THE DEPARTMENT OF PUBLIC INSTRUCTION, BOMBAY.

# A New Dictionary

OF THE

# MARÁTHÍ LANGUAGE.

COMPILED BY

RAGHUNÁTH BHASKAR GODBOLE



Bombay:
GOVERNMENT CENTRAL BOOK DEPÔT

1870.

Price 2½ Rupees.

# मराठी भाषेचा नवीन कोश.

हा ग्रंथ

रघुनाथ भास्कर गोडबोले यांनीं केला

तो

मेहेरबान विद्याखात्याचे डैरेक्टर यांच्या
हुकुमावरून छापिला.



मुंबई:
गव्हर्नमेन्ट सेन्ट्रल बुक डीपो.

---

सन १८७०.
शके १७९१.
किम्मत २॥· रुपये.

# PREFACE.

There is extant an excellent Dictionary of the Mahratti language prepared at Bombay by several learned Pundits with great labor and talent under the orders of the Bombay Government. Finding, however, that that Dictionary is so bulky that it cannot be carried about and consulted with convenience at all times, and that a great many Mahomedan words, which have, consequent on the rule of that nation over this country, crept into this language and have become almost a part of it, cannot by a reference to it be traced to their parentage, I had since many years entertained a hope of compiling a New Dictionary which would obviate the inconveniences mentioned above, and be a portable vocabulary fit for reference at all times to the old and young persons. This wish of mine has been accomplished by the goodness of God in as much as He has enabled me to go to the end of the arduous work I had commenced.

To those who would ask how such a bulky Dictionary could be compressed into a portable small volume, I would reply that such a thing became feasible in consequence of my having omitted the most difficult Sanscrit words which rarely occur in common language as well as those simple words which are easily understood by the generality and which bear no figurative meanings.

To such as would wish to know what end has been gained by abridging the old Mahratta Dictionary, I would say that I have added alphabetically to my present Dictionary the contents corrected and improved of a Vocabulary I had previously compiled under the name of Huns Kosh, so that the present work sets aside the necessity of reference to another work while reading the Mahratta poets. Moreover no previous Dictionaries attempted to show the origin of several Persian and Arabic words which have mixed with the Mahratta language.

The renderings of words are given in plain and easy terms, and they have after careful examination been approved by the Mahratta Translator and his Pundit.

The Director of Public Instruction of this Presidency wishes that this work should be one of general reference, and I am confident that it cannot be otherwise. My heartfelt prayer to God is that he would pour his blessing upon it so that that Gentleman's wish that it may become useful to the young and old may be accomplished.

RAGHUNÁTH BHASKAR GODBOLE.

# प्रस्तावना.

पूर्वी मुंबईमध्यें इंग्लिश सरकारचे आज्ञेवरून मोठाले पंडितांनीं मिळून मराठी भाषेचा कोश बहुत श्रम घेऊन व अपार बुद्धिसामर्थ्य खर्चून लिहिलेला अतिशयितच उत्तम आहे, परंतु तो फार मोठा असल्यामुळें हातांत वागवून फिरण्याची व पाहिजे तो शब्द पाहिजे तेव्हां पाहण्याची अगदीं सोय नसून यवनी राज्याच्या संबंधानें जे त्या भाषेचे शब्द मराठींत मिसळले आहेत केवळ ते मराठीच शब्द असे जें होऊन गेलें आहे त्याची महाराष्ट्र लोकांस कळायाजोगी निवड नाहीं; ह्या सर्व अडचणी दूर व्हावा व आबालवृद्धांस उपयोग घडावा असा कोश करण्याचें माझे मनांत फार दिवसांपासून होतें, त्याच हेतूनें सांप्रत हा कोश आरंभिलेला निर्विघ्नपणानें परमेश्वराच्या कृपेंकरून सिद्धीस लागला.

कोणी असें ह्मणेल कीं, पूर्वीचा एवढा मोठा कोश हातांत वागविण्याजोगा लाहान झाला कसा? तर असें समजावें कीं पूर्वीच्या कोशांत ज्यांचा नेहमींच्या भाषणांत उपयोग नाहीं असे फार अवघड जे शास्त्रीय संस्कृत शब्द होते ते व ज्यांचा अर्थ सहज मनांत येतो असे लाक्षणिकार्थावांचून असलेले साधारण मराठी शब्द ते, हे सर्व गाळून टाकल्यामुळें हा कोश हातांत वागविण्याजोगा झाला आहे.

पुन: अशी शंका होईल कीं, पूर्वीच्या कामांत होईल तितकी काटकसर करून ज्या अर्थी हा कोश तयार केला आहे त्या अर्थी यांत विशेष कांहीं नसेल? तर असें समजूं नये, कारण

जो मी पूर्वी कवितांमधील शब्दांचा हंसकोश नामक ग्रंथ केले-
ला नुकताच चांगल्या रीतीनें शोधून व आंत आणखी नवे शब्द
घालून तयार करून ठेवलेला ह्या कोशास वर्णानुक्रमानें ऐताच
जोडला आणि आजपावेतों मराठी भाषेचे कोश करणारे जित-
के झाले त्यांतून एकानेंही अरबी, फारशी शब्दांची निवड म-
राठी कोशांत केली नाहीं ती ह्यांत केली आहे. हाच ह्या को-
शांत विशेष आहे.

ह्या कोशांत शब्दांचे अर्थ जरी जुन्या कोशास अनुसरून
आहेत तरी होतील तितके सुलभ शब्दांनीं लवकर मनांत याव-
याजोगे केले आहेत व ते मराठी भाषांतर करणारे, अधिकारी
आणि त्यांचे पंडित यांणीं अक्षरशः तपासून पाहून मान्य केले
आहेत.

हा कोश सर्वत्र प्रचारांत आणावा ह्मणून मुंबई इलाख्यांतील
विद्याखात्याचे मुख्य अधिकारी मेहेरबान डायरेक्टर साहेब यांणीं
मनावर घेतलें आहे, यास्तव हा कोश आबालवृद्धांस पाहण्यास
उपयोगीं होण्यासारखा प्रसिद्ध होईलच, तर हा त्यांचा हेतु पूर्ण
पणें सिद्धीस जावा याविषयीं परमेश्वराजवळ मी प्रार्थना करीत
आहें.

ग्रंथकार.

# ह्या कोशांतील सांकेतिक शब्दांची सूचना.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| सं० | ह्मणजे | संस्कृत. | न० | == | नपुंसकलिंग. |
| प्रा० | == | प्राकृत. | ना० | == | नाम. |
| अर० | == | अरबी. | वि० | == | विशेषण. |
| फा० | == | फारशी. | किं० | == | किंवा. |
| सं. अप. | == | संस्कृताचा अपभ्रंश. | प्र० | == | प्रत्येकीं प्रयोग. |
| अ० | == | अथवा. | अव्य० | == | अव्यय. |
| ग्रं० | == | प्राकृत कवितांग्रंथांत. | धा.ना. | == | धातुसाधित नाम. |
| पु० | == | पुल्लिंग. | इ० | == | इत्यादि. |
| स्त्री० | == | स्त्रीलिंग. | उ० | == | उदाहरण. |

# मराठी भाषेचा नवीन कोश.





## -अ-

**अ** -हा वर्ण सर्व वर्णक्रमांत पहिला आहे व सोळा स्वरांत प्रथम स्वर आहे. (सं. अव्य.) ज्या संस्कृत शब्दाचें पहिलें अक्षर व्यंजन आहे, त्याच्या मागें याचा योग झाला असतां त्या अर्थाचा अभाव किंवा त्याशीं विरुद्धता अ० भिन्नता इ० दाखवितो आणि ज्या शब्दाचें पहिलें अक्षर स्वर आहे त्याच्या मागेंही याचा योग असतां अर्थ तोच परंतु एक नकार मध्यें अधिक शिरतो; जसें उ० नव्हे जो ब्राह्मण तो अब्राह्मण, ज्ञानाचा जो अभाव तें अज्ञान, आदराशीं विरुद्ध किंवा आदराहून भिन्न तो अनादर इ०.

**अँ** (अव्य०) कोणी कांहीं सांगितलेली गोष्ट चांगली ऐकण्यांत आली नसतां सांगणारास पुनः बोल अशा अर्थी याचा उच्चार करितात.

**अंः** (अव्य०) कोणी कांहीं सांगितलेली गोष्ट कि० केलेलें काम मनास आलें नसतां निषेधार्थी कि० तुच्छतार्थी याचा उच्चार करितात.

**अइनी** (स्त्री. ना.) (ग्रं०) पद्मा-आपणी.

**अइसा** (स्त्री. ना.) (ग्रं०) विष्णूची स्त्री जी लक्ष्मी ती.

**अक** (सं. न. ना.) दुःख. २ पाप.

**अंक** (सं. पु. ना.) अंकडा. २ चिन्ह. ३ मांडी.

**अकटोविकट** (सं. विकट) (वि०) आकारांत सुरेखपणा नसून जो पदार्थ फार मोठा तो.

**अँकडा** (सं. अंक) (पु. ना.) एक, दोन, तीन इ० संख्यांचीं चिन्हें तीं प्र०. २ एकाचे अंकासारिखा वांकविलेला खिळा तो. ३ विंचवाचा जो नांगडा तो.

**अँकडी** (अंकडा) (स्त्री. ना.) झाडाची खांदी, वस्त्र इ० ओढायाकरितां शेवटास वळविलेला खिळा बसवून किंवा अंगचाच तसा अवयव राखून जी वेळू इ० कांची काठी केली असत्ये ती.

**अंकण, अंकणा** (न. पु. ना.) (ग्रं०) पायांतील जें ब्रीद तें, तो ह्मणजे ब्रीदरूपानें जो कोणेकाचा शरीराकार धातु इ०कांचा करून पायांत घालितात तें तो.

**अंकणें** (सं. अंकन) (भा. ना.) कांहीं पदार्थ रेषा इ० चिन्हानें चिन्हित करणें. २ स्थळ इ०कावर रेषांनीं चित्र इ० उत्पन्न करणें

**अकर्म** ( सं. न. ना. ) दुष्कर्म.

**अकर्मा** ( सं. वि० ) ( ग्रं० ) कर्महीन. २ कर्मभ्रष्ट. ३ साहसकर्म करणारा.

**अकल्पनाकल्पतरु** ( सं. पु. ना. ) ( ग्रं० ) कल्पना नाहींशी करणारा जो कल्पवृक्ष तो.

**अकल्पित** (सं. अव्य०) पूर्वीं कल्पना केली नसतां किं० झाली नसतां.

**अकस** ( अर. पु. स्त्री. ना. ) द्वेष.

**अंकसळ-सळू** ( पु. ना. ) ( ग्रं० ) रुपें इ० धातु.

**अकस्मात्** ( सं. अव्य० ) अकल्पित.

**अकळतनकळत** ( अव्य० ) न समजतां.

**अकांत** ( सं. आक्रंदन ) ( पु. ना. ) उपद्रवकारकउष्ण, शीत इ० उपद्रवाचा अतिशय तो. २ त्याणें होतो जो दुःखातिशय तो आणि त्यासंबंधीं ओरडाओरडा तो.

**अकाबाई** ( सं. अक्का ) ( स्त्री. ना. ) लक्ष्मीची वडीलबहीण ती. २ दुर्दैव.

**अकारण** ( सं. वि० ) निष्कारण. २ ( अव्य० ) कारणावांचून किं० कारण नसतां.

**अकारमात्रा** ( सं. स्त्री. ना. ) (ग्रं०) प्रणवाची किं० ओंकाराची पहिली मात्रा ती.

**अकिंचन** ( सं. वि० ) दरिद्री.

**अंकित** ( सं. वि० ) चाकरी, उपकार इ० कारणामुळें जो कोणी ज्या कोणाची आज्ञा उल्लंघूं शकत नाहीं तो त्याचा. २ चिन्ह केलेला तो.

**अंकुर** ( सं. पु. ना. ) बीज इ० कांचा कोमल अवयव तो, मोड. २ लहान मुलाच्या अंगीं हें पुढें अमुक प्रकारचें होईल असा अर्थ जाणवणारें जें त्याच्या भाषणादिकांवरून चिन्ह दिसतें तें.

**अंकुश** ( सं. पु. ना. ) हत्तीच्या गंडस्थळावर टोचण्याचें उपयोगी एक शस्त्र आहे तो.

**अंकू** ( अंकित ) ( पु. ना. ) ( ग्रं० ) शिष्य, सेवक.

**अक्कड** (स्त्री. ना.) शूरपणा. इ० गुणांपासून उत्पन्न झालेला अभिमानाचा आकार जो बोलणें, चालणें इ०कांचेठायीं दिसायाजोगा असतो ती.

**अक्कल** (अर० स्त्री. ना.) बुद्धि.

**अक्कलहुशारीनें** (अव्य०) सावधपणानें, रोखा इ० लेखांत प्रसिद्धि.

**अक्राळविक्राळ** (वि०) भयंकर जो शरीराचा आकार किं० शब्द तो.

**अक्रीत** (न. ना.) अन्यायानें घेतलेलें मोल.

**अक्लेश** (सं. अव्य०) क्लेश न पडतां जितका लाभ व्हावयाचा त्यांत कांहीं न्यून न होतां. २ कांहीं अंश अवशिष्ट न राहतां.

**अकूसाबोकशी** (अव्य०) रडण्याचा वेग आटोपेनासा झाल्यामुळें जीव घाबरा होई अशा प्रकारें.

**अखंड** (सं. वि०) सबंध. २ (अव्य०) सदोदितपणें, मध्यें खंड न पडतां.

**अखडणें** (धा. ना.) पसरलेला वस्त्र, कागद इ० पदार्थ आटपून घेणें. २ संकोच पावणें.

**अखंडदंडायमान** (सं. वि०) ज्याचा पळ, घटिका, दिवस, वर्ष इ० कांनीं खंड अ० विभाग होत नाहीं तो.

**अखंडित** (सं. वि०) मध्यें ज्याचा खंड झाला नाहीं असें ज्ञान, संपत्ति इ० अर्थ तो.

**अखंडैकरस** (सं. पु. ना.) (ग्रं०) ब्रह्म.

**अखता** (सं. अप. स्त्री. ना.) (ग्रं०) अक्षता.

**अखत्यार** (अर० पु. ना.) मालकीप्रमाणें अधिकार तो.

**अखबर, बार** (अर० स्त्री. ना.) परराज्यादिकांतील लेखादिद्वारा येतें जें वर्त्तमान किं० बातमी ती.

**अखबरनवीस-नीस** (फा० पु. ना.) आपणास अखबर ल्याहावी ह्मणून परराज्यादिकांत जो राजे इ० कांनीं कोणी मनुष्य ठेविला असतो तो.

**अखम** (सं. अप. वि०)(ग्रं०) अक्षम. २ पंगु.

**अखर** (सं. अप. न. ना.)(ग्रं०) अक्षर. २ (प्रा०) गुरांची एके ठिकाणीं जमून बसण्याची जागा. ३ (फा० अव्य०) शेवटीं.

**अखलेख** (अव्य०) (ग्रं०) अनेकश. २ अखेलेखें.

**अखसें** (वि०) (ग्रं०) सर्व.

**अखा** (वि०) (ग्रं०) सगळा, सर्व.

**अखाडा** (पु. ना.) अड्डा.

**अखिल** (सं. वि०) सर्व.

**अँखें** (न. ना.) कंडाळ, पडशी इ० कांचे दोन दोन भागांतील एकेक भाग तें.

**अखेर** (फा० स्त्री. ना.) शेवट, समाप्ति. २ (वि०) शेवटील किं० शेवटला. ३ (अव्य०) शेवटीं.

**अखेलेखें** (अव्य०) (ग्रं०) वारंवार.

**अग** (सं. पु. ना.) पर्वत. २ वृक्ष. ३ (प्रा०) स्त्रीस संबोधन देतेवेळीं हें अव्यय ह्मणतात.

**अंग** (सं. न. ना.) शरीर, वस्त्र, इ० कांचा अवयव तें. २ शरीर. ३ गुदद्वार, योनि इ० कांवाटे जो मांसगोल बाहेर पडतो तें. ४ कोणेक कामांत कोणेकाचें अंग असणें ह्म० त्यांत त्याचें चित्त, अनुमोदन, पाठबळ, इ० असणें. ५ अंगावरपडणें ह्म० संसार इ० खटलें गळ्यांत पडणें किं० लाभासाठीं घेतलेला पदार्थादिक लाभदायक न होतां उगाच पोसावा लागणें इ०.

**अगई** (अव्य०) स्त्रियांचे भाषणांत भय, आश्चर्य यांचा उद्गार आहे.

**अंगघालणें** (धा. ना.) (ग्रं०) भूईवर पडून लोळण घेणें.

अंगचा (वि०) अंगावरील.२मनचा.

अंगछाया (सं. स्त्री. ना.) (ग्रं०) आश्रय. २ अंगाची जी सावली किं० कृपेची सावली ती.

अगटी (सं. अग्नि.) (स्त्री. ना.) शेकायासाठीं भूंवर किं० शेगडींत पेटवितात जो अग्नि ती.

अगड (स्त्री. ना.) (ग्रं०) लवणामधील वाट ती.

अगडतगड,दगड (न. ना.) अधिक उणें अमर्याद भाषण तें.

अगडबंब (वि०) फार जो लठ्ठ तो.

अगत्य (स. अगति) (अव्य०) निश्चयेंकरून. २ (न. ना.) पक्षपात, अभिमान, गरज.

अगत्यपूर्वक (सं.अव्य०)खचीतपणानें [समागम.

अगत्यवाद (सं. पु. ना.) अगत्यद्वितीयार्थी. [निरोगी.

अगद (सं.न.ना.) औषध. २ (वि०)

अंगदट (अंग, दृढ) (वि० ग्रं०) बळकट. [शेषरणानें

अगदीं (अव्य०) निःशेष. २ निः-

अंगधटाई (स्त्री. ना.) युक्ति सोडून अंगबळानें कांहीएक कार्य करण्याचा प्रयत्न ती.

अंगनघेणें (धा. ना. ग्रं०)पुढें न सरसावणें, किं० मागें सरणें.

अंगना (सं. स्त्री. ना.) स्त्री.

अंगपिळा (अंग पिळणें) (पु. ना.) अंगमोडा.

अंगबळ (न. ना.) अंगधटाई.

अंगमेहनत (स्त्री. ना.) शेतकी इ० कामांत जी अंगानें करायाची मेहनत अ० कष्ट ती.

अंगमोडा (अंग मोडणें) (पु. ना.) आळस इ० घालवायाकरितां हात, पाय इ०कांस देतात जो ताण तो.

अगम्य (सं. वि०) जावयास किं० जाणावयास अशक्य तो.

अगर (सं. अगरु) (पु. ना.) चंदनाची एक जाति आहे तो. २ (सं. आकर) (न. ना.) आगर. ३ (फा० अव्य०) अथवा, किंवा.

अगरडा, डें (सं. अग्र) (न. ना. ग्रं०) शेंडा, शेवट.

अंगराग (सं. पु. ना.) सुगंधि उटणें.

अगरी (स्त्री. ना.) (ग्रं०) शहरांतील पेठ.

अंगलग (अंग, लागणें) (पु. ग्रं०)

अंगलणें (धा. ना.ग्रं०)स्वाधीन होणें.

अंगली (सं.जांगुलीकरण) (स्त्री.ना.) औषधोपचार.

अंगलोट (पु. ना.) शरीरबांधा.

अंगवखा, खाँ (अव्य०) (ग्रं०) अंगावर.

अंगवटाँ (अव्य०) (ग्रं०) स्वाधीन.

अंगवठा (पु. ना.) अंगलोट.

अंगवण (स्त्री. ना.) (ग्रं०) अंगबळ, सामर्थ्य.

अंगवणियेचें (वि० ग्रं०) अलीकडचें.

अंगवणें (धा. ना. ग्रं०) मुकणें.

अंगवला (अव्य० ग्रं०) जवळ.

अंगवसें (न. ना. ग्रं०) रूप.

अंगविणें (ग्रा. ना. प्र०) अवरणें, मुकणें.

अंगसानें (न. ना. प्र०) लेंकरूं.

अगस्ती (पु. ना. प्र०) देहाचा अभिमान.

अंगहीन (स्त्री. ना. प्र०) वेश्या, कञ्चनीण. २ (स. वि०) पंगु.

अगा (स. अव्य०) पुरुषाचें संबोधन. (स्त्री. ना.) भोंरण. ३ ध्यास.

अगाई (अव्य०) अगई. [अगोदर.

अगाऊ (अव्य०) आधीं, पहिल्यानें,

अगांतुकी (स. आगन्तुक) (स्त्री. ना.) लग्नादि समारंभांत अन्न किं० दक्षिणा यांची जी याचना ती.

अगांतुक (स. आगन्तुक) (पु. ना.) अगांतुकी करतो तो.

अगाध (स. वि.) खोल. २ दुःशक.

अगार (स. न. ना.) घर.

अंगारा (स. अगार) (पु. ना.) देवाच्या धूपारतीतील राख प्रसाद म्हणून कपाळ, अंग इ० कांस लावितात तो अ० मंतरलेलें भस्म किं० राख तो. २ दाणा काळा पडणें असा जोंधळ्यावर पडतो रोग तो. कोणेकास अंगारा लावणें म्ह० त्यास आशा लावून मग त्याची निराशा करणें.

अगारामेर (स्त्री. ना. प्र०) शेताची कड ती.

अंगिक (न. प्र०) बळ.

अंगिकभाव (पु. ना. प्र०) शरीराची आकृति.

अगियाळें (स. अग्नि, आलय) (न. ना. प्र०) कुंड.

अंगिसुनी (वि० प्र०) निश्चळ.

अंगिकार (स. पु. ना.) स्वीकार.

अंगींपडणें (ग्रा. ना. प्र०) साध्य होणें, करणें. २ कोणेक गोष्टीची सवय पडणें.

अगुणीअष्टधाप्रकृति (स. स्त्री. ना. प्र०) अष्टधा प्रकृतीतून तीन गुण कमी केल्यानें शेष राहिले पांच या अर्थाकरून पंच महाभूतें.

अंगुली (स. स्त्री. ना.) बोट.

अंगुस्तन (स. अंगुलित्राण) (न. ना.) तीर मारतांना किं० शिवण्याचें काम करितांना बोटास इजा न व्हावी म्हणून जें कातडें किं० पितळ इ० धातु यांचें टोपण करितात तें.

अंगूर (फा० पु. ना.) द्राक्ष.

अंगूळवेढें (न. ना.) हाताचे बोटास कांहीं लागून म्हणून दुःख होतें तें.

अगेमागे (अव्य०) पुढेंमागें किं० मागेंपुढें. [साष्टांगनमन.

अंगेष्टी (अंग, अष्ट) (प्र० स्त्री. ना.)

अगोठ (स्त्री. ना.) पर्जन्यकाळाच्या आरंभींचा काळ किं० सर्व पर्जन्यकाळ तो.

अगोन (वि०) (प्र०) अगाऊरला.

अग्न (सं. पु. ना.) अग्नि.

अग्नि (स. पु. ना.) पंच महाभूतांतील तेजोरूप तिसरें भूत तो.

२ विस्तव, एकाद्यावर अग्नीचा पाऊस पडणें इ० त्यावर अनेक अनर्थ गुदरणें.

**अग्निकाष्ठ** (सं. न. ना.) पेटलेलें लांकूड. २ कोणेकानें अग्निकाष्ठ खाणें, भक्षिण इ० मरणासाठीं अग्नीत प्रवेश करणें.

**अग्निस्थान** (सं. न. ना. ग्रं०) दोंहीं भिंवयांमधील योगशास्त्रोक्तस्थान तें.

**अग्निहोत्र** (सं. न. ना.) वेदाध्ययनाचे अधिकारी ब्राह्मणादिक यांनीं अग्नि बाळगून सांज सकाळ होम करावा असें जें कर्म तें.

**अग्र** (सं. न. ना.) पदार्थमात्राचा शेवटला भाग तें. २ पुढचा जो भाग तें.

**अग्रगण्य** (सं. वि०) श्रेष्ठ.

**अग्रधान्य** (सं. न. ना.) पावसाळ्यांत प्रथम पिकणारीं धान्यें तीं प्रत्येकीं.

**अग्रसर** (सं. वि०) अग्रगण्य.

**अग्रहार, अग्राहार** (सं. पु. ना.) ब्राह्मणाचें कुटुंब पोषण व्हावें म्हणून ईश्वरप्रीत्यर्थ जो गांव किं० जमीन त्यास देतात तो.

**अघ** (सं. न. ना.) पाप.

**अघटित** (सं. वि०) घडण्यास कठीण तें.

**अघवा** (वि० ग्रं०) सर्व.

**अघवाबाट** (अघ वाट) (स्त्री. ना.) (ग्रं०) पापाचा मार्ग. २ विषयाचें सेवन तो.

**अघळपघळ** (अव्य०) शरीर, मन इ० कांच्या मोकळेपणानें करणें बोलणें इ० कांचें वि०.

**अघाडी** (स्त्री. ना.) पुढचा भाग ती. २ घोड्यास बांधायाची पुढील भागची दोरी ती.

**अघाडीपिछाडी** (स्त्री. ना.) पुढील व मागील भाग ती. २ घोड्याची पुढली व मागली दोरी ती.

**अघोर** (सं. वि०) फार भयंकर. २ बिनघोर.

**अंघ्री** (सं. पु. ना.) पाय.

**अग्रो** (म. अप. पु. ना.) आग्रह.

**अचकटविचकट** (वि०) शिव्या इ० दुर्भाषण तें.

**अचर्च** (अ, चर्चा) (पु. ना.) (ग्रं०) ज्याचें नांव स्त्रियांनीं घेऊन चर्चा करूं नये असा जो त्यांचा पति तो.

**अचपळ** (वि०) उत्पाती, खोडकर.

**अचंबा** (पु. ना.) आश्चर्य, नवल.

**अचल,ळ** (सं. पु. ना.) पर्वत. २ (वि०) ज्यास चलन नाहीं तो.

**अँचळ** (सं. अचल.) (पु. ना.) वस्त्रादिकांचा पदर तो. २ गाय, म्हैस इ० कांचा जो स्तन तो.

**अचाट** (वि०) अतिरिक्त, अतिशय. २ विलक्षण.

**अचानक** (अव्य०) अकस्मात्. २ अचकपणानें. ३ अलादी.

**अचावाचा** (वि०) यद्वा तद्वा, अद्वा तद्वा. २ अमर्याद.

**अचुंगळ, अचंगूळ** (वि० ग्रं०) कृपण. २ भ्रष्ट, अनाचारी.

**अचूक** (वि०) बिनचूक. २ अलाद.

**अज** (सं. पु. ना.) ईश्वर. २ बोकड

**अजगर** (सं. पु ना.) अार ह्मणून जो मोठा सर्प तो.

**अंजन** ( सं. न. ना.) काजळ. २ नेत्रानें स्वच्छ दिसावें किं० मस्तकांतील शैत्य जावें, अ० भुयींत पुरलेलें द्रव्यादिक दिसावें ह्मणून डोळ्यांत जें औषध घालितात तें. ३ गुरुकृपा अ० ईश्वरप्रसाद ज्याच्या योगानें यथार्थ ज्ञानदृष्टिप्राप्त होत्ये तें

**अजपा** (सं.स्त्री. ना.) जप करण्याचा आयास नसतां जप होतो जीचा असी जी श्वासोच्छ्वासात्मका हंसगायत्री ती.

**अजम** (प्रा० पु. ना.) जोर. २(अर० वि०) महाश्रेष्ठ, हा शब्द काग. दो पत्रीं कामगारास लिहितात.

**अजमावणें** (प्रा० धा. ना.) परिक्षून पाहणें. २ अजमासून पाहणें.

**अजमास** (फा० पु. ना.) सुमार, अटकळ, सरासरी. [तो.

**अजस्र** (न. ना.) फार मोठा पदार्थ

**अजा** (सं. स्त्री. ना.) शेळी.२माया.

**अजागळ** (सं. अजागलस्तन) (पु. ना.) निरूपयोगी जो मनुष्यादिक तो.

**अजातशत्रु** (सं. वि०) ज्यास कोणी शत्रु नाहीं तो किं० दुसरा कोणी शत्रुत्व करूं लागला तरी जो आपण स्वतः तसें करीत नाहीं तो.

**अजार** (फा. पु. ना.) दुःख, दुखणें.

**अजित** (सं. पु. ना.) परमेश्वर.

**अजिन** (सं. न. ना.) मृगचर्म.

**अजीं, अजीबाद** (अव्य०) अगदीं मुदलीं.

**अंजीर** (सं. किं० फा०) (पु.ना.) एक फळ आहे त्याचें झाड तें.

**अजीर्ण** (सं. न. ना.) भक्षिलेलें अन्न न जिरल्यानें विकार होतो तें.

**अजुर्दा** (फा० वि० ) उदासीन.

**अजून** (अव्य०) अद्यापि.

**अजूरदार** (फा. पु. ना.) जासूद.

**अजूरा** (अर. पु. ना.) जासुदाची मजूरी तो.

**अजेक** (प्रा. स्त्री. ना.) (ग्रं०)ममता.

**अट** (स्त्री. ना.) अटक. २ विण्याचा सूर उंच होण्यास घोडी लावितात ती. ३ दुराग्रह. ४ करार चुकल्यास अमूक व्याज देईन असी रोखे इ० लेखांत कूळ इ० कापासून नड लिहून घेतात ती.

**अटक** (स्त्री. ना.) प्रतिबंध. २ बंदीशाळा. ३ एक नदी आहे ती.

**अटकळ** ( स्त्री. ना. ) अजमास, सुमार. [अनुमानधपका.

**अटकळपंचविशी** (प्रा० स्त्री० ना०)

**अटकळणें** (धा० ना.) अडखळणें, अडणें. [बंध, अडकाठी.

**अटकाव** ( प्रा० पु. ना. ) प्रति-

**अटकू** ( प्रा० वि० ) (ग्रं०) बाधक.

**अटकें** ( प्रा० न० ना० ) विड्याच्या पानाचें अंखें.

अडसणें (धा. ना. ग्रं०) आडवसणें

अडसंधि (स्त्री. ना.) शरीरांतील अडचणींची जागा ती.

अडसो (पु. ना. ग्र०) खोळंबा.

अडळ,ळू (पु. ना. ग्र०) अटकाव. २ स्पर्श. [२ स्पर्शणें.

अडळणें (धा. ना. ग्र०) अडखळणें.

अडाखा (पु.ना.)मेळ,ताळा, कांटा

अडीमोडी (स्त्री.ना.)(ग्र०)अंगाविळा

अडेल (वि०) अटखोर. २ दुराग्रही.

अडोशींपडोशीं (अव्य०) आसपास, आजूबाजूस.

अडोसा (पु. ना.) दृष्टीस प्रतिबंध करण्याकरितां जो मध्यें कांहीं आड लावून प्रतिबंध करितात तो.

अड्डा (पु. ना.) गाड्या, घोडीं, मेणे डोल्या, इ० भाड्यानें ज्या स्थळीं मिळतात तें स्थळ तो.

अढळणें (धा. ना.) आपण केवळ त्यासाठीं पाहात नसतां सहजीं तो विषय दृष्टीस पडणें.

अढा (पु. ना.) मोठ्या दोरीस जी अढी पडल्ये तो.

अढावा (पु. ना.) खतावणीवरून जें येणें देणें उतरून झाडा काढितात तो.

अढी (स्त्री. ना.) आंबे इ० पिकण्यास जें खालवर गवत इ० घालून रचनाविशेष करितात ती. २ दोरींत दोरी अडकविण्यासाठीं जी गांठ इ० आकृतिविशेष करितात ती. ३ पाय लांब पसरून एकावर एक चढविल्यानें होतो जो आकार तो. ४ कोणेकाविषयीं आपले मनांत जो विरुद्ध भाव असतो तो.

अढें (न. ना.) घराच्या दोहों पाख्यांमध्यें जें मधोमध लांब लाकूड घालितात तें. [पिळें.

अढेवेढे (पु. ना.) अडफाटे. २ अळे-

अणकुची (स्त्री. ना.) अणी. २ टोंक.

अणखी (अव्य०) अणीक. २ पुन: ३ आणि. [२ (न.) अग्र.

अणियाळें (वि० ग्र०) अणीदार.

अणी (स्त्री. ना.) शस्त्रादिकांचे शेवटाकडील बारीक टोंक ती.

अणीक (अव्य०) अणखी २ पुन:

अणीवाणी (स्त्री. ना.) कोणेककार्य सिद्ध होण्याची जवळ आलेली स्थिति ती. २ क्रोधादिकामुळें भाषणाची मर्यादा सुटून शिवीगाळ, अरे तुरे, इ० करून मारामारीवर येण्याची अवस्था ती. [पणानें.

अणुआर (अव्य० ग्र०) चाराचूर-

अणुमात्र (स. वि०) किंचिन्मात्र.

अणुरेणु (स. पु. ना.) गवाक्ष इ० कातून पडलेल्या सूर्यकिरणांत दृष्टीस पडतात असे जे फार सूक्ष्म पृथ्वीचे अंश ते प्र०.

अंत (सं. पु. ना) पदार्थमात्राची समाप्ति जेथें होत्ये तो. २ नाश. ३ शेवट. ४ (अव्य०) पर्यंत, पावेतों.

अतएव (स. अव्य०)याचकारणास्तव

अंतक (सं. पु. ना.) यम. २ जोश्या-

च्या संहार करणारा तो यावा.

**अंतःकरण** (स. न. ना.) (ग्रं०) निर्विकल्प जें स्फुरण तें. २ मन, बुद्धि, चित्त, अहंकार अशा ज्या चार जीववृत्ति आहेत त्या प्रत्येकीं.

**अतणें** (धा. ना.) (ग्रं०) दडपणें.

**अतत्यायी** (वि.)साहसकर्म करणारा.

**अतःपर** (सं. अव्य०) पुनः

**अंतःपाती** (स. वि०) इच्छित समुदायांतला.

**अंतपार** (सं. पु. ना.) कोणेकपदार्थाची इयत्ता समजण्यास कारण जो त्याचा परम अवधि तो.

**अंतःपुर** (सं. न. ना.) राजादिकांचे स्त्रियांची जी राहण्याची जागा तें.

**अंतर** (सं. न. ना.) दोन पदार्थांच्यामधील अवकाश तें. २ अधिक उणेपणा. ३ चुकी. ४ बाकी. ५ अंतर्याम. ६ खंड. ७ इतर. कोणीकोणास अंतर देणें. म्ह० सोडणें किं० भेद देणें.

**अंतरंग** (सं. वि०) जिवलग. २ जवळचा.

**अंतरणें** (धा. ना.) कांहींएक कर्माचा समय प्राप्त झाला असतां तें न करितां तो समय अतिक्रांत करणें. किं० तें कर्म त्या समयीं न करितां तसेंच ठेवणें. २ मुकणें.

**अंतरपाट** (सं. अंतःपट) (पु. ना.) लग्नसमयीं वधूवरांमध्यें किं० मुंजीचे समयीं बटु आणि आचार्य यांमध्यें जो वस्त्राचा पडदा धरितात तो.

**अंतरसाल** (सं. स्त्री. ना.) वृक्षादिकांचे केवळ बाहेरील सालीचे आंतील जी साल ती.

**अंतरसाक्ष,साक्षी** (सं. पु. ना.) अंतर्यामाचा साक्षी जो ईश्वर, योगी, किं० आपला आपण तो.

**अंतरात्मा** (सं. पु. ना.) जीवात्मा. २ परमात्मा.

**अंतराय** (सं. पु. ना.) विघ्न.

**अंतराल, ळ** (सं. न. ना.) पृथ्वी आणि आकाश यांमधील पोकळी तें. २ आकाश तें.

**अंतरिक्ष** (सं. न. ना.) अंतराल.

**अंतर्गत** (सं. वि०) आंतील.

**अंतर्धान** (सं. न. ना.) गुप्त होण्याची अवस्था तें.

**अंतर्बाह्य** (सं. अव्य०) आंत आणि बाहेर.

**अंतर्याम** (सं. न. ना.) अंतःकरण.

**अंतर्यामी** (सं. पु. ना.) अंतरसाक्ष, साक्षी.

**अंतर्वेदी** (सं. स्त्री. ना.) भागीरथी व यमुना यांमधील देश ती.

**अतसबाजी** (फा. स्त्री. ना.) नळे, चंद्रज्योती इ० दारू जाळून जो खेळ करितात ती

**अंतस्थ** (सं. न. ना.) सरकार इ० कडून आपलें काम ज्याचे हातून होतें त्याचे भार्जवासाठीं जें गुप्तरूपेंकरून द्रव्य ज्यास लांच म्हणतात तो देणें तें. २ (वि०) आंतील.

**अतळस** (पु. ना.) (ग्रं०) परिमळ.
**अतिकाळ** ( सं. पु. ना. ) उशीर, अवेळ.
**अतिक्रम** (सं. पु. ना.) गमनानें पूर्वस्थानाचा त्याग घडतो तो. २ गुरु, शास्त्र इ० कांचा अनादर तो.
**अंतिगिळ** (अंती, गिळणं) (पु. ना.) (ग्रं०) सृष्टीचा संहार अ० प्रलय.
**अतिथि** (सं. पु. ना.) भोजनसमयीं भोजनार्थ येतो पांथस्थ तो.
**अतिरिक्त** (सं. वि.) अतिशयित.
**अतिशय** (सं. पु. ना.) अतिरिक्तपणा. २ (वि०) फार.
**अतिशयित** (सं. वि०) फार.
**अतिशयोक्ति** (सं. स्त्री. ना.) स्वाभाविक गुणादि जो ज्यांत आहे तो त्याहून अधिक करून सांगणें तें.
**अतिसार** (सं. पु. ना.) मलविसर्गाचा अतिशय असा एक रोग आहे तो.
**अतिसो** (पु. ना.) (ग्रं०) अतिशय.
**अतीतअभ्यागत** (सं. अप. पु. ना.) अतिथि अभ्यागत ह्म० अतिथि, गोसावी, बैरागी इ० तो.
**अतींद्रिय** (सं. वि०) इंद्रियांस अगोचर.
**अतुडणें** (प्रा. धा. ना.) (ग्रं०) सांपडणें.
**अंतुरी** (सं. अंतरंग.) ( स्त्री. ना. ) (ग्रं०) भार्या.
**अतुर्बळ,बळी** (वि०) (ग्रं०) शक्तिमान्.
**अतुल** ( सं. वि०) ज्यास तुळणा नाहीं तो.
**अतुवट** (वि०) (ग्रं०) गुह्य, गुप्त.
**अतेबुरी** (प्रा. न. ना.) (ग्रं०) टक्कल.
**अतेत्र** (वि०) (ग्रं०) मूर्तिमंत.
**अतोनात** (अव्य०) बहुतप्रकारें.
**अत्तर** (अर. न. ना.) चंदनादि द्रव्याचा अर्क तें.
**अंत्यज** (सं. पु. ना.) महार.
**अत्यंत** (सं. अव्य०) अतिशयेंकरून
**अत्रप** (वि०) कार्यास पुरून अधिक तो.
**अथणें** (सं. आस्ति) (धा. ना.) असणें.
**अथरणें** (सं. आस्तरण) (धा. ना.) बसणें किं० निजणें यासाठीं वस्त्र-जी इ० पसरणें. २ त्या योगानें भूमि आच्छादित करणें.
**अंथरी** (अंथरणें) (स्त्री. ना.) पाल्या, गवत इ० विणून अंथरायास जी चटई इ० करितात ती.
**अथाक,थांग** (वि०) थांग, ठिकाण, तळ यांचा अंत नसलेलें.
**अथाव** (वि०) (ग्रं.) खोल.
**अथिल** (सं. आस्तिक) (वि०) (ग्रं०) योग्य.
**अथिला(अथिल)** (वि०)(ग्रं०)योग्य, थोर, समर्थ, भाग्याचा.
**अथिलीथडी** (अथिल) (स्त्री. ना.) (ग्रं०) आस्तिक्यबुद्धि.
**अथी** (सं. आस्ति) (क्रि०) (ग्रं) आहे.
**अदपशीर** (अर० वि०) पडदा इ० कानें आच्छादित असलेला. २ सुरक्षित किं० मर्यादेनें राहिलेला.

अदमुरें (अर्धमुरणें) (न. ना.) अर्ध-वट विरजलेलें दहीं तें.

अदलाबदल (प्रा. स्त्री. ना.) याचा त्याला, त्याचा याला इ० प्रकारें पदार्थ बदलण्याचा प्रकार तो.

अदालत (अर० स्त्री. ना.) न्यायसभा.

अदावत (अर० स्त्री. ना०) कोणे-कावर दोष नसून द्वेषामुळें कल्पून दोषारोप करणें ती.

अंदुक (सं. पु. ना.) हत्तींची पायां-तील सांकळ, बेडी तो.

अंदुज (प्रा. पु. ना.) (ग्रं०) हड्यांव-र्ण रोग तो.

अदृष्ट (सं. न. ना.) प्रारब्धकर्म तें. २ कपाळास ह्मणतात. ३ (वि०) पाहिलेला नाहीं तो.

अंदेशा (फा. पु. ना.) संशय.

अद्दल (अर० स्त्री. ना.) कांहीं केल्याकर्माबद्दल तसें कर्म पुनः यावज्जन्म करूं नये असा संस्कार राहायाजोगें होतें कांहीं शासन तें. २ (वि०) किंचिन्मात्रही न्यून नाहीं असें माप, वजन इ० तें. ३ अट्टल.

अद्भुत (सं. वि०) अपूर्व, आश्चर्यकारक.

अद्याप,पी (सं. अव्य०) हावेळ पावेतों.

अद्रि (सं. पु. ना.) पर्वत.

अद्वातद्वा (सं यद्वातद्वा) (अव्य०) नाळतंत्र सोडून मनस्वीपणानें.

अद्वितीय (सं. वि०) ज्यासारखा दुसरा कोणी नाहीं तो किं० ज्यास सोबती नाहीं तो.

अंध (सं. वि०) आंधळा. [जोगा तो.

अंधक (सं. वि०) मंद दिसण्या-

अंधकार (सं. पु. ना.) प्रकाशाचा अभाव तो. २ कांहीं एक व्यवहाराच्या उपयोगीं जें शास्त्रादि ज्ञान त्याचा अभाव तो. [पळणें.

अधपणें (प्रा. भा. ना.) (ग्रं०) हीर-

अंधपरंपरा (सं. स्त्री. ना.) एकानें केलेलें पाहून दुसऱ्यानें करावें, दुसऱ्याचें पाहून तिसऱ्यानें करावें, परंतु हें मी करितों कशासाठीं व यांत फल काय इ० विचार न करितां कर्म करीत असावें असा चालतो जो परिपाठ तो.

अधम (सं. वि०) उत्तम, व मध्यम यांहून खालचा तो. २ दीनजनाची हिंसा, मातापितरांचा विरोध इ० लोक,शास्त्रविरुद्ध कर्म तें. किं० तें करणारा तो. [खालचा.

अधर (सं. पु. ना.) ओंठ. २ (वि०)

अधलंडमधलंड (वि०) मूर्ख, विद्वान्, गृहस्थ, भिक्षुक, खरें, खोटें इ० अनेक ज्या दोन दोन कोट्या त्यांत एके कोटींतही भरपणें ज्याची गणना करण्याची योग्यता नाहीं असा तो. [चीन नव्हे तो.

अधवा-ऱ्याचा (वि०) अर्वाचीन, प्रा-

अधाडा (प्रा. पु. ना.) (ग्रं०) मध्य-भाग.

अधाडां, अधाडें (प्रा. अव्य०) मध्यें.

अधाधिणें (प्रा. धा. ना.) (ग्रं०) भेडसावणें.

अंधाधुंद (प्रा. वि०) अंधाधुंदी ज्यांत आहे असें जें राज्य, कारभार इ० तो.

अंधाधुंदी, धी (प्रा. स्त्री. ना.) सेवक, पुत्र इ० कांनीं धनी, वडील यांचे भय वागवूं नये असा संसार, राज्य, व्यवहार व त्याची काळजी म्हणजे भदा किती खर्च किती इ०कांचा विचार न करितां ज्याला जसें पाहिजे तसें त्यानें वर्तावें, धनी इ०कांनींहि त्याचें निवारण कि० त्याविषयीं विचार न करितां आपले मनास येईल तसें वर्तावें अशी जी राज्यादि व्यवहारांत अव्यवस्था चालते ती.

अंधार (पु. ना.) अंधकार.

अंधारी (अंधार) (स्त्री. ना.) पावसाच्या ढगांनीं जो अंधार पडतो ती. २ घोड्याचे डोळ्यांस आच्छादन करण्याचें वस्त्र असतें तें. ३ पित्त झाल्यामुळें डोळ्यांपुढें कांहीं दिसेनासें होऊन नेत्रांपुढें भासतो अंधार तो.

अधाशी, सी (प्रा. वि०) आपल्या शक्तीपेक्षां अधिक खाण्याचा ज्याचा स्वभाव तो; किं० क्षुधेपेक्षां पात्रावर अधिक अन्न घेण्याचा ज्याला सोस तो.

अधिक (स. वि०) मोठा, फार, इ. ज्यास्त.

'अधिकभेट (अधिक, भेटणें) (स्त्री. ना.) (ग्रं०) साक्षात्कार.

अधिकार (सं. पु. ना.) पदवी. २ योग्यता.

अधिगत (सं. वि०) प्राप्त. २ ज्ञात.

अधिगम (सं. पु. ना.) प्राप्ति.

अधिप (सं. पु. ना.) राजा, धनी, स्वामी.

अधिपति (पु. ना.) अधिप.

अधिष्ठान (स. न. ना.) प्रभुत्व इ० रूप स्वशक्तीच्या योगानें कि० शरीरानें ज्या स्थानास जो व्यापून राहतो तें त्याचें. २ ज्या अधिकरणरूप वस्तूवर जो कांहीं पदार्थाचा भ्रम होतो तें त्याचें.

अधीन (स. वि०) जो ज्याचे सत्तेखालीं वर्ततो तो त्याचे.

अधुरा (वि०) अपुर्ता.

अधू (वि०) जें कार्य करण्याविषयीं ज्याचें सामर्थ्य उणें झालें आहे असा जो अवयव तो कि० तसा अवयवाचा मनुष्य तो.

अंधेर (पु. ना.) अंधार.

अधोमुख (स. वि०) ज्याचें तोंड खालीं आहे तो कि० लज्जा इ० कारणानें ज्याचें तोंड खालीं झालें आहे तो.

अधोर्ध्व (सं. अव्य०) वर खालीं. २ (ग्रं०) (पु. ना.) श्वासोच्छ्वासास म्हणतात. ३ स्थितिरूप अवस्था. ४ प्रकृति पुरुष.

अध्ययन (स. न. ना.) वेदशास्त्रादिकांचें पठन. २ पढलेलें जें शास्त्रादिक तें.

अध्यक्ष (सं. वि०) ज्या व्यवहाराचा धनीपणा ज्याकडे आहे तो त्याचा.

अध्यात्म (सं. न. ना.) ब्रह्मज्ञान.

अध्याय (सं. पु. ना.) पुराणादि ग्रंथांतील अनेक खंड केले असतात ते प्रत्येकीं. [रील पदादि घेणें.

अध्याहार (सं. पु. ना.) वाक्यांत बाहे-

अध्याहृत (सं. वि०) तसा पदादि घेतलेला तो.

अध्वर (सं. पु. ना.) यज्ञ.

अध्वर्यु (सं. पु. ना.) यज्ञामधील एक ऋत्विज आहे. २ राज्यादिकांमध्यें जो कोणेक अधिकाऱ्याचा मुख्य हस्तक असतो तो. [उनिरुपद्रव.

अनकळीत (वि०) (ग्रं०) अक्लेश.

अनंग (सं. पु. ना.) मदन.

अनघ (सं. वि०) निष्पाप.

अनंत (सं. वि०) ज्यास अंत नाहीं तो. २ ईश्वर. ३ पुराणप्रसिद्ध एक नाग आहे तो. ४ चोदा गांठीचा रेशमाचा दोरा पुजायास करितात तो. ५ एक कर्णभूषण आहे.

अननस (न. ना.) एक फळ आहे.

अनन्वित (सं. वि०) ज्याचा अन्वय यथास्थित जुळत नाहीं असें भाषण ग्रंथ इत्यादि तो. २ शास्त्र आणि लोकव्यवहार यांस विरुद्ध जें कर्म तें.

अनमान (अ, मान) (पु. ना.) जें कांहीं कर्म करणें प्राप्त झालें आहे त्याविषयीं अनादरबुद्धि तो.

अनमानधपका (अनुमान, धपका) (पु. ना.) अटकळपंचविशी.

अनराहटी (स्त्री. ना.) (ग्रं०) कुमार्ग.

अनर्गल, ळ (सं. वि०) ज्यास कोणतेंही कर्म करण्यास अडकाठी कोणतीच नाहीं असा जो मनस्वी तो.

अनर्थ (सं. पु. ना.) जेणेंकरून सर्वस्व नाश होतो आणि मनुष्यादिक केवळ घाबरे होतात असें चोरभय, अतिवृष्टि इ० महासंकटें तीं. किं० त्या उपद्रवांचा अतिशय तो. २ कांहींएक क्रिया, गुण इ०कांची जी सामान्य मर्यादा तिचें उल्लंघन होण्याजोगा जो त्या त्या क्रियांचा अतिशय तो. उ० तूं एका दिवसांत पांचशें श्लोक लिहिलेस तस्मात् अनर्थ केलास. ३ अर्थ नव्हे तो.

अनल (सं. पु. ना.) अग्नि. [नाहीं तो.

अनलस (सं. वि०) ज्यास आळस

अनवरत (प्रा. अव्य०) (ग्रं०) निरंतर.

अनवसर (पु. ना.) (ग्रं०) असमय. २ दुष्काळ. ३ विस्मरण.

अनवस्था (सं. स्त्री. ना.) प्रश्नोत्तरादिक जो क्रम त्याचे समाप्तीस कोठेंच अवधि मिळूं नये अशी जी त्या त्या व्यवहारास अवस्था प्राप्त होत्ये ती. उ० परमाणूस निरवयवत्व न मानिल्यास त्याचा अवयव, पुनः त्याचा अवयव, पुनः त्याचा अवयव, अशी कल्पना ती. २ स्थिति होण्याचीं जीं अनेक स्थलें त्यांतून एकाही स्थळीं स्थिति न पावल्यामुळें निराश्रितरूप दशा प्राप्त होत्ये ती. उ० पुरतें वैराग्य न होतां हठानें विषयत्याग केला अस-

ता अंतःकरणाची अनवस्था मात्र होईल.

**अनवाणी, वाहणी** (अ, वाहणा) (वि०) चालण्याचे प्रसंगीं जोडा, वाहाण इ० पायांत नसल्यावांचून जो मनुष्यादिक तो.

**अनशेपोटीं** (सं. अनशन) (अव्य०) जेवल्यावांचून अशा पोटानें.

**अनसाईपण** (प्रा. न. ना.) (ग्रं०) असहनता.

**अनसूट** (सं. अनुच्छिष्ट) (वि०) कोणेक पदार्थांतलि कांहीं अंशाचाही उपभोग, व्यय केल्यावांचून तशाचा तसाच ठेविलेला, आणिलेला, पाणी, दुभतें, धान्य इ० तो.

**अनागत** (सं. वि०) पुढें होणारा.

**अनाठायीं** (अ, ठाय) (अव्य०) द्रव्यादिकांचा विनियोग जेथें केला असतां इहलोकीं किं० परलोकीं कांहीं फळ व्हावयाचें नाहीं असें जें अपात्ररूप स्थान त्याचेठायीं.

**अनाथ** (सं. वि०) ज्याचा सांभाळ करणारा माता पितर, धनी इ० कोणी नाहीं असा तो.

**अनादि** (सं. वि०) हा अमुक काळापासून प्रवृत्त झाला असा कालरूप अवधि ज्यास नाहीं तो, ईश्वर, माया इ०. २ ज्याच्या आरंभकाळाचा थांग नाहीं असा जो चिरंतन ग्रंथ वेदादि तो.

**अनादिठाव, ठावो** (पु. ना.) (ग्रं०) कर्मभूमीस संकेतानें म्हणतात, कर्मभूमि म्ह० मृत्युलोक. २ परब्रह्म.

**अनादिसिद्ध** (सं. वि०) कोणी मनुष्यादिकांनी केलेला नव्हे असा ईश्वरनिर्मित किं० स्वतः सिद्ध तो.

**अनान** (अन्य, अन्य) (वि०) (ग्रं०) निरनिराळा.

**अनामत** (अर० स्त्री. ना.) आपलें द्रव्यादिक दुसऱ्यापाशीं ठेव म्हणून ठेवतात तो. २ (अव्य०) वादी, प्रतिवादी इ०क कोणेक विषयावर अनेक सत्ता करणारे त्या सर्वांच्या सत्तेवाहेर तिऱ्हाइताकडे जो विषय ठेवणें, असणें तो. ३ कोणेक विषयाचे जे अनेक विभागी त्यांनी आपआपला वांटून न घेतां ठेवलेला जो पदार्थ मोघमात तो. ४ अचळ.

**अनार** (पु. ना.) दाळिंब.

**अनारिसें** (अन्य) (वि०) (ग्रं०) भिन्न, निराळें.

**अनार्य** (सं. वि०) आर्य किं० श्रेष्ठ नव्हे तो म्ह० नीच.

**अनिर्वचनीय** (सं. वि०) ज्याचें निर्वचन करितां येत नाहीं असा जो ईश्वरमहिमा, पराकाष्ठेचें दुःख इ० तो.

**अनिर्वाच्य** (सं. वि०) अनिर्वचनीय.

**अनिल** (सं. पु. ना.) वायु.

**अनिवार** (सं. वि०) अतिशयित.

**अनिष्ट** (सं. वि०) इष्ट नव्हे तो, प्रतिकूळ.

**अनु** (सं. अव्य०) हा संस्कृत उपसर्ग आहे, याचा अर्थ मागून असा

आहे. २ (ग्र०) (वि०) अन्य.

अनुकंपा (स. स्त्री. ना.) दया.

अनुकरण (स. न. ना.) कोणेकाचे कृतीसारखी कृति किं० शब्दासारिखा शब्द दुसरा कोणी करतो ते.

अनुकार (स. पु. ना.) अनुकरण. २ (ग्र०) भसाद्दश आकार. ३ सम्प्रदाय.

अनुकूल,ळ (स. वि.) कोणेक कार्याचा ज्याच्या योगाने उत्कर्ष होतो त्यास तो. २ (न.) कोणेक कार्य करण्याविषयी देश, काळ, द्रव्य इ० साधनांना अनुकूलपणा तें. उ० यदां मुलाचे लग्न करण्यास आम्हास अनुकूळ नाहीं.

अनुक्रम (स. पु. ना.) यापुढे तो, त्यापुढे तो असा जो एकापुढे एक असण्याचा पूर्वापर भावसंबंध तो.

अनुक्रमणिका (स. स्त्री. ना.) अमुक पत्रांत अमुक प्रकरण आहे किं० अमुक प्रकरणापुढे अमुक प्रकरण आहे हें समजायाकरितां त्या त्या प्रकरणांची नांवें अनुक्रमानें लिहिलीं असतात ती.

अनुग्रह (स. पु. ना.) देवता, गुरु, राजा इ०कांचा भक्त, शिष्य, सेवक इ०कांवर होतो जो प्रसाद तो. २ गुरु शिष्यास जो मंत्र देतो तो. ३ कोणेक अर्थावर कोणेकाची व्याप्ति तो.

अनुघडी (अव्य०) (ग्र०) निरंतर.

अनुजाइनी (वि०) (ग्रं०) अनुकूळ

अनुताप (स. पु. ना.) कांहीं एक वाईट कर्म क्रोधादिकांच्या आवेशानें हातून घडून गेल्यानंतर अरेरे हें वाईट कर्म माझे हातून घडलें असा जो त्याविषयीं खेद होतो तो.

अनुदिन, दिनीं (स. अव्य०) प्रत्यहीं.

अनुनासिक (स. वि०) मुख आणि नासिका यांनीं ज्याचा उच्चार होतो तो अँ, ञ, म, ङ, ण इ० वर्ण तो.

अनुपकारी (स. वि०) थोड्या श्रमांनीं दुसऱ्यावर महान् उपकार होत असतां करूं नये अशा स्वभावाचा तो किं० दुसऱ्यानें केलेल्या उपकाराचा जो आभार मानीत नाहीं तो.

अनुपान (सं. न. ना.) रसायनादिक सिद्ध औषध ज्याच्यांत मिश्रित करून पोटांत घेतात तो साकर इ० पदार्थ तें.

अनुभव (स. पु. ना.) प्रत्यक्ष, अनुमान, शब्द इ०कांच्या योगानें हा पदार्थ मी जाणतो असा जो अंतःकरणावर ज्ञानाचा आकार होतो तो. २ सत्यासत्यरूपानें जाणिला जो शब्दादिक कांहीं एक अर्थ त्याचा फलादिरूप प्रत्यक्षादिकानें त्याविषयीं सत्य किं० असत्य असा ग्रह होतो तो. ३ वतन इ० भोग्य वस्तूचा जो उपभोग तो.

अनुमत (सं. न. ना.) कोणेक गोष्टीविषयीं कोणेकाचा अनुकूल भाव तें.

अनुमान (सं. न. ना.) कांहींएक हेतूच्या प्रत्यक्षानें अप्रत्यक्ष पदार्था-

चें ज्ञान होतें तें. २ असें ज्ञान होण्याचा जो मनोव्यापार तें. ३ अटकळ. ४ (ग्र०) संशय.

अनुमोदन (स. न. ना.) उत्साहपूर्वक कोणी कांही कर्म केलें किं० करायास आरंभिलें त्याविषयीं हें बरें केलें इ० त्याच्या स्तुतीनें जें कोणी करतो त्याचें प्रोत्साहन तें. २ अनुमत असेंही कोणी बोलतात.

अनुयायी (स. वि०) सहवर्त्तमान किं० मागून चालणारा जो सेवकादिक तो.

अनुरक्त (स. वि०) अनुरागयुक्त तो.

अनुराग (स. पु. ना.) प्रीति.

अनुरूप (स. वि०) ज्यास ज्या गुणादिकांनी जो जसा असावा तसा. उ० ही स्त्री यापुरुषास सर्व गुणांनी अनुरूप आहे.

अनुरोध (स. पु. ना.) कोणीएक भाषणादिकाचे प्रवृत्तीस इतर जो प्रभु, शास्त्र इ०कांचे प्रवृत्तिविगाचे पारतंत्र्य असने तो. उ० ज्याला शास्त्र ज्ञान आहे त्याला तदनुरोधाने बोलाय लागतें नाहींत बसलें ह्म० तिच्या अनुरोधाने जिकडे जाणें घडेल तिकडे जाणें प्राप्त.

अनुलक्ष्य (स. न. ना.) कोणेक लक्ष्यास लक्षून किं० कोणेकाचे वर्त्तण्याचे जें लक्ष्य त्याशी अनुकूलपणानें कोणेकाने वर्त्तण्याविषयी धरिलें जें सधान ते.

अनुलोम (स. वि०) (ग्र०) अन्वयरूप. २ सलटा.

अनुवाद (स. पु. ना.) एकवार बोललेल्या भाषणाचा सर्वांस स्पष्ट बोध व्हावा या कारणास्तव दुसऱ्याच्या मुखाने किं० स्वमुखानें पुनः जें उच्चारण तो. २ दुसऱ्याच्या दुष्कर्माचें उच्चारण तो.

अनुष्टुप् (स. स्त्री. ना.) श्लोकादिकांत एक छंद आहे, ज्याचे चरणास आठ अक्षरें असतात तो. २ (वि०) त्या छंदाने बांधिलेले श्लोकादिक तें. ३ (न) कोणेक पदार्थ, गोष्ट इ०कांचा आहे आहे, नाही नाही असा भाव तें

अनुष्ठान (स. न. ना.) कांही एक कर्म त्याला साधक जे व्यापार त्यांच्या द्वारें संपादन करण्याचा व्यापार तें. २ होम, हवन, जप जाप्य इ० विनियुक्त जें कर्म तें

अनुसंग (स पु. ना.) (ग्र०) विश्वास

अनुसंधान (स. न. ना.) अमुक केल्यानंतर अमुक करायाचें किं० अमुक बोलल्यानंतर अमुक बोलायाचें अशा प्रकारें अनेक विषय अनुक्रमानें ओवल्यासारिखे ज्यांत असतात असा अंतःकरणवृत्तीचा आकार तें. २ अंतःकरणवृत्ति, बाण इ०कांची ज्या ज्या विषयाकडे योजना तिकडे अभिमुखता तें. ३ कवीनें बांधिलें जें राजादिकांचें चरित्र तें किं० आख्यान तें.

अनुसरणें (अनुसरण) (धा. ना.) अनुलक्षून वागणें.

अनुसार (स. वि०) अनुरूप.

अनुसारी (सं. वि०) जो ज्यास अनुसरून वागतो तो, तदनुसारी.
अनुस्यूत (सं. वि०) मध्यें विच्छेद न होतां एकसारखा चाललेला जो वृत्ति, उपभोग, कारभार इ० तो.
अनृत (सं. न ना.) असत्य. २ (वि०) तसें भाषणादिक तें.
अनेग (वि०) (ग्रं) अनेक.
अनौतें (वि०) (ग्रं०) अन्य.
अन्नछत्र (न. ना.) अन्नसत्र.
अन्नशुद्धि (सं. स्त्री. ना.) देवास नैवेद्य समर्पण करण्याकरितां अन्नावर तप घालून जो संस्कार करितात ती. २ तें घालायाचें तूप.
अन्नसत्र (सं. न. ना.) जो कोणी ब्राह्मणादिक क्षुधित येईल त्यास अन्न घालावें असें धर्मकृत्य आपल्या संसाराबाहेर कोणी पुरुषानें चालविलें असतें तें. २ त्याकरितां बांधलें असतें घर तें. [आणि वस्त्र.
अन्नाच्छादन (सं. न. ना.) अन्न
अन्नानगत (अन्न, अन्न, गति) (स्त्री. ना.) कोणेकास अन्नाविषयीं जें दुर्भिक्ष प्राप्त होतें ती.
अन्य (सं. वि०) दुसरा. २ वस्तुतः एक रूप नव्हत असे जे ते परस्पर.
अन्येत्र (सं. अव्य०) अन्यस्थळीं.
अन्यथा (सं. अव्य०) अन्यप्रकारानें. २ मिथ्या. ३ विपरीत.
अन्योन्य (सं. वि०) परस्पर.
अन्वय (सं. पु. ना.) स्वरूपतः किंवा स्वशक्त्यादि द्वारा कोणेकास ज्या पून जें कोणेकाचें अस्तित्व तो. २ अनेक वाक्यें, पदें याचा परस्पर कर्त्ता, कर्म, क्रिया इ० संबंध तो. ३ भाषणादिकांतील इंगित अ० तात्पर्य तो. ४ वंश, कुळ.
अपकर्ष (सं. पु. ना.) मागें हटणें. न्यूनता.
अपका (प्रा. पु. ना.) पाणी, दूध इ० कांचा कोणेक पदार्थावर हातानें छिडकाव तो.
अपकार (सं. पु. ना.) अपथ्य, शत्रु. इ० कांपासून रोग, धननाश इ० रूप जी अहितफलाची प्राप्ति तो.
अपकीर्ति (सं. स्त्री. ना.) दुष्कर्मामुळें कोणेकाची वाईट ख्याति ती.
अपघात (सं. पु. ना.) अकस्मात् मरण यावयास कारण जें उडकांत बुडणें, सर्पदंश होणें इ० तो.
अपजणें (धा. ना.) (ग्रं०) उपजणें.
अपजय (सं. पु. ना.) पराजय.
अपटा (प्रा. पु. ना.) एक झाड आहे.
अपटी (अपटणें) (स्त्री. ना.) देणें, घेणें इ० व्यवहारांत जो तोटा इ० धक्का बसतो ती.
अपत्य (सं. न. ना.) ज्या आईबापाच्या पोटीं जें जन्मलें मूल तें त्याचें.
अपमान (सं. पु. ना.) मानखंडणा.
अपमृत्यु (सं. पु. ना.) अपघात.
अपर (सं. वि०) अन्य. २ पुढचा तो.
अपरंपार (सं. वि०) ज्याचा अंतपार लागत नाहीं तो.

**अपरात्र** (सं. अपररात्र) (स्त्री. ना.) मध्यरात्रीचा पुढील भाग तो.

**अपराध** (सं. पु. ना.) अन्यायकर्म केल्यामुळें कर्त्यांस जो दोषविशेष घडतो तो.

**अपरिमित** (सं. वि०) ज्याची इयत्ता होत नाहीं तो. २ नेमस्तापेक्षां अधिक तो.

**अपरूप** (सं. अपूर्व) (वि०) जो पूर्वी कधीं पाहण्यानें किं० ऐकण्यानें अनुभवलेला नव्हे तो

**अपरोक्ष** (सं. अव्य०) समक्ष. २ परोक्ष नव्हे जो ज्ञानादिक तो. ३ प्राकृत लोक असमक्ष अशा अर्थी याचा प्रयोग करितात.

**अपलाणी** (सं. अपल्याण) (वि०) (ग्रं०) खोगीर पाठीवर नसलेला घोडा तो.

**अपवर्ग** (सं. पु. ना.) मोक्ष.

**अपवर्त्तन** (सं. न. ना.) संक्षेप.

**अपवाद** (सं. पु. ना.) अंगीं दुर्गुण, दुष्कर्म नसतां यांत अमुक दुष्कर्म आहे असा जो कोणेकावर येतो आळ तो. २ कोणेक विधीनें कोणेक विधीचा जो बाध तो.

**अपशब्द** (सं. पु. ना.) व्याकरणाप्रमाणें साधला जात नाहीं जो शब्द तो. २ सभ्यमनुष्यांनीं बोलायास योग्य नव्हे किं० जेणेंकरून दुसऱ्याचा धिक्कार होतो किं० ज्याचा अर्थ घात, पात, मरण इ० रूप आहे असा शब्द तो.

**अपशाच** (प्रा. अव्य०) आपाप.

**अपसांत** (प्रा. अव्य०) तिऱ्हाईत, शत्रु इ० कांचे संबंधावांचून आपल्या आपल्यामध्यें.

**अपस्मार** (सं. पु. ना.) तोंडातून फेंस यावा, बेशुद्ध पडावें अशी व्याधि तो.

**अपहार** (सं. पु. ना.) कोणेकापासून द्रव्यादि लुटून घेण्याचा व्यापार तो. २ ज्यापासून द्रव्य घेतलें त्यास त्याच्या वियोगापासून होतें दुःख तो.

**अपांग** (सं. वि०) विकलांग. २नेत्राबाहेरचा शेवटचा भाग.

**अपाड** (प्रा. पु. ना.) (ग्रं०) सारखेपणा नव्हे तो. [पणानें.

**अपाडें** (प्रा. अव्य०) (ग्रं०) विषम-

**अपादणें** (प्रा. धा.ना.)(ग्रं०)संपादणें.

**अपाय** (सं. पु. ना.) अहितानें फळ होण्यास कारण जो उपाधि तो. २ विनाश.

**अपूट** (वि०) अचूक.

**अपूर्व** (सं. वि०) पूर्वी कधीं न होतां प्रथमच जें झालें केलें कांहीं एक तो. २ आश्चर्यकारक. ३ (न.) सुख दुःख प्राप्त होण्यास कारण जो जीवात्म्याच्याठायीं पुण्यपापात्मक संस्कार तें.

**अपेष्टा** (प्रा. स्त्री. ना.) केवळ जिकिरीस यावयाजोगी दुःखावस्था ती.

**अपेक्षा** (सं. स्त्री. ना.) हा मला असावा असा जो कोणेकपदार्थावर भावविशेष राहातो ती.

**अप्रतिम** (सं. वि०) ज्यास उपमा द्यावयास त्यासारखा दुसरा पदार्थ नाहीं तो.

अप्रमाण (स. वि०) प्रामाणिक नव्हे जें भाषण, शास्त्र इ० तें. २ ज्याचें प्रमाण होत नाहीं तो.

अप्रयोजक (स. वि०)निरुपयोगी तो.

अप्रा (अपुरा) (वि०) साधारण प्रमाणापेक्षां अखूड नाक इ० अवयव, पदार्थ तो किं० तसा तो. २ अपुरता जो अंगरखा इ० तो.

अप्सरा (सं. स्त्री. ना.) देवलोकीं उर्वशी, मेनका इ० वेश्या आहेत त्या प्रत्येकीं.

अफरातफर (प्रा. स्त्री. ना.) दंगा इ० कांचे गडबडीमुळें व्यवस्थेनें ठेवलेले पदार्थांचा किं० मनुष्यांचा इकडचें तिकडे, तिकडचा भलतीकडे असा जो व्यस्ताव्यस्तपणा किं० कांहीं गेलें कांहीं राहिलें असा जो प्रकार होतो तो.

अफवा (अर० स्त्री. ना.) अवाई.

अफाट (प्रा० वि०) जितक्यास जितकें जें कांहीं बेतावाताने असावें त्यापेक्षां फारच अधिक जें स्थल, ससार, खटलें इ० तें.

अफू (फा० स्त्री. ना) खसखशीचे बोंडाचा चीक ज्यांत कैफ असतो तो.

अंबट (वि०) हिरवा आंबा, चिंच, लिंबं यांचे रसासारखा जो रस तो.

अंबटओला (वि०) पुरता वाळलेला नव्हे, कांहींसा ओला तो.

अबद्ध (सं. वि०) लोक, शास्त्रप्रमाणास विरुद्ध जें भाषण इ० तें.

अंबर (सं. पु. ना.) एक सुगंधि पदार्थ आहे. २ खिळे उपटून काढण्याचे उपयोगी एक प्रकारचे आकाराचा चिमटा आहे तो. ३ (न.) आकाश. ४ वस्त्र.

अंबराई (स्त्री. ना.) अनेक आंब्याच्या झाडांचा समुदाय तो.

अबलक (अर. वि०) एक पशु, पक्षी इ० कांचे अंगावर रंग असतो तो. २ तशा रंगाचा घोडा इ० तो.

अबला (सं. स्त्री. ना.) स्त्री.

अबळ (स्त्री. ना.) अबाळ.

अंबा (सं. आम्र) (पु. ना.) एक वृक्ष आहे. २ त्याचें फळ तो. ३ अंबाशिपणें ह्म० लग्न झाल्यावर दुसरे दिवशीं वधूवराचे स्नानसमयीं एक समारंभ आहे तो करणें. ४ आई. ५ जगन्माता.

अंबाडा (सं. आम्रात) (पु. ना.)एक वृक्ष आहे. २ त्याचें फळ तो. ३ वेणी न घालतां स्त्रिया जो केसांचा बुचडा बांधितात तो. ४ अंबाडी.

अंबाडी (प्रा. स्त्री. ना.) ज्याचें तेल निघतें असें एक बीज आहे तें. २ त्याचें झाड तें. ३ त्या झाडाची दोरी करण्याचे उपयोगी जी त्वचा किं० साल निघते ती. ४ केसांची अंबाडी होणें ह्म० केस पिकल्यामुळें अंबाडीचे वाखासारखे दिसूं लागणें.

अंबार (फा. न. ना.)धान्यादि ठेवण्याकरितां भिंतीमध्यें जो पोकळ अवकाश राखितात तें.

अंबारी (अर० स्त्री. ना.) हत्तीच्या

पाठीवर बसायाकरितां जो वस्त्रादिकांनीं मढवून गृहाकार करितात तो.

अबाळ (अ, बाळगणें) (स्त्री. ना.) निगेचा जो अभाव तो. २ निर्वाहाचे उपयोगीं जे अन्नवस्त्रादि पदार्थ त्यांची अभावमूलक विपत्ति ती.

अंबील (स्त्री. ना.) नाचण्याचें पीठ अंबवून किं० ताकांत घालून शिजवून प्यावयाजोगा पातळ पदार्थ करितात तो. २ फार गढळ जें नदीचें पाणी त्यास आरोपानें म्हणतात.

अंबु (सं. न. ना.) उदक.

अंबुखा (अंबु) (स्त्री. ना.) (ग्रं०) वृष्टि. २ गवसणी.

अंबुखिणें (धा. ना.) (ग्रं०) शिंपणें.

अंबुज (सं. न. ना.) कमळ.

अंबुथणें (धा. ना.) (ग्रं०) पेटणें.

अंबुद (सं. पु. ना.) मेघ.

अंबुधि (सं. पु. ना.) समुद्र.

अंबूस (वि०) किंचित् आंबट.

अबोला (सं. अभाषण) (पु. ना.) रूसवा, द्वेष इ०कारणामुळें कोणेकानें कोणेकाशीं किं० परस्परांनीं एकमेकांशीं बोलूं नये असा कांहीं काल धरिला जो नियम तो.

अब्ज (सं. न. ना.) कमळ. २ (वि०) अबसंख्या.

अब्धि (सं. पु. ना.) समुद्र.

अभंग (सं. वि०) ज्यास भंग नाहीं तो. २ (पु. ना.) प्राकृत कवितेची जाति आहे, जीमध्यें ईश्वरगुणाचें प्राधान्य असतें.

अभंड (प्रा. न. ना.) तेल, तूप इ० पदार्थ भांड्यांत घालूनच वजन करायाचें असतां, भांड्याच्या भारंभार जें दगड इ० वजन बांधून वजनाचे पारड्यांत घालितात तें.

अभद्र (सं. वि०) मृत्यु, घात, बाधा इ० अशुभार्थक किं० विचकट अर्थाचा जो शब्द किं० तशा प्रकारचें भाषण अ० तें भाषण करणारा पुरुष तो. २ (न.) अकल्याण तें.

अभय (सं. न. ना.) कोणेकास आपल्यापासून किं० इतरापासून संभवणारें भय त्याचा, मजपासून तुला भय होणार नाहीं किं० इतरापासून होऊं देणार नाहीं अशा प्रतिज्ञेनें वचनादिद्वारा करितात भाव तें. २ अभयमुद्रा. ३ (वि०) निर्भय.

अभर (भरणें) (स्त्री.) द्रव्यादिक जितकें पाहिजे तितकें व्यवहारादिद्वारा मिळाल्यामुळें त्याविषयीं कोणेकाची होणें पर्तता ती. २ (वि०) तशा पर्ततेनें युक्त तो.

अभरवँशीं (प्रा. अव्य०) कोणेकाचे भरवशावर कांहीं कामास प्रवृत्त झाल्यावर तो भरवसा तुटल्यामुळें जें संकट प्राप्त होतें तेंत.

अभाव (सं. पु. ना.) कोणेक पदार्थाचा नाहींपणा तो.

अभाळ (न. ना.) आकाश. २ मेघपटल. ३ अभाळ कोसळणें म्ह०

कोणेकावर पराकाष्ठेचा एकादा अनर्थ गुदरणें.

अभिजात, त्य (सं. वि०) कुलीन.

अभिनय (सं. पु. ना.) कांहीं गोष्ट बोलतांना किं० गायनसमयीं भ्रूभंगादि चेष्टा होतात तो.

अभिनव (सं. वि०) नूतन.

अभिनिवेश (सं. पु. ना.) अहंकार.

अभिप्राय (सं. पु. ना.) अर्थ. २ मनांतील भाव.

अभिमान (सं. पु. ना.) आपल्याविषयीं किं० आत्मसंबंधी जे देहादिक त्यांविषयीं हा मी किं० हा माझा असा जो ग्रह असतो जेणेंकरून त्या त्या विषयांचें जें बरें वाईट तें तें आपलेंच असें वाटतें तो. २ अभिमानविषय जे पुत्रादिक किं० अंगीकारलेली कांहीं एक गोष्ट तीविषयीं जो पक्षपात तो. ३ ईर्षा. ४ गर्व.

अभिरुचि (सं. स्त्री. ना.) आवड.

अभिलाष (सं. पु. ना.) आपल्या हातीं सांपडलें जें दुसऱ्याचें द्रव्यादिक त्याचा त्रास प्रतारणा करून जो अपहार तो. २ दुसऱ्याचें द्रव्यादिक हरण करण्याची इच्छा तो. ३ (स्त्री.) इच्छा.

अभिशाप (सं. पु. ना.) तळतळाट. २ एकाद्याचे अंगीं दुष्कर्म नसतां त्यावर आळ घालून निंदा करणें तो.

अभिज्ञ (सं. वि.) विद्या, कला इ० कांस त्यांतील मर्मासुद्धां जो जाणतो तो.

अभ्यंग (सं. पु. ना.) न्हाणें इ०कांच्या उद्देशानें तेल इ०कांचा मस्तकापासून सर्व शरीरास लेप करितात तो.

अभ्यस्त (सं. वि०) ज्या शास्त्रादिकांत ज्याचा अभ्यास झाला आहे तो किं० ज्याणें ज्या शास्त्रादिकांचा अभ्यास केला आहे तो त्याविषयीं.

अभ्यागत (सं. पु. ना.) अतिथि.

अभ्यास (सं. पु. ना.) विद्या, कला इ० पूर्णपणें यावी म्हणून एकवार म्हटलेलें तेंच अनेकवार म्हणावें इ०रूप जो व्यापार तो.

अभ्युत्थान (सं. न. ना.) कोणी शिष्ट आपले जवळ आला असतां त्याच्या सन्मानार्थ उठण्याचा जो व्यापार तें.

अभ्र (सं. न. ना.) अभाळ, मेघपटल.

अभ्रा (अभ्र) (पु. ना.) लोड, तक्या, गादी इ० कांवर शुभ्र वस्त्राचें जें आच्छादन असतें तो.

अमदानी (फा० स्त्री. ना.) धान्य, फळें इ०कांचें पुष्कळपणें होण्याचे किं० मिळण्याचे दिवस ती. २ धान्य वस्त्र इ०कांची खरेदी विक्री यांच्या उद्देशानें या देशीहून त्या देशीं आणणें, नेणें इ० जी वहिवाट ती अ० तो जिन्नस ती. ३ राजा इ०कांची कारकीर्द ती.

अमर (सं. पु. ना.) देव. २ (वि०) ज्यास मरण नाहीं तो.

अमराई (स्त्री०) अंबराई.

अमर्याद (सं. वि०) लोक, शास्त्र मर्यादेस उल्लंघन वर्तणारा जो पु-

रूप, भाषण, कर्म, अतिशय पर्जन्य, थंडी तो. [भंग तो

**अमर्यादा** (सं. स्त्री. ना.) मर्यादेचा

**अंमल** (अर० पु. ना.) सत्ताधारी राजादिक त्यांची जी प्रजादिकांवर नियामक शक्ति ची ज्याति जीणेंकरून त्या प्रजादिकांस त्यांचे आज्ञानुरूप वर्तावें लागतें तो. २ रोगादिकांनीं दवण्याजोगी जी औषधादिकांची वर्चस्विता तो. ३ कैफ.

**अमा** (सं. स्त्री. ना.) अमावास्या. २ (पु०) मुसाच्या भाषेनें स्तनास ह्मणतात.

**अमात्र** (सं. वि०) (ग्रं०) निर्विषय.

**अमानत** (स्त्री.) अनामत.

**अमासें** (वि०) (ग्रं०) अमळ.

**अमित** (सं. वि०) अपरिमित

**अमीर** (अर० पु. ना.) ज्यास सरकारांतून मोठेपणाचा मान असून काहीं सरंजाम आहे असा जो श्रीमंत तो.

**अमुक** (वि०) नांव न घेतां सामान्यरूपानें सांगण्यास इष्ट तो.

**अमूप** (अ, माप.) (वि०) अमित.

**अमृत** (सं. न. ना.) स्वर्गी देवांचा एक भक्ष्य पदार्थ आहे, ज्याच्या भक्षणानें अजरामरता येथे तें.

**अमोघ** (सं. वि०) कदापि व्यर्थ होत नाहीं असा पराक्रम, बाण, वीर्य, मंत्र इ० तो.

**अय** (न. ना.) (ग्रं०) लोखंड.

**अयन** (सं. न. ना.) मकरादिक आणि कर्कादिक जी दोन राशिषट्कें त्यांत सूर्यादि ग्रहांचा जो संचार तें ज्यास दक्षिणायन, उत्तरायण असें ह्मणतात. २ अर्धवर्ष तें.

**अयनक** (फा० न. ना.) (ग्रं०) उपनेत्र.

**अयना** (फा० पु. ना.)(ग्रं०) आरसा.

**अयनी, णी** (स्त्री. ना.) (ग्रं०) समुदाय. २ युक्ति.

**अयब** (अर० पु. ना.) हा वाईट असें लोकांनीं ह्मणायाजोगी जो पदार्थाचे अंगी खोड असते तो.

**अयाचित** (सं. वि०) याचना न करितां जें मिळेल तितक्यानेंच आपल्या उदराचा किं० प्रपंचाचा निर्वाह करावा असा नियम ज्याणें धरिला आहे तो. २ कोणीक वस्तूचे लाभाविषयीं आपण याचनादिरूप उपाय न करितां तो तो वस्तु मिळणें, येणें तें.

**अयाल,ळ** (फा० स्त्री. ना.) घोडे, खेचर इ० कांचे मानेवर जे लांब केस असतात ते. २ कागदोपत्रीं शूद्रादि विधवा स्त्रियांचे नांवास आरंभीं नामाचे सचक लावायाचा असतां मध्यें याचा प्रयोग होतो.

**अयुत** (सं. वि०) दाहा हजार.

**अरड** (प्रा० स्त्री. ना.) अनेक मनुष्यांनीं एकदांच मोठ्यानें शब्द केले असतां जो गलबा होतो तो. २ एरंडा इ० कांचें घाण्यांत न घालितां तेल काढायाचें असतां जो भाजन शिजवून कुटा करितात तो.

**अरडा** (प्रा० पु. ना.) अरड किं० गलबा.

अरडाओरड,ओरडा (प्रा. स्त्री. पु ना.) अतिशयित अनेक प्रकारचा अरडा.

अरण्य (स. न ना ) जेथे आसपास मनुष्यांची वस्ती नाहीं तें स्थळ. २ झाडी.

अरता, अरुता (प्रा० अव्य०)(ग्र०) इकडे, याठिकाणी [मृत्युलोक.

अरत्र (न. ना.) (ग्र०) इहलोक,

अरंवे (न. ना.) (ग्र०) संततीच्या अभावाचें दुःख.

अरबटचरबट (प्रा० न ना.)निरस, सात्विक नव्हे असे जे कदन्नरूप भक्ष्य तें.

अरवस (प्रा० पु ना )(ग्र०) अंकुर

अरवार, अरुवार (प्रा० वि०)(ग्र०) श्यामपणें वाळडपणा, टणकपणा नाहीं असे केवळ हलकें पक्वान्न, अथरूप इ० तें

अरसा (स. आदर्श) (पु ना ) भिंगास एके अंगानें पारा लावून लाकड इ०कांचे चौकटींत बसवून प्रतिबिंब दिसण्याजोगें करितात तो २ पाहतांच बोध व्हावयाजोगा बाल्यबोध जो हिशेब,जमाखर्च इ० तो.

अरळ (प्रा० वि०) (ग्र०) अरवार

अराइणें (प्रा० धा. ना.) (ग्र०) अर्पण करणें. २ अनुकूळ होणें.

अराटी (स्त्री. ना.) (ग्र०) काटी.

अराणूक (स्त्री. ना.) (ग्र०) आराणूक.

अरांष, अरास (फा० स्त्री. ना.) घर, मांडव इ०कांस दिवे, आरसे, चित्रें, छतें, पडदे इ०कांनी शोभा करितात ती.

अरि (स. पु. ना ) शत्रु २ चक्र

अरिष्ट (स. न. ना.) चोर, शत्रु, सैन्य, सात इ०कांच्या सबबानें जी संकटदशा प्राप्त होण्ये ते कि० त्यांपासून आलेला जो उपद्रव त. २ अकटोविकट, भयंकर इ० वाटायाजोगें त्यास म्हणतात.

अरुणोदय (स. पु. ना.) सूर्योदयाचे पूर्वी तीन घटिका अरुणाचा जो उदय होतो तो. २ तो जो काल तो

अरेतुरे (अरे, तु) (स्त्री. न. ना.) बहुवचनानें बोलण्याची जी मर्यादा ती क्रोधादिकांमुळें सुटून एकवचनानें जे भाषण होतें तो तें.

अरेरे (अव्य०) खेदाचा कि० अद्भुत रसाचा उद्गार. २ प्रसंगी करावाचे ते निरमृत्यादिकांमुळें राहिल्या कि० न करायाचें केलें अ० घडलें असता अनंतर जो पश्चात्ताप होतो त्याचा उद्गार.

अरोगणें (प्रा. धा. ना.)(ग्र०)जेवणें

अर्क (स. पु. ना.) सूर्य. २ रुई म्हणून झाड आहे तो. ३ औषधादिकांचा सत्वांश द्रवादिरूपेकरून यन्त्रादिकानें निराळा काढितात तो.

अर्कुले (प्रा. न. ना.) अक्षरादिकावर दीर्घत्वाचे बोधक कि० रेफाचे बोधक जें ‿ असे चिन्ह लिहितात तें. [२ अडसर

अर्गला, ळा (स. स्त्री. ना.) गिर्द.

अर्चा (सं. स्त्री. ना.) देवताप्रतिमेस पूज्यत्व यावें म्हणून प्रथमतः पूजाविशेषरूप जो संस्कार करितात तो. २ देवतेची प्रतिमा.

अर्ज (अर० पु. ना.) विनंति, प्रार्थना.

अर्जन (स. न. ना.) संपादन.

अर्जी (अर० स्त्री. ना.) विनंतीपत्र.

अर्णव (स. पु. ना.) समुद्र.

अर्ती (स. आरति.) (ग्रा०) आवड.

अर्थ (स. पु. ना.) ज्या संज्ञारूप शब्दाच्या उच्चारणानें वाच्यमर्यादेकरून ज्याचा बोध होतो तो त्याचा. २ ईश्वर आणि ईश्वरापासून जें यच्चयावत् निर्माण झालें आहे, जें जिवास बोधविषय होतें तो. ३ सोनें, रुपें, नाणें इ० जें धन तो. ४ साधावयास उद्देशिलेलें जो काहिएक कार्यभाग तो. ५ धर्म, अर्थ, काम, मोक्ष व प्रयोजन. ६ तात्पर्य, अभिप्राय इ० अनेक अर्थ आहेत.

अर्थवाद (स. पु. ना.) कोणत्याही प्रकार्यांत गुण किं० दुर्गुण ईषन्मात्र असतां जें त्याचें अतिशयित वर्णन तो. २ कल्पनेनेंच काहीएक कार्यास कोणेक गोष्टीचा संबंध केला असतो तो.

अर्थशास्त्र (स. न. ना.) द्रव्यादि अर्थसाधन कोणत्या कोणत्या प्रकारें करावें त्याच्या युक्ति ज्यामध्यें सांगितल्या आहेत असें जें राजनीत्यादिक किं० ज्यामध्यें केवळ वचनप्रमाण नव्हे, तर अनुमानादियुक्ति ज्यामध्यें प्रबळ असें जें न्यायमीमांसादिशास्त्र त्यास म्हणतात.

अर्थाअर्थी (अव्य०) किमपि.

अर्थात् (स. अव्य०) सहजच.

अर्धबोबडा (प्रा. वि०) ठेचणें, चेंचणें इ० कानीं अर्धवट बारीक केलेला.

अर्धशिशी (स्त्री. ना.) अर्धें कपाळ दुखतें असा एक रोग आहे तो.

अर्धांगवायु (स. पु. ना.) एक वायुरोग आहे; जेणेंकरून अर्धें अंग अचेतन होतें. [अधिक उणा

अर्धामर्धा (वि०) अर्धा किं० काहीं

अर्धेल (स्त्री. ना.) अर्धें उत्पन्न घेण्याविषयीचा व्यापार तो.

अर्पण (स. न. ना.) आपला सत्ते चा निवृत्ति करून परसत्ताविष करण्याचा व्यापार तें. म्ह० दा० इ० देणें तें.

अर्भक (स. न. ना.) मुलगा. २ असमजस जो मनुष्य त्यास म्हणतात.

अर्मार (न. ना.) लढाऊ गलबतांचा जो समुदाय तें. २ कदाचित् एक गलबतासही म्हणतात.

अर्वाचीन (स. वि०) प्राचीन नव्हे तो म्ह० अलीकडला.

अर्वान्य (वि०) ज्याच्यामध्यें सभ्यता नाहीं व दुसऱ्याला मारावें, शिव्या द्याव्या, आपणही दुसऱ्यापासून शिव्या मार घेत असावें असा स्वभावाचा मनुष्य त्यास म्हणतात.

अर्वाळी (प्रा. स्त्री. ना.) अर्वाच्य भाषण जी चेष्टा ती.

**अलक** (सं. पु. ना.) कुरळ केस.

**अलंकार** (सं. पु. ना.) मनुष्यादिक आपल्या शरीरावर सोनें, रुपें इ० कांचे पदार्थ शोभेसाठीं धारण करितात तो किं० तेणेंकरून आलेला शोभाविशेष तो. २ कवितेंत वाक्यार्थास चमत्कार आणणारे जे उपमा, रूपकादि किं० वाक्यसरणीस शोभविणारे अनुप्रास, यमक इ० तो. ३ जेणेंकरून ज्यास शोभा येते तो त्याचा.

**अलखतपालखत,** } (स्त्री.) आसन-
**अलखनपालखन** } मांडी तो.

**अलग** (अ, लागणें) (अव्य०) राहायास कारणभूत जें काहींएक, त्याच्या संबंधावांचून. २ इकडे तिकडे न लागतां. ३ अधर. ४ कोणाशीं संबंध न होतां पृथक्.

**अलगरजी, गरजू** (वि०) आपल्या कामापुरतें दुसऱ्याचें बाह्यात्कारी आर्जव करणारा त्यास म्हणतात.

**अलगुजें** (न. ना.) एक वेळूचें केलेलें मुखवाद्य आहे तें.

**अलबत, बत्ता** (फा० अव्य०) अगत्यपूर्वक.

**अलबेला** (वि०) दृढता आणि नीटनेटकेपणा, हे गुण ज्यामध्यें तादृश नाहींत असा जो बोलणें इ० क्रियांनीं केलेला पदार्थ तो. २ होय किं० नाहीं याचा निश्चय न होई असें मुळमुळीत जें भाषण, लेख इ० तो. ३ आंत छानदारी असून बाहेर साधेपणा दिसावा असा वेष किं० तेणेंकरून युक्त पुरुष इ० तो.

**अलभ्य** (स. वि०) मिळायास अशक्य.

**अलाद, दी** (अर० अव्य०) अलग.

**अलायबलाय** (स्त्री. ना.) इडापिडा.

**अलाहिदा** (अर० वि०) पृथक्.

**अलि** (सं. पु. ना.) भ्रमर.

**अलिक** (स. न. ना.) कपाळ.

**अलोढणें** (धा. ना.) (ग्रं०) धुडाळणें, शोधणें. २ सर्व सदरें जमून येणें.

**अलोलीक** (वि०) (ग्रं०) अलौकिक. २ (स्त्री.) आवड.

**अलौकिक** (सं. वि०) लोकरीतीहून निराळें बुद्धि, शक्ति, कर्म इ० तें.

**अल्प** (स. वि०) थोडें, लहान.

**अल्पस्वल्प** (स. वि०) थोडें बहुत.

**अल्लड** (वि०) त्या त्या व्यवहारांत शिकवण प्राप्त होऊन ज्याचे अंगीं पुरा प्रौढपणा आला नाहीं असा जो मनुष्य, घोडा इ० तो.

**अवई** (स्त्री. ना.) अवाई.

**अवकळा** (स. अवकला) (स्त्री. ना.) उत्तरोत्तर तेजोहीन व्हावें अशी मनुष्य, देश इ० कांस जी दशा येते ती.

**अवकाश** (सं. पु. ना.) उशीर. २ समय, वेळ. ३ जागा, स्थल. ४ (ग्रं०) भेद, वेगळेपण, अंतर. ५ सामर्थ्य.

**अवगणन, गणना** (सं. न. स्त्री. ना.) अनादर.

**अवगत** (सं. वि०) जाणलेला.

**अवगम** (सं. पु. ना.) ज्ञान.

**अवगळ** (वि०) (ग्रं०) अमंगळ.

अवगाहन (सं. न. ना.) पाण्यांत बुडी मारण्याचें कर्म तें. २ कोणेक विषयांत बुद्धि इ० कांचा प्रवेश तें.
अवचट, टें (अव्य०) अकल्पित.
अवचित (अव्य०) अवचट.
अवच्छिन्न (सं. वि०) अवच्छेद कि० अंशरूपता पावलेला तो.
अवजड (वि०) आकारानें कि० वजनानें फार मोठा तो.
अवजार (अर० न. ना.) गलबत इ० चालवायाकारितां, वारा धरायासाठीं जें वस्त्र पसरून लावितात तें.
अंवटळणें (धा. ना.) डोकीवर मोठें ओझें घेतलें कि० निजतांना उशीचे खालीं डोकें पडलें इ० कारणानें शिरा इकडे तिकडे चळल्यामुळें मान दुखूं लागणें.
अवडळ (वि०) (ग्र०) किंचित्.
अँवढा (प्रा. पु. ना.) मुखांतील द्रव जो क्षणोक्षणीं गिळावा लागतो तो.
अंवतणें (सं. अप. न. ना.) आमंत्रण. २ (धा. ना.) आमन्त्रण देणें.
अवतरण (सं. न. ना.) श्लोक, वाक्य इ० कांची पूर्वापरसंगति दाखविण्यासाठीं टीकाकारादिक जो कांहीं मध्यें पदरचा ग्रंथ घालितात तें. २ अवतरण्याचा व्यापार तें. ३ खालीं उतरण्याचा व्यापार तें.
अवतंस (सं. पु. ना.) पुष्पें, रत्नें इ० कांचें शिरोभूषण कि० कर्णभूषण तो.
अवतार (सं. पु. ना.) देव, सिद्ध इ० कांनीं धारण केलेलें मनुष्यादिरूपें रूपांतर तो कि० त्या रूपानें जो त्यांचा प्रादुर्भाव तो. कोणेक कर्माविषयीं कोणेकानें अवतार घेणें म्ह० तें तें अनिशयित करूं लागणें. अवतार घेणें, होणें, सरणें इ० बहुत अर्थ आहेत.
अवदशा, दसा (सं. स्त्री. ना.) दारिद्र्यादि अनिष्टफल प्राप्त करणारी दुष्ट दैवदशा ती.
अवदान (सं. न. ना.) एके आहुतीस पुरायाजोगें घेतलें जें होमद्रव्य तें. २ अवदान मारणें म्ह० लबाडीनें पैसा खाणें.
अवधणा (प्रा. पु. ना.) वाधणा.
अवधान (सं. न. ना.) जाणण्यास योग्य विषय जाणले जात असी अंतःकरणाची जागरूक दशा तें. २ त्या दशेनें युक्त झालेल्या अंतःकरणानें कोणेक विषयाकडे अनुसंधान तें.
अवधि (सं. पु. ना.) कोणेक देश, काल, कर्म इ० रूप पदार्थ त्याची मर्यादा, असिन्न संपून जेथें नाहींपणा लागतो असा जो त्या पदार्थाच्या आसमंताद्भागींचा प्रदेश तो. २ सीमा, हद्द. ३ अवकाश, वेळ.
अवधूत (सं. पु. ना.) एक देहावांचून दुसरें वस्त्र, पात्र इ० कांहीं जवळ नाहीं असा जो योगी गोसावी इ० तो.
अवनि (सं. स्त्री. ना.) पृथ्वी.
अवयव (सं. पु. ना.) हात, पाय,

परमाणु इ० अनेक पदार्थ, संयोगादि संबंधानें परस्पर संबद्ध झाले असतां विशिष्ट जो एक देह पृथिव्यादि पदार्थ उत्पन्न होतो तें प्रत्येकीं.

अवरणें (प्रा. ना.) आवरणें.

अवरसचवरस (अव्य०) सभोंवार चार बाजूंस किं० लांबीनें रुंदी गणून किं० लांबीरुंदी सारखी करून चतुरस्र क्षेत्रादिकांचे प्रमाणांत.

अवरोध (सं. पु. ना.) गतिमान पदार्थांचे गतीचा कुंठितपणा तो. २ मृताशौचास म्हणतात.

अवर्षण (सं.न. ना.)वृष्टीचा अभाव.

अवल (अर० अव्य०) प्रथमतः २ (वि०) पहिला. ३ उत्तम कोटीतला. [श्रय.

अवलंब, लंबन (सं. पु. ना.) आ-

अवलक्षण (सं.न.ना.)वाईट लक्षण तें.

अवलाद (अर० स्त्री. ना.) संतति.

अवलिया (अर० पु. ना.) केवळ ब्रह्मनिष्ठता पावून विदेही झालेला तो.

अवलिळा, लीळा (सं. अवलीलया) (अव्य०) (ग्रं०) सहजलीलेंकरून.

अवशिष्ट (सं.वि०) अवशेष राहिलेला तो. [रात्रीस.

अवशीं, शीस (प्रा. अव्य०) पूर्व

अवशेष (सं. पु. ना.) कोणिक पदार्थाचा कांहीं अंशाचा विनियोग होऊन बाकी राहिलेला जो अंश तो.

अवश्य (सं. अव्य०) अगत्यरूप. २ कोणी कांहीं सांगितली किं० विचारिली जी गोष्ट तिच्या अंगीकाराचें द्योतक.

अवश्यमेव (सं. अव्य०) अवश्यच.

अवँस (स्त्री. ना.) अमावास्या.

अवसर (सं. पु. ना.) काळ.

अवसात (अव्य०) (ग्रं०) अकस्मात्.

अवसान (सं. न. ना.) कोणिक कार्याची समाप्तिदशा किं० मध्यें मध्यें होतो विराम तें किं० ग्रंथांत मध्यें मध्यें विराम घेण्याचीं नियमित स्थळें तीं प्रत्येकीं. २ कांहींएक कार्य निर्वाहाविषयीं शारीरादि बळ तें किं० तें शेवटास नेण्याविषयीं मनाची दृढता असणें तें. ३ कोणिक कार्य अवसानांत येणें म्ह० अटोक्यांत येणें.

अवसानघातकी (वि०) ज्यासमयीं जें काम केलें पाहिजे त्यासमयीं तें न करितां घात करण्याचा ज्याचा स्वभाव तो.

अवस्था (सं. स्त्री. ना.) काल, देशादिभेदेंकरून पदार्थमात्राचे होतात जे भिन्न भिन्न प्रकार ती.

अँवळ (प्रा. वि.) अडस. २ पसरट नव्हे तें.

अँवळा (सं. आमलक) एक फळ आहे तो. २ कोणिक कर्माच्या नांवें अंवळ्यायेवढें पुड्य म्ह० त्याचा केवळ अभाव. ३ अँवळा देऊन वेल काढणें म्ह० स्वल्पपदार्थ

देण्यानें कोणेकास आजवून त्या-पासून मोठें कार्य करून घेणें.

अवज्ञा (सं. स्त्री. ना.) आज्ञाभंग.

अवा (प्रा. पु. ना.) मातीचीं कच्चीं मडकीं भाजायाकरितां एके जागां रचिलीं असतात तीं. २ भाजल्या-वरही त्या तितक्या पात्रांच्या समु-दायास म्हणतात. ३ (स्त्री.) शू-द्रादि जातींतील प्रौढ स्त्रियांस म्ह-णतात.

अवाई (प्रा. स्त्री. ना.) कोणेक झा-लेली कि० होणार परोक्ष गोष्ट, ती साक्षात् पाहिली नसतां किंवा ले-खादि प्रमाण नसतां केवळ लोक-परंपरेनें अमुक देशीं अमुक झाले कि० होणार अशा प्रकारची बो-लवा चालली असते ती.

अवांका (प्रा. पु. ना.) शरीरादि वस्तुरूप अवसान तो.

अवांतर (सं. वि०) इतर.

अवार (सं. आवरण) (न. ना.) घर इ०कांभोंवतें जें भित, कुंपण इ० घालितात तें.

अवाळूं (प्रा. न. ना.) चर्मवृद्धि हो-ऊन शरीरावर फुगा उठतो तें.

अविच्छिन्न (सं. वि०) मध्यें विच्छे-द न पडतां कोणेक गोष्ट कांहीं काळ चाललेली ती. २ आंत यत्किं-चित् अंश न्यून न होतां जें आहे तितक्या प्रमाणाचें मिळणें तें.

अविद्या (सं. स्त्री. ना.) अज्ञान. २ ज्या रूपानें जो पदार्थ असणा-रा तो त्या रूपानें न दिसतां अ-न्यथा रूपानें जिच्या योगानें दि-सतो अशी ईश्वरशक्ति ती.

अविसाळें (सं. आलय) (न. ना.) (ग्र०) पक्ष्याचें घरटें, कोठा इ० तें.

अवीट (अ, विटणें) (वि०) विटत नाहीं असा जो वस्त्रादिकांचा रंग तो. २ ज्याचें नित्य सेवन होत असतांही कंटाळा येत नाहीं असा अन्नादि पदार्थ तो. ३ सामान्य आकारापेक्षां अतिमोठा असून सु-दृढ जो पदार्थ तो. [मांस.

अवीस (सं. आमिष) (न. ना.) (ग्र०)

अव्यक्त (सं. वि०) स्पष्ट किं० प्रकट नव्हे तो. २ केवळ ध्वनिरूप जो शब्द तो.

अव्यंग (सं. वि०) व्यंग नव्हे तो.

अव्यय (सं. वि०) ज्याचा व्यय होत नाहीं असें ब्रह्मस्वरूप तें. २ (न.) ज्यास विभक्ति, लिंग, वचन इ० कार्य होत नाहीं असा व्याकरण-रीतीचा शब्द तें.

अव्यवस्था (सं. स्त्री. ना.) व्यवस्थे-चा अभाव ती. [तो.

अव्यवहित (सं वि०) व्यवहित नव्हे

अव्हा (प्रा. वि०) (ग्रं०) उजवा.

अव्हासव्हा (प्रा. अव्य०) (ग्र०) इकडे तिकडे. [अनादर.

अव्हेर (सं. अवहेलन) (पु. ना.)

अंश (सं. पु. ना.) पदार्थाचे अनेक खंड ते प्रत्येकीं. [हीन तो.

अशक्त (सं. वि०) शरीरशक्तीनें

अशक्य (सं. वि०) शक्य नव्हे जें कांहींएक कर्म तें.

अशन (सं. न.ना.) भक्षण. २भोजन.
अशरीरीवाणी (सं. स्त्री. ना.) आकाशवाणी.
अशलग (वि०) (ग्रं०) सुगम, सोपें.
अशेख (वि०) (ग्रं०) अशेष.
अशेष (सं. वि०) अवघा.
अश्रु (सं. पु. न.) रडतांना नेत्रांत जें उदक येतें तो तें. हर्षामुळें उत्पन्न झालें तें हर्षाश्रु, प्रेमाश्रु, आनंदाश्रु इ०.
अश्रुत (सं. वि०) श्रुत नव्हे तो.
अश्व (सं. पु. ना.) वर बसून जायाचे उपयोगी एक ग्राम्य पशु आहे ज्यास घोडा म्हणतात तो.
अश्वासन (न. ना.) आश्वासन.
अश्विनी (सं. स्त्री. ना.) अश्वजातीय स्त्री. [जो समुदाय तें.
अष्टक (सं. न. ना.) आठ पदार्थांचा
अष्टगुण (वि०) (ग्रं०) आठपट.
अष्टपुत्री (स्त्री. ना.) लग्नसमयीं नवरीस जें वस्त्र नेसवितात तें.
अष्टाधिकार (सं. पु. ना.) गावसंबंधी ज्योतिष, धर्माधिकरण, उपाध्यपण, पाटिलकी इ० जे आठ अधिकार ते. २ निजणें, बसणें, उठणें, जेवणें इ० करायाचे कर्मास प्रसंगविशेषीं म्हणतात. ३ राज्यादि संबंधी प्रधानकी, सेनापत्य इ० सर्व अधिकार त्यासही प्रसंगानुरूप म्हणतात.
अष्टौप्रहर (सं. अव्य०) रात्रंदिवस.
असंगत (सं. वि०) पूर्वापर संगति ज्याची चांगली जुळत नाहीं असें भाषणादि तें.
असट (प्रा. वि०) पातळसर झालेली कणीक, पीठ इ० तें.
अँसडणें (धा. ना.) अंसडा देणें.
अँसडा (प्रा. पु. ना.) आचका.
असत् (सं. वि०) ज्यास अस्तित्व नाहीं तें. २ वाईट. ३ साधुजनाचा प्रतिपक्षी जन तो.
असंबद्ध (सं. वि०) पूर्वापरसबंध ज्याचा जुळत नाहीं तो.
असंभाव्य (सं. वि०) होईल, घडेल इ० संभावना करण्यास अयोग्य अर्थ तो.
असल (प्रा. वि०) (ग्रं०) सुगम, सोपें. २ (अर० वि०) मूळचा जो पदार्थ तो. ३ जारापासून उत्पन्न झालेला नव्हे तो. ४ स्वजातीय पदार्थांत उत्तम कोटींतला.
असलग (प्रा. वि०) (ग्रं०) सोपें.
असलणें (प्रा. धा. ना.) (ग्रं०) उसळणें.
असांगडें, सांघडें (प्रा. वि०) (ग्रं०) निरूपम.
असि (सं. स्त्री. ना.) तरवार.
असिका (सं. अशेष) (वि०) (ग्रं०) सर्व. [ऊत, स्वार.
असिवार (प्रा. पु. ना.) (ग्रं०) राअसुदा, दें (प्रा. वि०) कोणेक कामांत गुंतलेला नव्हे असा केवळ मोकळा मनुष्य इ० तो. २ ज्यास फेरफटका नाहीं असा घोडा तो

किं० ज्यास बहुतकाळ मैथुनप्रसंग नाहीं असा मनुष्य इ० तो.

असुर (सं. पु. ना.) दैत्य.

असूँ (न. ना.) अश्रु.

अँसूड (प्रा. पु. ना.) बैल इ० कास हाकावें किं० शेतावरील पाखरें उडवावीं म्हणून क्रमानें बारीक होत गेलेला दोर केला असतो तो.

अँसूडगांठ (अंसडा, गांठ) (स्त्री. ना.) एक पदर धरून अंसडा दिला असतां सुटायाजोगी जी गांठ ती.

असूत, द (सं. उत्सिक्थ) (न. ना.) भक्षिलेल्या पदार्थांचा अंश गिळतांना श्वास द्वारीं शिरल्यामुळें ठसका लागतो तें.

असूया (सं. स्त्री. ना.) मत्सरादिकामुळें दुसऱ्याच्या गुणावर दोषबुद्धि ती.

असोशी (प्रा. स्त्री. ना.) कांहीं पदार्थाविषयीं अतिशय सोस ती.

असोळी (स्त्री. ना.) (ग्रं०) पदराचें घरटें.

अस्करा (प्रा. पु. ना.) आख्या.

अस्का (वि०) असिका.

अस्खलित (सं. वि०) मध्यें स्खलन न पावतां एकसारखी चाललेली वाणी, गति इ० ती.

अस्त (सं. न. ना.) अंतर्धान. २ अदृश्यत्व.

अस्तनी (फा. स्त्री. ना.) अंगरखा, चोळी इ० कास हाताचा आच्छादक जो अवयव ती.

अस्ताव्यस्त (वि०) अव्यवस्थित.

अस्तित्व (सं. न. ना.) आहे अशा प्रतीतीस कारणभूत पदार्थनिष्ठ जो धर्म तें.

अस्तु (सं. अव्य०) असो.

अस्त्र (सं. न. ना.) ज्या बाणादि शस्त्रावर मंत्रकरून देवतेचें आवाहन केलें असतें तें शस्त्र किं० तो मंत्र.

अस्थि (स. स्त्री. ना.) शरीरांत ज्या सात धातु आहेत त्यांमध्यें लांकडासारखी एक बळकट धातु जिला हाड म्हणतात ती.

अस्पर्श (स. वि०) अस्पृश्य म्ह० स्पर्श करण्यास अयोग्य किं० अशक्य तो. २ रजस्वलेविषयीं प्रयोग

अस्मादिक (अस्मत्, आदि) आपला विशेषपणा वर्णन करायाचा असतां आम्हीं या ठिकाणीं याचा प्रयोग करितात.

अस्मान (फा. न. ना.) आकाश.

अस्मानी (फा० वि०) निरभ्र आकाशासारिखा जो रंग तो. २ (स्त्री.) गांव, शेत, इ० कास वीज, सांत, अतिवृष्टि, अनावृष्टि इ० दैवी उपद्रव बाधतो ती.

अहंकार (सं. पु. ना.) मीपणा. २ गर्व.

अहंकृति (सं. स्त्री. ना.) अहंकार.

अहा, अहाहा (अव्य०) आनंद, खेद यांचा उद्गार आहे.

अहाच (प्रा. अव्य०) (ग्रं.) सरासरीपणानें, वर वर. २ सहज रीतीनें.

अहाटणें (धा. ना.) शिजलेली डाळ इ० पळीनें घाटणें.

अहाणा (आ, हनन) (वि०) (ग्र.) आत्मघातकी. २ आहणा.

अहाणे (धा. ना.) (ग्र०) पोळणें, भाजणे. [घळ पघळ,

अहाळबहाळ (प्रा. वि०) (ग्र०) अ-

अहि (स. पु. ना.) सर्प.

अहिरा (प्रा. पु ना) डोळ्यांत एक रोग होत असतो तो. २ तो रोग घालविणारा मणि तो.

अहिर्निशी (अव्य०) रात्रंदिवस.

अही (प्रा. स्त्री. ना.) अग्नीची सूक्ष्म ज्वाला.

अहेर (प्रा. पु. ना.) आपले सोयरे नायरे इष्टमित्र यांचे घरीं कांहीं मंगलकार्य झालें असतां त्यांस देतात जी शेला पागोटें इ० वस्त्रे तो कि० त्याचें समर्पण तो.

अहेव (स. अविधवा) (स्त्री. ना.) ज्या स्त्रीचा नवरा जिवंत आहे ती.

अहोरात्र (स. न. ना.) एका सूर्योदयापासून दुसरा सूर्योदय होईपर्यंत जो काळ ते. २ (अव्य०) रात्रंदिवस.

अळणी (स. अलवण) (वि०) ज्यांत मीठ नाहीं असा पदार्थ तो. २ ज्यामध्यें रूच्यता तेजस्विता नाहीं असा जो मनुष्य, भाषण इ० तो.

अळमटळम (प्रा. स्त्री. न. ना.) आळस, उपेक्षा इ० कारणानीं कांहींएक काम मन लावून करा यांचें तें न करितां चुकवाचुकव करणें ती ते.

अळमळीत (प्रा. वि०) मळमळीत.

अळा (प्रा. पु. ना.) कांहींएक पदार्थाभोंवता बांधितात बांध तो. २ कोणेक व्यवहारास कांहीं व्यवस्थानियमरूप बंध असतो तो.

अळिउळ (पु. ना.) (ग्र०) भ्रमर.

अळुकी (प्रा. स्त्री ना.) (ग्र०) आवड, प्रीति. २ भक्त.

अळुमाळ, ळू (प्रा. पु. ना.) (ग्र०) विस्तार. २ (वि०) किंचित्, अल्प.

अळें (स. आलवाल) (न. ना.) वृक्षादिकांचें बुडीं कि० चिखल करण्याचे मार्गानें घातलेलें पाणी राहण्याकरितां खणून कि० बांध घालून जें स्थळ करितात ते.

अळेंपिळें (प्रा. पु. ना) अंग अनेक प्रकारें वांकडें तिकडें करून देतात जे अंगपिळें ते.

अळोच (प्रा. पु. ना.) (ग्र०) ध्वनि.

अळोंचणें (धा. ना.) (ग्र०) हळूच मागणें.

अक्षत (स० वि०) क्षतरहित तो. (स्त्री.) देवाची पूजा इ० करण्यासाठीं घेतात जे तांदूळ ती. ३ लग्न, मुंज इ० कांचें आमंत्रण करितात त्यावेळेस हातीं देतात कि० कपाळीं लावितात जे तांदूळ ती. ४ त्या आमंत्रण समारंभासहि म्हणतात. ५ प्रसंगीं सामान्य तांदुळांस म्हणतात. ६ कपाळीं लावलेल्या गंधांत जी दुसऱ्या रंगाची टिकली

लावितात तो किंवा तीसाठीं केलेले ग्रंथ तो.

अक्षर (सं. वि०) जें क्षरत नाहीं तें. २ (न.) अ, आ इत्यादिक वर्ण तें. ३ वेदशास्त्रादिरूप जी विद्या तिला प्रसंगविशेषीं म्हणतात. ४ ब्रह्म.

अक्षरशः (सं. अव्य०) काहींएक अक्षर न वगळतां.

अक्षरशत्रु (सं. पु. ना.) निरक्षर जो पुरुष त्यास म्हणतात. [आरती.

अक्षवाण (सं. आयुष्यवायन)(न.ना.)

अक्षौहिणि (सं. स्त्री. ना.) हत्ती २१८७० रथ २१८७० घोडे ६५६१० पदाति, पायदळ १०९३५० हीं सर्व संख्या मिळून जें सैन्य तें. २ एकावर एकवीस शून्यें दिलीं असतां जी संख्या होत्ये ती.

अज्ञ (सं. वि०) मूर्ख.

अज्ञातवास (सं. पु. ना.) आपलें राहाणें कोणास कळूं नये असा जो वास तो.

अज्ञान (सं. न. ना.) ज्ञानाचा जो अभाव तें. २ भ्रमात्मक अयथार्थ जें ज्ञान तें. ३ (वि०) अज्ञ. ४ ज्याचा लेंकुरपणा जाऊन प्रौढ झाला नाहीं तो.

—आ—

आ– हा वर्ण दुसरा स्वर आहे. आकारादि अक्षर उच्चारत्ये समयीं किं० कांहीं खानेसमयीं जो मुखाचा पसरट आकार होतो तो. २ (अव्य०) हा संस्कृत उपसर्ग आहे व हा त्या त्या पदामागें लागला असतां, तोंपर्यंत, त्यापासून समताद्भागीं असा अर्थ दाखवितो. उ० आजन्मांत मी खोटें बोललों नाहीं. याचें हे व्रत आमरण चाललें. ३ खबुतरें, मोरें इ० कांस बोलावण्याचा शब्द आहे.

आँ (अव्य०) अँ.

आइकणें (सं. आकर्णन) (धा. ना.) श्रोत्रेंद्रियानें म्ह० कानांनीं शब्दविषय ग्रहण करणें. २ दुसऱ्यानें कांहीं सांगितलेली गोष्ट मान्य करणें.

आइकीव (आइकणें) (वि०) लेख इ० कांहीं साधन नसतां केवळ जनमुखापासून ऐकूनच समजलेलें कांहीं एक तें. २ ऐकण्यानेंच प्राप्त होत्ये कांहीं गायन इ० विद्या ती. [२ इच्छा.

आइणी (स्त्री. ना.) (ग्र०) सामर्थ्य.

आइता (सं. अयत्नतः) (अव्य०) आपण यत्न न करितां सिद्धरूपानें कांहीं पदार्थ असणें, मिळणें तो.

आइतें (न. ना.) स्वयंपाक इ० कांसाठीं सिद्ध केलेलें जें साहित्य तें.

आइतोजी (आइता) (पु. ना.) पूर्वी खटपटीचे वेळेस न येतां फलाच्या उपभोगसमयीं मात्र येतो त्यास म्हणतात.

आऊ (आई) (स्त्री. ना.) अत्या.

आंकण (न. ना.) खडा, माती इ० तें.

आकर (सं. पु. ना.) ज्या स्थळीं जो रत्नादि पदार्थ पुष्कळपणानें उत्पन्न

होतो तें स्थळ ह्यास खाण म्हण-
तात तो.

आकर्ण (स. अव्य०) कर्णापर्यंत.

आकर्णन (स. न. ना.) श्रोत्रेंद्रियानें
शब्दाचें ग्रहण तें.

आकर्षण (स. न. ना.) काहीं वस्तु
असले या स्थळापासून वेगपरवश
करून आपलेकडे आणण्याचा व्या-
पार तो. २ पसरलेल्या पदार्थांची
आकुंचितपणें जी स्थिति ते.

आकलन (स. न. ना.) बुद्धि किं०
शरीर यांचे सामर्थ्यानें त्याचे त्याचे
विषय स्वाधीनपणांत आणण्याचा
व्यापार तें. [विससमातीपर्यंत.

आकल्प (स. अव्य०) ब्रह्मदेवाच्या दि-

आकळणें (स. आकलन) (धा. ना.)
दोर इ० कानीं काहीं पदार्थ इ-
कडे तिकडे न होई असा बांधून
नियमित करणें.

आकांत (पु. ना.) अकांत.

आकार (स. पु. ना.) वर्तुल, दीर्घ,
चतुरस्त्र, स्थूल, सूक्ष्म इ० प्रकार-
चा तो म्ह० अशा प्रकारची आ-
कृति तो २ कोणेक विषयाचें
ज्ञान करणांत प्रतिबिंबवत् रूप उ-
मटतें तो. ३ भय, हर्ष इ० कांचे
ज्ञापक किं० बोधक जे शरीरावर
सकंपता, हास्यवदन इ० भाव हो
तात ते प्रत्येकी. ४ हिशेब. ५आ-
कारास येणें म्ह० काहीं कार्य हो-
ण्याच्या रंगास येणें इ०.

आकाश (स. न. ना.) पंचभूतां
तील पहिलें भूत तें जें पृथिव्यादि
भूतांस सोडून अवशिष्ट पोकळीच्या
रूपानें राहातें.

आकाशवाणी (सं. स्त्री. ना.) को-
णेकास काहीं अर्थाचा बोधक शब्द
ईश्वरेच्छेनें आकाशांत मनुष्य
बोलल्यासारिखा होतो तो.

आकांक्षा (स. स्त्री. ना.) अपेक्षा.
२ कांक्षा.

आकुंचन (स. न. ना.) प्रसृत अस-
लेला पदार्थ संकुचित होणें किं०
संकुचित करण्याचा व्यापार तें.

आकृति (स. स्त्री. ना.) आकार.

आक्रंदणें (स. आक्रंदन) (धा. ना.)
आक्रंदन करणें.

आक्रंदन (स. न. ना.) शोक, भय
इ० कारणानें रडारड आरडा-
ओरडा होतो ते.

आक्रमण (सं. न. ना.) स्वतःस्वरू-
पानें किं०स्वशक्तीनें कोणेक पदार्था
चें व्यापन ते. [आक्रांत करणें.

आक्रमणें (स. आक्रमण) (धा. ना.)

आक्रांत (स. वि०) क्षुधा इ० कानीं
ज्याचें आक्रमण झालें आहे तो.

आक्रोश (स. पु. ना.) आक्रंदन.
२ निंदा.

आँख (स. अक) अक. २ डोळा व
कान या दोहोंमध्यें मर्मस्थळ आहे
तो. ३ (स. अक्ष) रथाचे चाकां-
तील कणा तो.

आँखडणें (आँखूड) (धा. ना.) लांब
पसरलेला जो दोर इ० तो आटो-
पून आखूड करणें.

आखंडल (स. पु. ना.) इंद्र.
आँखणी (स्त्री.ना.)अंकणी,रेखाटणी.
आखर (प्रा. पु. ना.)गुरांचें गोठण.
आखाडसासरा (पु. ना.) लहान मुलीस किं० बायकोस कोणी पुरुष दबावणीची किं० उपदेशाची गोष्ट सांग लागला असतां त्यास निंदेनें म्हणतात.
आखाडा (प्रा पु ना.) अड्डा. २ मल्लांचा तालीमखाना तो.
आँखी (प्रा स्त्री. ना.) आंबे उतरून काढायाचा झेला तो.
आँखूड, आखूड (स. आकुंचन) (वि०) कांहींएक लांबीचे प्रमाणाहून ज्याची लांबी कमी तें.
आँखे (प्रा. न. ना.) गोणी, कंठाळ इ० ओझ्याचे जे दोन दोन भाग ते प्रत्येकी. २ तेल तूप इ० कांनी भरलेला जो कानड्याचा बुधला तें.
आख्या (सं. स्त्री. ना.) सद्गुण किं० दुर्गुण यांच्या योगानें झालेली कोणकाची प्रसिद्धि ती.
आख्यान (स. न. ना.) चरित्ररूप कथानक तें.
आग (स. अग्नि) विस्तव. २ ज्वर, क्रोध इ० कांनीं होतो जो शरीराचा संताप ती. ३ आग लावणें म्ह० कोणाचा कोणाशीं कज्जा, युद्ध होई असें करणें.
आगतस्वागत (स. न. ना.)आपल्याकडे आलेल्या पाहुण्याचा उठून जागा देणें, कुशल प्रश्न करणें इ० सत्कार तें.
आगंतुक (स. पु. ना.) अगांतुक.
आगम (स. पु. ना.) धर्मशास्त्रादिशास्त्र तो. २ वृत्ति इ० कांची जो प्राप्ति तो. ३ कोणेक व्यवहाराची आरंभदशा तो.
आगमन (स. न. ना.) दूर असणाऱ्या मनुष्यादिकानें जवळ येण्याचा किं० होण्याचा व्यापार तें.
आगर (स. आकर) (पु. न. ना.) नारळ, सुपारी, केळ, इ० पदार्थ उत्पन्न होण्याचें किं० मीठ पिकवायाचें जें क्षेत्र तें. २ जो जो पदार्थ ज्या ज्या ठिकाणी पुष्कळपणें उत्पन्न होतो तें तें ठिकाण त्याचें
आगलाव्या (आग, लावणें) परस्परांमध्ये विरोध पाडून कज्जा लावण्याचा स्वभाव ज्याचा तो.
आगवळ (अग्र, वळण) (पु. ना.) वेणीच्या अग्राची गांठ घट्ट यावी म्हणून गंगावन इ० कांचा जो दोर तेथें लावितात तो
आगळ (स. अर्गला) अडसर.
आगळा (वि०) अधिक.
आगळीक (आगळा) (स्त्री. ना.) अपराध व्हायाजोगें मर्यादेचें उल्लंघन करून जें वर्तन ती.
आगापिछा (पु. ना.) अंगरखा इ० पदार्थांचा किं० कोणेक गोष्टीचा पुढला आणि मागला जो विभाग तो
आँगीठ (आग) (स्त्री. ना.) (ग्र०) अगटी.
आगेंमागें (प्रा. अव्य०) कांहींएक

देशकालादि अवधीचे काहीं पुढें किं० काहीं मागें.

आग्या (आग) (पु. ना.) एक वनस्पति आहे जिचा अंगास स्पर्श झाला असतां आग होत्ये तो. २ अनेक सर्प, रोग, मासे इ० पदार्थ त्यांमध्ये ज्याच्या योगानें अंगाची आग होत्ये तो.

आग्यावेताळ (आग, वेताळ) (पु. ना.) एक पिशाच आहे, जो साध्य झाला असतां पाहिजे त्या पदार्थास पाहिजे त्या ठिकाणीं आग लावतां येते. २ तापट व साहसी जो मनुष्य त्यास म्हणतात.

आग्येमोहोळ (आग, मोहोळ) (न. ना.) आग्या माशाचें मोहोळ तें.

आग्रह (स. पु. ना.) काहीं कार्य करावें किं० कोठें जावें इ० प्रकारची मनांत आलेली गोष्ट तडीस नेण्याविषयीं अंतःकरणानें धरिला जो भाव तो. २ दुसऱ्यास काही कार्याविषयीं प्रवृत्त किं० निवृत्त करण्यास जी अतिशय प्रार्थना करणें तो.

आघवा (वि०) अघवा.

आघाडी (स्त्री. ना.) कोणेक पदार्थाचा पुढील जो भाग किं० प्रदेश ती. २ घोड्याचे पुढचे पायांस किं० गळ्यास बांधायाची दोरी ती

आघात (सं. पु. ना.) धक्का. २ कोणेक पदार्थांचा दुसऱ्याशीं वेगानें शब्द होई असा संबंध तो.

आंच (प्रा. स्त्री. ना.) भट्टी. २ पाक इ० कास जो अग्निसंस्कार करितात ती.

आँचका (प्रा. पु. ना.) कोणेक पदार्थास ओढणें, लोटणें, हलविणें इ० काच्या योगानें जो त्यावर चलनरूप संस्कार उत्पन्न होतो तो.

आचरण (सं. न. ना.) काहिंएक कर्म आचरण्याचा व्यापार तें. २ आचार.

आचरणें (आचरण) (धा. ना.) कोणेक कर्म त्या त्या अनुकूल व्यापारद्वारा संपादणें.

आंचवणें (आचमन) (धा. ना.) भोजन झाल्यावर हस्त, मुख प्रक्षालन करणें. २ (आ, च्यवन) (सं.) मुकणें.

आँचळ (सं. अचल) (पु. ना.) गाय, म्हैस इ० पशु स्त्रियांचा स्तन तो.

आंचळी (स. अंचल) (स्त्री. ना.) वस्त्राचे शेवटास विणल्यावाचून जी सुताची शेवटें राहिलीं असतात ती.

आचांगळी (वि०) (ग्र०) निष्फळ.

आचार (सं. पु. ना.) शास्त्रांत सांगितलेले कर्मादिकांविषयीं जे विधिनिषेध त्यांचें पालन करून जें वर्तन तें किं० वर्तनप्रकार तो. २ व्यावहारिक कर्मांत मनुष्यादिकांचें वर्तन तो.

आचारविचार (सं. पु. ना.) शास्त्रोक्त स्नानसंध्यादिक तो आचार आणि कर्तव्याकर्तव्य तो विचार.

आचारी (पु. ना.) स्वयंपाकी जो दु-

सन्याच्या घरीं स्वयंपाक करून उपजीवन करतो ब्राह्मण तो.

आचार्य (सं. पु. ना.) यजमानानें आपल्या अंगत्वानें होमादि कर्म करायाकारितां वरिला असतो जो तो. २ वेदादि विद्या सांगणारा गुरु तो. ३ ह्या शास्त्राचा किं० ह्या धर्मांचा जो प्रवर्तक तो त्याचा. ४ विद्वान् प्रतिष्ठित जो पुरुष त्याच्या नावापुढें हें प्रतिष्ठानार्थ लागतें. उ० रामाचार्य, व्यंकटाचार्य इ०. [२ अगणित.

आचुंबित (सं. वि.) (ग्रं.) संपूर्ण.

आच्छादन (सं. न. ना.) कांहींएक पदार्थांवर वस्त्रादिक घालून बाहेरून न दिसे असें करण्याचा व्यापार ते. २ त्यास साधन जें वस्त्रादिक तें. [दिवसीं.

आज (स. अद्य) (अव्य०) वर्तमान-

आजकाल (अव्य०) सांप्रतकाळीं.

आजन्म (सं. अव्य०) जन्मापासून, जन्मपर्यंत.

आजला (आज) (अव्य०) कांहींएक अवधीपासून आजपर्यंत जो काळ तितक्या काळाला.

आजानुबाहु (सं. वि०) कोणी उभा राहिला असतां सहज गुडघ्यास पुरायाजोगे ह्याचे हात लांब असतात असा जो पुरुष तो.

आजूबाजूस (अव्य०) शेजारीं किं० आसपास.

आज्य (सं. न. ना.) शेळीचे दुधाचें तूप. २ साधारण तुपासही म्हणतात.

आटपणें (धा. ना.) पसरलेला सवेग गतिमान् जो पदार्थ किं० कांहीं व्यवहार याचा उपसंहार करणें. २ कांहींएक व्यवहाराचा निर्वाह करण्याविषयीं अंगीकार करणें. ३ कांहींएक विषय आपल्या सत्तेंत आणणें इ०.

आटपता (वि०) विशेष पसरलेला नव्हे असा जो जितक्यास तितका नेमस्त संसार, व्यवहार, शरीर इ० पदार्थ तो.

आटपसार (प्रा. वि०) आटपता.

आटपाआटप (आटपणें) (स्त्री. ना.) अनेक प्रकारचा पसारा आटपण्याचा व्यापार ती.

आटा (पु. ना.) इरलें, छत्री यांचा सांगाडा तो. २ कांहीं पदार्थांभोंवता बांधण्याकारितां दोरी इ० कांचा घालितात वेढा तो.

आटाआट (स्त्री. ना.) अटापिटा.

आटाघाट (स्त्री. ना.) आटाआट.

आटापिटा (पु. ना.) अटापिटा.

आटी (स्त्री. ना.) (ग्रं०) यत्न.

आटोका (पु. ना.) पदार्थांचो इयत्ता आकळण्यास साधन जी बुद्धि शक्ति तो.

आटोकाट (वि०) भद्दल.

आटोप (पु. ना.) उपसंहार. २ कोणेक व्यवहारव्यवस्थेनें आटपून धरण्याविषयीं अंगीं असतें सामर्थ्य तो

आटोपणें (धा. ना.) आटपणें.

आटोळा (पु. ना.) (ग्रं०) ओटा.

**आठव** (आठवणें) (पु. ना.) स्मरण.

**आठवडा** (आठ) (पु. ना.) आठ किं० सात दिवसांचा समुदाय इ० महिन्याचा चतुर्थांश काल तो.

**आठवण** (आठवणें)(स्त्री. ना.) आठव.

**आठवणूक** (आठवणें) (स्त्री. ना.) दूर असलेला किं० मेलेला जो आपला इष्ट त्याची आपणास आठवण होण्यास कारण जो त्याचा वस्त्रादि पदार्थ आपणापाशीं असतो ती. २ त्या योगानें त्याचें होतें स्मरण तो.

**आठुवें** (न. ना.) (ग्रं०) हृदय.

**आड** (प्रा. पु. ना.) ज्याला खालीं उतरायास पायऱ्या केल्या नाहींत असा जो खणून केलेला बांधीव जलाशय तो. २ (अव्य०) कांहींएक पदार्थ न दिसण्याजोगा होई अशाप्रकारें मध्यें कोणी असणें, होणें. ३ अडोशानें युक्त स्थळ त्याच्या ठायीं. ४ अट.

**आडदिवस** (आड, दिवस) (पु. ना.) कांहींएक कर्माविषयीं वर्ष किं० महिना यांतील संकेतित अ० नियमित असतात जे दिवस यांहून इतर दिवस तो.

**आडपडदा** (आड, पडदा) (पु. ना.) कांहींएक स्थळीं अडोसा व्हायास जो वस्त्र इ० कांचा पडदा बांधितात तो. २ लज्जा, भय इ० कारणामुळें भाषणादिकांत राखितात जी मर्यादा तो.

**आडवी, आडवें** (सं. अटवी) (स्त्री. न.) (ग्रं०) अरण्य.

**आडळ** (पु. ना.) (ग्रं०) स्पर्श.

**आडाखा** (प्रा. पु. ना.) अडाखा.

**आढ्य** (सं. वि०) धनिक. २ (वि०) जें विद्यादि ज्याजवळ आहे तेणेंकरून युक्त. उ० गुणाढ्य इ०.

**आढ्यता** (सं. स्त्री. ना.) तादृश अंगीं योग्यता नसतां प्रतिष्ठितपणाचा जो कोणी घालितो भाव ती.

**आण** (प्रा. स्त्री. ना.) शपथ.

**आणखी** (प्रा. अव्य०) अणखी.

**आणणें** (सं. आनयन) (धा. ना.) कोणेक स्थळाहून कोणेक पदार्थ आपल्याजवळ येई असा करणें.

**आणने** (स्त्री. ना.) आणण्या नेण्याची जो खटपट ती.

**आणभाक** (आण, भाष) (स्त्री. ना.) शपथपूर्वक वचन देतात ती.

**आणीबाणी** (प्रा. स्त्री. ना.) अणीबाणी.

**आतपत्र** (सं. न. ना.) अबदागिर, छत्री इ०.

**आतळणें** (धा. ना.) स्पर्शणें.

**आतांशीं, आतांसा** (आतां, असा) (अव्य०) सांप्रतकाळीं.

**आतिथ्य** (सं. न. ना.) अतिथींचा सत्कार.

**आतुडणें** (धा. ना.) (ग्रं०) हातीं लागणें.

**आतुर** (सं. वि०) दुखणाईत. २ अतिशय उत्सुक झालेला तो.

**आतुर्बळी** (वि०) (ग्रं०) अतिबलाढ्य.

**आत्मज** (सं. पु. ना.) मुलगा.

**आत्मनिवेदन** (सं. न. ना.) आत्मा

ईश्वरास अर्पण करावा असा एक भक्तीचा प्रकार आहे तें.

आत्मबुद्धि (सं. स्त्री. ना.) दुसऱ्याच्ये शिकवणीची नव्हे; केवळ आपलीच बुद्धि ती. २ आत्मविषयक बुद्धि ती.

आत्महत्या (सं. स्त्री. ना.) शास्त्रविधिविरहित बुद्धिपूर्वक करितात जो आपल्या प्राणांचा नाश ती. २ त्यापासून घडतें जें पातक तें.

आत्मा (सं. पु. ना.) देहमात्राच्याठायीं भिन्नत्वेंकरून त्या त्या देहाचा अभिमानी जो जाणवि तो. २ त्या सर्व जाणिवेचें मुख्य बिंबभूत जें परब्रह्मस्वरूप ज्याला परमात्मा म्हणतात तो. ३ अंतःकरण. ४ देह. ५ मी असा जो शब्द त्याचा अर्थ तो. उ० आपलें जें गृह तें आत्मगृह इ०.

आत्मीय (सं. वि०) आपलेपणा ज्यावर आहे असा जो सोयरा धायरा इ० तो.

आत्यंतिक (सं. वि०) अत्यंत.

आंथरणें (सं. आस्तरण) (धा. ना.) अंथरणें.

आथि-थी (सं. अस्ति) (क्रि०) आहे.

आथिलेपण (न. ना.) भाग्य. २ थोरपण.

आंदण (प्रा. न. ना.) लग्नांत कन्येला किं० जांवयाला अवश्य जें द्यावयाचें त्याहून इतर जी घोडा, रथ, दास, दासी इ० देणगी देतात तें.

आदर (सं० पु. ना.) कांहींएक पदार्थ किं० गोष्ट यांविषयीं हा चांगला असा अंतःकरणांत भाव असतो तो. २ सन्मान.

आदरउपचार (सं. पु. ना.) कोणी आपल्याकडे आला जो त्यास आदरपूर्वक आसन, भोजन इ० जे उपचार करितात तो. [उपचार.

आदरसत्कार (सं. पु. ना.) आदर

आदर्श (सं. पु. ना.) आरसा.

आदलेदिवशीं (आदि, दिवस) (अव्य०) इष्टदिवसाहून पूर्वदिवशीं.

आदळआपट (आदळणें, आपटणें) (स्त्री.) क्रोधादिकांमुळें शरीर किं० कांहीं इतर पदार्थ इकडे तिकडे अनेक वार आपटण्याचा जो व्यापार ता.

आदळणें (सं० आदलन) (धा. ना.) आपटणें. २ थडकणें. [थैपण.

आदळपण (न. ना. ) (ग्रं.) असम-

आदा (प्रा. पु. ना.) अभिनय. २कांहींएक व्यापारापासून होतो जो लाभ तो. ३ पदरीं द्रव्यादिकांचा जो संग्रह तो. ४ कुळाकडून द्रव्यादि येऊन होतें जो जमा तो.

आदाय (पु. ना.) व्यापारापासून होतो लाभ तो.

आदि (सं. पु. ना.) ज्यापासून कोणेकाचा आरंभ होतो तो त्याचा. २ समुदायांत जो प्रमुख तो. ३ इष्ट विषयाहून अगोदरचा तो. ४ (अव्य०) अगोदर.

आदिकारण (सं. न. ना.) मुख्यकारण.

आदित्य (सं. पु. ना.) सूर्य.

आदिपश्चात् (सं. अव्य०) किंचित् पुढें किं० मागें.
आदिपुरुष (सं. पु. ना.) परमेश्वर.
आदिमाया (सं. स्त्री. ना.) जिच्या योगानें सर्व प्रपंच होतो अशी ईश्वराची शक्ति ती. २ पार्वती.
आदिशक्ति (सं. स्त्री. ना.) आदिमाया.
आदिशून्य (सं. न. ना.) (ग्रं०) आदिशक्ति.
आदौ (सं. अव्य०) अगोदर.
आद्य (सं. वि०) अगोदरील.
आंधळा (सं. अंध) (वि०) कांहीं पदार्थ पाहावयास सामर्थ्यहीन जे नेत्र किं० तसा मनुष्य तो.
आधार (सं. पु. ना.) पदार्थ इकडे तिकडे न पडतां राहण्याविषयीं कारण जो अन्य पदार्थ तो. २ इष्ट व्यवहार खोटा न पडतां चालायास कारण जें वचनादि प्रमाणाचें बळ असतें तो किं० तें वचनादिरूप प्रमाण तो. ३ संसारादिकांचा निर्वाह होण्याविषयीं जें त्याला उपयोगी धन, विद्या इ० कांचें बळ तो.
आधि (सं. पु. स्त्री. ना.) केवळ अंतःकरणास जी व्यथा होय ती. २ कांहींएक आपल्या मागें लागतें लचांड त्यास म्हणतात. ३ (पु.) गाहाण.
आधिक्य (सं. न. ना.) अधिकपणा.
आधिपत्य (सं. न. ना.) धनीपणा. २ कोणेकाची कोणेकस्थळीं असत्ये जी मोठी प्रतिष्ठा तें.
आनखशिख (सं. अव्य०) पायांचे नखापासून डोकीचे केंसापर्यंत.
आनंद (सं. पु. ना.) सुख.
आनंदवन (सं. न. ना.) काशीक्षेत्र.
आनन (सं. न. ना.) मुख.
आनान (अन्य, अन्य) (वि०) (ग्रं०) वेगवेगळा. [ति.
आनिकी (प्रा. स्त्री. ना.) (ग्रं०) आ-
आनोज (पु. ना.) (ग्रं०) अंकुर.
आप (सं. न. ना.) उदक. २ आपण.
आपंगणें (धा. ना.) (ग्रं०) पोर, पशु इ० कास जवळ बाळगून ममतापूर्वक रक्षण करणें.
आपगा (सं. स्त्री. ना.) नदी.
आपण (सं. आत्मा) मी या अर्थाचें वाचक हें सर्व नाम आहे. २ सत्कारपूर्वक भाषणांत तूं याचे अर्थाचें वाचक परंतु तेव्हां अनेक वचनांत. ३ बाजार. [आपलेठायीं.
आपणपाच (आत्मा)(अव्य०) (ग्रं०)
आपत्ति (सं. स्त्री. ना.) संसार इ० कांचे निर्वाहास जो पदार्थ आवश्य पाहिजे त्याची दुर्लभता किं० रोगादि जन्य दुःख प्राप्त झाल्यामुळें जी कष्टावस्था प्राप्त होत्ये ती. २ प्राप्ति.
आपदा (सं स्त्री. ना.) आपत्ति.
आपधाक (आपला, धाक) (पु. ना.) दुसऱ्यानें भय दाखविलें नसतांही आपणच आपल्या मनांत हा मला मारील इ० कल्पना करून जो धाक बाळगितात तो.
आपन्न (सं. वि०) आपत्ति दशेस जो पावला तो. २ प्राप्त.

**आपपर** (आपला, पर) (वि०) आपला व पराचा काहीं पदार्थादि तो.

**आपलपोटाऱ्या, पोट्या** (आपला, पोट) (वि०) आपलें मात्र पोट भरलें इ० झालें इतर जे आपले पोसण्यास योग्य त्यांची काळजी जो बाळगीत नाहीं अशा स्वभावाचा तो

**आपला** (आपण) (वि०) आपण जो त्याचा

**आपलातुपला** (आपला, तुझा) (वि०) हा माझा आणि हा तुझा अशा भेदबुद्धीनें मानिला जो पदार्थ मात्र तो.

**आपलेआपण** (आपण) (अव्य०) दुसऱ्यानें प्रेरणादि न करितां स्वयें आपण होऊन.

**आपाड** (प्रा. पु. ना.) (ग्रं०) मोठेपणा, आधिक्य. २ अंतर अ० भिन्नता.

**आपादणें** (धा. ना.) (ग्रं०) संपादणें.

**आपान** (सं. पु. ना.) (ग्रं०) मोक्ष.

**आपाप** (अव्य०) आपलेआपण.

**आपुथिणें** (धा. ना.) (ग्रं०) गाजणें.

**आपैतें** (वि०) (ग्रं०) ऐतें. [२ अत्यंत.

**आपैसें** (प्रा. वि०) (ग्रं०) आपाप.

**आप्त** (सं. पु. ना.) साक्षात् किंवा परंपरेनें ज्याचा शरीरसंबंध परस्पर आहे ते परस्पर. २ आपला असा मानिला जो इष्ट मित्र इ० तो. ३ ज्याचें वचन ईश्वरासारिखें प्रमाण मानावें असा जो यथार्थ भाषणकर्ता तो. ४ (वि०) प्राप्त.

**आफडणें** (धा. ना.) (ग्रं०) स्पर्श करणें. [आपटणें.

**आफळणें** (प्रा. धा. ना.) (ग्रं०)

**आब** (प्रा. पु. ना.) याचाशीं अमुक द्रव्य, विद्या इ० असावें असा दुसऱ्यास तर्क व्हायाजोगा जो कांही लक्षणावरून डौल दिसत असतो तो. २ भाषणादिव्यवहार हा जसा असावा तसा यथायोग्य आहे असा जो काहीं सुशोभितपणा दिसत असतो तो.

**आबळागोबळा** (प्रा. वि०) (ग्रं०) व्यापून असलेला.

**आबादानी** (फा० स्त्री. ना.) स्वचक्र, परचक्र, दुर्भिक्ष इ० कांवाचून जी गांव, देश इ० कांची नांदती स्थिति ती.

**आबादी** (फा० स्त्री. ना.) आबादानी.

**आबालवृद्ध** (सं. पु. ना.) केवळ लेंकरापासून वृद्धपर्यंत जो मनुष्यसमुदाय तो.

**आंबोण** (आंबणें) (न. ना.) धान्य, कोंडा इ० शिजवून किं० भिजवून गुरांस खायास घालायासाठीं करितात तें. २ लग्नांत एके पाटींत शिध्याचें सर्व साहित्य, व कोंडा, पेंडीचा खडा, भाजीच्या काड्या इ० घालून वाजत गाजत विहिणीकडे पोहोंचवितात तें.

**आब्रू** (फा० स्त्री. ना.) योग्यता, मानमान्यता. २ काही पराक्रमादिकांमुळें जी राजादिकांपासून प्रतिष्ठा मिळते ती.

आभ (प्रा. न. स्त्री. ना.) आभाळ. २ (ग्रं०) प्रतिबिंब.

आभंड (प्रा. न. ना.) अभंड.

आभरण (सं. न. ना.) अलंकार.

आभार (सं. पु. ना.) दुसऱ्यानें केल्या उपकाराचें जें आपणावर ओझें असतें तो.

आभास (सं. पु. ना.) कोणेक आश्रयावर दृष्टिदोषादि कारणांमुळें कांहीं असत्य पदार्थांचा भ्रम होतो तो. २ भास.

आमंत्रण (सं. न. ना.) कांहीं कार्यार्थ कोणेकास बोलावणें तें. २ लग्नादि समारंभांत आमंत्रण करण्यास जातो मनुष्यसमुदाय तें. ३ अंवतणें.

आमय (सं. पु. ना.) रोग.

आमांश (सं. पु. ना.) पोटांत अपक्क अन्नरसाचा जो अंश राहतो तो किं० त्यापासून होत्ये विकृति ती.

आमिष (सं. न. ना.) खाण्याकरितां मेंढा इ० कांचे अंगाचें काढिलें जें अपक्क मांस तें.

आमेज (फा० पु. ना.) मिश्रितभाव.

आमोद (सं. पु. ना.) पुष्पादिकांचा सुगंध तो.

आम्नाय (सं. पु. ना.) वेद.

आम्र (सं. पु. ना.) आंबा.

आय (सं. पु. ना.) मिळकत. २ (ग्रं०) लोखंड. ३ आई. ४ (ग्रं०) आकार. ५ प्रत्यय.

आयणी, यनी (प्रा. स्त्री. ना.)(ग्रं०) सामर्थ्य. २ मन. ३ मत. ४ इच्छा. ५ आइणा किं० म्हण. ६ चांगली चाल.

आयतन (सं. न. ना.) घर, स्थान.

आयतें (न. ना.) आइतें.

आयाबाया (आई, बाई) (स्त्री. ना.) पराक्रमहीन पुरुषादिक किं० गोरगरीब लोक त्यांस प्रसंगानुसार म्हणतात.

आयास (सं. पु. ना.) परिश्रम.

आयुध (सं. न. ना) शस्त्र, हत्यार.

आयुष्य (सं. न. ना.) उत्पन्न झाल्यापासून मरेपर्यंत जो काळ तें.

आर (प्रा. स्त्री. ना.) भोंवरा इ० कांची आणी ती. २ अजगर.

आरक्त (सं. वि०) तांबडा.

आरज (आर्य) (वि०) (ग्रं०) श्रेष्ठ.

आरती (सं. स्त्री. ना.) देवादिकांस दीपानीं ओंवाळावें असा जो उपचार करितात तो. २ ओंवाळण्यास सिद्ध केलेलें दीपपात्र तें. ३ ओंवाळतेसमयीं म्हणतात गीतविशेष ती.

आरपार (सं. पार) (अव्य०) अलीकडचे भागापासून पलीकडचे भागापर्यंत. [ऽस्थिति.

आरंभ (सं. पु. ना.) प्रारंभ. २ मू-

आरंभरंभेचागोरऊ (पु. ना.) (ग्रं०) केळीचा खांब.

आरंभणें (सं. आरंभ) (धा. ना.) कोणेक कार्यास प्रारंभ करणें.

आरंभशूर (सं. वि०) उत्साहपूर्वक

कोणेक कार्यास आरंभ मात्र करावा मग तें आळसानें शेवटास न नेतां तसेंच टाकावें असा स्वभाव ज्याचा तो.

आरवणें (धा. ना.) कोंबडा इ० पक्ष्यांनीं शब्द करणें.

आरळ (प्रा. वि०) (ग्रं०) मऊ.

आराइणें (प्रा. धा. ना.) (ग्रं०) अनुकूळ असणें. २ अर्पिलें जाणें.

आराणूक (प्रा. स्त्री. ना.) (ग्रं०) पदार्थांची प्रीति. २ भगवत्प्राप्तीस विघ्न, प्रतिबंध तो. [इ० तें.

आराधन (सं. न. ना.) पूजन, स्तवन

आराधणें (आराधन) (धा. ना.) आराधन करणें.

आराध्य (सं. वि०) आराधन करण्यास योग्य तो.

आराम (सं. पु. ना.) दुखणें इ० कांचा उपशम झाल्यामुळें जी अंतःकरणास समाधानावस्था होते तो. २ दुखण्यास जो कांहीं उपशम तो. ३ उपवन. ४ सुखरूपता.

आरुष (आर्ष) (वि०) (ग्रं०) छांदिष्ट.

आरूढ (सं. वि०) आरोहण केलें ज्याणें तो.

आरोग्य (सं. न. ना.) निरोगीपणा.

आरोगणें (धा. ना.) (ग्रं०) भक्षण करणें.

आरोप (सं. पु. ना.) वास्तविक जो धर्म ज्यावर नाहीं त्यावर त्याचें बळेंच स्थापन तो. २ शेत इ० कांत बीजाचा प्रक्षेप तो. ३ अपवाद.

आरोहण (सं. न. ना.) खालच्या प्रदेशाहून वरच्या प्रदेशीं गमन तें.

आरोळी (प्रा. स्त्री. ना.) उंच स्वरानें जी हाक ती.

आर्जव (सं. न. ना.) कोणेकाचें अंतःकरण प्रसन्न करून घेण्याकरितां त्याची सेवा, स्तुति इ० रूप आचरणाचा प्रकार तें.

आर्त (सं. वि०) पीडित. २ आतुर.

आर्ति (सं. स्त्री. ना.) पीडा.

आर्द्र (सं. वि०) ओला.

आर्य (सं. वि०) श्रेष्ठ.

आर्या (सं. स्त्री. ना.) एक कवितेचें छंद आहे. २ त्या छंदावर केलेला श्लोक तो.

आर्यावर्त (सं. स्त्री. ना.) विंध्याचल आणि हिमालय यांमधील प्रदेश तो

आलय (सं. न. ना.) घर.

आलस्य (सं. पु. ना.) आळस.

आलागेला, आलेंगेलें (येणें, जाणे) (पु. न.) पाहुणा. [भाषण तो.

आलाप (सं. पु. ना.) परस्परांचें जें

आलापाला (पु. ना.) जसा तसा देहनिर्वाह मात्र होतो असा जो पाला, कंद इ० भक्ष तो.

आलिंगणें (सं. आलिंगन) (धा. ना.) आलिंगित करणें.

आलिंगन (सं. न. ना.) प्रीतीनें पुत्रादिकांस किं० केवळ कांहीं पदार्थास कवटाळून धरणें तें.

आली (सं. स्त्री. ना.) सखी. २ पंक्ति.

आलोचन (सं. न. ना.) नेत्रांनी

कि० बुद्धीनें काहींएक पुर्तेंगणी पाहण्याचा व्यापार तें.

**आलोढणें** (प्रा. धा. ना.) (ग्रं०) पारंगत होणें. २ काहींएक हातीं येणें. ३ क्रमानें सर्व कांहीं प्राप्त होणें.

**आलोलीक** (प्रा. स्त्री. ना.) (ग्रं०) आवड. [२ अवसान.

**आव** (प्रा. पु. ना.) आकार, डौल.

**आँव** (स. आम) (स्त्री. ना.) पोटांत अन्नाचा नीट परिपाक न झाल्यामुळें राहतो जो आमांश तो.

**आवग** (प्रा. पु. ना.) (ग्रं०) अहंकार.

**आवगणें** (प्रा. धा. ना.) पोर इ० कानें कुलपरंपरागत रीतीची मर्यादा सोडून मनस्वीपणानें वर्तणें. २ (ग्रं०) आटोपणें.

**आवटणें** (धा. ना.) (ग्रं०) उरणें.

**आवड** (प्रा. स्त्री. ना.) प्रीति.

**आवडनावड** (आवडणें, न आवडणें) (स्त्री.) काहीं पदार्थांविषयीं आवड काहींची नावड असा अंत:करणांतील विषम भाव तो.

**आवडनिवड** (स्त्री. ना.) आवडनावड.

**आवडळ** (पु ना.) (ग्रं०) साकार, दृश्य.

**आवरण** (स. न. ना.) आवरण्याचा व्यापार तें. २ तेणेंकरून पदार्थास होतो आवृतपणा तें. ३ वेष्टन.

**आवरणें** (आवरण) (धा. ना.) आटपणें. २ आच्छादणें. ३ वेष्टणें.

**आवर्जून** (सं. आवर्जन) (अव्य०) अगत्यपूर्वक.

**आवर्त** (स. पु. ना.) नदी इ० कांचें पाणी कि० वायु यांचें वर्तुळ भ्रमण होऊं लागल्यामुळें जो मंडलवत् आकारविशेष होतो तो. २ शरीरावरील केंसांचें वर्तुळाकार वळण तें.

**आवर्तन** (स. न. ना.) ईश्वरप्रीत्यर्थ स्तोत्रादिकांचा पाठ तें.

**आवश्यक** (स. वि०) निश्चयरूप, अगत्यरूप. [शब्द तो.

**आवाज** (फा० पु. ना.) ध्वनिरूप जो

**आवार** (स. पु. ना.) घरस् इ० स्थळ आवृत करण्यासाठीं भोंवतालीं जो कुंपण, गडगा, सैन्य इ० कांचा समावेश करितात तो.

**आवाहन** (सं. न. ना.) मूर्ति, शस्त्र इ० कांत मंत्रादिकेंकरून देवतादिकांचें सन्निहित करणें तें.

**आविर्भाव** (स. पु. ना.) स्पष्टता. २ आकार.

**आविष्करण** (सं. न. ना.) आविर्भाव.

**आवृत** (स. वि०) आवरण केलें आहे ज्याचें तो.

**आवृत्ति** (स. स्त्री. ना) काहींएक कर्माचें त्या त्या क्रियेच्या योगानें मुळापासून शेवटपर्यंत जें अनुष्ठान तें. २ (ग्रं०) येणें व जाणें

**आवेश** (स. पु. ना.) काम, क्रोध इ० कांचा अंत:करणांत होतो जो अतिशय आविर्भाव तो कि० त्यामुळें कर्तव्य कार्यावर वेगानें उठून पडण्याजोगें होतें अवस्थांतर तो

**आशंका** (सं. स्त्री. ना.) कोणेक गोष्ट करण्यास अंत:करणास वाटतो जो संकोच तो. २ येथें अमुक अर्थ असावा तो कां नाहीं कि०

अमुक नसावा तो कां आहे असा प्रकारची कोणेक गोष्टीविषयीं उठ-णारी कल्पना ती. ३ किंतु.

**आशय** (सं. पु. ना.) अभिप्राय. २ ज्या पदार्थाचें उत्पन्न होऊन राहावयाचें जें स्थान तो. इ० ज-लाशय, गर्भाशय.

**आशा** (सं. स्त्री. ना.) कांहीं इष्ट-पदार्थाचे लाभाविषयीं किं० कार्य-सिद्धीविषयीं जी संभावना तद्रूप अंतःकरणवृत्ति ती. २ केवळ आ-पलासा झालेला पदार्थ त्याचा आ-पला वियोग होऊं नये असा जो भाव ती. ३ इच्छा.

**आशाळभूत** (वि०) कांहींएक खा-ण्याच्या पदार्थाविषयीं आशा धरून याचना करण्याचा ज्याचा स्वभाव तो.

**आशींपाशीं** (प्रा. अव्य०) आसपास.

**आशीर्वाद** (सं. पु. ना.) कोणेकाचें बरें असो इ० रूप वाक्य बोलणें तो किं० मनांत चिंतन तो.

**आशौच** (सं. न. ना.) सूतक.

**आश्चर्य** (सं. न. ना.) विस्मय, नवल.

**आश्रम** (सं. पु. ना.) ब्रह्मचर्यादि चार ते. २ ऋषि इ० कांचें राहा-वयाचें पर्णशालारूप किं० आस-पासची जमीन सुद्धां जें स्थळ तो.

**आश्रय** (सं. पु. ना.) आधार. २ कोणेकाचे स्थितीस गुणावह किं० दोषावह जो कोणेकाचा सा-मीप्य संबंध तो.

**आश्रा** (पु. ना.) आश्रय.

**आश्रित** (सं. वि०) ज्याचा ज्याला आश्रय आहे तो त्याचा. २ कोणे-कानें जो कोणी आश्रयिला तो. ३ श्रीमंत लोकांचे पदरीं उपाध्या, कारकून इ०कांसारिखा नसून बाळगलेला असतो जो भिक्षुक ब्राह्मण तो.

**आश्लेष** (सं. पु. ना.) (ग्रं०) आ-लिंगन.

**आश्वासन** (सं. न. ना.) भय, शोक इ०कांनीं युक्त जो त्यास कांहीं चिं-ता नाहीं भिऊं नको इ० वचनानें धैर्य देतात तें.

**आँस** (सं. अक्ष) रथ, गाडी इ०कां-चा कणा तो.

**आस** (सं. आशा.) (स्त्री. ना.) आशा.

**आसक्त** (सं. वि०) कोणेक विषयावर बसलेलें अंतःकरण, इंद्रिय तें किं० तेणेंकरून युक्त पुरुष तो.

**आसक्ति** (सं. स्त्री. ना.) आसक्तप-णाची स्थिती ती.

**आसन** (सं. न. ना) बसण्याचा व्या-पार तें. २ बसायाच्या उपयोगी जो पाट इ० तो. ३ मनुष्याचे बस-ण्याचे आसनमांडी इ० प्रकार ते प्रत्येकीं. ४ घोडा इ० जें वाहन तें. ५ जमाखर्ची लिहिण्यांत जीं अनेक प्रकरणें तीं प्रत्येकीं.

**आसपास** (सं. आसमंतात्) (अव्य०) कांहींएक पदार्थाचे सभोंवता समीप प्रदेश जो त्याचेठायीं.

**आसमंतात्** (सं. अव्य०) आसपास.

**आसव** (सं. पु. ना.) मद्य. २ द्राक्षें इ०कांचा अग्निसंयोगानें औषधा-साठीं जो द्रव काढितात तो.

आसामी (अर० स्त्री·ना·) फडन-विशी इ० सरकारी चाकरी ती. २ती त्या कामगारास नेमलें असतें जें वेतन ती. ३ मनुष्यजातीच्या अनेक व्यक्ति त्या प्रत्येकीं.

आसिवार (पु. ना.) (ग्रं०) असिवार.

आसुक (सं. अप.) (न. ना.) (ग्रं०) अंशुक, वस्त्र.

आँसुडणें (धा. ना.) सुपानें धान्यादिक पाखडणें. २ (ग्रं०) ओढणें, झटका देणें.

आस्तिक (सं·पु.ना.) ईश्वर आहे असें मानणारा तो. २एक ऋषि होता.

आस्तिक्य (सं.न. ना.) अस्तिकपणा.

आस्था (सं· स्त्री· ना·) काहींएक कार्य साधावेंच साधावें असा जो भाव तो. २ आशा. ३ पोटाग.

आस्थेवाईक (आस्था) (वि०) कोणेक गोष्टीची ज्यास पोटाग आहे तो.

आस्पद (सं· न. ना.) स्थान.

आस्रा (सं· अप.) (पु. ना.) आश्रय.

आहणा (सं. आह) म्हण, उखाणा इ० तो.

आहाच (प्रा.अव्य०) साधारणपणानें.

आहाणा (आ, हनन) (वि०)(ग्रं०) आत्मघातक.

आहार (सं·पु. ना.) अन्नादिक भक्ष्य पदार्थ तो. २ तें अन्न खाण्याचा व्यापार तो. ३ अजगर. ४ निखाऱ्यांचा समुदाय तो. ५ आहारीं असणें म्ह० झोंपायाजोगें असणें.

आहाळणें (धा.ना.) (ग्रं०) पोळणें.

आल्हाद (सं. पु. ना.) आनंद.

आळ (प्रा. पु. स्त्री. ना.) अपवाद. २ वडील इ० कांजवळ लडिवाळपणें घेतात कांहीं गोष्टीविषयीं हट तो.

आळवणें, ळविणें (प्रा. धा. ना.) ईश्वर, दाता इ० कांपुढें वेडीं वाकडीं तोंडें करून दीनपणानें बोबड्या शब्दांनीं त्यास प्रसन्न करणें.

आळशी (आळस) (वि०) स्वभावानें जो आलस्ययुक्त तो. २ (स्त्री.) तेलधान्य आहे.

आळस (स. आलस्य) (पु. ना.) उद्योग करण्याविषयीं जो अंगीं मंदपणा तो. २ हैगय.

आळुमाळ (प्रा.वि०) (ग्रं०) अळुमाळ.

आक्षेप (सं· पु. ना.) आशंका. २ अडथळा.

आज्ञा (सं· स्त्री. ना.) वरिष्ठ, धनी, वडील इ० कानीं आपले सेवक, पुत्रादिकांस तूं हें कर, हें करूं नको इ० वाक्यांनीं प्रवृत्ति निवृत्तीविषयीं केला जो विधि तो. २ (ग्रं०) वेदशास्त्रासही म्हणतात. ३ वरिष्ठानीं आज्ञा केली असतां सेवकजन या शब्दानें उत्तर देतात.

आज्ञांकित (सं. वि०) जो ज्याचे आज्ञेंत वर्तणारा तो त्याचा.

आज्ञापत्र (सं· न. ना.) सरकारांतून प्रजा, सेवक इ० कांस हा शब्द पूर्वी लिहून कांहीं कर्माविषयींच्या आज्ञेचें पत्र लिहितात तें.

—इ—

इ—हा वर्ण तिसरा स्वर आहे.

इंगळ (सं. अंगार) निखारा.

इंगळी (इंगळ) विंचवांत एक भेद आहे. २ (ग्रं०) ठिणगी.

इंगा (प्रा. पु. ना.) चांभाराचें कातडें घोटायाचें एक अऊत आहे. २ एकाद्यावर इंगा फिरणें म्ह० दर्पपरिहार होण्या जोगें एकादे कचाटींत सांपडणें. ३ नांगरलेल्या जमिनींतील मातीचीं ढेंकळें फोडायाचें लाकूड तें.

इंगित (सं. न. ना.) मनांत कांहीं अभिप्राय आला असतां त्यास जाणविणारा शरीरावर जो आकार उत्पन्न होतो तें किं० तसा अभिप्राय तें.

इच्छा (सं. स्त्री. ना.) आशा.

इच्छाभोजन (सं. न. ना.) इच्छिलेला पदार्थ सिद्ध करून इच्छा तृप्त होई असे ब्राह्मणास भोजन घालितात तें

इजत (अर० स्त्री. ना.) आब्रू.

इजा (अर० स्त्री. ना.) उपद्रव.

इजारा (फा० पु. ना.) व्यवहाराचा धनी जो सरकार इ० त्यास उक्तें द्रव्य द्यावयास कबूल तोटा, नफा सर्व आपला असा बोलीनें जो मक्ता करितात तो.

इजीतजाणें (विजित, जाणें) हार जाणें.

इडपाड (प्रा. पु. ना.) (ग्रं०) नेट.

इडा (सं. स्त्री. ना.) (ग्रं) डावे नाकपुडींतील नाडी, स्वरशास्त्रांत प्रसिद्ध

इडापिडा (पीडा) (स्त्री. ना.) सर्व पीडा किं० दुःख. [र्वताचा.

इतपत (इयत्परिमित) (वि०) ह्या-

इतःपर (सं. अव्य.) अनंतर.

इतबार (अर० पु० ना.) विश्वास.

इतमाम (अर० पु. ना.) आपल्या संपत्तीप्रमाणें जें दास, दासी घोडीं इ० आपलें खटलें तो.

इतरत्र (सं. अव्य.) अन्यत्र.

इतराजी (अर. स्त्री. ना.) अवकृपा.

इतला (अर. पु. ना.) अनुमत.

इतस्ततः (सं. अव्य०) इकडे तिकडे किं० इकडून तिकडून.

इतिकर्तव्यता (सं. स्त्री. ना.) कांहीं कर्मांचें मुळापासून अवश्यक अनुष्ठान तें. [म्हणतात.

इतिश्री (सं. स्त्री. ना.) समाप्तीस

इतिहास (सं. स्त्री. ना.) प्राचीन झालेल्या वृत्तांताची कथा तो. २ कांहींएक गोष्टीचें इत्थंभूत वृत्त तो.

इत्थंभूत (सं. वि०) कोणेक गोष्ट ज्या प्रकारें जितकी झाली तीतील एकही अंश न गळतां जसेंचें तसें सर्व जें कांहीं वृत्त तो.

इत्यर्थ (सं. पु. ना.) कोणेक गोष्टीचा सारांशरूप सिद्धांत तो.

इंदिरा (सं. स्त्री. ना.) लक्ष्मी. विष्णुस्त्री

इंदीवर (सं. न. ना.) कमळ.

इंदु (सं. पु. ना.) चंद्र.

इंद्र (सं. पु. ना.) स्वर्गीं देवांचा राजा

आहे तो. २ ज्या समुदायांत जो श्रेष्ठ तो त्यामध्यें उ० विप्रेंद्र, नरेंद्र, मृगेंद्र इ०

इंद्रजाल (सं. न. ना.) नाहीं तें दिसावें आहे तें दिसूं नये इ० चमत्काररूप मंत्रविद्या आहे तें.

इंद्रधनुष्य (सं. न. ना.) सूर्याचे किरण मेघांवर पडून जो धनुष्याकार दिसतो तें.

इंद्रफणि (सं. पु. ना.) (प्र०) इंद्रजालविद्येनें रज्जु इ० कांचा दिसतो सर्प तो.

इंद्रिय (सं. न. ना.) श्रोत्र, चक्षु, त्वचा, जिव्हा, घ्राण हीं ज्ञानसाधनें पांच व वाचा, हस्त, पाद, पायु, उपस्थ हीं कर्मसाधनें पांच तीं प्रत्येकीं. २ मनासही कोणी म्हणतात. ३ पुरुषाचें लिंग तें.

इंधन (सं. न. ना.) सर्पण.

इनसाफ (अर० पु. ना.) न्याय.

इनाम (अर० न. ना.) राजे इ०क सेवकांवर प्रसन्न झाले असतां देतात जें वस्त्र, भूषण, भूमि इ० तें. २ देव, ब्राह्मण इ० कांस देतात जी भूमि इ० तें.

इभ (सं. पु. ना.) हत्ती.

इभ्रत (अर० स्त्री. ना.) हा कोणेवेळेस काय करील नकळे असें मानून लोकांनीं वचकत असावें असा पराक्रमादि गुणामुळें अंगीं योग्यताविशेष आला असतो ती.

इमला (अर० पु. ना.) सिद्ध भूमिवर मनुष्यकृतीनें केलेलें घर, विहीर, भिंत इ० बांदिस्तीचें काम तो.

इमान (अर० न. ना.) सत्य.

इमारत (अर० स्त्री. ना.) दगड, चुना, विटा, माती, लांकूड इ० कांनीं बांधून केलेलें घर, विहिर इ० स्थावर काम ती.

इयत् (सं. वि०) इतका.

इयत्ता (सं. स्त्री. ना.) इतकेपणा.

इरसाल (अर० वि०) एकजातीय इतर फळांपेक्षां गोडी इ० गुणांनी जो उत्कृष्ट आंबा इ० तो. किं० त्याचें झाड तो. २ अट्टल. ३ (न. ना.) सरकारांत जो तालुका इ० कांतून रोख पैसा पाठवितात तो, रवाना करणें याच्या योगीं प्रयोग.

इरादा (अर० पु. ना.) आपण अमुक करावें असा अंतःकरणांत कांहीं हेतु उठला असतो तो.

इलम (अर० पु. ना.) उपाय. २हुनर ३ गारुडी इ० आपल्या मंत्रविद्येने कांहीं करितो चमत्कार तो.

इलाखा (अर० पु. ना.) कोणेकावर कोणेकाचा असतो सत्तासंबंध तो. २ पालखीचे दांडीस जे गोंडे लावितात ते प्रत्येकीं. ३ प्रांत.

इलाज (अर० पु. ना.) उपाय.

इल्ला (कानडीभाषेंत) (पु. ना.) अन्न, पदार्थ इ० कांचा सरलेपणा किं० नकार अशा अर्थी याचा प्रयोग करितात.

इशारत (अर० स्त्री. ना.) कोणेक गोष्टीविषयीं कोणेकास नेत्रसंकेतानें सूचना ती.

पाण्यांत घालून कढवून जें द्रव्य सिद्ध करितात तें कि० त्या योगानें अलंकारास होतो जो संस्कार तो. ३ गवळी इ० कांशीं दूध इ० कांचा एकदांच दर खंडून नित्यशः त्यानें तें एकसारखें देत असावें असा बांधून ठेवितात जो नियम तो कि० त्या नियमाप्रमाणें प्रत्यहीं येतो जो पदार्थ तो.

उकिडवा (प्रा. वि०) टांचा टिरीशीं व गुडघे पोटाशीं येत असें पावलें टेंकून जो बसला तो.

उकिरडा (प्रा. पु. ना.) घर इ० कांतील कांहीं दिवस टाकलेल्या केरकचऱ्याचा जमलेला ढीग तो.

उकीर (उकरणें)(पु. ना.)उंदीर, घूस इ०कांनीं भूमि उकरून काढिलेले मातीचा तेथें होतो जो ढीग तो.

उक्ता (प्रा. वि०) खरेदी, विक्री इ० व्यवहारांत एक ठोक जिनसाची एक ठोक किंमत अशा प्रकारानें क्रय, विक्रय, मोल, बोली इ० तो.

उक्ति (सं. स्त्री. ना.) भाषण.

उखर (सं. उषर) (वि०) माळवट, डोंगरवट जमीन तो.

उखरवाखर (वि०) पाहिजे तशी नितळ नव्हे अशी भूमि, भिंत, फळी इ० ती.

उखळणें (सं. उत्किरण) नांगर, कुदळ इ० कांनीं भूमि इ० विशकलित अवयव करणें. २ कांहीं पदार्थांशीं घट्ट बसलेला कांहीं पदार्थ तो त्यापासून ढळविणें.

उखा (सं. उषःकाल)(ग्रं०) प्रातःकाळ

उखारी (प्रा. स्त्री. ना.)(ग्रं०) दुकान.

उखाळ (प्रा. पु. ना.) (ग्रं०) उलटी होण्यास देतात जें औषध तो.

उखाळी (उखळणें) (स्त्री. ना.) कोणेकाचें अंगीं दुष्कर्म, दुर्व्यसन इ० असतें पैशून्य तें काढणें इ० धातूच्या योगीं. [ळी इ० तो

उखाळीपाखाळी (स्त्री. ना.) उखा-

उखित (पु. ना.) (ग्रं०) वाटसरू २ (वि०) उदासीन.

उखितीक्रिया (स्त्री. ना.) (ग्रं० उदासीनपणानें केलेली क्रिया कि ब्रह्मार्पणबुद्धीनें झालेली क्रिया त

उखितें (प्रा. वि०) (ग्रं०) उक्तें, उ धडें. २ अवघें, सर्व.

उखीरवाखीर (प्रा.वि०)उखरवाख

उगड, उगंड (प्रा. पु. ना.) (ग्र उद्धार.

उगडणें (धा. ना.) (ग्रं०) विसर

उगम (सं. उद्गम) (पु. ना.) न इ० कांच्या उत्पत्तीचें स्थळ तो

उगवणी (उगवणें) (स्त्री. ना.) सऱ्याकडे गुंतलेला पैका उक ण्याचा व्यापार तो.

उगवणें (सं. उद्गमन) सूर्यादिक उदयाचलापासून; अंकुर, तृण कांनीं बीज, भूमि इ० कांप प्रकट होणें. [ओ

उगळणें (सं. उत्,गिरण) (धा.

उगा (प्रा० अव्य०) भाषण इ० पार न करितां.

**उगाणणें** (प्रा. धा. ना.) (ग्रं०) लुटणें, नागवणें. २ आपण स्वतः अर्पण करणें. [नागवण.

**उगाणवा** (प्रा. पु. ना.) (ग्रं०) लूट,

**उगाणा** (पु. ना.) (ग्रं०) उगाणवा. २ चव, रुचि, अनुभव. ३ उपदेशपर भाषण.

**उगारणें** (सं. उद्ग्रहण) (धा. ना.) कोणेकास मारायाकरितां शस्त्र, हात, काठी इ० उचलून त्यावर रोखून धरणें. [विड्याचा रस.

**उगाळ** (प्रा. पु. ना.) चावलेल्या

**उगाळणें** (प्रा. धा. ना.) चंदन इ० कांचा अंश निघे असें त्यास साण इ०कांवर घासणें.

**उग्र** (सं. वि०) भयंकर. २ उग्रट.

**उग्रट** (सं. उग्र.) (वि०) कपाळ दुखूं लागण्याजोगा जो वास तो किं० त्या वासाचा पदार्थ तो.

**उग्राणी** (स्त्री. ना.) सारा वसूल करण्याचा व्यापार ती.

**उघड** (उघडणें) (वि०) स्पष्ट. २ (अव्य०) प्रसिद्धपणानें. ३ (स्त्री.) उघाड.

**उघडणें** (सं. उद्घाटन) (धा. ना.) आच्छादनानें आच्छादिलेला पदार्थ आच्छादन काढून मोकळा करणें. २ मिटलेला पदार्थ विकसित करणें. ३ पर्जन्यानें कांहींकाळ मध्यें थांबणें. ४ दैव इ० उघडणें म्ह० ऊर्जितदशावह होणें.

**[उघ]डा** (उघडणें) (वि०) झांकलेला नव्हे तो. २ गूढ, गुप्त नव्हे तो. ३ ज्यास कोणी सांभाळ करणारें नाहीं असें मूल, राज्य इ० तो.

**उघडीक** (उघडा) (स्त्री. ना.) गुप्तपणें असलेली कांहींएक गोष्ट तिची प्रसिद्धि ती. २ उघाड.

**उघाड, उघाडी** (उघडणें) (स्त्री. ना.) पर्जन्यकाळांत पर्जन्य कांहीं काळ राहिलेली कालावस्था ती.

**उच** (सं. उच्च) (वि०) खालून वरपवेतों जें अंगुलादिरूप पदार्थाचें प्रमाण तेणेंकरून युक्त जो आकार किं० त्या आकारानें युक्त जो पदार्थ तो.

**उचका** (प्रा. पु. ना.) थापा देऊन द्रव्यादिक उपटण्याचा व्यापार तो. २ कांहीं विषयाचा अंतःकरणास अतिशयित ध्यास लागतो तो किं० तशा ध्यासामुळें होतो जो कांहीं भास किं०पडतें जें स्वप्न तें.

**उचकाउचक** (प्रा. स्त्री. ना.) थापा देऊन द्रव्यादिक उपटण्याचा व्यापार ती.

**उचकी** (प्रा. स्त्री. ना.) सशब्द कंठांत गचका लागतो ती.

**उंचनीच** (वि०) उंचसखल. २ उत्तमाधम.

**उचंबळणें** (प्रा. धा. ना.) पात्रांत उदकादिक अतिशयित भरल्यामुळें वर सांडूं लागणें किं० तें पात्र तसें भरलें जाणें.

**उचंबळा** (प्रा. पु. ना.) (ग्रं०) आनंद, हर्ष.

**उचल** (स्त्री. ना.) कोणेकास दुसरें काम न करूं देतां कोणेक कार्यांत त्वरेनें प्रवृत्त करण्याचा व्यापार तो. २ युद्ध इ० कार्चे आपण होऊन केलेलें जें उत्थान तें किं० शांत झालेल्या ज्वरादिकानें पुनः केलें उत्थान तें. ३ उत्तेजन.

**उचलणें** (सं. उच्चलन) (धा. ना.) खालचे प्रदेशीं असलेला पदार्थ हस्तादिकांच्या योगानें भार संभाळून वरच्या प्रदेशाकडे होई असा करणें. २ चालू नसलेला कांहीं व्यवहार चालू होण्याविषयीं हातीं घेणें. ३ दृष्टि चुकावून दुसऱ्याचा द्रव्यादि पदार्थ चोरणें. ४ पाणी इ० कांवर बुडबुडा इ० उठणें इ०.

**उचलबांगडी** (उचलणें) (स्त्री. ना.) कोणी हात, कोणी पाय, कोणी डोकें असें अनेकांनीं बलात्कारानें धरून कोणेकास उचलण्याचा प्रकार तो. २ अधिकारादिकांवरून असें चौघांनीं चोहींकडून उपद्रव देऊन उत्थापन करणें तो.

**उचलाउचल** (उचलणें)(स्त्री. ना.) संसार इ० खटल्याची या स्थळींहून त्या स्थळीं तेथून तिसरे स्थळीं अशी नेण्याची खटपट तो. २ हें उचल तें उचल, याणें उचलावें त्याणें उचलावें असा जो व्यापार तो.

**उचल्या** (उचलणें) (पु. ना.) दुसऱ्याची दृष्टि चुकावून पदार्थ चोरण्याचा ज्याचा स्वभाव तो. २ ज्या स्थळीं जो चार दिवस उपरी राहण्यास आलेला तो.

**उंचा** (उंच) (वि०) एकजातीय पदार्थांत गुण, मोल इ० कांनीं ज्याची योग्यता मोठी तो.

**उचापत** (स्त्री. ना.) होईल पैका तो एकदाच पुढें देऊं अशा बोलीनें लागेल तो जिन्नस वाण्याकडून नित्यश: आणण्याचा प्रकार तो.

**उचित** (सं. वि०) योग्य.

**उंची** (उंच) (स्त्री. ना.) पदार्थाचे खालचे भागापासून वरच्या भागापर्यंत व्याप्तीचें प्रमाण तें. २ उंचा

**उच्चार** (सं. पु. ना.) वाणीपासून वर्णात्मक शब्दाची जी स्पष्टता तो किं० त्यास अनुकूळ व्यापार तो

**उच्छृंखल** (सं. वि०) शास्त्रादिकांस न गणितां मनस्वीपणानें वर्तणार तो. [ध्वंस, नाश

**उच्छेद** (सं. पु. ना.) खंड. २ वि

**उजरणें** (सं. उज्ज्वलन) (धा. ना एकवेळ काढलेली रेषा, दिले भाग, केलेलें अध्ययन, सांगितले गोष्ट त्या त्या संस्कारानें स्पष्ट कि दृढ करणें.

**उजरी** (स्त्री. ना.) (ग्रं०) स्पष्टता.

**उजवण** (उजवणें) (स्त्री. ना.) ल मुंज इ० कार्य.

**उजवणें** (सं. ऊर्जन) (धा. न मुंज, लग्न, शास्त्राध्ययन इ० स्कार करणें. २ (सं. उद्याप केलेल्या व्रतादिकांचें उद्यापन क

**उजळ** (सं. उज्ज्वल) (वि०) निर चकचकीत जो पदार्थ तो. २ वळ काळा नव्हे असा जो

गौरवर्ण असून तेजस्वी मनुष्य तो.

**उजळणी** (उजळणें) मुळाक्षरांचें लिहिणें व पाठांतर यांची आवृत्ति ती.

**उजळणें** (सं. उज्ज्वलन) (धा. ना.) भांडें इ० घासण्यानें उजळ करणें. २ दिवा, मशाल इ० पेटविणें. ३ दिशा इ० प्रकाशानें युक्त होणें. ४ लाल झालेला डोळा, अंधारी रात्र निवळणें. ५ शिकलेलें आवृत्तीनें पक्कें करणें.

**उजळा** (उजळणें) (पु. ना.) सोन्यारूप्यास उजळ करण्याचा संस्कार तो किं० तो संस्कार करण्याचें द्रव्य तो.

**उजागरी** (सं. उत्,जागर) (स्त्री. ना.) कांहींएक व्यवहार करण्याविषयीं भय, लज्जा असल्ये ती नाहींशी होऊन तो प्रसिद्धपणानें करण्याची होल्ये मोकळीक ती.

**उजाड** (प्रा. वि०) मनुष्यादि वस्तीरहित घर इ० प्रदेश तो.

**उजाडणें** (धा. ना.) उजेडणें.

**उजाडी** (उजाड) (स्त्री ना.) ओसाडी.

**उजू** (सं. ऋजु) (वि०) नीट, दोरीसूद.

**उजूर** (अर० पु. ना.) आक्षेप.

**उजेड** (पु. ना.) प्रकाश.

**उजेडणें** (उजेड) (धा. ना.) सूर्योदय होणें. २ कोणेकास अनुकूळ काळ प्राप्त होणें.

**[illegible]गर** (उठणें) (न. ना.) उंचवटा.

**[illegible]णें** (धा. ना.) घासणें. २ (न. ना.) सुगंध पदार्थ अगंजा इ० अंगास लावण्याचा तें किं० त्या पदार्थानें शरीरास जें मर्दन तें.

**उटी** (प्रा. स्त्री. ना.) कपाळ, हात, ऊर, पोट इ० सर्वांगास चंदनादिकांचा लेप करितात ती.

**उठणें** (सं. उत्थान) (धा. ना.) अडव्या पडलेल्या किं० बसलेल्या सजीव पदार्थानें उठून उभें राहणें. २ निजलेल्यानें जागें होणें किं० मूर्छितानें सावध होणें इ०.

**उठताबसतां** (उठणें,बसणें) (अव्य०) प्रतिक्षणीं, प्रतिव्यापारीं.

**उठल्याबसल्या** (अव्य०) उठताबसतां.

**उठवळ** (उठवणें) (वि०) बसला असतां दुसऱ्यानें उठवावें असा आळशी तो.

**उठाउठी** (अव्य०) (ग्रं०) विलंब न करितां, सत्वरपणानें.

**उठाठेव** (उठणें, ठेवणें) (स्त्री. ना.) आणणें, नेणें, देणें, घेणें, ठेवणें, विचारणें इ० रूप अनेक प्रकारची रिकामी खटपट ती.

**उडणें** (सं. उड्डाण) (धा. ना.) पक्ष्यांनीं अंतरिक्षीं फिरणें. २ घोडा इ० कानीं सवेग चालणें. ३ उडीनें मध्यें असलेला खंदक, चर इ० तो उल्लंघन करणें. ४ आधारापासून कांहीं पदार्थानें आघातादिकांमुळें तटकर अन्यत्र जाणें. ५ मैथुनार्थ पशु इ० कानीं स्व स्व स्त्रीवर चढणें. ६ भिंत इ० कावरील दिलेल्या रंगानें नाहींसें होणें. ७ द्रव्यादि पदार्थ खर्चून नाहींसा होणें इ०.

लें म्ह० त्याचें सूचक चिन्ह जें भ्रकंपादिक होतें तो. २ लहान मुलाचे अगचो नानाप्रकारच्या खोड्या करण्याची जी चेष्टा ती.इ०.

उत्पाती (उत्पात) (वि०) उत्पात करण्याचा स्वभावाचा तो. २ उलीढाली करण्याचा ज्याचा स्वभाव तो.

उत्प्रेक्षा (स. स्त्री. ना.) वास्तविकपणानें जो पदार्थ ज्या रूपाचा नव्हे त्याजवर त्या पदार्थनिष्ठ काहीं एक धर्मांचे उपलब्धीमुळें हा तोच काय असें जे तद्रूपतेचें संभावनकाव्यादिकांत अलंकाररूप असते ती. उ० हा अंधकार चक्रवाकाच्या विरहाग्नीचा धूमच काय ? २ काहीं एक गोष्टीवर वक्तृत्वबलानें शंकासमाधानादि रूप कल्पनांनीं कोणी काढितो अनेक ज्या कोटी त्या प्र०.

उत्संग (स. स्त्री ना.) मांडी.

उत्सव (स. पु. ना.) उत्साह.

उत्साह (स. पु. ना.) काहीं एक गोष्टीचा अंतःकरणांत जो प्रीतिरूप भाव उठतो तो. २ हर्ष. ३ ईश्वरप्रीत्यर्थ रामनवमी, शिवरात्री इ० पुण्यदिवशीं ब्राह्मणभोजन, कथाकीर्तनादिद्वारा जो त्या कालास सुशोभितपणा करितात तो किं० अन्यलप्राप्ति समारंभात इष्टमित्रांसहित भोजनादि व्यापारानें आनंदानें काळ नेण्याचा प्रकार तो.

उत्सुक (सं. वि०) उत्कंठित.

उथळ (स. उत्, तल) (वि०) खोल नव्हे तें.

उदक (स. न. ना.) पाणी. २ काहीएक गोष्टीस उदक सोडणें म्ह० त्याचा त्याग करणें

उदंड (स. उद्दंड) (वि०) पुष्कळ.

उदधि (स. पु. ना.) समुद्र.

उदमी (उद्यम) ( पु. ना.) उद्यम करून निर्वाह करणारा तो.

उदय (स. पु ना.) अदृश्यपणानें असणारे सूर्यादिक ग्रह, नक्षत्रें त्यांचे स्पष्टपणानें ऊर्ध्वभागीं बाहेर दिसणें तो. २ उद्भव.

उदयीक (स. अव्य०) उद्यां.

उदर (स. न. ना.) पोट. २ पोटांत होणारा एक रोग आहे तें.

उदार (स. वि०) धर्मादाय करणें, आपण भोगणें इ० प्रकारें द्रव्याचा व्यय करण्यास भीत नाहीं, उत्साहानें करितो अशा स्वभावाचा मनुष्य तो.

उदास (स. वि०) ओसाड. २ काहीएक विषयावर बसलेली प्रीति तिचा विघात झाल्यामुळें काहींच सुचू नये अशा दशेस पावलेलें चित्त तें किं० तेणेंकरून युक्त पुरुष तो.

उदासीन (स. वि०) कोणेक विषयावर ज्याची प्रीति नाहीं व द्वेषही नाहीं असा ज्याविषयीं विधि व निषेध दोनीहि नाहींत असा मध्यवर्त्ती जो पुरुषादि तो म्ह० विरक्त तो.

उदीम (स. उद्यम) (पु. ना.) धान्यादिकांचा क्रयविक्रय व्यवहार तो.

**उदेजणें** (उदय) (धा. ना.) (ग्रं०) उत्पन्न होणें. २ प्रकाश होणें.

**उद्गम** (सं. पु. ना.) उगम.

**उद्गार** (सं. पु. ना.) ढेंकर. २ काईएक मनांत धरून ठेवलेली गोष्ट ती कोणीएक बोलत नसतांही कांहीं प्रसंगानें सहज तोंडावाटे तिचा ज्ञापक शब्द निघतो तो. ३ वाहवा, अहाहा इ० शब्द आश्चर्य, खेद इ० रस अंतःकरणांत झाले असतां तोंडावाटे सहज निघतात ते प्र०.

**उद्घाटन** (सं. न. ना.) कवाड इ० उघडण्याचा व्यापार तें. २ कोणेकाचा गुप्त दोष मर्म इ० तें प्रसिद्ध करण्याचा व्यापार.

**उद्दाम** (स. वि०) बारीकपणा, लवचीकपणा इ० रहित चांगला टवटवित, ठोंसर जो अंकुर, भूषण इ० पदार्थ तो. २ दुसऱ्याच्या दाबानें दबून विनत व्हावयाजोगा नव्हे जो मनुष्यादिक कि० त्याचा स्वभाव तो. ३पुष्पादिकांचा उग्र वास तो.

**उद्देश** (स. पु. ना.) कोणेक कर्माविषयीं कोणेकानें धरिला असतो अंतःकरणांत हेतु तो.

**उद्धट** (सं. अप. वि०) उद्धत.

**उद्धत** (सं. वि०) ज्याचे अंगीं विनयसंबंधी नम्रता नाहीं तो.

**उद्धरण** (सं. न. ना.) खालीं पडलेला कांहींएक पदार्थ वर काढण्याचा व्यापार तें.

**उद्धरणें** (सं. उद्धरण) (धा. ना.) उद्धरणयुक्त करणें. २ विपरीत लक्षणेनें वडील इ०कांवरून शिव्या देणें.

**उद्धार** (सं. पु. ना.) उद्धरणानें अधोदेशादि त्यागपूर्वक ऊर्ध्वदेश प्राप्तिरूप जें फळ तो.

**उद्बोध** (सं. पु. ना.) ज्ञान.

**उद्बोधक** (सं. वि०) ज्ञान होण्यास कारणीभूत जें चिन्ह तें.

**उद्भव** (सं. पु. ना.) उत्पत्ति.

**उद्यम** (सं. पु. ना.) उद्योग.

**उद्यान** (सं. न. ना.) उपवन.

**उद्यापन** (सं. न. ना.) व्रताच्या समाप्तिसमयीं कांहीं कर्मविशेष सांगितला आहे तें.

**उद्युक्त** (सं. वि०) कोणेक कर्म करण्याविषयीं जो सिद्ध झाला तो.

**उद्योग** (सं. पु. ना.) कांहीं कार्य करण्याविषयीं करावा लागतो कांहीं व्यापार तो.

**उद्वस** (सं. अप. वि०)(ग्रं०)उद्वस्त.

**उद्वस्त** (सं. वि०) ओसाड, उजाड.

**उद्विग्न** (सं. वि०) उद्वेगयुक्त.

**उद्वेग** (सं. पु. ना.) भय, शोकादिकांनीं कांहींच सुचूं नये, कोठें चैन पडूं नये अशी अंतःकरणास अस्वस्थता प्राप्त होते तो.

**उधड** (प्रा. वि०) उक्ता.

**उधडणें** (प्रा. धा. ना.) उसवणें. २ शिंग, हात इ० केंकरून वस्त्र इ० फाटे असें करणें. ३ धुडकावणें.

**उधळ** (स्त्री. ना.) उधळपट्टी.

**उधळणें** (सं. उन्मूलन) (धा. ना.) धूळ, गुलाल इ० पदार्थ ऊर्ध्वप्रदेशीं उडत असें करणें. २ द्रव्यादिक मनस्वीपणानें खर्चणें. ३ घोडा, बैल इ० कानीं अनावरपणें धांवत सुटणें किं० सैन्यादिकानें भयादि कारणामुळें वेगानें फुटून चोहींकडे पळू लागणें.

**उधळपट्टी** (उधळणें, पट्टी) (स्त्री. ना.) द्रव्यादिक मनस्वीपणें खर्च करण्याचा प्रकार तो.

**उधळ्या** (उधळणें) (वि०) उधळपट्टी करण्याचा ज्याचा स्वभाव तो.

**उधाण, उधान** (प्रा. न. ना.) अमावास्या पौर्णिमा यांचे संधीस समुद्रास वेगानें अतिशयित येणें भरतें तें. २ तारुण्यावस्थेचा जो भर तें.

**उधार** (स. उद्धार) (पु. ना.) उदयास कालांतरीं पैका देण्याचा कबूल करून पत्तीवर पाहिजे तो जिन्नस आणावा असा घेण्यादेण्याचा प्रकार तो किं० तशा प्रकारचें उदयाचें आपलेकडे तटून राहतें द्रव्य तो. २ (अव्य०) उधारपणानें.

**उनाड** (प्रा. वि०) पंतोजी, गुराखी यांचे नियमनांत नाहीं असें मोकळें सुटलेलें पोर, गुरूं तें.

**उनाडकी** (उनाड) (स्त्री. ना.) उनाड जें पोर इ० त्याची जी मनस्वीपणें चेष्टा ती.

**उन्मत्त** (सं. वि०) स्वभावानें किं० विद्या, धन इ० कांच्या मदानें ज्याचे अंगीं विनय नाहीं तो. २ मद्यादिकानें किं० वायु, काम इ० कांच्या विकृतानें बेशुद्ध झाला तो.

**उन्माद** (सं. पु. ना.) विद्या, संपत्ति इ० कांच्या योगानें किं० भांग अफू इ० कैफानें एक काय तो मी बाकी सर्व तुच्छ असा अंतःकरणांत भाव असतो तो.

**उन्मुख** (सं. वि०) ज्याच्या प्रवृत्तीचा झोंक जें कर्म करण्याकडे झाला तो त्याविषयीं.

**उन्हातान्हाचा** (ऊन्ह) (अव्य०) उन्ह असतां त्यापासून होणारी व्यथा इ० सोसून.

**उन्हाळपावसाळ** (उन्हाळा, पावसाळा) (अव्य०) उन्हाळ्यांत आणि पावसाळ्यांत म्ह० बारमाहीं.

**उन्हाळा** (ऊन्ह, काळ) (पु. ना.) पावसाळा व हिवाळा यांहून इतर चातुर्मासात्मक काळ तो किं० पावसाळ्याहून इतर जो अष्टमासात्मक काळ तो. २ ऊष्मा. ३ मूत्रद्वारीं आग होऊन वारंवार मुतायास होतें अशी एक उष्ण विकृति होत असते ती.

**उपकंठीं** (सं. अव्य०) (ग्रं०) जवळ.

**उपकार** (सं. पु. ना.) कांहींएक क्रियेनें कोणेकावर हितरूप फलाचा संबंध तो.

**उपकारी** (सं. वि०) दुसऱ्यावर उप-

कार करण्याचा ज्याचा स्वभाव तो. २ आभारी.

**उपक्रम** (सं. पु. ना.) आरंभ.

**उपखा** (प्रा. पु. ना.) (ग्रं०) श्रम. २ खर्च.

**उपचार** (सं. पु. ना.) ज्या ज्या रूपानें इष्ट कार्य सिद्ध करायाचें त्यास साहित्यभूत इतर पदार्थांच्या संबंधानें जो संस्कार करितात तो. २ साहित्यभूत पदार्थ, कृति इ० तोही. ३ (ग्रं०) गौरव.

**उपचारहोडें** (प्रा. वि०)(ग्रं०) क्षणिक.

**उपज** (उपजणें) (स्त्री. ना.) कृष्यादि व्यवहारांतील उत्पन्न तो. [जन्मणें.

**उपजणें** (सं. उपजनन) (धा. ना.)

**उपजत** (उपजणें) (अव्य०) जन्मापासून, स्वभाविकरून. उ० उपजत-शाहाणा.

**उपजीवन** (स. न. ना.) प्राण्याची अन्नाच्या योगानें जी सप्राणपणें स्थिति तें किं० तशी स्थिति होण्यास कारण अन्नादिक तें. २ निर्जीव पदार्थांची कोणेक आश्रयबलानें यथास्थितपणें स्थिति तें किं० तो आश्रयादि तें.

**उपजीविका** (सं. स्त्री. ना.) उपजीवन.

**उपजीव्य** (सं. न. ना.) ज्या अर्थास आश्रयून जो उपजीवन पावतो तो अर्थ त्याचें.

**उपटणें** (स. उत्पाटन) (धा. ना.) भूमि इ० आंत ठोकून बसविलेला किं० स्वाभाविक असलेला पदार्थ बळानें बाहेर काढणें. २ युक्तीनें कोणेकापासून द्रव्यादि काढणें. ३ दबलेला शत्रु, रोग इ० कानीं पुनः उपट खाणें. ४ दुसऱ्याची दृष्टि चुकावून कांहीं पदार्थ चोरून नेणें. ५ एकाद्यावर क्रोधाच्या आवेशानें उठणें.

**उपटसूळ** (उपटणें, सूळ) कांहींएक व्यवहार रंगानें चालला असतां त्यास मध्येंच कोणी विघ्नरूप उपस्थित होतो मनुष्यादिक तो.

**उपटाउपट** (उपटणें) (स्त्री. ना.) अनेकांपासून युक्तीनें किं० दृष्टि चुकावून द्रव्यादि उपटण्याचा व्यापार तो.

**उपट्या** (उपटणें) (वि०) उपटाउपट करण्याचा ज्याचा स्वभाव तो.

**उपडणें** (धा. ना.) उपटणें. [कडे तो.

**उपडा** (प्रा. वि०) ज्याचें तोंड भुई-

**उपंढर** (प्रा. पु. ना.) (ग्रं०) एकादे कर्माची उपडकी.

**उपतिष्ठणें** (सं. उपतिष्ठति) (धा. ना.) सांगितलेलें अध्ययनादिक अंतःकरणांत राहाणें.

**उपदंश** (सं. पु. ना.) एक रोग आहे.

**उपदेश** (सं. पु. ना.) गुरु जें कोणेक मंत्राचें करितो शिष्यास दान तो. २ कोणी कोणास कांहीं युक्ति इ०क सांगतो तो.

**उपदेशक** (सं. वि०) उपदेश करणारा.

**उपदेशी** (सं. वि०) ज्यास ज्यापासून मंत्रादि उपदेश झाला आहे तो त्याचा.

**उपदेष्टा** (स. वि०) उपदेशक.

उपद्रव (सं. पु. ना.) पीडा. २ पिशाचबाधा.

उपद्व्याप (सं. उप, उत्, व्याप) (पु. ना.) काहीं कार्य सिद्ध करण्याविषयीं अत्यंत मोठा व्यापक उद्योग तो.

उपनणें (प्रा. ना.)(ग्रं०) उत्पन्न होणें.

उपनयन (सं. न. ना.) ब्राह्मणादि तीन वर्णांचे पुत्रास वेदाधिकारार्थ अष्टमादि वर्षी करायाचा एक संस्कार आहे तो.

उपनिषत् (सं. न. ना.) वेदामध्यें ज्या शाखा आहेत त्या प्रत्येकींतील सिद्धांतरूप ज्ञानकांडात्मक अर्थ ज्यांत लिहिला आहे तो ग्रंथ तें.

उपनेत्र (सं. न. ना.) दृष्टीनें बारीकही पदार्थ दिसावा म्हणून जीं दोन वर्तुल भिंगें नेत्रांपुढें लावायास करितात तें.

उपन्यास (सं. पु ना.) स्थापन.

उपपत्ति (सं. स्त्री. ना.) कोणेक कार्य ज्या प्रकारें होतें, दिसतें त्याचें त्या त्या प्रकारें होण्यास, दिसण्यास नियामक जें मूळभूत कारण असतें तें. २ कोणेक अर्थाची सप्रमाण सयुक्तिक जी सिद्धि ती.

उपपादन (सं. न. ना.) प्रतिपादन.

उपभोग (सं. पु. ना.) काहींएक विषयजन्य सुखाचा किंवा दुःखाचा जो संस्कार आत्म्याच्या ठायीं होतो त्याची जी आपणास अनुभवरूपानें धृति ती.

उपमर्द (सं. पु. ना.) अनेक अपकारांनीं काहीं पदार्थ, मनुष्य इ० कांची करितात जी भग्नावस्था त २ अपमान.

उपमा (सं. स्त्री. ना.) कोणेक पद र्थास दुसऱ्या पदार्थाचें काहींए धर्मसाम्यास्तव वर्णितात जें सा दृश्य ती.

उपमाता (सं. स्त्री. ना.) दाई.

उपयुक्त (सं. वि०) ज्याचा उपयो आहे तो.

उपयोग (सं. पु. ना.) कोणेक क र्यास कोणेक अर्थाचें जें साधनत्वे करून असतें प्रयोजन किं० सा क्षता तो. [२ विरति

उपरति (सं. स्त्री. ना.) उपरम

उपरदवडा (प्रा. पु. ना.) आपण के णेकाचें बरें करूं गेलें असतां य यानें तें न येऊन यानें माझें वाई केलें असें येतें निमित्त तो.

उपराग (सं. पु. ना.) सूर्यग्रहण कि चंद्रग्रहण.

उपराळा (सं. उपरि) (पु. ना. बैल इ० कांवर लादलेले लोक इ० कांचें ओझें त्याच्या दोहों भा ज्यांचा तोल सारखा व्हावा म्हण कमी ओझ्याकडे जी मोकळी लो कडें इ० ठेवितात तो. २ गुळाच ढेप इ० पदार्थ तोलीत असतां व जनाचे धडीपेक्षां त्या ओझ्यांत अधिक वजन भरतें तो. ३ आप बरे रीतीनें वागत असतां दुसर शेजारी इ० तूं असें कां केलें म्ह णून करितो जो निमित्तारो तो इ०.

उपरी (सं. पु. ना.) जो ज्या स्थळीं-चा वतनदार नव्हे तो तेथें राहिला असतां त्यास म्हणतात. २ (अव्य०) वर, वरती.

उपरोध (सं. पु. ना.) संकोच.

उपरोधी, धीक (स. उपरोध) (वि०) जेणेंकरून दुसऱ्यानें आपला अपराध, उपकार इ० स्मरून संकोच पावावें, वर्माचें असें त्याला लागायाजोगें भाषण, लेख इ० तो किं० तसा कांहीं व्यापार तो.

उपलब्ध (सं. वि०) ज्याची उपलब्धि झाली तो.

उपलब्धि (सं. स्त्री. ना.) द्रव्यादि विषयाची जी प्राप्ति ती. २ कोणेक पदार्थाची इंद्रियांस प्रत्यक्षता ती.

उपलक्षण (सं. न. ना.) लक्ष्य जो कांहींएक अर्थ त्याशीं ज्याचा योग नित्य नाहीं असा जो कांहींएक पदार्थ त्याचा लक्षणेंकरून सांगितला जो कांहीं अर्थ तो. उ० ज्यावर कावळा बसला आहे तें रामाजीपंताचें घर यांत कावळा हें उपलक्षण. २ कोणेक विधीनिषेधीं व्यापकरूपेंकरून जो सांगायाचा अर्थ त्याचा एक देशानें जो केला असतो निषेध तें. उ० सोंगट्या खेळूं नयेत. ह्या एक देशानें सर्व प्रकारचे खेळ खेळूं नयेत असा अर्थ. यांत सोंगट्या हें उपलक्षण.

उपलाण, लाणी (सं. उत्, पल्याण (वि०) ज्याच्या पाठीवर खोगीर जीन इ० नाहीं असा घोडा इ० तो.

उपवन (सं. न. ना.) फुलझाडे, केळी, नारळी इ० वृक्ष लावून जें रमणीय स्थळ करितात तें.

उपवर (सं. वि०) मुलीस आठवें किं० नववें व मुलास बारावें किं० तेरावें वर्ष असा जो विवाहाचा सामान्य काल तो अतिक्रमून विवाह न होतां कांहीं काल राहिला जो मुलगा किं० मुलगी तो ती.

उपवास (सं. पु. ना.) व्रतादिकासाठीं सारा दिवस भोजन न करितां राहाण्याचा प्रकार तो.

उपशम (सं. पु. ना.) प्रवृत्त, वृद्धिगत जे रोग, क्रोध, अग्नि, चोर इ० त्याची कांहीं शांतता तो.

उपशमन (सं. न. ना.) उपशम होण्याचा व्यापार किं० साधन तें.

उपसणें (सं. उत्, सर्पण) (धा. ना) विहीर, पेंव, कणिंग, हंडा इ० पात्रांत भरलेलें पाणी, धान्य इ० तें घागर तांब्या, टोपलें, हात इ० कानीं बाहेर काढणें किं० तें पात्र त्या व्यापारानें तद्विमुक्त करणें. २ तरवार इ० मेणांतून बाहेर काढणें

उपसर्ग (सं. पु. ना.) उपद्रव.

उपसंहार (सं. पु. ना.) पसरलेला, जो वस्त्रादि पदार्थ त्याचा गुंडाळणें, घडी करणें इ० व्यापारांनीं करितात संकोच तो. २ तस्मात्, एवंच एकून इ० शब्दांनीं जो कोणेक गोष्टींतील सारांशाचा शेवटीं संग्रह करितात तो.

उपसा (उपसणें) (पु. ना.) पात्रां-

नन जलादिक उपसण्याचा व्यापार तो. २ उपसल्यामुळें त्या पात्रादि कांतून होतो जो जलादिकांचा व्यय तो.

उपस्थित (सं. वि०) कोणेक शब्दादि प्रमाणापासून ज्ञान होतो कोणेक अर्थ तो. २ कर्तव्यता, भोग्यता इ० रूपेंकरून अविनाश पावल काहींएक अर्थ तो. ३ वागत अस लेलें शास्त्रादिक तो. [पण

उपस्थिति (सं. स्त्री. ना.) उपस्थित

उपहास (सं. पु. ना.) कोणेकाः उद्देशून जनामध्यें छी छी थु इ० रूप त्याला लज्जा वाटायाजो गा जो व्यापार प्रवृत्त होतो ते.

उपहित (सं. वि०) कोणेक उपाधी संबद्ध झाला जो तो.

उपळ (उपळणें) (स्त्री. ना.) झा सुटावे अशी भूमीस अवस्था प्राप्त होते ती. २ ते सुटलेले झरे ते प्र.

उपळणें (सं. उत्प्लवन) (धा. न भूमि आदिकरून उपळीनें युक्त हो

उपळी (स्त्री. ना.) उपळ.

उपाई (सं. उत् आणि पाय) (अव्य घोडा इ० कानीं पुढील दोन पाय उभारून मागचे दोहीं पायांवर उभें राहणें. २ मनुष्यानें क्रोध ा- शानें कोणेकाच्या अंगावर ये ं.

उपाइलें (प्रा. वि०) (ग्रं०) उत्त इ. २ आवडतें. ३ प्रशस्त, मोठे

उपाधि (सं. पु० ना.) शुद्ध स्वरू नें असणारा पदार्थ त्याच्या ठायीं अन्यरूपता भासायास कारण पुन पदार्थांतराचा संबंध तो जि० ते पदार्थांतर. २ कोणेकापासून विलक्षण कार्य उत्पन्न होण्यास प्रयोजक काहीं एक तो. ३ लचाड.

उपाध्या (सं. अप. पु. ना.) उपाध्याय. २ भामट्या.

उपाध्याय (सं. पु. ना.) जो ज्याचे घरचें लग्न, मुंज इ० कर्म चालवितो तो त्याचा. २ वेदादि विद्या शिकविणारा गुरु तो.

उपाय (सं. पु. ना.) काहीं एक अनिष्टाचा इष्टरूपानें परिणाम व्हावा म्हणून करणें जी तदुपयुक्त क्रिया तो. २ साम, दान, दंड आणि भेद हे प्रत्येकीं.

उपायन (सं. न. ना.) वायन. २ इष्ट मित्र राजा इ०कांस पाठवितात भेट तें.

उपार्जन (सं. न. ना.) अर्जन.

उपार्जना (सं. स्त्री. ना.) द्रव्यादि मिळविण्यासाठीं लोकांजवळ याचना, सेवा, आर्जव इ० जो निकृष्ट उपाय करावा लागतो तो.

उपाशीं (सं. उपवास) न जेवितां रिकामे पोटानें.

उपास (सं. अप. पु. ना.) उपवास.

उपासतापास (पु. ना.) उपास, जागरण इ० तो.

उपाहार (सं. पु. ना.) अन्नादिकाहून इतर फळें, मिठाई इ० जे पदार्थ त्यांचें भक्षण तो. [योग.

उपेग (सं. अप. पु. ना.) (ग्रं०) उप-

उपेक्षा (सं. स्त्री. ना.) करण्यास

प्राप्त झालें जें काहीं त्याविषयीं हें केलें नाहीं म्हणून काय होतें इ० रूप जी अंतःकरणवृत्ति ती.

उपेक्षित (सं. वि.) उपेक्षा केली ज्याची तो.

उपोद्घात (सं. पु. ना.) ग्रंथांत प्रतिपादनीय जो काहींएक अर्थ त्याचें स्वरूप, प्रयोजन, हेतु इ० प्रतिपादनरूप जो पूर्वी अवतरणासारिखा ग्रंथांश असतो तो.

उपोषण (सं. न. ना.) उपवास.

उपोषित (सं. वि०) उपाशीं. २ उपोषणद्वारा पाळिला जो एकादश्यादि दिवस ज्याणें तो.

उबगणें (धा. ना.) दाटी, भय इ० कारणामुळें इकडे तिकडे हलायास अवकाश नाहींसा होऊन उबेनें त्रास पावणें. २ (ग्रं०) भय लज्जा इ० कारणानें यथेच्छ वर्तायास न सांपडल्यामुळें त्या संकोचानें अंतःकरणांत कोंडावलें जाणें. ३ उपेक्षणें.

उबट (प्रा. वि०) किंचित् उष्णस्पर्शविशिष्ट.

उबणें (ऊब) (धा. ना.) वातसंचार नाहीं अशा स्थळीं फळ, पुष्पादि अचेतन पदार्थ किं० सचेतन मनुष्यादिक राहिल्यामुळें त्या उबेनें विकृत होणें किं० व्यथित होणें.

उंबरा (प्रा. पु. ना.) दाराचे चौकटीचीं वरचें व खालचें अशीं दोन अडवीं लांकडें किं० चिरे ते प्रत्येकीं. २ शहरादिकांतील घरांची संख्या सांगणें असतां घरांसच म्हणतात.

उबार (प्रा. वि०) रोज खर्च्यावर पूर्वदिवशीं निघालेली शिलक दुसरे दिवशीं जमा धरितात तेथें सदरी हा शब्द लिहितात.

उभज्ञ (प्रा. पु. ना.) संतोष.

उभड (प्रा. पु. ना.) क्षतादिकांतून अकस्मात् आलेला रक्त, पू इ० कांचा प्रवाह तो. २ रडण्याचा अनावर गहिंवर येतो तो.

उभणें (धा. ना.) पडत असलेल्या पर्जन्यानें विराम पावणें.

उभय (सं. न. ना.) द्वय.

उभयता (सं. उभय) (वि०) दोघेजण.

उभळ (प्रा. स्त्री. ना.) डांग्या खोकला इ० खोकल्याचा पोटांतून येतो मोठा वेग तो.

उभा (सं. उत्तभन) (वि०) निजलेला इ० नव्हे तो. २ पायांचे तळवे भूमि इ० कांवर टेंकून आपले शरीराचे उन्नतीचा संकोच न करितां स्थित जो मनुष्यादि तो. ३ चालत असतां चालणें सोडून उभाच स्तब्ध राहिला मनुष्यादि तो. इ०.

उभाउभी (प्रा. अव्य०) कोठें कामासाठीं गेलें असतां तेथें न बसतां त्वरेनें. [उभा करणें.

उभारणें (प्रा. धा. ना.) खांब इ०

उभ्यांउभ्यां (प्रा. अव्य०) उभाउभी.

उमग (उमगणें) (पु. ना.) कोणेक गोष्ट किं० पदार्थ हा अमुक किं०

अमुक ठिकाणीं आहे असें होतें जें त्याचें ज्ञान तें.

उमगणें (सं. उन्मज्जन) (धा. ना.) कोणिक पदार्थ अमुक स्थळीं आहे असें जाणणें.

उमच (प्रा. पु. ना.)(ग्रं०)कृतघ्नपणा.

उमज (प्रा. पु. ना.) समज.

उमटणें (प्रा. धा. ना.) गुप्त झालेला काहीं पदार्थ त्याणें दृश्यता पावणें. २ छपवून ठेविलेलें दुष्कर्मादिक त्याणें प्रसिद्धतेस येणें. ३ वर्ण, शब्द इ० किं० तंतुवाद्यानें स्वरादिक स्पष्ट समजायाजोगा उत्पन्न होणें. ४ लिपी, ठसा इ० कानीं स्वच्छ अंकित होणें.

उमदा (अर० वि०) शौर्य, पराक्रम, रूप इ० गुणानीं जो अधिक तो.

उमर (अर. स्त्री. ना.) वय.

उमराव (अर. पु. ना.) अमीर.

उमलणें (सं. उन्मीलन) (धा. ना.) पुष्पाची कळी विकसित होणें. २ सुकून घट्ट झालेला मृत्तिका, धान्य, वस्त्र, पात्र इ० पदार्थ त्याणें भिजल्यामुळें मृदुत्व पावून विशकल होणें. ३ धान्यादिकानें लाही व्हायाजोगें फुटणें.

उमळणें (सं. उन्मीलन) (धा. ना.) भूमि इ० कानीं उपळीनें युक्त होणें. २ पोटांतील कोंवळा जो गर्भ त्याणें उष्ण विकृतीमुळें बाहेर पडणें. ३ पित्तादिकांमुळें पोटांत मळमळणें.

उमेद (फा. स्त्री. ना.) काहीं कार्य करण्याचें अवसान तें.

उमेदवार (फा. वि०) काहीं धंदा, रोजगार इ० काम आपण पत्करून वहिवाटूं अशी ज्याणें उमेद धरिली आहे तो.

उरकणें (प्रा. धा. ना.) कोणेक काम करून तडीस नेणें.

उरग (सं. पु. ना.) सर्प.

उरणें (सं. उर्वरित) (धा. ना.) अवशिष्ट राहणें. [२ भांड.

उरता, उर्ता (प्रा. स्त्री. ना.) आक्षेप.

उरफाटा (प्रा. वि०) उलटा.

उरफोड (स्त्री. ना.) उरस्फोड.

उरस्फोड (उर, फोडणें) (स्त्री. ना.) काहींएक काम किं० विद्यादिक यथास्थित समजून द्यावयाकरितां उरांत रक्त पडायाजोगा फार जो श्रम करावा लागतो तो.

उराड (उर) (न. ना.) निंदादि प्रसंगीं उरासव म्हणतात.

उरूबुरू (फा. अव्य०) समक्ष. २ (स्त्री.) समक्षता.

उर्मट (सं. उन्मत्त) (वि०) स्वभावेंकरून ज्याचे अंगीं विनय नाहीं तो.

उर्वरित (सं. वि०) अवशिष्ट.

उर्वी (सं. स्त्री. ना.) पृथ्वी.

उलगडणें (उ, लगटणें-सं. उद्घाटन) (धा. ना.) गुंडाळून घडी करून ठेविलेलें वस्त्रादिक किं० एकत्र गुंतून राहिलेलें सूत, दोरी, केंस इ० तें मोकळें करणें. २ पंचाईत इ० खटलें निर्वाहित करणें. ३ लग्न, मुंज इ० मोठें कार्य तें उरकणें.

उलगडा (उलगडणें) (पु. ना.) वाद, पंचाईत, हिशेब, कट इ० कांचा उलगडण्यानें निर्वाह तो.

उलट (उलटणें) (स्त्री. ना.) शांत झालेला रोगादिक त्याचें पुनः उत्थान तो. २ (अव्य०) जें ज्याप्रकारें व्हावें तें त्याप्रकारें न होता विरुद्ध प्रकार.

उलटणें (धा. ना.) भूमि इ० कांशीं ज्या अंगानें आश्रयून राहिला जो पाषाणादि पदार्थ तो तें अंग आधाराशीं वियुक्त करून दुसरें अंग त्याशीं संयुक्त होई अशा प्रकारें चालित करणें. २ ज्या स्थितीनें कोणिक कार्यांत विनियुक्त झालेला किं० रचनेंत संबद्ध झालेला कांहीं पदार्थ तो विपरीत स्थितीनें विशिष्ट करणें. इ०.

उलटा (प्रा. वि०) असलेल्या स्थितीहून विपरीत स्थितीनें स्थित जो कांहीं पदार्थ तो.

उलटापालट (उलटणें, पालटणें) ज्या स्थितीनें रचून ठेविला जो पदार्थ तो तद्विरुद्ध स्थितीनें किं० इकडचा तिकडे तिकडचा इकडे करण्याचा व्यापार तो.

उलटापालटा (वि०) उलटासुलटा.

उलटासुलटा (वि०) इकडचा तिकडे तिकडचा इकडे होई असा केलेला पदार्थांचा विभाग तो.

उलटी (उलटणें) (स्त्री. ना.) वांती.

उलंडणें (प्रा. धा. ना.) कलंडणें.

उलणें (प्रा. धा. ना.) भूमि, फळ, शरीर इ० गर्भाशाच्या नेटामुळें बाहेरील अंगीं विदीर्ण होणें.

उलथणें (सं. उत्, तल) (धा. ना.) भाकरी इ० तवा इ० कांवर ज्या अंगाकडून आहे तें अंग तेथून सोडवून विपरीत करणें. २ उलटणें. ३ कोणेकानें तटकर मरणें. ४ (न.) भाकर इ० तव्यावरून उलटविण्याचें लोखंड इ० कांचें साधन केलें असतें तें.

उलथा (प्रा. वि०) उपडा नव्हे तो.

उलथापालथ (प्रा. स्त्री. ना.) उलटापालट.

उलाढाल (प्रा. स्त्री ना.) एकाचें कर्ज काढून दुसऱ्यास द्यावें, कोणास जामीन रहावें, इ० नानाप्रकारचीं खटलीं तीं. [पक्षी आहे.

उलूक (सं. पु. ना.) घुबड ह्मणून

उल्का (सं. स्त्री. ना.) आकाशांतून अग्निरूप जो तारा पडतो तो.

उल्लंघ (सं पु. ना.) अतिक्रम.

उल्लंघन (सं. न. ना.) उल्लंघ.

उल्लास (सं. पु. ना.) (ग्रं०) हौस.

उल्लू (सं. उलूक) (वि०) मद्यादिकांचे मदानें किं० कामक्रोधांच्या क्षोभानें बेशुद्ध झाला तो. २ अविचारी भलत्याच भरीं भरावें अशा स्वभावाचा तो.

उल्लेख (सं. पु. ना.) कोणिक गोष्टीचा भाषणप्रसंगीं अंशतः किंचित् उच्चार किं० लेखनप्रसंगीं तसा लेख तो

उल्हास (सं. उल्लास) कांहीं मनासा-

रिखें झाल्यामुळें अंतःकरण प्रफुल्लित होऊन सुखोदयरूप भाव उठतो तो.

**उवेढा** (पु. ना.) (ग्र०) परचक्र. २ पराभव.

**उषःकाळ** (स. पु. ना.) पाहाटचा पांच घटका रात्रीपासून तीन घटका रात्रपर्यंत जो काल तो.

**उष्ण** (स. वि०) अग्नीचा किं० तशा जातीचा जो स्पर्श तो, किं० तो अग्नि इ० तो. २ (न. ना.) औषधादि भक्षण, उपवास इ० निमित्तानें शैत्यविरुद्ध जी विकृति शरीरांत उत्पन्न होत्ये तें.

**उष्णता** (स. स्त्री ना.) उष्णरूप विकृति. २ उष्णपणा.

**उष्मा** (स. पु. ना.) दाह.

**उसण** (प्रा. स्त्री. ना.) मोठें ओझें उचललें इ० निमित्तानें मान, पाठ, कंबर यांचे शिरेस आचका बसल्यामुळें इकडे तिकडे हलवण्याचे कळ निघायाजोगी विकृति होत्ये ती.

**उसणाबाई** (प्रा. अव्य०) (ग्र०) समोरासमोर.

**उसत** (स्त्री. ना.) एक कार्य करीत असतां त्यांतच दुसरें कार्य करायास थोडासा सांपडतो अवकाश तो. २ विसांवा.

**उसनवार** (उसना) (वि०) उसना अशा प्रकारें दिला किं० घेतला तो.

**उसनवारी** (उसनवार) (स्त्री. ना.) उसनवारपणानें द्रव्यादि द्यावें घ्यावें लागतें अशी रीत ती.

**उसना** (प्रा. वि०) आपणास जे द्रव्यादि पदार्थांची गरज लागे त्या जातीचा पदार्थ कोणेकास यालोतरी यावयास करून व्याज, बाट इ० बोलीवांचून त्यापासून घेतात जो तो २ हरएक व्यवहाराचा पोटांतोनें अभिमान न धरितां उदासिनपणानें वागणारा जो कोणीएक त्यास किं० त्याचे तदनुरूप जें भाषण कर्म इ त्यास म्हणतात.

**उसपणें** (प्रा. ना.) उपसणे

**उसरी** (प्रा. स्त्री. ना.) चिरून वाळवून ठेवितात जी गाजरें, वांगी इत्यादिकांची भाजी इ० ती.

**उसवणें** (प्रा. ना.) शिवलेल्या वस्त्राची शिवण काढून टाकणें.

**उससा** (पु. ना.) (ग्र०) सुख

**उसळ** (उसळणें) (स्त्री. ना.) डाळ किं० सगळे दाणे शिजवून खायास करितात पदार्थ ती.

**उसळणें** (स. उच्छलन) (प्रा. ना.) भूमि इ० आधारावर वेगानें आघातपूर्वक पडला जो जलादि पदार्थ तो भूम्यादिकांच्या प्रत्याघातानें किं० इतर कांहीं आघातामुळें किं० अग्निताापादिसंयोगानें उडणें अ० उडवणें २ उदकादिकांत किं० समुद्रांत तिरून जो मनुष्यादि पदार्थ त्याणें उडी मारल्याप्रमाणें तटकर उदकादिकांतून उडणें. ३ कोणेकानें भाषणादिप्रसंगीं शांति सोडून क्रोधावेशानें अकस्मात् युक्त होणें.

**उसळी** (उसळणें) (स्त्री. ना.) कोणे-
काची जी तटकर उसळून वर
उठियान ती.

**उसासा** (सं. उच्छ्वास) (पु. ना.)
खेदादिकानें जो मोठा सुसकारा
टाकितात तो.

**उसातजाणें** (धा. ना.) खातांना ग-
ळ्यांत घास अडकून ठसका लागणें.

**उस्तरणें** (उ, आस्तरण) (धा. ना.)
घरावर जें तृणादिक आच्छादन
असतें तें घरावरून काढणें.
२ उसवणें.

**उस्तवारी** (फा. स्त्री. ना.) घर, शे-
त, ग्रामपशु इ०कांस ज्याज्या स-
मयीं जो जो उपचार पाहिजे तो
तो त्या त्या समयीं करून बिघडूं
न देतां उत्तम प्रकारचे स्थितींत
राखण्याचा प्रकार तो.

**उस्वास** (सं. अप. पु. ना.) उच्छ्वास.
२ नळानें बांधून आणितात जें पा
णि त्यास मध्यें मध्यें मोकळें वाहा-
यासाठीं ठेवितात जो अवकाश तो.

**उँहूं** (अव्य०) कोणी कांहीं विचारिलें
असतां नको अ० नव्हे अशा उ-
त्तराचें वाचक.

**उहू** (सं. ऊह) (पु. ना.) कांहींएक
कार्यार्थ रचितात जो विभू तो.

**उळा** (प्रा. पु. ना.) हवळा.

**उळींग** (प्रा. पु. ना.) न देतां उपाय
नाहीं म्हणून दिला पाहिजे असा
भाव असतां जो देतात अहेर तो
वारणें, फेडणें इ० कांच्या योगीं
प्रयोग.

## —ऊ—

**ऊ**—हा वर्ण साहावा स्वर आहे.

**ऊँ:** (प्रा. अव्य०) अँ: २ आपल्ये हा-
तून असावधपणानें असमंजस
गोष्ट होय्यि आणि पटकर ध्याना-
वर येतो तेव्हां हा उद्गार निघतो.

**ऊठपाय** (उठणें, पाय) (अव्य०) उ-
ठल्या बसल्या.

**ऊत** (उतणें) (पु. ना.) अग्नीवर ठे-
वलेले दूध, तूप, कढी इ० पदार्थ
कढूं लागले म्हणजे वाफेच्या यो-
गानें जो वर उचलला जातो तो
किं० ती दशा तो. २ संपत्यादि-
कांची पराकाष्ठेची जी उत्कर्ष-
दशा ती. ३ रडण्याचा अतिशयि-
तपणें जो अनावर गहिंवर तो.

**ऊद** (अर० पु. ना.) एक सुगंधि औ-
षधाचा चीक आहे; जो धूपार्थ
जाळितात तो. २ (सं. उद्र) (न.
ना.) एक जनावर आहे.

**ऊन** (सं. उष्ण.) (न. ना.) सूर्यानें
भूम्यादिकांवर पडतें तेज तें. २ (वि०)
कढत. ३ (स. वि०) उणा.

**ऊब** (स्त्री. ना.) उष्णता. २ शिजत
ठेवलेल्या पदार्थांपासून निघय्ये उ-
ष्ण वाफ ती. ३ पदरच्या द्रव्यसं-
ग्रहाचा जो असतो आपल्यास आ-
श्रय त्यास म्हणतात.

**ऊर्जित** (सं. न. ना.) दारिद्र्यादि वि-
पत्ति दशा जाऊन उत्तरोत्तर वर्ध-
मान जी संपत्त्यादि सुदशा प्राप्त
होय्ये तें.

ऊर्णनाभी (सं. ऊर्णनाभ) (पु. ना.) (ग्रं०) कोळी ह्मणून जो जंतु तो.

ऊर्णा (सं. स्त्री. ना.) शाल, घोंगडी इ० वस्त्रें जींची होतात अशी मेंढा इ० कांची लोंकर ती.

ऊर्ध्वरेतस्क, रेता (सं. वि०) ज्याचें रेताचें पतन नाहीं तो.

ऊर्फ (अर० वि०) प्रसिद्ध नामांतर उ० माहे मोहोरम ऊर्फ चैत्रमास.

ऊह (सं. पु. ना.) तर्करूप जें ज्ञान तें.

ऊळ (प्रा. न. ना.) (ग्रं०) फूल. २ कादा.

---

## —ऋ—

ऋ— हा वर्ण सातवा स्वर आहे.

ऋजू (सं. वि०) उजू.

ऋण (सं. न. ना.) व्याज इ०चा नियम करून परत द्यावयाच्या बोलीनें सावकारापासून घेतात द्रव्यादिक तें. २ व्याज नियमावाचून उसनवार घेतलेल्या द्रव्यावरही व्यवहार होतो; तसेंच प्रत्युपकारानें अवश्य फेडिलें पाहिजे जें उपकारादिक तेथेंहि व्यवहार होतो. ३ कोणेक अंकराशीस उणा करावयाचा जो अंकराशि तो इ०.

ऋणकरी (ऋण, करणें) (पु. ना.) ऋण देणारा किं० घेणारा ते प्र०. २ ज्यापासून आपणास कांहीं उपयोग नाहीं आणि त्यास उगीच पोसावें तर लागतें त्यास निंदासमयीं आणि ज्याणापासून कांहींच उपकार होत नसता जो आपलें निरंतर हित करितो त्यास स्तुतिसमयीं म्हणतात. [ऋणकरी.

ऋणाईत, ऋणाईतस्वरूपि (पु. ना.)

ऋणानुबंध (सं. पु. ना.) मनुष्य, पशु, स्थल इ० कांपासून आपणास कांहीं इष्ट किं० अनिष्ट फल प्राप्त होण्यास प्रयोजक जो पूर्व जन्मींचा त्यांचा आपला कांहीं ऋणसंबंध असतो तो. २ परस्पराचा जो मित्रभाव तो.

ऋतु (सं. पु. ना.) दोन दोन महिने मिळून एकेक जे वसंतादिक वर्षाचे साहा विभाग ते प्र०. २ स्त्रियांस तारुण्यदशा प्राप्त झाली म्हणजे प्राय प्रतिमासीं विकृतिविशेष होतो तो. ३ पश्वादिकांनीं फळीं वृक्षादिकांनीं पुष्पित, फलित, अंकुरित व्हावें असा जो त्यास कालानुरोधानें विकृतिविशेष होतो तो.

ऋतुमती (सं. स्त्री. ना.) जिला ऋतु प्राप्त झाला आहे अशी जी स्त्री ती.

ऋतुशांति (सं. स्त्री. ना.) स्त्रियेस प्रथमतः ऋतु प्राप्त होतो तेव्हां पतीनें गर्भाधान करण्याचे अधिकारार्थ करावयाचें कर्म आहे ती.

ऋतुस्नात (सं. वि०) ऋतु प्राप्त झाल्यावर चवथे दिवशीं स्नान करून शुद्ध झालेली स्त्री ती.

ऋत्विज (सं. पु. ना.) यज्ञादिकांत तें तें हवनादि कर्म करण्यासाठीं यजमानानें वरिला असतो जो ब्राह्मण तो.

ऋषि (सं. पु. ना.) तपश्चर्यादि पुण्य-

कर्माचेठायीं निरंतर ज्याची निष्ठा ज्याचीं वचनें ईश्वरवचनासारखीं लोक प्रमाण मानीत आहेत असे जे पुराणादिप्रसिद्ध वसिष्ठ, विश्वामित्र, नारद इ० ते प्र०. २स्नानसंध्याशील असून ज्याचे अंगीं लबाडी लचाडी तिळप्राय नाहीं असा जो सात्विक ब्राह्मण त्यास म्हणतात. [नक्षत्र.

ऋक्ष (स. पु. ना.) अस्वल. २(न.)

## ऋ ऌ ॡ

हे तीन स्वर आरंभीं असलेले मराठी भाषेंत शब्द नाहींत.

—ए—

ए— हा वर्ण अकरावा स्वर आहे. (म. अव्य०) एक वचनानें कोणेकास संबोधन करायाचें असतां त्याचे नामापूर्वी कि० याचाच प्रयोग करितात. उ०ए खंड्या इकडे ये.

एककली (एक, कल) (वि०) वागण्यास जो कांहीएक संप्रदाय धरिला असतो तेणेंकरूनच वागणारा म्ह० ज्यास प्रसंग पाहून वागण्याचें ज्ञान नाहीं तो. २ पाठ, तर्क, हिशेब, कवन करणें इ० जे अनेक बुद्धीचे विषय त्यांमध्यें एकाच विषयावर चालणारी कोणेकाची स्वाभाविक बुद्धि तो.

एकंकार (सं. अप. न. ना.) एकाकार

एककालिक (सं. वि०) एककालीन.

एककालीन (स. वि०) एक समयीं झालेले, आलेले ते परस्पर.

एकचएक (वि०) केवळ जो एक तो.

एकछत्रीराज्य (एक, छत्र, राज्य) (न. ना.) समुद्रवलयांकित पृथ्वीचें राज्य एके राजाचे हाताखालीं असणें तें. [अनेक ते परस्पर.

एकजातीय (सं. वि०) एका जातीचे

एकठोक (अव्य०) एक थोक.

एकतऱ्हेचा (एक, तऱ्हा) (वि०) एक प्रकारचा.

एकतान (सं. वि०) एकाग्र.

एकतुकें (वि०)(ग्रं०) समान, सारखें.

एकथोक (वि०) थोडें थोडें अनेकवार न देतां न घेतां एकदाच मोठी रकम होई असें द्रव्यादि घेणें, देणें तें.

एकदम (एक, दम) (अव्य०) मध्यें विसावा न घेता एके दमानें. २कोणेक कर्माचे अनेक पर्याय न करितां एके पर्यायानें.

एकंदर (सं. एकत्र) (अव्य०) एके अधिकरणीं अनेक पदार्थांचे मिश्रण, संकलन इ० द्वारा मिळून जेव्हां स्थिति आहे तेव्हा याचा प्रयोग. २ पुनः पुनः अनेकवार करायाची गरज न ठेवितां एकदांच ताकीद करणें, सांगणें. ३ (स्त्री.) अनेक अंकादिकांची एकत्र मिळवणी ती इ०.

एकदांचा (एकदां) (अव्य०) कसें तरी सायासानें एकवार.

एकदेशी (सं. वि०) जो दृष्टांतादिक कोणेक अर्थास सर्वांशीं व्यापीत

नाहीं तो. २ सर्वांचे समजुतीस मिळत नाहीं असें जें कोणेका भाषण त्यास किं० तसें भाषण करणारा त्यास म्हणतात.

एकनिष्ठ (सं. एक, निष्ठा) (वि० भक्ति, तप इ० कांवर दृढ निष्ठ ज्याची बसली आहे असा भक्त तापस इ० तो. [गमनीं तो

एकनिष्ठकार्याकर (वि०) पुरा मात्रा-

एकपक्षीं (सं. एक, पक्ष) (अव्य० कोणीएक जो पक्ष त्यास अवलंबून २ एका प्रकारें.

एकपुती (एक, पुत्र) (स्त्री. ना.) जिला एक पुत्र आहे ती.

एकवळा (पु. ना.) (ग्रं०) एकोपा

एकवेळू (पु. ना.) (ग्रं०) मरणास संज्ञा. [एकदम

एकसमयावच्छेदेंकरून (सं. अव्य०)

एकसाहां (अव्य०) एकसारखा.

एकसारखा (वि०) सारख्या गुणाचे जे ते परस्पर. २ (अव्य०) वर्तनास धरिला जो कोणेक प्रकार त्याच प्रकारानें. ३ प्रवृत्त झाल्यापासून मध्यें विराम न होतां.

एकाएकीं (एक) (अव्य०) अकस्मात्.

एकाकी (एक) (वि०) एकटा.

एकाकार (एक, आकार) (न. ना.) अनेक जात्यादिरूप पदार्थ त्यांचा भिन्नभिन्नपणानें बोध न व्हाया-जोगा होणें संकर तें. २ (वि०) एकच आहे आकार ज्याजकर असें ज अंत:करण, बुद्धि इ० तो.

एकाग्र (सं. वि०) चंचलता सोडून एकाच विषयाकडे लागलेलें जें अंत:करण इ० तें.

एकांत (सं. पु. ना.) आपणास काहीं एक कार्य करण्यास अडचण करणारा जो परकीय मनुष्यादि तद्रहित स्थळ तो. २ कोणेकासहवर्तमान काहीएक गोष्टीचा एकांतीं करिता विचार तो.

एकादा (एक, आदि) (वि०) एक-आणि अनुक्रम अशा प्रकारें विवक्षित नव्हे तो. उ० तुजजवळ एकादा रुपया असला तर दे.

एकाक्ष (सं. वि०) एक अक्ष आहे नेत्र ज्याचा तो.

एकी (एक) (स्त्री. ना.) युद्ध, कलहादि निमित्तरहित जो भाव तो. २ मैत्री.

एकीहेळां (अव्य०) (ग्रं०) अकस्मात्

एकूनएक (अव्य०) एकामागें दुसरा दुसऱ्यामागें तिसरा, याप्रमाणें सर्व संपत अशा प्रकारें.

एकुलता, एकुलताएक (वि०) एक नाहीसा झाला तर दुसरा आहे तो नाहीं तर तिसरा आहे असें म्हणायास नाहीं, केवळ एकच एक असा जो पुत्र इ० तो.

एकोपा (पु. ना.) ऐकमत्य.

एखाद, दा (वि०) एकादा

एड (प्रा. स्त्री. ना.) घोडें इ० काम टाच मारणें, मारणें इ० सर्व शक्ति खर्चून प्रयत्न तो.

एतदर्थ (सं. अव्य०) यासाठीं.

एतावता (सं. अव्य०) इतक्यानें.

तुलें (प्रा. वि०) (ग्रं०) असें, इतकें, येवढें.

एरवां (प्रा० अव्य०) परवांचे पलीक-
डले दिवशीं किं० त्याहून पलीक-
डले दिवशीं. [णपणानें.

एरवीं (प्रा. अव्य०) अन्यथा साधार-

एरु (एर) (वि०) (ग्रं०) परस्पर संभाषण करतें जे उभय त्यांतून ए-
काचें वृत्त सांगून दुसऱ्याचे वृत्ता-
चे निवेदनार्थ याचा प्रयोग. उ०
सीता म्हणे लक्ष्मणा धांव, एरु म्हणे राक्षसी मार.

एलगार (पु. ना.) कांहिएक मोठें कार्य सिद्ध करण्याविषयीं नेटानें सर्व शक्ति खर्चून जो प्रयत्न तो.

एवंच (सं. अव्य०) एकून, सारांश, मिळून.

एवी (प्रा. वि०) (ग्रं०) असें.

एवींतेवीं (प्रा. अव्य०) अशीं प्रवृत्त होऊं नये तें झालें, आतां जसें होईल तसें होऊ अशा स्वभावानें.

—ऐ—

ऐ— हा वर्ण बारावा स्वर आहे.

ऐकणें (सं. आकर्णन.) (धा.. ना.) आइकणें.

ऐकींव (वि०) आइकींव.

ऐक्य (सं. नं. ना.) एकपणा,

ऐणी (प्रा. स्त्री. ना.) (ग्रं०) आइणी.

ऐता (वि०) आइता.

ऐदी (प्रा. वि०) अजागळप्राय, अव्य-
वस्थित, आळशी असा जो मनुष्य त्यास म्हणतात.

ऐंद्रजालिक (सं. पु. ना.) इंद्रजालाचा खेळ करणारा गारुडी तो.

ऐन (अर० वि०) उत्कर्ष होतां होतां त्याची पराकाष्ठा झाली आणि अप-
कर्षाचा आरंभ झाला नाहीं अशा मुख्य अवस्थेतील तो तो कालादि-
रूप जो पदार्थ तो. २ व्याज, तोटा इ० कानें जो अधिक उणा झाला नव्हे असा मूळभूतपदार्थ तो.

ऐरण (प्रा. स्त्री. ना.) ज्यावर अलं-
कार, भांडीं इ० ठोकून घडितात असें लोखंडाचें औत तें.

ऐरावत, वती (सं. पु. ना.) स्वर्गीं इं-
द्राचा हत्ती आहे तो.

ऐरिणी (प्रा. स्त्री. ना.) (ग्रं०) लग्नांत जींत पिठाचे दिवे लावून ठेवितात ती वेळूची केलेली झाल.

ऐवज (अर० पु. ना.) जेणेंकरून पाहिजे तो जिन्नस घ्यावा इ० काम होतें असा जो पैसा, रुपया, होन इ० तो किं० ज्याचे विक्रयानें तो पैसा उत्पन्न होतो म्हणून तद्रूपच मानिला जो सोनें, रुपें, धान्य, भांडें, पशु, क्षेत्र इ० पदार्थ तो. २ वस्तुमात्रांत तें तें कार्य साधण्या-
विषयीं जो तत्वांश असतो तो.

ऐवजीं (अर० अव्य०) ज्याच्याच्या जो कांहिएक पदार्थ त्याला ऐवज-
रूपेंकरून मानून त्याच्या योगानें द्रव्यांतरादि देणें, घेणें इ० प्रकारें.

ऐशआराम (अर० फा० पु. ना.)

नाच, तमाशा, गाणें इ० भोग, उपवनांत गमन इ० द्वारा जो मनोरंजन व्यापार तो.

ऐश्वर्य (सं. न. ना.) प्रभुत्व. २ वैभव.

ऐश्वर्ययोग (सं. पु. ना.) (ग्रं०) मायायोग.

ऐसपैस (वि०) प्रशस्त.

ऐसेनी (अव्य०) (ग्रं०) अशाप्रकारें.

ऐहिक (सं. वि०) इहलोकसंबंधी जें सुखादिक तें.

---

## -ओ-

ओ— हा वर्ण तेरावा स्वर आहे. २ (अव्य०) कोणी हाक मारिली असतां तिचें प्रतिवचन आहे.

ओंऊळ (सं. बकुल) (स्त्री. ना.) बकुलवृक्ष. २ (न. ना.) तिचें फूल तें.

ओंका (प्रा. वि०) जेथें जो अलंकारादि पदार्थ होता किंवा असावा तो तेथें नाहींसा झाल्यामुळें विशोभित व कमाचसा एक प्रकारचा दिसतो जो घर, शरीर, शरीरावयव इ० तो.

ओकारी (ओकार)(स्त्री. ना.) उदरस्थित अन्नादिकाची ओक असा शब्द होऊन वर जी उत्थिति ती. २ ओक.

ओखटा (प्रा. वि०) (ग्रं०) ज्याचे दर्शनादिकानें कंटाळा येतो असें जें मलीन, घाणेरें, वस्त्रपात्र, मनुष्य इ० तो.

ओंगण (प्रा. न. ना.) गाडा, रहाट इ० कांस तेल, बेरी इ० लावितात त्यास म्हणतात. [वाढणें.

ओंमरणें (धा. ना.) (ग्रं०) अन्नादिक

ओंगळ (सं. अप. वि०) अमंगल.

ओघ (सं. पु. ना.) जलादिकाचा प्रवाह. २ समुदाय. ३ कोणेक गोष्ट ओघास येणें म्ह० क्रमानें प्राप्त होणें.

ओघळ (ओघ)(पु. ना.) जलादिकाचा भूमि इ० कांवरून नीच प्रदेशाकडे चालतो जो बारीक प्रवाह तो. २ (स्त्री. ना. दोहोंकडे डोंगरी असून मध्यें केवळ संकुचित जो निम्न प्रदेश असतो ती.

ओघळणें (ओघळ) (धा. ना.) ओंवलेलें मोतीं, फूल इ० तें तंतूंतून बाहेर पडणें. २ नाक, कान, सुई इ० कांस पाडिलेलें जें छिद्र तें त्या अलंकारादिकाच्या घर्षणानें मोठें सैल होऊन खालीं उतरणें.

ओज (सं. ऊर्जा) (स्त्री. ना.) कोणेक पदार्थ न बिघडतां विवक्षितगुणविशिष्ट व्हावयास अपेक्षित जे उपचार तेणेंकरून जो संस्कार ती. २ शिक्षा, अभ्यास इ० कानें कोणेक कर्माची लागल्ये बरी रीत ती. ३ सवय.

ओझरता (प्रा. अव्य०) काकरता.

ओझें (प्रा. न. ना.) पदार्थाचे अंगीचा जो भार तें. २ मनुष्य, घोडें इ० कानीं वाहायाजोगा परिमित जो काष्ठ, दगड इ० पदार्थ किंवा बांधून एकत्र केलेला धान्य, तृण इ० पदार्थसमुदाय तें. ३ अवश्य

निर्वाह करणें प्राप्त ज्याचा असें संसारादि खटलें किं० तत्संबंधी श्रमदायक निर्वाहता तें.

**ओटंगण** (न. ना.) (ग्रं०) टेंकायाचे उपयोगीं लोड, गिर्दी इ० तें.

**ओटा** (प्रा. पु. ना.) वर बसणें, चत्र घालणें किं० काहीं पदार्थ ठेवणें इ० कांसाठीं भूमि इ० कांवर विटा, माती इ० कांनीं उच्चस्थळ करितात तो. २ जोंत्याची कड इ० स्थळीं वर बसून टेंकावें म्हणून हात सवा हात उंचीचा भिंतीसारिखा आकार करितात तो.

**ओटी** (प्रा. स्त्री. ना.) वरात माजघराचे बाहेर बसायाउठायासाठीं जी जागा राखितात ती.

**ओंटी** (स्त्री. ना.) काहीं पदार्थ आंत घ्यावयासाठीं नेसलेल्या किं० पांघरलेल्या वस्त्राचा पदर न बांधितां कांहींसा पात्ररूप केला जो आकार तो. २ ओंटी भरण्याचें जें तांदूळ, सुपारी, नारळ, हळकुंड इ० साहित्य तें. ३ गाय, म्हैस इ० पशुस्त्रियांची कास ती. ४ गुह्य आणि नाभि यांचा मध्यप्रदेश तो.

**ओंठाळी** (ओंठ, आळी) (स्त्री. ना.) घोड्याचे खालचे ओंठास लगाम नसतां जी दोरी बांधितात ती.

**ओंड** (प्रा. वि०) खोल. [डी विद्या.

**ओडंबरी** (स्त्री. ना.) (ग्रं०) गारु-

**ओडंबा** (स्त्री. ना.) (ग्रं०) बाळवी.

**ओंडा** (प्रा. पु. ना.) शाखारहित केलेला हात दोन हात लांब जो जाळण्यासाठीं लांकडाचा तुकडा तो.

**ओढ** (प्रा. स्त्री. ना.) पदार्थांची कोणीएकेकडे गति होण्यास होत्ये कारणभूत जी वेगपरवशता ती. २ कोणेक विषयाकडे अंतःकरणाचे गतीचा रोंख असण्यास कारणभूत जी आशा, ममता इ० वेगपरवशता ती. ३ खर्चेंचें करण्यास द्रव्यादिकाचे दुर्लभतेमुळें त्या त्या व्यवहारांत होत्ये अडचण ती. ४ शक्तीपेक्षां विशेष चालणें इ० झाल्यामुळें शरीरास बसतो ताण तो इ०.

**ओढगस्त, ग्रस्त** (ओढ, ग्रस्त)(वि०) खर्चावेंचाविषयीं ज्याजवळ द्रव्य नाहीं म्हणून जो अडचणींत असतो तो.

**ओढणें** (प्रा. धा. ना.) आकर्षणें. २ दुसऱ्याची तोंडजोड न ऐकतां दुराग्रहानें कोणेक गोष्ट धरून बसणें. ३ गुरगुडी तंबाखू, भांग इ० ओढणें म्ह० त्याचा धूर मुखवायूनें आंत घेणें. ४ तपकीर इ० ओढणें म्ह० नाकानें आंत घेणें. ५ रेघ इ० ओढणें म्ह० अंकनव्यापारानें ती निर्मिणें इ०.

**ओढवणें** (प्रा. धा. ना.) दुःखप्रद प्रारब्ध किं० त्याचें दुःखरूप फल अवश्य भोगण्यास प्राप्त होणें. २ (ग्रं०) काहींएक पदार्थादि घेण्यास हात पुढें करणें.

**ओढा** (प्रा. पु. ना.) ओढ. २ उगमापासून दोन तीन कोसांवर जाऊन नदीस मिळतो असा लहानशे नदीसारिखा जलप्रवाहमार्ग तो.

ओडाळ (प्रा. वि०) घरीं तृणादि भक्षायास असतां लोकांचे घरांत, शेतांत जाऊन खावें, नाश करावा अशा स्वभावाचें ढोर जें गुरूं तें.

ओतणें (प्रा. धा. ना.) पात्रांतील जलादि पदार्थ पात्र वांकडें करून बाहेर पडे असा करणें. २ धातुचा रस सांचांत ओतून प्रतिमादिक निर्मिणें.

ओतारी (ओतणें) (पु. ना.) मूर्ति, भांडीं इ० ओतण्याचें कसब करितो तो. [करितात जो भाव तो.

ओदन (सं. पु. ना.) तांदूळ शिजवून

ओप (प्रा. स्त्री. ना.) अलंकार इ० कांस चकाकी येण्याकरितां जो घोंटणें इ० संस्कार करितात तो. २ तेणेंकरून येते चकाकी ती.

ओपणें (सं. अर्पण) आपण अंगीकारलेला अधिकार इ० किं० कांहीं पदार्थ दुसरा जो कोणी त्याचे स्वाधीन करणें. २ विकणें. ३ वस्त्रानें स्वच्छ पांढरें होण्याकरितां वारंवार भिजवें, उन्हांत वाळावें अशा संस्कारानें संस्कृत होणें.

ओंवण (प्रा. न. ना.) घराचे वाशांवर तृण, कवलें इ० राहाण्याकरितां आडव्या काठ्या इ० बसवितात तें.

ओंबी (प्रा. स्त्री. ना.) गव्हाचे झाडाचा धान्ययुक्त तुरा ती किं० तत्संबंधी ओला दाणा ती.

ओमण (प्रा. न. ना.) ओंवण.

ओयरणें (धा. ना.) वैरणें.

ओरखडणें (ओरखडा) (धा. ना.) शरीर इ० ओरखड्यानें युक्त करणें. २ कोठें लेखणी लागली न लागली नागर लागला न लागला अशा प्रकारें लिहिणें, नांगरणें इ० तेथें प्रयोग.

ओरखडा (प्रा. पु. ना.) शरीरादिकांवर नख, कांटा इ० यांनें ओढिला असतां वरील त्वचा उखवून निघते रेषा तो.

ओरडणें (धा. ना.) अरडणें.

ओरपणें (धा. ना.) आंबील, कढी इ० पदार्थ भुरके मारीत भराभर खाणें. २ वरील त्वचा कांहीं निघे इतकें खाजविणें. ३ मोडशी इ० विकार दूर व्हावा म्हणून लोखंड तापवून तळव्यावरून ओढावें अशा संस्कारानें हात किं० पाय संस्कृत करणें.

ओरबडणें (धा. ना.) ओरखडणें २ वृक्षाची डाहाळी किं० त्यावरचा पाला, पुष्पें इ० ओरपणें.

ओरवडा, ओरबाडणें, ओरबाडा-हे शब्द ओरखडा, ओरखडणें याच अर्थाचे होत.

ओरा (प्रा. पु. ना.) लाडवासारिखा साखरेचा गोळा बांधिला असतो तो.

ओरी (प्रा. स्त्री. ना.) ओवरी.

ओल (प्रा. स्त्री. न. ना.) भूमि, भिंत, वृक्ष, शरीरावयव इ० कांचे अंगीं पर्जन्यादि योगानें असते जी आर्द्रता ती. २ योजिलेलें कार्य होण्याच्या संभावनेचें दिसतें लक्षण ती. ३ शत्रु इ० कानें आपणाशीं का-

र्हा केला जो करार त्याप्रमाणें त्याचे वर्तनाचा आपल्यास विश्वास येत नाहीं म्हणून किं० आपलें कांहीं काम त्याला अडवून करून घ्यावें म्हणून तें काम इ० होईपर्यंत त्याचें मनुष्य इ० अडकवून ठेवावें आणि कार्य झालें म्हणजे माघारें द्यावें तें किं० नशा संकेतानें अडकावलेलें मनुष्यादि तें.

**ओलसर** (प्रा. वि०) किंचित् ओला.

**ओला** (प्रा. वि०) उदकादिकानें भिजलेला किं० ज्याचे अंगचा जलांश सुकला नाहीं असा पदार्थ तो.

**ओलांडणें** (धा. ना.) उलंघून जाणें.

**ओलावा** (ओल) (पु. ना.) भूम्यादि पदार्थांच्याठायीं किंचित् ओलेपणा असतो तो. २ प्रार्थनादि श्रवणानें कोणेकाचे हृदयास यत्किंचित् होतो जो सद्रवपणा तो. ३ ओल. ४ प्रपंच, परमार्थ इ० व्यवहारीं अपेक्षित जो द्रव्यांश, भगवद्भक्ति इ० रूप तत्वांश तो.

**ओंवणें** (धा. ना.) पुष्प, मणि इ० कांचे छिद्रांत दोरा इ०भरणें किं० दोरा इ०कांत पुष्प, मणि इ०भरणें.

**ओवरा** (प्रा. पु. ना.) स्वयंपाकघर.

**ओवरी** (प्रा. स्त्री. ना.) देवालय, तीर्थ इ०कांचे समीप यात्रेकरू इ० राहावयाकरितां दगड, विटा, चुना इ० कानीं बांधिली असते जी धर्मशाळा ती किं० तिचे जे अवांतर विभाग ते प्रत्येकीं.

**ओंवळा** (प्रा. वि०) सोंवळा नव्हे व केवळ विटाळाचा नव्हे तो.

**ओंवाळणी** (ओंवाळणें) (स्त्री. ना.) दिवाळी इ०कांमध्यें आपणास कोणी ओंवाळिलें असतां त्यास सन्मानार्थ जें द्रव्यादि देतात ती. २ कथा इ० कांचे समाप्तीस हरिदास इ० कांवरून पैसा इ० ओंवाळून टाकितात ती.

**ओंवाळणें** (सं. अवलवलन)(धा. ना.) दीपादिक हातीं घेऊन मंगलार्थ देवता, नवरामूल इ० कांचे मुखासमोर प्रदक्षिण फिरविणें.

**ओंवी** (ओंवणें) (स्त्री. ना.) प्राकृत भाषेत कवितेचा एक छंद आहे. २ दळणें, झोंपाळ्यावर बसणें, मुलास हलविणें इ० समयीं स्त्रिया जें गीत म्हणतात तें.

**ओशट** (सं. अवशिष्ट) (न. ना.) तेल आणि तूप यांचे अंगीं सारांशानें स्निग्धत्व म्हणून जो धर्मविशेष असतो ज्याचे योगानें हात इ० कांस विलक्षण बुळबुळीतपणा येतो तें किं० तें स्निग्धत्व तें. २ (वि०) तेल, तूप यांचे संपर्कानें बुळबुळीत झालेला जो हस्त, वस्त्र, पात्र इ० तो.

**ओशाळकी** (प्रा. स्त्री. ना.) ओशाळगत.

**ओशाळगत** (प्रा. स्त्री. ना.) ओशाळेपणा.

**ओशाळा** (प्रा. वि०) आपलें कांहीं दुष्कर्मादि दुसऱ्यास समजूं नये ते समजल्यामुळें मुखश्री उतरे असा लज्जित झाला तो. २ दुसऱ्याचे उपकारादि भारानें केवळ दबेल झाला जो तो उपकार कर्त्यांचा.

ओस (प्रा. वि०) उजाड.

ओसंग (सं. उत्संग)(स्त्री.ना.)मांडी

ओसणणें (सं. उत्, स्मृ) (धा. ना.) निर्जेत किं० झोंपेंत बोलणें.

ओसरणें (सं. अपसरण) (धा. ना.) उत्तरोत्तर वाढत होतें जें दुखणें, सूज, पर्जन्य, दुष्काळ, नदीचा पूर इ० त्याणें मागें हटणें.

ओसरी (प्रा. स्त्री. ना.) ओटी.

ओसाड (प्रा. वि०) उजाड.

ओःहो (प्रा.अव्य०)आश्चर्याचा उद्गार.

ओहोट (ओहोटणें) (पु. ना.) भरती संपल्यानंतर उत्तरोत्तर पाणी न्यून होणें अशी अवस्था समुद्राचे पाण्यास होते ती.

ओहोटणें (सं. अव,अटन)(धा. ना.) समुद्राचें पाणी ओहोटीनें युक्त होणें.

ओहोटी (स्त्री. ना.) ओहोट.

ओहोरणें (धा. ना.) होरणें.

ओहोळ (वाहणें) (पु. ना.) लहानसा जो ओढा तो. २ ओघळ.

ओळ (सं. आवलि) (स्त्री. ना.) कांहीं पदार्थ सममूत्रानें संनिविष्ट होत गेले असतां होतो जो रचनाविशेष ती. २ अक्षरें इ० ल्याहायासाठीं काढितात रेषा ती. ३ वागणुकेविषयीं सभ्यपणाची रीत ती. ४ कांहीं गोष्ट ओळीस येणें म्ह० ओघास येणें.

ओळकंबणें (धा. ना.) अधांत्रीं लोंबत राहायाजोगें वरील कांहीं आधाराशीं संबद्ध होणें.

ओळकंबा (प्रा. पु. ना.) ओळकंब राहायाजोगा वरील आधाराचे हस्तादिकांनीं करितात संबंध तो

ओळख (ओळखणें) (स्त्री. ना.) एकवार प्रत्यक्ष झालेला जो कांहीं अर्थ त्याचे ज्ञानाचा कालांतरें पुनः त्याचें प्रत्यक्ष झालें असतां ह अमुक असें ज्ञान व्हावयाजोगा अंतःकरणांत राहिला असतो जो संस्कार तो. २ मनुष्यादिकांचा परस्पर परिचय तो. ३ ओळख पटायासाठीं साधनभूत जी खूण ती इ०.

ओळखण (स्त्री. ना.) ओळख.

ओळखणें (सं. उपलक्षण) (धा. ना.) पूर्वीं ज्याचें प्रत्यक्ष झालें असतें त्याचें पुनः प्रत्यक्ष झालें असतां ह अमुक अशा प्रकारें जाणणें.

ओळखदेख (स्त्री. ना.) ओळख पाळख.

ओळखपाळख (स्त्री. ना.) ओळख परिचय, सलग इ० तो.

ओळंबा (ओळंबणे, सं. अवलंबन (पु.) भिंत इ० कांना उजूपणा वांकडेपणा समजावा म्हणून जें धरून लोंबवून पाहतात जो एके दोरास बांधिलेला शिसें, दगड इ० कांचा गोळा तो.

ओळा (पु. ना.) ओल.

ओळीचा (ओळ) (वि०) विद्वत्ता कुलीनता इ० गुणांनीं जो ज्याशीं समान योग्यतेचा तो त्याचे. २ सभ्यरीतीचा जो कोणी मनुष्य तो

## -औ-

**औ**—हा वर्ण चौदावा स्वर आहे.

**औट** (वि०) साडेतीन संख्या.

**औत** (न. ना.) शेतकी इ० कांचें नांगर इ० सामान तें.

**औदार्य** (सं. न. ना.) उदारपणा.

**औदासिन्य** (सं. न. ना.) उदासीनपणा.

**औद्धत्य** (सं. न. ना.) उद्धतपणा.

**औरस** (सं. वि०) स्वस्त्रीचेठायीं स्ववीर्यानें उत्पन्न झालेलें अपत्य तें.

**औरसचौरस** (अ०) अवरसचवरस.

**औषध** (सं. न. ना.) ज्याचे सेवनानें रोगनिवृत्ति होऊन पुष्ट्यादि गुण उत्पन्न होतात असा झाड, पाला, मुळी, काष्ठ, धातु, रस, रसायन, मात्रा इ० तें. २ ज्याचे योगानें इच्छेनुरूप कार्य होतें असा जो द्रव्य, क्रियादिरूप कांहीं अर्थ तें. कांहीं पदार्थ औषधास नाहीं म्ह० किंचिन्मात्रही नाहीं असा अर्थ.

---

## —अं—

**अं**—हा वर्ण पंधरावा स्वर आहे. याचे शब्द अ ह्या वर्णांतच अंतर्भूत आहेत.

---

## —अः—

**अः**—हा वर्ण सोळावा स्वर आहे, हा वर्ण आरंभीं असलेले मराठींत शब्द नाहींत.

---

## -क-

**क**—हा वर्ण पहिलें व्यंजन आहे. हा प्रत्यय संस्कृत, नाममात्रापुढें विकल्पेंकरून लागतो. उ० पुत्रक, नामक, तारक इ०

**कंकण** (सं. न. ना.) स्त्रियांचे हातांतील भूषण आहे. २ यज्ञादिकांत दोरा मंत्रून हातांत बांधितात तें.

**कंकर** (प्रा. पु. ना.) लहान लहान खडे ते प्र० २ मृदंग नगारा इ० कास ओढीकरितां जो वादी लावितात तो.

**कंगणी** (स्त्री ना.) स्त्रियांचें हस्तभूषण आहे. २ पागोट्याचे बिनीवर एकावर एक पदरा चढवून जी उंच आकृति केली असते ती. ३ भिंत, लाकूड इ०कास जो कंकणाचे आकाराचा उंचवटा राखितात तो.

**कंगाल** (वि०) दरिद्री.

**कंगोरा** (फा० पु. ना.) भिंत इ०कास असलेले कंगणी तो. २ लांकूड इ० कास चतुष्कोणाद्याकार केला असता धारासारिख्या शिरा पडतात तो.

**कच** (प्रा. स्त्री. ना.) चहूंकडून संकटें आल्यामुळें आन कोंडाया जोगी जी अडचण प्राप्त होते ती. २ कचकच लागाया जोगा जो पीठ गूळ इ०कांत रेती इ० अंश असतो तो. ३ भयादिकामुळें कांहींएक कार्यापासून मागें सरण्याचा जो प्रकार तो. ४ (सं पु.) केस.

**कचकणें** (कच) (धा. ना.) युद्धादिकांत भय पावणें किं० काष्ठ, हाड इ० भारादिकामुळें केवळ द्विधा न होता किंचित् मोडलें जाणें.

**कचकन, कर, दिशी** (प्रा० अव्य०) कांच, मडकें इ० फुटण्याचा किं० शरीरादिकांत शस्त्रादि टोंचण्याचा किं० दाताखालीं रेती इ० सांपडण्याचा जो शब्द त्याचें अनु०

**कचकल** (पु. ना.) अनेक पदार्थांचे तुकड्यांचा समुदाय तो.

**कचका** (प्रा. पु. ना.) बलादिकानें कांहींएकावर शस्त्रादिकांचा प्रायः कच शब्द होई असा प्रहार तो. २ कांहीं पदार्थांस आंचका बसे असा ओढण्याचा जो व्यापार तो किं० कोणेक मनुष्यादिकांचा कांहींएक कार्यावर सवेग जो प्रवृत्तीचा प्रकार तो ज्याचे संबंधानें त्या क्रियेसंबंधी पदार्थांस टिकाव काढायास कठीण पडतें.

**कचकावणें** (कचक) (धा. ना.) ठोकणें. २ शिवीगाळ इ० कांनीं कोणेकास दविणें. ३ दुर्वह जें काम त्याची दुर्वहता न गणितां तें आग्रहानें करून टाकणें.

**कचकावून** (कचकावणें) (अव्य०) आपली सर्व शक्ति खर्चून किं० ज्या गोष्टीवर जितकी शक्ति पाहिजे त्यापेक्षां अधिक लावून.

**कचकून** (अव्य०) कचकावून.

**कचक्या** (वि०) कोणेकाशीं खुमखूम जिरवाया जोगा जो शक्तिमान तो.

**कचणें** (धा. ना.) कचरणें.

**कंचनी** (स्त्री. ना.) कळवंतीण.

**कचर** (प्रा. स्त्री. ना.) एक कंद आहे. २ कचरनीयार्थी.

**कचरणें** (धा. ना.) युद्ध, वाद इ० व्यापारीं जो प्रवृत्त झाला त्याणें भयादिकामुळें कच खाणें.

**कचरा** (प्रा. पु. ना.) केर, लाकूड इ० कांचे बारीक तुकडे इ० तो.

**कचाट** (न. ना.) अनेक प्रकारचे प्रयत्नांनीं साध्य किं० निरंतर ज्याची काळजी बाळगावी लागेल असा जो कांहींएक व्यापार त्यास त्रासानें म्हणतात. २ दुःखानें ज्याचा उपभोग केला पाहिजे असें जें कोणेकास उपस्थित झालें कांहींएक त्यास म्हणतात.

**कचाटी** (स्त्री. ना.) चहकडून चार संकटें आल्यामुळें अंतःकरणांत कोंडाया जोगी जी अडचण प्राप्त होते ती.

**कचावणें** (धा. ना.) कचणें.

**कंचुक** (सं. पु. ना.) अंगरखा, झगा इ० तो. २ सर्पांची जी कात ती.

**कंचुकी** (सं. स्त्री. ना.) चोळी किंवा कांचोळी. २ (सं. पु. ना.) चोपदार

**कचेरी** (स्त्री. ना.) राजकीय कारभार करण्याची जागा ती. २ तेथील कारभार करणारे मनुष्यांचा समुदाय तो. ३ त्या स्थळीं तशा कारभाराचा चालणा ती.

**कच्चा** (वि०) पिकलेलें नव्हे फळादिक तो. २ पुरेतपणीं किं० अगदीं-

च शिजलेला नव्हे भात इ० तो. ३ पदार्थांस दृढता इ० येण्यास कारणभूत जे संस्कार असतात ते पुरतेपणीं किं० अगदींच ज्यास झाले नाहीत म्हणून दृढतादि गुण ज्यामध्यें नाहींत तो. ४ प्रौढता पावलें नव्हे असें जें ज्ञान, बुद्धि इ० तो. इ०

कज्जल (सं. न. ना.) काजळ.

कज्जा, कज्या (अर. पु. ना.) कलह.

कज्याखोकला, कज्जाभांडण, कज्जाकफावत } लहानमोठा कज्जा इ० तो.

कट (सं. पु. ना.) काहींएक काम करण्याविषयीं अनेकांनीं केलें एकमत तो. २ बंदुकीस दस्ता व नळी मिळून बद्ध असतो तो. ३ अंग इ०कांवर मळाचा लेप बसतो तो. इ०

कटक (सं. न. ना.) सैन्य. २ कडें.

कंटक (सं. पु. ना.) बाभळ, बोर इ०कांचा शरीरादिकांत टोंचण्याजोगा जो अवयवविशेष असतो तो. २ ग्रामादिकांस उपद्रवकारी जो लाहानसाहान शत्रु, चाहाड इ० तो. ३ निर्दय जो तो.

कटकट (स्त्री. ना.) कज्जा. २ किरकीर.

कटकटा (अव्य०) (ग्रं०) दुःखाचा उद्गार आहे.

कटंजन (सं. न. ना.) कठडा.

कटणें (कट) (धा. ना.) शरीर वस्त्र इ० मलादिकानें युक्त होणें. २ काहींएक कार्याविषयीं जिवारती मेहनत करणें. ३ तुटणें.

कटाई (स्त्री. ना.) (ग्रं०) कढई.

कटारा (पु. ना.) टेकून बसायासाठीं किं० स्थलमर्यादार्थ लांकडाचे गराडे मारून जो आकारविशेष करितात तो.

कटाव (पु. ना.) आंत एकाएकी इतराचा प्रवेश न व्हावा व सुशोभित दिसावा असा जो सेनेचा रचनाप्रकार तो. २ यमकें, प्रौढपदें इ० विशिष्ट किं० अर्थभरित दोष देण्याविषयीं एकाएकीं दुसऱ्याची बुद्धि चालूंनये असें जें भाषण, काव्य इ० तो.

कंटाळा (कष्ट) (पु. ना.) काहींएक पदार्थाविषयीं किं० गोष्टीविषयीं वाईटपणा वाटल्यामुळें जी अरुचि असते तो.

कटाक्ष (सं. पु. ना.) नेत्रकोणानें कोणेक पदार्थाकडे अवलोकन, जें बहुधा साभिप्राय असतें तो. २ तशा अवलोकनाचा प्रकार तो. ३ सरळ अर्थावांचून इतर जो गूढार्थ तिकडे जो भाषणाचा रोंख असतो तो. ४ कोणेकावर जी क्रोधदृष्टि तो. ५ (वि०) निरंतर श्रम करीत असतां दमूंनये असा जो कोणेकाचे शरीरीं पराक्रम असतो तो, तशा पराक्रमानें युक्त शरीर किं० मनुष्यादि तो.

कटि (सं. स्त्री. ना.) देहाचा जो मध्यप्रदेश तो.

कटिरव (सं. कंठीरव) (ग्रं०) सिंह.

कटु (सं. वि०) कडू व तिखट रसानें युक्त तो. २ अप्रियभाषणादि तो.

**कट्टा** (पु. ना.) युद्धादि प्रसंगीं मनुष्यें इ० जीव तोडण्याचा व्यापार तो. २ (वि०) तरुण असून शरीरानें दृढ जो मनुष्यादि तो.

**कंठ** (सं. पु. ना.) हनवटी खालीं आणि खांद्याच्या वर जो शरीरावयव तो. २ त्यांतील जो ध्वनि तो.

**कठडा** (सं. काष्ठ)(पु. ना.) कटारा.

**कंठणें** (कष्ट) (धा. ना.) कांहींएक दुःख भोगून सारणें. २ सुख दुःख भोगीत भोगीत कांहीं काल काढणें. ३ गतीनें मार्ग अतिक्रांत करणें. |नवें.

**कंठसूत्र** (सं.न.ना.)मंगलसूत्र. २ जा-

**कंठस्नान** (सं. न. ना.) कंठपर्यंत जें स्नान तें. २शिरच्छेदास म्हणतात

**कठिन** (सं. वि०) ज्याचा भेद किं० छेद व्हायास बहुत प्रयत्न लागतो किं० अल्प प्रयत्नानें चेपत नाहीं तो. २ समजायास किं० करायास किं० व्हावयास अवघड जो ग्रंथ व्यवहार इ० तो. ३ ज्या हृदयाचा करुणादि रसानें द्रव होत नाहीं तें हृदय किं० तेणेंकरून युक्त पुरुष तो.

**कठीण** (वि०) कठिण.

**कठोर** (वि०) कठिन.

**कड** (स्त्री. ना.) कटि. २ वस्त्र, शेत इ० काच्या सभोंवताला जो अंतींचा प्रदेश तो. ३ कांणेक क्षेत्राचा आसमंतात् बहिःप्रदेश तो. ४ कांहींएक आरंभिलें कार्याचा शेवट तो.

**कडक** (वि०) ज्यांतील ओलेपणा अगदीं नाहींसा झाला तें धान्य, भाकरी इ० तो. २ ज्यामध्यें चिकणपणा कमी तें काष्ठ इ० तो. ३ सहन होण्यास कठीण जें उष्ण, तिखट, थंडी, भाषण इ० तो. ४ तापट जो स्वभाव किं० तसा मनुष्यादि तो. ५ (अव्य०) तडक.

**कडकडणें** (धा. ना.) वृक्ष इ० मोडतेसमयीं किं० वीज पडतेसमयीं कडकड असें वाजणें. २ तूप, तेल, पाणी इ० अतिशयित तापल्यामुळें शब्दयुक्त होणें.

**कडकडीत** (वि०) ज्या पदार्थांच्या भक्षणांत किं० हलविल्यानें कडकड असा शब्द होतो तो व कडक दाणा, कोरडे पोहे इ० पदार्थ तो. २ अति उष्ण उदकादिक तो. ३ चांगली वागते जी शास्त्रादि विद्या किं० तद्विशिष्ट जो विद्वान् तो. ४ भीडभाड न धरितां स्पष्ट जो भाषणादि व्यवहार तो व तशा स्वभावाचा पुरुष तो. ५ केवळ निरशन उपोषण किं० लोकापेक्षां अधिक आचार, सोंवळें, ओंवळें त्यास म्हणतात.

**कडकडून** (अव्य०) दृढपणें आलिंगणें, भेटणें इ० कांचें वि०. २ पुरत्या आवेशानें कोणेकाच्या अंगावर जाणें, चावणें इ० कांचें वि०.

**कडका** (पु. ना.) ऊन, थंडी यांचा अतिशय तो. २ (अव्य०) तडक.

**कडकावणें** (धा. ना.) कोणेकाच्या

शरीरावर चाबूक इ० कड शब्द होई असा बळकट मारणें. २ भय, भीड, संकोच इ० न धरितां मोठ्यानें स्पष्ट बोलणें,म्हणणें,इ०करणें.

**कडकी** (कडक) (स्त्री. ना.) उपदंशादि रोगामुळें किं० सोमल इ० उग्र औषध सेवनानें शरीरांतील सर्व धातु संतप्त व्हावयाजोगी जी उष्णता होते ती.

**कडवट** (वि०) किंचित् कडू.

**कडवसा** (पु. ना.) (ग्रं०) आधारी २ (स्त्री.) भिवई.

**कडस, कडसणी** (स्त्री. ना.) (ग्रं०) परीक्षा, चौकशी.

**कडा** (कड)(पु.ना.)पर्वताच्या धारेच्या खालीं जो नीट उभा प्रदेश तो.

**कडाका, खा** (पु. ना.) वाद्य, पठन, भजन इ० कांचा सतत चाललेला जो अतिशय तो. २ रोग कांहीं कर्म इ० कांचा सतत अतिशय प्रवृत्तपणा तो. ३ उष्ण, थंडी यांचा अतिशय तो. ४ चाबूक इ० कांचा फटकारा तो. ५ कचका.

**कडाड** (प्रा. वि०) (ग्रं०) जाणता. २ ताप पावलेला.

**कडाडगहींस** (वि०)(ग्रं०)पढतमूर्ख.

**कडाडणें** (कडाड) (धा. ना.) कडकडणें.

**कडासन** (सं. न. ना.) तपस्वी इ० कांचें व्याघ्रचर्मरूप आसन तें.

**कडियाळी** (प्रा. स्त्री. ना.) (ग्रं०) सांखळी. २ कटिलगाम. ३ माळ किं० हार.

**कंडी** (प्रा. स्त्री. ना.) बाजारबातमी किं० निर्मूळ जें कोणेकानें वर्तमान करून उठविलें तें.

**कडू** (सं. कटु) (वि०) निंब, कुटकी यांचे रुचीसारिखी जी रुचि किं० तद्विशिष्ट जो पदार्थ तो. २ जो शब्दादि विषय ज्यास रुचत नाहीं तो त्यास.

**कंडू** (सं. पु. स्त्री. ना.) खरूज इ० कानें अंग खाजवावें, घांसावें असे वाटायाजोगी विकृति, ती ती. २ युद्ध कलह इ० कांविषयीं उत्कट जी इच्छा ती. ३ त्यास कारण जी अंगांतील मस्ती तो.

**कडेकपाट** (कडा, कपाट) (न. ना.) पर्वतादिकांचा कडा किं० तेथील गुहा इ० दुर्गम दुर्लंघस्थान तें.

**कडेलोट** (कडा, लोटणें) (पु. ना.) ज्यास ठार मारायाचें त्यास पर्वताच्या कड्यावरून लोटून देण्याचा व्यापार तो. २ आपणच कोणी कड्यावरून घालून घेतात तो. ३ केवळ निकृष्ट पक्षांतील मनुष्य, गोष्ट इ० तो. ४ एकादे गोष्टीची पराकाष्ठा तो. [राश ती.

**कणकणी** (स्त्री. ना.) अल्प जी ज्व-

**कणखर** (प्रा. वि०) बहुत दिवस टिकायाजोगा घट्ट, बळकट पदार्थ तो

**कणणें** (धा. ना.) उसणीनें युक्त होणें. २ ज्वरादि व्यथेनें कुंथणें. [दया.

**कणव** (स्त्री. ना.) (ग्रं०) कृपा, कींव,

**कणवाळू** (वि०) (ग्रं०) दयाळू.

**कतरा** (अर० पु. ना.) मी सांगि-

तर्ली जी हकीगत ती खरी आहे, यांत कांहीं खोटें पडल्यास मी अपराधी इ० प्रतिज्ञायुक्त पंचाईतदार इ० कास वादी प्रतिवादी लेख देतात तो. २कबजंवनासही म्हणतात.

कतवार (न. ना.) बाजारबुणगें.

कत्तल (अर० स्त्री. ना.) युद्धादि प्रसंगीं जी पराकाष्ठेची तोडातोडी होते ती. २ मोहोरमचे दाहावे तारखेस फकीरलोक मिळून जें कर्म करितात तें.

कंथ (स. कांत) (प्र०) (पु. ना.) नवरा. [यार तें.

कथन (सं. न. ना.) कथण्याचा व्यापार.

कथा (सं. स्त्री. ना.) टाळ, विणा इ० घेऊन हरिदास जें कीर्तन करितो तो. २ कांहींएक वृत्तांताची गोष्ट किं० पुराणाचा अंश तो.

कंथा (सं. स्त्री. ना.) अनेक वस्त्रांचे ताकडे तुकडे एकत्र शिवून जाडें वस्त्र करितात तें.

कथानक (सं. न. ना.) कांहीं वृत्तांताची गोष्ट तें.

कद (पु. ना.) रेशमाचें वस्त्र आहे.

कंद (सं. पु. ना.) सुरण, अळूं, केळ इ०कांच्या मुळीं पिंडाकार जो अवयव असतो तो.

कदन (सं. न. ना.) सैन्यादिकांचा मारून तुडवून जो नाश तें.२ युद्ध.

कदन्न (सं. न. ना.) हरीक, राळा, इ० निकृष्ट धान्याचें अन्न तें.

कदंब (सं. पु. ना.) एक वृक्ष आहे. २ समुदाय.

कदबा (पु. ना.) कतबा.

कंदमूल, ळ (सं. न. ना.) अन्न नसतां खाण्याच्या उपयोगी जे कंद, मुळ्या इ० तें.

कदर (अर० स्त्री. ना.) चाकर इत्यादिकांचे अपराधादि दोष साहणें न साहणें एतद्विषयीं उपयुक्त धनी इ०कांची जी प्रकृति ती.

कंदरा (सं. स्त्री. ना.) गुहा.

कंदर्प (सं. पु. ना.) कामदेव. २ कोंडा.

कदर्य (सं. वि०) द्रव्य खरचण्यास ज्यास मृत्युप्राय दुःख होतें तो.

कदाचित् (स० अव्य०) कोणेक गोष्टीचे होण्याविषयीं किं० न होण्याविषयीं अनेक पक्ष निश्चित आहेत त्या त्या विरुद्ध होण्यास जो एखादा पक्ष त्या पक्षीं.

कदापि (स. अव्य०)कोणत्याही समयीं.

कदीम (अर० वि०) चिरकाल चालत आलेलें चाकरी, वतन, धर्म इ० तो.

कंदुक (सं. पु. ना.) चेंडू.

कद्रू (वि०) कदर्य.

कंधरा (सं. स्त्री. ना.) गळा.

कधीं (सं. कदा) (अव्य०) कोणत्या दिवशीं.

कधींच (अव्य०) ज्या कार्याच्या दिवसास अतिक्रमून फार दिवस झाले त्या समयीं.

कधींबिधीं, मधीं (अव्य०) मधलेमधले कांहीं दिवस वगळून कांहींकांहीं दिवशीं.

कर्दी (अव्य०) कदापि.

नक (सं. न. ना.) सोनें. २ धोतरा.
नवळा–वाळा (पु. ना.) दया.
नात (अर० स्त्री. ना.) डेरे, राहु-
ी इ० कां भोंवताला जो पडदा
उभा करीत असतात ती.
निष्ठ (सं. वि०) जो ज्यापेक्षां व-
यानें कमी तो. २ ज्यापेक्षां जो
गुणादिकानें कमी तो. ३ उत्तम
मध्यम कोटींतला नव्हे तो.
कन्यका (सं. स्त्री. ना.) कन्या.
कन्या (सं. स्त्री. ना.) स्त्रीरूप जे
मूल तें.
कंप (सं. पु. ना.) तरवारीचें पान
एकवार हलविलें असतां जसें ह-
लत राहातें तसें वायूनी विकृति
भय इ०कानें शरीरास किं० वा-
यूनें वृक्षादिकास जें चलन होतें तो.
कप (पु. ना.) सुरमाडाचे अंगास
पांढरा कापसासारिखा बुरा अस-
तो तो.
कपट (सं. न. ना.) पदार्थादिकाचे
वास्तविक स्वरूप मनात न येतां
अन्यथा रूपानें तो पदार्थ भासा-
यास कारण जी लबाडी तें. २ त्या
कपटानें अन्यथारूपानें भासू
लागला जो पदार्थादि त्यास म्ह-
णतात. ३ कृत्रिम भाव जो कोणे-
काविषयीं मनांत असतो तें.
कपटा (पु. ना.) कागद इ०कांचा
लहानसा तुकडा तो.
कपडा (पु. ना.) वस्त्र. [तो
कपडालत्ता (पु. ना.) वस्त्र, पात्र इ०
कपर्दिका, कपर्दीक (सं. कपर्दक)
(स्त्री. ना.) कवडीस म्हणतात.
कपा (पु. ना.) वटवा इ०कांस जें
पूड असतें तो. २ वस्त्राचा जो
तुकडा तो.
कपाट (सं. न. ना.) फळ्या इ०कांचें
द्वारास जें आच्छादन असतें तें.
कपार (स्त्री. ना.) खबदडी.
कपाल (सं. न. ना.) मस्तकाचें हा-
ड. २ मडक्याचे जे अनेक तुकडे
ते प्र०.
कपाळ (सं. कपाल) (न. ना.) भि-
वयांच्या वरला मस्तकापर्यंतचा
जो भाग तें. २ चांगलें वाईट
फळ भोगण्यास कारणभूत जो पूर्व
कर्मांचा परिपाक तें. ३ त्याचा लें-
ख जो कपाळी ब्रम्हदेव लिहितो तें.
कपाळकरंटा (वि०) दैवहीन.
कपाळकूट (स्त्री. ना.) मंदबुद्धीच्या
मनुष्यास कांहीं समजाविणें किं०
दुराग्रही जो मनुष्य त्यापासून
आग्रह सोडविण्याविषयीं उपदेशा-
दिरूप परिश्रम करावे लागतात
ती. २ दुसऱ्यास त्रास यावयाजो-
गें जें बहुत भाषण ती.
कपाळमोक्ष (पु. ना.) प्रेत जळत
असतां त्याचा मस्तक फुटण्याचा
व्यापार तो. २ आघातादिकामुळें
होतो त्यासही म्हणतात.
कपि (सं. पु. ना.) वानर. २ जो व-
यानें किं० कांहिं कामकाज करू-
न निभावल्यामुळें प्रौढ मनुष्यादि-
क त्यास थट्टेनें म्हणतात.
कपी (स्त्री. ना.) फुटलेल्या लाकडास

जो दुसऱ्या लांकडाचा तुकडा ब-
सवितात तो. २ गलबतावर मोठा-
लीं ओझीं ओढण्याचें मोटेच्या
चाकासारिखें यंत्र असतें तें.

कंपेश (पु. ना.) (फा०) न्यूनाधिक
भाव तो. [२ पारवा.

कपोत (सं. पु. ना.) एक पक्षी आहे.

कफ (सं. पु. ना.) शरीरांत वातादि
तीन दोष आहेत त्यांतील एक
२ कंठापासून मुखनासिकाद्वारानें
जो मलविशेष बाहेर पडतो तो.

कफणी (कफन) (स्त्री. ना.) कंठा-
पासून मस्तक, व कोपरापासून खा-
लीं हात मोकळे राहून इतर सर्व
आच्छादित होई असें वस्त्र शिवून
बैरागी इ० करितात ती.

कबज (अर० न. ना.) आपणास प्र-
संगीं प्रतिबंधक होई असें दुसऱ्या
पाशीं गुंतलें जें आपलें वचन, लेख
इ० तें. २ पावतीचा जो लेख तें.
३ सत्ता.

कबंध (सं. पु. न. ना.) मस्तक तुटून
गेलें असतांहि कांहीं चलनवलन-
युक्त जें धड असतें तें.

कबर (अर० स्त्री. ना.) मुसलमान
जेथें पुरला असतो त्या ठिकाणचें
थडगें ती.

कंबर (स्त्री. ना.) कमर.

कबाड (न. ना.) बैल इ० कांबर
आणिलें पैरणांचें ओझें तें.

कबुलात, लायत (अर० स्त्री. ना.)
ही गोष्ट मला मान्य आहे अशी
कोणेकाची वचनद्वारा किं० लेख-
द्वारा करून घेतात जी मान्यता ती

कबूल (अर० वि०) ही गोष्ट मला
मान्य आहे इ० असा जो मान्य
झाला तो. २ ज्याविषयीं मान्य
झाला तें कमांदिक तें.

कम (फा. वि०) उणा.

कमची (स्त्री. ना.) घोडे इ० कांस
मारण्याची बारीक छडी ती.

कमजास्त, जास्ती (फा० स्त्री. ना.
न्यूनाधिक भाव तें. २ (वि०
त्याणें युक्त तो. [भन तो, कमान

कमठा (पु. ना.) तीर सोडण्याचें सा-

कमंडलु (सं. पु. ना.) मृत्तिका, काष्ठ,
धातु इ०कांनीं केलेलें पाणी पिण्याचें
पात्र जें ब्रह्मचारी इ० बाळगितात
तें. [कमीपणा

कमती (वि०) कमी. २ (स्त्री. ना.)

कमनीय (सं. वि०) सुंदर.

कमर (फा० स्त्री. ना.) कटि.

कमल, ळ (सं. न. ना.) जलांत
उत्पन्न होतें असें एक पुष्प आहे.

कमला, ळा (सं. स्त्री. ना.) लक्ष्मी.

कमाई (स्त्री. ना.) कांहीं व्यापार के-
ल्यानें जी मिळकत होते ती.

कमाण, न (फा० स्त्री. ना.) कमठा.
२ त्या आकाराचा भित, अंगर-
खा इ० कास भरगच्च करितात ती.

कमाल (अर० न. ना.) गांव, देश
इ०कांची पाहाणी होऊन प्रति-
वर्षी चालण्याजोगी जी बेरीज
ठरली असते तें.

कमावणें (धा. ना.) कांहीं व्यवहारा-
नें द्रव्यादि मिळवणें. २ शेत इ०

कात ख्त घालणें, मळणें इ० व्यापारानें तें कोणेक कार्यास उपयुक्त होई असें करणे.

**कयाहीन** (सं काय, हीन)(वि०)शारीरकांति ज्याची केवळ वाईट तो.

**कर** (सं. पु. ना.) हस्त. २ प्रजेपासून संरक्षणनिमित्त राजा जें द्रव्य घेतो तो. ३नावेनें उतरणारे, देव दर्शनास जाणारे यांवर जे काहिं नियमित द्रव्य घेण्याचें कांहीं राजानीं आपआपल्या राज्यांत बसविलें असतें तो. ४ (सं.) सूर्यादिकांचे जे किरण ते. ५ (स्त्री. ना.) ग्रहण, संक्रांत होळी इ० दिवसांचा उत्तर दिवस तो. इ०.

**करक** (स्त्री. ना.) उसण, लचक.

**करकरीत** (वि०) केवळ नवा जो जोडा, वस्त्र अलंकार इ० तो. २ मृदुता नाहीं ह्मणून खालें असतां ज्याचा करकर शब्द होतो असें लेणवें काकडी इ० तो.

**करकोचा** (पु. ना.) काहिं मृदुपदार्थांवर दोरी इ० घट्ट बांधली असतां तिचा जो वण उमटतो तो. २ लांकूड इ०कास दोरी बांधण्यास त्यांचे पडावें ह्मणून जो तदाकार पाडिला असतो तो. ३ एक पक्षी आहे.

**करंटा** (वि०) दैवहीन.

**करंडणें** (धा. ना.) उंदीर, घोडा इ० कानी दातानीं वस्त्र इ० तोडणें.

**करडा** (वि०)जमीन पांढरी असून वर काळे किं० तांबडे ठिपके असतात असा जो घोड्याचा रंग तो व तशा रंगाचा घोडा तो. २ असडी तांदूळ तो. ३ दुसऱ्यास शिक्षा करण्याविषयीं तीक्ष्ण स्वभावाचा तो.

करडूं (न.ना.)शेळीचें लहान पोर तें.

**करढोक** (पु. ना.) एक पक्षी आहे.

**करणी** (करणें) (स्त्री. ना.) नवऱ्या मुलास लग्नामध्यें जें वस्त्रें, भूषणें इ०कांचें अर्पण तें. २ कोणेकावर जारण मारणादि प्रयोग तो. ३कांहीं कर्म करण्याचा व्यापार तो.

**करतलामल** (सं.करतलामलक)(पु. ना.) करतळावर घेतलेला आंवळा तो. २ ज्या विषयाचा यत्किंचित् अंशीही आपणास अज्ञान नाहीं असा जो मूर्तिमंत डोळ्यापुढें स्फुटरूप विद्यादि विषय तो.

**करदनकाळ** (सं. कृतांतकाल) (पु. ना.) सर्वांनीं भ्यावें असा क्रूर जो मनुष्य तो.

**करनकर, करी** (करणें, न करणें) (वि०) करायास सांगितलेलें न करणें, न करण्यास सांगितलेले करणें असा स्वभाव ज्याचा तो.

**करपणें** (धा. ना.) अन्नादिक बहुत अग्नि लागल्यामुळें आंतील तत्वांश जळून दग्धप्राय होणें. २ थंडी,उष्ण यांच्या कडक्यानें किं० अग्नीनें वृक्षादिक दग्धप्राय होणें. ३ अकस्मात् भय शोकादिक प्राप्त झाल्यामुळें केवळ म्लानपणा, निस्तेजपणा येई अशा दशेतें कोणी पावणें.

करभार (पु. ना.) मांडलिक राजापासून सार्वभौम जो कर घेतो तो.

करमणूक (करमणें) (स्त्री. ना.) क्रिडादि योगानें, सुखानें जो उद्योग तेणेंकरून कालातिक्रम तो. २ त्यास साधन जो उद्योगादि तो.

करमणें (सं. क्रम) (धा. ना.) सुखानें काल अतिक्रांत करणें.

करवत (सं. करपत्र) (पु. ना.) ज्यास दांत पाडिले असतात असें लांकडें इ० कापायाचें शस्त्र आहे.

करवा (पु. ना.) सोललेल्या ऊंसाचे लहान लहान खावयाजोगे तुकडे ते प्र०

कराकर (अव्य०) दांतखाणें, ऊंस चावण इ०कांचें विशेषण.

करामत (अर० स्त्री. ना.) एकाएकीं लोकांचे मनांत येऊं नये अशी अद्भुत कार्य करायाची किं० बहुत प्रयत्नानें करावयाचें कर्म अल्प प्रयत्नानें करायाची युक्ति ती.

करार (अर० पु. ना.) कोणेकानें कोणेकाशीं स्वकर्त्तव्य गोष्टीविषयीं केला जो निश्चय तो.

करारनामा (फा० पु० ना.) करारसंबंधी लेख तो.

करी (सं. पु. ना.) हत्ती.

करुणा (सं. स्त्री. ना.) दुसऱ्याचें दुःख पाहून जो अंतःकरणास द्रव येतो ती. [स्पर्श तो.

कर्कश (सं. वि०) कठोर जो शब्द,

कर्कशा (सं. स्त्री. ना.) कज्जा, भांडण इ० कांनीं संगतीच्या मनुष्यास त्रास देण्याचा स्वभाव जीचा ती.

कर्ज (अर० न. ना.) ऋण.

कर्जबाजारी (कर्ज, बाजार) (वि०) ज्यास बहुतांचें देणें आहे तो.

कर्जाऊ (कर्ज) (वि०) व्याजाच्या बोलीनें घेतलेलें द्रव्य ते.

कर्ण (सं. पु. ना.) शब्द ऐकणारें इंद्रिय तो किं० आकारविशेषरूप त्याचें स्थान तो.

कर्णधार (सं. पु. ना.) गलबतावर सुकाणु धरणारा मुख्य नाविक तो.

कर्णमात्रा (पु. ना.) (प्र०) कर्णभूषण जो कुडलें, चौकडा, बाळी, इ० तो.

कर्णिका (सं. स्त्री. ना.) कमल इ० पुष्पांचा केवळ मध्यभाग ती.

कर्णी (सं. स्त्री. ना.) गवंड्याचें एक औत आहे ती.

कर्णोपकर्णी (सं. कर्ण, उपकर्ण) (अव्य०) एकानें दुसऱ्यापासून दुसऱ्यानें तिसऱ्यापासून अशा परंपरेनें कांहीं वर्तमानादि श्रवण करणें त्याचें वि०.

कर्तब (न. ना.) गाण्यांतील डावपेंच.

कर्त्तव्य (सं. वि०) करायास उद्दिष्ट जो अर्थ तो.

कर्त्ता (सं. पु. ना.) कांहीं उद्योग किं० पदार्थ यातें करणारा तो. २ क्रियासिद्धीविषयीं स्वतंत्रत्वेंकरून जें कारक तो वाक्यार्थाच्याठायीं व्याकरणांत. ३ द्रव्यार्जनादिविशिष्ट पराक्रम ज्याचे अंगीं आहे तो.

**कर्दम** (सं. पु. ना.) चिखल. [आहे.
**कर्पूर** (सं. पु. ना.) एक सुगंधि द्रव्य
**कर्म** (सं. न. ना.) कर्त्याच्या व्यापारा-
च्या फलाचें आश्रयभूत जें कारक
तें वाक्यार्थाचे ठायीं व्याकरणांत.
२ कांहीं करण्याचा जो व्यापार तें.
३ स्नान, संध्या इ० ज्या शास्त्र-
विहित क्रिया तें. ४ शुभाशुभ भोग-
प्राप्तिविषयीं कारणभूत जें आपलें
पूर्वकृत् सदसत् आचरण तें.
**कर्मधर्मसंयोगानें** (अव्य०) प्रारब्ध
योगानें.
**कर्मनिष्ठ** (सं. वि०) स्नानसंध्यादि
कर्माविषयीं ज्याची निष्ठा असा
जो कर्मठ तो.
**कऱ्हें** (न. ना.) (ग्रं०) उंट.
**कल** (सं. पु. ना.) कोणेक पदार्थाचा
कोणेका पदार्थाकडे कलण्याचा जो
झोंक असतो तो. २ चित्तवृत्तीचा
रोख तो.
**कलंक** (सं. पु. ना.) ताम्रादि धातूं-
च्या अंगीं मळ असतो, जो पोटांत
गेला असतां वमन होतें तो.
२ कांहीं दुष्कर्मसंबंधानें अपकी-
र्तिरूप जो दोष प्राप्त होतो तो.
**कलकल** (सं. पु. स्त्री. ना.) अनेक
मनुष्यें, पक्षी यांचा अनेक शब्दां-
चा अतिशय तो ती.
**कलकलणें** (कलकल) (धा. ना.)
पित्तक्षोभ झाल्यामुळें किं० कलक-
लाटाचें श्रवण झाल्यामुळें मस्तक
दुखूं लागणें.
**कलकलाट** (कलकल) (पु. ना.) क-
लकलाचा अतिशय तो.
**कलंगी** (स्त्री. ना.) पागोट्यावर बां-
धायाचें रत्नखचित भूषण आहे
ती. २ पिच्छादिकांचा तुरा घो-
ड्याचे मस्तकावर बांधितात ती.
३ लावण्या गाणारांत जे दोन सं-
प्रदाय आहेत त्यांतील एक तो किं०
तिचें दर्शक चिन्ह डफावर ला-
वितात ती.
**कलणें** (कल) (धा. ना.) मध्यरात्र
मध्यान्हादि जे काल ते कांहींसे
अतिक्रांत होणें. २ मर्जी इ० कां-
नें कोणेक विषयाकडे कल पावणें.
३ कलंडणें.
**कलत्र** (सं. न. ना.) विवाहाची स्त्री.
**कलथणें** (कल) एक्या अंगावरून
दुसऱ्या अंगावर होई असा कोणे-
क पदार्थ उलटविणें.
**कलभंट** (पु. ना.) (ग्रं०) कलहावि-
षयीं शूर तो. [झगडा.
**कलंभा** (पु. ना.) (ग्रं०) भांडण,
**कलम** (सं. अ० अर०) (न. ना.)
राजकीयादि व्यवहार संबंधी ले-
खादि विषयाचीं जीं अनेक प्रक-
रणें असतात तीं प्रत्येकीं. २ वृ-
क्षांतर होण्यास भूमींत किं० दुस-
ऱ्या वृक्षावर लावितात वृक्षाची
खांदी तें. ३ चित्रें इ० लिहिण्यास
जी केशयुक्त काडी करितात तें.
४ लेखणी. ५ हात, पाय इ० कलम
करणें म्ह० छेदणें.
**कलमी** (फा० वि०) कलम लावून
केलेला जो आंबा इ० वृक्ष तो.

२ लेखादिकानें सप्रमाण जी बा-
तमी ती.

कलवड (प्रा. पु. ना.) शेण, माती इ० कांच्या लेपानें आच्छादित जो गोंवऱ्यांचा ढीग तो.

कलश (सं पु. ना.) पूजा इ० कां-साठीं पाणी घ्यावयाचें ताम्रादि पात्र तो.

कलह (सं. पु. ना.) भरेतुरे शिवी-गाळ इ० करण्याचा प्रकार तो.

कला (सं. स्त्री. ना.) युक्ति. २ गाणें, लिहिणें इ० कर्मे तीं प्रत्येकीं. ३ यंत्रादि रचनेंत जो कोणेक व्या-पार व्हावा अशी कर्त्याची इच्छा असत्ये म्हणून जो त्यांत कांहीं प्रकार विशेष ठेविला असतो ती. ४ त्या यंत्रादिकांपासून इच्छित फळ उ-त्पन्न होतें ती. ५ चंद्राचा सोळावा भाग ती. ६ मनुष्यादिकांवर कां-तिरूप शोभा दिसत्ये ती.

कलागत (कलह) (स्त्री. ना.)भांडण.

कलाबतू (पु. ना.) चांदी इ० कांचा ततु करून रेशमाचे तंतूस गुंडा-ळून जी तार करितात ती.

कलाल (अर० पु.ना.)मद्य विकणारा.

कलि (सं. पु. ना.) चार युगांतील चाललें जें युग तो.

कलियुग (सं. न. ना.) कलि.

कलुली (सं. कल्लोल) मस्तीनें घोडा ज्या अनेक प्रकारच्या उड्या मा-रणें इ० चेष्टा करितो ती.

कलुष (सं. न. ना.) पातक.

कलेवर (सं. न. ना.) मनुष्यादिकां-चें शरीर तें. [तो.

कल्प (सं. पु. ना.) ब्रह्मदेवाचा दिवस

कल्पक (सं. वि०) नव्या चमत्कारिक कल्पना ज्यास सुचतात तो.

कल्पतरु (सं. पु. ना.) जी इच्छा केली ती पुरविण्याचें सामर्थ्य ज्यास आहे असे स्वर्गादि लोकीं जे पा-रिजातादि वृक्ष आहेत ते प्रत्येकीं.

कल्पना (सं. स्त्री. ना.) कांहींएक गोष्ट करावी कीं न करावी अशा प्रकारचा जो अंत:करणांत वृत्ति-विशेष उठतो ती. २ तर्क. ३ कांहीं इष्ट कार्य सिद्ध होण्याविषयीं बुद्धी-नें योजिला जो उपाय तो. ४ कां-हींएक गोष्टीची अंत:करणानें के-ली रचना, योजना इ० ती.

कल्पवृक्ष (सं. पु. ना.) कल्पतरु.

कल्पांत (सं. पु. ना.) ब्रह्मदेवाच्या दिवसाचा अंतसमय तो. २आकांत.

कल्पिणें (प्रा. ना.) कांहींएक गोष्ट कल्पनाविषय करणें.

कल्पित (सं. वि०) कल्पिलेला.

कल्पितकादंबरी (सं. स्त्री. ना.) के-वळ निर्मूल गोष्ट जी मनानें र-चिली ती.

कल्मष (सं. न. ना.) पाप. २ अंत:-करणांत जो कुडाभाव तें.

कल्याण (सं. न. ना.) सुखरूपता.

कल्ला (पु. ना.) गालावर मिशाच्या संबंधाचा केसांचा झुबका राखि-तात तो. २ गलबला.

कल्लोल, ळ (सं. पु. ना.) उदकाची मोठी लहरी तो. २ अग्नीचा सवेग जो झोत तो.

कल्होळ (सं. कल्लोल) (पु. ना.) रडें, हाका मारणें इ०आकांत तो.

कव (प्रा. स्त्री. ना.) हस्ताग्रांशीं हस्ताग्र मिळवून मध्यें कांहीं पदार्थ धरायाकारितां जो पोकळ अवकाश राहातो तो.

कवच (सं. न. ना.) चिलखत, अंगरखा इ० शरीरास जें आच्छादन करितात तें. २ कांहीं पदार्थांचे अंगास लागून स्वतःसिद्ध आवरण असतें तें.

कंवटाल (न. ना.) जारण, मारण इ० जो प्रयोग कोणेकावर करितात तें. २ कोणिकास बुडविण्यास अनेक लबाड्या रचून सजलें जे लबाड, तुफान इ० तें.

कंवटाळणें (कव) (धा. ना.) कवेंत धरणें. २ वल्ली इ०कांनीं वृक्षादिकांस वेष्टणें.

कवडसा (पु. ना.) दीप, पात्रादिकांची छाया जी त्याच्या मागें पडते तो. २ गवाक्षादिकांतून सूर्यादिकांचे किरण आंत पडतात तो.

कवडी (स्त्री. ना.) समुद्रांतील एक जलजंतूच्या शरीरावरील हाड आहे, कचित् देशीं पैशाच्या चौसष्ट, ऐशीं अशा व्यवहारीं नाण्याप्रमाणें चालतात. २ थेंब दोन थेंब जमलेलें जें दहीं त्यास म्हणतात.

कवडीचामाल (वि०) किंमत पडायाजोगा ज्यामध्यें ऐवज नाहीं असा जो तुच्छ मनुष्यादि पदार्थ त्यास म्हणतात.

कवडीचुंबक (वि०) अतिलोभी तो.

कवन (सं. न. ना.) करण्याचा व्यापार तें. २ तेणेंकरून झाला जो ग्रंथ तें.

कवळणें (कव) (धा. ना.) कोटाळणें.

कवळी (स्त्री. ना.) वेगेंन मावायाजोगा जो पदार्थसमुदाय ती. २ दांतांची पंक्ति ती. ३ पांचशें किं० साडेपांचशें विड्याच्या पानांचा समुदाय ती.

कवाईत (अर० स्त्री. ना.) युद्धसमयीं शिपायी इ०कांनीं इच्छित संकेतानुरूप वर्तावें ह्मणून अभ्यासासाठीं जी पूर्वी शिक्षा शिकवितात ती. २ कांहीं काम करण्याची युक्ति ती.

कवाड (न.) कपाट.

कवि (सं. पु. ना.) रसालंकारयुक्त शब्दरचना करणारा तो. २ शुक्राचार्य. ३ ज्ञानी.

कवित्व (सं. न. ना.) कविता.

कविता (सं. स्त्री. ना.) कवन.

कविलास (पु. ना.) (ग्रं०) कैलास.

कव्हाळ (वि०) (ग्रं०) मोठा.

कशिदा (फा० पु. ना.) वस्त्रावर रेशीम इ० कांच्या तंतूनें जे वेलबुट काढितात तो.

कषाय (सं. पु. ना.) औषधें कुटून त्यांत पाणी घालून अग्नीवर ठेवून

जें अष्टमांशादिरूप पाणी राखितात तें.

**कष्ट** (स. पु. ना.) शेत इ० व्यवहारांत जो शारीर उद्योग तो. २ त्यापासून होतें शरीरास दुःख तें. ३ आधि, व्याधिरूप जो दुःसह भोग तो.

**कस** (सं. कषाय) (पु. ना.) अन्न इ० कांत जो सत्वांश असतो तो. २ सुवर्णादि धातूच्याठायीं रंगरूप जो गुण कसोटीनें कळतो तो.

**कसणी** (स्त्री. ना.) कठाळ, दिंड इ० कसायाची दोरी ती.

**कसणें** (कस) (धा. ना.) कठाळ इ० दोरीनें दृढ आवळणें २ सोनें इ० कसोटीवर घासणें. ३ कोणेकाचा चोरपणा, लबाडपणा इ० गुणांची परीक्षा व्हावी ह्मणून त्यास अनेक प्रकारच्या युक्तींनें छळून लोभवून पाहणें.

**कसपट** (न. ना.) तृणादिकांचा केवळ [लहान तुकडा त.

**कसब** (अर० न. ना.) गाणें, शिंपिणें इ० कला कि० त्याविषयीं अभ्यासेकरून अंगीं येतें सामर्थ्य तें २ उपजीविकेसाठीं अनेक पुरुष समागमरूप कर्म, जें कोणी स्त्री करिते तें. ३ आपण दुसऱ्यास कांहीं गोष्टींत भरावें कि० आपण दुसऱ्यास न सांपडावें ह्मणून जी लबाडीची युक्ति तें.

**कसबीण** (कसब) (स्त्री. ना.) व्यभिचार करून उदरनिर्वाह करणारी स्त्री ती.

**कसर** (अर० स्त्री. ना.) कांहीएक इष्टपदार्थांशीं बरोबर न होण्यास कारणभूत न्यूनाधिकभावरूप अंतर असतें तें. २ न्यूनाधिक अंश तोही. ३ कांहीएक अंश निःशेष न होतां त्याचा राहिला जो शेष अंश तो. ४ कणकणी. ५ ऊर्णावस्त्र, पोथी इ० कांस जी कीड लागते ती.

**कसरत** (अर० स्त्री. ना.) जोर काढणें, मुद्गल पेलणें इ० व्यापार ज्याच्या व्यापारानें शरीर स्वाधीन असतें ती.

**कसरता** (कसरणें) (अव्य०) इष्टदिशेशीं किंचित् वांकडा होई अशा प्रकारें.

**कसा** (पु. ना.) अंगरखा इ० कांचा बंद तो. २ रुपये ठेवायाकरितां हात दीड हात लांब आणि केवळ अरुंद जी पिशवी केली असते तो. ३ (वि०) कोणत्या प्रकारचा.

**कसाई** (पु. ना.) पशु मारून त्यांचें मांस विकून उपजीविका करणारा तो.

**कसाब** (अर० पु. ना.) कसाई.

**कसोटी** (स्त्री. ना.) सोनें इ० घासून पाहण्याचा दगड तो. २ हरएक गोष्टीची परीक्षा.

**कस्तूरी** (स. स्त्री. ना.) कोणेक मृगाचे नाभीपासून सुगंधि द्रव्य उत्पन्न होतें ती.

**कस्तूरीमृग** (स. पु. ना.) ज्याच्या नाभींत कस्तूरी उत्पन्न होते तो मृग.

**कहर** (अर० पु. ना.) कांहीएक पदार्थाचा किं० गोष्टीचा पराकाष्ठेचा अतिशय तो.

**कही** (स्त्री. ना.) लष्करास गवत, काष्टें इ० लुटून आणायाकरितां जो जातो आसमंताद्भागीं लष्करांतील मनुष्य समुदाय ती. २ त्या समुदायाचें तसें कर्म ती.

**कळ** (सं. कला) (स्त्री. ना.) यंत्र इ० कांतील त्याचा कांहीं व्यापार होण्याचा जो अवयव ती. २ तिडीक. ३ कलहासमूळ कांहीं कारण ती.

**कळँक** (पु. ना.) बांबू, वेळू. [ तो.

**कळकट** (वि०) किंचित् कळकलेला

**कळकटणें** (धा. ना.) भांडें इ० कळकादि मलानें मलीन होणें.

**कळकणें** (धा. ना.) आंबट पदार्थ तांबें इ०कांच्या कळंकानें युक्त होणें. २ ताम्रादिपात्र कळंकानें विटणें.

**कळकळ** (स्त्री. ना.) कांहींएक पदार्थ चांगला राहण्यासाठीं त्यास जपण्याविषयींचा अंतःकरणास वेध ती. २ दुसऱ्याचें दुःख पाहून अंतःकरणास जो द्रव येतो ती.

**कळप** (सं. कलाप) (पु. ना.) एक जातीय पशु, पक्षी इ०कांचा समुदाय तो.

**कळवंतिण, वांतिण** (सं. कलावती) (स्त्री०) गीत, नृत्यकलांनीं उपजीविका करणारी स्त्री ती.

**कळवळा** (पु. ना.) दुसऱ्याचें दुःख पाहून दयेनें किं० प्रेमानें अंतःकरणास द्रव येतो तो.

**कळवा** (पु. ना.) घोडें इ० मोकळें सोडलें असतां पळूं नये म्हणून त्याच्या पुढल्या व मागल्या पायांस मिळून जी दोरी बांधितात तो.

**कळस** (सं. कलश) (पु. ना.) देवालय, अंबारी, देव्हारा इ० यांचे शिखरावर शोभेसाठीं जो आकार कलशासारिखा करून लावितात तो. २ उत्तरोत्तर वृद्धि पावणारी जी कांहीं गोष्ट तिच्या वृद्धीचा परमावधि तो.

**कळा** (सं. अप. स्त्री. ना.) कला. २ मोठी कळी ती.

**कळाशी** (स्त्री. ना.) काष्ठादि दोन पदार्थांचा समजून न येण्याजोगा परस्पर संयोग ती.

**कळासणें** (धा. ना.) कळाशीनें युक्त करणें.

**कळासु, सू** (पु. ना.) (ग्रं०) चातुर्य.

**कळासूत्र, कळसूत्र** (न. ना.) बाहुल्यांनें अंगांत त्यांचे अवयव पाहिजेत तसे फिरावे म्हणून अनेक युक्तींनीं सूत्रें बांधिलीं असतात तें.

**कळिकटा** (वि०) (ग्रं०) निमित्तभूत. २ भांडखोर.

**कळी** (स्त्री. ना.) कलिका. २ बुंदी म्हणून पक्वान्न आहे त्याचा जो एकेक दाणा ती. ३ चुन्याचे उपयोगी बारीक जे खडे असतात ते प्रत्येकीं. ४ अंगरख्याच्या घेरास त्रिकोणाकार जे तुकडे असतात ते प्रत्येकीं. ५ (ग्रं०) कलियुग.

**कक्षा** (सं. स्त्री. ना.) चंद्र, सूर्य,

नक्षत्रें इ०कांचा एकावर एक जी संचारस्थानें आहेत तीं प्रत्येकीं. २ वादी प्रतिवादी यांच्या एकमेकांवर होतात त्या पूर्वपक्षादि कोटि त्या. [अथवा.

का (अव्य०) काय. २ (प्र०) किंवा,

कां (अव्य०) कशाकरितां. २ (प्र०) किंवा.

काई (अव्य०) काय.

काईम (अर. वि०) ठोकलेला, पुरलेला असा न हलणारा जोगा पदार्थ तो.

काईल ( अर० वि० ) वादादिकांत उत्तराविषयीं कुंठित झाला तो. २ (स्त्री. ना.) उसाचा रस कढवून गूळ करण्याची कढई ती.

काउटी (स्त्री. ना.) (प्र०) महत्त्व.

काउरें (न. ना.)(प्र०) वेड.

काक (सं. पु. ना.) कावळा. [उा

कांकड—कांकर (पु. ना.)(प्र०) ख-

कांकडणें (धा. ना.) हात, पाय इ० अवयव थंडीनें संकुचित होणें.

काकपद (स. न. ना.) ओळीस चुकलेलें अक्षरादिक बाहेर लिहून जेथें चुकलें तेथें कावळ्याच्या पायासारिखी खुण करितात तें.

काकवी (स्त्री. ना.) उसाचा रस कढवून गूळ न होऊं देतां मध्यामाणें जो पातळ राबा राखितात तो.

काकळूत (स्त्री. ना.) करुणा भाकण्याचा व्यापार. २ कोणाचें दैन्यादि पाहून मनांत येणें करुणा ती.

कांकीं (अव्य०) कशास्तव म्हणाल तर.

कांकूं (न. ना.) नाहीं कि० होय याचा निश्चय न होतां अंतःकरणांत उभयात्मक व्यापार होतो तें. उ० मी बोललों त्याविषयीं स्पष्ट काय तें सांगा कांकूं करूं नका. [आहे.

काकोळ (न. ना ) (प्र०) एक विष

काकर्थ (स. काकु, अर्थ) (पु. ना )

स्वरभेदेंकरून विरुद्धार्थ कल्पनाबोधक जो वाक्याचा अर्थ तो.

काग (पु. ना.) काक.

कागडा (सं. काक) (वि०) कावळ्याच्या दृष्टीसारखी चंचळ दृष्टि ज्याची असा जो मनुष्य तो.

कागद (फा० पु ना ) वेळू, ताग इ० कुटून लिहिण्याच्या उपयोगी करितात पत्र तें.

कांगावें (न. ना.) कांगावें.

कागाळी (स्त्री. ना.) गार्‍हाणें.

कांघावें (न. ना )थोडें दुःख असतां रडून ओरडून अधिक दाखविण्याचा प्रकार तें. [जात.

काच (स. पु ना. ) कांच. २ (गा )

कांच (स.काच)(स्त्री.)गारांचा राबा ज्याचे आरसे इ० करितात तें.

कांचकुयरी (स्त्री. ना.) एक औषधी आहे. [पुष्पवृक्ष आहे

कांचन (स. न. ना.) सोनें. २ एक

काचय (वि०) (प्र०) मित्र, अधीर.

काचरी (स्त्री. ना.) वसरी.

कांचोळी (स. कंचुकी) (स्त्री. ना.) जिचे बंद मागें असतात अशी चोळी ती.

काज (सं. अप. न ना.) (ग्रं०) कार्य.

काजवा (पु. ना.) एक क्षुद्रजंतु आहे जो रात्रीं नक्षत्रासारिखा चकाकतो.

काजळ (सं. कज्जल) (न. ना.) दिवा इ०कावर जी मस जमते तें.

कांजी (सं. स्त्री. ना.) भाताची अंबविलेली पेज ती.

काट (पु. ना.) चातुर्य. २ वस्त्र इ० कावर जमलेला मळाचा लेप तो. ३ कृपणपणा.

काटक (पु. ना.) रामोशासारिखी एक जाती आहे. २ केवळ जो निर्दय मनुष्य त्यास म्हणतात.

काटकसर (स्त्री. ना.) व्यापारादिकांत निर्घेळ नितकी युक्तीनें द्रव्यादिकांची कसर काढण्याचा व्यापार ती.

कांटा (स. कंटक) बाभळ इ०कांचा दाभणासारिखा अवयव तो. २ अंगावर रोमांच येतो तो. ३ तंजवा इ०कांचे दांडीचे मध्यभागी अवयव असतो तो. ४ किंचित् हीव येतें तें. ५ कुलपांत निबंध लागण्या जोगा अवयव असतो तो. ६ दुष्ट जो मनुष्य तो. ७ कंवर, मान इ०चेत काही अवयव असतो तो इ०.

काटाकाट (स्त्री. ना.) कांहीं व्यवहार इ० थोडक्यांत व्हावा म्हणून मळ खर्चाहून अवांतर खर्च थोडथोडे कमी करण्याचा व्यापार ती.

कांटाळा (पु. ना.) (ग्रं०) तजवा. २ बरोबरी, उपमा.

काठी (सं. काष्ठ) वेळू इ० कांचा चार, पांच हात लांबीचा तुकडा ती. २ पांच हात व पांच मुठी लांब भूमि मोजण्याचें प्रमाण ती. ३ शरीरास आधारभूत जो आंतील अस्थिपंजर त्यास म्हणतात.

काडी (स्त्री. ना.) गवत इ० कांचा जो लहान तुकडा तो. २ काडी मोडून देणें म्ह० शूद्रादिकांत नवरा व बायको अशा प्रकारें झालेला संबंध तो काडी मोडून देऊन नाहींसा करणें.

काडीमात्र (वि०) किंचित्मात्र.

कांडुळणें (धा. ना.) खाजविणें.

कांडें (सं. कांड) (न. ना.) वेळू, ऊस इ० कांचें पेर तें. २ (ग्रं०) बाण, तीर.

काढणी (स्त्री. ना.) सूत, रेशीम इ० वांनी अनेक पदरी दोरी ती. २ हरभरा, गहूं इ० कांस शेतांतून उपटून काढण्याचा व्यापार ती.

काढणें (धा. ना.) कांहींएक पदार्थ आधारापासून वियुक्त करणें. २ लेखनादिद्वारा चित्र, अक्षर इ० भिंत, कागद इ० कांवर निर्मिणें. ३ वस्त्र इ० विणून उत्पन्न करणें. इ० अनेक अर्थ आहेत.

काढा (सं. अप. पु. ना.) कषाय. २ व्याजाचे जागीं जें धान्य कबूल करितात तो. ३ माळवें विकत घेतलें असतां घेलीच्या बाहेर जें वांगीवर मागून घेतात तो.

काढाऊ (वि०) काढीव.

**काढींव** (काढणें) (वि०) आपणास पाहिजे तसा बेत सांगून विणविलें जें वस्त्रादि तें.

**काढू** (काढणें) (वि०) दुसऱ्यापासून आर्जवादि अनेक युक्तींनीं द्रव्यादि काढण्याचा ज्याचा स्वभाव तो.

**काणी** (स्त्री. ना.) (ग्र०) क्लेश.

**काणोसें** (वि०) (ग्र०) वांकडें.

**कांत** (स्त्री. ना.) सर्पादिकांचे अंगावरील त्वचा निघते ती. [सुंदर.

**कांत** (स. पु. ना.) नवरा. २ (वि०)

**कातणें** (धा. ना.) (ग्रं०) रथ इ० कांस घोडे इ० जुपणें.

**कांतणें** (स. कर्त्तन) (धा. ना.) काष्ठ इ० चरकास लावून शस्त्रानें पाहिजे तसें करणें. २ चातीं, राहाट इ० कांच्या योगानें सूत निर्माण करणें. ३ (न. ना.) करजीचे प काम करण्याचे एक औत आहे.

**कातळ** (पु. न. ना.) स्तत. सिद्ध जी दगडाची भूमि तो ते.

**कानळा** (पु. ना.) केळें इ० कांचा वर्तुळ, पातळ तुकडा तो.

**कांता** (स. स्त्री. ना.) सुंदर स्त्री २ ज्याबरोबर जिचा विवाह झाला आहे ती त्याची.

**कांतार** (स. न. ना.) अरण्य.

**कांति** (स. स्त्री ना.) पदार्थमात्राच्या अंगचें तेज ती.

**कांतिया** (पु. ना.) (ग्र०) कोयता.

**काथा, काथ्या** (पु. ना.) नारळाचे सालपटांत जे तंतु असतात त्यांचा समुदाय किं० त्याची दोरी तो.

**काथाकूट** (काथा, कुटणें) अप्रयोजक वाग्व्यापार करीत बसण्याचा व्यापार तो.

**कादंबरी** (स. स्त्री. ना.) कल्पित कथा रचून केलेलें काव्य ती.

**कान** (स. अप. पु ना.) कर्ण. २ कान किटणें म्ह० कांहीएक गोष्ट अनेक वेळ ऐकिल्यामुळें कटाळा येणें. ३ कांहीएक गोष्ट कानावर घालणें म्ह० श्रुत करणें. ४ कान देणें म्ह० कांहीं गोष्ट ऐकण्याविषयीं अवधान देणें इ० अनेक अर्थ आहेत.

**कानकळाशी** (स्त्री. ना.) पशूचे कान इ० अवयवांची ठेवण ती. [वाणा.

**कानकोंडा** (वि०) संकुचित, लाजिर-

**कानकोडें** (कान, कोंडणें) (वि०) दुसऱ्यास नकळे असें गुप्त किं० चोरीचें कर्म तें.

**कानठळी** (कान, टाळें) (स्त्री. ना.) शैत्यादि विकृतीनें किं० मोठा नाद श्रवण झाल्यामुळें कर्णेंद्रिय बधिरप्राय होणें किं० बधिरता जाणें याचा प्रयोग बसणें, उघडणें याच्या योगीं.

**कानडें** (वि०) (ग्र०) दुर्बोध

**कानन** (स. न. ना.) अरण्य.

**कानवडा** (वि०) कुशीवर निजलेला अ० पडलेला तो.

**कानवसा** (पु. ना.) दूरचा शब्द एकाग्रतेनें कान देऊन ऐकण्याचा व्यापार तो. [गालावरील प्रदेश ते.

**कानशील** (न. ना.) कानाचे पुढचा

कानस (स्त्री. पु. ना.) लोहादिक घा-
सून साफ करण्याचें निख्याचें एक
औत आहे.

कानाडी (स्त्री. ना.) बाण सोडायाचे
वेळेस कर्णापर्यंत मनस्वी ताणून
ओढिली जी धनुष्याची दोरी ती.

कानाडोळा (पु. ना.) प्रयत्न करण्या-
चे प्रसंगीं जो उदासीनपणा तो.
२ कांहीं गोष्टीविषयीं ऐकलें न ऐक-
लें करण्याचा प्रकार तो.

कानी (स्त्री. ना.) (ग्रं०) काहाडणी.

कानीन (सं. पु. स्त्री. ना.) विवाहापूर्वीं
कन्यकापणांत झालेलें मूल तो ती.

कानू (अर० स्त्री. ना.) राजा, वतन-
दार इ० कांहीं प्रजादिकांनीं अ-
सा कर द्यावा, या या प्रकारें व-
र्तावें असा जो वर्तणुकेचा नियम
ठरला असतो ती.

कांप (सं. अप. पु. ना.) कंप.

कापट्य (सं. न. ना.) कपटीपणा.

कापड (सं. कर्पट) (न. ना.) वस्त्र.

कापडी (कापड) (वि०) कापडाचा
केलेला पदार्थ तो. २ (पु. ना.)
खांद्यावर कावड घेऊन तीर्थयात्रा
करीत फिरतो तो.

काफर (अर० वि०) हरामी.

काफरी (अर० पु. ना.) शिद्दी लो-
कांस म्हणतात.

काफला (अर० पु. ना.) दूर देशीं-
च्या यात्रेस निघतो जो हजारों
लोकांचा समुदाय तो.

काफी (पु. ना.) बुंद म्हणून दाणा
आहे तो; ज्याचें पाणी चाहासारिखें
पितात.

कांब (स्त्री. ना.) वेळू इ० कांचा उभा
चिरलेला तुकडा ती. २ कोंपरापा-
सून मणगटापर्यंत जें हाड ती.
३ धातूचा तुकडा ती.

कांबळा (सं. कंबल) (पु. ना.) दोन
घोंगड्या एकत्र शिवून जें विशेष
वस्त्र करितात तो.

काबाडी (वि०) कबाड वाहणारा तो.
२ ज्याला कुशळतेचें नाजूक काम
करितां येत नाहीं तो. [दंड ती.

कांबी (स्त्री. ना.) (ग्रं०) धनुष्याचा

काबीज (अर० वि०) पराक्रमानें स्व-
सत्तेंत आणिलेला देश इ० तो.

काबील (अर० वि०) प्रवीण. २ का-
बीज.

काबू (अर० वि०) अनेक युक्तींनीं
कांहीं काम करून घेण्याविषयीं जो
कुशल तो.

काम (सं. पु. ना.) मदन देव. २ मैथु-
नेच्छा. ३ साधारण पदार्थमात्रा-
ची इच्छा तो. ४ प्रयोजन अ०
कारण. ५ कर्म इ०. [काम तें.

कामकाज (न. ना.) लहान मोठें

कामगार (पु. ना.) कांहीं कारखान्या-
वर खपायास ठेविलेला मनुष्य तो.

कामठ, ठा (स्त्री. ना.) (ग्रं०) दुकान.
२ टांकसाळ. [कुर्ली

कामथाडोळ (पु. ना.) (ग्रं०) अंड-

कामधेनु (सं. स्त्री. ना.) इच्छिला
पदार्थ देणारी अशी पुराणप्रसिद्ध
गाय आहे ती. २ साधारण गा-

यांस प्रशंसासमयीं ह्मणतात. ३ भिक्षा मागण्याचे झोळीस संकेतानें ह्मणतात.

कामना (सं. स्त्री. ना.) इच्छा.

कामातुर (सं. वि०) मैथुनेच्छेनें विव्हळ झाला तो.

कामारें (न. ना.)(ग्रं०)वा.

कामिना (कामिनी)(स्त्री. ना.)(ग्रं०)

कामिनी (सं. स्त्री. ना.) स्त्री.

कामुक (सं. वि०) ज्यास मैथुनेच्छा किं० साधारण कांहीं विषयाची इच्छा आहे तो. [सर्वनाम आहे.

काय (सं. पु. ना.) देह. २ प्रश्नार्थक

कायटी (स्त्री. ना.) (ग्रं०) घालमेल.

कायदा (अर० पु. ना.) असें असें वागावें; अन्यथा वागू नये असा जो कांहीं नियम बांधिला असतो तो.

कायम (वि०) काइम.

काया (सं. स्त्री. ना.) शरीर.

कारकीर्द (फा० स्त्री. ना.) राज्य इ० व्यवहारांवर कोणिक कार्यांचें जें चालन असतें कांहींकाल कर्तृत्व तो.

कारकून (फा० पु. ना.) राज्य, सावकारी इ० यांचे लेखांत कुशल तो.

कारखाना (फा० पु. ना.) ज्याचे पोटीं अंगभूत कामें अनेक असतात असा जो शेतकी इ० व्यापार तो २ त्यास साधनभूत पदार्थांचा समुदाय तो.

कारंजें (न. ना.) शोभेसाठीं पाणी उंच उडविण्याचें यंत्र करीत असतात तें.

कारण (सं. न. ना.) निमित्त, हेतु प्रयोजन.

कारणदेह (सं. पु. ना.) (ग्रं०) अविद्या, अज्ञान.

कारभार (सं.-कार्य, भार) (पु. ना.) कांहीं एक कार्याचा अंगावर भार घेऊन त्याची खटपट करणें तो.

कारस्थान (सं. कार्य, स्थान) (न. ना.) कांहीं मोठें कार्य सिद्ध करण्याविषयीं गुप्त युक्तीनें बांधिलें जें संधान तें.

कारा (सं. स्त्री. ना.) कारागृह.

कारागीर (फा० पु. ना.) कारिगर.

कारागृह (सं. न. ना.) बंदीशाळा.

कारिगर (फा० पु. ना.) शिल्प काम करणारा तो.

कारु (सं. पु. ना.) शिल्पविद्येवर निर्वाह करणारे सुतार, सोनार, लोहार इ० तो. २ बलुतेदार जे महार, चांभार इ० ते प्र०.

कारुण्य (सं. न. ना.) करुणा.

कार्मुक (सं. न. ना.) धनुष्य.

कार्य (सं. न. ना.) कांहीं काम तें. २ करावयाचा पदार्थादि तो.

कार्यप्रयोजन (सं. न. ना.) विवाह इ० कार्य तें.

कार्यवादी, वादू (वि०) कोणाकडून आपलें कार्य साधावयाचें आर्जव करणें गोड बोलणें इ० प्रसंगानुरूप वर्ततो तो.

कार्यसाधक (सं. वि०) इष्टकार्याविषयीं जो साधक तो. २ कार्यवादू.

कार्याकारण (वि०) आवश्यक कार्याचे निरोधपुरता तो.

काल (सं. पु. ना.) भूत, भविष्य, वर्तमान समय तो. २ ज्याचें भाग पळ, घटिका इ० केंकरून होतें तो. ३ मृत्यु किं० ज्यापासून होतो प्राण व शरीर याचा वियोग तो. ४ समय. ५ मरणादि सभावना ज्यापासून आहे असा सर्वांविक तो. ६ (वि०) काळा.

कालक्रमण (सं. न. ना.) काळ घालविण्याचा व्यापार तें. [मण

कालक्रमणा (सं. स्त्री. ना.) कालक्र-

कालगुजारा (सं. काल, गुजारा) (पु. ना.) विषमकाळीं कसातरी निर्वाह तो.

कालवणें (धा. ना.) कांहीं पदार्थामध्यें दुसरा पदार्थ घालून सारखा करणें. २ पोटांत कालवणें इ० पित्तादिकांमुळें ढवळल्यासारखी विकृति होणें इ०.

कालवा (सं. कुल्या) (पु. ना.) नदी इ०कांचें पाणी अन्यत्र नेण्याकरितां खणून जो मार्ग करितात तो

कालक्षेप (सं. पु. ना.) कालाचा अतिक्रम.

काला (कालवणें) (पु. ना.) भाकरी इ० कुसकरून आंत ताक इत्यादि घालून कालवून जो गोळा करितात. तो २ दहींकाला.

कालिमा (सं. स्त्री. ना.) काळेपणा २ कांहीं दोषामुळें कुलास कलंक लागतो तो.

कालाबूल, भूल (स्त्री. ना.) (ग्रं०) बाराशिंगा.

काल्पनिक (सं. वि०) कल्पनेनेंच रचलेली कांहीएक गोष्ट ती.

काव (स्त्री. ना.) तांबडे मातीचा एक भेद आहे. २ (पु.) (ग्रं०) त्रास, कंटाळा.

कावकाव (स्त्री. ना.) कावळ्याच्या कलकलाटाचें अनुकरण. २ कर्जदार, याचक इ० कांचा त्रास यावयाजोगा याशा इ०रूप अनेकांचा एकवार जो शब्द तो.

कावणें (धा. ना.) काव्हणें.

कावर (स्त्री. न.) पाचर. २ (ग्रं०) गुदस्थानीं टांच देतात ह्या कर्मास योगमार्गांत म्ह०.

कावराबावरा (वि०) अकस्मात् क्रोधाचे किं० भयाचे आवेशानें मुद्रा फिरून कर्तव्याकर्तव्य विचार ज्याचा नाहींसा झाला तो.

कांवरें (न. ना.) काविरें.

कावल (न. ना.) फार जुनें झालेलें किं० नवें असून फार पातळ असें जें धातूचें भांडें तें.

कावा (पु. ना.) कारस्थान. [वेडगळ.

काविरें (न. ना.) (ग्रं०) वेड. २ (वि०)

काव्य (सं. न. ना.) गद्यरूप किं० पद्यरूप ग्रंथ तें. २ (पु०) शुक्राचार्य.

काव्हणें (धा. ना.) घाबरणें, त्रासणें.

काशी (सं. स्त्री. ना.) एक मोठें पुण्य क्षेत्र आहे.

काशीकर (पु. ना.) काशीची यात्रा ज्यानें केली तो. २ काशींतील राहणारा तो. ३ पक्का जो धूर्त त्यास म्हणतात. [चपळता.

काश्मिरी (स्त्री. ना.)(ग्रं०) वाणीची

काष्ठ (सं. न. ना.) लाकूड.

कास (स्त्री. ना.) (ग्रं०) कासोटा. २ कटिप्रदेश. ३ गाय, म्हैस इ० कांची ओटी. ४ कुरण. ५ (सं पु.) खोकला. [जुंपण्याची दोरी

कासरा (पु. ना.) असूड. २ बैल

कासावीस (वि०) व्याकूळ.

कांसाळ (स्त्री. ना.) नौबत इ०कांबरोबर वाजविण्याची मोठी झांज ती.

काहणी (स्त्री. ना.) कथा, गोष्ट. २ (ग्रं०) फोल.

काहली, काहिली (स्त्री. ना.) ज्वरानें किं० कांहीं उष्ण औषध सेविल्यामुळें जी अंगाची आग होते ती.

कांहींबाहीं (वि०) थोडें बहुत.

कांहींचेबाहीं (अव्य०) मनांत आणिलेला जो कांहींएक अर्थाचा परिणामादिक त्याशीं केवळ विपरीत होई अशा प्रकारें.

काहूर (न. ना.) निबिड जो अंधार तें. २ मेघ वारा यांची गर्दी तें.

काळ (सं. अप. पु. ना.) काल.

काळजी (काळीज) (स्त्री. ना.) कोणेक गोष्ट कशी होईल, काय होईल किं० कशी झाली असेल इ० रूप जी अंतःकरणास व्यथा ती.

काळनिद्रा (स्त्री. ना.) संकेतानें मृत्यूस म्हणतात.

काळमांजर (न. ना.) ऊद म्हणून जनावर आहे तें.

काळवखें (न. ना.) (ग्रं०) अंधारें.

काळवीट (पु. ना.) काळे पाठीचा हरिण तो.

काळसर (वि०) किंचित् काळा.

काळसांवळा (काळा,सांवळा) (वि०) केवळ काळा नव्हे व केवळ गोरा नव्हे असा जो मनुष्य तो.

काळा (वि०)काजळाचे रंगासारिखा जो रंग तो. २ तशा रंगानें युक्त तो. ३ विष्णूस संकेतानें ह्मणतात.

काळाकिट्ट, कुट्ट (वि०) अतिशयित काळा तो.

काळाकुळकुळीत (वि०) काळाकिट्ट.

काळीज (न. ना.) पोटांत उराकडील प्रदेशीं एक अवयव आहे तें.

काळें (न. ना.) कांहीं दोषामुळें कुळास कलंक लागतो तें.

काळोख (पु. ना.) अंधकार.

काळोखी (स्त्री. ना.)अंधारी. २ पित्तादिकांमुळें डोळ्यांपुढें अंधारी येते ती. ३ कांहीं दोषामुळें कुळास कलंक लागतो ती.

काळ्याडोईचेंमनुष्य (न. ना.) मनुष्य, परंतु इतर जीवांपेक्षां अद्भुत शक्ति वर्णायाची असतां प्रयोग.

कांक्षा (सं. स्त्री. ना.) कांहींएक अर्थ किं० गोष्ट साधारण रीतीनें ज्या प्रकारची दिसते तिशीं विरुद्ध

जी संभावना ती. २ इच्छा.

किंक (स्त्री. ना.) भय इ० कामुळें बारीक उंच गळ्यानें आरोळी ती

किंकर (सं. पु. ना.) सेवक.

किंकळी, काळी (स्त्री. ना.) किंकळण्याचा शब्द ती.

किंकिणी (सं. स्त्री. ना.) क्षुद्र घंटिका.

किचकिचणें (धा. ना) वानरानें दांत चावून किं० पिंगळ्यानें शब्द करणें.

किचबिडीत, जबिडीत (वि०) वाचायास अवघड पडायाजोगें, वांकडें तिकडें एकांत एक लिहिलेलें अक्षरादिक तें. [आहे तो.

किंचिज्ज्ञ (सं. वि०) अल्प ज्ञान ज्यास

किजबीड (वि०) किजबिडीत.

किटण (सं. किट्ट) (न. ना.) गुरगुडीची नळी, शरीर, वस्त्र इ० कावर जो चिकटला असतो मळ तो.

किटणें (किटण) (धा. ना.) शरीर इ० मळानें लिप्त होणें. २ इंद्रियांस कांहीं विषयाचा अतिशय संस्कार झाल्यामुळें त्यांनीं कंटाळणें.

किडाळ (वि०) (ग्रं०) डांकलग. २ खोटें.

किडूकमिडूक (न.ना.) खिडूकमिडूक.

किण (सं. पु. ना.) शरीर इ० कांवर दोरी इ० चिरकाळ घसवटल्यामुळें जें चिन्ह पडतें तो.

कितका (सं. कियत्परिमित) (वि०) कोणत्या प्रमाणानें परिमित.

कितान (अर० न. ना.) तागाचें वस्त्र आहे.

किताब (अर० पु. ना.) कोणी कांहीं लोकोत्तर कर्म केलें असतां त्यास राजे इ० संतुष्ट होऊन प्रशंसार्थ जें नाम देतात तो. २ पुस्तक.

किंतु (सं. पु. ना.) संशय. २ कांक्षा.

कित्ता (पु. ना.) अक्षराचें वळण लागण्याकरितां वळविण्यासाठीं वळणशुद्ध अक्षराचा कागद घेतात तो. २ ज्या संप्रदायादिकांची आपणास शिक्षा घेण्याची विवक्षा आहे तो संप्रदायादिक. [बुटीचें वस्त्र तो.

किनखाप (फा० पु. ना.) जरीच्या

किनरी (सं. किन्नर) (स्त्री. ना.) बारीक उंच जो कंठांतून ध्वनि काढितात ती. २ एक तंतुवाद्य आहे ती.

किंनिमित्त (सं. अव्य०) किमर्थ.

किफायत (फा० स्त्री. ना.) लाभ.

किमपी (सं. अव्य०) ईषन्मात्रही.

किमया (फा० पु. स्त्री. ना.) तांबें इ० धातूंचें औषधीं इ० कानीं सोनें इ० व्हावयाची विद्या ती तो. २ ज्या पदार्थांपासून किं० व्यापारापासून निरंतर लाभ होतो त्यास म्हणतात.

किमयागर, गार (वि०) किमयेची विद्या जाणतो तो.

किमर्थ (सं० अव्य०) कशासाठीं.

किमानपक्ष (सं. अव्य०) केवळ शेवटील जो पक्ष त्यास आश्रयून.

किंमत (अर० स्त्री. ना.) कांहीं पदार्थ विकत घेतला असतां त्यास जें द्रव्य द्यावे लागतें ती. २ योग्यताविशेष.

किरकणें (धा. ना.) हत्ती इ० कानें किकाळणें. २ पोर, याचक इ० कानीं त्रास यावयाजोगें आरडणें.

किरकिर (स्त्री. ना.) कटकट.

किरकोळ (वि०) कृश. २ एक ठोक नव्हे जो धान्य, द्रव्य इ० पदार्थ तो.

किरटा (वि०) विशोभित दिसाया-जोगें बारीक रेघाचें अक्षर इ० तो. २ कृपण.

किरण (सं. पु. ना.) सूर्य, चंद्र इ० तेजस्वी पदार्थापासून पसरले-ला जो प्रकाश दिसतो तो.

किरमीज (सं. कृमिज) (न. ना.) कृमीपासून होणारा रंग तें.

किराग (न. ना.) (ग्रं०) उड्डान.

किराणा (पु. ना.) लवंग, जायफळ, पत्री इ० पदार्थ तो.

किरीट (सं. पु. ना.) राजे इ० कां-चा मुकुट तो.

किर्र (वि०) ज्यामध्यें बांबू इ० वृक्षां-चे अनेक प्रकारचे शब्द होतात व अत्यंत निबिड वृक्ष ज्यांत आहे-त असें अरण्य तें.

किलकिलाट (पु. ना.) चिमण्या, मैना इ०कांचे शब्दांचा अतिशय तो.

किलाण (न. ना.) उड्डान.

किल्ला (अर० पु. ना.) भोंवताला चर, तट, बुरूज इ० करून श-त्रु इ०कांस दुर्गम असें राहावया-साठीं स्थळ करितात तो.

किल्ली (सं. कील) (स्त्री. ना.) कुलूप लावायाचें किं० काढायाचें यंत्र आहे तो. २ हिशेब, श्लोकाचा अर्थ इ०कांचें तत्व जाणण्याची यु-क्ति ती.

किशोर (सं. पु. ना.) बालक.

किळस (स्त्री. ना.) अमंगल पदार्थ पाहिल्यामुळें किं० कांहीं पदार्थ अतिशयित सेविल्यामुळें अंतःकर-णास कंटाळा येतो तो.

कीं (अव्य०) (ग्रं०) किंवा.

कीट (पु. ना.) किडा. २ किटण. ३ मळ. ४ हिणकट सोनें.

कीर (सं. पु. ना.) राघू. २ (अव्य०) (ग्रं०) निश्चयेंकरून.

कीर्त्तन (सं. न. ना.) भगवत्कथा ह-रिदास उभा राहून वर्णितो तें.

कीर्ति (सं. स्त्री. ना.) कोणेकाची उत्तमत्वेंकरून प्रसिद्धि ती.

कीर्द (फा० स्त्री. ना.) प्रतिदिवशीं-चा जमाखर्च ज्या वहीवर लिहि-तात ती.

कींव (स्त्री. ना.) करुणा.

कीळ (सं. कीला) (स्त्री. ना.) रत्ना-दिकांची प्रभा अ० तेज ती. [पृथ्वी.

कु (सं. अव्य०) वाईट. २ (स्त्री.)

कुइरी (स्त्री. ना.) एक वेल आहे. २ (न.) तिचें फळ तें. ३ फार कोंवळा जो आंबा, फणस तो.

कुई (स्त्री. ना.) कोल्ह्याची आरोळी ती. २ अनेक मनुष्यांची एकदम आरोळी ती.

कुईट (वि०) खवट झालेलें खोबरें, धान्य इ० तें. २ कोणेकाचें दोष-रूप मर्म अंतःकरणांत धरून प्र-

संगीं काढावें असा कुत्सित स्वभाव ज्याचा तो. कि० तसं त्याचें भाषण तें.

कुकरणें (धा. ना.) (ग्रं०) निंदा करणें.

कुका (पु. ना.) जो थोर झाला असून पोरासारिखें चाळे करितो त्यास म्हणतात.

कुच (सं. पु. ना.) स्त्रियेचा स्तन तो. २ (न. ना.) सैन्यादिकांचा स्थलांतरीं जाण्याकरितां पूर्वस्थळ सोडण्याचा व्यापार तें.

कुचका (वि०) कुजका.

कुचकूच (स्त्री. ना.) इतरास ऐकूं न जाईं असा कोणिकाजवळ हळूहळू बोलण्याचा व्यापार ती.

कुचंबणें (धा. ना.) काहिंएक गोष्टीच्या अडचणींत सांपडून सुटका न होतां कांहींकाल दुःख पावे असें कोणीं कोणास करणें.

कुचर (सं. कुचर) (वि०) अंतःकरणाचा जो कपटी तो. २ द्विदल धान्यांत जो दाणा भिजत शिजत नाहीं तो. ३ कामचोर, कसब चोर तो.

कुचराई (स्त्री. ना.) कुचरपणा.

कुचाळ (वि०) कुचाळी करणारा तो

कुचाळी (स्त्री. ना.) दुसऱ्यास चिडविण्याचा व्यापार ती.

कुचेष्टा (स्त्री. ना.) कुचाळी.

कुंज (सं. पु. ना.) अरण्यांत लतांनीं आच्छादित क्रीडादि करण्यास योग्य प्रदेश असतात तो.

कुजका (वि०) कुजलेला. २ कपटी.

कुंजर (सं. पु. ना.) हत्ती.

कुंजरी (स्त्री. ना.) (ग्रं०) सेना.

कुटका (पु. ना.) फळ, कागद इ० कांचा लाहान तुकडा तो.

कुंटण (स्त्री. ना.) जार आणि जारिणी यांची घटना करून देणारी स्त्री ती.

कुटाकुटी (स्त्री. ना.) (ग्रं०) मृत्यूचें भय.

कुटाळ (वि०) कुचाळ.

कुटाळकी (स्त्री. ना.) कुटाळी.

कुटाळी (स्त्री. ना.) कुचाळी.

कुटिल (सं. वि०) ऋजू नव्हे तो.

कुटी (स्त्री. ना.) (ग्रं०) आळ, आरोप. २ निंदा.

कुटुंब (सं. स्त्री. ना.) स्त्री, पुत्र इ० मनुष्यें तें. २ केवळ स्त्रीसही म्ह०

कुटुंबवत्सल (सं. वि०) ज्याचे पदरीं मुलें, बाळें इ० कुटुंब आहे तो.

कुटें (वि०) (ग्रं०) लंगडें.

कुंठित (सं. वि०) गमन करणें, भाषण करणें इ० व्यवहारीं प्रवृत्त असतां काहीं अडचण आल्यामुळें तो व्यवहार चालविण्याविषयीं ज्याची शक्ति थकली तो. २ त्याची गति, भाषण इ० ती.

कुडकुडणें (धा. ना.) पापड इ० चुरतेसमयीं कुडकुड शब्दानें युक्त होणें. २ त्रासानें मनानेंच मनांत हाका मारीत राहाणें.

कुडमुळी (स्त्री. ना.) (ग्रं०) कमळ.

कुंडल (सं. न. ना.) कर्णभूषण आहे.

**कुडावा** (पु. न. ना.) (ग्रं०) रक्षण.

**कुडी** (स्त्री. ना.) मनुष्यादिकांचें कलेवर तें.

**कुडें** (न. ना.) सुंठ इ० कांचा तुकडा तें. २ दुष्ट कल्पना.

**कुणगा** (पु. ना.) पितराचे द्रव्याचे जे अनेक विभागी बंधु त्यांतील एकानें इतरांस न कळतां चोरून ठेविलें जें द्रव्य तें.

**कुणबीण** (स्त्री. ना.) दासी.

**कुतरओढ** (स्त्री. ना.) अनेक कार्यें करण्यास प्राप्त झाल्यामुळें किं० अनेकांचें देणें झाल्यामुळें जी तारंबळ होत्ये ती.

**कुतरा** (पु. ना.) एक पशु आहे.

**कुत्रें** (न. ना.) दार उघडावें म्हणून त्यास अडकवण करितात तें. २ गवताचा तुरा.किं० एक वनस्पतीचें सकंटकफल आहे; जें वस्त्रादिकांस लागलें असतां चिकटून राहतें.

**कुत्र्याचेंमूत** (पु. ना.) छत्राक.२ फटकन शिवी द्यावी, दुसऱ्याच्या अंगावर यावें अशा स्वभावाचा जो द्वाड मनुष्य त्यास ह्मणतात.

**कुत्र्याचेंशेंपूट** (न. ना.) अनेक उपदेशादि केले असतांही ज्याचा दुष्ट स्वभाव जात नाहीं अशा मनुष्यास ह्मणतात.

**कुत्सित** (सं. वि०) वाईट. २ दुर्गंधियुक्त अमंगल असा जो कुजलेला पदार्थ तो. ३ कृत्रिमयुक्त जो मनुष्यादि तो.

**कुंथणें** (धा. ना.) कन्हणें. २ मलविसर्ग होण्याकरितां बळानें अपानवायु रेटून कंठानें शब्द करणें. ३ कांहीं कार्यसिद्धीसाठीं सर्व शक्ति खर्चून प्रयत्न करीत असणें किं० आरंभिल्या कार्याचा विरुद्ध परिणाम झाल्यामुळें खेद करीत बसणें.

**कुंद** (सं. पु. ना.) एक पुष्पाचा वेल आहे. २ (वि०) चांगला साफ नव्हे असा जो कंठध्वनि तो.

**कुदलणें** (धा. ना.) पदार्थांचा भुसगा पडे असा उपभोगणें.

**कुंदी** (स्त्री. ना.) पांघुरणाच्या घड्या घट्ट बसायासाठीं परीट जो चापून ठोकण्याचा व्यापार करितो ती. २ कोणेकाची मारून कुटून जी दुर्दशा करणें ती.

**कुंप** (न. ना.) कुंपण.

**कुंपण, कुपण** (न. ना.) काटक्या, कांट्या इ० कांनीं कोणेक स्थळाभोंवतें केलें जें भिंतीसारखें आवरण तें.

**कुपित्थ** (सं. कुपित्त) (न. ना.) पोटांत जो अजीर्णांश होतो किं० स्वच्छ मलशुद्धि होत नाहीं तें. २ कपट.

**कुफराण** (अर० न. ना.) कोणी कांहीं दोष केला नसतां त्यावर जो रचला दोष तें.

**कुबड** (सं. कुब्ज) (न. ना.) वातादि विकृतीमुळें पाठीस येतो जो वक्रपणा तें.

कुबेर (सं. पु. ना.) देवांचा धनाध्यक्ष आहे. २ मोठा जो द्रव्यवान् त्यास म्हणतात.

कुंभ (सं. पु. ना.) घागर, कलश. २ हत्तीचें गंडस्थळ. [फराण

कुभांड (सं. कु, भांड) (न. ना.) कु-

कुंभिनी (सं. स्त्री. ना.) पृथिवी.

कुमक (फा० स्त्री. ना.) साहाय्य.

कुमर (सं. पु. ना.) मुलगा.

कुमलणें (धा. ना.) कुंदी काढणें.

कुमाईत (अर० वि०) दाढी, अयाळ, गुडघे, पाय, कान हे काळे असून जो शरीरानें रक्तवर्ण किं० यत्किंचित् रक्तताभिश्र असा घोडा तो.

कुमार (सं. पु. ना.) प्रौढ दशेस आला नव्हे असा जो पुत्र तो.

कुमारिका (सं. स्त्री. ना.) जिचा विवाह झाला नाहीं अशी मुलगी ती.

कुमारी (सं. स्त्री. ना.) कुमारिका.

कुमुद (सं. न. ना.) चंद्रविकासी कमळ तें.

कुरकुरणें (कुरकूर) (धा० ना.) कोणी कांहीं केलेलें मनास आलें नसतां संकोचादि कारणामुळें अस्पष्ट भाषण करणें.

कुरकुरीत (वि०) कुडकुडीत. [ती.

कुरकूर (स्त्री. ना.) कुरकुरण्याचें कर्म

कुरंग (सं. पु. ना.) हरिण.

कुरठा (वि०) मनाचा कपटी. २ (पु. ना.) (ग्रं०) स्थळ, जागा.

कुरमुरणें (धा. ना.) चुरमुरणें.

कुरवंडी (स्त्री. ना.) (ग्रं०) वधूवरें इ० कांवरून दृष्टिविकाराचे शांतीसाठीं निंबलोण, अन्न इ० ओंवाळून टाकण्याचा व्यापार ती किं० दीप ओंवाळण्याचा प्रकार ती.

कुरवाळणें (धा. ना.) ममतेनें बालक इ०कांचे अंगावरून हात फिरविणें.

कुरळ (सं. कुरल) (वि०) जो नीट केला असतां ज्याचें वेंटाळें होतें असा सुशोभित केस तो.

कुरापत (अर० स्त्री. ना.) कज्जा होण्यास बळेंच काढिलें जें निमित्त तीं.

कुर्रा (पु. ना.) विद्या, शौर्य इ० कांच्या अभिमानाचा दर्शक वस्त्र, अलंकार, मिशा इ० कांचें धारण व पाहणें, बोलणें इ० क्रिया येणेंकरून जो कोणी डौल दृष्टीस पाडतो तो.

कुऱ्हा (वि०) (ग्रं०) कुबडा.

कुल (सं. न. ना.) एकापासून पुत्रपौत्रादिरूपेंकरून झाले जे अनेक त्यांची त्या मूळ पुरुषापासून वंशपरंपरा चालते तें. २ एकजातीय जीवांचा समुदाय तें. ३ (ग्रं०) अर्थज्ञान.

कुलटा (सं. स्त्री. ना.) व्यभिचारिणी.

कुलदीपक (सं. वि०) सर्व कुलास उद्धरणारा किं० नांवा लौकिकास आणणार असा कुलामध्यें उत्पन्न झाला जो पुण्यपराक्रमादि गुणयुक्त पुरुष तो.

कुलपीगोळा (पु. ना.) गरनाळ इ० कांत घालावयाचा पोटी जकेरा भरलेला असा गोळा तो.

कुलवधु (सं. स्त्री. ना.) उत्तम कुलांत उत्पन्न होऊन तदनुरूप सदाचारादि गुणसंपन्न जी स्त्री ती.
कुलीन, ळीण (सं. वि०) उत्तम कुलांत उत्पन्न होऊन तदनुरूप सभ्यत्वादि गुणांनीं युक्त तो. [मर्थ्य.
कुवत (अर० स्त्री. ना.) शक्ति, सा-
कुवसा (पु. ना.) (ग्रं०) आश्रय.
कुवाडें (न. ना.) (ग्रं०) कोडें.
कुशल (सं. न.) रोग, दारिद्र्य इ० रहित जी सुखावस्था तें. २ (वि०) शिल्पादिकांत जो प्रवीण तो.
कुशाग्रबुद्धि (सं. स्त्री. ना.) फार तीक्ष्ण बुद्धि ती. २ (वि०) तशा बुद्धीचा तो.
कुश्चळ (वि०) मळीण. २ दुर्गंधि.
कुष्ट (सं. न. ना.) एक रोग आहे. ज्याच्या योगानें अंगावरील त्वचा पांढरी होत्ये किं० कुजून गळत्ये तें.
कुसकरणें (धा. ना.) चुरणें.
कुसमुसणें (धा. ना.) कुरकुरणें.
कुसरी (स्त्री ना.) (ग्रं०) कौशल्य.
कुसळ (न. ना.) तृणादिकांवर फार बारीक अग्राचा अवयव असतो तें.
कुसुम (सं. न. ना.) पुष्प, फूल.
कुस्ती (फा० स्त्री. ना.) मल्लादिकांचें बाहुयुद्ध. [दरी.
कुहर, री (स्त्री. ना.) (ग्रं०) गुहा,
कुहा (पु. ना.) (ग्रं०) कूप.
कुहार (न. ना.) (ग्रं०) कोठार.
कुळक (स्त्री. ना.) मोडशी अतिरिक्त झाल्यामुळें हाग शेक आवयालोगीं विकीत होतें ती.
कुळकणी (स्त्री. ना.) (ग्रं०) चातुर्य.
कुळवाड (स्त्री. ना.) (ग्रं०) उद्दाम.
कुळीक (स्त्री. ना.) (ग्रं०) कुळक.
कुक्षी (सं. स्त्री. ना.) काखेचा खालचा आणि कटीचा वरचा, अंतला किं० बाहेरला प्रदेश ती.
कूट (कुटणें) (न. ना.) लोणचें इ० कांत घालायासाठीं मोहोऱ्या, मेथ्या इ० कुटून चूर्ण करितात तें. २ सरळपणानें लागू नये असा श्लोक, हिशोब इ०, तें. ३ एकविचारानें चालणाऱ्यांचा जो एकोपा तें. ४ (ग्रं०) शरीर. [जलाशय तो.
कूप (सं. पु. ना.) आड म्हणून जो
कूष्मांड (सं. पु. ना.) कोहळ.
कूस (सं. अप. स्त्री. ना.) कुक्षी. २ मोजून मापून कांहीं पदार्थांची इयत्ता केली असतां त्यांत जी कसर राहात्ये ती.
कूळ (सं. अप. न. ना.) कुल. २ ज्याणें ज्याचें द्रव्यादि देणें आहे तो त्याचें.
कृत (सं. न. ना.) चार युगांतील पहिलें युग तें. २ (वि०) केला जो तो.
कृतकृत्य (सं. वि०) जें पुण्यकर्मादि करायाचें तें केल्यामुळें ज्याचें जन्मसार्थक झालें तो.
कृतघ्न (सं. वि०) दुसऱ्यानें आपणावर केलेला उपकार मनांत न वागवि-

तां जो त्याचे अनिष्टाविषयीं प्र-
वर्तता तो.
कृतघ्न (सं. वि०) दुसऱ्यानें केला जो
आपणावर उपकार तो विसरत
नाहीं तो. [३ करदनकाळ.
कृतांत (सं. पु. ना.) यम. २ मृत्यु.
कृतार्थ (सं. वि०) कृतकृत्य.
कृति (सं. स्त्री. ना.) कांहींएक कार्य
करण्याचा जो व्यापार तो. २ को-
णेकानें कांहीं व्यापारानें जें कांहीं
सिद्ध केलें तो.
कृत्य (सं. न. ना.) कृति.
कृत्या (सं. स्त्री. ना.) उग्रदेवता.
२ भांडखोर जी स्त्री तिला म्हणतात.
कृत्रिम (सं. न. ना.) कपट. २ (वि०)
कृतीनें केलेला तो.
कृपण (सं. वि०) कदर्य.
कृपा (सं. स्त्री. ना.) करुणा.
कृमि (सं. पु. ना.) किडा.
कृश (सं. वि०) किरकोळ, रोड.
कृषि (सं. न. ना.) शेत करण्याचा
व्यापार तो.
कृष्ण (सं. पु. ना.) विष्णुचा आठवा
अवतार. २ (वि०) काळा.
कृष्णा (सं. स्त्री. ना.) एक महानदी
आहे. २ द्रौपदीस म्हणतात.
कृप्ति (सं. स्त्री. ना.) कांहीं कर्मावि-
षयीं कोणेकानें काढिली युक्ति ती.
२ कांहीं कार्यांत युक्तिवानानें ठे-
विली युक्ति ती.
कें (अव्य०) (ग्रं०) कोठें. [ती.
केका (सं. स्त्री. ना.) मोराचा शब्द
केणी—केणें.
केणें (न. ना.) (ग्रं०) विकला अस-
तां पैसा व्हावयाजोगा जो जिन्नस तें.
केतकी (सं. स्त्री. ना.) केवड्याचें झाड.
केतुलें (वि०) (ग्रं०) केवढें. २ कसें.
केधवां (अव्य०) (ग्रं०) केव्हां.
केरणें (धा. ना.) (ग्रं०) खाणें.
केली (सं. स्त्री. ना.) क्रीडा.
केवल, ळ (सं. वि०) ज्यामध्यें य-
त्किंचित् इतर अंशाचा संबंध ना-
हीं असा किं० ज्यामध्यें अन्यथा-
पणाची किंचिन्मात्र संभावना ना-
हीं असा एकरूप जो तो.
केवा (पु. ना.) (ग्रं०) पाड किं० ग-
णना. २ डबोलें.
केविलवाणा (वि०) दीनवाणा.
केवी (अव्य०) (ग्रं०) कोणत्या प्रकारें.
केव्हां (अव्य०) कोणत्या समयाच्या
ठायीं. [ळांत.
केव्हांच (अव्य०) केवळ थोडक्या वे-
केसरी (सं. पु. ना.) सिंह.
केळवण (न. ना.) विवाह, मुंज यांचे
आरंभीं एक भोजनाचा समारंभ
करितात तें. [जाणारी स्त्री.
केळवली (स्त्री. ना.) (ग्रं०) सर्वा
केळी (स्त्री. ना.) कळशी.
कैं (अव्य०) (ग्रं०) कोठें. २ केव्हां.
कैक (वि०) कितीएक, कित्येक.
कैंचा (वि०) (ग्रं०) कोणता. २ कोठला.
कैंची (स्त्री. ना.) कागद कातरण्याची
कातर.

**कैद** (अर० स्त्री. ना.) राजा, शास्त्रकर्ते इ० कांनीं प्रजादिकांनीं या या प्रकारें चालावें अन्यथा चालूं नये असा जो नियम चालविला असतो तो. २ चोर इ० कांस जो प्रतिबंध तो. ३ (वि०) प्रतिबंधांत ठेविला तो. ४ कदर. [क्षपान.

**कैपक्ष** (पु. ना.) (ग्रं०) कैवार, प-

**कैफ** (अर० पु. ना.) भांग इ० कांत उन्माद यावयाजोगा जो गुण असतो तो किं० तें भांग इ० द्रव्य तो.

**कैरा** (वि०) ज्या घोडा इ० पशूंचा एकच डोळा घारा असतो किं० तशा डोळ्यानें युक्त पशु तो. २ तिरळा मनुष्य तो किं० त्याचा डोळा तो.

**कैवल्य** (सं. न. ना.) जीवात्मा आणि परमात्मा यांचें अभेदरूप ज्ञान झाल्यामुळें जी मुक्ति तें.

**कैवार, कैंवार** (पु. ना.) पक्षपात. २ वर्तुळकाढायाचें यंत्र तो.

**कोकरूं** (न. ना.) मेंढीचें पोर तें.

**कोकलणें** (धा. ना.) आपलें कांहीं इच्छित कार्य न झाल्यामुळें हाका मारीत बसणें.

**कोकिळा** (सं. कोकिल) (स्त्री. ना.) वसंतकाळीं मंजुल शब्द करणारा एक पक्षी आहे.

**कोंग** (न. ना.) मीस. २ कुबड.

**कोंच** (स्त्री. ना.) शस्त्रादिकाचें टोंक लागल्यामुळें शरीरास पडल्ये खळी तो.

**कोट** (सं. कोट) (पु. ना.) भोंवताली तटबंदी करून जो किल्ला बांधितात तो. २ कोटि शब्दाचा अपभ्रंश.

**कोटकल्याण** (कोट, कल्याण) (न. ना.) कांहीं अपरिमित लाभानें पराकाष्ठेची तृप्तता तें.

**कोटि** (सं. स्त्री. ना.) शंभर लक्ष संख्या तो. २ वादी प्रतिवादी इ० आपआपला पक्ष सिद्ध करण्याकरितां शंका समाधानादिरूप ज्या अनेक युक्तींच्या रचना करितात त्या प्र०.

**कोठवळा** (कोठी, वाला) (पु. ना.) कोठीवरील अधिकारी तो.

**कोठी** (सं. कोष्ट) (स्त्री. ना.) तांदूळ, डाळ इ० नित्य खर्चांचे उपयोगी पदार्थ ठेवायाकरितां जें गृह केलें असतें तो. [२ कौतुक.

**कोड** (सं. अप. न. ना.) कुष्ट.

**कोडगा** (वि०) निलाजरा. २ (पु. ना.) लाता, बुक्या इ० कांचा जो मार तो.

**कोंडणें** (धा. ना.) कोणेकाच्या मार्गांचा निरोध करून त्यास अडकवून धरणें. २ वादादिकांत चोहोंकडून दोष देऊन कोणेकास बोलण्याविषयीं निरुपाय करणें.

**कोंडा** (स्त्री. ना.) वापड, बांगड्या इ० पदार्थांची जी वीस अशा रूपाची संख्या ती.

**कोंडी** (कोंडणें) (स्त्री. ना.) मनुष्यादिकास कोंडून धरायासाठीं भिंत इ० कांनीं आवृत स्थळ करितात तो.

कोडें (न. ना.) कूट. २ संकटावस्था.

कोतवाल (फा० पु ना.) शहरांत चोरी, शिंदळकी इ० न व्हावी म्हणून संरक्षणार्थ जो अधिकारी ठेविला असतो तो.

कोता (फा० वि०) अपुरता.

कोथळा (पु. ना.) पोटाचें कोठ्या भोंवताले जें मांसादिकाचें आवरण असतें तें. २ धान्य ठेवण्याचें बळद कि० मोठी पिशवी तो.

कोदंड (सं. न. ना.) धनुष्य.

कोंदण (कोंदणें) (न. ना.) भूषणादिकांवर हिरा इ० रत्न बसवायाचे उपयोगी जो उंच सोन्याचा पत्रा असतो तें.

कोंदणें (धा. ना.) पात्र, छिद्र इ० कांत काहीं पदार्थ आंत जाईल तितका खचून खचून भरणें. २ आंत काहीं पदार्थ घट्ट बसल्यामुळें छिद्र इ० निरुद्ध होणें.

कोंदाटणें (धा. ना.) कोंदणें.

कोप (सं. पु. ना.) क्रोध.

कोंपट (न. ना.) खोंपटी.

कोंब (पु. ना.) अंकुर.

कोम (पु. ना.) कागदोपत्रीं विधवा स्त्रीचें नांव लिहिलें असतां तिच्या भर्त्याच्या संबंधासाठीं त्याच्या नामापूर्वीं हा शब्द लिहितात. उ० लक्ष्मीबाई कोम माधवराव.

कोमट (वि०) किंचित् उष्ण.

कोमणें (धा. ना.) म्लान होणें.

कोर (स्त्री. ना.) पदार्थांच्या कडेची धार ती.

कोरड (स्त्री. ना.) ज्वर इ०कांमुळें घशास जो कोरडेपणा येतो ती.

कोरडा (वि०) ज्याच्यामध्यें कांहींक गोडीचा ओलसरपणा नाहीं तो. २ (पु.) चोर इ० कांस मार देण्याचे असुडासारखा वाताच्याचा वळिलेला तो.

कोरा (वि०) धुतल्यावांचून नवें वस्त्र इ०तो. २ लिहिल्यावांचून जो कागद तो. ३ क्या व्यवहारांत जो केवळ नवा तो.

कोराकरकरीत (वि०) केवळ कोरा.

कोरान्न (कोरा, अन्न) (न.ना.) शिजल्यावांचून जें धान्य त्याची भिक्षा तें.

कोलणें (धा. ना.) गलींतील विटी दांडूनें उडविणें. २ कोणी काहीं विचारिलें असतां आपल्या अंगावर न घेतां तें दुसऱ्यावर लोटणें.

कोलती (स्त्री. ना.) पेटलेलें लहान लांकूड ती.

कोलदांडा (पु. ना.) हातांत पाय सांपडवून हात बांधणें व गुडघ्यांत लांब लांकूड अडकवणें असा बांधण्याचा प्रकार तो.

कोलाकोल (स्त्री. ना.) यानें त्यावर त्यानें ह्यावर अशी काहीं गोष्ट बोलण्याचा व्यापार ती.

कोलाहल (सं. पु. ना.) मोठा गलबा

कोलीत (न. ना.) कोलती.

कोलीतकांकण (न. ना.) (प्र०) पेटलेलें लांकूड गरगरां वाटोळें फिरविलें असतां जो कंकणासारखा

आकार दिसतो; त्यास अलात-
चक्र म्हणतात तें. [तो.

कोलिता (पु. ना.) (ग्रं.) रक्षण क

कोल्हा (पु. ना.) एक वन्य पशु आ-
हे. २ संकेतानें धूर्त मनुष्यास म्ह-
णतात. [गलबा.

कोल्हाळ (सं. कोलाहल) (पु. ना.)

कोल्हेर, री (वि०) (ग्रं०) लांकूड
इ० कांचें केलेलें बाहुलें इ० तें.

कोवसा (पु. ना.) (ग्रं०) आश्रय.

कोंवळा (सं. कोमल) (वि०) ज्यांत
सत्वांश किं० बळकटी कमी असा
पदार्थादि तो.

कोष्टी (पु. ना.) सुताचीं वस्त्रें विणून
निर्वाह करणारी एक जाति आहे
ती. २ एक किडा आहे, ज्याचे ना-
भीपासून तंतु निघती.

कोस (सं. क्रोश) (पु. ना.) आठ
हजार हात लांबीचें मान तो.
२ आपणास पाहिजे तसा चतुष्को-
णादि आकार सारखा असावा
त्यांत वांकडेपणा आल्यामुळें जो
न्यूनाधिक भाव होतो तो.

कोसला (पु. ना.) एक किडा आहे.

कोसळणें (धा. ना.) रचलेला भिंत
इ० पदार्थ तो त्या रचनेचा भंग
होऊन विशकलित होणें. २ कांहीं
योजलेली मसलत विस्कळित होणें.

कोळ (कोळणें) (पु. ना.) चिंच,
आंबा, भात इ०कांत पाणी, ताक
इ० घालून त्याचा अंश आंत ये-
ई असें कुसकरलें असतां जें दाट
पाणी निघतें तो.

कोळसा (पु. ना.) विझलेला निखा-
रा. २ एक पक्षी आहे. ३ एक
वन्य पशु आहे.

कोळिष्टक (न. ना.) कोष्टी म्हणून
किडा आहे त्याच्या नाभींतून नि-
घून जमला असतो जो सूत्रस-
मुदाय तं.

कोळी (पु. ना.) मत्स्य मारून किं०
नौका व्यवहार करून उपजीविका
करितो तो किं० वन्य पशु मारून
निर्वाह करितो तो. २ कोष्टी म्हणून
जो किडा तो.

कौतुक (सं. न. ना.) आश्चर्य. २ पुत्र,
देह इ० पदार्थांवर माझें सर्वस्व
काय तें हें व यासारखा दुसरा
पदार्थ त्रैलोक्यात नाहीं असा जो
भाव असतो तें किं० त्या भावामु-
ळें जें त्याचें लालन इ० उपचार
करण्याचा प्रकार तें.

कौपीन (सं. न. ना.) लंगोटी.

कौल (अर० पु. ना.) कृषि इ० व्य-
वहार करणारास या या प्रकारें
तुम्ही नांदावें, तुम्हास अमुक सूट
दिली किं० माफी केली आहे इ०
रूप अभयपत्र सरकार देतें तो.
२ (न.) घरावर आच्छादनार्थ
मातीचे पन्हळ करून घालितात तें.

कौलिक (सं. वि०) मांत्रिक.

कौस्तुभ (सं. पु. ना.) चवदा रत्नांपैकीं
विष्णूच्या गळ्यांत जो मणि आहे तो.

क्रतु (सं. पु. ना.) यज्ञ.

क्रम (सं. पु. ना.) क्रमण. [पार तें

क्रमण (सं. न. ना.) क्रमण्याचा व्या-

क्रय (सं. पु. ना.) कांहीं द्रव्य देऊन कांहीं पदार्थ घेण्याचा व्यापार तो.

क्रयविक्रय (सं. पु. ना.) पदार्थ विकत घेणें व विकणें इ० उदीम तो.

क्रव्याद (सं. वि०) हिरवें मांस खाणारे व्याघ्रादिक तो.

क्रिया (सं. स्त्री. ना.) कांहींएक व्यापाराची कर्तव्यता ती. २ मेलेल्याचें उत्तरकर्म तीं. ३ शपथ, दिव्य इ० ती.

क्रियानष्ट (सं. वि०) कृतघ्न.

क्रीडा (सं. स्त्री. ना.) ज्यामध्यें पुण्यपुरुषार्थरूप फळ नाहीं, केवळ तत्कालीं मात्र चित्त रमावें असा जो सोंकट्या, गंजिफा, नृत्य, गायन इ० खेळ खेळण्याचा व्यापार ती. २ परमार्थदृष्टीनें सर्व व्यवहारमात्रास क्रीडा म्हणतात.

क्रुद्ध (सं. वि०) क्रोध पावला तो.

क्रूर (सं. वि०) उग्र.

क्रोध (सं. पु. ना.) कोणेकाच्या हातून अपराधादि झाले ते न सोसल्यामुळें त्याचें शासन करावें असा जो वृत्तिविशेष उत्पन्न होतो जेणेंकरून सर्वांगाचा संताप होतो तो.

क्लिष्ट (सं. वि०) सरळमार्गानें ज्याचा निर्वाह होत नाहीं, ज्याच्या मध्यें वांकडेतिकडेपणा इ० बहुत अडचणी असतात असा जो व्यवहार तो.

क्लिष्टकल्पना (सं. स्त्री. ना.) सरळ नव्हे अशी कल्पना ती.

क्लीब (सं. पु. न. ना.) नपुंसक. २ (वि०) अपराक्रमी मनुष्य तो.

क्लेश (सं. पु. ना.) दारिद्य, रोग, इष्ट पदार्थांचा वियोग इ० कांपासून झालेलें दुःख तो. किं० कांहीं आयास केल्यामुळें शरीरास किं० अंतःकरणास जी व्यथा उत्पन्न होते ती.

क्वचित् (सं. अव्य०) कांहींएक गोष्टीच्या संभावनेचीं जी देश, कालादिरूप अनेक स्थळें त्यामध्यें बहुत स्थळें वगळून कांहींएक स्थळीं. उ० हजारांवर एकटा धावून जाणारा क्वचित्.

क्वार (सं. अप. स्त्री. ना.) कुमारी.

---

—ख—

ख—हा वर्ण दुसरें व्यंजन आहे. (सं. न. ना.) शून्य. २ आकाश.

खंक (वि०) द्रव्यहीन. २ कुत्रा गुणानें द्वाड तो.

खग (सं. पु. ना.) आकाशांत गमन करणारे पक्षी, ग्रह इ० तो.

खंग (वि०) रोगादिकांमुळें अशक्त झालेला किं० कृश झालेला तो.

खंगर (पु. ना.) पक्की भाजलेली वीट तो.

खगा (पु. ना.) (ग्रं०) पक्षी. २ पाऊस.

खगोल (सं. पु. ना.) ज्यामध्यें ग्रह, नक्षत्रें इ० आहेत असें जें आकाश तो.

खग्रास (सं. पु. ना.) ग्रहणामध्यें सूर्यमंडल, चंद्रमंडल ग्रासून जो आकाशाचा ग्रास होतो ता. २ व्यापारादिकांमुळें जी कांहींएक पदार्थांची निःशेषता ती.

खच (स्त्री. ना.) अडचणीच्या जागेंत झाली जी मनुष्यादिकांनी दाटी ती.

खचणें (धा. ना.) पात्र इ० कांत धान्य इ० पदार्थ चिणून पोकळी न राही असा बसविणें. २ भिंत, खांब इ० कांनी मूळ ठिकाण कमी दिसायाजोगें खालीं जाऊन घट्ट बसणें. ३ उमेद, मसलत खचणें म्ह० त्यांनी नाहीं असे होणें. ४ (ग्रं०) कोरीव केल्याप्रमाणें होणें.

खचरट (वि०) खडतर.

खचित (सं. वि०) रत्नादिकांनीं निबिडपणें युक्त जो पदार्थ तो. २ निश्चित. [श्चितपणानें.

खचीत (वि० अव्य०) निश्चित, निखंजन (सं. पु. ना.) एक पक्षी आहे.

खजाळ (खाज) (वि०) ज्यास कलहाविषयीं कडू फार तो.

खजिल (वि०) पराजयादि दुःखामुळें खेदयुक्त तो.

खजीना (फा० पु. ना.) द्रव्य, माल इ० भरावयाचें ठिकाण तो. २ बंदूक इ० कांचें कान्याजवळचा प्रदेश ज्यांत दारूची दाह राहन्ये तो. ३ कारंज्याचें पाणी उडायासाठीं त्याचे समीप पाणी साठवायाचें उंच जागा बांधितात तो इ०.

खंजीर (फा० पु. ना.) एक शस्त्र आहे.

खट (वि०) दुर्जन.

खटनट (वि०) वाईटसाईट.

खटपट (स्त्री. ना.) मेहेनत. २ कज्जा.

खटला (पु. ना.) कज्जा. २ शेत, वाडी, गुरें, मुलें, माणसें इ० रूप तो किं० जमीन इ० नानाप्रकारें पोट भरण्याचे व्यापार ते प्र०. ३ देण्याघेण किंवा मागील राहिली जी लडथड तो.

खटलेवाईक (वि०) ज्याचे पदरीं शेत, वाड्या इ० खटला आहे तो.

खटाटोप (पु. ना.) दंभ दिसायाजोगें किं० अल्पकार्याविषयीं जें मोठें सामर्थ्यजाल तो.

खट्टा (पु. ना.) श्रमामुळें कंबरमोड झाली असतां कंबरेच्या हाडास म्हणतात. २ (वि०) आंबट. ३ गतोत्साह तो.

खट्याळ (वि०) खट.

खड (सं. पु. ना.) अपराध्यांपासून द्रव्यादिरूप दंड राजे घेतात तो. २ अमुक कार्यास अमुक द्रव्यादिक असा ठराव तो. ३ चाललेल्या कार्याची जी मध्यें मध्यें न चालता स्थिति तो. ४ तुकडा. ५ जंबुद्वीपाचे जे विभाग आहेत ते प्र०.

खडक (पु. ना.) मनुष्यानें केलेली नव्हे अशी दगडाची भूय तो. २ (वि०) वाळलेला जो काष्ठादि पदार्थ तो. [तो.

खडकाळ (वि०) पाषाणमय भूमि इ०

खडकुनी (स्त्री. ना.) (ग्रं०) सूर्याच्या खडतर उष्णानें पदार्थ करपून जाणें ती.

खडखडाट (पु. ना.) धान्य, उदक इ० कांचा केवळ जो अभाव तो.

खडखडीत (वि०) ज्याचा ओलेपणा गेला तो. २ रोग इ० कानीं जो अशक्त झाला नाहीं तो व त्याचें स्पष्ट भाषणादि तें.

खंडणी (सं. खंडन)(स्त्री. ना.) इतर राजा इ० कानें आपणास उपद्रव करूं नये एतदर्थ जो राजा किं० प्रजा मोठ्या बलाढ्य राजास द्रव्यादि देतात ती.

खंडणें (सं. खंडन) (धा. ना.) ग्रंथ, काष्ठ इ० कांचें खंडन करणें. २ घेण्यासाठीं कोणेक पदार्थाची किंमत ठरावणें.

खडतर (वि०) त्रासदायक काठिन्यादि गुण आहेत ज्यामध्यें असा देश, मार्ग, ग्रंथ इ० तो.

खडतरणें (धा. ना.) (ग्रं०) शस्त्र इ० अंगांत खोंचणें.

खंडन (सं. न. ना.) वाद्याचें मत किं० ग्रंथ इ० कांचा युक्त्यादिकांच्या योगानें मोडण्याचा व्यापार तें. २ काष्ठ इ० कांचा तुकडे करण्याचा व्यापार तें.

खडबड (स्त्री. ना.) राज्यादिकांत मोठें होणारें युद्ध इ० तत्सूचक जो परस्परांचा कज्जा इ० ती.

खडबडीत (वि०) उर्बारखाबीर.

खडवा (पु. ना.) (ग्रं०) डोंगर.

खडसणें (धा. ना.) वृक्षाच्या डाहाळ्या तोडणें.

खंडज्ञान (सं. न. ना.) (ग्रं०) जीवात्मा व परमात्मा यांचें अभेद ज्ञान नव्हे तें.

खडा (पु. ना.)बारीक दगड. २त्यासारखाच जो हिरा, माणीक इ० तो. ३ (वि०) उभा. ४ खडा टाकून ठाव पाहाणें म्ह० कार्य झालें तर झालें न झालें तर न झालें अशा समजुतीनें एकाद्यावर शब्द टाकणें. ५ यांतील खडान खडा त्यास माहीत आहे म्ह० बारीक मोठे सर्व अंश त्यास ठाऊक आहेत इ०.

खडाण (स्त्री. ना.) (ग्रं०) दूध थोडें देत असून लाता फार मारिते अशी गाय ती.

खडी (स्त्री. ना.) बारीक खड्यांचा समुदाय ती. २ मुंगसासारिखा क्षुद्र जंतु आहे. ३ पांढरी माती. ४ वस्त्रावर वेलबुट काढायाचे उपयोगी चकचकीत रंग आहे.

खडीताजीम (फा० स्त्री. ना.) थोर मनुष्याच्या सत्कारार्थ उभें राहून जी ताजीम घेतात ती.

खडूळ (वि०) खडुळल्यानें मलीन झालें उदक इ० तें. २ विकृतीनें आरक्त झाला जो डोळा तो.

खड्ग (सं. पु. ना.) तरवार.

खण (पु. ना.) स्त्रियांचे चोळीपुरतें कापड तो. २ वाडा इ० इमारतीचे दोन खांबांमधली जागा तो. ३ संक्रांतीचे दिवशीं वांटायाकरितां पांच सुगडांचा समुदाय तो. ४इमारतीच्या मजल्यासही म्हणतात

खणकावणें (धा. ना.) कोणी दबावें असें उग्रभाषण करणें.

खणखणीत (वि०) खडखडीत.

खणुवाळ (वि०) (ग्रं०) खरबुडीत.

खंत (स्त्री. ना.) वाईट पदार्थ पाहिल्यामुळें मनास जी विकृति होत्ये ती. २ प्रिय पदार्थांच्या वियोगानें अंतःकरणास विकार होतो ती.

खत (अर० न. ना.) कर्जखत, गाहाणखत इ० तें. २ शेत, मळा इ० कांस पुष्टीसाठीं जो कुटा, केरकचरा इ० घालितात तें.

खतावणी (स्त्री. ना.) रोजखर्डयावरील पत्न्या एकमा खात्यांत लिहिण्याचा व्यापार ती व तो कागद किं० वही ती.

खंती (स्त्री. ना.) खंत.

खंदक (फा० पु. ना.) किल्ला इ०कांभोंवता खणतात चर तो.

खंदा (फा. वि०) बळकट असून क्रूर, चंचळ असा घोडा तो. २ तसा मनुष्य तो.

खद्योत (सं. पु. ना.) काजवा.

खनाळ (न. ना.) (ग्रं०) एकांतस्थळ.

खप (पु. ना.) विक्र्यादिकानें पदार्थांचा व्यय तो.

खपड, खप्पड (वि०) ज्याचें तारुण्य गेलें त्यास निंदा कर्तव्य असतां म्हणतात.

खपणें (धा. ना.) मेहनत करणें. २ जिन्नस इ०कांचा खप होणें ३ मरण्यास म्हणतात

खपरेल (न. ना.) घरावर घालावयाच्या कौलांत एक भेद आहे तें. २ (वि०) त्यानें आच्छादित वाडा, घर इ० तें.

खबर (अर० स्त्री. ना.) स्थलांतरीं झालेली किं० चाललेली जी कांहीं गोष्ट तिला जाणावयाच्या किं० सांगावयाच्या समयीं म्हणतात.

खबरदार (फा० वि०) ज्ञानशक्ति, शरीरशक्ति, द्रव्यशक्ति इ० साधनें ज्या ज्या व्यापारास जीं जीं उपयोगीं तीं तीं ज्याच्यामध्यें आहेत तो त्या त्या विषयीं.

खबाड (न. ना.) (ग्रं०) पाण्याचें डबकें. [दोबस्त.

खंबिरी (स्त्री. ना.) खंबीरपणा. २बं-

खंबीर (वि०) दमणें, मोडणें, पडणें, ढासळणें इ० विकार ज्यास एकाएकीं होत नाहींत असा पदार्थ तो.

खमंग (वि०) मीठ, मिरची, हिंग इ०कांच्या योगानें जो पदार्थ रुचिकर झाला तो किं० त्याचा वास तो.

खर (सं. पु. ना.) गाढव. २ रेंव. ३ धात.

खरखरीत (वि०) गुळगुळीतपणा किं० मृदुपणा, साफी इ० ज्यास नाहीं असा काष्ठ, वस्त्र इ० पदार्थ तो.

खरड (स्त्री ना.) शिव्या इ० भाषणानें कोणेकाचा पाणउतारा ती.

खरडघांशा (खरडणें, घांसणें) (वि०) सरासरी लेखनविद्या जाणतो परंतु त्यांतील मर्म ज्यास समजत नाहीं असा जो कारकून त्यास

निंदेनें म्हणतात. २ नाकसकी न्हा-
वी, सुतार इ०कांसही म्ह०.
खरडपट्टी (स्त्री. ना.) खरड.
खरडा (पु. ना.) वारंवार लिहिल्या-
मुळें चितारड झाला जो कागद तो.
२ पक्का लेख दुसऱ्या कागदावर
लिहावयाचा अशा संकेतानें पूर्वी
लिहिला जो कागद तो.
खरपूस (वि०) विशेष भाजणें, तळ-
णें इ० कामुळें जो पदार्थ रुचि-
युक्त झाला तो. २ लाभ, लोभ
इ० न धरितां प्रसंगोपात्त उत्तर
करण्यास जो भीत नाहीं अशा
स्वभावाचा तो किं० त्याचें भाषण,
कारभार इ० तो. ३ निक्षून.
खरवड (खरवडणें) (स्त्री. ना.) दूध
इ० पदार्थास आटविणें इ० संस्कार
केला असतां खरवडायाजोगा जो
अंश बुडास उकला असतो तो.
२ संपत्ति जाऊन जो अल्पस्वल्प
अंश राहतो तो.
खरवस (पु. ना.) गाय, म्हैस यांचें
कोंवळें दूध तापविलें असतां जो
पदार्थविशेष होतो तो.
खरा (वि०) जो जो पदार्थ ज्या ज्या
रूपानें भासला तो वस्तुत: तसाच
तो. २ (पु.) उष्णतेमुळें मुखांत
फोड येतात ते प्र०. ३ गंधाचा
जो रवा तो. [टा नव्हे तो.
खराखुरा (वि०) निश्चयेंकरून खो-
खरांटें (न. ना.) (ग्रं०) गुरांच्या
योगानें झाला जो चिखल तें.
खराब (अर० वि०) वाईट. २ ओ-
स जो शीत, वाडी इ० पदार्थ तो.
खरीद (फा० वि०) पैका देऊन वि-
कत घेतला तो.
खरीप, फ (अर० पु. ना.) मूग,
मटकी, बाजरी इ० पूर्वधान्यें ती
प्र०. २ (ग्रं०) (स्त्री. ना.) पडीत
भूमीची लागवड.
खर्च (फा० पु. ना.) द्रव्य इ०कां-
चा त्या त्या प्रसंगीं व्यय झाल्यामुळें
नाहींपणा तो.
खर्चवेच (पु. ना.) खर्च इ० तो.
खर्ची (स्त्री. ना.) खर्चायाच्या उद्दे-
शानें संकेतनियत जें प्राय: द्रव्य
तें. २ (वि०) खासा किं० उत्तम
प्रतीचा नव्हे तो.
खर्चीक (वि०) उदारपणें खर्च कर-
ण्याचा ज्याचा स्वभाव तो.
खल (खलण) (पु. ना.) औषधादि-
कांचें चूर्ण करावयाचें धातुमय
किं० पाषाणाचें पात्र आहे तो.
२ औषधें बारीक करण्याचा व्या-
पार तो. ३ (सं. वि०) दुर्जन.
खलक (पु. ना.) सर्व लोक अ०
मनुष्यें.
खलणें (धा. ना.) खलांत घालून
औषधादि घोटणें. २ (ग्रं०) वि-
चाराचा विषय मनांत घोळून घो-
ळून दृढ करणें.
खलबत (फा० न. ना.) कांहींएक
गोष्टीविषयीं दुसऱ्याबरोबर एकांतीं
विचार तें. [तो.
खलबत्ता (पु. ना.) खलासहित बत्ता
खलाशी (पु. ना.) गलबतावरील

तांडेल इ० मुख्य अधिकारी सोडून जे इतर कामगार ते प्र०. २ लष्करांत तोफा इ० ओढायाचें काम करण्यास लोक ठेविले असतात ते प्र०.

खलास (अर० वि०) खर्चल्यानें नाहींसा झाला जो द्रव्यादि पदार्थ तो

खवग (पु. न. ना.)(प्र०) पक्षशब्द. २ आकाश.

खवणी (स. क्षपणक) (पु. ना) (प्रं०) बौद्धमतानुसारी नग्न दीक्षेचा मनुष्य तो. २ माकड.

खवळणें (स. क्षोभ) (धा. ना.) समुद्र, वारा, मनुष्य इ० कानी क्षुभित होणें. [हाताचा सांधा तो.

खवाट, टा (पु. ना.) खांद्याचा व

खवीस (अर० पु. ना.) मुसलमान मरून पिशाच होतो त्यास म्हणतात. २ द्वाड जो मनुष्य त्यासही म्हणतात.

खश्ट (स. शठ) (वि०) खडतर.

खसखशीत (वि०) भीड इ० न धरितां जें भाषण, देणें घेणें इ० व्यापार तो.

खसखस (फा० स्त्री. ना) अफूचें बीं तें २ (अव्य०) कापणें इ० कांचे शब्दाचें अनुकरण.

खस्ता (सं कष्ट) (स्त्री. ना) दुख णेकरी इ० कांची जी चिरकाळ खटपट तीस त्रासानें म्हणतात.

खळ (स्त्री. ना.) गहूं, उडीद इ० कांचे पिठाची कागद इ० डकवायासाठीं जी पेज करितात ती. २ कांहींएक गोष्ट करीनच करीन किं० करणार नाहीं इ० रूप धरिला जो हट्ट तो. ३ (वि०) खल.

खळखळ (अव्य०) बांगड्या इ० कांचें वारवार वाजणें त्याचें अनुकरण २ (स्त्री. ना.) देणें, घेणें इ० व्यवहारी सरळीनपणा सोडून वांकड्या वाटेचा अंगीकार तो.

खळगट (न. ना.) आंबटी, सांभारें यास निंदेनें म्हणतात.

खळगे (वि०) (प्र०) लहान.

खळणें (धा. ना) चाललेल्या कांहींएक गोष्टीनें कांहीं काळ न चालतां स्थिर राहणें. २ कागद इ० खळीनें युक्त करणें.

खळा (स्त्री. ना.) (प्र०) झोंबी

खळी (स्त्री. ना.) खळगी. २ (प्र०) तुरटी.

खळें (न. ना) धान्याची मळणी करायासाठीं शेत इ० त्यांत झाडून, सारवून जागा करितात तें २ चंद्र, सूर्य यांच्या सभोंवार अभ्राचा परिघ पडतो तें. ३ (प्र०) झोंबी.

खाई (स्त्री. ना) सर्वाला उडी घालण्यासाठीं अग्नीच्या निखाऱ्यांनीं युक्त अशी खळी करितात ती.

खाऊ (खाणें) (पु. ना) साकर इ० मधुर जे पदार्थ त्यास मुलांच्या भाषेनें म्हणतात. [जो तो.

खाक (वि०) राख होई तों जळाला

खाकर (वि०) (प्र०) पानें झडलेला वृक्ष तो.

खाकरणें (धा. ना.) गळ्यांतील कफ

सुटावा म्हणून कंठांत खां असा शब्द करणें.

खांकरा (खांकरणें) (पु. ना.) खांकरण्यानें सुटणारा जो कफ तो २ (ग्रं०) धान्यास चार शिकविताना जो खुरखुरा वाजवितात तो

खांकावणें (धा. ना.) (ग्रं०) गर्जना करणें.

खाखा (खाणें) (स्त्री. ना.) उपोषणादि कारणामुळें अनेकवार भक्षिलें असताही क्षुधा शांत होऊं नये अशी जी अवस्था ती किं० अतिशय क्षुधा लागल्यामुळें केव्हां एकदा खाईन अशी अवस्था होत्ये ती.

खाखातें (वि०) (ग्रं०) कर्कश.

खाग (पु. ना.) (ग्रं०) मोक्ष.

खागें (न. ना.) (ग्रं०) सूर्यचंद्रांभोंवतें पडतें खळें तें.

खांच (स्त्री. ना.) खळगा. २ व्यापारादिकांत येतो तोटा ती.

खांचखोंच (स्त्री. ना.) गायनादिकांतील डाव पेंच इ० ती. २ लेखादिकांतील न्यूनाधिक भाव ती.

खाज (खजूं) (स्त्री. ना.) कंडू.

खाजवाखाजव (स्त्री. ना.) दुसऱ्यानें चिडून कलहास प्रवृत्त व्हावें म्हणून केली जी चेष्टा ती.

खाजविणें (धा. ना.) कंड जावया जोगा नखादिकांचा व्यापार करणें.

खाजुगें (न. ना.) (ग्रं०) खाजें.

खाजें (न. ना.) खारीक, खोबरें इ० मधुर पदार्थ तें. [२ (वि०) खाद्य.

खाट (सं. खट्वा) (स्त्री. ना.) बाज.

खाटलें (न. ना.) खाट.

खाटीक (सं. खट्टिक) (पु. ना.) पशु इ० कांचा वध करणारी व त्यांचें मांस विकणारी एक निर्दय जाति आहे ती. २ (वि०) निर्दय.

खाडा (पु. ना.) खळगा. २ (सं. खंड) सतत चाललेल्या कामास मध्यें विराम तो. ३ तो विराम ज्यावेळेस होतो तो काळ.

खाडाग (वि०) सर्वोपायानें दूध देत नाहीं अशी गाय इ० ती.

खाडी (स्त्री. ना.) ज्या नदींत समुद्राचें भरतीचें पाणी जेथवर येतें तेथवर त्या नदीसच म्हणण्याचा व्यवहार आहे. [त्याचें क्षत तें.

खांडूक (न. ना.) गळू इ० तें किं०

खाण (सं. खनि) (स्त्री. ना.) ज्या ज्या स्थळीं जो जो पदार्थ उत्पन्न होतो तें तें स्थळ त्याची त्याची.

खाणावळ (स्त्री. ना.) जेथें पैसा देऊन जेवायास मिळतें ती जागा. २ खाण्याबद्दल द्यावें लागतें मोल ती.

खाणें (धा. ना.) अन्न इ० पदार्थ तोंडांत घालून गळ्याखालीं उतरे असा करणें. [२ काळीजखाऊ.

खाणोरी (वि०) (ग्रं०) खादाड.

खातर (अ० स्त्री. ना.) हा भारी, हा मान्य, हा पूज्य अशी बुद्धि ती. २ हा खरा किं० लबाड असा मनाचा निःसंशयपणा ती.

खातरजमा (फा० स्त्री. ना.) खातर.

खातरी (स्त्री. ना.) खातरजमा.

खाताजेवता (खाणें, जेवणें) (वि०)

ज्यास खाण्याजेवण्याचे पदार्थांची उणीव नाहीं तो.

खातापिता (वि०) खाता जेवता.

खातें (न. ना.) रोजखरच्यावर एकाचे नांवें अनेक रकमा अनेक पानांवर असतात त्यांचें नांव दुसऱ्या कागदावर लिहून त्या खालीं त्या देण्याघेण्याच्या सर्व रकमा लिहितात तो जो कागद तें. २ ज्याज्या नांवाखालीं ज्या ज्या समुदायाची किं० व्यवहाराची घडामोड होत्ये तन्नामयुक्त जो तो समुदाय किं० व्यवहार तें.

खादणें (धा. ना.) (ग्रं०) खाणें.

खादाड (वि०) सर्वदा खाण्यावर ज्याचें चित्त तो.

खांदी (स्त्री. ना) वृक्षाचे मुख्य शरीरास जो अवयव फुटतो ती.

खादी (स्त्री. ना.) हलके किमतीचें एक पांढरें वस्त्र आहे.

खाद्य (सं. न. ना.) चावून खाण्याचा [पदार्थ तो.

खानेसुमारी (फा० स्त्री. ना.) शहर, गांव इ०कांतील घरें इ०कांचे गणनेचा सरकारांतून कागद कारितात ती.

खापर (सं. खर्पर) (न. ना.) धान्य इ० भाजायासाठीं किं० खापरपोळी करण्यासाठीं जें मातीचें पात्र करितात तें. २ कधीं कधीं सर्व मातीचे पात्रांस किंवा धातूच्या भांड्यासही म्हणतात डोईवर खापर फुटणें इ० कोणेकाने दुर्निमित्ताचें अधिकारी होणें.

खापरखुंटी (स्त्री. ना.) खापराचा तुकडा ती.

खापरसून (न. ना.) एक धातु आहे.

खांबा (पु. ना.) (ग्रं०) अंकुर.

खाबू (वि०) खाणारा.

खामाखाय (अव्य०) निश्चयपूर्वक.

खार (सं. क्षार) (पु. ना.) मीठ, तुरटी इ० पदार्थ ते प्र०. २ लोणच्यांतील रस तो. ३ (स्त्री.) खडी नावाचा क्षुद्र प्राणी ती. पदरास खार न लागूं देणें इ० आपला तोटा न होई असें करणें.

खारा (वि०) अंगीं खारेपणा ज्याच्या असा पाणी इ० पदार्थ तो.

खाराखीर (स्त्री. ना.) थोड्या विषयासाठीं जी कोणेकाबरोबर ओढाताण ती.

खाल (स्त्री. ना.) अंगावरील कातडें.

खालसा (अर० पु. ना.) ज्याकडे जो गांव इ० इनाम, जहागिर होता तो त्याजकडून सरकारांत घेण्याचा व्यापार तो.

खाला (स्त्री. ना.) (ग्रं०) बाहुली.

खालावणें (खालीं) (धा. ना.) धन, संपत्ति, ऊन इ० कमी होणें. २ संपत्ति इ०कमी झाल्यामुळें कोणेकानें खराबीस येणें. ३ (ग्रं०) उंचस्थळींचा पदार्थ अधोभागीं करणें.

खालीं (अव्य०) अधोभागीं. २ गुण इ०कांनीं न्यूनदर्शन. ३ (वि०) रिक्त जें स्थळ इ० तें.

खावंद (फा० पु. ना.) धनी, मालक.

खास (अर० अव्य०) खचीतपणानें.

खासगत (अर० वि०) स्वतःचा जो पदार्थादि तो. २ (अव्य०) स्वतः त्यास.

खासदार (पु. ना.) घोड्याचे चाकरीकरितां ठेविला जो मनुष्य तो.

खासा (अर० वि०) मोठा जो मनुष्य त्यास सेवक इ० म्हणतात. २ उत्तम गुणादिकेंकरून युक्त तो.

खिचड (पु. ना.) (ग्रं०) मिसळ.

खिचडी (स्त्री. ना.) तांदूळ, डाळ इ०कांचा मिश्रित समुदाय तो. २ दाटीस म्हणतात.

खिचा (पु. ना.) (ग्रं०) [illegible]यकाळ.

खिजणें (धा. ना.) दुसऱ्यानें वर्म काढल्यामुळें क्रोधानें युक्त होणें.

खिंड (स्त्री. ना.) दोन बाजूंस डोंगर इ० उंचवटे असून मध्यें अडचणीचा मार्ग असतो तो.

खिडकी (स्त्री. ना.) उजेड पडावा, वारा यावा इ० कांसाठीं चौकटीस गरादे बसवून किं० दरवाजासारखी लावितात ती.

खिडूकमिडूक (न. ना.) मोडकातोडका जो प्रायः दागिन्यांचा समुदाय तें.

खितपणें (धा. ना.) क्षीण व्हावयाजोगें बहुत दिवस दुखण्यांत पडणें.

खिजमत, दमत (फा० स्त्री. ना.) सेवा, आर्जव इ० तो.

खिजमतगार (फा० पु. ना.) जोडा संभाळणें, पाय रगडणें इ० कामें करायासाठीं ठेवितात जो शूद्रादि तो.

खिदाळणें (धा. ना.) अमर्यादपणें हास्य, चेष्टा इ० करणें.

खिन्न (सं. वि०) खेदयुक्त.

खिरा (पु. ना.) काकडींत एक जाति आहे.

खिरापत (फा० स्त्री. ना.) कथा इ० समारंभांमध्यें नारळ, साकर, हरभऱ्याची भिजलेली डाळ इ० वांटितात तो.

खिलात (अर० स्त्री. ना.) राजा स्हदर्शी कोणेकास प्रतिष्ठार्थ जें वस्त्रादि देतात ती.

खिलार, ल्लार (न. ना.) गायी इ० कांचा जो समुदाय तें.

खिसगणती (स्त्री. ना.) खातर.

खिसमिस (फा० स्त्री. ना.) ज्यांत बीज नाहीं अशी द्राक्षांची एक जाति आहे.

खिसा (फा० पु. ना.) कांहीं पदार्थ ठेवण्याकरितां पिशवीचे आकाराचा अंगरख्यास लावितात अवयव तो.

खिस्त (अर० स्त्री. ना.) कोणेकास प्रातःकाळीं रुपये द्यावे व सायंकाळीं त्याचें व्याज व ते रुपये त्यापासून घ्यावे अशा रीतीचा व्यवहार तो. आठचार दिवसांचेही बोलीचा असा व्यवहार असतो. २ कांहीं कार्यांतील ज्या अनेक कडाकुटी त्यांस त्रासानें म्हणतात.

खिळखिळा (वि०) ओढाताण इ० कारणामुळें ज्याचे सांधे शिथिल झाले तो.

**खिळखिळीत** (वि०) खिळखिळा.

**खीच** (स्त्री. ना.) (ग्रं०) खिचडी, एकत्रपणा.

**खीर** (सं. क्षिप्रा) (क्षीर) (स्त्री. ना.) दुधामध्यें गव्हले, नादळ इ० घालून अग्नीच्या संयोगानें आटवून पक्वान्न करितात तें.

**खीळ** (सं. कील) (स्त्री. ना.) दरवाजा इ० कानें प्रतिबंधार्थ जें अडकण करितात तें.

**खुजट** (वि०) स्वभावतः किंवा रोगानें जो ठेंगणा मनुष्यादि तो.

**खुजा** (वि०) ठेंगणा.

**खुंट** (पु. न. ना.) ज्यास पानें इ० कांहीं नाहींत केवळ सोट असा वृक्ष तो. २ हजामत केल्यावर हातास लागणारा केशांश तो. ३ पृथ्वीचे जे चार कोपरे ते प्र०. ४ जेथें न्हावी इ० भिन्नाइकांचा बाट पाहात जमून बसतात तो. ५ दूरदेशीं जाण्यास जितक्यांनीं मिळून भाड्यानें जी गाडी केली त्यांतील प्रत्येक मनुष्य तो. ६ खुंटावरचा कावळा म्ह० ज्या स्थळीं ज्या मनुष्यास परदार, वतनवाडी, बायकोमुलें इ० नाहींत त्यास त्या स्थळीं म्हणतात.

**खुंटणें** (धा. ना.) प्रतिबंधादि कारणामुळें कोणेकानें कुंठित गति होणें. २ परिमित पदार्थांचा अंश कमी होणें.

**खुटुखुटू** (अव्य०) हळूहळूपणानें.

**खुडकणें** (धा. ना.) उपाय चालेनासा झाल्यामुळें हाकामा ीन बसणें.

**खुडणें** (धा. ना.) झाडाचीं पानें इ० नखांनीं तोडणें, कुरतुडणें.

**खुडा** (वि०) फार काम इ० कांमुळें किंवा तो तो अवयव बहुत वेळ एकसारखा धरल्यामुळें त्यास जो जडपणा येतो तो.

**खुणगांठ** (स्त्री. ना.) कांहींएक गोष्टीचें कोणेकास स्मरण राहावें म्हणून जी त्याचे पदरास गांठ देतात ती.

**खुतखाबीज** (स्त्री. ना.) (ग्रं०) मालकीण, धनीण.

**खुंतणें** (धा. ना.) (ग्रं०) ध्यान करणें.

**खुद** (फा० वि०) खासगत.

**खुनशी** (स्त्री. ना.) खुनस करण्याचा स्वभाव ज्याचा तो

**खुनस** (पु. स्त्री. ना.) आपला अपराध कोणी केला असतां त्याचें त्याकाळीं शासन न होई म्हणून स्मरण धरून कालांतरानें सूड उगविण्याचा मनांत धरिलेला भाव तो.

**खुनी** (फा० वि०) ज्याणें खून केला आहे तो.

**खुपणें** (धा. ना.) डोळा, शरीर इ० कांत केर, कांटा इ० शिरल्यामुळें त्यांनीं सतत वेदना उत्पन्न करणें. २ नेत्रादिकांनीं त्या वेदनेनें युक्त होणें. ३ कोणेकानें डोळा, मन इ० कांत खुपणें म्ह० असहनता उत्पन्न करणें.

**खुपसणें** (धा. ना.) कांहींएक पदार्थांत जोरानें हस्तादि शिरविणें.

**खुबसुरत** (फा० वि०) सुंदर.

[खु]बा (पु. ना.) गुडघा इ० शरीरा-वयवाचे सांध्यांनें हाडांचा वर्तुल उंचवटा तो.

[खु]बी (फा० स्त्री. ना.) कोणेक पदार्थ सर्व प्रकारें जाणल्यावर त्यांत मनास आनंद होण्याजोगा जो धर्मविशेष असतो तो. २ कोणेक पदार्थांत असतें गुप्त मर्म तो.

खुमखुम (स्त्री. ना.) कोणेकांत असते जी बळ इ० कांची अहंता ती.

खुमारी (अर० स्त्री. ना.) खुमी.

खुरखूर (स्त्री. ना.) खुमखुम. २ कांहीं गोष्टीविषयीं अंतःकरणास लागते चटपट ती. [इ० खरडून काढणें.

खुरपणें (धा. ना.) खुरप्यांनें गवत

खुरपें (न. ना.) गवत इ० काढाया-चें एक लोखंडी औत आहे तें.

खुरशी (अर० स्त्री. ना.) उंच बसा-यांचे उपयोगी ज्यास चार पाय व टेकायाचें साधन असतें असें लाकूड इ० कांचें केलेलें एक आसन आहे ती.

खुराक (फा. पु. ना.) शरीरास पुष्टि यावी म्हणून तूप, साखर इ० पदार्थ नियमशः खाणात तो.

खुर्दा (फा० पु. ना.) रुपया इ० मोठें नाणें देऊन जें तांबें इ० कांचें पैसे इ० नाणें घेतात तो.

खुलणें (धा० ना.) स्तुति इ० कानें कोणेकाचें अंतःकरण प्रसन्न होणें. २ रंगादिकांच्या योगानें घर इ० कांनीं सुशोभित दिसायाजोग्या अवस्थेस पावणें.

खुला (वि०) उघडा. २ रिकामा जो तो.

खुलासा (अर० पु. ना.) अंतःकरण, भाषण इ० कांतील गुप्त आशय तो. २ घर, बाग इ० कांच्याठायीं जी रमणीयता असते तो.

खुश (फा. वि०) आनंदयुक्त.

खुशकी (फा० स्त्री. ना.) पायांनीं जायाजोगा जो मार्ग ती. याचा प्रयोग जलमार्गाचे संबंधानें येतो.

खुशबोई (फा० स्त्री. ना.) सुवास.

खुशामत (फा० स्त्री. ना.) आर्जव.

खुशाल (फा० सं. कुशल) (वि०) संपत्ति इ० कारणामुळें आनंदयुक्त तो. २ (अव्य०) काळजी न बाळगितां जाणें, येणें इ० कांचे वि०.

खुशाली (स्त्री. ना.) संतोष.

खुशी (फा० स्त्री. ना.) संतोष. २ (वि०) संतुष्ट.

खुसपट (न. ना.) चीड यायाजोगें किं० अपातेष्ट व्हावयाजोगें जें कोणेकाचें मर्म तें, किं० मूळ नसतां कलहास कारण तें.

खुळगा (पु. ना.) रेडा.

खुळपट (खुळा) (वि०) वांकडा झाला जो हात, पाय इ० अवयव तो व तसा मनुष्य तो.

खुळा (वि०) वेडा. २ खुळपट.

खूण (स्त्री. ना.) पदार्थांवर करितात किं० स्वतःसिद्ध असतें जें चिन्ह तें. २ गुप्तरूपानें आपला अभिप्राय दुसऱ्यास कळावा म्हणून करितात जो नेत्र, हस्त इ० कांनीं संकेत तो.

खून (फा० पु. ना.) मनुष्यवध. खून चढणें म्ह० खून केला त्या वेळेस खुनाचा उन्माद चढणें.

खूब (फा० वि०) पुष्कळ. २ चांगला

खूळ (न. ना.) वेड. २ लोकांस उपद्रवकारक जें वेड तें. ३ मुरळीतपणानें होणारे कार्यांस मध्यें जें विघ्न तें.

खेंकाळणें (धा. ना.) घोड्यानें हिसणें. २ मनुष्यानें मोठ्यानें हंसणें त्यास निंदेनें म्हणतात. [२ आंवळणें.

खेंचणें (धा. ना.) ओढणें, ताणणें.

खेंचर (फा० न. ना.) घोड्यापासून गाढवीचेठायीं किं० गाढवापासून घोडीचेठायीं उत्पन्न होते अशी एक पशुजाति आहे.

खेचर ( सं. वि० ) आकाशमार्गानें जाणारे पक्षी, नक्षत्रादि ते प्र०.

खेंचाखेंच (स्त्री. ना.) ओढाताण.

खेट (स्त्री. ना.) दाटी.

खेटणें (धा. ना.) चालण्यानें कोणेक मार्गाचा भवधि हस्तगत होई असें करणें. २ कोणी कोणाशीं अंतर न राहावयाजोगें समीप होणें.

खेटर (न. ना.) जोडा, वहाण यांस निंदेनें म्हणतात.

खेटरखाऊ (वि०) कांहीं कर्माविषयीं दुसऱ्यानें शिव्या दिल्या, खेटरें मारलीं तथापि ज्यास लाज नाहीं; पुन: खेटरें खावीं अशा स्वभावाचा तो.

खेटा (पु. ना.) वेरझार, येरझार.

खेडकुली (स्त्री. ना.) (ग्रं०) उप[illegible]

खेडें (सं. खेटक) (न. ना.) ल[illegible] गाव तें.

खेद (सं. पु. ना.) इष्टपदार्थांचा योग किं० अनिष्ट पदार्थांची प्रा[illegible]प्ति झाल्यामुळें अंत:करणास व्यथा उत्पन्न होते तो.

खेप (स्त्री. ना.) कोणेएक स्थळीं [illegible]णें, येणें मिळून जो एक व्या[illegible] ती. २ देशांत राहून देशांतरीं [illegible]ला, गेला, जो बैल, गलबतें [illegible] कावर जिन्नस त्याचा भरणा [illegible]

खेरीज (भर० वि०) शिवाय. २ [illegible]

खेंव (सं. क्षेम.) (स्त्री. ना.) आलि[illegible]

खेव (अव्य०) (ग्रं०) तत्क्षणीं.

खेवण (न. ना.) (ग्रं०) कोंदण.

खेवणें (न. ना.) (ग्रं०) शोभा.

खेवमी (सं. क्षोणी) (स्त्री. ना.) ([illegible] पृथ्वी.

खेळ (सं. खेलन) ( पु. ना.) [illegible] विनोदार्थ ज्या अनेक प्रकार[illegible] क्रीडा त्या प्र०. २ त्यास स[illegible] सोंकट्या इ० ते प्र०.

खेळणी (खेळ) (स्त्री. ना.) [illegible] व्यापार न करितां खेळण्याचा [illegible]पार ती. २ खेळण्याविषयीं सं[illegible] नियत जो काळ ती.

खेळीमेळी (स्त्री. ना.) परस्प[illegible] थट्टा, मस्करी करावयाजोग[illegible] परस्परांचा मित्रभाव ती. २ [illegible] क्रमणेसाठीं ज्या थट्टा, विनोद नानाप्रकारच्या चेष्टा ती.

खैरात (फा० स्त्री. ना.) यवन लोक फकीर इ०कांस धर्मार्थ जें द्रव्य वांटितात तें.

खैवंग (वि०) (ग्रं०) बळकट.

खैस (पु. ना.) खवीस.

खो (सं.क्षय) (पु. ना.)(ग्रं०) नाश. २ विपत्तिकाळ. ३ कोणेकाचें कोणेक स्थळापासून उच्चाटन तें.

खोंक (स्त्री. ना.) दगड इ० लागल्यामुळें मस्तकादिकांस जें क्षत पडतें तें.

खोंकड (वि०) म्हातारपणामुळें जो जर्जर झाला तो. २ (स्त्री. ना.) कोल्ह्यासारखें रानांतील एक जनावर आहे.

खोंकर (वि०) (ग्रं०) फुटकें.

खोकला (पु. ना.) कास म्हणून एक रोग आहे; ज्याच्या योगानें कंठांतून खोखो असा शब्द होतो.

खोगीर (फा० न. ना.) घोड्याच्या पाठीवर घालायासाठीं जें बुरणूस, वस्त्र इ० काचें करितात तें.

खोगीरभरती (स्त्री. ना.) कांहींएक कार्याविषयीं गणनीय जे त्याहून इतरांस निंदेनें म्ह०.

खोंच (स्त्री. ना.) खोंक. २ गायन, भाषण, लेख इ० कांतील खुबी तें. ३ व्यापारांत जो तोटा तें.

खोंचणें (धा. ना.) पदार्थांचे छिद्रांत किं० छिद्र होई असा कांहींएक पदार्थ बळानें शिरकविणें. २ कोणी कोणाचें मर्म काढिल्यामुळें त्याणें तत्काळ भग्नोत्साह होणें.

खोचार (स्त्री. ना.) (ग्रं०) बंदूक.

खोजा (फा० पु. ना.) नपुंसक.

खोट, खोंट (स्त्री. ना.) पायल्याचा मागचा भाग तें. २ सोनें, रुपें इ० कांची जी लगड तें. ३ खोटेपणा. ४ व्यापारांत येतो जो तोटा तें. [लगड.

खोटी (स्त्री. ना.) खोळंबा. २ (ग्रं०)

खोटू (पु. ना.) (ग्रं०) लगड.

खोड (स्त्री. ना.) मनुष्यादि सर्व पदार्थमात्रांत किं० त्यांचे कृत्यांत ज्या गोष्टींचा अंश असावा तो नसणें; किं० नसावा तो असणें तें. २ दुसऱ्यास क्रोध यावयाजोगी जी चेष्टा तें. ३ हें आवडतें, हें नको असा स्वभाव तें. ४ (न.) मृदंगाचें लांकूड तें. ५ गंध उगाळण्याचा चंदनादिकांचा तुकडा तें.

खोडा (पु. ना.) मनुष्य इ० कांस अडकावायासाठीं लांकडाचें यंत्र करितात तें. २ गुंतून पडायाजोगा कांहींएक व्यापार तें.

खोडी (स्त्री. ना.) खोड.

खोत (पु. ना.) सरकारचे तर्फेनें गांव इ० कांचा वसूल जमा करण्यास योजिला असतो किं० वतनदार असतो असा अधिकारी तो. २ जकात इ० कामाचा मक्तेदार त्यासही म्हणतात.

खोदणें (धा. ना.) खणणें. २ उकरणें.

खोप (न. ना.) (ग्रं०) पोट.

खोपट, खोपटी (न. स्त्री. ना.) फार लहान घर.

**खोंपा** (पु. ना.) बायकांचे वेणीचा बुचडा.

**खोल** (वि०) उथळ नव्हे तें, ओंड. २ ज्याचा अर्थ उघड नव्हे असें जें भाषणादि तें. ३ ज्याच्या अंतःकरणांतील किं० भाषणांतील अभिप्राय एक एकीं समजत नाहीं असा जो मनुष्य किं० त्याचें अंतःकरण, भाषणादि तें इ०.

**खोलणें** (धा. ना.) (ग्रं०) उघडणें.

**खोलता** (पु. ना.) (ग्रं०) मशालची.

**खोली** (स्त्री. ना.) खोलपणा. २ घरामध्यें निजणें इ० कांकरितां जी निवांत जागा करितात ती.

**खोळंबा** (पु. ना.) कोणेक कार्यास जें साधन पाहिजे तें मिळेपर्यंत त्या कार्याची स्तब्धता ती.

**ख्यात** (सं. वि०) लोकप्रसिद्ध.

**ख्याति** (सं. स्त्री. ना.) शौर्यादि गुणेकरून जी लोकांत प्रसिद्धि ती.

**ख्यालीखुशाली** (स्त्री. ना.) चित्त रमविण्यासाठीं जे गाणें, बजावणें इ० व्यापार ती.

---

## —ग—

**ग**—हा वर्ण तिसरें व्यंजन आहे. (पु. ना.) संकेतानें गर्वास ह्मणतात. उ० त्या गृहस्थास अलीकडे गची फार पीडा झाली आहे.

**गई** (स्त्री. ना.) शासन करण्यास योग्य त्याची जी उपेक्षा ती.

**गगन** (सं. न. ना.) आकाश.

**गगनोळ** (न. ना.) (ग्रं०) आकाशाचें पुष्प.

**गंगाजमनी** (वि०) ज्या वस्त्राचे दोहींबाजूंचे कांठ दोहीं रंगांचे असतात तें वस्त्र. [पुच्छाचे काळे केंस.

**गंगावन** (सं. न. ना.) वनगाईच्या

**गचकळणें** (धा. ना.) नदी इ० कांत मनुष्यादिकानें नाकातोंडांत पाणी जाऊन घाबरें होऊन खालीं जा, वर ये अशा अवस्थेनें युक्त होणें. २ कोणेक व्यापारांत निभाव लागेनासा झाल्यामुळें हिसके खात राहणें.

**गचकळी** (स्त्री. ना.) गचकळण्याच्या व्यापारानें खालीं वर जाणें येणें अशी घडली जी आवृत्ति ती. २ कांहींएक आरंभिलेल्या कार्यांत भय इ० कारणामुळें कुंठित गति होण्याचा जो व्यापार ती.

**गचका** (पु. ना.) कांहींएक स्पर्धा अटकल्यामुळें किं० चालतांना उंच सखल जमीन लागल्यामुळें अकस्मात् जो आचका बसतो तो. २ तसा गचका बसण्याजोगें जें खळगा इ० स्थळ तें. ३ कांहींएक व्यापारामध्यें तोटा इ० धक्का बसतो तो.

**गचांडी** (स्त्री. ना.) मानेस अंगठा व तर्जनी या दोन बोटांच्या मधील भागानें जो धक्का देतात ती. २ त्याच वेळीं मानेसही ह्म०.

**गचावणें** (धा. ना.) गचकळणें.

**गच्च** (अव्य०) आंत पोकळी न राही अशा प्रकारें.

**गच्ची** (स्त्री. ना.) घर, वाडा इ० कांचे ठायीं चुन्यानें पिटून काढलेली भूमि ती. [व्यापार ती.

**गच्छंती** (स्त्री. ना.) पळून जाण्याचा

**गज** (फा० पु. ना.) चोवीस तसू प्रमाणाचें वस्त्रादि मोजण्याचें मान आहे तो. २ बंदुकींत बार ठासण्याचें उपयोगी लोखंडी छडी आहे ती. ३ खिडकी इ० कांस दोन चार बोटांचे अंतरानें प्रायः उभे तिथारी किं० काठीचे आकाराचे मारितात ते प्रत्येकीं. [रास.

**गंज** (स्त्री. पु. ना.) धान्यादिकांची

**गज** (सं. पु. ना.) हत्ती.

**गजगर्जीत** (वि०) मुलें, माणसें इ० कांची गलबल ज्यांत असते तें गृहादिक. [समुदाय.

**गजघंट** (पु. ना.) (ग्रं०) हत्तींचा

**गजनी** (स्त्री. ना.) गर्भसुती एका बाजूनें रंगीत असें एक उंची वस्त्र आहे.

**गजब** (अर० पु. ना.) अवसान खचायाजोगें मोठें संकट गुजरतें तो. २ दुसऱ्यानें दबलें जावयाजोगा जो शिव्या देणें, मारणें इ० घेगा तो.

**गजबज** (स्त्री. ना.) अनेक मनुष्य एकत्र असल्यामुळें त्यांचे शब्दाचा गलबा असतो ती.

**गजबजणें** (धा. ना.) कोणेक स्थळ गजबजीनें युक्त असणें. २ दरवडा इ० कारणामुळें धैर्य सुटून घाबरें होणें.

**गजर** (सं. पु. ना.) कीर्तनादिकांत ईश्वर नामोच्चारादि सर्व मिळून मोठा शब्द करितात तो, किं० अनेक वाद्यांचा मोठा शब्द तो. २ प्रहर भरला म्ह० तासावर सगळ्या प्रहराचे ठोके मारितात तो.

**गजरा** (पु. ना.) अनेक पुष्पें एकत्र गुंफून हातांत घालायासाठीं करितात तो. २ स्त्रियांचें एक करभूषण आहे.

**गजांतलक्ष्मी** (सं. स्त्री. ना.) जीमध्यें हत्ती आहेत अशी संपत्ति ती. २ पंचा मात्र केवळ नेसायास मिळायाजोगी जी संपत्ति तीसही म्हणतात

**गट, गट्ट** (पु. ना.) एकचित्त मनुष्यांचा कांहीएक कार्यार्थ जमलेला समुदाय तो. २ (अव्य०) कांहीं एक पदार्थ त्वरेनें गिळतेसमयींचे शब्दाचें अनुकरण. गटकरणें म्ह० दुसऱ्याचें द्रव्य खाणें.

**गटकळी** (स्त्री. ना.) गटंगळी.

**गटंगळी** (स्त्री. ना.) गचकळी.

**गट्टी** (स्त्री. ना.) अत्यंत मित्रपणा ती.

**गठडी** (स्त्री. ना.) वस्त्रांत द्रव्यादि घालून जी पुरचुंडी बांधितात ती. २गुप्त द्रव्य. ३पिशाचादि उपद्रवामुळें निश्चेष्ट होऊन पडलेलें शरीर.

**गंठीसोड** (पु. ना.) (ग्रं०) भामट्या. २ कृपण.

**गट्ठा** (पु. ना.) कापूस, कापड इ० कांचें बैल इ०कांवर वाहून न्यावयाजोगें घट्ट बांधिलें ओझें तो.

**गड** (पु. ना.) पहाडी किल्ला.

**गंडकी** (सं. स्त्री. ना.) एक महान-

दी आहे. २ (ग्रं०) सोनें कसून पाहाण्याची कसोटी.

गडगंज (वि०) धनधान्यादिकेंकरून न समृद्धिमान् जें गृह किं० त्याचा धनी तो. २ (अव्य०) इष्ट कार्यास पुरे होई अशा प्रकारें.

गडगड (अव्य०) मेघ, रथ, गाड्या इ० कांचे गतिसमयींचे शब्दा अनुकरण. [चा समुदाय तो.

गडगडाट (पु. ना.) गडगड शब्दा-

गडगनेर (पु. ना.) केळवण.

गडगा,घा (पु. ना.) एकावर एक रचलेल्या अनेक दगडांचा ढीग तो.

गडत (अव्य०) अत्यंत अदृश्य होई अशा प्रकारें. उ० ह्या झाडींत सगळी फौज गडत झाली. २ (स्त्री. ना.) काळोख.

गडद,डत (न. ना.) अतिशय अंधकार तें. २(वि०)गर्द. [खळगा तें

गडदर (न. ना.) (ग्रं०) खोल जे

गडप (अव्य०) ठाव ठिकाण न लागे अशा प्रकारें.

गडबड (स्त्री. ना.) भाषण, वाद्यें इ० कांचा घोळ तो. २ त्यानें झालेली अंतःकरणाची व्यग्रता ती. ३ त्या व्यग्रतेनें कांहीं कामाची झाली बिघडाविघड ती. ४ इतर कार्य न सुचायाजोगा व्यापार तो इ०.

गडबडणें (धा. ना.) पात्रादि अनेक पदार्थांनीं आधारापासून सुटून गडबड असा शब्द करीत जाणें. २ व्यग्र चित्त होणें. ३ कांहीं पदार्थ गेर विल्हेस लागणें इ०.

गडा (पु. ना.) चार पैसे किं० कवड्या यांचा समुदाय तो. २ मनुष्याचे हातांत व घोड्याचे गळ्यांत काळ्या सुताचा दृष्ट इ० न व्हावी म्हणून बांधितात तो. एकाद्यास गडा घालणें म्ह० त्याचें भुलथापीनें द्रव्य हरण करणें. [जुडी. ४वाकर.

गडी (पु. ना.) गट्टी. २मित्र. ३(स्त्री.)

गड्डा (स्त्री. ना.) लहान भुईकोट किल्ला. २ दाहा दस्ते कागदांचा समुदाय तो.

गढूळ (वि०) खडूळ.

गण (सं. पु. ना.) समुदाय. २ देव, मनुष्य, राक्षस असे तीन ते प्रत्येकीं. ३ कवितेंत लघु, गुरु इ०कांवरून बांधिले आहेत जे आठ प्रकार ते प्र०. ४ सेवक इ०.

गणगोत (न. ना.) भाऊबंद, सोयरे धायरे इ० तें.

गणणें (सं. गणन) (धा. ना.) एक, दोन इ० मोजणें. २ हें भारी, हें तुच्छ असें मानणें. [अशी बुद्धि.

गणती (स्त्री. ना.)संख्या. २ हें तुच्छ

गणना (सं. स्त्री. ना.) गणती.

गणिका (सं. स्त्री. ना.) कळवंतीण.

गणित (सं. न. ना.) अंकांची घडामोड तें व त्यापासून सिद्ध झालें फळ तें.

गणीम (पु. ना.) (ग्रं०) गनीम.

गत (सं. गति) (स्त्री. ना.) अवस्थांतर. २ मृदंगादि वाद्य वाजविण्याच्या किं० नृत्याच्या अनेक रीति त्या प्रत्येकीं. ३ सादृश्य या अर्थी

प्रयोग. उ० नेव्याचेंगत काय करतोस. ४ (वि०) गेलेला. उ० गतवर्ष, गतगोष्ट इ०. ५ नाहींसा झालेला, गांवास गेलेला, किं० मरण पावलेला. उ० गतवस्तु, ग्रामांतरगत, गतभर्तृका.

गताळका (सं. गतालका) (स्त्री. ना. (ग्रं०) अंकेशा विधवा जी स्त्री ती.

गति (सं. स्त्री. ना.) कोणिक देशांतरीपर्यंत पाद इ० रूप टाकण्याचा व स्वस्थव्यापारानें पोंचण्याचा व्यापार तो. २ कांहींएक कार्याचा जो निर्वाह तो.

गत्यंतर (सं. न. ना.) उपायांतर.

गथागोवी (स्त्री. ना.) (ग्रं०) गुंता, गुंताडा. [नें. २ (वि०) मळकट.

गदळ (न. ना.) केर, कचरा इ० मळ

गदारोळ (पु. ना.) (ग्रं०) पांडित्य, व्याख्यान. २ गलबा. ३ (अव्य०) गदगद हंसणें.

गद्य (सं. न. ना.) जींत अक्षरें, मात्रा अमुक असाव्या असा नियम नाहीं ती कविता तें.

गंध (सं. पु. ना.) पुष्पादिकांतील सुवास. २ (न.) चंदनादिकांचें काष्ठ उगाळून देवादिकांस लावायास करितात तें. [आहे.

गंधर्व (सं. पु. ना.) देवांत एक जाति

गंधर्वनगर (सं. पु. ना) आकाशांत नगरासारिखें दिसतें तें.

गप, गप्प (स्त्री. ना.) मिथ्या गोष्ट ती.

गपकन, गपकर, गफदिशीं (अव्य०) अकस्मात्.

गपचप (अव्य०) न बोलतां.

गप्प (स्त्री. ना.) गप. २ (अव्य०) ठावठिकाण न लागायाजोगें होई अशा प्रकारें. [पणा.

गफलत (अर० स्त्री. ना.) असावधगबर (वि०) द्रव्यसंपन्न.

गबरू (वि०) शरीर, धन इ०कांनीं सुदृढ संपन्न तो.

गबेलें (न. ना.) चिखल, चुना इ० वाहून नेण्याचें पात्र तें.

गभस्ति (सं. पु. ना.) सूर्य.

गंभीर (सं. वि०) ज्याचा आशय एकाएकीं ध्यानांत येत नाहीं; किं० मोठ्या संकटांत जो घाबरत नाहीं; अ० जो उतावीळ होत नाहीं असा मनुष्यादि तो. २ अतिशयित खोल डोह इ० तो. ३ स्थिर चाललेलें नदी इ० कांचें पाणी, मेघ, समुद्र यांचा शब्द तो.

गमजा (फा० पु. ना.) गैररीत. २ शृंगारसंबंधी चेष्टा.

गमणें (सं. गमन) (धा. ना.) सुखानें काळ जाणें. २ (ग्रं०) भासणें. ३ व्यर्थ काळ घालविणें.

गमत, गंमत (स्त्री. ना.) सुखानें काळाचा अतिक्रम ती. २ तो काळ जाण्यास जें साधन ती.

गमन (सं. न. ना.) जाण्याचा व्यापार.

गमावणें (धा. ना.) कांहींएक पदार्थ सांडणें इ० कांच्या योगें नाहींसा करणें. २ मरणें. ३ अन्न इ० पालविणें.

गाय (स्त्री. ना.) गई.

गयाळ, ळी (वि०) ज्यास स्वतः ज्ञान नाहीं आणि सांगितलें समजत नाहीं असा मनुष्य तो. २ प-रागंदा झालेलें कूळ.

गर (पु. ना.) फलादिकांतील मगज तो. २ (सं. न.) विष.

गरक (अर० वि०) जल इ० कांचे ठायीं निमग्न झालेला. २ कांहींएक विषयांत जो निमग्न तो.

गरका (पु. ना.) नाचणें इ० कांचे वेळेस वाटोळें फिरण्याचा व्यापार तो. २ कांहीं पदार्थाभोंवता मनुष्यादिकांनीं घातला वेढा तो.

गरज (अर० स्त्री. ना.) ज्या पदार्थादिकांवांचून कोणेक कार्य अडलें जातें त्याची त्याविषयीं जी सापेक्षता ती. २ चालढकल.

गरत (सं. गृह, रत) (स्त्री. ना.) विवाह होऊन व्यभिचार दोषामुळें जी जातिभ्रष्ट झाली नाहीं ती स्त्री.

गरल (सं. न. ना.) विष.

गरळ (सं. गरल) (स्त्री. ना.) विषयुक्त सर्पादिकांची जी लाळ ती.

गरळा (पु. ना.) लहान मुलाचें औषध.

गराडा (पु. ना.) वेढा.

गराद (स्त्री. ना.) गजतृतीयार्थी.

गरादा (पु. ना.) गराद.

गरीब (अर० वि०) उद्दाम नव्हे तो व जो द्रव्यहीन तो.

गरीबगुरीब (वि०) गरीब इ० तो.

गरीबी (स्त्री. ना.) गरीबपणा.

गरुवती (स्त्री. ना.) (ग्रं०) गुरुत्व, श्रेष्ठपणा.

गरुवा (वि०) (ग्रं०) ज्ञातारा.

गरोदर (सं. वि०) गर्भवती. [शब्द.

गर्जना (सं. स्त्री. ना.) मेघादिकांचा

गर्त्ता (सं. स्त्री. ना.) खळी.

गर्द (वि०) गडद.

गर्दभ (सं. पु. ना.) गाढव.

गर्दी (फा० स्त्री. ना.) अतिशय दाटी. २ युद्ध, दंगा, पर्जन्य, शिव्या इ० कांच्या अतिशयास ह्मणतात.

गर्भ (सं. पु. ना.) मातेच्या उदरांतील रक्तरेतापासून झालेला जीव तो. २ पदार्थाचे आंतील भाग तो. ३ श्लोकादिकांतील जें तात्पर्य तो.

गर्भगाळित (गर्भ, गळणें) (वि०) कांहींएक कारणानें अतिशयित भ्यालेला तो.

गर्भश्रीमंत (सं. वि०) गर्भसुखी.

गर्भसुखी (सं. वि०) जो आपल्या उत्पत्तिकाळीं बहुत संपत्तिमान् तो.

गर्भिणी (सं. वि०) गर्भवती.

गर्व (सं. पु. ना.) अहंकार.

गर्विष्ट (वि०) ज्यास गर्व आहे तो.

गलतान (अर० वि०) गयाळ.

गलथा (पु. ना.) चौरंग, पाट, चिरा इ० कांचे बाजूस क्रमानें उतरता जो कांहींसा आकार करितात तो.

गलफटणें (गफलत) (धा. ना.) कांहीं पदार्थानें थोंग न लागायाजोगें चुकणें किं० सांडणें.

गलबत (न. ना.) नौका.

गलबल (स्त्री. ना.) गलका. २ कांहींएक व्यवहाराची किं० त्याच्या रचनेची घालमेल ती. ३ घाबरेपणा.

गलीम (अर० पु. ना.) शत्रु.

गलेलठ्ठ (वि०) अक्षरशत्रु असून शरीरानें धष्ट पुष्ट तो.

गल्ला (फा० पु. ना.) कित्येक मण, खंडी इ० रूप जो धान्याचा समुदाय तो.

गल्ली (स्त्री. ना.) लहान रस्ता.

गल्लीकुची (स्त्री. ना.) आडगल्ली.

गवगवा (पु. ना.) गलबल. २ कांहींएक गोष्टीची प्रसिद्धि.

गवसणी (स्त्री. ना.) वीणा इ० कास आच्छादनासाठीं जी तदाकार पिशवी करितात ती. [सांपडणें

गवसणें (सं. गवेषण) (धा. ना.)

गवांदी (स्त्री. ना.) (ग्रं०) अन्नसत्र.

गवाक्ष (सं. न. ना.) लहान खिडकी.

गव्हर (स्त्री. ना.) गुहा.

गव्हरणें (धा. ना.) (ग्रं०) सांगणें.

गव्हार (वि०) अप्रयोजक मनुष्यास ह्मणतात.

गस्त (फा० स्त्री. ना.) किल्ला, शहर इ० कांचे संरक्षणार्थ रात्रीं फिरण्यास ठेविला जो मनुष्यसमुदाय ती व त्या समुदायाचा जो फिरण्याचा व्यापार ती. २ (न.) मंडपादिकांचा जो खण तें.

गहन (सं. वि०) दुर्गम, दुर्ज्ञेय जो पदार्थ तो.

गहिरा (वि०) चांगला खुललेला जो रंग तो.

गहिंवर (सं. गह्वर) (पु. ना.) शोकादि कारणामुळें रडें येणापूर्वी जो कंठ दाटून येण्याची अवस्था तो.

गहींस (वि०) (ग्रं०) मूर्ख किं० अविचारी. २ धाईट.

गळ (पु. ना.) लहान लहान मासे धरण्यास लोखंडी कांट्याचें यंत्र करीत असतात तो. २ विहीर इ० कांतील पडलेलें पात्र इ० तें काढायास लोहादिकांचे अनेक आंकडे एकत्र करून करितात यंत्र तो. ३ मनुष्यास फांशीं देण्याचें यंत्र तो. ४ गळ घालणें ह्म० एकाद्यास आपलें कार्य करण्याविषयीं अत्यंत आग्रह करणें इ०.

गळंगा (पु. ना.) (ग्रं०) खरें खोटें, सोंवळें ओंवळें यांचा जेथें भेद नाहीं असा एकंकार तो.

गळणें (सं. गलन) (धा. ना.) आधारबंध शिथिल झाल्यामुळें खालीं गावयाजोगें त्यापासून वियुक्त होणें. २ छिद्रादिकारणामुळें पात्रांतून पदार्थ खालीं पडे असा होणें. ३ आरंभिलेला व्यापार तडीस न नेतां थकणें इ० कारणामुळें आरंभणारांतून कित्येकांनीं मागें राहणें,

गळती (गळणें) (स्त्री. ना.) गळ.

गळसोटी (स्त्री. ना.) गळ्यापाशीं होणारा एक रोग आहे.

गळा (सं. गल) कंठ.

गळहाटणें (धा. ना.) गलफटणें.

गळहाटा (पु. ना.) कांहींएक कार्याची अव्यवस्थेमुळें झालेली दुर्दशा तो. २ कडवा पेढा इ० कांचा पेंढ्याशिवाय जो पाचोळ्यांचा पसरलेला समुदाय तो.

गळाळा (पु. ना.) (ग्रं०) मधुर जो रस त्याची धारा तो.

गा (अव्य०)संबोधन अगा या अर्थाचें.

गाउली (स्त्री. ना.) (ग्रं०) गाय.

गागणें (धा. ना.) ओरडणें.

गांगरणें (धा. ना.) भय इ० कारणामुळें कांहीं सुचेना अशा अवस्थेस पावणें.

गांजणूक (स्त्री. ना.)गांजण्याचा व्यापार तो व त्यापासून झालेलें कोणास दुःख तें.

गांजणें (धा. ना.) कोणेकास चैन न पडे असें वारंवार दुःख देणें.

गाजणें (सं. गर्जन) (धा. ना.) मेघादिकांनीं गर्जना करणें. २ कांहींएक गोष्ट प्रसिद्ध होणें.

गाजतीरागीव (स्त्री. ना.) (ग्रं०) श्रुतीची गर्जना.

गाजी (अर० पु. ना.) कीर्ति वाखाणायाजोगा प्रतापी तो.

गांठ (सं. ग्रंथि) (स्त्री. ना.) दोरी आदिकरून पदार्थांचे पदर परस्पर गुंतवून त्यांचीं शेवटें ओढिलीं असतां जो कांहीं मध्यें टेंगळासारिखा विशेष होतो तो. २ परस्पराची दृष्टादृष्ट, उत्तर प्रत्युत्तर इ० व्हावया जोगा जो त्यांचा समीप संबंध तो. जिवाशीं, प्राणाशीं गांठ म्ह० त्याचा जाण्याचा प्रसंग असा अर्थ इ०.

गांठणें (गांठ) (धा. ना.) दोरी इ० गांठ देऊन बांधणें. २ ज्याच्याशीं आपलें कार्य आहे त्यास त्वरतेनें समीप करणें इ०.

गांठा (पु. ना.) (ग्रं०) पिंजरा. २ एक कंठभूषण पुरुषाचें आहे.

गांठोडी (स्त्री. ना.) गठडी.

गांठोडें (न. ना.) वस्त्र, धान्य इ० अनेक पदार्थ वस्त्रांत घालून गुंडाळून गांठ करितात तें. २ नागपंचमीचे दिवशीं एक पक्वान्न करीत असतात तें कि० गुप्त जें द्रव्य तें. [कपटी.

गांठयाळ (वि०) गांठळ. २ (ग्रं०)

गाडणें (धा. ना.) जमीन इ० कांत पुरणें. [झणतात.

गाडभरू (वि०) द्रव्यवानास निंदेनें

गाडा (पु. ना.) ज्यास दोन चाकें लावून ओझें इ० वाहण्यास जें वाहन करितात तो. २ ऊंस इ० कांस वर्तुळाकार काष्ठ असतें तो.

गाडी (स्त्री. ना.) लाहान गाडा.

गाडीवान (पु. ना.) गाडी हकण्याचें कसब करितो तो. [समर्थ तो.

गाडू (वि०) कांहींएक कार्याविषयीं अ-

गाडोरा (पु. ना.) (ग्रं०) घर इ० कांचा पाया.

गाढ (सं. वि०) निबिड.

गाढमूढ (वि०) अतिशयित गाढ.

गाढा (वि०) ज्या कसबांत जो पुरा तो. २ (ग्रं०) बलाढ्य.

गाणें (सं. गान) (न. ना.) ध्रुपद इ० तें. २ (धा. सा.) ध्रुपद इ० ह्मणणें. ३ (न.) लोकचलीत कंठाला येण्याजोगी जी गोष्ट तें.

गात्र (सं. न. ना.) अंग. [भिमान.

गाथा (पु. ना.)(ग्रं०) व्याख्या. २ अ-

गादी (स्त्री. ना.) निजणें किं० बसणें याकरितां वस्त्राचे पोटीं कापूस इ० घालून शिवून करितात ती. २ राजे इ० जे अधिकारी त्यांचे बसायाचें आसन ती.

गांध (स्त्री. ना.) पित्त इ० विकृतीनें कि० मुंगी इ० डसल्यामुळें शरीराची त्वचा जाड होऊन गांठीसारखी वर उठये ती.

गांधल (स्त्री. ना.) गांधिलमाशी.

गांधीलमाशी (स्त्री. ना.) माशांत एक भेद आहे. [भाषण.

गानवी (सं. गान) (ग्रं०) बोलणें,

गाफल, फील (अर० वि०) असावध.

गाबाळ (पु. ना.) पानें, कागद इ० कित्येक पदार्थ समुदायांतून चांगला चांगला अंश निवडून घेऊन राहिला जो अंश तो तें. [गर्भ तो.

गाभ (सं. अप०)(पु. ना.) उदरांतील

गाभा (सं. गर्भ) (पु. ना.) केळीचे झाडाच्या आंतील अंश तो. २ झाड इ० वृक्षाचे खोंड्याचा भाग तो. ३ वृक्षादिकांचे पोटीं जो कठिणांश असतो तो.

गाभारा (गर्भ) (पु. ना.) देवालयांतील मुख्य जें देव राहाण्याचें स्थळ तो.

गोभवन (न. ना.) (ग्रं०) सूक्ष्मांकुर.

गाय (सं. गौ) (स्त्री. ना.) शिंगें असून जिचे गळ्या खालची कातडी लोंबत असत्ये अशी एक पशुजाति आहे त्यांतील जी ती. २ (वि०) स्वभावानें जो गरीब तो.

गायक (वि०) गवई. [पार तें.

गायन (सं. न. ना.) गाण्याचा व्या-

गार (स्त्री. ना.) एक पांढरा धोंडा आहे. २ पर्जन्याचें उदक घट्ट जमून खडीसाकरेच्या खड्यासारख्या ज्या पडतात ती. ३ (वि०) अतिशय थंड पाणी इ० तें. ४ हिरवेपणाचा अतिशय वर्णायाचा असतां याचा प्रयोग होतो. उ० हें झाड हिरवें गार दिसतें. गार होणें म्ह० तृप्त होणें. [धोंडा ती.

गारगोटी (स्त्री. ना.) पांढरा वाटोळा

गारठा (गार) (पु. ना.) पाणी इ० पदार्थांत जो थंडपणाचा अतिशय असतो तो.

गारवा (पु. ना.) गारठा.

गारुडी (सं. गारुड) (पु. ना.) सर्पादि बाळगून त्यावर पोट भरतो तो.

गारूड (सं. गारुड)(न. ना.) इंद्रजाल. २ दुसऱ्यास फसवायाजोग्या अनेक प्रकारच्या युक्तींचा समुदाय तें.

गारोडी (पु. ना.) गारुडी.

गारोळा (वि०) घाऱ्या डोळ्यांचा.

गाऱ्हाणें (न. ना.) ज्यानें अपराध केला त्याचें जें दुसऱ्या कोणाजवळ कथन तें. २ देवाजवळ जो आपला अभिप्राय सांगणें तें.

गाल (सं. गल्ल) (पु. ना.) मुखाचे बाजूंचे दोहींकडील जे भाग ते प्रत्येकीं.

गालगुच्चा (गाल) (पु. ना.) गालास बोटांनीं जो चिमटा घेतात तो.

गालफट-ड (न. ना.) गालाचे आंतील किं० बाहेरील प्रदेश तें.

गालफुगी (स्त्री. ना.) जेणेंकरून गाल फुगतात असा एक रोग आहे; ज्यास गालगुंड म्हणतात ती.

गालीचा (फा० पु. ना.) प्रतिष्ठित लोकांचे बसायाचे उपयोगी एक चित्रवर्ण ऊर्णावस्त्र आहे तो.

गालेरा (गाल) (पु. ना.) गालगुचा.

गाव (पु. ना.) (ग्रं०) आश्रय.

गांव (स. ग्राम) (पु. ना.) ज्यास्थळीं घरें बांधून मनुष्यांची चिरकाळ वस्ती असते तो, किं० तिचा सीमावधि प्रदेश तो. २त्या स्थळीं राहणारा मनुष्यादि समुदाय तो ३ चार कोस किं० एक योजन तो. ४ कांहींएक गोष्ट गांवीं असणें, नसणें म्ह० लक्ष्यांत असणें, नसणें इ०. [जी भिंत असल्ये तें.

गांवकुसू (न. ना.) सर्व गांवाभोंवतीं गांवखुरी (अव्य०) गांवाचे आसपास.

गांवगन्ना (अव्य०) तालुका, महाल इ०कांचे पोटचे जे अनेक गांव त्या सर्वांस प्रत्येकीं धरून.

गांवगुंड (गांव, गुंडा) (वि०) गारूड्यास जिंकायासाठीं त्याची विद्या शिकतो तो. २ अंगीं तादृश विद्या नसतां जो दुसऱ्यास जिंकण्याविषयीं प्रवीण तो, किं० नानाप्रकारच्या लबाड्या करून गांवांत खेळ करितो तो.

गांवढळ (वि०) मोठ्या मनुष्याची रीत भात ज्यास कळत नाहीं आणि प्रायः जो गांवढे गांवांत राहातो असा मनुष्य तो व त्याचा भाषणादि व्यवहार तो.

गांवढें (न. ना.) लहान गांव.

गांवढेगा (वि०) (ग्रं०) गांवढळ.

गावाई (स्त्री. ना.) (ग्रं०) गलबला.

गावारें (न. ना.) (ग्रं०) गऱ्हाराण.

गाशा, गांशा (अर० पु. ना.) वरले अंगास सकलादीचे तुकडे व आंतले अंगास खारवा असें शिवून बसायाचे उपयोगी दुहेरी वस्त्र करितात तो. गांशा गुंडाळणें, आटोपणें म्ह० बिऱ्हाड आटपून पळून जाणें, अ० व्यापार इ० आटोपणें किं० मरणें.

गाहाण (न. ना.) सावकार इ० कर्ज इ०कांस पैका देतेसमयीं तो उगवेल न उगवेल म्हणून विश्वासार्थ जो माल ऐवज घेतो तें.

गाहाणवट (वि०) सावकाराकडे गाहाण ठेवलेलें वस्तु.

गाहाळ (वि०) ज्यामध्यें अव्यवस्थितपणा बहुत आहे असा जो मनुष्य व त्याचा कारभार इ० तो. २ गैरविल्हेस लागल्यामुळें सांपडेनासा झाला जो कागद पत्र इ० तो.

गाही (स्त्री. ना.) ग्वाही.

गाळ (पु. ना.) पाणी इ०कांचे तळीं

जमलेला मळ असतो तो. २ कांहीं एक पदार्थांतील चांगला चांगला अंश निवडून घेऊन वगळ सगळ अंश राहिला तो. ३ (स्त्री०)शिवी.

गाळण (स्त्री. ना.) गळून किं० थकून गेल्याप्रमाणें जी अवस्था होत्ये ती.

गाळणें (धा. ना.) जल इ० पातळ पदार्थ किं० कुटलेला बारीक पदार्थ त्यांतील शुद्धभाग काढण्यासाठीं वस्त्रादिकांवर घालून चांगला अंश पात्रांत पडे असें करणें. २ तीळ इ० पदार्थ घाणा इ०कांत घालून त्याचा द्रव काढणें. ३ क्रमास आलेला पदार्थ गोष्ट इ० वगळणें इ०.

गाळींव (गाळणें) (वि०) गाळलेला पाणी, चूर्ण इ० पदार्थ तो. २ अत्यंत या अर्थाचें द्योतक सोदा, लुच्चा, लबाड यांचें विशेषण.

गितू (न. ना.) (ग्रं०) गीत.

गिरगिरी (स्त्री. ना.) भोंवंड.

गिरा (पु. ना.)राहु.२(स्त्री. सं.)वाचा

गिरि (सं. पु. ना.) पर्वत.

गिर्कांडा,डी (स्त्री. ना.) चक्रासारिखें भोंवतें फिरण्याचा व्यापार. २ सरळ मार्ग सुटल्यामुळें जो फेरा तो.

गिर्की (स्त्री. ना.) मंडलाकार फिरण्याचा प्रकार तो. २ पित्तादि विकृतीमुळें जी घेरी येते ती.

गिऱ्हाईक (सं. ग्राहक) (वि०) दुसऱ्यापासून जिन्नस विकत घेणारा तो त्या प्रसंगीं. २ गुणादिकांचा ग्राहक तो.

गिलावा (फा० पु. ना.) भिंत इ० साफ व्हावी ह्मणून चुना किं० माती यांचा लेप देतात तो.

गिला (फा० पु. ना.) प्रपंचादि संबंधी रडगाणें तो. २ नालिश.

गिळंकृत (व. ना.)दुसऱ्याची ठेव इ० गिळण्याचा व्यापार तें.

गिळणें (सं. गिलन) (धा. ना.) कांहींएक पदार्थ तोंडांत घेऊन गळ्याचे आंत उतरेसा करणें. २ ठेव इ० गिळंकृत करणें. ३ दुसऱ्यानें केलेला अपराध किं० शिवीगाळ इ० त्याचा प्रतीकार न करितां उगें राहणें. ४ क्रोध, रडें इ० बाहेर दिसूं न देतां आंतलेआंत आटोपणें.

गी (स्त्री. ना.) (ग्रं०) वाचा.

गीत (सं. न. ना.) गायन.

गीति (सं. स्त्री. ना.) आर्याछंदांत एक भेद आहे.

गीता (सं. स्त्री. ना.) ईश्वरावतारांनी बोलिलेलें भगवद्गुणादि वर्णन ज्यांत आहे असे जे पुराणाचे लहान लहान अंश ते प्रत्येकीं ती.

गीर (पु. ना.) गर.

गीर्वाण (सं. पु. ना.) देव. २ (वि०) [संस्कृत भाषा.

गुंग (वि०) ज्वरादिकामुळें किं० कैफ खाल्यामुळें मोहयुक्त तो किं० शास्त्र इ० कांतील कठीण अंश पुरतेपणीं मनांत न आल्यामुळें मोह पावून परावृत्त झाला तो किं० गायन इ० विषयांत एकतानता झाल्यामुळें इतर व्यापारीं अनासक्त तो.

गुंगणें (धा. ना.) गुंग होऊन डुलूं लागणें. २ मुखानें वर्ण न उच्चारितां नाकांतील स्वरानें हुं हुं हुं हुं असें गायन करणें. ३ भोंवरा इ० कानें फिरतांना शब्द करणें.

गुंगारा (पु. ना.) कोणेकास फसवून पळण्याचा व्यापार तो.

गुंगी (स्त्री. ना.) गुंगपणा.

गुच्छ (सं. पु. ना.) झुबका.

गुजरणें (धा. ना.) गुदरणें.

गुजराण (फा. स्त्री. ना.) अल्प द्रव्य इ० सामग्रीनें संसारादिकांचा कसा तरी सरासरी निर्वाह तो.

गुजरी (स्त्री. ना.) सायंकालचे समयीं ऐनभरानें भरतो जो बाजार तो. २ लुगड्यांत एक भेद आहे.

गुजारत (स्त्री. ना.) देणें, घेणें इ० व्यवहारीं, प्रसंगी साक्षी इ० कर्माविषयीं उपयोगी पडायाकरितां कोणेकाचे समक्षतेचा संबंध करून ठेवितात तो इ०.

गुंजारव (सं. पु. ना.) भ्रमराचा शब्द.

गुजारा (पु. ना.) गुजराण.

गुटमळणें (धा. ना.) कांहींएक गोष्ट करावी कीं न करावी अशा विचारांत पडणें. २ गुपटणें.

गुडगुडी (स्त्री. ना.) तंबाखू इ० कित्येक पदार्थांचा धूर पिण्याचें यंत्र आहे तो.

गुडघा (पु. ना.) पायांचे मध्यभागाचे सांध्यांचा जो प्रायः वरील भाग तो.

गुडघी (स्त्री. ना.) गुडघ्यास एक रोग होत असतो तो.

गुडदी (स्त्री. ना.) शिसा इ० बारीक तोंडाचे पात्रास तोंडीं बसवितात जो काष्ठ इ० कांचा तुकडा तो.

गुंडा (पु. ना.) वाटोळा धोंडा. २ आटोकाट शाहाणा तो.

गुडाखू (स्त्री. ना.) तंबाखूंत गूळ घालून एकत्र कुटून गोळा करितात तो. २ दुर्दशा.

गुंडाळणें (धा. ना.) वेष्टणें. २ पसरलेला पदार्थ आकुंचित होई असा करणें. ३ वादादिकांत एकाद्यास पराजित करणें. [अतिशय तें.

गुडुप, प्प (न. ना.) अंधकाराचा

गुढार (न. ना.) दंग्यामुळें पळून आलेला मनुष्यसमुदाय तें. २ (ग्रं०) (पु.) हत्तीच्या पाठीवरील हौदा.

गुण (सं. न. ना.) सत्व, रज, तम हे तीन. २ विद्या, कला, सत्य शौर्यादि जे धर्म ते. ३ (पु.) दुखणें इ० कांची उतार दशा तो.

गुणगूण (स्त्री. ना.) दुसऱ्यास स्पष्ट ऐकायास न जाई असें भाषण, अध्ययनादि तो.

गुणज्ञ (सं. वि०) गुणाचा जाणता.

गुणाचा (वि०) भलेपणा इ० चांगले गुण ज्यामध्यें आहेत तो.

गुणावह (सं. वि०) जें औषधादि गुण देऊं लागतें तें.

गुणिजन (सं. वि०) गायनादि गुण ज्यामध्यें आहेत तो. [२ पंचाक्षरी.

गुणिया (पु. ना.) (ग्रं०) गारोडी.

गुंतणें (धा. ना.) मोकळें न व्हाया-

जोगें एकादे पदार्थांत किं० व्यवहारांत सांपडलें जाणें.

गुतणें (धा. ना.) गुंतणें.

गुतवळ (पु. ना.) विंचरणें इ० व्यापारानें डोकीचे केंसांतून तुटून गळालेला केश तो.

गुंता (पु. ना.) चाललेला किं० चालावयाचा कांहींएक व्यापार त्यास कांहीं काळ न चालायाजोगा जो प्रतिबंध प्राप्त होतो तो.

गुत्ता (पु. ना.) मक्ता.

गुथणें (धा. ना.) (ग्रं०) गुंफणें.

गुदगुद (स्त्री. ना.) कंड.

गुदगुली (स्त्री. ना.) शरीरास हस्तादि स्पर्श झाला असतां हंसें यावयाजोगा जो विकार होतो तो. २ कांहीं इष्ट गोष्टीच्या श्रवणानें आनंदासारखा अंतःकरणास जो विकार उत्पन्न होतो तो.

गुदमरणें, मुरणें (धा. ना.) नाकातोंडांतील श्वास बंद झाल्यामुळें घाबरणें.

गुदरणें (धा. ना.) आपण मोकळें व्हावें ह्मणून कोणेक व्यवहारादिकांत पदार्थ किं० मनुष्य यास संबद्ध करणें. २ अपरिहार्य संकट प्राप्त होणें. ३ ज्या ज्या काळीं जें जें कार्य करावयाचें किं० घडायाचें तें तें त्या काळीं न होतां किं० न घडतां तो तो काळ अतिक्रांत होणें. ४ मरणें.

गुदराण (स्त्री. ना.) गुजराण.

गुन्हा (फा० पु. ना.) अपराध.

गुन्हेगारी (फा० स्त्री. ना.) गुन्हा. २ त्या संबंधें गुन्हेगारापासून घेतात द्रव्य तें.

गुप्त (सं. वि०) बाह्यचक्षु इ० इंद्रियांस गोचर नव्हे तो.

गुप्ती (गुप्त) (स्त्री. ना.) एक शस्त्र आहे; जें प्रायः शस्त्र असें ओळखलें जात नाहीं.

गुंफणें (धा. ना.) शोभेसाठीं किं० कांहीं पदार्थ सिद्ध करायासाठीं तंतु इ० कांत पुष्पें इ० ओंवणें किं० संबद्ध करणें.

गुंफा (सं. गुंफ) (स्त्री. ना.) आंत राहावयाजोगें पर्वतादिकांस बीळ असतें तें. २ त्यासारखेंच जें स्थळ बांधून करितात तें.

गुंफिरा (पु. ना.) (ग्रं०) गुंताडा.

गुमान (फा० पु. ना.) खातर.

गुमास्ता (फा० पु. ना.) अन्यानें अंगें करावयाचें जें काम त्यावर जो त्यानें आपला मुखत्यार ठेविला असतो तो.

गुरकणी (स्त्री. ना.) व्याघ्र इ० कांनीं क्रोधाच्या आवेशानें केलेला शब्द तो. २ मनुष्यानें तसा केला जो शब्द तो.

गुरकावणी (स्त्री. ना.) दुसऱ्यानें दबलें जावें ह्मणून दाखविली जी गुरकणी ती.

गुरंगुटणें (धा. ना.) सर्व अवयव झांकत असें वस्त्र पांघरून घेणें.

गुरळी (स्त्री. ना.) (ग्रं०) चूळ.

गुराब (अर० स्त्री. ना.) मोठें लढाऊ गलबत.

गुरु (सं. पु. ना.) विद्या सांगणारा तो किं०बाप इ०जो आपणास पूज्य तो. २ बृहस्पति म्हणून जो देवांचा उपाध्याय तो. ३ दोन मात्रात्मक वर्ण तो. ४ वजनानें जड तो.

गुरुगम्य (सं. वि०) गुरुनें सांगितल्यावांचून समजायाचा नव्हे विषय तो.

गुरुपुत्र (सं. पु. ना.) गुरूचा मुलगा. २ जो सत्पुरुषाचा उपदेशी तो.

गुरुमंत्र (सं. पु. ना.) गुरुनें उपदेशिला मंत्र तो. २ कोणेकानें कोणेकास उपदेशिली बरी, वाईट गोष्ट तो.

गुर्मी (स्त्री. ना.) तारुण्य, विद्या इ० संबंधीं जो शरीरांतठायीं मद असतो ती.

गुर्विणी (सं. स्त्री. ना.) गर्भिणी.

गुऱ्हाळ (न. ना.) उंसाचा रस काढण्याचा व गूळ करण्याचा कारखाना तें.

गुलकंद (फा० पु. ना.) गुलाबाच्या फुलांत खडीसाखर घालून खाण्यास उपयोगी पदार्थ करितात तो.

गुलगुलीत (वि०) फार मऊ.

गुलछबु, शब्बु (फा० पु. ना.) एक फुलझाड आहे.

गुलजार (फा० वि०) सुंदर.

गुलत्रय (न. ना.) (ग्रं०) गूळ, राब, काकवी या तिहींचा समुदाय तें.

गुलबास (फा० स्त्री. ना.) एक फुलझाड आहे.

गुलछौशी (फा० वि०) द्रव्य व्ययादिकाचें भय न बाळगतां नानाप्रकारचे विषय भोगण्याचा ज्याचा स्वभाव तो.

गुलाब (फा० पु. ना.)एक फुलझाड आहे. २ त्याचें फूल तो. ३ त्या पुष्पांनीं सुवासित केलें पाणी तो.

गुलाबदाणी (फा० स्त्री. ना.) गुलाबपाणी ठेवण्याचें पात्र ती.

गुलाम (अर० पु. ना.) बटकीचा लेंक तो. २ महाहरामी तो.

गुलामगिरी (स्त्री. ना.) हरामीपणा. २ गुलामासारिखें आर्जवपूर्वक सेवादि कर्म ती.

गुलडाग (पु. ना.) तापविलेल्या खिळ्यानें दिलेला डाग तो.

गुली (स्त्री. ना.) (ग्रं०) गलबला.

गुहा (सं. स्त्री. ना.) पर्वत इ० कांच ठायीं व्याघ्रादिकांनीं आंत राहावयाजोगें जें पोळ असतें ती.

गुहिरा (पु. ना.) (ग्रं०) इच्छेस येईल तसा शरीराचा रंग धरणारा एक सरड्यासारिखा प्राणी आहे.

गुह्य (सं. न. ना.) उपस्थ. २ गुप्त वर्तमान इ० तें.

गुळणी (स्त्री. ना.) टाकायाच्या उद्देशानें तोंडांत घेतलें जें पाणी ती. २ कांहीं विकृतीनें तोंडांतून पडतो रक्ताचा चूळ ती.

गुळपापडी (स्त्री. ना.) एक पक्कान्न आहे. २ परोक्ष किं० पाठीमागें

अपराध करून समक्ष गांठ पडली असतां प्रसन्न करण्याविषयीं जें गोडगोड कपटाचें भाषण तें.

गुळवणी (न. ना.) गूळ मिसळलें पाणी. २ (ग्रं०) भाताची पेज मात्र ध्यावयास यावी असा हाल करण्याचा प्रकार तें.

गुळाचागणपति (पु. ना.) स्वतः हातानें कांहीं काम करावयाचें नाहीं, आणि दुसऱ्यास मात्र तूं आळशी आहेस तुझ्या कांहीं काम होत नाहीं असें म्हणणारा तो. २ थोडा बहुत अंगीं धनीपणा असून एकाद्या कारभाराविषयीं हें बरं कीं वाईट इ० कांहींच न बोलणारा तो.

गुळाळा (पु. ना.) (ग्रं०) गुळणी.

गुळुंब, भ (सं. गुल्म) (न. ना.) रक्तविकारानें शरीरावर गांठ उठत्ये तें.

गुळहार (न. ना.) गुऱ्हाळ.

गूज (सं. गुह्य) (न. ना.) (ग्रं०) कोणास न कळूं देण्याचें कांहीं वर्तमानादि तें.

गूढ (सं. वि०) गुप्त. २ ज्याचा बोध व्हावयास कठीण असा श्लोकादि किं० त्याचा अर्थ तो.

गूत (स्त्री. ना.) सूत्रादिकास जो मध्यें पिळा पडतो तो.

गूल (फा० पु. ना.) बंदूक इ०कांच्या तोंड्यास अग्नि लाविला असतां शेवटीं कळीसारिखा आकार होतो तो. २ खिळा इ० तापवून वर्तुळ डाग देतात तो. ३ (स्त्री. ना.) अकस्मात् कांहीं मारामार किं० चोर इ०कांची आवाई आल्यावरून लोकांनीं धारडूं लागावें, घाबरावें, पळूं लागावें अशी जी अवस्था ती. किं० तिणें झालेला गलबा तो.

गृह (सं. न. ना.) घर.

गृहस्थ (सं. पु. ना.) ज्यास बायको आहे तो. २ जो भिक्षुकानें पोट भरीत नाहीं तो. ३ भला मनुष्य.

गृहिणी (स्त्री. ना.) ज्याणें जिशी लग्न केलें ती त्याची.

गेंगाणा (वि०) ज्याचें सर्व भाषण नाकांतील स्वरांत होतें तो.

गेंडा (पु. ना.) एक अरण्यपशु आहे; ज्याचे नाकावर शिंग असतें.

गेंद (पु. ना.) मखमाल इ०कांचे फुलाचा गुच्छ तो. २ स्त्रियांचे पायांतील बोटांतलें एक भूषण आहे.

गेरू (सं. गैरिक) (स्त्री. ना.) कात.

गेळ (स्त्री. ना.) एक झाड आहे. २ (न.) तिचें फळ तें. ३ पशूचा चिरलेला खुर तो प्रत्येकीं.

गेळा (पु. ना.) तूप, तेल इ० ठेवायाचें लहान तोंडाचें एक पात्र आहे तो. २ गेळीचें फळ.

गैर (अर० अव्य०) कितीएक शब्दांमागें याचा योग होतो तेथें क्वचित् त्यावांचून असा त्याचा अर्थ जाणावा. उ० गैर अन्याय. गैर समजूत इ० २ (वि०) वास्तविक नव्हे तो असाही अर्थ होतो. उ० गैरमार्ग इ०.

गैरसाळ (वि०) खोटसाळ जें रुपया

इ० नाणें तो. २ ज्याच्या व्यवहारा-
ची रीत शुद्ध नाहीं असा जो म-
नुष्य तो व त्याचा भाषणादि व्यव-
हार तो.

गोखातू (अव्य०) (ग्रं०) मध्यंतरींच.

गोगलगाय (स्त्री. ना.) एक क्षुद्र जं-
तु आहे. २ (वि०) प्रकृतीनें अत्यं-
त गरीब तो.

गोंगाट (पु. ना.) माशा इ०कांचा
गोंगों शब्दाचा अतिशय तो.
२ गलबा. ३ कांहींएक गुह्य गो-
ष्टींची प्रसिद्धि.

गोचर (सं. पु. ना.) ज्या पदार्थाचें
प्रत्यक्ष ज्या इंद्रियास होतें तो त्यास.

गोचीड (पु. ना.) एक क्षुद्र जंतु आ-
हे जो प्राय: गाय, म्हैस इ० पशूं-
चे अंगावर पडतो.

गोटा (पु. ना.) आंतील पाणी आट-
लेला सुका नारळ. २ वाटोळा
दगड.

गोठण (स्त्री. ना.) पाण्याच्याजवळ
दोन प्रहरचे वेळेस गुरांस बसाया-
चो जी झाडाखालची जागा अ-
सते ती.

गोठणें (धा. ना.) द्रवयुक्त पातळ प-
दार्थानें घट्ट होणें. २ खणून केले-
ले भूमीनें चोप इ०कांनें घट्ट होणें.

गोठा (सं. गोष्ठ) (पु. ना.) घरांत गु-
रें बांधण्यास जी जागा केली अ-
सते तो.

गोड (वि०) मधुर. २ हृदयास आनंद
करणारा जो विषय तो. शेवट गोड
होणें म्ह० परिणाम चांगला होणें.

गोंडबी (स्त्री. ना.) विंच्याचे पोटांती-
ल बी ती. [अवयव ते.

गोंडस (वि०) मांसल जे हस्तपादादि

गोंडा (पु. ना.) मखमाल इ०कांचा
जें गुच्छसदृश पुष्प असतें तो.
तसाच रेशीम इ०कांचा पालखी
इ०कांस शोभेसाठीं बांधितात तो
किं० गाय इ०कांचे गुच्छास अ-
सतो तो.

गोंडाळ (वि०) गोंडस. २ (न. ना.)
तडागादि संबंधी जलावर लहान
लहान झाडें रुझतात तीं प्रत्येकीं.

गोडी (स्त्री. ना.) गोडपणा. २ अ-
भिरुचि. ३ परस्परांचा सख्यभाव
ती. [सख्य भाव ती.

गोडीगुलाबी (स्त्री. ना.) परस्परांचा

गोणताट (न. ना.) गोणपाट.

गोणपाट (न. ना.) तागाच्या सालीं-
चे तंतूंनीं विणलेलें जाडें वस्त्र; ज्या-
च्या गोण्या व पोतीं शिवतात तें.

गोणी (स्त्री. ना.) बैल इ०कांवर धा-
न्यादि वाहून नेण्याचे उपयोगी जें
कंठाळीसारिखें करितात ती.
२ कांहींएक व्यवहाराचें ओझें
किं० संकट ती.

गोत (सं. गोत्र) (न. ना.) गोत्रजा-
चा समुदाय तें.

गोता (अर० पु. ना.) वाकडी, पतंग
इ०कांस खालीं आणण्याकरितां
जी आचुका देतात तो. २ कांहीं
व्यवहारांत जो येतो तोटा तो.
३ व्यर्थ पडली जी येरझार तो.

गोतांबोल (स्त्री. ना.) (ग्रं०) अनेक

जातीचा जेवणें, शरीरसंबंध इ० सकर तो.

**गोत्र** (सं. न. ना.) वंशाचा मूळ पुरुष जो ऋषि तें. आणि त्याचा वंश तें.

**गोत्रज** (सं. वि०) जो ज्याचे गोत्रांत उत्पन्न झाला तो त्याचा.

**गोंद** (पु. ना.) झाडाचा चीक आहे.

**गोंदळा** (पु. ना.) (ग्रं०) समुदाय.

**गोंदी** (स्त्री. ना.) खाडीचें पाणी आंत येई अशा बेतानें जी गलबतें बांधायाकरितां जागा करितात ती.

**गोधळ** (पु. ना. (ग्र०) पिशाच.

**गोंधळ** (पु. ना.) देवीप्रीत्यर्थ गाणें, नाचणें इ० समारंभ तो. २ अनेकांनीं रडणें, ओरडणें, हंसणें इ०कृत कोलाहल तो. ३ अव्यवस्थित पदार्थादिकांची अव्यवस्था तो.

**गोंधळणें** (धा. ना.) व्यवस्था नाहींशी होणें. २ वायु इ०कांनीं समोर न जातां वाटोळें फिरूं लागणें. ३ कोणेक कार्यानें किं० त्याच्या कर्त्यानें एक सोय न सांपडल्यामुळें घोंटाळ्यांत पडणें.

**गोंधळीक** (वि०) गोधूलिक.

**गोधांगुळी** (स्त्री. ना.) धनुर्धराचें अंगुस्तन.

**गोधूम** (सं. पु. ना.) गहूं.

**गोधूलिक** (सं. वि०) सूर्यास्ताचें पूर्वापर घटिकार्ध मिळून जो. एक घटिकात्मक काल तें.

**गोप** (पु. ना.) सुवर्णाचा अलंकार आहे. २ एक तऱ्हेच्या विणकरीनें रेशीम इ० कांचा विणतात दोरा तो. ३ (सं.) गवळी ह्मणून जाति आहे तो.

**गोपुर** (सं. न. ना.) देवालयादिकांच्या परिघद्वारावर दुमजला तिमजला अशीं बंदिस्त बांधून जें करितात तें.

**गोफ** (पु. ना.) गोप.

**गोफण** (स्त्री. ना.) दगड मारायाकरितां सुंभ इ० कांची वळून करितात ती.

**गोंब** (स्त्री. ना.) (ग्रं०) गोम.

**गोम** (स्त्री. ना.) ज्यास बहुत पाय असतात असा एक क्षुद्र जंतु आहे ती. २ घोड्याचे अंगावर एक दुर्लक्षण असतें ती. ३ कांबळा, घोंगडी इ० कांचे शेवटास रेशमि इ० कांचे दोरे भरून करितात ती. ४ अनेक गुणांनीं युक्त जो मनुष्यादि त्याचे अंगीं एकादा दुर्गुण असतो ती.

**गोमटा** (वि०) (ग्रं०) सुरूप. २ (पु. ना.) सुरेखपणा.

**गोमय** (सं. न. ना.) गाईचें शेण.

**गोमा** (पु. ना.) इष्ट गोष्टीविषयीं दुसरा आग्रह करित असतां लटका उदासीनपणा दाखविण्याचा प्रकार तो. [ती.

**गोरगरीब** (वि०) गरीब, अनाथ इ०

**गोरज** (सं. वि०) गोधूलिक.

**गोरटी** (स्त्री. ना.) (ग्रं०) गोरे रंगाची स्त्री ती. [इ० तो.

**गोरस** (सं. पु. ना.) गायीचें दूध

**गोरांजन** (न. ना.) (ग्रं०) स्त्रिया किं० पुरुष जें आपणास ईश्वरप्रीत्यर्थ अग्नींत जाळून घेतात तें.

**गोरामोरा** (वि०) आपणास कोणी रागें भरलें असतां ज्याची विलक्षण मुखचर्या झाली तो व त्याचें मुख.

**गोरी** (पु. ना.) (ग्रं०) फांसेपारधी.

**गोरोचन** (सं. न. ना.) एक गाईचे मस्तकांत उत्पन्न होणारा सुगंधि पदार्थ आहे.

**गोल** (सं. पु. ना.) वर्तुळ किं० दीर्घवर्तुळ जो आकार तो. २ (वि०) वाटोळा. ३ (पु.) पागोटें इ० वस्त्रांत जो जरीचा पदर करितात तो.

**गोलंदाज** (फा० पु. ना.) तोफ मारण्याविषयीं ठेविला जो मनुष्य तो.

**गोलांगुल** (सं. पु. ना.) माकड.

**गोव** (स्त्री. ना.) (ग्रं०) गुंता.

**गोंवणें** (धा. ना.) गुंफणें. २ कोणीएक मनुष्यादिक कोणेक स्थळीं अ० व्यापारांत गुंतला जाई असें करणें.

**गोंवर** (सं. गोवर्ण) (पु. ना.) देवींसारखा एक रोग आहे तो. २ वाईट साईट केर कचरा तो. ३ गोंवऱ्यांचा चूर तो.

**गोवसा** (पु. ना.) (ग्रं०) नवस.

**गोवा** (पु. ना.) (ग्रं०) गुंता.

**गोंवारी** (पु. ना.) गुराखी. २ (स्त्री. ना.) एक झाड आहे व त्याची शेंग ती.

**गोशेरा, गोश्वारा** (फा० पु. ना.) कांहींएक गोष्ट, किं० प्रकरण यांतील तात्पर्यार्थ.

**गोष्ट** (सं. स्त्री. ना.) अर्थाचें अनुसंधान धरून जें वाक्य किं० वाक्यसमुदाय तो. २ सामान्य जो कांहींएक व्यापार त्यास ह्मणतात. ३ कोणेक स्थळीं किं० प्रकरणीं कोणेक गोष्टीचा किं० मनुष्याचा निघाला जो उल्लेख तो इ०.

**गोसावी** (सं. गोस्वामी) (पु. ना.) जो शूद्रादि शेंडी टाकून भगवीं वस्त्रें धारण करितो तो. २ कथा करणारा हरिदास तो. ३ घरदार, बायकापोरें इ० ज्यास नाहींत त्यास ह्मणतात.

**गोहाडी** (स्त्री. ना.) (ग्रं०) गुखाडी.

**गोहो** (पु. ना.) नवरा.

**गोळा** (सं. गोल) (पु. ना.) चूर्ण इ० कांचा किं० लोहादि धातूचा किं० काष्ठ इ० कांचा जमणें, जमविणें इ० कारणांनीं झाला किं० केला जो वर्तुलादि आकाररूप पदार्थ तो. २ (अव्य०) पसरलेला पदार्थ एकत्र होई अशा प्रकारें करणें इ० कांचें वि०.

**गोळागोळी** (स्त्री. ना.) बंदुकांच्या गोळ्या, तोफांचे गोळे इहींकरून जो परस्पर प्रहाराचा व्यापार ती.

**गोळाबेरीज** (स्त्री. ना.) सर्व बेरजा एकत्र मिळवून जी बेरीज ती. २ कांहींएक मोठी गोष्ट किं० विषय यांतील वेंचे घेऊन काढिलें जें तात्पर्य ती.

**गोळी** (स्त्री. ना.) बंदुकींत घालण्यास

थिर्जे इ० कांचा करितात तो.
२तशीच चूर्णादिकांची करितात ती.

गौ (सं. स्त्री. ना.) गाय.

गौडबंगाल (न. ना.) गारुडी इ० मंत्रसामर्थ्यकरून कित्येक पदार्थ उत्पन्न करून नाहींसे करितात अशा प्रकारचा खेळ तें. २ कार्य दिसावें आणि कारण दिसण्यांत येऊं नये असा जो कोणेक स्थळीं व्यापार घडतो तें.

गौंडी (पु. ना.) घर इ० कांच्या भिंती बांधित असतो अशी एक जाति आहे तो.

गौण (सं. वि०) मुख्य नव्हे तो.

गौर (सं. वि०) गोरा. २ (स्त्री.) एक देवी आहे ती.

गौरव (सं. पु. ना.) पदार्थसंबंधी जडपणा तें. २ अल्प प्रयत्नानें होणारे कार्यास बहुत प्रयत्न लाविला असतां जो दोष येतो तें. ३(पु. न.) सन्मान.

गौल्यता (स्त्री. ना.) श्रवण करणाराचे चित्तास आनंद व्हावयाजोगा जो भाषणांत मधुरपणा तो.

ग्रंथ (सं. पु. ना.) परस्पर संगतवार अर्थाचे वाक्यांचा जो रचनाविशिष्ट समुदाय तो. २ बत्तीस अक्षरांचा लिहिलेला जो समुदाय तो. ३ कांहींएक व्यवहारसंबंधी जी गोष्ट तो.

ग्रंथकार (सं. वि०) ग्रंथकर्ता

ग्रथणें (सं. ग्रथन) (धा. ना.) (ग्रं०) अर्थानुसंधानपूर्वक अनेक वाक्यें एकत्र जुळणें. २ पुष्पादिक गुंफणें.

ग्रंथी (सं. स्त्री. ना.) गांठ.

ग्रस्त (सं. वि०) ज्याणें जो गिळिला तो त्याणें. २ ऋण, रोग इ०कांनीं व्याप्त तो.

ग्रह (सं. पु. ना.) सूर्य, चंद्र इ० नऊ ते प्रत्येकीं. २ ब्रह्मराक्षसादि पिशाच तो. ३ पिशाचासारिखा उपद्रव करणारा जो मनुष्य त्यास म्हणतात. ४ सुसर इ० जलचर तो. ५ कोणेक पदार्थाचें भ्रमरूपेंकरून बुद्धीच्याठायीं भान तो.

ग्रहण (सं. न. ना.) अमावास्येस किं० पौर्णिमेस सूर्य व चंद्र यांचे आड दुसरे ग्रह आल्यामुळें जें त्याच्या बिंबाचें आच्छादन होतें तें. २ कोणेक विषयाचें बुद्धीनें किं० कांहीं पदार्थाचें हस्तानें जें स्वीकरण तें.

ग्राम (सं. पु. ना.) गांव. २ गाण्यांत सातस्वरांतील जे मुख्य तीन अवधि ते प्रत्येकीं.

ग्रामकूळ (पु. ना.) (ग्रं०) कुत्रा.

ग्रामज्य (न. ना.) (ग्रं०) मैथुनेच्छा.

ग्रामण्य (सं. न. ना.) ज्ञातींत कोणी विरुद्ध धर्माचरण केल्यामुळें त्यास जातीबाहेर टाकणें किं० कोणी दूषितास पावन करून जातींत घेणें. इ० विषयक जो खटला तें.

ग्रामस्थ (सं. वि०) गांवकरी.

ग्रामांतर (सं. न. ना.) अन्य जो ग्राम तें. २ आपल्या गांवाहून दुसऱ्या गांवीं जाण्याचा व्यापार तें.

ग्राम्य (सं. वि०) ग्रामाचे आश्रयानें उत्पन्न होतात व त्याचेच आश्रयानें राहातात असें जे पशु, पक्षी, वृक्ष इ० ते प्रत्येकीं. २ विषयभोगाचे ठायीं निरंतर आसक्त तो.

ग्रास (सं. पु. ना.) एकवार उचलून तोंडांत घातलें असतां गिळलें जावयाजोगें जें अन्नादि तो. २ ग्रासण्याचा जो व्यापार तो.

ग्रासणें (सं. ग्रसन) (धा. ना.) मनुष्यादि पदार्थ शत्रु इ० कांनीं ग्रस्त करणें.

ग्राह (सं. पु. ना.) मगर.

ग्राहक (सं. वि०) शास्त्रादि विषय ग्रहणाविषयीं बुद्धिकौशलरूप सामर्थ्य ज्याचें आहे तो. २ कोणिकाचे विद्यादिगुण ग्रहण करून त्याचा सन्मान करणारा जो मनुष्य तो.

ग्रीवा (सं. स्त्री. ना.) मान ह्मणून जो शरीरावयव तो.

ग्रीष्म (सं. पु. ना.) ज्येष्ठ व आषाढ असा द्विमासात्मक काळ तो.

ग्लह (सं. पु. ना.) डाव किं० पण.

ग्लानि (स्त्री. ना.) ग्ला.नि.

ग्लान (सं. वि०) ग्लानीनें युक्त.

ग्लानि (सं. स्त्री. ना.) दुखणें, श्रम, शोक इ० कारणांनीं शरीरावरील टवटवी जावयाजोगी जी अशक्तता-रूप अवस्था प्राप्त होत्ये ती. २ (ग्रं०) काकळूत.

ग्वाही (फा० पु. ना.) देणें, घेणें इ० व्यवहारीं किं० मारामारी इ० प्रसंगीं निःस्पृहितपणें तो तो विषय प्रत्यक्ष पाहणारा जो तो. २ (स्त्री.) त्या त्या विषयाच्या निर्णयप्रसंगीं जें त्याविषयींचें त्याचें भाषण ती व त्या व्यवहारसंबंधी जो त्याचे हातचा खत इ० लेख असतो ती.

---

## —घ—

घ— हा वर्ण चौथें व्यंजन आहे.

घट (सं. पु. ना.) जल इ० ठेवायाचें उपयोगी मृत्तिका, धातु इ० कांचें पात्र आहे तो. २ ईश्वरानें केलेलीं यच्चयावत् शरीरें तीं प्रत्येकीं. ३ (स्त्री.) धान्य इ० कांत मोजणें इ० कारणानें येत्ये तूट ती.

घंट (पु. ना.) (ग्रं०) समुदाय.

घटणें (धा. ना.) कमी होणें. २ कोणेकानें कांहीं विद्यादिकाचे अभ्यासामुळें प्रवीण होणें.

घटना (स्त्री. ना.) कांहींएक कार्य साधावयाविषयीं घटकाचें कर्म ती.

घटमूट (वि०) नाजूकपणा व सुरेखपणा असो किं० नसो परंतु बळकटपणा ज्यात आहे असें जें वस्त्र, गृह इ० तें.

घटस्फोट (सं. पु. ना.) जो पतित प्रायश्चित्त इच्छित नाहीं त्याच्या त्यागासाठीं जी क्रिया करितात तो.

घटा (पु. ना.) घसवटणें इ० कारणामुळें अंगावरील ज्या जागचें रक्त मरून घट्ट होतें तो.

घटाई (स्त्री. ना.) घटमूटपणा. २ तूट.

घंटापारधी (पु. ना.) (ग्रं०) गाय-

नादिकेंकरून मृगास भुलवून पा-
शांत घालतो तो.

घटाव (पु. ना.) डौल चांगला दि-
सायाजोगा जो सैन्यादिकांचा र-
चनाप्रकार तो किं० त्याणें आले-
ला डौल तो. २ घटना.

घटें (अव्य०) (ग्रं०) निश्चयेंकरून.

घट्ट (वि०) ज्यामध्यें जलांश किं०
पोकळपणा फारच कमी तो.

घट्टा (पु. ना.) घटा.

घट्टाई (स्त्री. ना.) घट्टपणा.

घड (पु. ना.) ज्या देंटास अनेक
फळें संलग्न असतात तो. २ चार
पांच वाट्या एकत्र जडलेलें कोशिं-
बीर इ० वाढण्याचें एक पात्रवि-
शेष करितात तो.

घडघड, घडघडां (अव्य०) रथादि-
कांच्या चालतेसमयींच्या शब्दाचें
अनुकरण. २ अस्खलितपणें मो-
घ्यानें वाचण्याचें वि०.

घडघडणें (धा. ना.) रथादिकांनीं
चालतेसमयीं घडघड शब्द होई
असें वाजणें. २ कांहीं कामकार-
भार इ० नष्ट होणें. ३ योजलेली
मसलत कोसळली जाणें. ४ संके-
तानें मरणास म्हणतात. ५ कांहीं
पदार्थांनें घडघडत पडणें.

घडघडाट (पु. ना.) घडघड शब्दा-
चा अतिशय.

घडण (सं. घटना) (स्त्री. ना.) घडून
आला जो पात्र, अलंकार इ० कांस
डौल तो. २ घडण्याचा व्यापार तो.
३ घडणावळ.

घडणावळ (स्त्री. ना.) पात्रादि घड-
ल्याची मजुरी ती. २ अलंकारादि-
कांचा डौल तो.

घडणें (धा. ना.) ठोकणें, तासणें इ०
व्यापारानें कांहींएक पदार्थ सिद्ध
करणें. २ कांहींएक गोष्ट ईश्वरेच्छे-
नें होणें. ३ कांहींएक गोष्ट कोणे-
कांचे हातानें झाली जाणें.

घडमोड (घडणें, मोडणें) (स्त्री. ना.)
कांहींएक भांडें, दागिना इ० कांचें
घडण्यामोडण्याचा व्यापार तो. २वा-
णिज्यादि व्यापार किं० राजकीय
अधिकारी इ० कांचें नवें जुनें करणें.

घडा (सं. घट) घागर.

घडामोड (स्त्री. ना.) घडमोड.

घडिघडी (अव्य०) वारंवार.

घडीबंद (वि०) ज्याची घडी मोडली
नाहीं असें वस्त्र तें.

घडी (स्त्री. ना.) घटिका. २ एकेरी
वरल दुहेरी, तिहेरी इ० केलें असतां
होते ती. [कार्याचें साधन तें.

घडीतें (न. ना.) (ग्रं०) कांहींएक

घड्याळ (न. ना.) कालमान समज-
ण्याचें यंत्र आहे.

घण (सं. घन) (पु. ना.) लोखंड,
तांबें इ० कांवर उचलून मारायाचें
एक लोखंडी औत आहे.

घणघणघंटा (स्त्री. ना.) कांहींएक
पदार्थांचा केवळ अभाव ती. [दाटी.

घणदाट (वि०)सघन, दाट. २(स्त्री.)

घन (पु. ना.) घण. २ (सं.) मेघ.

घनवटा (स्त्री. ना.) (ग्रं०) निजणें
इ० कांची गादी.

घण्याघोळ (पु. ना.) अनेक वाद्यांचा अव्यवस्थित मोठा शब्द. २ अनेक पदार्थ, अनेक कार्यें एकत्र मिळाल्यामुळें अव्यवस्थितपणा होऊन जो होतो गोंधळ तो.

घबाड (सं. न. ना.) एक मुहूर्त आहे. २ अल्प प्रयत्नानें मोठा लाभ होतो त्यास ह्मणतात. [सुदैव्याचें विशेषण.

घमघम (अव्य०) अतिशयित सुवास

घमघमाट (पु. ना.) सुवासाचा अतिशय.

घमंड (स्त्री. ना.) कार्यास पुरून उरायाजोगी जी पदार्थांची समृद्धि ती. २ कृपणपणावांचून पदार्थांचा उपभोग ती. ३ अहंता.

घमंडानंद (वि०) शरीरानें सुदृढ असून जेवायास मात्र यथास्थित मिळालें ह्म० मग इतर कोणतीही काळजी करीत नाहीं त्यास निंदेनें ह्मणतात.

घमंडी (स्त्री. ना.) घमंड.

घमशान, स्यान (न. ना.) लयलूट. २ (वि०) घमंडानंद.

घर (सं. गृह) (न. ना.) पर्जन्यादि निवारक, छायाकारक, संसारकृत्याचे उपयोगी जें काष्ठ इ० कांचें निर्मितस्थळ करितात तें. २ पशु, पक्षी इ० आपल्यास राहण्यास तृणादिकांचें कोठें, बीळ इ० करितात तें. ३ कित्येक वस्तूंचें उत्पत्तिस्थान तें किं० स्थितिस्थान तें. उ० पापाचें घर लोभ; पर्जन्याचें घर माघळ इ०. ४ घरांत राहणारीं कुटुंबाचीं मनुष्यें तें इ०.

घरगुती (घर) (वि०) माड्याचा, उसना, बाजारी इ० काढून भिन्न ह्म० केवळ घरचा.पदार्थादि तो.

घरघर (स्त्री. ना.) कंठांत कफ दाटल्यामुळें जो श्वासानें शब्द होतो तो. २ जातें फिरतेसमयीं जो शब्द होतो तो.

घरघेऊ (घर, घेणें) (वि०) दुसऱ्यास मोह घालून फसवून त्याचें घर घेण्याचा स्वभाव ज्याचा तो.

घरघेणा (वि०) (ग्रं०) घरघेऊ.

घरट (स्त्री. ना.) भात इ० दळायाचें मोठें जातें तो. २(ग्रं०) (न.) तस्त.

घरटी (स्त्री.ना.) घर. २(ग्रं०) गस्त.

घरटीकार (पु. ना.) (ग्रं०) गस्तकरी.

घरडुळणें (घर) (धा. ना.) (ग्रं०) घराचा झाडा घेणें.

घरंदाज (वि०) स्वसत्तेच्या घरांत असून राहणारा तो.

घरदार (न. ना.) घर इ० सर्व प्रपंचाचें खटलें तें.

घरबारी (वि०) बायका, पोरें इ० खटलें ज्याचे मागें आहे तो.

घरबूड (घर, बुडणें) (स्त्री. ना.) कांहींएक कारणानें सर्वस्वनाश ती.

घरभेद्या (वि०) घरांतील पक्का माहीतगार तो.

घरवरीत (स्त्री. ना.) (ग्रं०) घरवात.

घरवात (स्त्री. ना.) (ग्रं०) घरसंसारसंबंधीं कथा.

घराऊ (वि०) घरगुती.

घराणें (न. ना.) परंपरेनें चालत आ-

ला जो वंश किं० त्यांतील मनुष्य-समुदाय तें.

घरोबा (पु. ना.) वस्तुतः एका घरचे नसतां मित्रपणामुळें घराच्या सारखा झाला जो ऐक्यभाव तो.

घर्म (सं. पु. ना.) घाम. [पार तें.

घर्षण (सं. पु. ना.) घांसण्याचा व्या-

घवघवीत (वि०) पाहतांच नेत्रांस समाधान वाटायाजोगा जो ठळक दागिना, मनुष्य इ० तो.

घष्टनी (स्त्री. ना.)(ग्रं०) घांसाघांशी.

घस (घांसणें) (स्त्री. ना.) कांहींएक व्यवहारांत मूळचे भांडवलास आलेली तूट ती.

घसघशीत (वि०) घवघवीत.

घसघस (स्त्री. ना.) थोड्या विषयासाठीं एकाद्याबरोबर जी घांसाघास किं० ओढाताण ती.

घसमरपण (न. ना.)(ग्रं०) खाकरून खाकरून घसा खाण्याचा व्यापार तें.

घसरणें (धा. ना.) निसरडे जाग्यावरून खरकन पाय इ० सरणें. २ अधिकारावरून च्युत होणें. ३ शरीर क्षीण होणें.

घसरा (पु. ना.) पदार्थ घांसला जाई असा त्याजवर हस्तादिकांचा व्यापार तो. २ घस.

घसवटणें (धा. ना.) घांसणें इ० कांच्या योगें पदार्थाचा अंश निघे असें करणें. २ मनुष्यादिकानें त्या त्या कार्याविषयीं अभ्यस्त होणें.

घसा (पु. ना.) गळ्याचे आंतील प्रदेश तो. २ कंठध्वनि.

घसाघस (अव्य०) घसघस किं० खसाखस शब्द होई अशा प्रकारें.

घळघळ (अव्य०) नेत्रांतून पाणी वाही अशा प्रकारें रडण्याचें वि०.

घळघळां (अव्य०) घळघळ.

घळणें (धा. ना.) पाण्याच्या नेटानें नदी इ० कांची माती धुपून धुपून जाणें. २ मोतीं, नाक इ० कांचीं छिद्रें मोठीं होणें.

घाई (स्त्री. ना.) उतावळी. २ चर्मवाद्य इ० कांचा गजर किं० त्याचे वाजविण्याची गति ती. [२ मांस.

घाऊस (न. ना.) (ग्रं०) गोमांस.

घांघोसणें (धा. ना.) (ग्रं०) शोषणें.

घाट (पु. ना.) गांवाहून गांवास जाण्यास मध्ये वाटेंत जो पर्वत असतो तो किं० त्यावरील चढ उताराचा रस्ता असतो तो. २ नदी इ० कांचे कांठीं स्नान इ० कारणानिमित्त जी पायऱ्यांची बांदिस्त करितात तो. ३ घाटमाथा. ४ डौल.

घाटा (पु. ना.) फोलासुद्धां हरभऱ्याचा दाणा तो.

घाटाघाट (स्त्री. ना.) कांहींएक कार्याचा अनेक प्रकारें फार दिवस चाललेला विचार ती.

घाण (स्त्री. ना.) दुर्गंधि. २ केरकचरा इ० वाईट पदार्थ ती. ३ दुर्दशा.

घाणवटा (पु. ना.) (ग्रं०) तेली इ० कांचा तेल इ० गाळण्याचा घाणा.

घाणा (पु. ना.) तेल्याचें तेल काढण्याचें यंत्र तो. २ उंसाचा रस काढायाचा चरक. ३ खापर, उ-

खळ इ० कांत भाजणें, काढणें इ० कासाठीं जो प्रत्येक वेळेस पदार्थ घालितात तो. ४ घाणा भरणें झ० लग्न, मुंज इ० कांत जो कांडण्याचा आरंभीं समारंभ करितात तो. [न मोठा जो नाश तो.

घात (सं. पु. ना.) जीवबध. २ लहा-

घातघेणा (वि०) घातक.

घातपात (पु. ना.) कोणिकाचा वध किं० नाश तो.

घापणें (धा. ना.) (ग्रं०) घालणें. २ सांपडणें. ३ सोडणें.

घाबरणें (धा. ना.) भयादिकामुळें सुचेना अशा अवस्थेनें युक्त होणें.

घाम (सं. घर्म) (पु. ना.) उष्णता इ० कांच्या योगानें अंगास सुटतें जें पाणी तो. २ दया.

घामट (घाम) (वि०) मळीण.

घामाघूम (वि०) श्रम इ० कारणामुळें ज्याचे अंगास घाम सुटला तो.

घामोळें (घाम) (न. ना.) घामाच्या विकारानें अंगावर पुरूळ उठतो तें. २ जोडा, खोगीर इ० कांस घामाचा मळ न लागावा ह्मणून जें कातडें, वस्त्र इ० असतें तें.

घायाळ (वि०) शस्त्रादिकांचे वार ज्याच्या अंगावर आहेत तो. २ पराजयादि कारणामुळें ज्याची मानखंडना झाली आहे तो.

घार (स्त्री. ना.) एक पक्षी आहे.

घारणें (धा. ना.) (ग्रं०) माजणें. २ कैफ इ० कांच्या योगानें उन्मादयुक्त होणें.

घालणें (धा. ना.) पात्रादिकांच्या आंत किं० वर जसा पाहिजे तसा पदार्थ टाकणें. २ छिद्रामध्यें काठी इ० पदार्थ शिरविणें. ३ समाराधना, गोंधळ इ० घालणें झ० करणें. ४ भिंत इ० घालणें झ० सिद्ध करणें इ० अनेक अर्थ आहेत.

घालमेल (स्त्री. ना.) इकडचें तिकडे, तिकडचें इकडे करण्याचा व्यापार तो. २ कांहीं गोष्ट सिद्ध करण्याविषयीं अनेक प्रकारची खटपट तो. ३ सोईनें चाललेल्या व्यापारांत अंतर तो.

घालवणें (धा. ना.) स्थळ, अधिकार इ० कांवर संबद्ध जो मनुष्यादि पदार्थ तो त्या त्यापासून जाई असा करणें. २ काल इ० अतिक्रांत करणें इ०.

घाला (घालणें) (पु. ना.) सर्वस्व नाश होण्याजोगा जो संकटाचा अनिवारपणें पात तो.

घाव (पु. ना.) वस्त्र, शस्त्र इ० कांचा स्वपरविषयीं जो प्रहार तो. २ शस्त्रादि प्रहारानें पडलेलें क्षत तो.

घास (पु. ना.) गवत.

घांस (सं. ग्रास) (पु. ना.) अन्नादिकांचा वर्तुळसा लहान तोंडांत घालावयाचा गोळा तो. २ जात्यांत घालितात वैरण तो. ३ मोतीं इ० रत्नास छेद पाडतांना जो अंश कमी होतो तो.

घिरटी (स्त्री. ना.) येरझार.

घिसघीस (स्त्री. ना.) घांसाघांस.

घीस (स्त्री. ना.) झीज.

घुंघातणें (धा. ना.) घुबड इ० कानीं शब्द करणें. [घोट.

घुटका (पु. ना.) पाणी इ० कांचा

घुटमळणें, मुळणें (धा. ना.) घोंटाळ्यांत पडणें. २ कांहीं कार्य करावें न करावें अशा विचारांत अडचणलें जाणें.

घुबड (न. ना.) ज्यास रात्रीं मात्र दिसतें असा एक पक्षी आहे.

घुमट (पु. ना.) देवालयादिकांस कळसाचे खालीं डेऱ्याचे आकाराची जी बंदिस्त करितात ती.

घुमणें (धा. ना.) कोणत्याही शब्दानें प्रतिध्वनियुक्त होणें. २ नाद इ० कांस बाहेर जाण्यास अवकाश नाहींसा झाल्यामुळें ओलेंओलें परिपुष्टता पावणें. ३ पारव्यानें स्वजातीय शब्द करणें. ४ कांहींएक कार्य होणार होणार असें सर्वत्र बोलत अशा अवस्थेस त्या कार्यानें पावणें इ०.

घुमरी (स्त्री. ना.) (ग्रं०) सामर्थ्य.

घुरा (पु. ना.) (ग्रं०) एक दुर्गंध वृक्ष आहे.

घुसडणें (धा. ना.) वस्त्र, पुस्तक इ० कांची दुर्दशा व्हावयाजोगें अव्यवस्थितपणें उपभोगणें.

घुसडा (पु. ना.) दुर्दशा व्हायाजोगा वस्त्रादि पदार्थांचा उपभोग.

घुसणें (धा. ना.) शिरणें.

घुसळणें (धा. ना.) दहीं इ० रवीनें मंथन करणें. २ एकाद्यास एकादे कामांत थकें असें करणें.

घुसा (पु. ना.) ठोंसरा. २ राग.

घुळणें (धा. ना.) पदार्थानें लोटत किं० गडबडत जाणें.

घूक (पु. ना.) (ग्रं०) घुबड.

घूड (पु. ना.) घड.

घूस (स्त्री. ना.) उंदरासारिखा मोठा एक प्राणी आहे ती.

घृत (सं. न. ना.) लोणी कढविल्यानंतर जें होतें तें.

घृतकुल्यामधुकुल्या (सं. स्त्री. ना.) तूप व गोड पदार्थ यांची समृद्धि ती.

घेघे (स्त्री. ना.) युद्धसमयीं वीर आवेशानें असा शब्द उच्चारितात.

घेणें (सं. ग्रहण) (धा. ना.) अगदीं किं० कांहींवेळ पर्यंत कांहींएक पदार्थावरील दुसऱ्याचा संबंध दूर करून आपल्या सत्तेंत आणणें. २ कांहीं एक पदार्थ हस्तादिकानें स्वसंनिकृष्ट करणें. ३ शोध इ० घेणें म्ह० करणें. ४ रान घेणें म्ह० सरळ मार्ग सोडून अडवें तिडवें जाणें अ० रीत सोडून भाषण इ० करणें इ०. [लेणें.

घेपणें (धा. ना.) (ग्रं०) घेणें. २ घा-

घेर (पु. ना.) परिधि.

घेरा (पु. ना.) घेर. २ कांहीं पदार्थाभोंवता मनुष्यादिकांचा वेढा.

घेरी (स्त्री. ना.) पित्तादिकांमुळें जी मंडलाकार फिरल्याप्रमाणें अवस्था होत्ये ती.

घेवारी (पु. ना.) ठोकमाल खरेदी

करून मग थोडथोडा फुटकळ वि- कणारा तो.

घोकणी (स्त्री. ना.) अध्ययनादिकांतील शब्दांची किं० वाक्यांची वारंवार आवृत्ति अ० उच्चार ती. २ काहिंएक विषयाचा निदिध्यास तो. [कणी करणें.

घोकणें (सं. घोषण) (धा. ना.) घो-

घोकरी (अव्य०) (ग्रं०) लवकर.

घोख (सं. घोष) (पु. ना.) गर्जना.

घोंगडें (न. ना.) कांबळ्याचें एक पट्टें तें. कधीं कधीं कांबळ्यासही म्हणतात. २ झट अ० लचांड.

घोगरा (वि०) फुटक्या मडक्याच्या किं० म्हशीच्या शब्दाप्रमाणें जो कंठध्वनि झाला तो.

घोगाण (न. ना.) (ग्रं०) काहिंएक पदार्थांवर घोंघों शब्द करणाऱ्या माशांचा समुदाय तें.

घोगी (स्त्री. ना.) सखलाशींची अंगावर घेण्यास करितात टोपी ती.

घोघो (अव्य०) समुद्रादिकांच्या शब्दाचें अनुकरण.

घोट (पु. ना.) एकवार गिळायाजोगें तोंडांत किं० पात्रांत घेतलेलें पाणी इ० तो.

घोंटणें (धा. ना.) पातळ पदार्थ गिळणें. २ कागद इ० गुळगुळीत होण्याजोगा करवा इ० कानीं घासणें. ३ कांहीं पदार्थ बारीक व्हावा म्हणून खलणें. लाळ घोंटणें म्ह० प्रिय पदार्थांविषयीं पराकाष्ठेचें आसक्त होणें.

घोटभरणें (धा. ना.) (ग्रं०) जीव घेणें.

घोटाळणें (धा. ना.) क्रियाचें अक्षरांतून हात वळविणें. २ वारा इ० कानीं एक मार्ग न धरितां चालणें. ३ कांहिंएक कार्य करावें कीं न करावें याविषयीं अंतःकरणानें अनेक प्रकारच्या कल्पनांनीं युक्त होऊन गोंधळांत पडणें.

घोटाळा (पु. ना.) सोईनें असलेल्या वस्तूंची अस्ताव्यस्त दशा तो. २ वायु इ० कांचें वांकडें तिकडें चालणें तो. ३ कांहिंएक गोष्टीविषयीं बुद्धीची अनेकविधता तो. ४ एकंकार. ५ (ग्रं०) कागद घोंटायाचा करवा तो.

घोडा (पु. ना.) अश्व. २ पाळणा टांगायासाठीं पाय बसवून अडवें लांकूड करितात तो. ३ चालण्याचे प्रसंगीं प्रत्येक पायास संकेतानें म्हणतात. इ०

घोडी (स्त्री. ना.) अश्वजातीची स्त्री ती. २ मुरंस टांगायासाठीं पंतोजी उंच दोरी बांधून ठेवितो ती. ३ पखवाज उंच ठेवण्यासाठीं घडवंची करितात ती इ०.

घोण (स्त्री. ना.) गोम नांवाचा प्राणी.

घोर (सं. पु. ना.) वीणा इ०कांस खरजस्वराची तार लावितात तो. २ काळजी. ३ भयंकर जो राक्षसादि तो. ४ गाढ मूढ निद्रेचें वि०.

घोरणें (धा. ना.) निजेंत घर्घर शब्द होई असा श्वासोच्छ्वास टाकणें.

घोरपड (सं. गोधि) (स्त्री. ना.) सरड्याचे आकाराचा एक मोठा प्रा-

णी आहे. २ निर्वाह करण्यास अशक्य असें एकादें संकट प्राप्त होतें तें [युद्ध इ० तें.

घोरांदर (वि०)(ग्र०) भयंकर सेना,

घोष (स. पु. ना) समुद्र, अध्ययन इ०कांचा मोठा ध्वनि तो. २ घोंकणी ३ गौळवाडा.

घोषयात्रा (स. स्त्री. ना.) (ग्र०) गाई इ० पशूंचें चरणें इ० पाहण्याची क्रीडा ती.

घोषी (न. ना.) (ग्र०) मिश्रितपणा. २ (ग्र०) भांडवल.

घोंस (पु. ना.) मोत्यें, फुलें इ०कांचा झुबका तो. [२ हांसडणें

घोसणें (धा. ना.) (ग्र०) शोधणें.

घोंसा (पु. ना) फुलांचा गजरा.

घोळ (पु. ना.) आरड्या ओरड्याचा गोंधळ. २ घोटाळा.

घोळका (पु. ना) ज्यामध्यें आरडाओरडा असा मनुष्यांचा उभा किं० चाललेला समुदाय तो.

घोळणें (धा. ना.) एकाद्यास मार इ०कांनी थकें असें करणें. २ एकादा विषय मनांत आणून अनेक वार उलटून पालटून पाहणें.इ०.

घोळाणा (पु. ना.) गुणगुणा.

घ्राण (स. न. ना) नाक ह्मणून जें गंध ग्रहण करणारें इंद्रिय तें.

—ङ—

ङ— हा वर्ण पांचवें व्यंजन आहे. हा वर्ण केणिक शब्दाच्या आरंभीं असे शब्द मराठी भाषेत नाहींत.

—च—

च— हा वर्ण साहावें व्यंजन आहे. (अव्य०) कांहींएक अर्थाचें निश्चयद्योतक आहे. उ० तुझीच या मी गेलोच होतों इ०.

चक (पु. ना.) एकमत किं० एकमतानें केलेला नियम. २ राजादिकांनी केलेल्या नियमांची प्रजेवर न मोडण्याविषयीं जी तेजोरूप सत्ता ती.

चकचकणें (धा. ना.) वीज, हिरा इ० कांनीं चकचकीतपणानें नेत्रांपुढें स्फुरद्रूप होणें.

चकचकाट (पु. ना.) डोळे दिपायाजोगा दीपादिकांचा तेजःप्रसर तो

चकचकी (स्त्री ना) चकचकीतपणा.

चकचकीत (वि०) चकचकण्यानें युक्त तो. २ निर्मळ.

चकणें (धा. ना.) कांहीं कारणामुळें किं० वास्तविक अश मनांत न आल्यामुळें फसलें जाण्याजोग्या मोहास पावणें.

चकती (स्त्री. ना.) तांब्याचा पत्रा, केळें, कागद इ० कांचा लहान पातळ जो प्रायः वर्तुळ तुकडा ती. २ सनद, चिठी इ० ती.

चकनाचूर, चकणाचूर (पु. ना) कांहींएक पदार्थ फुटल्यामुळें त्याचा लहान लहान खडरूप समुदाय तो.

२ बहुत श्रम झाल्यामुळें शरीरीं जो थकलेपणा होतो तो.

**चकपक** (स्त्री. ना.) काहीं कार्य करण्याविषयीं अंगीं चपलतारूप गुण असतो तो. २ (वि०) नीटनेटका व स्वच्छ जो वस्त्रादि पदार्थ तो.

**चकभूल** (स्त्री. ना.) काहीं अद्भुत इ० कांच्या दर्शनानें बुद्धि चकायाजोगा जो मोह प्राप्त होतो तो. २(वि०) तशा मोहानें युक्त तो.

**चकमक** (स्त्री. ना.) गारेपासून अग्नि पडावा ह्मणून तिजवर आघात करायासाठीं पोलादि पदार्थ, पट्टी इ० करीत असतात तो. २ युद्ध किं० कलह झडणें, उडणें इ० कांचे योगीं प्रयोग.

**चकाकणें** (धा. ना.) चकचकणें.

**चकारशब्द** (पु, ना.) भाषणाचा किंचित् अंश तो.

**चकित** (स. वि०) भय, अद्भुतदर्शन इ० कारणामुळें चकला तो.

**चकोर** (सं. पु. ना.) एक चंद्रामृत पिणारा पक्षी आहे.

**चक्र** (वि०) लकलकीत, स्वच्छ. २ (न.) डोळे दिपायाजोगें आकस्मिक जें तेज:स्फुरण तें. ३ (वि०) चकित.

**चक्र** (सं. न. ना.) रथादिकाचें चाक. २ एक शस्त्र आहे. ३ एक खेळायाकरितां लांकडाचें करितात तें.

**चक्रवर्ती** (सं. पु. ना.) सर्व पृथ्वीचा राजा तो.

**चक्रवाक** (सं. पु. ना.) एक पक्षी आहे.

**चक्रव्यूह, विभू** (पु. ना.) परसैन्याचा आपल्या सेनेंत प्रवेश न व्हायाजोगा असेनेचा रचनाप्रकार तो.

**चक्री** (स्त्री. ना.) अनेक समानशील मनुष्यें एकत्र मिळून जो गाणें इ० समारंभ करितात तो. २ पागोट्याच्या बिनीवर पट्ट्या बसवून करितात तो. [पादिकांनीं युक्त तो.

**चखोट** (वि०) सांगायाजोगे गुणरू-

**चग** (फा० पु. ना.) मुखांत धरून बोटानें वाजवायाचें एक पोलादि वाद्य आहे. [दिकांची समृद्धि तो.

**चंगळ** (स्त्री. ना.) काहींएक पदार्था-

**चंगा** (सं. वि०) चखोट.

**चघळ** (न. ना.) पशूंनीं तोंडांत घेऊन चघळून टाकिला जो चारा तें. २ (वि०) ज्यांत तात्पर्य नाहीं असें कंटाळा यावयाजोगें भाषण इ० तें. किं० तें करणारा मनुष्य तो.

**चघळणें** (धा. ना.) खावयाचा पदार्थ तोंडांत घालून बहुत वेळ आंतले आंत फिरविणें.

**चंची** (स्त्री. ना.) पान, सुपारी इ० ठेवण्याची अनेक पुडांची पिशवी.

**चट** (स्त्री. ना.) काहींएक पदार्थाची किं० व्यापाराची गोडी लागल्यामुळें त्यावांचून चैन पडूं नये अशी जी अवस्था ती. २ (अव्य०) नि:शेष होई अशा प्रकारें जाणें, खाणें इ० कांचें वि०.

**चटई** (स्त्री. ना.) अंथरी.

**चटक** (स्त्री. ना.) चट. २ लागलेली काहींएक खोड ती.

**चटका** (पु. ना.) अग्नि, तिखट इ० कांच्या संयोगानें जिव्हा इ०कांस जी दुःसह व्यथा होत्ये ती. २कांहीं एक व्यापार पुनः करण्याविषयीं भय वाटावें किं० त्याचें स्मरण झालें असतां खेद वाटावा असें जें त्यापासून अनुभवलेलें दुःख ती.

**चटपट** (स्त्री. ना.) अंतःकरणास दुःखाची टोंचणी लागत्ये ती.

**चटोर** (वि०) अंगीं मोठेपणा नसून अचावचा भाषण करण्याचा स्वभाव ज्याचा त्यास निंदेनें ह्मणतात.

**चट्टा** (पु. ना.) फोड इ० कांचें क्षत. २ क्षत बरें होऊन त्या ठिकाणीं जें चिन्ह राहतें तें. ३ सावकारी इ० व्यवहारांत घस बसते ती.

**चट्टामट्टा** (पु. ना.) सर्व खाण्याचे पदार्थांची खाऊन जी निःशेषता ती.

**चट्टीपट्टी** (स्त्री. ना.) शरीरावरील भूषणादिकांचा छानछोक दिसायाजोगा जो रचनाप्रकार ती.

**चंडकीर्ण** (सं. पु. ना.) सूर्य.

**चडचड** (स्त्री. ना.) धान्य, द्रव्य इ० पदार्थांची दुर्लभता व्हावयाजोगी अल्पता ती.

**चडफड** (स्त्री. ना.) चडफडण्याचा [व्यापार.

**चडफडणें** (धा. ना.) क्रोधाच्या आवेशानें दांत ओंठ चावणें, हातपाय आपटणें इ० व्यापार करणें.

**चंडाळ** (सं. अप० पु. ना.) महार, मांग, चांभार इ० ती. २ (वि०) अत्यंत निर्दय, अतिपापी त्यास निंदेनें ह्मणतात.

**चंडोल** (पु. ना.) एक पक्षी आहे. २ कैफ करण्याचा एक प्रकार आहे. ३ चांगला हुशार व बोलका, गुणी मनुष्य त्यास म्हणतात.

**चढ** (पु. ना.) पर्वतादिकांचा क्रमानें जो उन्नत भाग ती. २ संपत्ति, दुखणें इ० कांची उत्तरोत्तर वृद्धि ती इ०.

**चढण** (स्त्री. ना.) चढ.

**चढणें** (धा. ना.) आरोहण करणें किं० कांहीं पदार्थानें आरोहित होणें. २ पूर्व रीतीपेक्षां कांहीं पदार्थानें अधिक होणें. ३ मी वरिष्ठ असें अभिमानानें मानणें.

**चढता** (वि०) उत्तरोत्तर क्रमानें ज्यास चढ आहे तो.

**चढतीवेळ** (स्त्री. ना.) सूर्योदयापासून मध्यान्हपर्यंत जो काळ ती.

**चढाई** (स्त्री. ना.) शत्रूस दबवायासाठीं तयारी करून त्याचे अंगावर जाण्याचा व्यापार ती.

**चढाव** (पु. ना.) चढ. २ चढाई.

**चणचण** (स्त्री. ना.) चडचड.

**चणचणणें** (धा. ना.) खारट पदार्थादिकानें क्षतादिकांवर लागल्यामुळें व्यथा करणें. २ भुकेनें अतिशयित प्रदीप्त होणें. ३ धान्याच्या धारणीनें चढणें इ०.

**चणचणीत** (वि०) ज्या पदार्थास तिखट, मीठ, फोडणी इ० यथायुक्त आहे तो. २ कडक.

**चतुर** (सं. वि०) कुशल.

**चतुरंग** (सं. वि०) हत्ती, घोडे, रथ,

पायदळ हीं चार अंगें ज्यास आहेत अशा सेनेचें किं० सेनापर्यायाचें वि०,

**चतुर्भुज** (सं. वि०) ज्यास चार भुज आहेत तो. २ ज्याच्या मुसक्या बांधिल्या त्यास संकेतानें ह्मणतात. ३ ज्याचें लग्न झालें त्यास संकेतानें म्हणतात.

**चतुरस्र** (सं. वि०) ज्यास चार कोण आहेत तो. २ अनेक विद्या, कला ज्याच्यामध्यें आहेत तो.

**चतुष्पद** (सं. वि०) ज्यास चार पाय आहेत तो पशु इ०.

**चतुःसीमा** (सं. स्त्री. ना.) क्षेत्रादिकाचे चोहींबाजूंची मर्यादा.

**चंदन** (सं. पु. ना.) एक सुगंधि वृक्ष आहे. २ (न.) त्याचें गंध उगाळण्यास खोड करितात तें. ३ कांहीं पदार्थाचा खाणें, लुटणें इ० कांनीं सत्यानास तें.

**चंदी** (स्त्री. ना.) घोडा इ० कास नित्यशः जो दाणा देतात ती २ संसारखर्चाकडे जें नित्यशः धान्यादि लागतें ती.

**चंद्र** (सं. पु. ना.) रात्रीं प्रकाश देणारा आकाशांत एक तेजस्वी पदार्थ आहे.

**चंद्रकांत** (सं. पु. ना.) ज्यावर चंद्रकिरण पडलें असतां द्रव सुटतो असा पाषाण तो.

**चंद्रज्योत** (स्त्री. ना.) गंधकप्रधान दारू पणतींत घालून वर कागद चिकटवून करितात; जिचा अग्निस्पर्श झाला असतां चंद्रासारिखा प्रकाश पडतो ती.

**चंद्रबल,ळ** (सं. न. ना.) कोणेकाचे राशीस चंद्राचें आनुकूल्य तें. ओढून चंद्रबळ आणणें. म्ह० तादृश अंगीं प्रतिष्ठा नसतां ती ओढून ताणून आणणें. एकाद्यास चंद्रबळ देणें म्ह० त्यास कांहीं कार्याविषयीं उत्तेजन देणें. [दिणें.

**चंद्रिका** (सं. स्त्री. ना.) चंद्राचें चांदिणें.

**चंद्री** (सं. चंद्र) (स्त्री. ना.) मद्यादिकाचे मदानें किं० त्रिदोष वायु इ० झाल्यामुळें डोळे ताठकळून जी ऊर्ध्वदृष्टि होण्याची दशा ती. २ बाहेरून येणारास बहुत वेळ लागला असतां जी कोणेकास अतिशयित उत्कंठा लागते ती.

**चंद्रूस,द्रोस** (पु. ना.) एक उपधातु आहे.

**चप** (अव्य०) कांहींएक भाषणादि क्रिया न करितां स्वस्थपणानें.

**चपटा** (वि०) ज्यामध्यें उभारपणा कमी दिसतो असा पदार्थादि तो.

**चपडाक** (स्त्री. ना.) शरीरावर केलेला तळहाताचा प्रहार ती.

**चपराक** (स्त्री. ना.) चपडाक.

**चपराशी, सी** (पु. ना.) चपरास धारण करणारा शिपाई तो.

**चपरास** (स्त्री. ना.) शिपाई इ०कांचे गळ्यांतील पट्ट्यावर अक्षरादि खोदलेलें पितळ इ०कांचें तकट असतें ती.

**चपल, ळ** (सं. वि०) कांहीं उद्योगा-

विषयीं ज्याचे अंगीं त्वरा आहे तो. २ (स्त्री.) पायांतील वाहाण ती.

**चपला** (सं. स्त्री. ना.) वीज.

**चपापणें** (धा. ना.) अकस्मात् भय किं० लज्जा यांचें कारण दिसल्यामुळें अंतःकरणवृत्तीत फेर होणें.

**चंपू** (सं. पु. ना.) गद्यपद्यात्मककविता.

**चपेट** (स्त्री. ना.) कोणेकाची दुर्दशा करायाजोगें जें कोणेकास देश कालादि आनुकूल्य प्राप्त होतें ती. २ कांहींएक व्यवहारांत झाला जो कांहीं द्रव्यादि नाश ती.

**चप्पू** (वि०) अल्पवय असून बोलणें इ० कांत कुशल तो.

**चबिना** (सं. चर्वन) (पु. ना.) पोहे, फुटाणे इ० चावून खायाचे जे पदार्थ ते. [चकाकी

**चमक** (स्त्री. ना.) रत्नादिकांतील

**चमकणें** (धा. ना.) चकाकणें.

**चमकावणें** (धा. ना.) छडी, चाबूक इ० कांनीं कोणेकास मारणें. २ एकाग्रास रागें भरणें. ३ शृंगारचेष्टा दाखविण्यासाठीं नेत्र इ० कांची चमक बाहेर पडे असें करणें.

**चमचमाट** (पु. ना.) उत्तम भक्ष्य भोज्य इ० पदार्थांची समृद्धि तो. २ चकचकाट.

**चमचमीत** (वि०) चणचणीत.

**चमत्कार** (सं. पु. ना.) आश्चर्य किं० आश्चर्यकारक पदार्थ, व्यापार इ० तो. २ देव, औषध इ० पदार्थांचा आश्चर्य वाटायाजोगा अनुभव

**चमत्कारिक** (सं. वि०) चमत्कार वाटायाजोगा पदार्थ, व्यापार, भाषण इ० तो.

**चमू** (सं. स्त्री. ना.) सेना.

**चमेल, चमेली** (स्त्री. ना.) एक पुष्पवल्ली आहे. २ (न.) तिचें फूल तें.

**चर** (पु. ना.) खंदक.

**चरक** (फा. पु. ना.) ऊंसाचा रस काढायाचें यंत्र आहे तो. २ धातुमय पात्रादिकांस साफ करणें इ० कामाचें यंत्र तो.

**चरकट** (न. ना.) कंटाळा यावयाजोगी लांबचलांब गोष्ट तें.

**चरका** (पु. ना.) चटका.

**चरचरीत** (वि०) मऊ नव्हे असें खरखरीत वस्त्र इ० तें. २ (अव्य०) यत्किंचित् न्यूनतारहित पूर्णपणानें.

**चरण** (सं. पु. ना.) चालण्यास उपयोगी जो शरीराचा अवयव तो. २ श्लोक इ० कांचा चतुर्थांश तो. ३ (स्त्री.) गुरें चारणीबद्दल सरकार देणें घावें लागतें ती.

**चरणी** (सं. चरण) (स्त्री. ना.) (ग्रं०) पादसेवा.

**चरणें** (धा. ना.) गुरें इ० कांनीं ज्या ठिकाणीं तृणादि रुजलें आहे तेथें जाऊन तें खाणें. २ सारा दिवस मनुष्यानें कांहीं तरी खात असणें. ३ बिवा, दुःख इ० कांनीं चिडणें.

**चरफड** (स्त्री. ना.) चटफड.

**चरब** (अर० फा०) (अव्य०) इच्छित प्रमाणांत यत्किंचित् न्यूनता नसतां पूर्णपणें.

**चरबी** (फा० स्त्री. ना.) बकरा, मे-

टा इ०कांचे मांसाचें तेल काढीत बसनात ती.

चरम (सं. वि०) शेवटला.

चरमस्थिति (सं. स्त्री. ना.) ज्ञानी पुरुषाची समाधिरूप सहज स्थिति ती.

चरस (पु. ना.) भांगेचे झाडावरील बोंडांचा चीक काढीत असतात तो.

चरा (पु. ना.) साफ जें भांडें, शस्त्र इ० ह्याजवर रेंव इ०कांच्या योगानें ज्या रेषा पडतात तो.

चराई (स्त्री. ना.) गुरांची राखोळ.

चराचर (सं. न. ना.) स्थावरजंगमात्मक सर्व जग तें.

चरित (सं. न. ना.) आचरण.

चरितार्थ (सं. पु. ना.) संसारादि व्यवहाराचा जसातसा स्वल्प सामर्थ्यानें निर्वाह तो.

चरित्र (सं. न. ना.) चरित.

चर्चा (सं. स्त्री. ना.) प्रसंगानुरूप कोणिकाची कोणिक स्वल्प गोष्ट निघते ती. २ देवादिकांचें चरित्र कथन करण्याचा व्यापार ती. ३ कोणिकाची त्याच्या पाठीमागें निंदा ती.

चर्म (सं. न. ना.) कातडें, चामडें.

चर्मचक्षु (सं. न. ना.) (ग्रं०) व्यवहारिक पदार्थांचे मात्र दर्शनाचे उपयोगी नेत्र तें.

चर्या (सं. स्त्री. ना.) कोणिकाची कांहींएक एक बरें वाईट कर्म करण्याविषयीं सतत जी रीति चालत आली असते ती. २ शरीरावरील कांहींएक गुणाचें बोधक तेज ती.

चऱ्हाट (स्त्री. ना.) मोठी वळलेली दोरी तें. २ कंटाळा यावयाजोगी गोष्ट इ० तें.

चलचित्तपानतुंदिल (सं. वि०)(ग्रं०) चंचल चित्ताचें प्राशन करून दोंदील झालेला.

चलती (स्त्री. ना.) जी झटली ती गोष्ट त्याचे हातून पार पडावी अशी जी कांहींएक काल कोणिकास देश, कालादि आनुकूल्यरूप दशा प्राप्त होते ती.

चलन (सं. न. ना.) कांहींएक पदार्थ हलण्याचा क्रि० स्वस्थानापासून पलीकडे सरण्याचा व्यापार तें. २ (स्त्री.) ज्या देशादिकांत ज्या रुपया इ० नाण्याची मुख्यत्वेंकरून वहिवाट ती.

चलबिचल (स्त्री. ना.) कांहींएक जी स्थिरपणें चालू झाली गोष्ट तिलाच कांहीं काल स्थिरता, कांहीं काल चंचलता अशी उभयात्मक अवस्था प्राप्त होते ती.

चलाख (फा० वि०) चपळ.

चव (स्त्री. ना.) ज्या ज्या इंद्रियानें जो जो विषय घेतला त्याची जी गोडी ती. २ (पु.) नारळाचा खरडून काढिला जो कीस तो. ३ मोत्याचें वजन या शब्दानें बोलण्याची रूढी आहे तो.

चवई (स्त्री. ना.) (ग्रं०) चौरंग.

चवक (न. ना.) (ग्रं०) आश्चर्य. २ अधीरपण.

चवचकी (स्त्री. ना.) (ग्रं०) कवाड.

चवड (स्त्री. ना.) भाकरी, पोळी इ० कांचा रचलेला ढीग तो.

चवडा (पु. ना.) तळपायांच्या बोटांजवळचा प्रदेश तो. २ (ग्रं०) पंजा. ३ (वि०) रुंद.

चवर्थी (स्त्री. ना.) (ग्रं०) सायुज्यमुक्तिस संकेतानें ह्मणतात.

चंवरडोल (पु. ना.) हत्तीवरील अंबारी तो.

चंवरी (सं. चामर) (स्त्री. ना.) वनगाईचे सकेशपुच्छास सोनें, रुपें इ० कांची दांडी किं० मूठ बसवून राजादिकांवर वारायास करीत असतात ती. [स्तक.

चवरें (न. ना.) (ग्रं०) शेवट. २ म-

चवाठा (पु. ना.) चार वाटा जेथें एकत्र मिळतात असें स्थळ तो.

चवाळें (न. ना.) लहान उणाख घोंगडी तें.

चश्मा (पु. ना.) उपनेत्र.

चहाड (वि०) दुसऱ्याची गुप्त गोष्ट दुसऱ्याजवळ सांगण्याचा ज्याचा स्वभाव तो. [कर्म तो.

चहाडी (स्त्री. ना.) चहाडपणाचें

चळ (सं. चलन) (पु. ना.) म्हातारपण, वायु, पिशाच इ० कांमुळें झाला जो बुद्धीस भ्रंश तो.

चळकांप (पु. ना.) वाघ, चोर इ० कांच्या भयानें चळचळां मुतणें, कांपणें अशी जी कोणेकास अवस्था प्राप्त होत्ये तो.

चळचळीत (वि०) उत्तम भक्ष, भोज्य पदार्थांची समृद्धि ती. २ कांहीं कार्यास पुर्तेपणें व्हावयाजोगा भक्ष्य भोज्यादि पदार्थ तो.

चळथ (स्त्री. ना.) चवड.

चळबळ (स्त्री. ना.) कांहींएक कार्यासाठीं हातपाय इ० हलविण्याचा व्यापार तो.

चळवळ (स्त्री. ना.) चळबळ.

चक्षु (सं. न. ना.) नेत्र.

चक्षुश्रवा (सं. पु. ना.) सर्प.

चाई (स्त्री. ना.) शरीरावरील केंस झडतात असा एक रोग आहे तो.

चाकर (पु. ना.) नित्यशः काम करावयाचें पत्करून जो कोणी कोणापासून त्याबद्दल मोल घेतो तो.

चाकरमान्या (पु. ना.) प्रतिष्ठेनें चाकरासच ह्मणतात.

चाकरी (स्त्री. ना.) चाकराचें कर्म तो.

चाकळा (पु. ना.) (ग्रं०) मलद्वाराचे मांसाचा गोळा तो.

चाकाटणें (धा. ना.) (ग्रं०) चकित होणें.

चाकी (स्त्री. ना.) चाकासारिखा वाटोळा तांबें इ० धातूचा किं० काष्ठ इ० कांचा तुकडा तो.

चाखणें (धा. ना.) पदार्थाची गोडी कळायासाठीं त्यांतील कांहीं अंश खाऊन पाहणें.

चांग (वि०) (ग्रं०) चांगला.

चांगावे (न. ना.) (ग्रं.) चांगुलपण.

चांचड (पु. ना.) तांबड्या मुंगळ्यासारिखा प्राणी तो. २ (न.) एक क्षुद्र जंतु आहे.

चाचण (पु. ना.) (ग्रं०) चाचड.

चांचणी (स्त्री. ना.) कांहींएक पदार्थाचे परीक्षेकरितां त्याच्या एकादे अंशाचा अनुभव ती. २ साकर इ० कांचा जो पाक करितात ती.

चांचपडणें (धा. ना.) डोळ्यांनीं दिसत नसतां किं० अंधार असतां हस्तादिकांनीं वस्तु शोधण्याचा किं० चालण्याचा व्यापार करणें तो. २ भय इ० कामुळें लागत लागत बोलणें.

चांचपणें (धा. ना.) चांचपडणें.

चांचरणें (धा. ना.) (ग्रं०) भुलणें.

चांचरी (स्त्री. ना.) (ग्रं०) बोबडी.

चांचा (पु. ना.) एक लुटारू जात आहे [णारा.

चांचुवडें (न. ना.) (ग्रं०) चोंच.

चांचूं (न ना.) किंचित् भाषणोच्चार तें. २ चोंच.

चाट (वि०) (ग्रं०) चवचळपणा कर-

चाटण (न. ना.) चाटून खाण्याचें औषध तें.

चाटणें (धा. ना.) औषधादि पदार्थ जिव्हेनें ग्रहण करणें किं० कांहीं पदार्थावरून जिव्हा फिरविणें. २ तोफेचा गोळा किं० बंदुकीची गोळी इ० कांनीं वेगाबरोबर शरीराचो कांहीं त्वचा नेणें.

चाटी, चाटया (पु. ना.) कापडाचें दुकान घालून उद्योम करितो तो

चाड (स्त्री. ना.) (ग्रं०) आवड. २ गरज. [जनाची जूट ती.

चांडाळचौकडी (स्त्री. ना.) दुष्ट

चातक (सं. पु. ना.) पर्जन्याचे उदकावांचून दुसरें जल न पिणारा असा एक पक्षी आहे. [उवड.

चाथ, चाथी (स्त्री. ना.) (ग्रं०) व-

चांदई (स्त्री. ना.) दुगखी घराची आढ्यापर्यंत उंच भित ती.

चांदणी (स्त्री. ना.) आकाशांतील तारा ती. २ छायेकरितां मंडपाकार वस्त्र बांधितात ती.

चादर (स्त्री. ना.) रुजामा, गादी इ० कांवर शुभ्र वस्त्र घालितात ती.

चांदी (स्त्री. ना.) निर्मळ रूपें तें. २ फजीती.

चाप (सं. न. ना.) धनुष्य. २ (प्रा. पु.) मळसूत्र इ० कांच्या जोरानें कांहीं पदार्थ दाबण्याचें यंत्र आहे तो.

चापट (वि०) चपटा. २ (स्त्री) चपराक.

चांपसणें (धा. ना.) चांचपणें.

चापेखण (पु. ना.) प्रायः चौसोपी घरास दोन सोप्यांचे संधीस जो मोठा खण येत असतो तो.

चाबुकस्वार (पु. ना.) घोड्यास चाल शिकवितो तो.

चामर (सं. स्त्री. ना.) चवरी.

चामवा (चामड) (स्त्री. ना.) त्वचेंत घुसून राहणारी अशी एक उवाची जाति आहे.

चामीकर (सं. न. ना.) सोनें.

चार (स्त्री. ना.) हिरवें लहान गवत ती. २ (पु. ना.) एक झाड आहे. ३ (अव्य०) हिरव्या रंगाचें ओन-

शयद्योतक. ४ (पु. ना.) भांड, मर्यादा सोडून ज्या नानाप्रकारच्या चेष्टा तें. [आहे.

चारण (स. पु. ना.) एक देवजाति

चारा (पु. ना.) डोंगर इ० कांचे ठायीं चरायाजोगा जो तृणसमुदाय रुजला असतो तो. २ पशु, पक्षी इ० कांचें भक्ष्य जें तृणादिक तो.

चाराचुरा (पु. ना.) कांहीएक पदार्थाच्या बारीक बारीक तुकड्यांचा समुदाय तो. [बी ती.

चारोळी (स्त्री. ना.) चार वृक्षाची

चार्वाक (पु. ना.) नास्तिकांत एक भेद आहे.

चाल (स्त्री. ना.) गमनास अनुकूळ जो व्यापार ती. २ घोडा इ० कांचा तुरकी इ० गतिविशेष ती. ३ देश, जाति इ० कांची रीत ती इ०.

चालचर्या (स्त्री. ना.) रीतभात.

चालढकल (स्त्री. ना.) आळस, द्रव्याभाव इ० कारणामुळें जो कांहीं कार्याचा जसा तसा निर्वाह ती.

चालणें (स. चलन) (धा. ना.) गमनास अनुकूळ पावलें टाकण्याचा व्यापार करणें. २ कालानें क्षणाक्षणानें अतिक्रांत होत असणें ३ देशादि संप्रदायाप्रमाणें वर्तणें इ०.

चालू (वि०) चालता झाला तो.

चावट (वि०) ज्याचे बोलण्यास ताळतंत्र नाहीं किं० एकच बोलणें वारंवार निरर्थक बोलण्याचा स्वभाव तो.

चावटी (स्त्री. ना.) चपळपणा. २ वाचाळपणा.

चावडी (स्त्री. ना.) शहर इ० कांतील चवाठ्यावर कोतवाल इ० बसून कारभार करायासाठीं जी जागा केली असल्ये ती. २ चोहोंकडील चार लोक येऊन ज्या घर इ० स्थळीं गप्पा मारीत बसतात तें घर किं० ज्या घरांत गुप्त गोष्ट प्रकट न होतां राहात नाहीं असें घर ती.

चावदशी (स्त्री. ना.)(ग्र०) जागेपणा.

चावळणें (धा. ना.) ज्वर, भय, निद्रा इ० कारणांमुळें कोणेकानें बरळू लागणें.

चावा (पु. ना.) मनुष्यादिकांस चावण्याचा व्यापार किं० त्याणें झालें जें चिन्ह तो.

चावी (स्त्री. ना.) किल्ली.

चाहणें (धा. ना.) प्रिय असें मानणें.

चाहा (पु. स्त्री. ना.) औषधी झाड आहे. २ कोणेकाचा कोणेक स्थळीं प्रियपणा ती.

चाहूल (स्त्री. ना.) आभार इ० कांत मनुष्यादिकांचा भास व्हायाजोगें जें चिन्ह आढळतें ती.

चाळ (पु. ना.) घुंगरांचा समुदाय पायांत नाचणारे बांधितात तो २ रुंदी थोडी व लांबी फार असें जें घर असतें तो.

चाळणें (धा. ना.) धान्य, माती, कोळसे, पानें, पुस्तकें इ० निरनिराळें किं० उलटापालट करणें

चाळवणें (धा. ना.) कोणी कोणास कांहीं कार्याविषयीं आज उद्यां असे करणें. २ कांहींएक पदार्थ चळे किं० चाळी असे करणें.

चाळवाचाळव (स्त्री. ना.) अनेक तऱ्हांनीं चाळविण्याचा व्यापार तो.

चाळा (पु. ना.) कांहींएक व्यापार करण्याविषयीं कोणेकास निरंतर लागला जो छंद तो. प्राय: दुर्व्यसनाविषयीं.

चाळिशी (स्त्री. ना.) मनुष्यास चाळीस वर्षें झालीं असतां जी वयोवस्था प्राप्त होते ती. [चे प्रकारानें.

चाळनपाळन (अव्य०) अदलाबदलीं-

चिकचीक (स्त्री. ना.) पाऊस इ० पडल्यामुळें जमिनीवर झाला जो सद्रवपणा तो.

चिकट (वि०) चिकासारिखा डकाया जोगा जो पदार्थ तो. २कद्रू, लोचट मनुष्य तो.

चिकटी (स्त्री. ना.) डोकीचे केसांत जो चिकट मलांश होतो तो.

चिकण (वि०) छेदायास किं० भेदायास जो कठीण पदार्थ तो. २ज्याने अंगी चिकटपणा बहुत असा उडीद इ० पदार्थ तो. ३ जिला लोणी फार अशी गाय, म्हैस इ० ती.

चिकित्सक (स. पु. ना.) वैद्य. २(वि०) रत्नादिकांचे परीक्षेविषयीं कुशल तो. ३ कांहींएक गोष्टीविषयीं बहुत चौकशी करण्याचा सभाव ज्याचा तो.

चिकित्सा (स. स्त्री. ना.) औषधादिकेंकरून रोगनिरसनाचा उपाय तो. २ रोगाची जी परीक्षा ती.

चिकोटी (स्त्री. ना.) वळाची परीक्षा पाहावयाकरितां बळानें मणगट धरण्या सोडण्याचा व्यापार तो.

चिक्कू (वि०) कद्रू.

चिखल (सं. चिकिल)(पु. स्त्री. ना.) जमिनीवर पाणी सांडल्यामुळें तत्काल जी फार आर्द्रता येते ती. २ मातीत पाणी पडल्यानें जो उमलून गारा होतो तो.

चिघळ (पु. ना.) गूळ, साकर इ० पदार्थास जो द्रव सुटतो तो. [होणें.

चिघळणें (धा. ना.) चिघळानें युक्त

चिचावणें (धा. ना.) (ग्रं०) उंदीर इ०कांनीं चिवचिव करणें.

चिचोळा (वि०) क्रमानें निमोळता.

चिटपाखरूं (न. ना.) पांखरूं इ० तें

चिटी, चिठ्ठी (स्त्री. ना.) लिहिलेला किं० लिहावयाचे प्रसंगीं कोरा जो कागदाचा तुकडा तो. २ (वि०) चिटाचा जो अंगरखा इ० पदार्थ तो.

चिडचीड (स्त्री. ना.) दाटी.

चिडणें (धा. ना.) खिजणें. २ विषा इ०कांनी उतणें.

चिडाणी (पु. ना.) (ग्रं०) कुपात्र.

चिडी (स्त्री. ना.) (ग्रं०) चिमणी पक्षीण.

चिणचीण (स्त्री. ना.) कुरकुर. २ (अव्य०) रात्रीं रातकिडा इ० जो शब्द करितो त्याचें अनुकरण.

चिणणें (धा. ना.) बीळ, खिडकी

इ० विटा, दगड, माती इ०कां-
नीं खचखचून पक्कोणीं बुजविणें.
चिंतणें (स० चिंतन) (धा. ना.) कां-
हींएक अंत करणांत आलेल्या वि-
षयाचा बरा कि० वाईट, कसें
करावें काय करावें इ० रूप वि-
चार करणें तो. २ कांहींएक क-
ल्पना कि० योजना करणें इ०
चिंतन (स. न. ना.) चिंतण्याचा
व्यापार.
चितळ (पु ना.) एक रानांतील प-
[शु आहे.
चिता (स. स्त्री. ना ) प्रेत जाळण्या-
करितां काष्ठादिकांची रचून क-
रितात ती.
[चारणा.
चिंता (स स्त्री. ना.)काळजी. २ वि-
चिंताक्रांत (स वि०) चिंतेनें व्याकुळ.
चिताड (वि०) गिचमीड.
चिंतामणि (स. पु ना.) चिंतिलें
देणार असा एक पाषाण आहे.
२ एक रत्न आहे ३ गणपति.
चित् (स स्त्री. ना ) ज्ञान.
चित्त (स. न. ना.) अंतःकरण.
चित्तज (स पु ना. ) मदन.
चित्र (स. न. ना.) रेघा कि० माती
इ०कांनीं केला जो मनुष्यादिकांचा
आकार ते २ आश्चर्य [ड्याचा तो.
चित्रकाई (वि०) (ग्रा०) अपूर्व देह
चित्रगुप्त (स पु ना ) प्राणीमात्रांचे
पाप पुण्य लिहिणारा यमाचा लेखक
आहे. २ (वि०) उत्कृष्ट लिहिणा-
रा जो कारकून त्यास स्तुतीनें म्ह०.
चित्रलेप (न. ना )(ग्रं०)गोपीचंदन
कि० गणगोळ्या यांची मूर्ति ते.
चित्रविचित्र (स. वि०) अनेक प्र-
कारच्या रंगांनीं युक्त तो. २ आ-
श्चर्यकारक ज्या अनेक प्रकारच्या
कथा त्या प्र०.
चिथावणें (धा. ना ) एकाद्यास चा-
ड येई असा व्यापार करणें [क ते.
चिंब (वि०) अति भिजलेलें वस्त्रादि-
चिभूड (स्त्री. ना.)एक वेल आहे
२ (न.) तिचे फळ ते. [णारा.
चिमकुला (वि०) लहानसा, चिम-
चिमकुरा (पु. ना.) चिमटीनें अंगा-
ची कातडी ओढण्याचा प्रकार तो.
चिमखडा (पु ना.) कांबीनें कि०
बोटाचें जोरानें मारितात खडा तो.
२(वि०)चणचणीत हुशार मुलगा तो.
चिमट (स्त्री. ना.) अंगुष्ठ व तर्जनी
यांच्या संयोगानें जी आकृति होते ती.
२ तिचे प्रमाणाचा पदार्थ ती.
चिमटा (पु. ना.) पदार्थ घट्ट धरणें,
उपटणें इ०कांसाठीं लोखंडाचा क-
रितात तो. २ चिमकुरा. ३ दो-
न नद्या एकत्र मिळाल्या असतां
जो आकार होतो तो
चिमणा (पु ना ) एक लहान पक्षी
आहे. २ (वि०) चिमकुला.
चिमोरा (पु. ना.) (ग्रा०) चिमटा.
चिरकणें (धा. ना ) हगतांनें भ्याल्या-
मुळे चिरें असा शब्द करणें २ र-
डकुंडीस येणें. ३ मुलानें थोडथोडं
हगणें.
चिरकांडी (स्त्री. ना.) फळ, शरी-

रावयव इ०कांतून दाबणें इ०कारणा-मुळें जोरानें जो रस, रक्त इ० कांची धार उडल्ये ती.

चिरंजीव (पु. ना.) पुत्र व पुत्रासारिखा जो कोणी त्यास कागदोपत्रीं हें विशेषण देतात. २ ब्रह्मकल्पपर्यंत वांचणारे जे ते प्रत्येक.

चिरड (स्त्री. ना.) उणें उत्तर, मर्मश्रवण, इ० कारणामुळें अंतःकरणास क्षोभिरूप धर्म उत्पन्न होतो ती.

चिरडणें (धा. ना.) काहिएक पदार्थ दोन पदार्थांचे कचींत सांपडून चुरला जाई असें करणें,किं० तसा होणें.

चिरडी (स्त्री. ना.) लहान मुलींचें नेसायाचें लुगड्यासारिखें एक वस्त्र आहे ती.

चिराग (फा० पु. ना.) दिवा.

चिरोटा (पु. ना.) एक पक्वान्न आहे.

चिलखत (न. ना.) शरिरावर गोळी, वार इ० न लागावा ह्मणून लोखंडाच्या बारिक बारिक कड्या एकमेकांत गुंफून जो अंगरख्यासारिखा प्रकार करितात तें.

चिलम, चिलीम (स्त्री. ना.) तंबाखू इ० पदार्थ आंत घालून वर अग्नि ठेवून गुरगुडीचे मेरूवर ठेवितात ती.

चिलमी (वि०) भंगड लोकादिकांनीं उठविलेली बातमी, वर्तमान इ० तें.

चिलींपिलीं (न. ना.) मुलेंलेंकरें.

चिवट (वि०) चिकण जो काष्ठादि पदार्थ तो.

चिवडणें (धा. ना.) भात, पोळी, फळ इ० पदार्थांची दुर्दशा होई असें विदारण करणें.

चिवडा (पु. ना.) काहिएक पदार्थ अनेकवार चिवडल्यामुळें झाली जी त्याची दुर्दशा तो. २ काहिंएक गोष्टीचा विचका तो. ३ पोहे, चुरमुरे, डाळें इ० पदार्थ मिसळून तळून करितात तो.

चिवळ (वि०) (ग्रं०) रोड.

चिवा (पु. ना.) वेळूंत एक भेद आहे.

चिन्ह (सं. न. ना.) काहिंएक गोष्टीचें किं० गुणाचें जें कोणेक वस्तूंत काहिएक ज्ञापक असतें तें. २ काहीएक पदार्थ ओळखला जावा ह्मणून त्यावर जें अंकनादि करितात तें. ३ विलक्षण जो मनुष्यादि तें, किं० त्याच्या विलक्षण चेष्टा तें.

चिळस (स्त्री. ना.) वीट, कंटाळा.

चींची (स्त्री. ना.) (ग्रं०) दुर्दशा. २ फजीती.

चीक (स. चिक्कण) (पु. ना.) रुई इ० पदार्थांचा चिकट दुधासारिखा अंश तो.

चीज (फा० स्त्री. ना.) वस्तु. २ चमत्कारिक गायनादि विद्या ती. ३ धृपदादि कवीत.

चीजवस्त (चचि) (स्त्री. ना.) वस्त्रपात्रादि सर्व वस्तुमात्र ती.

चीड (स्त्री. ना.) चिरड.

चीण (पु. ना.) घर इ० कांतील भूमीस ओल न यावी म्हणून तिचे पोटीं घट्ट चिणून दगडांचा थर बसवितात तो. २ परकर इ० कांस

कंबरेजवळच्या भागास ज्या चुण्या शिवणीसाठीं घालितात तो.

**चीत** (वि०) कुस्तींत पराभूत होऊन उताणा पडला तो. २ चितांग.

**चीप** (स्त्री. ना.) पातळ दगड तो.

**चीर** (स्त्री. ना.) तडा गेल्यामुळें किं० सांधा न बसल्यामुळें बारीक रेघेसारखी फट राहते ती. २ (सं.न.) (ग्र०) वस्त्र.

**चुकणें** (धा. ना.) जी गोष्ट ज्या प्रकारानें ज्या काळीं ज्या देशीं अशी व्हावी असा जो अजमास त्यांत अंतर पडणें. २ कांहींएक प्राप्त झालेलें खटलें, कलह इ० त्याची निवृत्ति होणें इ०.

**चुकतमाकत, वाकत** (अव्य०) चुकत चुकत अशा प्रकारानें.

**चुकविणें** (धा. ना.) चुके असें करणें. २ चुकवाचुकव करणें. ३ देणें, घेणें इ० कांची वारावार करणें.

**चुकामूक** (स्त्री. ना.) कांहींएक गोष्ट पदार्थ इ० कांचीं ज्या काळीं ज्या ठिकाणीं गांठ पडावी असा अजमास त्याचा अभाव तो.

**चुकारतट्टू** (वि०) चुकवाचुकव करणारास निंदेनें म्हणतात.

**चुकावणें** (धा. ना.) चुकविणें.

**चुकी** (स्त्री. ना.) कांहींएक व्यापार ज्या प्रकारानें घडावा, करावा त्यास कांहीं कारणामुळें अंतर पडतें ती.

**चुकूर** (वि०) अपरिचित मनुष्यादि समुदाय किं० स्थळ यांत जी कोणेकास चकितावस्था प्राप्त होते तशा अवस्थेनें युक्त झाला तो.

**चुगलखोर** (वि०) चहाडखोर.

**चुगली** (स्त्री. ना.) चहाडी.

**चुचकारणें** (धा. ना.) क्रुद्ध होऊन अनावर झाला जो अश्वादि पशु त्यास स्थिर करायाकरितां तोंडानें एक तऱ्हेचा विलक्षण शब्द करणें किं० तशा व्यापारानें त्यास युक्तीनें जवळ बोलावून गोंजारणें.

**चुटका** (पु. ना.) कवित्वादिकांतील किं० भाषणादिकांतील चमत्कारिक जो अल्पांश तो. २ चटपट.

**चुटकी** (स्त्री. ना.) अंगुष्ठ व मध्यमा यांच्या संयोगांतून जो शब्द होतो ती.

**चुट्टा** (पु. ना.) तंबाखू ओढायाची पानाची विडी तो.

**चुडा** (स. चूडा) (पु. ना.) स्त्रियांचें हस्तभूषण आहे. २स्त्रियांचें सौभाग्य.

**चुणूक** (स्त्री. ना.) कांहींएक पदार्थ किं० गोष्ट यांचे ज्या अवयवावरून मुख्य अवयवीचें सर्व स्वरूप ध्यानांत येतें असा जो त्या अवयवाचा प्रकटभाव ती.

**चुनडी** (स्त्री. ना.) स्त्रियांचे उपयोगी बारीक ठिपक्यांनीं युक्त असें एक वस्त्र आहे ती. [२ (वि०) कद्रू.

**चुंबक** (सं. पु. ना.) लोहचुंबक.

**चुंबन** (सं. न. ना.) प्रीतीनें मुखादि चुंफण्याचा व्यापार तें.

**चुरचुरणें** (धा. ना.) कांहींएक गोष्टीविषयीं लागली जी चटपट तिनें युक्त होणें. २ भाजल्यामुळें किं० क्षतादिकांस तिखट, खारट पदार्थाचा

संयोग झाल्यामुळे त्यांनी व्यथा विशेष उत्पन्न करणें.

**चुरचूर** (स्त्री. ना.) चटपट.

**चुरबुरीत** (वि०) (ग्र०) तीक्ष्ण.

**चुरस** (स्त्री. ना.) वैमनस्य.

**चुरा** (स. चूर्ण) (पु. ना.) ठेचणें, मोडणें, फुटणें इ० कारणामुळें पदार्थांचे झाले जे खंडशः तुकडे ते. २ श्रमादि कारणामुळें शरीराचे अवयवांचा झाला जो शिथिलपणा तो.

**चुराडा** (पु. ना.) चुरा.

**चुळका** (स. चुलुक) (पु. ना.) जलादि पदार्थ हातांत राहावा म्हणून द्रोणाकार हाताचा आकार करितात तो. २ त्यांत मावलेला जलादि पदार्थ तो.

**चुळबुळणें** (धा. ना.) चळवळ करणें.

**चुळुके** (वि०) (ग्र०) सुंदर. [खिळा.

**चूक** (स्त्री. ना.) चुकी. २ बारीक

**चूड** (स्त्री. ना.) सण इ० वांचे काड्यांची इ० जी जुडी मशालीसारखी पेटवून उजेडासाठीं करितात ती. २ (स. पु. ना.) मुगुट.

**चूर** (पु. ना.) चुरा. २(वि०)निमग्न.

**चूर्ण** (स. न. ना.) औषधादिकांचा बारीक चुरा तें. २ चुना.

**चूर्णिका** (स. स्त्री. ना.) शब्द, अर्थादि अलंकार जीत आहेत अशी काव्यादिकांतील गद्यपद्यात्मक कविता ती.

**चेइरें** (वि०) (ग्रं०) जागृत.

**चेंगट** (वि०) कांहीं कार्य करण्याविषयीं मंद तो.

**चेंगरणें** (धा. ना.) चुरलें जाणें.

**चेंचणें** (धा. ना.) आघात इ० करून छिन्नभिन्न अवयव किं० शिथिल अवयव करणें.

**चेटक, चेटूक** (न. ना.) कोणाचा घात किं० कोणास ठकविणें याचे उपयोगी एक मंत्रविद्या आहे २ कारस्थान. [आहे. २ चेटूक.

**चेडा** (पु. ना.) (ग्र०) एक पिशाच

**चेडें** (न. ना.) (ग्र०) पिशाचबाधा.

**चेणें** (धा. ना.) (ग्र०) जागें होणें

**चेतणें** (स. चेतन) (धा. ना.) अग्नि, काम, क्रोध इ० कांहीं प्रदीप्त होणें

**चेंदा** (पु. ना.) चुराडा. [दाटी तो.

**चेप** (चेपणें) (पु. ना.) अतिशय

**चेपणें** (धा. ना.) कापूस इ० पदार्थ अवळला जावा म्हणून दाबणें.

**चेला** (पु. ना.) शिष्य.

**चेव** (पु. ना.) कांहीं कार्याविषयीं कांहीं कारणानें मनांत उत्पन्न झाली जी उत्कंठा ती.

**चेवणें** (धा. ना.) मर्यादा सोडल्यामुळें किं० वेड लागल्यामुळें लोकांत अप्रतिष्ठा पावणें.

**चेवा** (पु. ना.) (ग्र) जागेपणा.

**चेष्टा** (स. स्त्री. ना.) चलन वलनरूप व्यापार तो. २ दुसऱ्यास चीड येण्याजोगा व्यापार तो.

**चेहरा, चेहेरा** (फा० पु. ना.) मुखश्री किं० त्याचा आकार तो.

**चैतन्य** (स. न. ना.) चेतनपणा.

**चैन** (न. ना.) मनाची स्वस्थतारू-

प अवस्था तें. [(ग्र०) विचार

चोख (वि० ) चांगलें. २ (पु. ना.)

चोखट (वि०) चांगलें, शुद्ध, निर्मळ.

चोखडें (वि०) चोख.

चोंखणें ( धा. ना.) फलादिकांतील रस मुखानें आकर्षून घेणें.

चोखाळ (वि०) (ग्र) चोख.

चोखाळी (स्त्री. ना.) (ग्र०) फूल.

चोज (न. ना.) (ग्र०) कौतुक, नवल. २ प्रीति.

चोजणें (धा. ना.) (ग्र०) जाणणें.

चोढें (वि.)(ग्र०)खोल. २ (न.)खड्डा.

चोंथा (पु. ना.)नारळ इ० कांचा रसांश घेतल्यावर जो अवशेष भाग राहतो तो.

चोपडणें ( धा.ना. ) तूप, तेल इ० पदार्थाचें अवयवांस चोळणें.

चोपडी (स्त्री.ना.)कांहीं कागद एकत्र बांधून सारखे कापून जी वही करितात ती.

चोपणें (धा. ना.) ठोकून ठाकून जमीन इ० घट्ट व साफ करणें. २ रोड होणें. ३ एकाद्यास काठी इ० कानीं ठोकणें. ४ (न.) जमीन चोपायाचें उपयोगी लांकूड तें.

चोंबडा, चोमडा (वि ) इकडली गोष्ट तिकडे तिकडली गोष्ट इकडे सांगावी असा स्वभाव ज्याचा तो. २कोडगा.

चोर (स. चोर) (पु. ना.) दुसऱ्याची वस्तु त्याची दृष्टि चुकवून किं० बलात्कारानें घेऊन जातो तो.

चोरखिडकी (स्त्री. ना.) कांहीं प्रसंगीं पळून जाणें इ० कार्यासाठीं, किल्ला इ० कांत गुप्त खिडकी असते ती.

चोरगस्त (स्त्री. ना ) लोकांस न समजण्याजोगी शहर इ० कांत रात्री सरकारची मुकी गस्त फिरते ती.

चोरघडी (स्त्री. ना.) कोरे वस्त्राचे पोटांत समजुतीस न येण्याजोगी घडी असते ती.

चोरचिरटा (पु. ना.) चोर इ० तो.

चोरणें (धा. ना.) दुसऱ्याचे वस्तूचा अपहार करणें. २ कांहीएक गोष्ट कोणास न कळू देतां गुप्त राखणें.

चोरबातमी (स्त्री. ना. ) गुप्त रीतीनें समजुनीत आणिलेलें वर्तमान ती.

चोरापोरीं (अव्य०) चोर, पोर इ० कांनीं नेल्यामुळें कांहीएक वस्तु नाहींशी होई अशा प्रकारें.

चोरी (स्त्री. ना.) चोराचें जें कर्म ती. २ कांहीएक कर्म करण्याविषयी शंका ती.

चोला (पु.ना.) घेरावांचून अंगरख्याचा वरील भाग तो.

चोहटा (पु. ना.) (ग्र) चवाठा.

चोळखा (पु.ना.) (ग्र०) सुरकुती.

चोळामोळा (पु.ना.) वस्त्र इ० पदार्थाची चोळून मळून दुर्दशा तो.

चौक (पु ना.) चौसोपी वाड्याचें मधलें चतुरस्र अंगण तो. २ लावणी इ० कांचे कडवें तो. ३ घोडा इ० कांचा बराबर चार पाय उचलून त्वरेनें चालण्याचा प्रकार तो. इ०.

चौकडा (पु. ना.) समान चार मो-

त्यांचा समुदाय तो. २ चार कुड-क्यांचा जो समुदाय तो.

**चौकडी** (स्त्री. ना.) चतुःसंख्यारूप पदार्थांचा समुदाय तो. २ एका जुटी-चे चार मनुष्यांचा समुदाय तो. ३ चौकडी गुंग होणें इ० अक्कल गुंग होणें.

**चौकशी** (स्त्री. ना.) खरें खोटें, चांगले वाईट, सस्तें माहाग इ० कांच्या निर्णयाविषयीं जो पुरतेपणी विचार तो. [णी कुशल तो.

**चौकस** (वि०) चौकशी करण्याविष-

**चौकळ, चौकाळ** (वि०) कांहींएक कार्यास पुरून उरायाजोगा झाला जो विपुल पदार्थ तो.

**चौका** (पु. ना.) पुरभई लोक स्वयंपाकासाठीं प्रायः झाडून सारवून चतुरस्र जागा करितात तो.

**चौकी** (स्त्री. ना.) शहर, मार्ग इ० कांचे नाक्यावर आल्या गेल्याची चौकशी, झाडाझडती इ० कांचे उपयोगी शिपाई लोक राहण्यासाठीं जी जागा घरासारखी बांधितात ती २ त्या स्थळीं ठेविलेला शिपाई लोकांचा समुदाय तो. ३ देव इ० ठेवायासाठीं लाहान चौरंग करितात तो

**चौखरणें, खुरणें** (धा. ना.) चोहींकडे ताणून बांधणें.

**चौगर्द, गर्दी** (अव्य०) चारी बाजूस.

**चौंगा** (पु. ना.) चार अंगुळें प्रमाणाचे मान तो.

**चौघडा** (पु. ना.) देव, राजा इ० कांचे द्वारीं नित्यशः वाजवायासाठीं काळू, नगारे, वाजत्रें, कर्णा इ० समुदाय ठेविला असतो तो.

**चौघडी** (स्त्री. ना.) चारपदरी वस्त्राची घडी ती.

**चौघुला** (पु. ना.) ग्रामसंबंधी वतनदार एक अधिकारी आहे.

**चौचक** (न. ना.) (ग्र०) कवाड, दार.

**चौंढाळ** (वि०) चोहींकडून कांहींएक कार्याची ढवळाढवळ करितो असा पंचकळ मनुष्य तो

**चौतर्फ, तर्फा** (वि०) चोहों स्वामीच्या संबंधानें युक्त जो देश, ग्राम इ० तो. २ (अव्य०) चौगर्दा.

**चौथ** (स्त्री. ना.) कांहींएक उत्पन्नाची चौथाई ती. २ चौथी तिथि

**चौथरा** (पु. ना.) वर घर इ० बांधायासाठीं अगोदर खाली चौकोनी बंदिस्त करितात तो.

**चौथाई** (स्त्री. ना.) चतुर्थांश

**चौपाशीं** (अव्य०) (ग्र०) चोहींकडे.

**चौफळा** (पु. ना.) (ग्र०) झोंपाळा.

**चौफाळणें** (धा. ना.) (ग्र०) घालवून देणें.

**चौफुला** (पु. ना.) लवंग, जायफळ इ० पदार्थ निरनिराळे ठेवायाच्या सोईचें धातुमय पात्र करितात तो.

**चौफेर** (अव्य०) चौगर्दा

**चौबार** (पु. ना.) (ग्र०) चवाठा.

**चौरस** (पु. ना.) लांबी, रुंदी, उंची हे धर्म असून ज्याची चार अंगें तासून साफ केली आहेत असा स्तंभादि पदार्थ तो. २ चतुरस्र जें क्षेत्रादि तो.

चौसोपी (वि०) चार आहेत सोपे ज्यास असें घर इ० तें.

च्युत (सं. वि०) गलित. उ० पदच्युत इ०.

---

—छ—

छ— हा वर्ण सातवें व्यंजन आहे.

छ: (अव्य०) दुसऱ्याच्या भाषणादिकांचा तिरस्कार कर्तव्य असतां याचा प्रयोग. उ० छ: तो काय सांगतो आपलें कपाळ.

छकडा (सं. शकट) (पु. ना.) लष्करांतील सामान वाहण्याचा लहान गाडा.

छकडी (सं. षट्क) (स्त्री. ना.) साहा संख्या पदार्थाचा समुदाय तो.

छकणें (धा. ना.) ठकणें. २ लिहिलेले नांव इ० खोडून टाकणें.

छक्क (सं. चकित) (वि०) आश्चर्ययुक्त.

छक्कड (स्त्री. ना.) चपराक. २ देणें घेणें इ० व्यवहारांत जो चट्टा तो. ३ कांहीं व्यवहारांत कोणेकास फसविण्याचा व्यापार तो.

छक्कापंजा (पु. ना.) डावपेंच.

छचोर (वि०) हलकट मनुष्य तो.

छट (सं. शठ) (वि०) ज्याचें भाषणादि व्यवहारांत छक्केपंजे आहेत तो. २ कृपणासही ह्मणतात.

छटा (स्त्री. ना.) छाया. २ किरण.

छडी (स्त्री. ना.) वेत इ० कांची बारीक काठी. २ राजकीय चिन्हांत सोनें कि० रुपें यानीं मढवून कि० अग्रास लावून काठी करितात ती.

छत (सं. छत्र) (न. ना.) मंडप इ० कांचा आंतल्या अंगचे वरील प्रदेशीं पसरट वस्त्र लावितात तें. २ (अव्य०) छ:. ३ गायन इ० कांत छत भरणें म्ह० पराकाष्ठेचा रंग करणें.

छत्र (सं. न. ना.) पर्जन्य कि० उष्ण यांचे निवारणार्थ वस्त्रादिकांच हातीं दांडा धरून डोकीवर धरायाजोगें करितात तें. प्रायः देव, राजा यांजवर धरितात. २ ज्यांच्या सत्तेखालीं आपणास निःकाळजीनें वागायास सांपडतें असे जे पुत्रास मातापितर, प्रजेस राजा इ० तें.

छत्रपति (सं. पु. ना.) राजा. २ दुदांडी पैशास ह्मणतात.

छत्री (सं. छत्र) (स्त्री. ना.) सामान्य लोक पर्जन्य, उष्ण निवारणार्थ कागदादिकांची छत्रासारखी करितात ती.

छंद (सं. पु. ना.) श्लोकादिकांचे गुरु, लघु वर्णविशिष्ट जे भेद सांगितले आहेत तो. २ कांहीएक गोष्ट केल्यावांचून चैन पडूं नये असा जो अंतःकरणास अभिलाष तो. ३ कांहींएक वस्तूची उत्कंठा.

छदाम (पु. ना.) पूर्वीं कांहींएक फार हलकें नाणें चालत होतें. सध्यां उपलब्ध नाहीं. २ मला छदाम मिळत नाहीं, मी तुझा छदाम लागत नाहीं असे प्रयोग मात्र होतात; तेथें कांहींएक मिळत नाहीं, लागत नाहीं असा अर्थ जाणावा.

छद्म (स. न. ना.) कपट. २ भाष णादिकांत गुप्त जो दश किं० मर्म ते
छद्मी (छद्म) (वि०) कपटी. २ मर्म बाहेर काढण्याचा ज्याचा स्वभाव तो.
छपणें (धा. ना.) न समज देतां गुप्त राहणें [घर करितात ते.
छपर, छप्पर (न. ना.) तृणादिकांचे
छपरपलंग (पु. ना.) वस्त्रादिकांचे छपरानें युक्त पलंग तो.
छपरी (स्त्री. ना.) खोपटी.
छपवणी, छपावणी (स्त्री. ना.) कांहींएक गोष्ट छपविण्याचा व्यापार तो.
छब (स. छवि) (स्त्री. ना.) पदार्थांवर चांगुलपणा दिसण्यास कारणभूत जी खुबी ती किं० त्या त्या पदार्थसंबंधी इतर भेदक जो प्रकार तो.
छबिना (फा० पु. ना.) सैन्य, ग्राम, दुर्ग इ० कांच्या रक्षणार्थ जो घोडेराऊत यांचा समुदाय किं० गजबतांचा समुदाय निरंतर सिद्ध ठेविला असतो तो. २ उत्साहादि प्रसंगीं देवाची स्वारी मिरवते ती.
छर्रा (पु. ना.) बंदूक इ० कांत घालण्यास उंडदाएवढ्या बारीक गोळ्या असतात तो. [व्यापार
छल, छळ (स. पु. ना.) छळण्याचा
छलना, ळना (स. स्त्री. ना.) गांजण्याचा व्यापार तो.
छळणूक (स्त्री. ना.) गांजणूक.
छळवाद (पु. ना.) छळणा [गजेला.
छाकटा (वि०) मद्यपानें करून झि-
छांछूं (न. ना.) अल्प स्वल्प मत्रादिकांचा टाणाटोणा तें.

छाट (पु. ना.) कागद, वस्त्र इ० बेताप्रमाणें ठेवून कापून काढायाचा किं० काढिला जो अंश तो.
छाटणें (धा. ना.) कांहींएक पदार्थांचा बेतापेक्षां अधिक राहिला जो किंचित् अंश तो कातर इ०कानें कापून काढणें. २ वस्त्र इ० मळकाढून टाकून स्वच्छ करणें. दम छाटणें म्ह० श्वासोच्छ्वास कोंडून धरणें. पणी इ० छाटणें म्ह० हातानें तोडीत जाणें इ०.
छाटी (स. शाटी) (स्त्री. ना.) संन्याशाचें नेसावयाचें किं० पांघरायाचें भगवें वस्त्र तें. २तोंड पुसायाकरितां धुवट वस्त्राची घडी बाळगितात ती.
छाती (स्त्री. ना.) ऊर. २ कांहींएक गोष्टीविषयीं धैर्य न सुटे अशी मनाची दृढता ती.
छांदिष्ट (वि०) लोकांचें न ऐकतां स्वमतानें लोकविरुद्ध वागण्याचा ज्याचा स्वभाव तो.
छान, छाण (स्त्री. ना.) चोकशी. २ सुशोभित दिसायाजोगा वस्त्र भूषणादिकें करून किं० स्वतःसिद्ध केला जो डौल तो.
छानछुकी, छोक (स्त्री. ना.) छान दिसायाजोगा वस्त्र, पात्र इ० कांचा यथायोग्य रचनेचा व्यापार तो. किं० तेणेंकरून आली शरीरादिकांस शोभा ती.
छानणें (धा. ना.) उदकादि पदार्थ गाळणें. २ कांहींएक पदार्थ किं०

व्यापार यांतील तत्व समजायासाठीं त्या पदार्थाची कि० व्यापाराची चौकशी करणें.

छाप (पु. ना.) रुपया, कागद इ० कांवर अक्षरादि चिन्हें उमटायाचें एक यंत्र आहे. २ त्या यंत्रानें उमटलेलें अक्षरादि चिन्ह तो. ३ कोणेकाचें कांहीं गुणामुळें इतरांवर वर्चस होऊन तेज पडतें तो.

छापखाना (पु. ना.) रुपये, अक्षरें इ० छापण्याचा कारखाना तो.

छापा (पु. ना.) शत्रु असावध पाहून त्यावर अकस्मात् घाला घालितात तो २ छाप.

छाया (स. स्त्री. ना.) व्यवधानानें प्रकाशाचा प्रतिबंध झाला असतां व्यवधानासम आकाराचा जो तेजाचा अभाव तो. २ जेणेंकरून छाया होय असें तृणादिकांचे आच्छादन तो. ३ सुखानें राहायास कारण जो मातापितर, यजमान इ० कांचा आश्रय तो इ०.

छायामंडप (स. पु. ना.) (ग्र०) बारीक शुभ्र वस्त्राचा पडदा सोडून आंत दिवा ठेवून त्यांमधून मनुष्यादिकांचीं कागदाचीं कातरलेलीं चित्रें फिरविल्यानें जी पडद्यावर त्यांची छाया भारी मोठी दिसते त्या पडद्यास म्हणतात.

छावणी (स्त्री. ना.) कांहीं दिवस राहावयाकरितां लष्करी लोक छपरें इ० बांधून त्यांत वस्ती करितात तो.

छावा (पु. ना.) हत्तीचें पिलूं.

छिः (अव्य०) छः.

छिडकाव (पु. ना.) वस्त्रादिकांवर रंगादिकांचा किं० जलाचा बिंदुशः सेक तो.

छिथू (स्त्री. ना.) सभादिकांत अप्रतिष्ठा व्हायाजोगा धिक्कार तो.

छिद्र (स. न. ना.) प्रवेशायोग्य जें द्वार तें, बीळ, भोक. २ कांहीएक व्यापारास साधन जो अनेक अंग त्यांतून एकाद्याची न्यूनता झाल्यामुळें जी विकलांगता तें. ३ छद्म.

छिनाल (वि०) पति सोडून जाराजवळ जाते ती, तसा आपली विवाहित स्त्री सोडून दुसऱ्या स्त्रीशीं जाणारा तो.

छिनावणें (धा. ना.) हिरून घेणें.

छिन्नभिन्न (स. वि०) तुटून फुटून तुकडे झालेला.

छिलणें (धा. ना.) लेखणी इ० पदार्थांचा चाकू इ० बारीक शस्त्रानें कीस काढणें.

छीछी (अव्य०) छः. २ (स्त्री) चीची.

छेकणें (धा. ना.) एकाद्याचे नांवे लिहिलेली रकम इ० ती खोडून टाकणें.

[खण तो.

छेका (पु. ना.) रकम खोडल्याचा

छेद (स. पु. ना.) वृक्षादिक तोडण्याचा व्यापार तो. २ तुकडा. ३ छिद्र.

छेदणें (स. छेदन) (धा. ना.) वृक्षादिक शस्त्रानें तोडणें. २ मोत्य इ० कांस छिद्र पाडणें.

छोटा (वि०) लहान.

छोटेखानी (वि०) मोठ्या योग्यतेचा नव्हे जो मनुष्यादि तो.

## —ज—

ज— हा वर्ण आठवें व्यंजन आहे. संस्कृत शब्दापुढें याचा योग झाला असतां त्यापासून उत्पन्न झालेला असा अर्थ दाखवितो. उ० पंकज, अंडज इ०.

जइत (पु. ना.) (प्रा०) जय.

जई (अव्य०) (प्रा०) जेव्हां. २ जेथें.

जकात (अर० स्त्री. ना.) कोणेक स्थळापासून स्थलांतरीं व्यवहारार्कारितां आणितात कि० नेतात जो जिन्नस त्या संबंधीं त्या त्या स्थळीं कि० मार्गातील नाक्यावर जो राजकर द्यावा लागतो तो.

जखडणें (धा. ना.) आवळून बांधणें.

जखम (फा० स्त्री. ना.) शस्त्रादिकांनीं पडलेलें जें क्षत तें. २ कांहीएक व्यापारांत येतो जो चट्टा तो.

जख्ख, जख्खड (वि०) म्हातारपणामुळें अशक्त झाला तो. [सृष्टि तें.

जग (स. न. ना.) स्थावरजंगमरूप

जग (फा० पु. ना.) लोखंड कि० त्याचें शस्त्रादि बहुत दिवस वहिवाटींत नसल्यामुळें त्याजवर जो मळ चढतो तो. २ अनभ्यासामुळें विद्यादिकांवर जी मालिनता येते ती. [आहे.

जंगट (न. ना.) कांश्याचें एक वाद्य

जगडंबर (पु.न. ना.)जगद्रूप पसारा.

जगड्वाळ (वि०) अवाढव्य. २ मोठें. ३ भयंकर.

जगणें (धा. ना.) न मरतां राहणें कि० कांहीं नाश, व्यय, अपहारादि न होतां राहणें.

जगत्त्रय (न. ना.) स्वर्ग, मृत्यु, पाताळ या तिहींचा समुदाय तें. [ड तो.

जगभांड (वि०)सर्वांशीं भांडणारा द्वा-

जंगम (स. वि०) स्वतः चलनवलनास जो समर्थ मनुष्य, पशु इ० तो. २ (पु.) एक जाति आहे व मत आहे.

जंगल (स. न. ना.) अरण्य. २(फा०पु.)एक रोग आहे. ह्याचा हिरवा रंग होतो. [प्रसिद्धि तें.

जघन्य (न. ना.) गुप्त गोष्टींची अति

जंजाळ (स. जजाल) (जगज्जाल) (न. ना.) अंतःकरणास त्रास देणारा जो संसारादिसंबंधी मुलेंबाळें इ० खटला तो, कि० त्यानें त्याचे निर्वाहाविषयीं अनेक प्रकारची खटपट तो. [बेडी.

जंजरा (फा० पु. ना.) पाण्यांतील

जंजीर (फा० स्त्री ना) सांखळी

जटा (स. स्त्री. ना.) शेंडी इ० कांनि लांबलांब केस परस्पर चिकटून जो आकार होतो तो.

जठर (स. न. ना) उदर, पोट

जठराग्नि (स. पु. ना) खाल्लेल्या अन्नाचा परिपाक करणारा पोटांतील अग्नि तो.

जड (स. वि०) भारानें युक्त तो. २ बुद्धि इ० ज्यांची मंद आहे तो. ३ ह्याचे वचनादि मान्य करावें लागतें असा जो मनुष्य तो त्या समुदायांत ४ दुर्निवह कांहीएक संकट तें. ५ अचेतन जो पदार्थ तो इ०.

जडकावणें (धा. ना.) रोग, पर्जन्य इ० कांनी पूर्वावस्थेपेक्षां अधिक होणें.

जडजोखींव (न. ना.) ज्याचा संभव आहे असा अनर्थापात तें.

जडण (स्त्री. ना.) कोणीएक पदार्थ सिद्ध होई असे अनेक पदार्थ यथा-योग्य एकत्र संबद्ध करण्याचा प्रकार ती.

जडणी (स्त्री. ना.) जडण.

जडणें (धा. ना.) जडण करणें. २ हिरा इ० कोंदणांत बसविणें. ३ शरीरास रोगादिक किं० स्वभावास व्यसन इ० पूर्वींची नसतां दुर्निवारपण प्राप्त होणें इ०.

जडभारी (पु. ना.) (ग्रं०) संकट.

जडाव (पु. ना.) जडणी.

जडी (स्त्री. ना.) वृक्षादिकांची मुळी.

जडीबुटी (स्त्री. ना.) औषधोपयोगी मुळ्या, पत्रा, भस्म इ० तीं. २ गुप्त ठेविले जे नग, नगोटी, रुपये इ० तीं.

जणुं (अव्य०) जसा काय. प्रायः उत्प्रेक्षेचें द्योतक.

जंत (स. जन्तु) (पु. ना.) पोटांत काडुसारिखे कृमि उत्पन्न होत असतात ते प्र०.

जतन (स. यत्न) (स्त्री. ना.) पालन-पोषणादिकें करून आस्थापूर्वक उत्तम रीतीनें रक्षण ती.

जती (स. यती) (पु. ना.) संन्यासी परंतु बौद्धधर्मी पाषंडी त्यास म्हणतात.

जंत्रा (पु. ना.) (ग्रं०) घोडा.

जत्रा (स. यात्रा) (स्त्री. ना.) ज्या ज्या देवतेचा जो जो कांहीं नियमित दिवस असतो त्या त्या दिवशीं तेथें त्याच्या भक्त जनांनीं दर्शनास यावें, कथा, गोंधळ इ० करावें असा जो समारंभ ती, किं० त्या समारंभास मिळालेला मनुष्यसमुदाय ती.

जधीं (अव्य०) (ग्रं०) ज्या दिवशीं.

जन (सं. पु. ना.) जगांतील जीवसमुदाय.

जनक (सं. पु. ना.) बाप. २ ज्या वस्तूचीं जी उत्पत्तिकारणें त्यांत जो मुख्य तें.

जनन (सं. न. ना.) उत्पत्ति.

जननी (सं. स्त्री. ना.) आई.

जनपद (सं. पु. ना.) देश.

जनानखाना (फा० पु. ना.) राजादि समर्थ लोकांचें अंतःपुर तें.

जनानी (फा० वि०) केवळ स्त्रियांसंबंधीं वस्त्रादिक तें.

जनावर (फा० न. ना.) हत्ती इ० पशु आंव सर्पादिक तें.

जन्म (सं. न. ना.) जनन.

जन्मप्रभृति (सं. अव्य०) जन्मापासून.

जन्मसवाशीण (स्त्री. ना.) जीस वैधव्य प्राप्त होत नाहीं अशी, जी वेश्या, बटीक इ० ती.

जन्मसावित्री (स्त्री. ना.) जन्मपर्यंत जी सौभाग्यवती स्त्री ती, किं० सुवासिनी स्त्रियांस आशीर्वादार्थ प्रायः वृद्ध स्त्रिया म्हणतात.

जन्माचेकर्मीं (अव्य०) कधीं काळीं.

जन्मांतर (सं. न. ना.) अन्य जें जन्म तें. २ दैव.

जन्मादारभ्य (सं. अव्य०) जन्मापासून. [धक्का तो.
जन्मांध (सं. वि०) उपजत जो आं-
जप (सं. पु. ना.) ईश्वरनाम, मंत्र इ० कांचा मनामध्यें अनेकवार उच्चारण्याचा व्यापार तो.[पुण्यकर्म तें.
जपजाप्य (सं. न. ना.) जपादिक
जपणी (जपणें) (स्त्री. ना.) चाकर इ० गमेल किं० चोर इ० डोळा चुकवून कांहीं नेईल यासाठीं त्यावर लक्ष्य ठेवण्याचा व्यापार तो.
जपणें (सं. जप) (धा. ना.) कांहींएक गोष्टींत अंतर न पडावें म्हणून निरंतर तिकडे लक्ष्य ठेवणें. २ जप करणें.
जपमाळ (सं. अप० स्त्री. ना.) जपाची संख्या धरावयाची माळ ती. २ कांहींएक कार्याची घोकणी ती.
जपाणणें (धा. ना.)(प्रं०) आच्छादित करणें. २ अपूज्य करून अपमान करणें.
जप्त (अर० वि०) सरकारानें अटकाव्यांत ठेविलें जें वतन इ० तें.
जप्ती (जप्त) (स्त्री. ना.) जप्त करण्याचा व्यापार ती.
जबडा (पु. ना.) दंतांकडीपासून मुखाचा अर्धभाग तो.
जबर (अर० वि०) विद्या, द्रव्य, बळ, इ० कानीं अधिक तो. [निग्रह.
जबरदस्ती (फा० स्त्री. ना.)बलात्कार,
जबरा (अर० वि०) जबर.
जबरी (अर० स्त्री. ना.) जबरदस्ती.
जबानी (स्त्री. ना.) वादी, प्रतिवादी, साक्षीदार इ० कांपासून वादनिर्णय करणारानीं लिहून घेतला त्याचा त्याचा मजकूर तो.
जबाब (फा० पु. ना.) प्रश्नावरलें उत्तर तो.
जबाबी (फा०वि०) जबाब करण्याविषयीं कुशल तो. २ तास भरला असतां त्यापासून आपाप ठोके वाजतात असें घड्याळ तें.
जंबूक (सं. पु. ना.) कोल्हा.
जम (जमणें) (पु.ना.) अनेक साधनांनीं साध्य जी कांहींएक गोष्ट त्या साधनांचे अनुकूलतेमुळें त्या गोष्टीचा सोयीनें जो चालूपणा तो.
जमवाजमव (स्त्री.ना.) कांहीं कार्याच्या उपयोगी अनेक पदार्थ अनेक प्रकारांनीं जमविण्याचा व्यापार ती.
जमणें (धा. ना.) एकत्र होऊन राहाणें. २ पातळपदार्थानें घट्ट होणें. ३ कांहींएक कार्यांचीं साधनें अनुकूळ झाल्यामुळें तें कार्य सोईस लागणें इ०.
जमा (अर०स्त्री. ना.) खरेदी, विक्री इ० व्यवहारीं आदायरूप जें द्रव्य ती.
जमात (अर० स्त्री. ना.) समुदाय.
जमाबंदी (स्त्री. ना.) गांव, देश इ० संबंधी उत्पन्नाची पाहणी करून जें त्याचें सरकार देणें निश्चित केलें असतें ती. २ फौज, द्रव्य इ० कांची जमवाजमव ती.
जमाव (पु.ना.) जमात.
जमीदार (जमीनदार) (पु. ना.) देशमुख, देशपांड्या इ० वतनदार तो.
जमीन (फा०स्त्री. ना.) नद्या, समु-

द्र इ० पाण्याचा भाग वर्ज करून अवशिष्ट जो पृथ्वीचा अंश तें. २ वस्त्राचे काठ, व पदर वर्जून अवशिष्ट जो मधला अंश तें. ३ वस्त्र, पशु इ० कांचें मळभूत अंग तें.

जमिनदोस्त (फा०वि०) मल्लयुद्धांत पराजित होऊन ज्याची पाठ भूमीस लागली तो. २ केवळ जमिनीस मिळाला तो.

जय (सं. पु. ना.) युद्धादिकांत दुसऱ्यास जिंकल्यामुळें जो उत्कर्ष प्राप्त होतो तो. २ ईश्वरास संबोधन द्यावयाचें असतां त्याचे नामाशीं याचा योग होतो. उ० जयशंकर . जयरघुवीर इ०.

जयजयकार (सं. पु. ना.) ईश्वर, राजा इ० कांची वाखाणणी तो.

जयंती (सं. स्त्री. ना.) ईश्वराचे जे रामकृष्णादि अवतार त्यांच्या जन्मदिवसाचा जो समारंभ तें. २ (वि०) जिंकणारी.

जर (सं. ज्वर) (पु. ना.) ताप. २ (प्रा. स्त्री.) कलाबतूच्या तारांनीं केला जो विणून वस्त्रांश तो. ३ (अव्य.) संकेतार्थी.

जरगा (पु. ना.) (ग्रं०) जाळें.

जरठ (सं. वि०) वयानें म्हातारा. २ निबर.

जरडी (स्त्री. ना.) पोटांत उजव्ये बाजूस एक रोग होत असतो ती.

जरतार (पु. स्त्री. ना.) कलाबतू.

जरब (अर०स्त्री. ना.) दुसऱ्यास भय उत्पन्न व्हावें असें क्रूरतारूप कोणेकाचे अंगीं तेज असतें तो.२ त्या संबंधानें इतरांस प्राप्त होतें जें भय तें. ३ (वि०) प्रमाणाहून जो भारी तो. उ० त्या मापापेक्षां हें माप जरब. या घोडजोड्याची किंमत जरब.

जरा (सं. स्त्री. ना.) म्हातारपण. २ (प्रा०अव्य०) किंचित्. २ अमळसा.

जरूर (अर० अव्य० ) अगत्यरूप. २ (स्त्री. ना.) गरज.

जर्दा (फा०वि० ) घोड्याचा एक रंग आहे तेणेंकरून युक्त जो घोडा तो. २ (पु. ना.) बारीक कातरून केलेला तंबाखू तो.

जल (सं. न. ना.) पाणी.

जलचर (सं. वि. ) जलांत उत्पन्न होऊन राहाणारे मत्स्यादिक ते.

जलतरंग (सं. पु. ना.) जलसंबंधी तरंग तो. २ क्रमानें सप्त स्वर उमटावे असें कांचेच्या पात्रांतून पाणी घालून एक वाद्य वाजवीत असतात तो.

जलद (फा०वि०) चपळ. २ (अव्य०) त्वरेनें. ३ (सं. पु. ना.) मेघ.

जलधि (सं. पु. ना.) समुद्र.

जलनिधि (सं. पु. ना.) जलधि.

जलाभास (सं. पु. ना. ) (ग्रं०) मृगजळ.

जलाल (अर०वि०) ज्याचें सहन होणें दुसऱ्यास दुःसह तो. [इ० तो.

जलाशय (सं. पु. ना.) वापी, कूप

जल्प (सं. पु. ना.) मी असें करीन तसें करीन इ० भाषण तो.

जंव (अव्य०) (ग्रं० ) जेव्हां. २ जोंकालपर्यंत.

जवनीक (सं.जवनिका) (पु. ना.) पडदा, कनात इ० तो.
जंववर, वरी (अव्य०) (ग्रं० ) जंव.
जवस ( पु. ना.) एक धान्य आहे.
जवळ (पु.ना.) एक ब्राह्मणांत जात आहे. २ (अव्य०) कालदेशादिकृत ज्यास अंतर थोडें असा तो. ३ जो कोणी कोणाचे सत्तासंबंधाखालीं तो. उ० त्या राजाजवळ लाख फौज आहे इ०.
जवादीमांजर (पु. ना.) ज्याचे अंडास सुवास येतो असा एक वन्यमांजर आहे.
जवान (फा०वि०) तरूण.२ (पु.ना.) पुरुषव्यक्तिमात्र सर्व त्यासही ह्मणतात.
जवारि ( स्त्री. ना.) जोंधळा नावाचें धान्य.
जवाहिर (अर० न. ना.) हिरा, माणिक, मोतीं इ० रत्नें तें; किं० तत्सबद्ध सुवर्णादिकाचे दागिने तें.
जसन (न.ना.) (ग्र०) अडकथा.
जहर (फा० न. ना.) विष.
जळजळ (स्त्री. ना.) पित्तविकारानें किं० तिखट पदार्थ खाण्यानें घशांत किं० दुसऱ्या कांहीं शरीरावयवांस जी आग सुटये ती.
जळजळणें (धा. ना.) जळजळीनें युक्त होणें. २ क्रोध, ज्वर यानीं संतप्त होणें.
जळजळाट (पु.ना.) अतिशय जळजळ. २ क्रूर जे राजादिक त्यांचा प्रजेस अतिशय उपद्रव तो. [सर्पण.
जळण (न. ना.) लांकूड, गोंवरी इ०.
जळणें (स. ज्वलन) (धा. ना.) अग्नीच्या योगानें पदार्थ दग्ध होणें. २ अग्नीच्या योगानें दिवा इ० कानें प्रज्वलित असणें इ०.
जळमट (न. ना.) कोळिष्टकाचे सुतेरे तें; किं० बहुत दिवसांचे पिठांत कृमिजन्य दोरे होतात तें; किं० नाक, तोंड इ० कातुन जे कफसंबंधी तसेच दोर निघतात तें.
जळू (सं. जलयूका) (स्त्री. ना) एक पाण्यांतील जंतु आहे. [अर्थी.
जळो (अव्य०) त्रासाचा उद्गार या
जाइऊळ (न. ना.)(ग्र०)जाईचे फूल.
जाइजणें (वि०) जाणारें, अशाश्वत.
जाउपें (न. ना.) (ग्र०) जुळें मूल किं० मृत तें.
जाकळणें (धा. ना.) (ग्र०) कळवळणें.२ मोह पावणें. [क्षुद्र देवता आहे.
जाखनाता (स्त्री. ना.) (ग्र०) एक
जाखाईजुखाई (स्त्री.ना.)जाखमाता
जांगड (स्त्री. ना.) खपेल तें खपवूं न खपेल तें परत करूं अशा बोलीनें वस्त्रादिक विकत घेण्याचा प्रकार तो. २ अशा प्रकारचें वस्त्रादिक लिहून ठेवण्याची वही ती.
जागणें (स. जागृ) (धा. ना.) निद्राकाली निद्रा न येतां राहणें. २ आपआपल्या व्यवहारांत सावध असणें.
जागर (सं. पु. ना.) जागण्याचा व्यापार तो. २ देवाच्या उद्देशानें जागण्याचा समारंभ करितात तो.
जागरण (सं. न. ना.) जागर.
जागरूक (वि०) जागरणशील. २ज.-

गती जी विद्या, मंत्र इ० तो.

जागल्या (पु. ना.) चोर इ० कांचा उपद्रव न व्हावा म्हणून पाहरा करायासाठीं गांवचा माहार इ० जागत ठेवितात तो.

जागा (वि०) झोंप नसलेला किं० व्यवहारादिविषयीं सावध तो. २(स्त्री.) कांहींएक पदार्थ राहावयास किं० मावायास आधारभूत स्थळ ती. ३ कांहींएक अधिकारादिक ठिकाण ती इ०.

जागृत (सं. वि०) जागा, सावध.

जांघ (स्त्री. ना.) गुडघ्याचे वरले बाजूचा आंतला प्रदेश ती.

जाच (पु. ना.) गांजणूक.

जाचणी (स्त्री. ना.) जाच.

जाचणें (धा. ना.) गांजणें.

जाजम (न. ना.) छींट किं० खारवा यास अस्तर लावून बसायाचे उपयोगीं वस्त्र करितात तें.

जाजावणें (धा. ना.) क्रोधाच्या आवेशानें एखाद्याच्या अंगावर जाणें.

जाजू (स्त्री. ना.) (ग्रं०) वितंडवाद. २ आळ.

जाज्वल्य (सं. वि०) प्रखर तेज किं० सामर्थ्य आहे ज्याचें तो. २ रागीट.

जाड (वि०) स्थूळ किं० लठ्ठ. २ घट्ट. ३ (ग्रं०) प्रौढ. ४ (न.) बळ.

जाड्य (सं. न. ना.) जडता. २ अजीर्ण. ३ अज्ञानदशा.

जाण (वि०) कांहींएक विद्येविषयीं पूर्ण ज्ञाता तो. २ दुसऱ्याचें संकटादि जाणून यथाशक्ति दूर करण्याच्या स्वभावाचा तो. ३ दुसऱ्याचे उपकार जाणून प्रत्युपकार करणारा तो.

जाणणें (धा. ना.) पदार्थेंकरून किं० त्याच्या गुणविशेषेंकरून पदार्थास बुद्धिविषय करणें.

जाणीव (स्त्री. ना.) जाणण्याची शक्ति.

जाणूनबुजून, सवरून (अव्य०) जाणत असतां.

जाणें (सं. यान) (धा. ना.) कोणेकानें पूर्वस्थळ सोडणें. २ पूर्वस्थळ सोडून दुसऱ्या स्थळाचा संयोग करणें. ३ कालादिकानें अतिक्रांत होणें इ०.

जातवेद (सं. पु. ना.) अग्नि.

जातिनशीं, निशीं (अव्य०) स्वतः.

जातीचा (वि०) जातीवंत. २ स्वतांचा

जातीनें (अव्य०) जातिनशी.

जात्यंध (सं. वि०) जन्मांध.

जात्या (अव्य०) मूळप्रकृतीनें किं० स्वभावानें. २ स्वतः.

जादा (वि०) अधिक.

जादू (फा० स्त्री. ना.) साबरी मंत्रादि जारणमारणाची विद्या. २ त्य विद्येचा प्रयोग ती.

जानवसा (पु. ना.) वधू किं० वरास त्याचे पक्षाचे लोकांची विवाहानिमित्त ग्रामांतरीं कोणेकाचे घरीं स्थिति ती.

जापाणणें (धा. ना.) जपाणणें.

जाब (फा० पु. ना.) जबाब.

जाबसाल (फा० पु. ना.) प्रश्नोत्तराचा शब्द किं० वाक्य तो.

जांभई (स्त्री. ना.) निद्रा, आळस इ० विकृतीमुळें तोंड पसरलें जाऊन दीर्घ श्वास जातो तो.

जांभळी (स्त्री. ना.) जांभई.

जामदार (पु. ना.) जामदारखान्यावरील अधिकारी.

जामदारखाना (पु. ना.) जवाहीर इ० ठेवायाचें स्थळ तो.

जामा (फा० पु. ना.) अंगरख्याचा एक भेद आहे.

जामात (सं. पु. ना.) जावई.

जामीन (अर० पु. ना.) सावकारास कुळाचा विश्वास नसतो ह्मणून मध्यें विश्वासार्थ जो मनुष्य राहातो तो. २ घर, वाडा इ०कांतील खाव अशक्त झाला असतां बळकटीसाठीं दुसरा थिरा देतात तो.

जामून (वि०) (ग्रं०) फार ठेंगणें बेढब मनुष्य तें.

जायजणा (वि०) कांहीं पदार्थ चार दिवस दुसऱ्याचा मागून आणिला तो.

जायबंदी (वि०) मोडणें, फुटणें इ०कामुळें निरुपयोगीं होण्याचे अवस्थेस आला जो पदार्थ तो.

जाया (सं. स्त्री. ना.) भार्या.

जायां (वि०) जायबंदी.

जायाचा (वि०) जायजणा. [रणारा.

जार (सं. पु. ना.) परस्त्रीशीं संग क-

जारणमारण (सं. न. ना.) शत्रु इ० कास वेड लागावें किं० मरण यावें यास्तव जो मंत्रप्रयोग तें. [णी स्त्री ती.

जारिणी (सं. स्त्री. ना.) व्यभिचारि-

जाल (सं. न. ना.) मासे इ० धरण्याकरितां जें जाळें करितात तें.

जालीम (अर० वि०) प्रखर, उग्र जो तो. [न्येचा पति.

जावई (सं. जामात्) (पु. ना.) क-

जावळ (न. ना.) लहान मुलाचे डोईवरील मुळचे जे केंस असतात तें.

जावळा (सं. यमल) (वि०) एककालीं एका गर्भापासून उत्पन्न झालीं जीं दोन मुलें तीं प्रत्येकीं.

जावळिया (पु. ना.) शेजारी.

जावानिगें (वि०) (ग्रं०) नामांकित.

जासूद (अर० पु. ना.) मोल घेऊन त्वरेनें पत्र, निरोप इ० नेऊन जाब आणण्याचें कर्म करितो तो.

जास्त, जास्ती (वि०) अधिक.

जाहांबाज (फा० पु. ना.) विद्या, कला इ०कांत निपुण तो.

जाहागीरदार (फा० पु. ना.) ज्यास जाहागिर आहे तो.

जाहागीर (फा० स्त्री. ना.) सरदार इ०कास फौज ठेवणें इ० खर्चाबद्दल जो मुलूख देतात ती. २ देवादिकांच्या इनमामाबद्दल गांव इ० देतात ती. [गलबत.

जाहाज (फा० न. ना.) प्रायः मोठें

जाहिरात (अर० स्त्री. ना.) जाहिरनामा.

जाहीर (अर० वि०) विदित, ठाऊक.

जाळ (सं. ज्वाला) अग्नीची ज्वाळा तो. २ ज्वर किं० ताप. [२ गांजणें.

जाळणें (धा. ना.) जळे असा करणें.

जाळितें (न. ना.) (ग्रं०) ज्ञान.

जाळी (सं. जाल) (स्त्री. ना.) मासे धरण्याच्या जाळ्यासारखी सुत, काष्ठ, कागद इ०कांची मखर इ०कांस लावायासाठीं करितात ती. २ एकांत एक वेल गुंडाळून होतें घर ती.

जाळें (न. ना.) मासे धरण्यासाठीं किं० गोंवऱ्या इ० बांधायासाठीं जें दोरीं इ०कांचें विरळ विरळ घरांचें गुंफून करितात तें.

जिऊ (पु. ना.) (ग्रं०) जीव.

जिऊनवय (न. ना.) (ग्रं०) बाल्य, तारुण्य सरून वृद्धाप्य आलेलें वय.

जिकडणें (अव्य०) ज्या प्रदेशाकडून.

जिकडूनातिकडून (अव्य०) चोहींकडून.

जिकडेतिकडे (अव्य०) चोहींकडे.

जिंकणें (सं. जय) (धा. ना.) पराजित करणें. २ विवाद, पण इ०कांसंबंधी पदार्थ न्यायानें आपलासा करणें.

जिकीर (अर० स्त्री. ना.) हें कार्य माझ्यानें होत नाहीं असें सांगितलें असतांही पुनः पुनः कसेंही असो हें कार्य करा करा अशी ग्लानि दाखवून बोलण्याचा प्रकार ती. २ कोणेक कार्यासाठीं अनेक उपाय केले ते निष्फळ झाले असतां जी निरुपाय दशा होऊन खेद होतो ती.

जिणणें (धा. ना.) (ग्रं०) जिंकणें.

जिणें (न. ना.) प्राणधारण. २ (धा. ना.) प्राण धारण करणें.

जितणें (धा. ना.) (ग्रं०) जिंकणें.

जितवणी (स्त्री. ना.) (ग्रं०) जीवनाचा उपाय.

जिता (वि०) जिवंत.

जिताणें (न. ना.) (ग्रं०) कुरवंडी.

जिती (स्त्री. ना.) (ग्रं०) वाढती दशा.

जित्रब (न. ना.) पेरिलेलें जें धान्य किं० लाविलेलें जें वांग्या, मिर्चा इ० तें. २ गाय, म्हैस इ० पशु तें.

जिनगाणी, गानी (स्त्री. ना.) प्राणधारणरूप स्थिति ती.

जिनगी (फा० स्त्री. ना.) प्राणधारण होण्यास साधनभूत जें द्रव्यादिक ती.

जिन्नस (अर० पु. ना.) खरेदी करणें, विकणें ह्याच्या संबंधानें वस्तुमात्रास ह्मणतात.

जिन्नसपान्नस (पु. ना.) अनेक प्रकारचा जो जिन्नस तो.

जिन्नसवार (फा० वि०) चमत्कारिक तऱ्हेचा जो वस्त्रादि पदार्थ तो.

जिम्मा (अर० पु. ना.) पत्कर.

जिरणें (सं. जीर्ण) (धा. ना.) भक्षिलेलें अन्न औषध इ० पचणें. २ तेल इ० पातळ पदार्थ भूमि इ० कांत मिळून नाहींसा होणें. ३ पोटांतील गर्भ आंतल्याआंत नाहींसा होणें इ०.

जिराईत (अर० न. ना.) पर्जन्यानें पिकतें जें धान्यादिक तें.

जिलबी (स्त्री. ना.) एक पक्वान्न आहे.

जिलीब (अर० स्त्री. ना.) राजादिक चालत असतां पुढें जो अनेक शिपाई, स्वार इ०कांचा समुदाय चालतो ती.

जिल्हई (स्त्री. ना.) अलंकार, पात्र इ०कांवर ओप दिल्यामुळें किं० घासल्यामुळें जी तेजगी येते ती.

जिल्हा ( अर० पु. ना. ) राजकीय व्यवहाराचे व्यवस्थेसाठीं कांहींएक मर्यादा करून जो देशविभाग करितात तो.

जिवट (वि०) वळकट.

जिवलग (वि०) जिवास आश्रयभूत असा जो प्रिय, पति, ईश्वर तो.

जिवाणू (न. ना.) किरडूं.

जिवापरता (वि०) शरीरशक्तीनें निर्वाह करण्यास कठीण जें कार्य, दुखणें इ० तो. [पासून प्रीतीनें.

जिवाभावानें (अव्य०) अंतःकरणा-

जिवाळें (वि०) (ग्रं०) सजीव.

जिव्हा (सं. स्त्री. ना.) रस ग्रहण करणारें इंद्रिय तें. [२ काळीज.

जिव्हार (न. ना.)(ग्रं०) अंतःकरण.

जिव्हाळा (पु. ना.) कांहींएक पदार्थ किं० गोष्ट ज्याचे आश्रयबळानें उत्पन्न होते, वर्तते असें जें कांहीं त्याचे जीवस्थानापन्न तत्व असतें तो. २ अंतःकरण ओढण्याजोगी ममता तो.

जिव्हाळी (स्त्री. ना.) नखाचे खालचा जो सचेतन भाग ती. २सूर, सनई इ० कांस तोंडांत धरून वाजवायासाठीं जें ताडपत्रीचें पोंपरें करून लावितात ती. ३ बंबानील पडदा.

जिज्ञास, ज्ञासु (वि०) (ग्रं०) जाणायास इच्छितो तो. [इच्छा.

जिज्ञासा (सं. स्त्री. ना. ) जाणायाची

जी (अव्य०) विनयपूर्वक हाकेदेणें किं० होयह्मणणें अशा अर्थी. उ० अरे खंडू, जी आलों.

जीत (वि०) जिता. २ (स्त्री.) जय.

जीन (फा० पु. न. ना.) खोगरांत एक भेद आहे.

जीनजिन्नस (न.ना.) शेत, भात इ० तें.

जीमूत (सं. पु. ना.) मेघ.

जीर्ण (सं. वि०) बहुतकाळ गेल्यामुळें किं० दुखणें इ० कारणामुळें जो जर्जर झाला तो. २ जिरलें गेलें जें भक्षित अन्नादि तो.

जीर्णोद्धार (सं. पु. ना.) जीर्ण झालेला जो देव, देवालय इ० पदार्थ तो काढून नवा करण्याचा व्यापार तो.

जीव (सं. पु. ना.) अंतःकरणविशिष्ट जें चैतन्य तो. २ प्राण. ३ सर्व प्राणिमात्र तो इ०.

जीवकण (पु. ना.) (ग्रं०) जीवदशा.

जीवजंतु (सं. पु. ना.) किडा, मुंगी इ० जे क्षुद्र प्राणी तो.

जीवदशा (सं. स्त्री. ना.) (ग्रं०) जन्ममरणाच्या फेऱ्यांत असावें अशी जी अवस्था ती.

जीवन (सं. न. ना.) उदक. २ ज्यावांचून जो वांचत नाहीं तें अन्नादिक त्याचें. ३ प्राणधारण. ४ ज्यावांचून जो राहात नाहीं नाश पावतो तें त्याचें.

जीवन्मुक्त ( सं. वि० ) अज्ञानामुळें जीवत्व उत्पन्न होऊन नंतर जो जीव असतांच देहादि अभिमान सुटून ज्ञानेंकरून मुक्त झाला तो.

जीवन्मृत ( सं. वि० ) ज्याची कीर्ति बुडाली किं० दुष्कर्मामुळें जो निंद्य झाला असा जिवंत असून मेल्यासारिखा तो.

जीवात्मा (सं. पु. ना.) जीवरूप जो आत्मा तो.

जीविका (सं. स्त्री. ना.) उपजीविका.

जुकड (न. ना.) जोखड. [जुगार.

जुखेळ (सं. द्यूत.) (पु. ना.) (ग्रं०)

जुगणें (सं. योग.) (धा. ना.) काहींएक कार्यसिद्धीसाठीं परस्पर एकत्र होणें. २ काहींएक कार्य घटनेंत येणें.

जुगार (पु. ना.) द्रव्यादिक मांडून अमुक फासा पडला असतां तें द्रव्य घ्यावें, किं० विपरीत पडला असतां द्यावें अशा तऱ्हेच्या संकेताचा खेळ तो.

जुजबी (फा० वि०) सरासरी निर्वाहापुरतें जें घर इ० बांधितात तें.

जुंझ (न. ना.) (ग्रं०) युद्ध.

जुट्टा (पु. ना.) एकावर एक रचलेला दाहा कौलांचा समुदाय तो.

जुडगा (पु. ना.) चोया, तांटें, शेंगा इ० पदार्थ एकत्र जुळून बांधून केला तो.

जुडा (पु. ना.) जुडगा.

जुडी (स्त्री. ना.) लाहान जुडगा.

जुत्पति (पु. ना.) (ग्रं०) जेठी अ० मल्ल. [साचा

जुना (सं. जीर्ण) (वि०) बहुतदिव-

जुनाट (वि०) अतिशय जुना.

जुनापाना (वि०) फार किं० मध्यम जुना तो.

जुंबाड (न. ना.) मोठी जाळी किं० झुडपी तें. २ मोठ्या वृक्षाचे बुडाचा जो मोठा विस्तार तें.

जुमानणें (जुमान) (धा. ना.) हें दुर्निर्वह, हें अनुल्लंघनीय इ० मानणें.

जुरत (अर० स्त्री. ना.) दुसऱ्यास मारणें, शिव्यादेणें इ० विषयीं जी कोणेकाची शक्ति ती.

जुलमाचारामराम (पु. ना.) आपल्यामनांतून हौस नसून जें काहीं करावें लागतें त्यास ह्मणतात.

जुलाब (फा० पु. ना.) ढाळ होऊन कोठा स्वच्छ व्हावा ह्मणून औषध घेतात तो व तें औषध घेतल्यामुळें होतो जो ढाळ तो.

जुलूम (अर० पु. ना.) जबरी, बलात्कार. २ काहींएक गोष्टीचा अतिशय तो.

जुवा (पु. ना.) जुगार.

जुळणें (धा. ना.) अनेक पदार्थ किं० काहीं व्यवहार यथायुक्त संबद्ध करणें.

जूं (न. ना.) नांगर इ० कास बैल इ० जुंपण्यासाठीं त्याच्या मानेवर ठेवायाचें उपयोगीं जें काष्ठ करितात तें.

जूट (सं. यूथ) (स्त्री. ना.) अनेक मनुष्यादिकांचें एकमत तें. २एकमताचे अनेक मनुष्यांचा समुदाय तो.

जे (अव्य०) कीं. उ० अर्ज करितों ऐसाजे. [तर्के. ३ जसें.

जेउतें (वि०) (ग्रं०) जेवढें. २ जि-

जेंगट (न. ना.) जंगट.

जेजाणें (न. ना.) (ग्रं०) युद्ध.

जेजाल (स्त्री. ना.) मोठे बंदुकीसारखी असत्ये ती.

जेठा (पु. ना.) वस्त्र रंगवायासाठी

कुसुंब्याचा रंग करितात तो. २ ब-सून गुडघे उभे केले व ते गुडघे आणि कंबर या भोंवतें वस्त्र गुंडाळून करितात जो बंधनप्रकार तो.
जेठी (पु. ना.) कुस्ती, कसरत इ० करणारा तो.
जेणें (न. ना.) (ग्रं०) जिणें. [नर्के.
जेतुलें (वि०) (ग्रं०) जेवढें. २ जि-
जेधवां (अव्य०) (ग्रं०) जेव्हां.
जेमतेम (अव्य०) कशाही पराकाष्ठेनें.
जेर (फा० वि०) हीनसामर्थ्य.
जेरबंद (फा० पु. ना.) घोड्याचे सरांसरांत ओंवून पुढल्या दोहों पायांच्या मधून तंगास जो बंध बांधितात तो. जो प्रायः चर्मी असतो.
जेवण (न. ना.) देशादि भेदेंकरून मुख्यत्वें भक्षणीय अन्न तें व तें भक्षावयाचा व्यापार तें. [व्यापार तें.
जेवणखाण (न. ना.) खाणें पिणें इ०
जेवणावळ (स्त्री. ना.) कांहींएक नैमित्तिका मुळें स्वजनादि लोकसमुदाय मिळवून जो भोजनसमारंभ करितात ती.
जेवी (वि०) (ग्रं०) जसें, जेवढें. २ (अव्य०) ज्याप्रकारें.
जेव्हांतेव्हां (अव्य०) वारंवार.
जैत (पु. ना.) (ग्रं०) जय.
जस (वि०) (ग्रं०) जसें.
जों (अव्य०) (ग्रं०) जंव. [णित.
जोईस (न. ना.) (ग्रं०) ज्योतिष. ग-
जोकड,खड (न. ना.) जूं.
जोखणें (धा. न.) वजन करणें.
जोखम, जोखीम (न. ना.) कांहीं-एक सक्रीय द्रव्याच्याठायीं किं० कांहीं करायाचा जो व्यापार त्यांत् भयप्रद जो धर्म असतो तें. २ तशाप्रकारचें द्रव्यादिक तें.
जोगवा (पु. ना.) देवीच्या संबंधाची भिक्षा तो. २ त्या भिक्षेसमयीं हा उच्चारण्याचा शब्द.
जोगावणें (धा. ना.) जतन करणें. २ उदरपूर्ति पावणें. [वी, वैरागी.
जोगी (सं. योगी) (पु. ना.) गोसा-
जोगेश्वरा (पु. ना.) (ग्रं०) कैलास म्हणतात. [ठा संसारखटला तो.
जोजार (पु. ना.) कुटुंबादिरूप मो-
जोड (पु. ना. ) एका अलंकाराची दोन अवयवरूपानें असते जोडी तो. उ० पाटल्याचा जोड. २ (स्त्री. ना.) संपादन केलें जें द्रव्यादिक ती. ३ (पु०) नफा, फळ. [ळविता तो.
जोडता (वि०) कुटुंबातील मुख्य मि-
जोडपी (पु. ना.) सोबती.
जोडपें (न. ना.) नवरा आणि नवरी उभयतां मिळून तें.
जोडा (पु. ना.) कातड्याचा पायांत घालायास करितात तो. २ सारख्या पांच जानव्यांचा समुदाय तो. ३ एका ताण्याचीं दोन धोतरें तो. ४ जोडपें. ५ (ग्रं०) उपमा.
जोडी (स्त्री. ना.) एका कार्याचे उपयोगीं सारखे जे दोन पदार्थ ती. २ (ग्रं०) लाभ, नफा, फळ.
जोत (स्त्री. ना.) दीपाची ज्वाळा. २ रत्नाचें तेज ती.

जोतें (न. ना.) घर इ०काचा चौथरा.

जोंबाळणें (धा. ना.) उत्तम प्रकारें रक्षण करणें. [रामर्थाल बळ तो.

जोम (सं. यौवन) (पु. ना.) शरी-

जोर (फा० पु. ना.) जोम. २ पदार्थमात्रांत कांहींएक कार्य करण्याची शक्ति तो. ३ पहिलवान इ० शरीर बळकट राहाण्यास साष्टांग नमस्कारापमाणें जो एक प्रकार करितात तो इ०.

जोरावर, वार (वि०) जबरदस्त.

जोहर (पु.ना.) (ग्रं०) अग्नि. २ अग्निप्रवेश तो.

जोहरी (पु.ना.) मोत्यें, हिरे इ०कांचा व्यापार करणारा.

ज्या (सं. स्त्री. ना.) धनुष्याची दोरी. २ पृथ्वी. [श्रेष्ठ.

ज्येष्ठ (सं. वि०) वडील. २ (वि०)

ज्योति (सं. स्त्री. ना.) जोत.

ज्योतिर्लिंग (सं. न. ना.) काशीविश्वेश्वर, रामेश्वर इ० शिवाचीं बारा लिंगें प्रसिद्ध आहेत तीं प्रत्येकीं.

ज्योतिःशास्त्र (सं. न. ना.) आकाशांतील तेजस्वी पदार्थ जाणायाचें शास्त्र तें.

ज्योतिष (सं. न. ना. सूर्यादि ग्रहांची गति इ० जाणायाची विद्या तें.

ज्योतिषी (सं. वि०) ज्योतिष जाणणारा जोशी तो.

ज्वर (सं. पु. ना.) ताप मोवाचा रोग.

ज्वरसृष्टि (सं. स्त्री. ना.) (ग्रं०) तापाच्या भ्रांतींत जें चित्रविचित्र पदार्थांचें दर्शन होतें ती.

ज्वलन (सं. पु. ना.) अग्नि. [ळ ती.

ज्वाला (सं. स्त्री. ना.) अग्नीचा जा-

ज्वालामाली (सं. पु. ना.) अग्नि.

ज्वालामुखी (सं. स्त्री. ना.) तोंडातून ज्वाला निघतात अशी एक देवी आहे. २ (वि०) ज्वाला निघतात ज्यापासून असा पर्वत इ० तो.

---

—झ—

झ— हा वर्ण नववें व्यंजन आहे.

झकणें (धा. ना.) कोणेक गोष्टींत बुद्धि चकणें. २ फसणें.

झकमारणें (धा. ना.) लोकाचारविरुद्ध निंद्य कर्माचरण करणें. [वणें.

झकवणें (धा. ना.) चकवणें. २ फस-

झगझगणें (धा. ना.) चकचकणें.

झगटणें (धा. ना.) एके पदार्थानें दुसऱ्या पदार्थाशीं घसवटल्याप्रमाणें लागून जाणें.

झगडा (पु. ना.) कलह, भांडण.

झगमगीत (वि०) झगझगीत.

झगरें (न. ना.) भाकर इ० पदार्थ भाजून सिद्ध करायासाठीं किं० शेकण्यासाठीं. अनेक गोवऱ्या इ० रचून जो अग्नि करितात तें.

झगा (पु. ना.) पायांपर्यंत लांब असा जो अंगरख्यासारिखा करितात तो.

झंझावात (सं. पु. ना.) पर्जन्यासहित मोठा वारा तो.

झट (न. ना.) उपाधि, लचांड.

झटकणें (धा. ना.) झाडणें. २ झटकन निघून जाणें.

झटका (पु. ना.) क्रोधादिकांचा वेग तो. २ वेगवान् पदार्थांचे वायूचा किं० साक्षात् त्याचा कांहीएक पदार्थांवर संबंध तो.

झटकारा (पु. ना.) झटका.

झटणें (धा. ना.) अंतःकरणपूर्वक कांहींएक कार्याचा यत्न करणें. २ कोणी कोणाचे अंगाशीं येऊन भिडणें.

झटपट (स्त्री. ना.) कलह. २ त्वरा. ३ (अव्य०) चपकर.

झटापट,पटी (स्त्री. ना.) झटपट.

झड (स्त्री. ना.) अहोरात्र सतत दाट पर्जन्याची वृष्टि ती. २ एका वस्तुवर एककाळींच जी अनेकांची उडी ती किं० प्रवृत्ति ती.

झडकरणें (धा. ना.) (ग्रं०) विचार करणें.

झडणें (धा. ना.) शरीराचे अवयव किं० वृक्षादिकांचीं पानें गळून पडणें. २ चौघडा, नौबत इ० कानीं वाजणें. ३ कलह इ० होणें. ४ बंदूक इ० कांचा अवाज होणें. ५ चाकर इ० कांचा मुशारा वेळच्यावेळेस पोहोंचणें.

झडती (स्त्री. ना.) कांहींएक पदार्थ शोधण्याचा व्यापार ती. २ पदार्थांची इयत्ता कळण्याकारितां जें त्याचें मेज,माप ती.

झडप (स्त्री. ना.) पदार्थादिकांवर पक्ष्यांची किं० प्रिय पदार्थांवर मुलांची उडी ती. २ खिडकी, दरवाजा इ० कांची फळी ती.

झडपण,पणी (स्त्री. ना.) भूतबाधा, बाहेरवसा इ० ती.

झणझणणें (धा. ना.) झणझण शब्द होई असें टाळ इ० कानीं वाजणें. २ त्या नादानें कानांनी युक्त होणें. ३ आपटल्यामुळें किं० तिखट इ० कांचा जिव्हा इ० कांस स्पर्श झाल्यामुळें त्यांनीं वेदनायुक्त होणें.

झणी (अव्य०) (ग्रं०) झणें.

झणें (अव्य०) (ग्रं०) कदाचित्.

झपाटणें (धा. ना.) कांहींएक कार्य त्वरेनें संपादणें. २ कांहीं पदार्थ त्वरेनें खाऊन नाहींसा करणें.

झपाटा (पु. ना.) एकाएकीं कोणेकाम होण्ये पिशाचबाधा तो. २ एकादे कार्याविषयीं कोणेकाचें होण्ये जो आवेशानें प्रवृत्ति तो.

झबलें (न. ना.) लहान मुलाचे अंगांत घालायास अंगरख्याप्रमाणें केलेलें तें.

झमकणें (धा. ना.) (ग्रं०) झळकणें.

झरझरी (स्त्री. ना.) एक गुडगुडीचा भेद आहे; जिची नळी लांब असून वळणावर गुडाळलेली असते ती.

झरझरीत (वि०) विरळ तनूचें विणलेलें वस्त्र तें.

झरणें (धा. ना.) पाझरणें.

झरा (सं. झर) (पु. ना.) भूमींतून जो पाण्याचा उगम तो. २ सतत द्रव्यप्राप्तिस म्हणतात.

झरोका (पु. ना.) वायु यावा, प्रकाश पडावा इ० वांसाठीं घर इ० कांमध्यें जी लहान खिडकी ठेवितात तो.

झळ (सं· झला) (स्त्री. ना.) उन्हाळे दिवसांत शरीरास अपकारक जी वाऱ्याबरोबर उष्णता येते ती. २ अग्नीची अही ती·

झळई (स्त्री. ना.) झळ.

झळकणें (धा. ना.) चमकणें.

झळझळ (स्त्री. ना.) (ग्रं०) कवड-सा. २ तेज, चकचकी.

झळंबणें (धा. ना.) (ग्रं०) बुडून निमग्न होणें. २ विरघळणें. ३ पोळणें. ४ ममता इ० कानीं गुंडाळलें जाणें.

झळाळ (स्त्री. ना.) तेज, चकचकी.

झां (अव्य०) कर, म्हण या धातूंच्या योगीं. उ० झां करणें म्ह० पळून जाणें.

झांक (स्त्री. ना.) (ग्रं०) वायु इ० कांची झुळूक.

झांकण (न. ना.) कांहींएक पदार्थावर आच्छादक जो पदार्थ घालितात तें.

झांकणें (धा. ना.) कांहीं पदार्थ झांकणानें आच्छादित करणें. २ कांहीं गोष्ट गुप्त ठेवणें.

झांकलेंमाणिक (न. ना.) बाहेर तादृश तेज इ० दिसण्यांत येत नसून ज्याचे अंगीं चांगले गुण असतात तें.

झांकें (वि०) (ग्रं०) व्यर्थ.

झांकोळणें (धा. ना.) आच्छादित होणें. २ व्यापणें.

झांगड (स्त्री. ना.) एक वाद्य आहे. २ नानाप्रकारचे वाद्यांचा सतत वाजण्याचा शब्द ती.

झांजडझांजड (न. ना.) अंगावरील लंब दिसायाजोगी जी पांढट तें.

झांझां (अव्य०) घोडा इ० कांस हांकित्येसमयीं उच्चारितात.

झाड (न. ना.) शाखा, पल्लव इ० अवयवयुक्त असून स्वतंत्रपणानें वाढणारा जीव तें. २ ज्या मनुष्याचे अंगांत पिशाच खेळतें तें शरीर त्या पिशाचाचें. ३ गंधक, सोरा, दारू इ० कांचें करितात तें किं० बिलोरी कांचेचें मंडपादिकांत असतें तें अ० उदकाच्या लावण्यास धातुमय करितात तें· [सर्व झाडें तीं.

झाडझाडोरा (पु. ना.) लहान, मोठीं

झाडझूड (न. ना.) झाड इ० तें.

झाडणी (स्त्री. ना.) केरसुणी. २ खरडपट्टी. ३ पिशाच विषबाधा इ० कांचा जो मांत्रिक इ० निरास करितो ती.

झाडणें (धा. ना.) केरसुणी इ० कानें केर कचरा इ० काढून टाकणें. २ शेंडी, वस्त्र इ० वरील जलांश, सुरकुत्या इ० नाहींशा होण्यास त्यांस झटझट शब्द होई असें हलविणें. ३ एकाद्याची खरडपट्टी काढणें किं निषेध करणें इ०.

झाडपाला (पु. ना.) औषधाचे उपयोगी जो झाडाचा पाला, मूळ इ० तो.

झाडा (पु. ना.) झडती. २ मळशुद्धीसही म्हणतात.

झाडी (स्त्री. ना.) लहान मोठ्या झाडांचा निबिड समुदाय ती.

झाडून (अव्य०) यच्चयावत्, सर्व.

झाप, झांप (स्त्री. ना.) पोहतेवेळेस मनुष्य किं० चालतांना सर्प जो पुढील

देश आक्रमण करण्यासाठीं पुढलें अंग उंच उचलण्याचा व्यापार करितात तो. २ झडप.

झापड (स्त्री. ना.) कांहीं विकारानें डोळे मिटून पडण्याची अवस्था प्राप्त होते ती.

झारिया (पु. ना.) (ग्रं०) झारेकरी.

झारी (स्त्री. ना.) तोटी लाविलेलें पाणी पिण्याचें उपयोगी एक पात्र आहे ती.

झारेकरी (पु. ना.) रस्ता इ० कांतील पडलेल्या मातींतून किं० उकरडा इ० कांतून सोनें, रुपें इ० धातु निवडून काढणारी व त्यावर निर्वाह करणारी एक जाति आहे.

झालर (स्त्री. ना.) मंडप, छत इ० कांस शोभार्थ लोंबायाजोगें जें त्याचे बाजूस वस्त्रादि लावितात ती.

झावळें (वि०)(ग्रं०) अंधक अंधक तें.

झाळणें (धा. ना.) पात्रादिकांस डांक लावून अग्निसंयोगानें घट्ट बसविणें.

झिंगणें (धा. ना.) मद्यप्राशनानें शुद्धिबुद्धिरहित होणें.

झिजणें (धा. ना.) घासणें इ० कारणांमुळें कांहीं पदार्थानें कमी होणें. २ शरीर इ० कांनीं रोड होणें.

झिंजाडणें (धा. ना.)(ग्रं०) केंस धरून एकाद्यास भुईवर पाडणें. २ झुगारणें.

झिडकारणें (धा. ना.) एकाद्याचा कठोर भाषणानें तिरस्कार करणें.

झिपरा (वि०) ज्याचे डोईचे केंस पसरले आहेत तो.

झिपरी (स्त्री. ना.) तोंड इ० कांवर केंसाच्या बटा लोंबतात ती प्रत्येक.

झिमझिम (अव्य०) स्थिरपणानें कांहीं काळपर्यंत पडतो जो एकसारखा पाऊस त्याचे शब्दाचें अनुकरण.

झिरूमिरू (वि०) कसा तरी जीव धरून राहिला असा जो केवळ निर्बळ तो.

झिज (स्त्री. ना.) अलंकार इ० कांचा झिजल्यामुळें जो अंश जातो ती. २ आपल्या शरीरास जे कष्ट सोसणें ती.

झील (स्त्री. ना.) रत्न इ० कांवरील तेज ती. २ (अव्य०) (ग्रं०) हळू.

झुकणें (धा. ना.) दृष्टि चुकावून पळून जाणें. २ इमारत इ० कांनीं कलणें. ३ शरीर इ० कांनीं कृश होणें. ४ न सांपडायाजोगें मनमानेल तिकडे जाणें. [किरात.

झुकतझुकत (अव्य०) डुलत किं० झोंकिरात

झुकांटी, झुकांडी (स्त्री. ना.) दृष्टि चुकावून पळून जाण्याचा व्यापार ती.

झुगारणें (धा. ना.) झुगटणें.

झुंज (न. ना.) युद्ध.

झुंजार (वि०) युद्धांत निपुण. [मुराग.

झुंड (स्त्री. ना.) मनुष्यादिकांचा समुदाय

झुडतर, तार (वि०) केवळ वृद्धतामुळें जर्जर झालेला.

झुडूप (न. ना.) प्रसंगीं मनुष्यादिकांस लपून राहावयाजोगें अनेक शाखादिकांनीं गच्च भरलेलें लहान झाड तें.

झुणूक (स्त्री. ना.) पदार्थादिकांचा किं० कांहीं गोष्टीचा किंचित् भास ती, चुणूक.

झुपका, बका (पु. ना.) फुलें, मोत्यें इ० कांचा गुच्छ तो, किं० गाय इ० कांचे

शेंपटीच्या केसांचा तसा आकार तो.
झुंबर (पु. ना.) अनेक दिवे लावण्याच्या सोयीचें बिलोरी झाड तो.
झुरका (पु. ना.) तपकीर, तंबाखू इ० एकवेळ ओढण्याचा व्यापार तो.
झुरणी (स्त्री. ना.) प्रियवस्तूच्या वियोगानें जी शरीर, मन इ० कास क्षीणतारूप अवस्था प्राप्त होणें ती.
झुरळ (न. ना.) एक क्षुद्र जंतु आहे.
झुलणें (धा. ना.) डुलणें.
झुलवणें (धा. ना.) कोणेकास कांहीं कार्याविषयीं नाहीं असें न ह्मणतां आज उद्यां अशा रीतिनें बहुत दिवस नादीं लावणें. २ तशा नादाखालीं कांहीं काल अतिक्रमणें.
झुलवाझुलव (स्त्री. ना.) झुलवण्याचा व्यापार ती.
झुला (पु. ना.) झोंपाळा. २ पाळणा.
झुलूप (फा० न. ना.) लहान मुलांचे किं० शूद्रादिकांचे कानाजवळ शोभेसाठीं जे केस राखितात तें.
झुळझूळ (अव्य०) थोड्या पाण्याचे किं० वायूचे वाहण्याचे शब्दाचें अनुकरण.
झुळूक (स्त्री. ना.) मंदमंद जी वायूची गति ती. २ पदार्थ पुरता दृष्टीस न पडतां जो त्याचे आकारादिकांचा किंचित् भास ती.
झूल (स्त्री. ना.) घोडा इ० कांचे पाठीवर अंग झांके असें वस्त्र घालितात ती.
झेंगट (न. ना.) जंगट. २ कचाट.
झेंडा (पु. ना.) देवद्वार, राजद्वार, दुर्ग इ० कांवर किं० राजादिकांचे स्वारींत जो मोठा ध्वज उभारला असतो तो. झेंडा लावणें म्ह० कीर्ति संपादन करणें.
झेंडू (पु. ना.) एक फुलझाड आहे व त्याचें फूल तो. २ सर्पदंश झाल्यानें रक्ताच्या गुळण्या तोंडावाटे येऊं लागतात तो.
झेंपणें (धा. ना.) आपल्या शक्तीनें कांहीं कार्याचा परिणाम करणें.
झेलणें (धा. ना.) वरून पडलेला पदार्थ भुईवर पडूं न देतां अलादी वरचेवर हातांत घेणें. २ वचन इ० झेलणें म्ह० कोणेकाची आज्ञा पाळून करणें.
झेला (पु. ना.) फुलें गुंफून जो गुच्छ करितात तो. २ आंबे इ० फळें उतरण्याची मोठी अंखी तो.
झोंक (पु. ना.) कल. २ गायन, वस्त्रपरिधान, चालणें इ० संबंधी डौल तो. ३ वायु इ० कांचा झटका तो.
झोंकणें (धा. ना.) मद्य, दूध, भांग इ० पदार्थ पिणें. २ झुगारणें. ३ गप्प इ० झोंकणें म्ह० उठविणें किं० सांगणें.
झोंका (पु. ना.) वाणीलोक जिन्नस तोलतांना कमी देण्यासाठीं तागडीस देतात अंचका तो. २ व्यापारांत आला जो तोटा तो. ३ व्यर्थ जो हेलपटा तो. ४ पाळणा इ० कांस हलविण्यासाठीं मागें पुढें ओढण्याचा व्यापार तो.
झोटधरणी (स्त्री. ना.) (ग्रं०) रणादिकांत एकमेकांचे अंगास झोंबून परस्परांची केसधराधरी होणें ती.
झोटिंग (पु. ना.) एक पिशाच आहे.

झोटिंगपाच्छाई (स्त्री. ना.) जेथें एक नियंता नाहीं, असल्यास मूर्ख असतो अशा ठिकाणीं बहुनायकी होऊन जी कामकारभारांत अव्यवस्था होत्ये तसें राज्य, अंमल इ० ती.

झोड (स्त्री. ना.) मोठ्या पर्जन्याचा जो कांहींकाल सततपणा ती. २ भात इ० धान्य तृणापासून मोकळें करण्याचा व्यापार ती. ३ काठी इ० कांनीं जो मारण्याचा व्यापार ती. ४ कांहींएक व्यवहाराचा अतिशयित चालूपणा ती.

झोड (वि०) न्यायानें घेणें, देणें इ० व्यवहार न करितां त्यांत लबाडी किं० खळखळ करणारा तो.

झोडणें (धा. ना.) झोडणी करणें. २ भक्ष्य, भोज्यादि पदार्थ त्या त्या व्यापारानें अतिशय उपभोगणें.

झोडपणें (धा. ना.) झोडणें.

झोत (पु. ना.) अग्नीची मोठी ज्वाला. २ प्रायः वरून पडणारा जो पाण्याचा लोट तो.

झोतावा (पु. ना.) झोत.

झोंपा (पु. ना.) झोका अ० हलण्यामुळें बसतो धक्का तो. २ कुंपणाच्या दाराची झडप.

झोंपाळा (पु. ना.) ज्यावर बसून झोके घेतात तो. [तो.

झोंपाळू (वि०) ज्यास झोंप बहुत आहे

झोंबणें (धा. ना.) क्षार इ० पदार्थानें क्षत इ० कास लागून वेदना करणें. २ सर्पादिकांनीं डसणें. ३ बलात्कारानें स्त्रियादिकांस धरणें. ४कोणेकाचें भाषणादिकानें सलायाजोगें अंतःकरणास लागणें. [लढाई ती.

झोंबी (स्त्री. ना.) मल्ल इ० कांची

झोल (पु. ना.) वस्त्र इ० ताणलेल्या पदार्थास खालीं लोंबायाजोगा सैलपणा येतो तो; किं० अंगरखा इ० कांचा घेर तो.

झोला (पु. ना.) देणें, घेणें इ० व्यवहारीं भाज उद्यां करण्याचा प्रकार तो.

झोळणा (पु. ना.) सुपारी इ० पदार्थ ठेवण्यासाठीं प्रायः चतुष्कोण वस्त्र घेऊन त्याचे कोंपरे पोटीं मोडून मधलीं अंतरें शिवून शेवटील टोंकास दाल लाविली असतां होतो जो आकारविशेष तो.

झोळू (पु. ना.) (ग्रं०) वस्त्राचा पदर. २ सुरकुती. ३ (वि०) मिथ्या.

---

## -ञ-

ञ—हा वर्ण दाहावें व्यंजन आहे. हा आरंभीं असलेले शब्द मराठी भाषेंत नाहींत.

---

## -ट-

ट— हा वर्ण अकरावें व्यंजन आहे.

टक (स्त्री. ना.) सतत एकाग्र दृष्टीनें पाहणें ती. २ टकळी. ३ (ग्रं०) संकट.

टकटक (अव्य०) एकसारखें लक्ष्य लावून पाहण्याचें विशेषण. २ (स्त्री. ना.) कंटाळा यावयाजोगी भाषणादिकांची गडबड.

टकमक (अव्य०) टकटक.
टकमका (अव्य०) टकटक.
टकळा (पु. ना.) प्रिय वस्तूच्या वि-रहानें तिची घोकणी किं० वेध तो.
टकळी (स्त्री. ना.) टक.
टकोटक (अव्य०) पूर्वी मोजलेल्याच्या बरोबरीनें.
टकर, टक्कर (स्त्री. ना.) एडके इ० कांच्या लढाईंत परस्परें मस्तकावर मस्तक आदळण्याचा व्यापार तो. २ युद्धादि प्रसंगीं दुसऱ्याचा पराजय अ० बरोबरी होईपर्यंत जी स्थिति ती.
टक्कल (न. ना.) ज्ञातारपण, रोग इ० कारणांमुळें केशरहित झाला जो मस्तकावरील प्रदेश तें.
टंगळमंगळ (स्त्री. ना.) कांहींएक कार्य करण्याविषयीं अनास्थेनें जी चु-कवाचुकव ती.
टणक (वि०) छेदण्यास व भेदण्यास कठीण तें. २ निरोगी तो.
टणका (वि०) शरीरानें सुदृढ.
टणत्कार (सं. टंकार) (पु. ना.) धनुष्याचे दोरीचा शब्द.
टपकणें (धा. ना.) पावसाच्या योगानें घर इ० कांनीं टपटप शब्द होई अशाप्रकारें गळणें.
टपका (पु. ना.) टपकण्याच्या यो-गानें पडणारा पाण्याचा थेंब तो. २ट-पका. ३ नागवेलीचें पिकलें पान तें.
टपटप, टपटपां (अव्य०) नेत्रादिकां-तून उदकाचे बिंदु पडण्याच्या शब्दा-चें अनुकरण.
टपणें (धा. ना.) कांहींएक कार्याकडे लक्ष्य देऊन जपत राहाणें.
टपोर, टपोरा (वि०) साधारण प्र-माणाहून मोठा तो.
टप्पा (पु. ना.) गायनांत एक चीज आहे. २ तीर, गोळी इ० कांचे ग-तीची समाप्ति जेथें होत्ये तेथपर्यंत जो प्रदेश तो. ३ घाट इ० कांतील जीं विराम स्थानें तीं प्रत्येकीं.
टमटमीत (वि०) पुष्ट व शक्तिमान तो. २ (अव्य०) आंत अवकाश न राही अशा प्रकारें.
टर (स्त्री. ना.) उपहास. २ आग्रह.
टरकणें (धा. ना.) वस्त्रादिकानें टर शब्द होई असें फाटणें.
टरफल (न. ना.) बीज, धान्य इ० कांवरील त्वचा.
टवका (पु. ना.) शस्त्र इ० कांच्या योगानें निघालेला शरीरादिकाचा तुकडा तो.
टवकारणें (धा. ना.) काम, क्रोध इ० कांच्या आवेशानें कोणेकाकडे पाहा-यासाठीं मनुष्यानें डोळे व पशूनें कान ताठून धरणें.
टवंच (न. ना.) (ग्रं०) दुःख.
टवटवी (स्त्री. ना.) शरीर, मुख इ० कांचा प्रफुल्लितपणा ती.
टवळें (न. ना.) समई, पळी इ० कां-चा दांड्यावांचून अवयव तें; ज्यांत तेल इ० राहतें.
टवाळ (वि०) लिहिणें, वाचणें सोडून उनाडक्या करितो तो. २ चटोर. ३ (ग्रं०) लटकें. ४ निरुपयोगी.
टळटळीत (वि०) भर दोन प्रहरच्या

तेजानें युक्त. २ स्वच्छ दिसण्याजोगा मोठा.

टळणें (धा. ना.) उपद्रवकारक प्रसंग दूर होणें किं० चुकणें. २ कालानें अतिक्रांत होणें. ३ केलेल्या प्रतिज्ञेंत अंतर पाडणें.

टांक (पु. ना.) ठसा उमटवून केलेली देवाची प्रतिमा, ठसा इ० तो. २ लेखणीचा अग्रभाग तो.

टाकणें (धा. ना.) त्याग करणें. २ कारभारादिक दुसऱ्यावर सोंपणें. ३ अंगीकारलेला पदार्थ, गोष्ट इ० ती वर्ज करणें इ०.

टाकभाडें (न. ना.) मनुष्यादिकास अमुक ठिकाणीं पोंचवावें मात्र, परत आणू नये अशा बोलीचें भाडें तें.

टांकसाळ (स्त्री. ना.) रूपये इ० पाडण्याचें ठिकाण. २ (ग्रं०) ठसा.

टांका (पु. ना.) दोन वस्त्रें व पानें इ० एकास एक जडावी ह्मणून दोरा इ० कांचा जो बंध देतात तो.

टाकिणें, टाकिजणें (धा. ना.)(ग्रं०) पावणें.

टाकी (स्त्री. ना.)(ग्रं०)कृति. २आवड.

टांकी (स्त्री. ना.) पाणी इ० भरायासाठीं दगडाची करितात ती. २ दगड फोडण्याचें एक औत आहे. ३ त्या औतानें जातें इ० कास टोंचे पाडतात ती.

टांकें (न. ना.) पाण्याच्या पुरवठ्यासाठी मोठें टांकीसारखें बांधून करितात तें.

टांग (स्त्री. ना.) टिरीपासून पावलापर्यंत जो पाय ती. टांगेखालून जाणें कोणेकाच्या, ह्म० आपण बोलल्याप्रमाणें कांहींएक गोष्ट घडून न आल्यास हार गेल्याप्रमाणें त्याशीं नम्र होणें.

टांगणें (धा. ना.) खालीं लोंबायाजोगा कांहीं पदार्थ वर बांधणें.

टांगें (न. ना.) टकलें.

टांच (स्त्री. ना.) पायाची खोंट. २ घेणेकऱ्यानें किं० सरकारानें घर इ० कावर आणिली जी जप्ती ती.

टांचण (न. ना.) स्मरणासाठीं केलेले जमाखर्चाचें टिपण तें.

टांचणी (स्त्री. ना.) सुईसारिखी परंतु जिला नेढें नसतें ती. २ (ग्रं०) त्रेधा किं० दुर्दशा. [२ ठेंगणें.

टांचें (वि०) (ग्रं०) उणें, आखूड.

टाणाटोणा (पु. ना.) अल्प स्वल्प मंत्र तंत्रादि विद्या तो.

टापटीप (स्त्री. ना.) व्यवस्था, बेतबात.

टापरण (न. ना.) उपकाराचें ओझें.

टापशी (स्त्री. ना.) डोकीस रुमाल, धोतर, पागोटें इ० कांवरून बांधण्याचा एक प्रकार आहे.

टापू (पु. ना.) बेट.

टाफरें (वि०) घोडा टाप टाकतो त्याप्रमाणें चालणारें जें मनुष्यादि तें.

टामटूम (स्त्री. ना.) थोडक्यांत पदार्थ डौलदार दिसावा असें करण्याचा प्रकार ती. २ तेशा करण्यानें पदार्थास आलेला डौल ती. ३ टाणाटोणा.

टारगा (वि०) चटोर. २ खुजट.

टाहो (पु. ना.) सतत सारखें रडण्याचा किं० एक शब्द वारंवार उच्चार-

ण्याचा प्रकार तो. २ (ग्रं०) लाभ.
**टाळ** (सं. ताल) (पु. ना.) एक काशाचें वाद्य आहे तो.
**टाळणें** (धा. ना.) टळे असें करणें. २ कांहींएक पदार्थ विकून टाकणें.
**टाळा** (पु. ना.) अवश्य केलें पाहिजे अशा कार्याचा किं० मोठें कठीण जें संकट त्याचा आपल्यास संबंध न होऊं देण्याचा व्यापार तो. २ मुखामधील वरचा भाग.
**टाळाटाळ** (स्त्री. ना.) हें टाळ, तें टाळ असा व्यापार तो. २ चुकवाचुकव.
**टाळी** (सं. ताल) (स्त्री. ना.) दोन्ही तळहात परस्परांवर आदळण्यानें जो शब्द होतो तो. २ (ग्रं०) समाधि.
**टाळु** (सं. तालु) (स्त्री. ना.) मस्तकावरील जो मर्मभाग तो.
**टाळें** (न. ना.) मुखांतील वरचा भाग तें. २ कुलूप. ३ जमीनींतील मोरीचा मळ काढण्यास जें मध्यें मध्यें दार ठेवितात तें.
**टिकणें** (धा. ना.) कांहींएक कालमर्यादेपर्यंत किं० देशमर्यादेपर्यंत नाशादि न पावता राहाणें.
**टिकरणें** (न. ना.) (ग्रं०) ठिकाण.
**टिकलग** (वि०) (ग्रं०) शोभिवंत.
**टिकला** (पु. ना.) कपाळ इ० कांवर गंध, कुंकूं इ० कांचा तिलक लावितात तो.
**टिकली** (स्त्री. ना.) लहान जो टिकला ती. २ स्त्रिया आपल्या कपाळावर शृंगारशोभेसाठीं कांच किं० कांहीं रंग इ० कांची वर्तुळ लावितात ती.
**टिकाऊ** (वि०) बहुत दिवस टिकायाजोगा तो.
**टिकाव** (पु. ना.) कांहींएक कार्यांत कांहीं कालपर्यंत टिकण्याचा जो व्यापार तो.
**टिकेलें** (वि०) (ग्रं०) स्थिर.
**टिकोजी** (वि०) मानपानाचे टिळ्याचा जो अधिकारी त्यास निंदा कर्त्तव्य असतां ह्मणतात.
**टिकोरें** (न. ना.) सुमारें दोन तीन हात लांब मनगटाइतका जाडा जो लांकडाचा तुकडा तें.
**टिंच** (स्त्री. ना.) हाताचा अंगठा व तर्जनी हीं पसरल्यानें जें मान होतें ती. २ बोटाचे पेरानीं मडकें इ० कांवर जो प्रहार करितात ती.
**टिपण** (न. ना.) टांचण. २ कांहीं कार्यासाठीं केलेला जो काल, देश इ० कांचा संकेत तें. ३ जन्मपत्रिका.
**टिपणें** (धा. ना.) टांचणें. २ भूमीवर पडलेल्या धान्यादिकांचा एकेक दाणा वेंचणें. ३ भूय इ० कांवर पडलेला पातळ पदार्थ वस्त्रादिकानें पुसून घेणें. ४ भिंतीस चुना सारवणें.
**टिपूर** (अव्य०) स्वच्छ चांदिणें पडण्याचें विशेषण.
**टिपूस** (पु. ना.) उदकादिकांचा केवळ स्वल्पांश तो.
**टिरटीर** (स्त्री. ना.) थोडेंसें द्रव्य मिळाल्यामुळें दरिद्री याणें जो चार दिवस श्रीमंतीचा डौल करणें ती.
**टिलू** (वि०) खुजा मनुष्य जो त्यास विनोदानें ह्मणतात.
**टिवल्याबाव्हल्या** (स्त्री. ना.) उना-

उपणानें किं० अंगीं मोठेपणा नसतां जो सोदेगिरीचा डौल तो.

**टीक** (स्त्री. ना.) स्त्रियांचें गळ्यांतील एक भूषण आहे त्यामधील जो एकेक अवयव ती. २ नथ इ० कांवर शोभेसाठीं जो हिरा, मोत्यांची चौकडी इ० लावितात ती.

**टीका** (सं. स्त्री. ना.) ज्या स्थळीं ग्रंथ कठीण असतो त्या स्थळीं जी त्याची व्याख्या ती. २ दुसऱ्याची त्याचे असमक्ष जी निंदा ती.

**टीप** (स्त्री. ना.) ग्रंथांतील कठिण शब्दाचा अर्थ जो बाजूस खुणांनीं लिहितात ती. २ गांव, शहर इ० कांतील घरांची जी मोजदाद करितात ती. ३ वस्त्रास एक प्रकारचा दोरा घालितात ती. ४ (न.) नेत्रांतील अश्रु तें.

**टीर** (स्त्री. ना.) कुला.

**टुकटुक** (अव्य०) अशक्ततेमुळें किं० दुर्मिळ पदार्थाच्या लोभामुळें तिकडे एकाग्र दृष्टीनें पाहण्याचें किं० मंदज्योति जो दिवा त्याचे जळण्याचें विशेषण.

**टुमणी** (स्त्री. ना.) कांहींएक कार्य करून घेण्याविषयीं दुसऱ्यास वारंवार कंटाळा येण्याजोगें स्मरण करण्याचें कृत्य ती. [किर.

**टुरटूर** (स्त्री. ना.) टिरटीर. २ किर-

**टूम** (स्त्री. ना.) कांहीं पदार्थास कांहीं उपचारानें येते जी शोभा ती. २ पदार्थांमधील खुबी ती.

**टेक** (पु. ना.)(ग्रं०)डोंगर. २ इच्छा.

**टेंकडी** (स्त्री. ना.) लहान डोंगरी.

**टेंकण** (न. ना.) कांहीं पदार्थ टेंकून राहण्याविषयीं त्यास जो आधार लावितात तें.

**टेंकणें** (धा. ना.) टेंकणाराचा आधाराशीं संबंध होई असें करणें. २ आपलें कार्य दुसरा कोणी करील अशा भरंवशानें आपण उगीच राहणें.

**टेंगूळ** (न. ना.) लागल्यामुळें कपाळ इत्यादिकांवर गांठ येत्ये तें.

**टेणा, टेण्या** (पु. ना.) पुष्ट झाला जो टेंकूण, ऊ इ० तो. २ दिव्यांतील मोठी वात तो.

**टेपर** (न. ना.) ही गोष्ट तुम्हापासून गेली, पसरली इ० जें कोणेकावर ठेविलें निमित्त तें.

**टेंभा** (पु. ना.) उजेडासाठीं काठी इ० कास वस्त्र गुंडाळून जो काकडा करितात तो. २ डौल.

**टेहेळणें** (धा. ना.) चोरी इ० करण्यासाठीं कांहींएक पदार्थ गुप्तरूपानें न्याहाळून ठेवणें.

**टोंक** (न. ना.) लांकूड इ० कांचा अग्रभाग तें. २ गांव इ० कांचा शेवटचा प्रदेश तें.

**टोंकर, टोकर** (पु. ना.) पाटीसारिखें एक कातड्याचें पात्र आहे तो.

**टोंकावणें** (धा. ना.) तोंड पुढें करून कांहींएक वस्तु पाहणें.

**टोंचणी** (स्त्री. ना.) जाचणी. २ टुमणी. ३ आंबे इ० कांस भोंक पाडण्याचें शस्त्र ती.

**टोंचणें** (धा. ना.) सूय, शस्त्र इ०

कानें कांहींएक पदार्थ सच्छिद्र करणें. २ गांजणें. [मूर्ख.
टोणपा (पु. ना.) सोटगा. २(वि०)
टोप (पु. ना.) एक धातुमय पात्र आहे तो. २ केसांचा गुंफलेला बायकांच्या वेणीचे आकाराप्रमाणें मस्तकावर घालण्यास करितात तो.
टोपण (न. ना.) करंड्याचें झांकण. २ नगारा, नौबत इ० कांचे उपयोगीं जें पात्र करितात तें.
टोपला,ली,लें (पु. स्त्री. न. ना.) धान्य इ० ठेवण्यास जें पात्र करितात तो.
टोपी (स्त्री. ना.) मस्तक झांकायास वस्त्राची शिवून करितात ती. २ थंडी, पाऊस, ऊन न लागण्यासाठीं सखलादीची करितात ती.
टोलर,ल्हर (वि०) (ग्रं०) पोकळ.
टोला (पु. ना.) काठी, दांडू इ० कांनीं केलेला प्रहार तो. २ मर्मभेदक जें भाषण तो. ३ विटकरीचा तुकडा तो. [पदार्थादि तो.
टोलेजंग (वि०) फार मोठा व खंबीर
टोळ (पु. ना.) पंखाचा एक क्षुद्र जंतु आहे.
टोळधाड (स्त्री. ना.) शेत इ०कांचे नाशास कारण जो टोळांचा समुदाय तो.
टोळी (स्त्री. ना.) एकाच कार्यास प्रवृत्त झालेला जो जीवसमुदाय ती.

—ठ—

ठ—हा वर्ण बारावें व्यंजन आहे.

ठक (वि०) दुसऱ्यास ठकवितो तो.
ठकडा (वि०) (ग्रं०) मोठा ठक तो.
ठकणें (धा. ना.) दुसऱ्याच्या कपटानें फसलें जाणें किं० आपणच भ्रमानें आपल्या शाहाणपणास दोष लागे अशी अवस्था पावणें.
ठकबाजी (स्त्री. ना.) ठकण्याचा किं० ठकविण्याचा व्यापार ती. [२ ठक.
ठकार,रू (वि०) (ग्रं०) मोहक.
ठणकणें (धा. ना.) दुखावलेला शरीराचा अवयव किं० क्षत इ० कानें झालेलें दुःख यानें आघात झाल्याप्रमाणें वारंवार व्यथा पावणें. [तो.
ठणका (पु. ना.) ठणकण्याचा प्रकार
ठणठणाट (पु. ना.) ठणठण असा जो बोंबलणें इ० कांचा शब्द त्याचा अतिशय तो. २ पाणी आदिकरून पदार्थांची अत्यंत अल्पता तो.
ठणठणीत (वि०) जलांश इ० आटल्यामुळें जो पदार्थ अगदीं कोरडा झाला तो.
ठपका (पु. ना.) टपका. २ कांहींएक व्यापारांत चूक झाल्यामुळें जो त्या कर्त्यावर दुसऱ्याचा दोष येतो तो.
ठरणें (धा. ना.) वादग्रस्त गोष्ट सिद्धांतास येणें. २ टिकणें.
ठराव (पु. ना.) विवादांतील गोष्टींचा सिद्धांत तो. २ टिकाव. [करणें.
ठरावणें (धा. ना.) ठरण्यांत येई असें
ठसका (पु. ना.) मोहरी, मिरची इ० कांचा अंश टाळूस लागून शरील छिद्रांत गेल्यामुळें जो शब्द होतो

तो. २ कपाळ इ० कांवर ठस शब्द होई असा आघात होतो तो.

**ठसठसीत** (वि०) ठळक जो दागिना इ० पदार्थ तो.

**ठसठोंबस** (वि०) (ग्रं०) मूर्ख व निलाजरा तो.

**ठसणें** (धा. ना.) सांगितलेली, पाहिलेली किं० ऐकिलेली गोष्ट मनांत दृढ राहणें.

**ठसा** (पु. ना.) वारंवार अक्षरें इ० लिहिण्याचे श्रम पडूं नयेत ह्मणून धातु, काष्ठ इ० कांवर अक्षरें लिहून जी मुद्रा करितात तो. २ सद्गुण अ० दुर्गुण इ० कांचा कोणिकाचे अंतःकरणावर प्रतिबिंबितपणा तो किं० त्याविषयीं आठवण तो.

**ठसेठोंबसें** (वि०)(ग्रं०)बारीक-मोठें.

**ठळक** (वि०) धातुमय दृढ जो दागिना तो. २ टळटळीत. ३ द्रव्य, विद्या इ० कांनीं संपन्न तो.

**ठाउकतें** (वि०) (ग्रं०) कळलेलें. २ साध्य झालेलें.

**ठाकठिकी** (स्त्री. ना.) कांहींएक पदार्थ किं० व्यापार यांस शोभा यावयाजोगें जेथलें तेथें जसें असावें तसें करण्याचा प्रकार.

**ठाकठीक** (वि०) चांगली ठाकठिकी झालेला अ० केलेला तो.

**ठाकणें** (धा. ना.) (ग्रं०) राहणें. क्वचित् उभें राहाणें असाही अर्थ होतो.

**ठाकत** (पु. ना.) (ग्रं०) ध्यास.

**ठाकुरकी** (स्त्री. ना.) अल्प साधनांनीं संसार इ० खटल्याचा निर्वाह करण्याच्या प्रकारांनीं राखिली जी मइत्यादिरूप पूर्वस्थिति ती.

**ठाण** (सं. स्थान) (न. ना.) घोडा इ० कांचें बंधनस्थान. २ तीर मारत्येसमयीं बसण्याचा एक प्रकार आहे.

**ठाणबंद, बंदी** (वि०) ठाण्यावरच सर्वदा बांधून ठेविला असतो जो घोडा इ० पशु तो.

**ठाणमाण** (न. ना.) (ग्रं०) शरीराचा बांधा.

**ठाणवई, ठाणवी** (स्त्री. ना) लांकडाची समई परंतु जिला लोखंडाचें दिवेलावणें बसविलें असतें ती.

**ठाणें** (न. ना.) ठाण. २ किल्ला, गढी आदिकरून जें सरकारचें स्थान तें. ३ त्या स्थानाच्या रक्षणार्थ अधिकाऱ्यासह जो मनुष्यादि समुदाय असतो तें. ४ पाहुणे इ० कांची जी कोणेकाचे घरीं कांहींकाळ स्थिति तें. ५ (धा. ना.) (ग्रं०) राहणें.

**ठाम** (वि०) स्थिर, कायम. २ टंकोटंक.

**ठाय** (पु. ना.) ठाण. २ (ग्रं०) निश्चय. ३ आश्रय. ४ पत्रावळ इ० तो.

**ठायींपडणें** (धा. ना.)(ग्रं०)सांपडणें.

**ठायींपाडणें** (धा. ना.) (ग्रं०) शोध लावणें.

**ठायेंठावो** (पु. ना.) (ग्रं०) स्वस्थानीं वास. २ (वि०) स्वस्थानवासी.

**ठार** (अव्य०) मनुष्यादिकांचा जीव जाई असें मार, कर, हो इ०कांचें वि०. २ खाणें, पिणें, बुडणें इ०कांनीं निःशेष होई अशा प्रकारें. इ०.

**ठाव** (पु. ना.) केळ इ०कांचें पान किं० पत्रावळ इ० तो. २ जल किं० जलाशय याचा तळ तो.

ठावेठिकाण (पु. न. ना.) कोणेक प-दार्थाची सांपडण्याची किं० राहाण्या-ची जागा ती तें.

ठावणें (धा. ना.) (ग्रं० राहणें.

ठावोवरी (अव्य०) (ग्रं०) पर्यंत, पा-वेतों. [विण्याचा व्यापार ती.

ठांसणी (स्त्री. ना.) ठांसून घट्ट बस-

ठांसणें (धा. ना.) मोकळ्या पदार्थास ठासठांसून घट्ट बसविणें.

ठिकरी (स्त्री. ना.) दगडाची चीप किं० खापरी जी तापवून तीवर लो-णी, जिरें इ० घालून कढी इ०कांत बुडवितात किं० तीवर कढी ओति-तात ती. २ तिच्या योगानें कढी इ०कांस लागतो जो वास ती. ३ (वि०) (ग्रं०) भिन्न.

ठिकाण (न. ना.) स्थळ, स्थान. २ आश्रय. ३ थांग. ४ अंतपार.

ठिकाणा (पु. ना.) ठिकाण.

ठिकी (स्त्री. ना.) धान्यादि ठेवण्या-साठीं कणगीचे आकाराचें गोणपा-टाचें शिवून जें करितात ती.

ठिकें (न. ना.) शेताचें लहान क्षेत्र तें.

ठिकाळें, गोळें (न. ना.) लहान प-त्रावळ तें.

ठिगळ (न. ना.) वस्त्र इ०कास जो चिंधी इ०कांचा कपा अ० जोड देतात तें. [चें.

ठिगुळवाणें (वि०) (ग्रं०) अनोळखी-

ठिणगी (स्त्री. ना.) अग्नीचा कण.

ठिपका (पु. ना.) पातळ गंध इ०कां-चा टिकला तो. २ शाई, पाणी इ०-कांचा कागद इ०कांवर पडलेला बिं-दु तो.

ठी (पु. न. ना.) (ग्रं०) ठिकाण.

ठीक (वि०) यथायुक्त, जसा असावा तसा.

ठुंठण (न. ना) अग्रभाग तुटून रा-हिला जो हात, पाय, वृक्ष इ०कांचा अवयव तें.

ठुणका (पु. ना.) (ग्रं०) बुकांदा.

ठुसठुशीत (वि०) चांगला पुष्ट.

ठुसठूस (स्त्री. ना.) ठणका.

ठेक (पु. ना.) (ग्रं०) अंकुश.

ठेका (पु. ना.) पखवाज इ०कांत वा-जविण्याची एक गत आहे तो.

ठेंगणा (वि०) उण्या उंचीचा. २ (ग्रं०) नीच, हलका, उणा.

ठेंगमत, ठेंगेंमत (न. ना.) ज्यास शा-स्त्राधार नाहीं असें मत तें.

ठेंच (स्त्री. ना.) पायांचे बोटांस चा-लतांना दगड इ०कांपासून आघात होतो ती. २ एकादे व्यवहारांत झा-लेली जी फसगत ती.

ठेचणें (धा. ना.) चेंचणें.

ठेणें (धा. ना.) (ग्रं०) राहाणें.

ठेप (स्त्री. ना. ) कोणेक कार्याविषयीं केलेला कालाचा किं० स्थळाचा नि-यम ती. २ अपराधी मनुष्यास का-हीं नियमित काळपर्यंत सरकारांतून तुरुंगांत जो करितात प्रतिबंध ती.

ठेपणें (धा. ना.) एकास एकानें ला-गावें असें दोघांनीं परस्पर भिडणें. २ कांहीं कार्य अवश्य केलें पाहिजे अशा दशेस येणें.

ठेव (स्त्री. ना.) पुरून ठेवलेलें द्रव्य तें. २ विसव्यार्जी किं० थोड्या व्याजानें कोणी कोणाशीं ठेवतो द्रव्य तें. ३ शरीराची ठेवण तें.
ठेवण (स्त्री. ना.) शरीराचा बांधा तें.
ठेवणें (सं. स्थापन) (धा. ना.) कोणेक पदार्थावर कोणेक पदार्थ राहाविणें. २ योजिलेलें किं० चाललेलें कांहीं कार्य कांहीं काळपर्यंत न करितां तसेंच राखणें. ३ ठेव.
ठेवा (पु. ना.) द्रव्यादिकाची ठेव. २ (ग्रं०) पुण्य पापाचा संचय तो.
ठोक (पु. ना.) मनुष्य इ० काठ लाकूड इ० कार्नीं केलेला प्रहार तो. २ (वि०) ठळक. ३ फुटकळ नव्हे जो पदार्थादि तो.
ठोकणें (धा. ना.) लाकूड इ० कार्नें कांहीं पदार्थावर आघात करणें. २ मनुष्यादिकास काठी इ०कार्नें मारणें.
ठोकताळा (पु. ना) पदार्थाच्या कांहीं अवयवांचा अनुभव घेऊन त्याचे किंमत इ० कांचा बांधला जो अजमास तो.
ठोकर (स्त्री. ना.) चालणारानें दुसऱ्या पदार्थास जो पायानें प्रहार करणें तें किं० चालणारास दुसऱ्या पदार्थापासून ठोशब्द होई असा आघात होणें तें. २ ठेंच.
ठोकळा (पु. ना.) मोठ्या जाड लाकडाचा जो हात दोन हात लांब तुकडा तो. २ शाईची दौत इ०ठेवण्यासाठीं जें लांकडाचें पात्र करितात तो.
ठोका (पु. ना.) हातवडा, काठी इ० कांचा ठो शब्द होण्याजोगा जो आघात तो. २ त्याच्या योगानें उमटलें जें चिन्ह तें. ३ शास्त्रादिकांतील भविष्यगोष्टी इ० कांचा प्रत्यय तो.
ठोंसर (वि०) जाड जें वस्त्र, काष्ठ इ० तें.
ठोंसरा (पु. ना.)मूठ वळून जो प्रहार करणें तो. २ दुसऱ्याचें मर्म काढून त्यास लाजविण्याचा व्यापार तो.

---

## —ड—

ड— हा वर्ण तेरावें व्यंजन आहे.
डकणें (धा. ना.) चिकटणें. २ डगणें.
डंका (सं. ढक्का) (पु. ना.) एक चर्मवाद्य आहे. २ चौघडा वाजविणें झाल्यावर शेवटीं जी थोरली नौबद वाजवितात तो.
डंख (सं. दंश) (पु. ना.) कोणी आपलें वाईट केलें असतां जो त्याचें वाइटाविषयीं मनांत भाव धरिला असतो तो. २ सर्प इ० कांचा दंश तो. ३ चुना, पोहे इ० कुटायाचा लाट तो. [ण्य तो.
डंग (न. ना.) झाडीनें दाट जें अरडगणें (धा. ना.) आधार ढिला झाल्यामुळें कोणेक पदार्थ सुटून पडण्याजोगा होणें. २ भयानें युक्त होणें.
डगमगणें (धा. ना.) डगडगणें २ धैर्य सुटून भयानें घाबरें होणें.
डगर (स्त्री. ना.) टेंकडी. २ पर्वताचा लहान कडा तो. [खगारि.
डगरू (पु. ना) (ग्रं०) प्रासिक्ष,

डंगरू (पु. ना.) (ग्रं०) प्रतिबंध.

डंगारणें (न. ना.) टिकोरें.

डचका (पु. ना.) अंतःकरणास होते जी एकाएकीं भीति तो.

डचमळणें (धा. ना.) पात्रांतील पाणी इ०पदार्थ हलल्यामुळें बाहेर येणें किं० आणणें.

डंडळणें (धा. ना.) (ग्रं०) चळणें.

डपकें, बकें (न. ना.) पर्जन्य इ० कांचें पाणी साचलेली खळी तें. २ लहान बुधला.

डफ (पु. ना.) एक चर्मवाद्य आहे.

डफघाईस, डबघाईस (अव्य०) नाश होण्याजोग्या अवस्थेस.

डंब (स. दंभ) (न. ना.) ढोंग. २ रिकामा खटाटोप.

डबडबणें (धा. ना.) उदकादिकानीं पात्र इ० पूर्ण भरलें जाणें. २ पडसें इ०कानें मनुष्यादिकानें व्यापलें जाणें.

डबा (पु. ना.) करंड्यासारिखें धातु, काष्ठ इ० कांचें पात्र करितात तो. २ लहान मुलाच्या पोटांत एक रोग होत असतो तो.

डबी (स्त्री. ना.) तपकीर इ० ठेवण्याचे उपयोगी पात्र असतें ती. २ देवाचा जो जामदारखाना, पेटी इ० ती.

डंबोलें (न. ना.) संचय करून ठेवलेलें द्रव्य तें.

डंभ (न. ना.) डंब.

डरकण (स्त्री. ना.) वाघ, बैल इ० कांचा आवेशपूर्वक शब्द ती.

डरकी (स्त्री. ना.) डरकणी.

डरांवडरांव (अव्य०) बेडकाच्या शब्दाचें अनुकरण.

डला (पु. ना.) डबोलें.

डंवचणी (स्त्री. ना.) टोंचणी.

डवडव (स्त्री. ना.) श्रम. २ (अव्य०) सर्व शरीर भिजे असा घाम येणें त्याचें वि०.

डवरणें (धा. ना.) पर्जन्यानें वाट भरून येणें. २ वृक्षादिकानीं फळें, फुलें इ० कानीं भरणें. ३ (ग्रं०) शृंगारणें.

डसणें (धा. ना.) चावणें.

डहुरा (पु. ना.) बहुधा उन्हाळे दिवसांत नदी इ०कांमध्यें पाण्याकरितां खळी खणतात तो.

डहुळणें (धा. ना.) ढवळणें. २ घुसळणें.

डळमळणें (धा. ना.) कांहींएक पदार्थाचा आधारबंध ढिला झाल्यामुळें त्याणें हलणें. २ सिद्ध दशेस आलेली किं० येणारी कांहीं गोष्ट ती तशी न होणें. ३ पाणी इ०कानीं हलणें.

डळमळीत (वि०) हलायाजोगा किं० हलूं लागला जो कांहीं पदार्थ तो. २ निश्चयात्मक नव्हे जो व्यवहारादि तो. ३ तोंडोतोंड भरलेला पात्रादि तो.

डाईक (वि०) (ग्रं०) पोटांत दंश धरणारा तो.

डांक (पु. ना.) भोंड्याचा सांधा, छिद्र इ० बंद करण्याकरितां जो पितळ, कथील इ०कांचे रसाचा रांवा करून लावितात तो. २ त्वरेनें कागदपत्र इ० पोहोंचविण्यासाठीं जो

जागोजाग सरकार इ०कांनून मनुष्यादि समुदाय ठेविला असतो तो.

डाकलग (वि०) ज्यास डाक लागला आहे तो. २ दोषयुक्त झालेला तो. ३ रोगयुक्त शरीराचा तो.

डाकुली (स्त्री. ना.) (प्रा०) चेष्टा.

डांग (स्त्री. ना.) केळ, चवेण इ०कांचें मुळापासून सबंध पान तो. २ बुंध्याकडे वांकण असलेली हातीं धरावयाची काठी ती.

डांगरटी (स्त्री. ना.) (प्रा०) डांगोरा.

डाग (पु. ना.) खिळा इ० तापवून शरीरावर चटका देतात तो. २ शुभ्र वस्त्रादिकांवर शाई इ० पदार्थांचा बिंदु पडून मळकट दिसायाजोगें जें चिन्ह उमटतें तो. ३ दुष्कर्म केल्यामुळें कुलादिकांस कलंक लागतो तो. ४ अलंकार.

डागडुजी (स्त्री. ना.) इमारत इ०कांची मोड तोड झालेली नीट करण्याचा व्यापार तो.

डागणें (धा. ना.) तापलेला खिळा इ०कानें भाजणें. २ मर्मास झोंबायाजोग्या भाषणानें कोणेकास दुखविणें. ३ तोफ इ०कांचे कान्यावरील दारूस आग देणें.

डागर (न. ना.) उडदाचे पिठांत मीठ, तिखट इ० घालून भिजवून करितात तें.

डांगा (पु. ना.) काठी.

डागिना, णा (पु. ना.) सोनें इ०कांचा अलंकार तो.

डांगुरटी (स्त्री. ना.) (प्रा०) डांगोरा.

डांगोरा (पु. ना.) दौंडी म्हणून जें चर्मवाद्य आहे तें रस्तोरस्तीं वाजवून कोणेक गोष्टीची जी प्रसिद्धि तो. २ कीर्ति. ३ दौंडी. ४ (प्रा०) मायाशक्ति.

डाफरणें (धा. ना.) रागानें दांत, ओंठ चावून कोणेकावर संतापणें किं० अंगावर ओरडणें.

डांबर, मर (न. ना.) एक प्रकारचें रोगण आहे.

डांबरणें (धा. ना.) वायूच्या विकारानें पोट इ० फुगणें किं० जड होणें.

डांभणें (धा. ना.) गाय इ० पशूस खुटा इ०कांशीं घट्ट बांधणें. २ गाय इ० पशु बांधायासाठीं खुटा पुरणें.

डामडौल (पु. ना.) कोणेकाबरोबर साज, सरंजाम, घोडे, माणसें इ० जें खटलें असतें तो २ वस्त्रालंकार अंगावर घालण्याचा व्यापार तें.

डाली (स्त्री. ना.) आंबे इ० फळांची कावड किं० एकीकडलें ओझें तें. २ कोणेकाचा कोणाशीं पराकाष्ठेचा वैरभाव तो.

डाव (पु. ना.) सोंगट्या इ०कांचा आरंभापासून शेवटापर्यंत जो खेळ तो. २ क्रमानें आलेली खेळाची पाळी तो. ३ डाख. ४ दुसऱ्याचा पराजय इ० करण्याची युक्ति तो. (स्त्री०) लांकडाची पळी.

डावपेंच (पु. ना.) एखाद्यास वश इ० करण्याची युक्ति तो. २ मल्ल इ०कांची दुसऱ्यास पाडाव करण्याची युक्ति तो.

डावलणें (धा. ना.) (प्रा०) फेंकून

देणें. २ अनादरानें सोडून देणें, टाकणें.

डांस (सं. दंश) (पु. ना.) ज्याच्या चावण्यानें अंगास तत्काळ गांध येते अशी एक माशीची जाति आहे. २ चावा. [करणें.

डाहारणें (धा. ना.) (ग्रं०) प्रसिद्ध

डाळें (न. ना.) हरभरा इ० भाजून त्याचा कोंडा काढून जें करितात तें.

डिंक (पु. ना.) गोंद.

डिंकवडा (पु. ना.) डिंकांत खारीक, खोबरें इ० पदार्थ घालून बाळंतीण इ०कांसाठीं जें औषधी लाडू करितात तो [२ पानांचा अग्रभाग.

डिकशी (स्त्री. ना.) वृक्षाचा अग्रभाग.

डिखळ (न. ना.) शिजलेला भात इ०कांचीं पुष्कळ शितें एकत्र होऊन जो गोळा होतो तें. २ मातीचें ढेकळ तें.

डिंगरी (स्त्री. ना.) मुळ्याची शेंग ती

डिंगरूं, डिंगर (पु. ना.) (ग्रं०) मूल, लेंकरूं. २ (वि०) प्रिय, आवडतें.

डिंब (न. ना.) (ग्रं०) आभास. २ उपद्रव. [लेंकरूं इ० उपाधि.

डिंबोपाधि (स्त्री. ना.) (ग्रं०) मूल

डिंभ (सं. न. ना.) लेंकरूं. २ (वि०) मूर्ख

डिरूं (पु. ना.) (ग्रं०) शेंग.

डींक (पु. ना.) डिंक.

डुकली (स्त्री. ना.) किंचित् लागलेली झोंप ती. २ बसल्याबसल्या किंचित् निद्रा लागून मनुष्य डोलण्याचा प्रकार ती.

डुडूळ (न. ना.) (ग्रं०) घुबड.

डुबक (स्त्री. ना.) गाय इ० पशूनें न पळावें म्हणून पुढील दोन पायांस जी दोरी बांधितात ती. [बुडी ती.

डुबकी (स्त्री. ना.) पाण्यांत मारितात

डुंबणें, मणें (धा. ना.) पाण्यांत उड्या इ० मारून पोहण्याचा खेळ खेळणें. २ प्रपचादिकांत निमग्न होऊन राहणें

डुलणें (धा. ना.) हत्ती इ० कानीं एका अंगावरून दुसऱ्या अंगावर वारंवार हलणें किं० त्यावर बसलेल्या मनुष्यानें जागचेजागीं हलत राहणें. २ आनंद इ० झाल्यामुळेंही तसेंच हलण्यानें युक्त होणें. ३ गाहाण ठेवलेला पदार्थ सोडविण्यास पैसा न मिळाल्यामुळें आपल्या सत्तेंतून सावकार इ० कांच्या सत्तेंत जाणें. ४ कर्ज दिलेला पैसा किं० कोणाकडे ठेवलेली ठेव बुडणें.

डूब (पु. ना.) रंगाचें वस्त्र फिकट झालें असतां पुनः रंगांत बुडविण्याचा व्यापार तो. किं० त्या व्यापारानें त्यावर बसला रंग तो.

डेख (न. ना.) फळ, पान, फूल इ०कांचा झाडाशीं संयुक्त असलेला अवयव तें.

डेरा (पु. ना.) एक मातीचें केलेलें पात्र आहे. २ राजे इ० लोक प्रवासास जातात त्यासमयीं त्यांस राहण्याच्या उपयोगी घरासारिखें कनातच शिवून जें करितात तो. ३ मोठें पोट तो. ४ देवळाचा घुमट तो.

डेविरा (वि०) (ग्रं०) मारका.

डोई,डोय (स्त्री. ना.) मनुष्यादिकांचें शिर तें. २ पिढी.

डोईजड (वि०) भंगीं धनीपणा नसतां ज्याचें म्हटलेलें कांहीं करावें लागतें अशा वजनदारीचा मनुष्य तो. २ कठीण किं० भारी.

डोईफोड (स्त्री. ना.)कपाळकूट.[वर्ण.

डोकावणें,डोंकावणें (धा. ना.)टोंका-

डोंगर (पु. ना.) पर्वत. २ दुःखाचा डोंगर म्ह० दुःखाचा अतिशय.

डोंगरवट (वि०) फार डोंगरांच्या संबधाचा प्रदेश तो.

डोंगराळ (वि०) डोंगरवट.

डोंगरी (स्त्री. ना.) लहान डोंगर. २ (वि०) डोंगराळ. ३ डोंगरसंबंधी.

डोंगळा (पु. ना.) मोठी मुंगी तिला म्हणतात. २ तिजसारखा एक काळा किडा आहे.

डोंगा (वि०) (ग्रं०) वाकडा.

डोंडी (स्त्री. ना.) (ग्र०) पीक.

डोंब,डोम (पु. ना.) अतिशूद्रांत एक जाति आहे. २अग्नीचा मोठा जाळ तो.

डोंबकावळा (पु. ना.) कावळ्यांत एक जाति आहे.

डोंबल (न. ना.) डोचकें, शिव्या इ० देण्याचे प्रसंगीं. [जाति.

डोंबारी (पु. ना.) कोल्हाटी नावाची

डोरली (स्त्री. ना.) वांगीसारिखें एक झाड आहे तें. [२ (वि०) सुंदर.

डोरी (स्त्री. ना.) (ग्रं०) सुंदर मुख.

डोल (पु. ना.) विस्मय. २ झोंक. ३ एक कातड्याचें पोहोऱ्यासारिखें पाणी काढण्याचें पात्र आहे तो.

डोलकर (पु. ना.) डोली वाहण्याचें कसब करितो तो.

डोलकाठी (स्त्री. ना.) गलबतावरील शिडाची जी काठी ती.

डोलणें (धा. ना.) डुलणें.

डोली (स्त्री. ना.)मनुष्यास आंत बसवून नेण्याआणण्याकरितां पाळण्याच्या आकाराचें एक वाहन करितात ती.

डोल्हारा (पु. ना.) लहान झोंपाळ्याचे डौलाचा करित असतात तो.

डोह,डोहो (पु. ना.) ज्यामधील पाणी कधींहि क्षीण होत नाहीं अशी जी नदींतील फार खोल जागा तो.

डोहळा,होळा (सं.दोहद)(पु. ना.) गरोदर स्त्रीस ज्या नानाप्रकारच्या इच्छा होतात तो. २ अयोग्य पदार्थाची किं० साधारण बरे वाईट पदार्थाची जी इच्छा तो.

डोळ (पु. ना.) डाळ करण्यासाठीं जो द्विदल धान्याचा भरडा करितात तो. २ चोख डाळींत ज्या क्वचित् क्वचित् सालांसकट डाळिंबशा सापडतात तो. ३ किंतू.

डोळस (वि०) ज्याचे डोळे खबरदार तो. २ (ग्रं०) ज्याचे डोळे सुंदर आहेत तो.

डोळा (पु. ना.) रूपविषय पाहण्यास साधन जें इंद्रिय तो;किं० त्या इंद्रियाचें तें स्थान तो. २ कांहीएक व्यवहाराची माहितगारी समजण्यास कारण जें शास्त्र, कागदपत्र, दूत इ० तो. ३ मोराचे पिसांवर जो

नेत्रासारखीं चिन्हें असतात तो. ४ नारळाचे शेंडीखालीं ज्या खळ्या असतात तो. ५ डोळे येणें इ० डोळ्यास कांहीं रोग होणें. ६ डोळे झांकणें इ० कांहीं गोष्टीची उपेक्षा करणें किं० असावध असणें अ० मरण पावणें इ०.

डोळेझांक (स्त्री. ना.) रोग, शत्रु इ० कांची उपेक्षा ती.

डोळेफोड (वि०) दुसऱ्याच्या नजरेंत लवकर भरणारा सुंदर इ० जो पदार्थ तो. २ (स्त्री. ना.) डोळ्यांस त्रास होण्याजोगी जी मेहेनत ती.

डौरवाय (पु. ना.) (ग्रं०) उपहास, थट्टा.

डौल (पु. ना.) सर्व पदार्थ मात्राचे रचनेंत जो कांहींएक आकारविशेष असतो तो. २ वस्त्र, अलंकार इ०. ३ मानमान्यता. उ० त्या दर्बारांत त्याचा डौल बरा आहे.

---

## —ढ—

ढ—हा वर्ण चौदावें व्यंजन आहे. (वि०) ज्यास व्यवहारचातुर्य नाहीं तो किं० अक्षरशत्रु तो.

ढकलणें (धा. ना.) कोणेक पदार्थ पलीकडे सरके असा करणें. २ कशा तरी प्रकारानें कालक्रमणा करणें.

ढकलपट्टी (स्त्री. ना.) चालढकल

ढकलाढकल (स्त्री. ना.) ढकलपट्टी २ लोटालोट.

ढग (पु. ना.) अभ्र.

ढग (पु. ना.) ज्यास जो व्यापार अयोग्य त्यांत तो आसक्त झाला असतां त्या व्यापारास निंदेनें म्हणतात.

ढणढणीत (वि०) मोठ्या प्रकाशानें युक्त जो दिवा इ० तो.

ढब (स्त्री. ना.) बाहेरून चांगला दिसण्याजोगा जो पदार्थाचा डौल तो. २ तऱ्हा.

ढबू (पु. ना.) दोन शिवराई वजनाचा पैसा तो. २ (वि०) पुष्ट शरीर ज्याचें तो.

ढवढव (स्त्री. ना.) अव्यवस्थेमुळें कोणेक कार्याची लोकांनीं हंसायाजोगी जी दुर्दशा ती. २ सभा इ० कांनि कोणिकाची झाली जी अप्रतिष्ठा ती.

ढवळणें (धा. ना.) घाटणें. २ पाणी आदिकरून पदार्थांत हात इ० घालून खालचा अंश वर, वरचा खालीं होई असें करणें. ३ पोटांत उमदळणें.

ढवळा (सं. धवल.) (वि०) पांढऱ्या रंगाचा बैल इ० पशु तो. २ पांढरा रंग तो.

ढवळाढवळ (स्त्री. ना.) हें ढवळ तें ढवळ असा जो व्यापार तो. २ एकादे कार्याची दुर्दशा ती.

ढव्वाळकी (स्त्री. ना.) चीड यावयाजोगी कोणिकाची थट्टा मस्करी ती.

ढवाळी (स्त्री. ना.) (ग्रं०) ढवाळकी.

ढसळ, साळ (वि०) उदार. २ (ग्रं०) मोठा.

ढसाळणें (धा. ना.) (ग्रं०) विसरणें.

ढस्मा (पु. ना.) (ग्रं०) हिमा. [जोगा.

ढळढळीत (वि०) स्वच्छ दिसण्या-

ढळणें (धा. ना.) चलन पावणें. २केल्या नियमांत अंतर पडणें. ३ देव इ० कांवर चवरी,मोरचेल इ०डुळणें.
ढांगळ (वि०) अतिशय उंच जो मनुष्यादि तो. [शोषणें.
ढांढुळणें (धा. ना.) कांहींएक वस्तु
ढांपा (पु. ना.) जिना इ० बंद करायाचे उपयोगी वर पाडायास फळी करितात तो.

ढाल (स्त्री. ना.) आपल्या अंगावर दुसऱ्यानें मारलेलें शस्त्र लागू न व्हावें ह्मणून कातडें इ० कांचीं वर्तुळ करून बाळगितात ती. २ किल्ला इ० कांत सरकारचें मोठें निशाण असतें तें. ३ (प्रं०) (न. ना.) केवळ जें मारणादिकाविषयींचें क्षुद्र साधन तें. ४ स्त्रियांचें साहस कर्म तें.
ढालगज (वि०) साहस कर्म करणारी स्त्री ती.

ढालाईत (वि०) राजादिकाचे स्वारीपुढें जे सोटेबरदार शिपाई चालतात ते. २ स्वारींतील निशाण चालणारा तो. [खोकला लागतो ती.
ढास (स्त्री. ना.) कोरडा जो सतत
ढासळणें (धा. ना.) रचलेल्या पदार्थाची रचना कोसळायाजोगी ढिली होई असें करणें. २ रचलेल्या पदार्थानें कोसळणें.

ढाळ (पु. ना.) मोतीं इ० कांवरील तेज. २ घराचे पाख्यास पाणी निघून जाण्याजोगा उतरतेपणा तो. ३ पोटांतील विष्ठा पातळ होऊन पडते तो. ४ हाच मळ बाहेर पडण्यास औषध घेतात तो.
ढाळक (न. ना.) ढाळ होण्यास पोटांत घेतात औषध तें.
ढाळेंढाळें (अव्य०) (प्र०) हळूहळू.
ढिगार,गारा (पु. ना.) धान्यादिकांचा गंज.
ढिमा (पु. ना.) (प्र०) मुलामा.
ढिला (वि०) अंवळ नव्हे तो. २ ध्यान चौकशी इ० नाहीं असा मनुष्य किं० कारभार तो. [तो.
ढीग (पु. ना.) धान्यादिकांचा गंज
ढील (पु. ना.) उशीर.
ढुंकून (अव्य०) डोकावून.
ढुंग (न. ना.) ढुगण.
ढुंगण (न. ना.) कंबर व मांड्या यांचे मधला मागल्या बाजूचा प्रदेश तें.
ढुसणी (स्त्री. ना.) शिंग इ० कानें भोंक पडावयाजोगा प्रहार ती.
ढेंकर (पु. स्त्री. ना.) पोट भरल्यामुळें किं० फुगल्यामुळें वायूची ऊर्ध्व गति होऊन कंठांतून ध्वनि निघतो तो ती. २ ढेंकर देऊन पचणें इ० दुसऱ्याचें द्रव्यादि खाऊन जिरविणें.
ढेंकूळ (न. ना.) नांगर, कुदळ इ० कांनीं जमीन उखळली असतां जें ढिखळ निघतें तें.

ढेंढळ (स्त्री. ना.) पातळ हगण्याजोगा विकार ती. [साळा सरणें.
ढेंढेंफिटणें (धा. ना.) (प्र०) पाय-
ढेंप (स्त्री. ना.) ऊंसाचा रस कढवून खळींत ओतल्यानें जी जमते ती.

२ एकत्र असलेलें गवत, कागद इ० भिजून खाप होते तो.

**ढेपसा** (पु. ना.) गोंवरीच्या राखेचा तुकडा तो.

**ढेर** (स्त्री. ना.) मोठें पोट तें

**ढोंग** (न. ना.) डंभ, किं० पोकळ खटाटोप. २ दुगण.

**ढोंडी** (पु. ना.) (ग्रा०) आकार.

**ढोंपर** (पु. ना.) गुडघा. [च्या दशेस.

**ढोंपरखुंटीस** (अव्य०) ढोंपर टेंकण्या-

**ढोबळ, बळा** (वि०) ओबडधोबड जो मोठा पदार्थ तो.

**ढोर** (न. ना.) गाय, म्हैस इ० पशु तें. २ (पु.) कातडें रंगविणारी एक जात आहे ती.

**ढोल** (स्त्री. ना.) वृक्ष, पर्वत इ०कां-मध्यें पशु पक्षी इ० राहण्याजोगें जें भोंक असतें तें. २ (पु. ना.) एक मोठें चर्मवाद्य आहे तें. ३ मोठें पोट तें.

---

## —ण—

ण— हा वर्ण पधरावें व्यंजन आहे. हें अक्षर आरंभीं असलेले शब्द नाहींत.

---

## —त—

त— हा वर्ण सोळावें व्यंजन आहे.

**तई** (अव्य०) (ग्रा०) तेव्हां. २ तेथें, तिकडे.

**तकट** (न. ना.) अलंकारादि करा-यासाठीं सुवर्णादि धातूचा ठोकून केला जो पातळ पत्रा तो.

**तकटून** (अव्य०) आंत किंचित् अ-वकाश किं० पोकळी न राही अशा प्रकारें.

**तकतकणें** (धा. ना.) रंग इ० कां-च्या योगानें चकचकीत दिसणें. २ मनुष्यादिकांचें शरीर इ० कांति-युक्त दिसणें.

**तकरार** (अर० स्त्री. ना.) विपरीत भाषण. २ दोष नसून व्यर्थ जो दो-षारोप तो.

**तकलादी** (अर० वि०) तकलुबी.

**तकलुबी** (अर० वि०) दिसण्यांत बा-हेरून शोभिवंत परंतु आंत जें नि-र्बळ तें.

**तकवा** (अर० पु. ना.) (ग्रा०) बळ, सामर्थ्य. २ धैर्य. [अपराध.

**तकशीर, सीर** (अर० स्त्री. ना.)

**तकूब** (अर० अव्य०) चालल्या का-र्यास मध्यें कांहीं काल विराम होई अशा प्रकारें. २ (न.) तगादा न करण्याविषयींचें मनाईपत्र तें. [सन.

**तक्त** (फा० न. ना.) राजाचें सिंहा-

**तक्तपोशी** (फा० स्त्री. ना.) तक्त्यांनीं केलेली पाटून मांडणी ती. (वि०) त-क्त्यानें युक्त.

**तक्ता** (फा० पु. ना.) लांकूड करव-तानें चिरून जी लांब फळी करितात ती. २ गुलाब इ० झाडांची सारखी लाविलेली पंक्ति ती.

**तक्या** (फा० पु. ना.) एक प्रकार-च्या आकाराचें टेंकून बसायास सा धन करितात तो. २ फकीर लोकां-चीं राहण्याची जागा ती.

**तकसीम, सीम** (अर० स्त्री. ना.) वतन इ० कांचे अनेक विभाग ते.

**तंग** (फा० पु. ना.) घोडा इ० कांव-रील खोगीर इ० आवळण्याचा का-तड्याचा पट्टा तो. २ (वि०) अंवळ किं० घट्ट.

**तंगडी** (स्त्री. ना.) मांडीपासून पाव-लापर्यंत जो पाय त्यास निंदेनें ह्मणतात.

**तगणें** (धा. ना.) टिकणें.

**तगबग** (स्त्री. ना.) तगमग.

**तगमग** (स्त्री. ना.) (पं०) काहली इ० कानीं व्याकुळपणा तो.

**तगाई** (अर० स्त्री. ना.) मुलखाचे रावणुकीसाठीं सरकारांतून कुळास पैसा देतात तो.

**तगादा** (अर० पु. ना.) कूळ इ० कास पैसा लवकर टाका इ० उप-द्रवाचा व्यापार तो.

**तजवीज** (अर० स्त्री. ना.) कांहीं कार्य उत्पन्न होण्यापूर्वीं जी त्यास उपयोगी सामग्रीची सिद्धता ती. २ कांहीं कार्य अमुक रीतीनें करावें ह्मणून केली जी अंतःकरणांत योजना ती. ३ यु-क्ति.

**तबेला** (अर० पु. ना.) तेज.

**तट** (सं. पु. ना.) नदी इ० कांचें ती-र. २ गांव, किल्ला इ० कांभोंवतालची भिंत तो. ३ जातिप्रकरणांत जे दोन पक्ष होतात तो किं० तशा प्रकारचा विरुद्धपणा तो. [मुरवत इ० तो.

**तटका** (पु. ना.) (पं०) संबंध. २भिड,

**तटणें** (धा. ना.) थांबणें, खोळंबणें. २ अडून बसणें.

**तटबंदी** (तट, बंदी) (स्त्री. ना.) गांव, किल्ला इ० कांचे भोंवतालचें आव-रण ती.

**तटस्थ** (सं. वि०) किनाऱ्यावर रा-हिलेला तो. २ चाललेल्या कांहीं का-र्याचा रोध करून थांबला तो.

**तंटा** (पु. ना.) कज्जा. [तीर. २तळें.

**तटाक** (सं. न. ना.) नदी इ० कांचें

**तटाणी** (स्त्री. ना.) लहान घोडी.

**तंटाबखेडा** (पु. ना.) कज्जा, भांडण.

**तटिनी** (सं. स्त्री. ना.) (पं०) नदी.

**तट्ट** (अव्य०) अवकाश किं० पोकळ-पणा न राही अशा प्रकारें.

**तट्टू** (पु. ना.) लहान आकाराचा घोडा. २ पाढऱ्या कापडांत एक जा-त आहे.

**तटया** (पु. ना.) वेळूची अंथरी.

**तड** (स्त्री. ना.) समाप्तीचा अवधि. २ थड. [निबंध न होतां इ०.

**तडक** (अव्य०) कोणेक गोष्टीस प्र-

**तडकणें** (धा. ना.) थंडी, उष्ण या-च्या अतिशयानें काष्ठ, भूमि इ० कां-स चीर पडणें. २ एकाएकीं कांहीं भ-य इ० प्राप्त झाल्यामुळें अंतःकरणास व्यथा होणें.

**तडकफडक** (वि०) स्पष्ट असा जो भा-षणादि व्यवहार तो किं० तसें भाषण करण्याचा प्रकार तो.

**तडकाफडकी** (अव्य०) बहुत दिवस विपत्ति न भोगितां मरणें इ० कांचें वि०.

**तंडणें** (धा. ना.) (पं०) धार करणें.

**तडतड, डा** (अव्य०) फोडणी इ०-

काच्या शब्दाचें अनुकरण. २ अधिक उणें बोलण्याचें वि०. ३ तडतडां तोडणें म्ह० लहान लहान मुलें माशा इ० कानीं आई इ० कास भारी त्रास देणें.

तडफड (स्त्री. ना.) चडफड.

तडवा (पु. ना.) (ग्रं०) छतासारिखा जो चांदवा तो.

तडस (पु. ना.) पोट फुगल्यामुळें त्यास लागल्ये तिडीक तो.

तडा (पु. ना.) लाकूड, मडकें इ०कास पडते चीर तो. २ मडकें इ० तापल्यामुळें त्याची खपली निघल्ये तो.

तडाका (पु. ना.) कडाका. २ तडातड शब्द होई असा चाबूक इ०काचा प्रहार तो. ३ झपाटा किं० वेग.

तडाग (सं. तटाक) (न. ना.) तळें.

तडातोड (स्त्री. ना.) ताडातोड.

तडामोडा (पु. ना.) ताडामोडा.

तडित् (सं. स्त्री. ना.) वीज.

तडीतापडी (पु. ना.) गोसावी, वैरागी इ० तपस्वी तो.

तंडुल (सं. पु. ना.) तांदूळ.

तण (न. ना.) (ग्रं०) तृण. [उणें.

तणतणणें (धा. ना.) रागानें चरफडणें.

तणार (न. ना.)(ग्रं०)तृणालय, छपर.

तणाव, तणावा (अर० पु. ना.)डेरा, राहुटी इ० कांचा ताण दोर तो. २ दोरी इ० ताणल्यामुळें येतो जो ताठपणा तो व तो ताणण्याचा व्यापार तो. ३ प्रपंचादिनिर्वाहास उपयोगी जो आश्रयभूत असतो तो. [तो.

तंत (वि०) संख्यादिकानें परस्पर तुल्य

तंतरणें (सं. तंतु)(धा. ना.)कोणीकानें कोणीकापासून ठकवून द्रव्य काढणें किं० कांहीं लोभ इ० दाखवून फसविणें. २ पुरुषानें स्त्री उपभोगणें.

तंतु (सं. पु.ना.) कापूस, रेशीम इ०कास पीळ घातला असतां जें सूत्र निघतें तो. [तारांचें वाद्य त.

तंतुवाद्य (सं. न. ना.) वीणा इ०

तंतोतंत (वि०) संख्या, गुण इ०कांनीं तुल्य. [रितां, लागलीच.

तत्काल, ळ (अव्य०) विलंब न क-

तत्पद (सं. न. ना.) (ग्रं०) ईश्वर.

तत्पर (सं. वि०) ज्या व्यवहारादिकाकडे ज्याचें पूर्ण लक्ष्य तो त्याविषयीं.

तंत्र (सं. न. ना.) अनेक व्यापार एकामींच करण्याचा प्रकार तें. उ० मुलाची मुंज व मुलीचें लग्न एकाच तंत्रानें आटपून घेतलें. २ अनुलक्ष्य. उ० राजाच्या तंत्रानें प्रधानानें चालावें. ३ कांहीं अनुष्ठानांत मंत्रावांचून हस्तक्रिया तें. ४ मंत्रशास्त्रांतील एक प्रकरण आहे.

तत्रापि, तत्रापी (सं. अव्य०) तसें असतांही. [तार ही.

तंत्री (स्त्री. ना.) लोखंड इ० कांची

तत्त्व (सं. न. ना.) कांहींएक पदार्थ, भाषण इ० कांतील जो साररूप अंश तें. २ वास्तविक स्वरूप तें. ३ पृथिव्यादि भूतें, पंचविषय इ० तीं प्र०.

तत्त्वतः, तत्त्वता (सं. अव्य०) वस्तुतः

तत्त्वज्ञान (सं. न. ना.) वस्तुतः ज्या रूपानें असणारा जो पदार्थ त्याचें

त्या रूपेंकरून जें ज्ञान तें. २आत्म-स्वरूपाचें जें ज्ञान तें.
तथा (स्त्री.ना.)संशय. २(सं.अव्य०) तशाप्रकारें.
तथापी (स. अव्य०) तत्रापी.
तथास्तु (सं. अव्य०) तसें असो.
तथ्य (स. वि०) वास्तविक.
तदाकार (स. पु. ना.) केवळ तोच आकार.
तद्देशी (सं. वि०) त्या देशांत उत्पन्न झाला तो. २ परदेशी, हिंदुस्थानी इ० मनुष्य तो. [संबंधीं आळस तो.
तंद्रा (स. स्त्री. ना.) (ग्रं०) निद्रे-
तद्वत् (सं. अव्य०) त्यासारखा.
तधीं (अव्य०) (ग्रं०) त्यादिवशीं, त्या काळीं. [२ तृण.
तन (स. तनु) (न. ना.) शरीर,
तनखा (फा० पु. ना.) कांहीं पदार्थावर कोणेकाचा स्वामित्वरूप संबंध तो. उ० त्या गृहस्थानें आपल्या बायकोचा तनखा तोडून टाकिला. २पगार इ० कांचीं वरात तो. उ० रिसालदार तनखेसाठीं अडून बसला आहे.
तनय (स. पु. ना.) मुलगा.
तनया (स. स्त्री. ना.) मुलगी.
तनाखोरी (फा० स्त्री. ना.)विश्वासघात. [कृश.
तनु (सं. स्त्री. ना.) शरीर. २ (वि०)
तन्मय (सं. वि०) तद्रूप, केवळ तोच.
तन्मात्रा (स. स्त्री. ना.) (ग्रं०) शब्दादिक विषय.
तन्मात्रार्धवेन्ही (वि०) (ग्रं०) प्रणवाहून विलक्षण.
तन्हार (न. ना.) (ग्रं०) तणार.
तप (स. न. ना.) शरीरशुद्धीसाठीं किं० देवताप्रसाद होण्यासाठीं उपोषणादि जें आचरण तें. २ बारा वर्षांचें जें कालप्रमाण तें.
तपणें (धा. ना.) सूर्यानें सर्वांस प्रकाश व्हावयाजोगें तेजस्वीरूपें वर्तणें. २ (ग्रं०) तप करणें.
तपन (सं. पु. ना.) सूर्य.
तपशील,सील (अर० पु. ना.) समुदायरूप जी कांहीं वस्तु इ० तिचे पोटभेद दाखविण्यानें जो लेख करण्याचा किं० सांगण्याचा प्रकार तो. २ बयाद. [चरण तो.
तपश्चर्या (सं. स्त्री. ना.) तपाचें आ-
तपास,तपासणी (अर० पु.स्त्री. ना.) कांहीं एक गोष्ट खरी, खोटी इ० दुसऱ्या प्रमाणानें ताडून पाहणें तो ती. २ शोध.
तपीळ (सं. तप्त) (वि०) (ग्रं०)तापट.
तप्त (सं. वि०) तापलेला.
तफावत (अर० स्त्री. ना.) कोणेकाचें कोणेकाच्या गुणादिकांशीं अधिक उणेपणामुळें वैषम्य तो, अंतर.
तबक (अर० न. ना.) रुपें इ० धातूंचें ताट.
तबला (अर० पु.ना.)दोन पडगीं निरनिराळीं असें एक चर्मवाद्य आहे तो.
तंबाकू,खू (पु. स्त्री.) गुरगुडींत घालून ओढण्याच्या किं० खाण्याच्या उपयोगी एक झाडाचा पाला आहे.

तबियत (अर० स्त्री. ना.) मनुष्यादिकांची प्रकृति.

तंबू (पु. ना.) एका खांबाचें जे वस्त्राचें घर करितात तें.

तबेला (अर० पु. ना.) घोडा, रथ इ० ठेवायाचें घर तें.

तम (सं. पु. ना.) अंधकार. २ तमोगुण. ३ क्रोधादिकांच्या आवेशानें कर्तव्याकर्तव्य विचार न राहण्याची अवस्था तें.

तमचा (पु. ना.) पिस्तूल.

तमणें (धा. ना.)गर्वानें वल्गना करणें.

तमा (अर० स्त्री. ना.) हा मोठा, हा पूज्य इ० जी गणना ती.

तमाम (अर० वि०) सर्व.

तमाशा (फा० पु. ना.) नानाप्रकारचीं सोंगें आणावीं, बाहुलीं नाचवावीं इ० अनेक प्रकारचे खेळ दाखविणें तें. २ लाज सोडून मनस्वीपणानें चेष्टा करणें तें.

तयार (फा० वि०) ज्याचा कांहींएक अंश करणें राहिला नाहीं असा तो इ०.

तर (सं. तरि) (स्त्री. ना.) होडी, गलबत इ० ती. २ उतरून जाण्याजोगी लहान खाडी ती. ३ (अव्य०) त्याअर्थी.

तरकट (न. ना.) दुसऱ्यावर कांहीं दोषाचा आरोप करावा किं० भिवावें, घाबरें करावें इ० कासाठीं जी कोणेकानें कल्पिली खोटी गोष्ट तें.

तरंग (सं. पु. ना.) समुद्र, नदी इ० कांत वायूच्या योगानें जे पाण्याचे फुगे होतात ते. २ बुद्धीच्या ठायीं ज्या ज्या नव्या नव्या कल्पना उठतात त्या प्रत्येकीं.

तरंगणें (धा. ना.) तरंगाप्रमाणें लाकूड इ०कानें पाण्यावर राहणें. २ ज्या आधारावर ज्यानें जें कांहीं कार्य आरंभिलें तो आधार सुटल्यामुळें त्यानें मध्यें गचके खाऊं लागणें इ०. [तर.

तरजमा,जुमा (अर० पु.ना.) भाषांतरट (न. ना.) गोणपाट. २ (ग्रं०) (पु.) घोड्याचा असूड.

तरणा (सं. तरुण) (वि०) बाळ नव्हे व म्हातारा नव्हे तो. [ळकट.

तरणाताठा (वि०) तरणा असून बतरणि (सं. पु. ना.) सूर्य.

तरणी (सं. स्त्री. ना.) नौका.

तरणें (धा. ना.) काष्ठानें इ० पाण्यावर तरंगणें. २ प्रपंचादि संकटापासून पार पडणें.

तरतरणें (धा. ना.) कांहीं कार्य करण्याविषयीं अतिशयित उत्कंठित होणें. २ घडा, फोड इ० कानें फुगून टवटवीत होणें.

तरफ (अर० स्त्री. ना.) लांकूड, दगड इ० जड पदार्थ पुढें लोटण्याकरितां खालीं लांकूड, पाहार इ० घालितात ती. २ पक्षपात किं० पक्ष.

तरफड (स्त्री. ना.) चरफड.

तरबेज (अर० वि०) निपुण.

तरमुंड,डी (स्त्री. ना.) कोणेक व्यवहार, स्थान इ० कांत सर्व शरीरासहित मस्तकाचा प्रवेश ती.

तरवार (सं. तरवारि) (स्त्री. ना.)

युद्धाचें उपयोगी एक शस्त्र आहे तें. २ तरवार मारणें, करणें, गाजविणें इ० प्रशंसा होण्याजोगा युद्धादिकांत पराक्रम करणें.
तरवारबहादर,दूर (वि०) रणांत तरवार केलेला असा शूर तो.
तरळ (स्त्री. ना.) अजीर्णविकारानें अतिशयित ढाग, ओकं व्हावी अशी विकृति ती.
तरळणें (सं. तरल) (धा. ना.) दृष्टि चलित होणें किं० भोंवावणें.
तराजू (फा० स्त्री. ना.) तागडी.
तराँडे (न. ना.) गलबत. २ (ग्रं०) ताफा, पेटा वे.
तराळ (पु. ना.) बिगार नेणार महार, कोळी इ० गांवचा बलुतेदार तो.
तरु (सं. पु. ना.) वृक्ष.
तरुण (सं. वि०) तरणा.
तरुणी (सं. स्त्री. ना.) सुमारें सोळा वर्षांचे वयाची अशी स्त्री ती.
तर्क (सं. पु. ना.) लक्षणदर्शनावरून कांहीं कांहींएक अर्थाचें ज्ञान होतें तें. २ तें ज्ञान होण्यास बुद्धीचा चांगलेपणा तो. ३ ज्यांत निश्चयरूपता नाहीं असे अंतःकरणाचे अनेक आकार ते प्र०. ४ प्रत्यक्ष, अनुमान इ० दिकांवरून पदार्थाचा निर्णय समजण्याची विद्या ती.
तर्तुद (अर० स्त्री. ना.) कांहींएक कार्याचे सामग्रीची सिद्धता करण्याचा व्यापार तो. [पोट भरणें त्याचें वि०.
तर्र (अव्य०) अवकाश न राहायाजोगें
तऱ्हा (अर० स्त्री. ना.) कोणेक पदार्थ किं० व्यापार यामध्यें भेद होण्याजोगा जो प्रकार असतो तो. कोणिकानें तऱ्हा तऱ्हा करणें इ० मनस्विपणाच्या चेष्टा करणें. तऱ्हाभरणें इ०एकादे गोष्टीचें किं० पदार्थाचें नादीं लागणें.
तऱ्ही (अव्य०) (ग्रं०) तरीही.
तऱ्हेचा (तऱ्हा) (वि०) लोकविलक्षण रीतिचा किं० अपूर्व रीतीचा.
तल, तळ (सं. पु. न. ना.) पात्रादिकाचा आंतील जो अधोभाग तो तें.
तलख (फा० वि०) ज्याचे अंगीं कांहीं काम करण्याविषयीं आवेश, त्वरा इ० आहे अशा स्वभावाचा तो. २ अतिशय तीक्ष्ण पदार्थ तो.
तलखी (तलख) (स्त्री. ना.) ज्वरादिकानीं पाचरें होण्याजोगी अंगाची आग होते ती. २ तलखपणा.
तलग (पु. ना.) (ग्रं०) प्रेम. २(वि०) प्रेमळ.
तलफ (अर० स्त्री. ना.) तलब.
तलब (अर० स्त्री. ना.) तम्बाकू, तंबाकू इ० पदार्थांची अतिशय इच्छा ती. २ त्याचें व्यसन तें. ३ शिपायाचा तुंबलेला रोजमुरा.
तलम (वि०) बारीक, मृदु असें जें सूत्र किं० वस्त्र तें.
तलवार (स्त्री. ना.) तरवार.
तलाव (पु. ना.) तळें.
तलाश, स (फा० पु. ना.) पदार्थ मिळविण्याचा किं० शोधण्याचा प्रयत्न तो. २ शोध. [निमग्न तो.
तल्लीन (सं. वि०) कांहींएक विषयांत

तत्र ( स्त्री. ना. ) पित्तादिकामुळें येते घेरी ती. [अतिशय ती.
तवक ( पु. ना. ) ( ग्रं० ) क्रोधाचा
तवका ( पु. ना.)(ग्रं०) क्रोध. २धैर्य.
तवंग (पु. ना.) तेलाच्या योगानें पाण्यावर येतो तरंग तो.
तवा (पु. ना.) भाकरी,पोळी इ० भाजायाचें एक लोखंडी पात्र आहे तो. २ शेला, शालजोडी इ० कांचा काठ व पदर सोडून मधला भाग तो.
तसदी, तस्दी (अर० स्त्री. ना.) तगादा. २ शरीरास होतो जो परिश्रम ती.
तसनस(अर० पु. स्त्री. ना.)कांहीं पदार्थाचा हरवणें,मोडणें इ० नाश तो ती.
तसबी- तस्बी (फा० स्त्री. ना.) एका दोऱ्यांत अनेक मोत्यें ओंवून जो सर करितात ती.
तसबिर-तस्बीर ( अर० स्त्री. ना. ) कोणेकाचे स्वरूपाप्रमाणें काढिलें जें चित्र ती त्याची. [त.
तसलमात (अर० स्त्री. ना.) दिम्म-
तस्कर (सं. पु. ना.) चोर.
तस्त (फा० न. ना.) पाय, तोंड इ० धुण्याचें पाणी सांडायाचें पात्र तें.
तस्मात् (सं. अव्य०) त्यास्तव.
तह (फा० पु. ना.) उभय शत्रूंचा परस्पर विरोध मिटून तुह्मी असें व आह्मी असें वर्त्तावें असा होतो जो नियम तो.
तहकूप, ब (अव्य०) तकूब.
तहशील,सील (अर० स्त्री. न. ना.) प्रजाकडे यावयाचें सरकारचें द्रव्य त्याचा वसूल करण्याचा व्यापार ती इ०.
तहान (स्त्री. ना.) तृषा.
तहांहयात (फा० अव्य०) कोणेक जिवंत आहे तोंपर्यंत.
तळ (सं. तैल) (पु. ना.) सैन्यादिक उतरलेलें स्थळ तो. २ सैन्यादिकांची कोणेक स्थळावर कांहींकाळ स्थिति ती. ३ व्यापारी लोकांच्या मालाच्या गाड्या उतरण्याची जागा तो.
तळघर (न. ना.) खालच्या मजल्याचे खालीं भूमींत मनुष्यादि राहायाजोगें जें स्थळ करितात तें.
तळणें (धा. ना.) तेल, तूप इ० कांत अग्नीच्या संयोगानें पदार्थ पक्क करणें. २ ऊन्ह इ० कानें संतप्त होणें.
तळतळ (स्त्री. ना.) क्रोधादिकानें अंतःकरणास संताप होतो ती.
तळतळणें (धा. ना.) कोणेकापासून आपला अपकार झाला असतां संतापून हातपाय आपटणें, त्यास शाप देणें इ० करणें. २ बालक इ० कानें अकस्मात् दुःख झाल्यामुळें मोठ्यानें ओरडणें.
तळतळाट ( पु. ना.)शाप. २संताप.
तळपट (न. ना.) कुलक्षय.
तळपणें (धा. ना.) (ग्रं०) भूषणादिकानें झळकणें. [कांचें मूळ.
तळबूड (स्त्री. ना.) (ग्रं०) वृक्षादि-
तळमळ (स्त्री. ना.) ज्वर, उष्णता इ० कांच्या संतापानें चैन न पडण्याजोगी अवस्था ती. २ तडफड.

**तळवट** (पु. ना.) कोणेक पदार्था-चा अधोभाग तो. [दाबणें.

**तळवटणें** (धा. ना.)(ग्रं०) दडपणें,

**तळवेमार** (पु. ना.) (ग्रं०) तापले-ल्या तव्यावर उभें करून मारण्याचा व्यापार तो. २ तेल इ० कांत तळून मारण्याचा व्यापार तो. ३ पर्वतादि कांचे तळीं लोटून मारण्याचा व्या-पार तो.

**तळाठी** (पु.ना.)गांवचा वसूल जमा करणारा कारकून तो. २ (स्त्री.ना.) कितीएक गांवचे वसूलबाकीचा उत्पन्न करण्याचा अधिकार ती.

**तळोंटपण** (न. ना.) (ग्रं०) नम्रता.

**ताईत** (अर० पु. ना.) सोनें, रुपें इ० धातूंचें अर्धचंद्रादि आकाराचें मुलाचे गळ्यांत घालावयाचें एक भूष-ण आहे. तो त्याचे गळ्यांतील ता-ईत आहे म्ह० त्यास अतिशयित प्रिय आहे. [सामर्थ्य.

**ताकत, द** (अर० स्त्री. ना.) शक्ति,

**ताकपिरें** (वि०) (ग्रं०) ताकपिणारें.

**ताका, तागा** (पु० ना.) सबंध जें वस्त्र, बनात इ० तो.

**ताकीत, द** (फा० स्त्री. ना.) असें केलें पाहिजे न केल्यास दंड इ० हो-ईल या प्रकारचें प्रजादिकांस राजा-दिकानें सांगणें ती.

**ताग** (पु. ना.) अंबाडीसारखें एक झाड आहे. २ त्याचा वाख तो.

**तांगडणें** (धा. ना.) पशु इ०कांस घट्ट बांधून टाकणें. २ कोणेकास कांहीं कामावर गुंतवून परतंत्र करणें

**तागडी** (स्त्री. ना.) एका दांडीस दोन परडीं बांधून वजन करण्यास जें साधन करितात ती. [रा. ३ ठिकाण.

**तागा** (पु. ना.) ताका. २ (ग्रं०) दो-

**तागाईत** (फा० अव्य०) इतकालप-र्यंत. २ (वि०) (ग्रं०) तगण्याजोगा.

**ताजवा** (पु. ना.) सोनें, रुपें इ० तो-लण्याचा कांटा तो. [डोला.

**ताजा** (फा० वि०)नवा. २ (अर०पु.)

**ताजाकलम** (फा० न. ना.) रोखा इ० किं० पत्र पुरें झाल्यावर विस्मर-णानें राहिलेला मजकूर मागून लि-हितात तें.

**ताजीम** (अर० स्त्री. ना.) अभ्युत्थान.

**ताजेघोड्याचीगोमाशी** (स्त्री. ना.) जोंपर्यंत कोणेकाजवळ संपत्ति इ० आहे तोंपर्यंत त्याचें आर्जव करणा-रा मनुष्य त्यास म्हणतात.

**ताट** (न. ना.) भोजन करणें इ० उ-पयोगी जें रुपें इ० धातूंचें उथळ पात्र करितात तें. २ फांशावांचून जी पुतळी तीस म्हणतात.

**तांट** (न. ना.) वरू, जोंधळा इ० कांचें कांड तें. [इ० ताठले जागें.

**ताटकळणें** (धा. ना.) शरीर, डोळे

**ताटी** (स्त्री. ना.) (ग्रं०) मूर्च्छा किं० समाधि. २ अनेक कांबटी एकत्र बांधून करितात भिंत, दार इ०कां-सारिखें आवरण ती.

**तांटूक** (न. ना.) लहान तांट.

**ताठ** (वि०) ज्यास लवचीकपणा नाहीं तो. २ शरीरानें बळकट तो. [पणा.

**ताठा** (पु० ना.) ताठपणा. २ उद्धट-

ताडणें (धा. ना.) काठी, चाबूक इ० कानीं कोणेकावर प्रहार करणें. २ काहीं परिमाण, हिशेब, भाषण इ० खरें खोटें कळण्यासाठीं दुसऱ्या प्रमाणाशीं लावून पाहणें. ३ काहीं एक गोष्ट अनुमानानें जाणणें.

तांडव (सं. न. ना.) अभिनयपूर्वक जें नृत्य तें. २ बीजरूप जी कोणेक गोष्ट तिचा जो विस्तार तें.

तांडा (पु. ना.) एका पाठीमागें एक स्थित असलेले किं० चाललेले एका जातीचे बैल इ० त्यांचा समुदाय तो.

ताडातोड, तोडी (स्त्री. ना. ) आई लेंकरूं, नवरा बायको, मित्र मित्र इ०कांचा परस्पर वियोग ती.

ताडातोडा (पु. ना.) टाणाटोणा.

ताडामोडा (पु. ना.) काहीं वस्तवानीं इ० पदार्थ मोडणें, विकणें इ० व्यापार तो.

ताडी (स्त्री. ना.) ताडाचे पोईपासून निघतो जो मद्योपयोगी द्रव तो.

तांडी (स्त्री. ना.) (ग्रं०) तांडा.

तांडेल (पु. ना.) गलबतावरील किं० लष्करांतील खलाशांतील जो मुख्य तो. २ बैलांवर माल नेत असतात त्या बैलांचे तांड्याचा लमाण इ० धनी तो.

ताण (पु. ना.) दोर, वस्त्र इ०कांस चहूंकडून ओढ बसल्यामुळें त्याच्याठायीं जो ताठपणा येतो तो. २ श्रमादि कारणामुळें शरीरादिकांस बसली जी ओढ ती.

ताणाताण (स्त्री. ना.) अनेक कार्यामुळें किं० बहुतांचें देणें इ० झाल्यामुळें जी कोणेकाची ओढाओढ ती.

तात (सं. पु. ना.) बाप.

तांतड, डी (स्त्री. ना.) काहीएक कार्याचा नेट लागल्यामुळें तें लवकर लवकर करावें असें वाटायाजोगी अवस्था ती. किं० तीमुळें अंगी येतो सत्वरपणा तो.

तांतडीतांतडी (अव्य०) (ग्रं०) लवकर लवकर.

तातपुरचा (अव्य०) त्याच हेतूनें.

तातवेळां (अव्य०) (ग्रं०) त्या उद्देशानें.

तात्पर्य (सं. न. ना.) अभिप्राय. २ भाषण, लेख इ० कांतील सारांश तो.

तांत्रिक (सं. वि०) उपासनामार्गप्रतिपादक तंत्र जाणणारा किं० त्या मार्गानें वर्तणारा तो. २ संक्षेपरूपानें करितात जें कांहीएक कर्म तें.

तात्विक (सं. वि०)प्रामाणिक. २(न.) तत्वज्ञ, सार.

ताथू (सं. अप. पु. ना.) (ग्रं०) तनु, [दोरा.

तादात्म्य (सं. न. ना.) उभय पदार्थांची जी परस्पर एकरूपता ते.

तांदूळ (सं. तंडुल) (पु. ना.) साळी, राळा इ०कांचे दाण्याचे आंत जो अंश असतो तो. २ तदाकार सोन्याचा मणि तो.

तादृश (सं. वि०) त्याप्रकारचा. २विशेषेंकरून गणायाजोगा नव्हे तो.

तान (स्त्री. ना.) गायनांतील रागाचा अलाफ ती. २ तृषा.

तान्हा (सं. स्तनंधय) (वि०) स्तनपान करणारें असें लहान मूल तो.

ताप (सं. पु. ना.) ज्वर. २ सूर्य, अग्नि इ० कांचेठायीं जी तप्तता असते ती.

तापट, ड (वि०) ज्यास लौकर राग येतो अशा स्वभावाचा तो. २ जो घोडा, बैल इ० पशु मंद नव्हे तो.

तापणें (अ. ना.) अग्नि, सूर्य, ज्वर, क्रोध इ० कांच्या योगानें शरीर इ० तापयुक्त होणें. २ मनुष्य, पित्त, क्षुधा इ०कांनीं मंदता सोडून प्रखर होणें.

तापता, फता (फा० पु. ना.) एक रेशमी वस्त्र आहे.

तापत्रय (सं. न. ना.) (ग्रं०) आध्यात्मिक, आधिभौतिक, आणि आधिदैविक या तिहींचा समुदाय तें. २ दरिद्रदशेस विशेषेंकरून ह्मणतात.

तापपोळी (स्त्री. ना.)(ग्रं०) शब्दादि विषयांस ह्मणतात.

तापस, सी (पु. ना.) तपस्वी.

ताफा (अर० पु. ना.) कळवंतीण, तिचे साजिंदे व वाद्यें यांचा समुदाय तो. २ सूर, सनई इ० कांसहित वाजंत्र्यांचा समुदाय तो. ३ वाजेस भोंपळे, घागरी इ० बांधून नदी इ० कांतून पलीकडे जाण्यास किं० कोणास नेण्यास साधन करितात तो.

तांब (स्त्री. ना.) लोखंडाच्या अंगीं जो मळ उत्पन्न होतो तो. २ कणकेंत गव्हांच्या सालीचा अंश तो.

ताबडतोप, ब (अव्य०) कांहीं अवकाश नकरितां.

ताबा (पु. ना.) (ग्रं०) समुदाय. २ अंकितपणा.

तांबूल (सं. न. ना.) विडा. [तांबडा.

ताम्र (सं. न. ना.) तांबें. २ (वि०)

ताम्रपट (सं. पु. ना.) राजादिकांनीं ब्राह्मणादिकांस जें भूमि इ० दान केलें असतें त्याचा जो लेख तांब्याच्या पत्र्यावर करून देतात तो.

तार (फा० स्त्री. ना.) धातु, रेशीम इ० कांचा तंतु ती. २ भांग, मद्य, संपत्ति इ० कांचा जो उन्माद ती. ३ (सं. ना.) हलक्या सुरांत खरज अलापून पुन: उंच जो अलापितात तो किं० तसा नाद तो. ४ तारायंत्रांतील बातमी ती. [एक दैत्य होता.

तारक (सं. वि०) तारणारा. २ (पु. ना.)

तारकशी, सी (वि०) धातूच्या तारांनीं विणून केलेला तो.

तारण (सं. न. ना.) तारण्याचा व्यापार तें किं० साधन तें. २ उदिमासाठीं कोणापासून कांहीं द्रव्य घ्यावयाचें असतां विश्वासार्थ जो त्याजवळ कांहीं माल ठेवितात तें.

तारतम्य (सं. न. ना.) क्रिया, जाति इ० कांच्या संबंधानें जें पदार्थांचेठायीं परस्पर एक जातीत असतें त्यांत जो गुणादिकृत भेद तें. २ पदार्थांतील गुणादिक जाणून तदनुरूप उपचारादि करण्याविषयीं जें बुद्धीच्याठायीं कौशल असतें तें.

तारंबळ (स्त्री. ना.) अनेक कार्यें एकसमयीं प्राप्त झाल्यामुळें किं० आपणास न झेपे असें देणें, घेणें, ओझें

इ० वारणें प्राप्त झाल्यामुळें कसेंक-रूं काय करूं म्हणून अंतःकरणास होत्ये जी व्यग्रता ती. २ खाण्या वि-ण्याविषयींची आबाळ ती.

तारवठणें (धा. ना.) भांग, अफू इ० कांच्या तारेनें किं० झोंप इ० कांच्या योगानें गुंगलें जाणें.

तारवटी (वि०) लांबचे बंदरापासून तारवावर आलेला माल तो.

तारसें (वि०) तारवठलेल्या डोळ्याचें मनुष्य तें किं० ज्याच्या डोळ्यापुढें तारा तारा येतात तें.

तारा (सं. स्त्री. ना.) चांदणी. २ बृ-हस्पति, वाळी, हरिश्चंद्र राजा यांच्या ज्या स्त्रिया त्या प्रत्येकीचें नांव. २ न-दी, खाडी, यांतील उथळी जागा.

तारांगण (सं. न. ना.) आकाश.

तारांबळ (स्त्री. ना.) तारंबळ.

तारीख (अर० स्त्री. ना.) यवनी, इं-ग्रेजी इ० महिन्याचा एकेक दिवस ती.

तारीफ (अर० स्त्री. ना.) कांहींएका पदार्थ इ० कांचें उत्कृष्टपणाचें वर्ण-न ती.

तारुण्य (सं. न. ना.) तरूणपणा.

तारूं (न. ना.) गलबत.

तार्किक्य (सं. न. ना.) तर्क.

ताल (सं. पु. ना.) टाळ. २ ताडाचा वृक्ष. ३ घराचा मजला.

तालीम (अर० स्त्री. ना.) गीत, नृ-त्य, मल्लयुद्ध इ० कांची शिक्षा, गुरू-पासून घेतात ती. २ तालीमखाना.

तालीमखाना (फा० पु. ना.) मल्लयु-द्ध, दांडपट्टा इ० शिकण्याकरितां जी शाला किं० घर बांधितात तो. २ एक औषधि आहे.

तालु (सं. न. ना.) मुखामध्यें वर-च्या भागीं एक अवयव आहे तें. २ (स्त्री.) टाळू.

तालुका (अर० पु. ना.) किल्ला किं० एकादा मोठा गांव मुख्यत्वेंकरून मानून त्याखालीं आसपासचे गांव धरून राज्यकारभारासाठीं जो दे-शविभाग कल्पिला असतो तो.

तालेवार (फा० वि०) दैववान्, संप-त्तिवान्.

ताव (सं. ताप) (पु. ना.) सुवर्णादि धातूंस अग्नींत तापविण्याचा व्यापार तो. २ तापविल्यानंतर जो वर्ण त्या-वर दिसतो तो. ३ कागदाचें सगळें पान तो. ४ सगळें भिंग तो. ताव देणें म्ह० कोणेकास दपटशा देणें किं० कोणेकाचें द्रव्य अंगच्या क-सबानें हरण करणें इ०.

तावडींतून (अव्य०) ताब्यांतून किं० कोणेकाच्या हातांतून.

तावणें (धा. ना.) तापवणें.

तावदान (फा० न. ना.) दार, खि-डकी इ० कांस वायु इ० कांचा प्रतिबंध होऊन प्रकाश पडावा म्ह-णून जें भिंग लावितात तें.

ताशा (अर० पु. ना.) एक चर्मवाद्य आहे. २ (वि०) खरडघाशा.

तास (अर० पु. ना.) अडीच घटकांचें कालमान तो. २ ज्याचे घटकेनें किं० अडीच घटकांनीं ठोके वाजवितात असें जें काशाचें वाद्य तो. ३ (सं. पु.)

नाम नांवाचा पक्षी तो. ४ (न.) नांगराने जमिनींत जी रेषा पडते ते. ५ नदीचें पात्र.

ताळ (सं. ताल) (पु. ना.) भरवंद.

ताळतंत (सं. ताल, तंतु) (पु. ना.) ताळ.

ताळा (सं. ताल) (पु. ना.) कोणेक गोष्टीचा खर्चपण, इ० दुसऱ्या प्रमाणानें ताडून पाहण्याचा व्यापार तो.

ताळी (स्त्री. ना.) टाळी. २ (ग्रं०) देहाची सत्यत्वबुद्धि ती.

ताळू (स्त्री. ना.) टाळू.

ताळेबंद (पु. ना.) खतावणी, रोजखरडा इ० कांवरून महिन्याचा किं० वर्षाचा झाडा लिहून ताळा पडण्याजोगा बंद तयार करितात तो.

ति (वि०) तीन. उ० तिमजला.

तिख (वि०) (ग्रं०) तीव्र.

तिखट (न. ना.) मिरचीचें स्वादासारिखा स्वाद तें. २ मिरच्या वाटून किं० कुटून जो पदार्थ करितात तें. ३ (वि०) तिखटस्वादानें युक्त तो. ४ दाहक, किं० छेदक शक्तीनें तीव्र तो इ०.

तिघई (स्त्री. ना.) तीन रस्ते ज्यास आहेत असें घर इ० ती.

तिघावणी,नी (स्त्री. ना.)(ग्रं०) काम, क्रोध, लोभ या तिहींचा समुदाय ती.

तिजा (वि०) (ग्रं०) तिसरा.

तिजाई (स्त्री. ना.) तिसरा अंश ती.

तिटकारा (पु. ना.) तिरस्कार, वीट.

तिडकी (स्त्री. ना.) ठिणगी.

तिडतीड (स्त्री. ना.) क्रोधाच्या आवेशानें अंतःकरणाची व्यग्रतारूप दशा ती. [पडते जी भेग ती.

तिडा (पु. ना.) दोरी इ० कांस

तिडीक (स्त्री. ना.) पोटसूळ, कपाळदुखी इ० कांच्या योगानें उदर, मस्तक इ० कांत जी दुखण्याची व्यथा उत्पन्न होते ती. २ कांहींएका कार्याची जी कळकळ ती.

तितिक्षा (सं. स्त्री. ना.)(ग्रं०) शीत, उष्ण इ० कांचें सहन ती.

तितुणें (धा. ना.) (ग्रं०) मागें जाणें.

तिथि (सं. स्त्री. ना.) महिन्याचा तिसावा भाग ती.

तिनसांज (स्त्री. ना.) प्रातःकाल, मध्यान्हकाल व सायंकाल यांतील तिसरा संधि तो.

तिंबणें (धा. ना.) कणीक भिजवून विशेष चिकट व मऊ होई अशी मळणें.

तिमिर (सं. न. ना.) अंधकार. २ नेत्रास अंधत्वासारिखा रोग होतो तें.

तिरकती,टी (वि०) तीन डोलकाठ्या ज्यास असतात असें गलबत तें.

तिरगीमिरगीवर (अव्य०) सर्वे भाषण इ० करीत असतां अरे तुरे किं० मारामारीवर येणें त्याचें वि०.

तिरंदाज (फा० वि०) तीर मारण्यांत कुशल तो.

तिरमिरी (स्त्री. ना.) मर्मस्थानीं कांहीं आघात होऊन किं० अग्नि, तिखट यांचा संयोग अ० पित्त इ०

कोर्ची उचल झाल्यामुळें जी मूर्च्छा येते ती. २ मस्तक झणझणण्याजोगी जी वेदना ती.

तिरवा (वि०) ज्यास समोरचा पदार्थ दिसत नाहीं असा डोळा किं० तशा डोळ्याचा मनुष्य किं० त्याचें तसें पाहणें तो.

तिरशिंगराव (पु. ना.) दुसऱ्याशीं मिळून राहूं नये आणि थोड्या कारणानें चिरडीस यावें असा मनुष्य तो, तिरसट.

तिरसट (वि०) तिरशिंगराव.

तिरस्कार (सं. पु. ना.) त्रास. २ कोणेकाचा तुच्छ बुद्धीनें अनादर तो.

तिरळा (वि०) तिरवा.

तिऱ्हाईत (पु. ना.) परस्परें दोघांनीं करायाचें जें कांहीं कार्य त्याचा संबंध ज्यास नाहीं असा जो तिसरा मनुष्य तो.

तिलक (सं. पु. ना.) टिळा. २ ज्या जातीत किं० वंशात जो श्रेष्ठ त्यास त्या त्या ठिकाणीं ह्मणतात. उ० रघुकुलतिलक.

तिवई (सं. त्रिपदी) (स्त्री. ना.) तीन पायांची घडवंची ती.

तिष्ठणें (धा. ना.) कोणेकानें कोणेकाची प्रतीक्षा करीत बसणें किं० स्तब्ध राहणें.

तिसमारखाँ (पु. ना.) या नांवाचा पूर्वी कोणी शूर मनुष्य होता, परंतु आतां अंगीं शूरत्व नसतां जो कोणी त्याचा आव घालितो त्यास ह्मणतात.

तिहींउणें, तिहींतिहींउणें (वि०) (ग्रं०) (त्रिगुण) त्रिविध. २ तिहींनीं युक्त. ३ तिहींनीं उणें तेंही.

तिहींचीखूण (स्त्री. ना.)(ग्रं०)गुरु, शास्त्र, आत्मप्रतीति यांची खूण ती.

तिळतीळ (वि०) थोडथोडा.

तिळप्राय (वि०) केवळ जें अल्पप्रमाण त्याणें परिमित तो.

तिळवण (स्त्री. ना.) नव्ये नवरीस नवऱ्याकडून पहिल्या मकरसंक्रांतीचीं वाणें वांटण्यास जो साडी, चोळी, तीळ इ० वाजत गाजत पाठविण्याचा समारंभ होतो तो.

तिळांजळी, जुळी (स्त्री. ना.) कोणेकाच्या मरणानंतर पाण्याबरोबर तीळ देण्याचें एक कर्म आहे तो.

तीज (स्त्री. ना.) तृतीया.

तीनवार (पु. ना.) तीन आठवडे.

तीर (फा० पु. ना.) धनुष्यानें मारायाचा बाण तो. २ (न.) समुद्र, नदी इ०कांचा कांठ किं० त्या कांठाकडील आसपासचा प्रदेश तें. ३ (पु) खाव इ० कास जो निरकस धिरा देतात तो.

तीर्थ (सं. न. ना.) ज्याच्या उदकानें स्नानादि केलें असतां पुण्य लागतें अशीं जीं भागीरथी इ० कांचीं जलें तीं प्र०. २शालग्रामादि पाषाण देव, गुरु, ब्राह्मण इ० कांचें पादोदक तें.

तीर्थराज (सं. पु. ना.) सद्गुरु. २ समुद्र. ३ प्रयाग.

तीर्थरूप (सं. पु. ना.) पिता. २ पत्र लिहितांना मातापितरांस ह्मणतात.

तीर्थस्वरूप (वि०) नात्यानें जे आप-

णास चुलता, चुलती आदिकरून वडील त्यांस कागदोपत्रीं लिहितात.
तीर्थाटन (सं. न. ना.) अनेक तीर्थयात्रा करीत फिरण्याचा व्यापार तें.
तीव्र (सं. वि०) प्रखर.
तीळ (सं. तिल) (पु. ना.) तेल निघणारें एक धान्य आहे तो. २ तदाकार मनुष्याचे अंगावर काळा ठिपका असतो तो.
तीक्ष्ण (सं. वि०) तिखट स्वादानें युक्त तो. २ ज्याची धार प्रखर असें शस्त्र तें. ३ ज्याची बुद्धि तीव्र असा मनुष्य तो.
तुई (स्त्री. ना.) दालीसारिखा जरीचा एक अरुंद पदार्थ आहे.
तुक (न. ना.) (ग्रं०) मनुष्यादिकाचे अंगचें महत्व तें. २ तोलवजन.
तुकडमोड्या (वि०) जो केवळ भोजनाचे मात्र उपयोगी असा आळशी मनुष्य तो.
तुकडा (पु. ना.) पदार्थमात्राचें शकल तो. २ पोळी, भाकरी इ० पदार्थ तो. कोणिकास कोणिक गोष्टीविषयीं तुकडा मोडून देणें म्ह० भीड न धरितां स्पष्ट उत्तर करणें.
तुकडी (स्त्री. ना.) सैन्य इ० काची टोळी. २ राज्यकारभाराचे व्यवस्थेसाठीं जो लहान जिल्ह्याप्रमाणें देशविभाग कल्पिला असतो ती.
तुकावणें (धा. ना.) मान उंच करून मागें पुढें होई अशी मनुष्य, सरडा, कोंबडा इ० कानीं हलविणें.
तकीं (अव्य०) (ग्रं०) तुळणेंत.
तुके (अव्य०) (ग्रं०) सारखें.
तुंगें (तुंग) (ग्रं०) (वि०) उंच.
तुच्छ (सं. वि०) ज्याच्यांत मान्यता येण्याजोगा तत्वांश नाहीं तो.
तुटक (वि०) ज्याचा संबंध बरोबर जुळत नाहीं असा जो ग्रंथ, भाषण इ० तो. २ मध्यें मध्यें खंडित झाला असा जो मार्ग, रेषा इ० तो. ३ दुसऱ्याचें मन जेणेंकरून तुटतें असें भाषण तें किं० तसें भाषण करण्याचा स्वभाव तो किं० तशा स्वभावाचा मनुष्य तो इ०. [तो. २ तुटक.
तुटका (वि०) तुटून छिन्न झालेला
तुटणें (धा. ना.) शस्त्रादिकांच्या तडाक्यानें किं० ताणण्यानें पदार्थ छिन्न होणें. २ ज्या प्रमाणानें युक्त जो पदार्थ त्याणें अल्प परिमाण होण्याजोगी न्यूनता पावणें इ०.
तुडवणें, तुडविणें, तुडिवणें (धा. ना.) कांहींएक पदार्थ पायांच्या आघातानें चुरे, मळे किं० त्याचा अंश पायांस चिकटे असा वर पाय देऊन करणें. कोणिकास लाता, बुक्क्या इ० कानीं तुडविणें म्ह० मारणें.
तुडुंब, तुडुंम (न. ना.) घोड्यावरील नगारा तें. २ (अव्य०) परिपूर्ण होई असें भरणें, फुगणें इ० कांचं वि०.
तुणणें (धा. ना.) फाटलेलें वस्त्र आंत सुंत भरून पहिल्यासारखें धड करणें.
तुती (अर० स्त्री. ना.) एक फळवृक्ष आहे.
तुतें (तुती) (न. ना.) तुतीचें फळ.
तुंद (वि०) (ग्रं०) जेवायास मिळालें

ह्म० पुन: भूक लागेपर्यंत ज्यास क-शाचीही अपेक्षा राहिली नाहीं असा जो पशूसारिखा मनुष्य तो. २ भांग, अफू इ० अमलांत गुंग तो. ३ द्र-व्यादि मदानें जो गर्विष्ठ तो.

तुंदिल (सं. वि०) दोंदील.

तुफान (अर० न. ना.) समुद्र परा-कष्टीचा खळबळावा, झाडें मोडावीं अशा प्रकारचा वायूचा क्षोभ होतो तें. २ कोणेकावर घेतलें जें कुभांड तें. ३ (वि०) क्षोभ पावलेला किं० अना-वर तो इ०.

तुंबडी (स्त्री. ना.) शरीरांतील रक्त किं० वायु काढायाचें नळीसारखें एक यंत्र आहे तें. २ गोसावी, बैरागी इ० कांचें एक भोपळ्याचें किं० लांकडाचें पात्र आहे तें इ०.

तुंबणें (धा. ना.) सतत चाललेला जो उदक, वायु इ० पदार्थ किं० निरंतर होणारें कांहींएक काम त्याच्या पुढील गतीचा रोध झाल्यामुळें त्यांनीं निरु-द्ध होऊन जमून राहाणें.

तुंबळ (सं. तुमुल) फार मोठा क-ज्जा, युद्ध इ० तें.

तुंबा (सं. पु. ना.) कडू पांढरा भोप-ळा किं० काष्ठ याचें जें मोठें पात्र करितात तो.

तुंबारा (पु. ना.) पाणी इ० तुंबून रा-हावें ह्मणून मोरी इ० कांचे छिद्रांत जो बोळा इ० घालितात तो. २ बो-ळा इ० कांच्या योगानें पाणी इ० कां-स तुंबून राहावयाजोगी अवस्था प्रा-प्त होते तो. [घोडा.

तुरग, तुरंग, तुरंगम (सं. पु. ना.)

तुरट (सं. तुवर) (वि०) तुरटी, सुपा-री इ० कांचे रसासारखा रस तो. २ (वि०) तशा रसानें युक्त तो.

तुरतूर (अव्य०) लवकर लवकर चा-लण्याचें वि०.

तुरपणें (धा. ना.) वस्त्राचा कांठ इ० दुमडून घेऊन शिवणें.

तुरंबणें (धा. ना.) ज्यास ज्या वस्तूची गरज लागली आहे ती त्यास न देतां खोळंबून धरणें. २ (ग्रं०) अंगावर कांहीं वस्तु धारण करणें.

तुरबंबाळ (पु. ना.) (ग्रं०) अनेक वाद्यादि ध्वनींचा मोठा शब्द तो.

तुरळक (अव्य०) कांहीं येथें व कांहीं तेथें अशाप्रकारें पाऊस पडणें, धान्य उगवणें इ० कांचें वि०.

तुरा (अर० पु. ना.) पागोटें इ० कां-स लावायाकरितां मोत्यें, फुलें इ० कांचें भूषण करितात तो. २ ऊंस, राजगिरा इ० कांस शेंड्यावर जो गुच्छ येतो तो. इ०.

तुरीय (सं. वि०) चौथा.

तुरीयावस्था (सं. स्त्री. ना.) जागृति, स्वप्न, सुषुप्ति या तिहीं अवस्थांहून वि-लक्षण चौथी अवस्था ती.

तुरुक, तुरूक (सं. तुरुष्क) (पु. ना.) घोडेस्वार. २ (ग्रं०) यवनास ह्मण-तात.

तुरुंग (पु. ना.) बंदीशाळा.

तुरुतुरू (अव्य०) पाऊल विशेष लांब पडूं नये परंतु त्वरेनें उचलित असावें अशा प्रकारें चालण्याचें वि०. २ मो-ठ्यानें नसून फार लवकर बोलणें त्या-

चें वि०, परंतु निंदाकरणें असतां प्र०.
तुरुत (अव्य०) एव्हां. २ तत्क्षणींच.
तुरें (न. ना.) (ग्रं०) एकप्रकारचें चर्मवाद्य आहे.
तुर्तातूर्त (अव्य०) तुरुत.
तुलगा (पु. ना.) (ग्रं०) वाद्याचा ध्वनि. २ प्रतिध्वनि तो.
तुलना, ळणा (सं. स्त्री. ना.) कांहीं पदार्थ तोलण्याचा व्यापार ती. २कोणी दोन पदार्थांची गुणादिकेंकरून समता ती.
तुला (सं. स्त्री. ना.) तागडी. २ आपल्या भारंभार सोनें इ० ब्राह्मणास देण्याचें कर्म आहे ती. ३ (ग्रं०) उपमा.
तुलीप (पु. ना.) (ग्रं०) पलंग.
तुल्य (सं. वि०) समान.
तुषात (पु. ना.) (ग्रं०) कोंडा.
तुषार (सं. पु. ना.) वायूच्या योगानें उडतात जे केवळ बारिक उदकाचे कण ते प्र०. २ दहिंवर.
तुसडा (वि०) तुटक स्वभावाचा तो.
तुळणें (धा. ना.) तोलणें, वजन करणें. २ कोणिक दोघांची समता करणें.
तूक (न. ना.) वजन. २ महत्व. ३ कवितेचा वाक्यरूप तुकडा.
तूट (स्त्री. ना.) इच्छित प्रमाणाशीं ज्याची न्यूनता येथे ती. २संतत चाललेल्या व्यापारांत खंड पडतो ती. ३ परस्पर स्नेही, मायलेंकरें, स्त्रीपुरुष यांत जो वियोग ती इ०.
तूण, तूणीर (सं. पु. ना.) तीर ठेवण्याचा भाता तो.
तूर (स. तुवरी) (स्त्री. ना.) एक धान्य आहे व तिचें झाड ती. २ दोन टोंकाचा खिळा ती.
तूर्त (सं. त्वरित) (अव्य०) तुरुत.
तृण (सं. न. ना.) गवत. २ केवळ तुच्छ जो मनुष्यादि त्यास म्हणतात. दातीं तृण धरणें म्ह० शूरत्वादिकाचा अभिमान सोडून दैन्य धारण करणें.
तृप्ति (सं. स्त्री. ना.) कोणेकाविषयीं पुरे पुरे अशी भावना ती.
तृषा (सं. स्त्री. ना.) पाणी पिण्याची इच्छा ती. २ कांहीं प्रिय वस्तूची उत्कंठा ती. [प्राप्तीची इच्छा ती.
तृष्णा (सं. स्त्री. ना.) कोणेक विषयाचे
तडतें (वि०)(ग्रं०) तसें, तेवढें, तितकें.
तेगा (अर० पु. ना.) तरवारींत एक भेद आहे. २ अभिमान, देशांत प्रसिद्ध.
तेज (सं. न. ना.) अंधकाराचा व शीताचा निरास जेणेंकरून होतो असा जो सूर्य, अग्नि इ०कांचेठायीं द्रव्यविशेष असतो तें. २ सर्व पदार्थ मात्रांत त्यात्याचे कार्यनिर्वाहाचा शक्तिविशेष तत्तास्वरूपेंकरून असतो तें. ३ विद्यादि गुण अंगीं असल्यामुळें जो अंगीं उत्कर्षविशेष राहतो तें इ०. [तेज आहे तो.
तेजःपुंज (सं. वि०) ज्याचे अंगीं बहुत
तेजस्वी (सं. वि०) ज्यांत बहुत तेज आहे असा पदार्थ तो.
तेधवां (अव्य०) (ग्रं०) ते हां.
तेरवां (अव्य०) परवाचे पुढील दिवशीं.

तेरीज (स्त्री. ना.) अनेक बेरजांची विशिष्ट एक बेरीज करण्याकरितां क्रमानें मांडल्या ज्या बेरजा त्या प्र०. २ (न. ना.) त्या बेरजांचें पत्रक तें.

तेरीमेरी (स्त्री. ना.) अरे तुरेचें भाषण ती. [नि आहे.

तेलमुंगी (स्त्री. ना.) मुंगीत एक जा-

तेवीं (अव्य०) (ग्रं०) त्याप्रकारें.

तेसणें (वि०) (ग्र०) तेवढें, तितकें.

तैं (अव्य०) तई.

तैजस (सं. वि०) तेजाचे संबंधाचा तो. २ (ग्रं०) जीव परंतु स्वप्नावस्थेचा अभिमानी तो.

तैनात (अर० स्त्री. ना.) सैन्यादिकांचा रोजमुरा ती.

तैल (सं. न. ना.) तेल.

तैलबुद्धि (सं. स्त्री. ना.) काहींएक विषयाचा यत्किंचित् अंश समजला असतां लागलीच त्या सर्व विषयास व्यापणारी जी बुद्धि ती. २ (वि०) तशा बुद्धीचा जो पुरुषादिक तो.

तैष (सं. पु. ना.) क्रोधाचा आवेश तो.

तैसा (वि०) (ग्रं०) तसा.

तों (अव्य०) तंव.

तोक (सं. न. ना.) अपत्य.

तोकडा (वि०) (ग्रं०) अँखूड.

तोख (अर० पु. ना.) कुत्रा इ०कांचे गळ्यांत जी लोखंड इ०कांची पट्टी बांधितात तो. २ (ग्रं०) तोष, संतोष.

तोटका, गा (पु. ना.) तोडगा.

तोटा (पु. ना.) काहींएक व्यवहारांत मूळ द्रव्याची होये जी हानि तो. किं० त्या व्यवहारांत जितका लाभ व्हावा असा संभव असतो त्यापेक्षां उणा होणें तो. २ इष्टप्रमाण पुरें न-व्हायाजोगी जी त्या त्या पदार्थाची न्यूनता तो. ३ कागदाची वळी करून तींत दारू खचून बंदुकेनें किं० येन्हवींच उडवायाकारितां जो पदार्थ करितात तो.

तोटी (स्त्री. ना.) कारंजें, झारी इ०कांस उदक इ०कांची बारीक धार पडावी झणून बारीक छिद्रांची नळी लाविली असते ती.

तोड (स्त्री. ना.) लाकूड इ० दुभंग करण्याकरितां त्यांत कुऱ्हाड इ०कानें जो छेद करितात ती. २ ज्याचें एक अंग चौरस केलें आहे असा जो पाषाण ती. ३ काहीं न होण्याजोगे कार्यास होण्याजोगी काढिली जी युक्ति ती. ४ देणें, घेणें इ० व्यवहाराचा उभयतांतून कोणावरही विशेष भार न पडतो जो उलगडा ती. ५ कोणेक पदार्थाशीं सारखेपणानें मानिला जो दुसरा पदार्थ तो त्याची.

तोंड (न. ना.) (सं. तुंड) जेणेंकरून खातां येतें व बोलतां येतें असा जो शरीराचा अवयव तें. २ हनुवटीपासून ललाटापर्यंत जो भाग तें.

तोंडओळख (स्त्री. ना.) परस्परें विशेष परिचय नसतां तोंड पाहतांच हा अमूक इतकें समजायाजोगी जी ओळख असते ती.

तोंडगा (पु. ना.) पिशाच, रोग यांचें निरसन व्हावें म्हणून जें कुवेडें करितात तो. २ देवी याव्या म्हणून हात इ० कास जो व्रण करितात तो.

तोंडघशीं (अव्य०) पडणें, देणें इ० कांच्या योगीं प्रयोग. जिना इ० कांपासून तोंड घांसे, फुटे असें पडणें. २ ज्या आश्रयाच्या बळानें कांहीएक व्यवहारीं कोणी प्रवृत्त झाला तो आश्रय नाहींसा झाल्यामुळें त्याणें फशीं पडणें.

तोंडचा,तोंडाचा (वि०) तोंडासमोरच्या गतीचा वारा इ० तो. २ लेखनविद्या इ० गुण अंगीं नसतां ते गुण असल्यासारखे शब्द मात्र ज्यास बोलतां येतात असा जो कारकून, शिपाई इ० तो. ३ ज्याच्यामध्यें लेखरूप साधन नाहीं असा जो कारभार इ० तो.

तोंडचा,तोंडाचाफटकाळ (वि०) अंतःकरणांत क्रोधादि नसतां सहज ज्याच्या तोंडांतून शिवी इ० दुर्भाषण निघत असतें अशा स्वभावाचा तो.

तोंडचाघांस (पु. ना.) ज्यापासून आपणास लाभ होत आहे असें वृत्ति, वतन इ० किं० पदरीं पडायास आलेला जो लाभ त्यास म्हणतात.

तोंडजोड (स्त्री. ना.) कांहींएक व्यवहार इच्छिल्याप्रमाणें चालावयाजोग्या ज्या बारिक मोठ्या युक्ति त्या.

तोंडदेखणा,देखला (वि०) आपल्या अंतःकरणांत तसा भाव नसतां दुसऱ्याचें मन राखावें म्हणून त्याचें मनासारिखें करितात जें भाषण, न्याय इ० तो.

तोंडपाठ (वि०) पुस्तकाचे आश्रयावांचून केवळ तोंडानें म्हणायाजोगा पाठ जो पद्य इ० तो.

तोंडपिटी (स्त्री. ना.) (ग्रं०) आपला मोठेपणा प्रगट व्हावा म्हणून जें गुरु इ० योर जनांशीं त्यास अडविण्याच्या प्रश्नांनी भाषण तो.

तोडर (पु. ना.) एक पादभूषण आहे.

तोडा (पु. ना.) हातांतील किं० पायांतील सुवर्णाचें किं० रुप्याचें एक भूषण आहे तो. २ प्रायः सहस्रपरिमित रुपये, मोहरा इ० नाणें आंत घालून बांधलेली पिशवी तो. ३ जामगी. ४ सुतळी इ० कांचा हात दोनहात जो तुकडा तो.

तोंडाळ (वि०) दुसऱ्यावर तोंड टाकण्याचा स्वभाव ज्याचा तो मनुष्य.

तोंडीलावणें (न. ना.) तोंडी लावायाकरितां केलें जें भाजी, चटणी इ० तें.

तोतया (पु. ना.) तो पदार्थ कोणीएक जण नसतां तदाकार जी त्याची त्याणें केली रचना तो.

तोतरा (वि०) बोलतांना अडखळून एकेक अक्षर दोन दोन तीन तीन वेळ ज्याचे भाषणांत येतें तो.

तोफ (स्त्री. ना.) आंत दारू भरून बार काढायाचें एक यंत्र आहे ती.

तोबत (स्त्री. ना.) तोहमत.

तोबरा (पु. ना.) घोड्यास दाणा चारायाकरितां कातडें, पडम इ० कांची जी पिशवी शिवतात तो. २ अति-

रिक्त काहीं आंत भरल्यामुळें किं० क्रोधादिकानें फुगविलें जें तोंड त्यास म्हणतात.

तोबा (पु. ना.) वस्त्रास पोळ घालून दोरीसारिखा कोणेकास माराव्याकरितां केला जो पदार्थ तो. [तुर्इ.

तोय (सं. न. ना.) उदक. २ (स्त्री.)

तोरण (सं. न. ना.) द्वार. २ उत्साहदिवशीं घर, मांडव इ० कांत द्वार इ० प्रदेशीं आम्रपल्लव, पुष्पें इ० एका दोरींत गुंफून शोभेसाठीं बांधितात तें. ३ नारळ, खोबऱ्याच्या वाट्या इ० कांचीं माळ देवादिकांवर बांधितात तें. ४ एक फळ आहे तें. ५ (स्त्री. ना.) त्याचें झाड ती.

तोरमली (स्त्री. ना.) पक्का झालेला नव्हे असा कोंवळा हिरा ती.

तोरा (पु. ना.) संपत्ति, सौंदर्य इ० कांचे अभिमानाचा जो अंगीं आविर्भाव दिसतो तो.

तोल (सं. तुल) (पु. न. ना.) तागडी इ० कानें तोलण्याचा व्यापार तो. २ त्या व्यापारानें समजतें जें पदार्थाचें मान तो. ३ कल इ०.

तोशीस (अर० स्त्री. ना.) राजा, चोर इ० कांचा जो उपद्रव ती.

तोहमत (अर० स्त्री. ना.) कोणी अपराध केला नसतां अपराध केल्याचा आरोप घेतो ती.

तोळंबा (पु. ना.) (ग्रं०) खांब ज्यात बसवितात तें उथळें तो.

त्याग (सं. पु. ना.) स्वीकारलेल्या पदार्थांचें जें विसर्जन तो किं० स्वीकार करण्याच्या प्रसंगीं जो अस्वीकार तो.

त्रहाटणें (धा. ना.) (ग्रं०) नौबत इ० मोठ्यानें वाजविणें. २ सैन्य इ० सिद्ध करणें.

त्रागा (पु. ना.) कोणेकाचे दारीं डोकें फोडून घेणें, उपास करीत बसणें असा व्यापार तो.

त्राण (सं. न. ना.) रक्षण. २ कांहींएक कार्याचा निर्वाह व्हायाजोगें शारीरादि शक्तीचें अवसान तें.

त्राता (सं. वि०) भय, संकट इ०कांपासून रक्षिता.

त्राय (न. ना.) (ग्रं०) रक्षण. १सत्ता.

त्रास (सं. पु. ना.) कंटाळा. २ सूर्य, अग्नि, दुर्जन इ० कांच्या संबंधानें जो होतो संताप तो किं० त्याचेठायीं संतापकारक शक्तिविशेष असतो तो. ३ भय.

त्राहटणें (धा. ना.) (ग्रं०) त्रहाटणें.

त्रिकांडवेद (सं. पु. ना.) (ग्रं०) कर्म, उपासना, ज्ञान, असे तीन भाग ज्यांत, असा वेद तो.

त्रिकाल, त्रिकाळ (सं. अव्य०) प्रातःकाल, मध्यान्हकाल आणि सायंकाल याचेठायीं किं० भूत, भविष्य, वर्तमान या तिहीं कालांचे ठायीं.

त्रिकुटी (स्त्री. ना.) (ग्रं०) चोरी, चहाडी, शिंदळकी या तिहींचा समुदाय ती.

त्रिकूट (सं. न. ना.) तीन शृंगांचा जो पर्वत तें. २ एक कार्य करणारे किं० एकमताचे तीन मनुष्यादिक तें.

३ (ग्रं०) इडा, पिंगला, व सुषुम्ना या तिहींचा जो समुदाय तें.

त्रिदाघ (स. त्रि, दाह)(पु. ना.)(ग्रं०) त्रिविध ताप.

त्रिदोष (सं. पु. ना.) कफ, वात, पित्त, या तिहींचा क्षोभ तो.

त्रिधातुक (सं. न. ना.)(ग्रं०) शरीर.

त्रिपदशोधन (सं. न. ना.) (ग्रं०) तत्पद, त्वंपद, असिपद या तिहीं पदांचें शोधन तें.

त्रिपाद (सं. पु. ना.) अग्नि.

त्रिपुटी (सं. स्त्री. ना.) ज्ञेय, ज्ञाता, ज्ञान हीं तीन किं० कर्त्ता, कर्म, क्रिया हीं तीन तीं.

त्रिभाग (सं. पु. ना.) (ग्रं०) चुना, वाळू, ताग हीं तीन मिळून तो.

त्रिभुवन (सं. न. ना.) स्वर्ग, मृत्यु, आणि पाताळ हे तीन लोक मिळून तें.

त्रिमात्रा (सं. स्त्री. ना.) (ग्रं०) अकार, उकार, मकार ह्या तीन.

त्रिवर्ग (सं. पु. ना.) तिघेजण ते. २ धर्म, अर्थ, आणि काम हे तीन मिळून तो.

त्रिवाचा (अव्य०) (ग्रं०) कांहींएक गोष्टीचे सत्यताचा किं० मिथ्यात्वाचा निश्चय सांगणें असतां तो तीन वेळां उच्चारून, सांगणें या धातूचे योगीं प्रयोग.

त्रिविधताप (सं. पु. ना.) अध्यात्म, अधिभूत, अधिदैव असा तीन प्रकारचा ताप तो.

त्रिशंकु (पु. ना.) (ग्रं०) काम, क्रोध आणि लोभ हे तीन मिळून तो.

त्रिशुद्धि (सं. अव्य०) (ग्रं०) त्रिपदशोधनेंकरून किं० तीनही प्रतीतींच्या प्रत्ययेंकरून. २ निश्चयेंकरून.

त्रेधा (सं. स्त्री. ना.) भयामुळें जो त्रास होतो तो किं० शक्तीपेक्षां मोठें काम पडल्यामुळें किं० एकदाच अनेक कार्यें करण्याचा प्रसंग पडल्यामुळें जी अवस्था होत्ये ती.

त्रैधर्म (सं. न. ना.) (ग्रं०) त्रिवर्ग.

त्रैलोक्य (सं. न. ना.) त्रिभुवन.

त्वचा (सं. स्त्री. ना.) शरीरावरील चर्म तें. २ वृक्षादिकांची साल.

त्वंपद (सं. न. ना.) (ग्रं०) त्वंपदार्थ.

त्वंपदार्थ (सं. पु. ना.) (ग्रं०) जीव.

त्वरा (सं. स्त्री. ना.) जलदी.

त्वरित (सं. अव्य०) तरेनें.

त्वरेंकरीं (अव्य०) (ग्रं०) त्वरित.

त्वष्टा (सं. पु. ना.) विश्वकर्मा.

---

## —थ—

थ— हें सत्रावें व्यंजन आहे.

थकणें (धा. ना.) कुंठित शक्ति होणें. व्यवहार, सावकारी इ० थकणें ह्मणजे पुढें चालिनाशीं होणें. पैका, बाकी इ० थकणें ह्म० उगवेनाशीं होणें इ०.

थक्क (वि०) आश्चर्यानें युक्त.

थट्टा (स्त्री. ना.) विनोदार्थ जी कोणाची चेष्टा ती. २ मानायाचें जें वचनादिक तें गणनेंत न आणितां त्याची उडवणी ती.

थड (सं. तट) (स्त्री. ना.) नदी इ०कांचें तीर ती. कामकाम थडीस लागणें ह्म० शेवटास लागणें.

**थंड** ( वि० ) उष्ण विकृतीनें विकारलें नव्हे जें उदक त्याचा जो स्पर्श किं० तज्जातीय इतरांचाही जो स्पर्श तो किं०तशा स्पर्शानें युक्त जें उदक इ० तें. २ काम, क्रोध, शोक इ० कृत जो आवेश किं० ज्यास त्वरा नाहीं असा मनुष्यादिक तो.

**थडक** (स्त्री. ना.) ठोकर.

**थडकणें** (धा. ना. ) सवेग पदार्थानें मध्यें प्रतिबंध आल्यामुळें वेग कुंठित होऊन पडणें.

**थंडगार** (वि०) अतिशयित थंड.

**थडगें** (न. ना.) मेलेलें मनुष्य ज्यास्थळीं जाळलें किं० पुरलें असतें तेथें जें चौथऱ्यासारखें बांधिलें असतें तें.

**थंडा** (वि०) ज्याचे प्रकृतीस त्वरा नाहीं किं० एकाएकीं काम क्रोधादिकांचा आवेश येत नाहीं असा स्वभाव ज्याचा तो. २ मैथुनशक्तीस कमी पुरुष तो.

**थंडी** (स्त्री. ना.) जल, वायु इ०कांचे अंगीं दुःसह जो शीतस्पर्श असतो; ज्याचा हेमंतादि ऋतुमाहात्म्यानें अतिशय होत असतो ती. २ थंड औषधादिकांच्या योगानें शरीरांत जो उष्णतेचा प्रतिपक्षी गुणविशेष उत्पन्न होतो ती व औषधाच्या ठायीं तदुत्पादक गुणविशेष असतो ती.

**थंडें** (न. ना.) थडगें.

**थबकणें** (धा. ना.) काहींएक कार्य करीत असतां मध्यें अकस्मात् भय इ० वाटल्यामुळें चकित होऊन किंचित् स्तब्धता पावणें.

**थबथबणें** (धा. ना.) थबथब आतून उदकादि बिंदु गळत असें वस्त्र, शरीर इ० होणें किं० वस्त्रादिकांतून उदकादि थबथब गळणें.

**थर** (पु. ना.) भिंत, बांध, जोतें इ० कर्तव्य असतां पर्यायापर्यायानीं दगड, विटा इ०कांचे केलें जे सन्निवेश ते प्रत्येकीं किं० लिंपायाचें असतां पर्यायापर्यायानीं केले जे लेप ते प्र०.

**थरकणें** (धा. ना.) अकस्मात् भय झाल्यामुळें कंप, रोमांच होत अशा दशेतें पावणें.

**थरकांप** (पु. ना.) भयानें रोमांचसहित जो कंपातिशय तो.

**थरत** (अव्य०) कंप व्हावयाजोगें कांप, भी यांचें वि०.

**थरथर** (अव्य०) वारंवार शरीरीं कंप किं० रोमांच येत असें कांपणें, भिणें यांचें वि०.

**थरथरां** (अव्य०) थरथर.

**थरारां** (अव्य०) थरथरां.

**थवणें** (धा. ना.) (ग्रं०) निरोगी होणें. २ बळावणें.

**थवा** (पु. ना.) एकत्र असलेला एकजातीय जीवांचा समुदाय तो.

**थळ** (सं. स्थल) (न. ना.) ज्या जागेंत ऊंस लावितात ती जागा तें, शेत.

**थळभरीत** (न. ना.) कोणेक स्थळीं माल भरण्याचा व्यापार तें.

**थळमोड** (स्त्री. ना.) कोणेक स्थळीं भरून आणलेला माल विकण्याचा व्यापार ती. [पात्र.

**थळींव** (सं. स्थाली) (न. ना.)(ग्रं०)

थाऊ (वि०) (ग्रं०) स्पष्ट, प्रांजळ.
थाक (पु. ना.) (ग्रं०) थांग.
थांग (पु. ना.) ठाव.
थाट (पु. ना.) आंत उणेपणा किं० अव्यवस्थितपणा न दिसायाजोगा सैन्यादिकांचा यथायोग्य रचनेचा जो प्रकार तो.
थाटणें (धा. ना.) थाट दिसायाजोग्या प्रकारानें संसार, कारभार इ० व्यवहार चालविणें, किं० सैन्यादिक थाट दिसायाजोग्या रचनेनें विशिष्ट करणें.
थाटमाट (पु. ना.) थाट दिसायाजोगी वस्त्र, भूषण किं० सैन्य, सभा इ०कांची मांडणी तो.
थाटी (स्त्री. ना.) (ग्रं०) फांस.
थातंबणें (धा. ना.) (ग्रं०) निसरणें.
थान (सं. अप. न. ना.) स्तन.
थाप (स्त्री. ना.) मृदंग इ०कांवर शब्द होण्यासाठीं सर्व तळहाताचा प्रहार तो. २ समुद्रादिकांचे लाटांचा नौकादिकांवर जो प्रहार तो. ३ दुसऱ्यानें आपणास मानावें वरचढ होऊं नये असा जो आपला त्यांजवर वरिष्ठताविशेष असतो तो. ४ भूलथाप.
थापट (स्त्री. ना.) तळहाताचा जो प्रहार तो. [जी गोंवरी ती.
थापटी (स्त्री. ना.) थापट. २ लहान
थापडवाईक (वि०) बदलून गोष्ट सांगायाजोगें ज्यामध्यें पाणी नाहीं असा जो साधारण मनुष्यादि तो.
थांबणें (धा. ना.) मनांत आणलेलें किं० आरंभिलेलें कांहीं कार्य त्यापासून कांहीं काल विरत होणें किं० त्या कार्यानें कांहीं काल विरत होणें.
थाय (पु. ना.) (ग्रं०) अहंकार.
थाया (पु. ना.) (ग्रं०) छंद.
थार (सं. स्थान) (पु. ना.) कोणेकास स्थिर होऊन राहाण्यास आश्रय तो. २ कांहीं व्यवहार करावयास सोयीचा जो आधार तो. ३ तात्कलंत.
थारणें (धा. ना.) (ग्रं०) स्थिरावणें.
थारळें (न. ना.) आंत अग्नि घालून दूध इ० तापवावें ह्मणून जी खळी केली असते तें. [धार.
थारा (थारा) (पु. ना.) आश्रय, आ-
थारेपालट (पु. ना.) दुखणाईतास गुण पडावा ह्मणून जें स्थळांतर करितात तो.
थारोळें (न. ना.) थारळें.
थालणें (धा. ना.) (ग्रं०) प्रकाशणें.
थाली (सं. स्थाली) (स्त्री. ना.) स्वयंपाकाचें पितळी इ० पात्र ती.
थाव (पु. ना.) (ग्रं०) थांग. २ बळ.
थावणें (धा. ना.) (ग्रं०) स्थिरावणें. २ बळावणें.
थावरणें (धा. ना.) (ग्रं०) स्थिरावणें. २ संभाळणें. [धिक्य.
थावा (पु. ना.) (ग्रं०) बळ. २ आ-
थावें (न. ना.) (ग्रं०) रंग.
थाळ (स्त्री. ना.) स्वयंपाकादि करायाकरितां चुलीचे अभावीं गोंवऱ्या रचून अग्नि करितात ती.
थाळा (सं. स्थाली) (पु. ना.) पीठ

मळ्याचे उपयोगी धातुमय पात्र असतें तो. शूद्रभाषित.

थाळी (स्त्री. ना.) लहान थाळा तो.

थिकणें (धा. ना.) (ग्रं०) चरफडणें.

थिकुलें (वि०)(ग्रं०)थोडें. २ लाहान.

थिजणें (धा. ना.) तूप इ० पातळ पदार्थ थंडीच्या योगानें घट्ट होणें. २ नेत्रांनीं मरणसमय जवळ आल्यामुळें अचेतन होऊन स्तब्धता पावणें. ३ कांहींएक रसाच्याठायीं मनुष्यादिकानें तल्लीन होऊन स्तब्धता पावणें.

थिजें (अव्य०) (ग्रं०) सांप्रत.

थिटा (वि०) (ग्रं०) अंखूड. २अरूंद.

थिता (वि०)(ग्रं०) वायां. २असणारें.

थिल्लर (सं. न. ना.) (ग्रं०) सामान्य उदकाचें डबकें तें.

थुंकणें,थुकणें (धा. ना.) मुखांतील द्रव बाहेर टाकणें. [नुकरण.

थू (अव्य०) थुंकण्याच्या शब्दाचें अ-

थूथू (स्त्री. ना.) छिथू.

थूळ (सं. स्थूल) (वि०) सूक्ष्म नव्हे तें.

थेकुटें (वि०) (ग्रं०) लाहान. २ अंखूड. ३ नीच.

थेकुलें (वि०) (ग्रं०) थेकुटें.

थेट (वि०) दुसऱ्या देशादिकांचा संबंध ज्यास नाहीं असा तो. उ०चांगली खडीसाखर थेट कालपीस मिळते.

थेंब (पु. ना.) जलादिकांचा बिंदु तो. २ (ग्रं०) प्रळयकाळचा मेघ त्यास म्हणतात. [रडो.

थेरडा (सं. स्थविर) (वि०) म्हाता-

थैथय्या,थैथयाट (पु. ना.) वेश्यादिकांची नृत्यरूप जी क्रीडा तो. २कांहीं वेदना सोसवेनाशी झाल्यामुळें गडबडा लोळणें, ओरडणें इ० जो व्यापार त्यास म्हणतात. [शर्दा.

थैला (पु. ना.) पोतें किं० मोठी पि-

थैली (स्त्री. ना.) लहान पोतें किं० पिशवी.

थोक (वि०) ठोक.

थोकडें (वि०)(ग्रं०) लाहान. २अंखूड.

थोकणें (धा. ना.) (ग्रं०) थांबणें.

थोकलें (वि०) (ग्रं०) थोकडें.

थोट,थोंट (वि०) खोटें बोलणें व कुभांड रचणें इ० गुणयुक्त तो.

थोंटण (न. ना.) हात, पाय यांचे पंजे किं० वृक्षादिकांच्या फांद्या यांचे शेंडे झडल्यानें किं० कापल्यानें जो मागें बोडका अवयव राहातो तें.

थोटा,थोंटा (वि०) ज्याचे हात, पाय इ० कांचीं थोटणें झालीं आहेत असा जो मनुष्य, वृक्ष इ० तो किं० तो हात, पाय तो.

थोटावणें (धा. ना.) (ग्रं०) स्तब्ध होणें. २ निर्बळ होणें.

थोडाबहुत (वि०) अल्पस्वल्प.

थोतांड (न. ना.) कांहीं मूळ प्रमाण नसतां लबाडीचे कल्पनेनें मूळ आहेशीं दिसण्याजोगी रचली जी गोष्ट तें.

थोबाड (न. ना.) गालफड.

थोर (सं. स्थविर) (वि०) आकार, वय किं० विद्या, मूल्य, अधिकार इ० संमाननीय जो गुण तेणेंकरून जो

अधिक किं० ज्याचे अंगीं हलकेपणा नाहीं असा जो प्रौढ, दिलदार तो.

---

—द—

द—हा वर्ण अठरावें व्यंजन आहे. (स. वि०) संस्कृत शब्दमात्रापुढें याचा योग होतो आणि तसा योग झाला असतां त्या त्या अर्थातें देणारा असा अर्थ होतो. उ० सुखातें देणारा तो सुखद, दुःखातें देणारा तो दुःखद इ०.

दंग (वि०) इष्ट विषयलाभ झाल्यापासून जो संतोष किं० कांहीं चमत्कार पाहिल्यापासून जो विस्मय त्यांत ज्याची अंतःकरणवृत्ति निमग्न झाली आहे तो.

दगड (पु. ना.) शस्त्रावांचून सामान्य उपायानें जो फुटत नाहीं, जलानें विरत नाहीं अशी पृथ्वीचे शरीरांत अवयवभूत पदार्थजाति आहे तो. २ मूर्ख किं० करुणादि रसानें ज्याचें चित्त द्रवत नाहीं त्यास म्हणतात.

दगदग (स्त्री. ना.) अनेक कार्यें एक समयीं करण्याचा प्रसंग किं० अनेकांचें देणें इ० कारणामुळें कंटाळा यावयाजोगा जो परिश्रम होतो ती.

दंगल (पु. ना.) अनेक गवई व पखवाजी एकत्र मिळून जो गायनाचा समारंभ करितात तो. २ धांगडधिंगा.

दगा (फा० पु. ना.) ज्याविषयीं आपण ज्या भरंवशानें राहतों त्या भरंवशाचा घात होऊन आपली फसगत व्हावयाजोगें जें कोणेकाचें प्रतिकूल वर्तन किं० तेणेंकरून होणारी जी हानि तो.

दंगा (पु. ना.) देशादिकांतील सर्व मनुष्यादिकांची धांवाधांव, पळापळ व्हावयाजोगा जो गनीम, पेंढारी इ० कृत उपद्रव तो.

दंगाधोपा (पु. ना.) दंगा इ०.

दगाफटका (पु. ना.) दगा इ०.

दग्ध (सं. वि०) जळाला तो.

दग्धहस्ती (सं. वि०) ज्याच्या हाताखालीं राहिलेल्या चाकर, शिष्य इ० कांचें कल्याण होऊंनये अशा दैवयोगाचा जो मनुष्य तो. २ ज्याचे हातून अन्न, द्रव्य इ० कांस पुरवठा येत नाहीं असा जो मनुष्य तो.

दचक (स्त्री. ना.) भयानें शरीरादिकांस जो धाचका बसतो ती.

दचका (पु. ना.) दचक.

दटावणें (धा. ना.) मारण्यावांचून दुसरा दबे असा शब्दव्यापार करणें.

दट्टा (पु. ना.) दौत इ० कांतील शाई इ० पदार्थ बाहेर न पडावा म्हणून जो त्यांचे छिद्रांत बूच मारितात तो. २ दुसऱ्याचा पाणउतारा व्हावयाजोगा शिव्या इ० उग्रभाषणाचा मार तो.

दंड (सं. पु. ना.) गमन इ० समयीं हातीं धरावयाजोगा वेळू इ० कांचे काठीचा तुकडा तो. २ कोंपरापासून हाताचा वरचा भाग तो. ३ शासन. ४ अपराधापासून शासनार्थ द्रव्य घेतात तो. ५ धोतर, लुगडें इ० जुन्या वस्त्राचे दोन तुकडे एकत्र करावया-

साठीं एकप्रकारची शिवण घालितात तो. ६ दांडगा जो मनुष्य तो. ७ जोर इ०.

**दंडक** (सं. पु. ना.) संप्रदाय. [ख्याख्या.

**दंडगी** (स्त्री. ना.) (ग्रं० ) अग्नीची

**दडणें** (धा. ना.) कोणेकाचे दृष्टीस न पडावें म्हणून अंतर्धानादिकानें गुप्तरूपें राहाणें.

**दंडणें** (धा. ना.) अपराधी इ० कास ताडन, द्रव्यापहार इ० द्वारा शिक्षा करणें. २ प्रायश्चित्त,तीर्थयात्रा इ०कानीं शरीर, अंतःकरण इ० दमनाविशिष्ट करणें.

**दंडन** (सं. न. ना.) दंडण्याचा जो व्यापार तें व त्यापासून झालेला देहविकास संस्कारविशेष तें.

**दडपण** (न. ना.) चेपण. २ दुर्निर्वह कार्याचें ओझें तें.

**दडपणें** (धा. ना.) कांहींएक पदार्थाचे भाराखालीं दुसरा पदार्थ चेपून बसे असें करणें. २ आपल्या वर्चस्वानें वादादिकांच्या योगें कोणी कोणास निकृष्टता पाववणें.

**दंडवत** (सं. दंड) (न. ना.) दंडासारिखें साष्टांग नमन तें.

**दडस** (वि०) जाड व घट्ट वस्त्र इ० तें.

**दंडळणें** (धा. ना) (ग्रं०) डळमळणें. २ भयानें कांपणें व घाबरें होणें.

**दडा** (पु. ना.) नाक, कान, इ०कांचे छिद्रांत प्रतिबंधक बसतो जो मळ इ० तो.

**दडी** (स्त्री. ना.) कोणेकाचे दृष्टीस न पडावें म्हणून गुप्तरूपानें स्थिति ती.

**दंडेल** (वि०) न्यायानें द्यावें, घ्यावें असें जें प्राप्त झालें तें न करितां मुरव्हीतपणा सोडून कज्जा सांगावा इ०रूप स्वभाव ज्याचा तो.

**दणका** (पु. ना.) दणशब्द व्हावया-जोगा मुष्टि, मुसळ इ० कांचा प्रहार तो. २ अनेक वाद्यादि ध्वनींचा कडाका तो. ३ अधिक द्रव्यादि लावून सर्वत्र प्रसिद्धि व्हावयाजोगा जो विवाहादि प्रयोजनाचा समारंभ करितात तो.

**दणगट,कट** (वि०) स्थूळ असून बळकट किं० ज्यामध्यें नाजूकपणा नाहीं असा वस्त्र, शरीर इ० पदार्थ तो.

**दणदणणें** (धा. ना.) तोफ, नगारा इ० कानीं मोठ्यानें वाजणें किं०त्याचे प्रतिध्वनीनें ग्राम, गुहा इ० कानीं युक्त होणें. २ झपाट्यानें चालल्यामुळें मार्ग इ० कानीं हदरणें इ०.

**दंत** (सं. पु. ना.) चावायास साधनभूत जीं प्राणिमात्राचे मुखांत दृश्य हाडें असतात तीं.

**दंतकथा** (सं. स्त्री. ना.) ज्या वृत्तांताविषयीं शास्त्र, पुराणादिरूप प्रमाण नाहीं अशा ज्या कथा त्या प्र०.

**दंती** (सं. पु. ना.) हत्ती.

**दत्त** (सं. वि०) दिलेला. २ दत्तक. ३ (पु. ना.) एक ईश्वराचा अवतार आहे तो.

**दत्तक** (सं. वि०) निपुत्रिकानें विधिपूर्वक पुत्रत्वेंकरून घेतला जो दुसऱ्याचा पुत्र तो. [तिभाव.

**दंद** (सं. द्वंद्व) (न. ना.) (ग्रं०) द्वै-

दंदशूक (सं. पु. ना.) (ग्रं०) सर्प.

ददात,धात (स्त्री. ना.) अन्नवस्त्रादिक जे जितके पदार्थ उपयोगार्थ पाहिजेत ते तितके न मिळत असी जी आपत्ति ती.

दंदिया (पु. ना.) (ग्रं०) योद्धा.

दपटणें (धा. ना.) छिद्रांत कांहीं पदार्थ बळ्यानें भरणें. २ बलात्कारानें मनुष्य, पशु इ० कांस कांहीं कामास लावणें. ३ पदार्थाचे धन्यास न गणितां पदार्थ बलात्कारानें उपभोगणें इ०.

दपटशा (पु. ना.) पाणउतारा होण्याजोगा निर्भिडपणानें दुसऱ्यास बोलण्याचा प्रकार तो.

दपटून (अव्य०) रगडून.

दंपत्य (सं. न. ना.) स्त्री आणि तिचा पति तें.

दप्तर (न. ना.) दफ्तर.

दफ्तर (अर० न. ना.) लिहिण्याच्या साहित्यासुद्धां जो लिहिलेल्या कागदांचा समुदाय तें. २ राजकीय कागदपत्र लिहिण्याचें व ठेवण्याचें स्थळ तें.

दबकणें (धा. ना.) भय किं० लज्जा यामुळें कांहीं आरंभिलेल्या व्यापारांत स्तब्ध होणें. २ वर भार पडल्यामुळें काष्ठादिक कांहीं नम्र होणें. ३ मनुष्यादिक कांहीं शिक्षा पावल्यामुळें कांहीं नम्र होणें.

दबणें (धा. ना.) दबकणें.

दबदबा (अर० पु. ना.) कोणेकास हा कोणेवेळेस काय करील इ० कोणेकाचें भय असतें तो.

दबावणें (धा. ना.) क्रोधादि आकारप्रदर्शनपूर्वक भाषणव्यापारानें दुसऱ्यास दबविणें.

दबेल (वि०) जो ज्याचे दबविल्यानें दबला जातो तो त्याचा.

दंभ (सं. पु. ना.) ढंभ, ढोंग.

दम (फा० पु. ना.) श्वासोच्छ्वासरूपानें संचार करणारा जो प्राणवायु तो. २ कफादिकामुळें गतींविषयीं प्रमाणाहून होतो जो अधिक श्वास तो. ३ कांहीं पदार्थाचे तत्वांशास धरून अवष्टंभरूपानें असतो जो वायु तो. ४ बाहेर टाकलेला वायु आंत न घेतां किं० आंत घेतलेला बाहेर न टाकितां कांहींकाल राहाण्याची शक्ति तो. ५ अवसान. ६ (सं.) इंद्रियनिग्रह तो.

दमट (वि०) किंचित् ओलेपणा ज्यांत आहे असें जें वस्त्र, काष्ठ इ० तें.

दमणें (धा. ना.) थकणें.

दमदमीत (वि०) घमघमीत. २ लवकर भूक न लागायाजोगें भरलेलें पोट तें.

दमदार (वि०) ज्या भूय इ० पदार्थांत ओलसरपणा टिकण्यास कारणभूत जो दम असतो तो. २ एकाएकीं अवसान सोडीत नाहीं किं० उतावळा होत नाहीं असा तो.

दमन (सं. न. ना.) इंद्रियें, शत्रु इ० दमण्यास साधनभूत जो व्यापार तें. २ त्याचा जो दमलेपणा तें.

दमा (फा० पु. ना.) श्वासरोग तो.

दमामा (फा० पु. ना.) मोठा नगारा.

दया (सं. स्त्री. ना.) कृपा.
दयालु, ळु (सं. वि०) कृपाळु.
दयित (सं. वि०) (ग्रं०) प्रिय.
दर (पु. ना.) भाव किं० निरख. २ (स. न.) भय. ३ (अव्य०) प्रत्ये- की. उ० दरगाईस, दर मनुष्यास इ०.
दरड (स्त्री. ना.) नदीतीर, पर्वत इ० स्थळीं तुटलेली जी भूमि असते ती.
दरद (पु. स्त्री. ना.) दर्द.
दरदाम (पु. ना.) विकत घ्यावयाचे पदार्थाचे दराप्रमाणें मोलाची इयत्ता ती.
दरमाहा (फा० अव्य०) प्रतिमासीं. २ (पु. ना.) कारकून, शिपाई इ० कास प्रतिमासीं द्यावयाचें वेतन तें.
दरवडा (पु. ना.) चोरांनीं घरांत शिरून घरधन्यास न गणितां बला- त्कारानें घर लुटण्याचा जो प्रकार तो. २ त्या चोरांचा जो समुदाय तो.
दरवाजा (पु. ना.) दर्वाजा.
दरा (सं. पु. ना.) पर्वतादिकांच्या म- धला खोलगट प्रदेश तो.
दरारा (पु. ना.) कोणेकास कोणेका- चें असतें भय तें.
दरिद्र (सं. न. ना.) अन्न वस्त्र इ० आवश्यक पदार्थांची दुर्लभता तें. २ तन्मूलक जी आपत्ति ३ (सं. वि०) दरिद्री.
दरिद्री (सं. वि०) ज्यास दरिद्र आहे तो. २ जो उदार नव्हे व ज्याला नीच पदार्थ आवडतें असा कृपण- स्वभावाचा जो मनुष्यादिक त्यास ह्मणतात.
दरी (सं. स्त्री. ना.) दरा.
दरेमार (पु. ना.) (ग्रं०) पर्वतादि- कांच्या दरींत लोटून मारण्याचा प्र- कार तो.
दरोगा (फा० पु. ना.) राजादिकांनीं कांहींएक कामावर नेमलेले मनुष्यां- ची देखरेख करण्यासाठीं ठेविला अ- सतो जो मनुष्य तो.
दरोडा (पु. ना.) दरवडा.
दरोबस्त (फा० वि०) झाडून सर्व.
दर्कार (फा० पु. स्त्री. ना.) सापेक्ष- ता, गरज.
दर्खास्त (फा० स्त्री. ना.) सरकारास [लिखी अर्ज ती.
दर्द (फा० पु. स्त्री. ना.) शरीरांती- ल रोगांची कसर ती तो. २ कोणेक विषयांतलि गुप्त जें मर्म तें. ३ का- ळजी.
दर्दी (फा० वि०) ज्या कामाची जो काळजी बाळगितो तो त्याविषयीं, २ ज्या विषयांत जो मर्मज्ञ तो त्या- विषयीं.
दर्प (सं. पु. ना.) गर्व. २ उग्र असून अतिशयित जो गंध तो. ३ तेजादि वर्चस्वामुळें लोकांनीं भ्यावें असा जो कोणेकाचा कोणेकावर दाब असतो तो.
दर्पण (सं. न. ना.) आरसा.
दर्बार (फा० पु. ना.) राजकीय का- रभार करण्याची जागा. २ राजकीय कारभारी मंडळी.
दर्भदिवी (स्त्री. ना.)(ग्रं०) चंद्रज्योत.
दर्या (फा० स्त्री. पु. ना.) समुद्र.
दर्याफत, फती (फा० स्त्री. ना.) का-

हीं एक विवादाचा सिद्धांत करण्याचा राजसभा इ० स्थळीं जो विचार तो. [वरील खलाशी.

दर्यावर्दी (दर्या) (पु. ना.) तारवा-

दर्वाजा (फा० पु. ना.) घर इ० कांत मनुष्यादिकांस शिरण्यास भिंत इ० कामध्यें जो अवच्छेद ठेविला असतो तो. २ तो बंद करायासाठीं त्या बेताच्या फळ्या इ० तेथें असते तो.

दर्वेशी (फा० पु. ना.) व्याघ्रादिक आरण्यपशु धरून त्यांस लोकांचे दारोदार फिरवून उपजीविका करितो तो.

दर्शन (सं. न. ना.) अवलोकन.

दर्शनी (वि०) आंत गुण नसून पाहाण्यांत मात्र चांगला दिसतो तो. २ घर इ० कांचें लोकांचे दिसण्यांत यावयाजोगें बाहेरचें अंग तो.

दर्शनीहुंडी (स्त्री. ना.) हुंडीपत्र पाहतांच धन्याचे पदरीं द्रव्य पालावें अशा संकेताची हुंडी ती.

दल, दळ (सं. न. ना.) पान. २ द्वितीयांश. ३ (ग्रं०) सैन्य.

दलणें (धा. ना.) (ग्रं०) द्वेषकरणें.

दलदल (स्त्री. ना.) आंत गेलें असतां रुतून जावें असा जलसंयोगामुळें भूमीस जो शिथिलपणा येऊन चिखल झाला असतो ती.

दलभार (पु. ना.) सैन्याचा समुदाय.

दलामालकी (स्त्री. ना.) आपलें कांहीं आंत हित नसतां उगीच आपलें काम सोडून लोकांचे कारभाराची दवळादवळ ती. २ अनेकप्रकारची कंटाळा यावयाजोगी खटपट ती.

दलाल (अर० पु. ना.) जिन्नस घेणारा व देणारा या उभयतांचा व्यवहार मध्यस्थपणें बोलीचालीनें साधून देतो तो.

दलाली (दलाल) (स्त्री. ना.) दलालाचें कर्म ती व दलाली केल्यामुळें त्यास ग्राहिकादिक द्रव्य देतात ती.

दंव (न. ना.) उदकरूप जो हिमाचा तुषार तें.

दवडणें (धा. ना.) घोडा इ० तरेनें चालविणें. २ सेवकादिक आपलेपासून स्थळांतरीं जाई असा करणें. ३ गमावणें. ४ निरास करणें.

दंवडी (स्त्री. ना.) डांगोरा.

दवा (अर० स्त्री. ना.) औषध.

दवासन (न. ना.) घोड्याचे गळ्यांतील दोहोंकडे बांधायाचें चऱ्हाट तें.

दंश (सं. पु. ना.) डंख. २ डांस. ३ ग्रंथांतील कठीण अंश तो. ४ गूढ अभिप्राय.

दशदिशा (अव्य०) दाहीं दिशांकडे.

दशन (सं. पु. ना.) दांत.

दशमी (स्त्री. ना.) दाहावी तिथि. २ दुधांत किं० फलादिकांच्या रसांत पीठ भिजवून भाकरी करितात ती.

दशशत (सं. न. ना.) (ग्रं०) हजार संख्या तें. [दशी.

दशा (सं. स्त्री. ना.) अवस्था. २ (सं.)

दसरा (सं. दशहरा) (पु. ना.) आश्विन शुद्ध दशमी. [जो राजकर तो.

दस्त (फा० पु. ना.) शेतकींसंबंधी

दस्तऐवज (फा० पु. ना.) वादप्रसंगीं उपयोगी पडण्याजोगा साक्षीसहित कोणेकाचा हातचा लेख तो.

दस्ता (फा० पु. ना.) बंदुकीची नळी ज्या लांकडांत बसविली असत्ये तो. २ कागदाचे चोवीस पानांचा समुदाय तो.

दस्तुरी (स्त्री. ना.) दलाली.

दस्तूर (अर० पु. ना.) दंडक. २(न.) लिहिलेल्या पत्रावर हस्ताक्षराचे खुणेसाठीं जें लेखकाचें नांव तें. ३ कोणेकाचा हातचा जो लेख तें.

दहन (सं. न. ना.) जळण्याचा व्यापार तें. २ (पु.) अग्नि.

दहशत (फा० स्त्री. ना.) धाक.

दळ (न. ना.) दल. २ आरसा, कागद इ०कांची जाडी तें. ३ फटींतील अंतर्ळीं इ० टाकून घेण्याजोगा अंश तें.

दळण (न. ना.) दळायाकरितां घेतलें जें धान्यादिक तें. २ दळण्याचा व्यापार तें. ३ (ग्रं०) परिचय. ४ समागम. [चय इ० तें.

दळणवळण (न. ना.) ओळख, परि-

दळवट (वि०) (ग्रं०) समुदाययुक्त.

दळवाड (पु. ना.) (ग्रं०) समुदाय. २ (वि०) संपूर्ण. [२ प्रभा. ३ स्वरूप.

दळवाडें (न. ना.) (ग्रं०) दळवाड.

दळवेपण (न. ना.) (ग्रं०) सेनापतित्व.

दळ्या (वि०) धट. २ एक पक्वान्न आहे.

दक्ष (सं. वि०) ज्याची बुद्धि निरंतर सर्वत्र सावध असत्ये असा जो चतुर तो. २ ज्या व्यापारांत जो पुरा कुशल तो.

दक्षिणा (सं. स्त्री. ना.) कांहीं व्रतादि केलें असतां त्याची सांगता होण्यासाठीं किं० केवळ परमेश्वरप्रीत्यर्थ ब्राह्मणास द्रव्यादिक देतात तीं.

दक्षिणायन (सं. न. ना.) कर्क संक्रांतिपासून धन संक्रांतिपावेतों साहा राशींत सूर्यादिकांची स्थिति तें.२ जोंपर्यंत सूर्य दक्षिणायनांत आहे तोंपर्यंत जो काळ तें.

दक्षिणावर्त (सं. वि०) ज्याचें वळण प्रदक्षिणाकार असतें असा जो शंख इ० तो.

दाई (फा० स्त्री. ना.) उपमाता. २ प्रसूतसमयीं जी कुशल स्त्री बाळंतिणीची सुटका करिते असत्ये ती.

दाईज (सं. दायाद) एक कुलांत उत्पन्न झाल्यामुळें जे वडिलांच्या धनादिकांचे विभागी ते परस्परें. २ एक गोत्रज असून जे आशौचसंबंधी ते परस्परें. ३ निरंतर जो आपणास दुःख देणारा त्यास भारोगानें ह्मणतात.

दाखल (अर० वि०) गमनव्यापारानें जो कोणी कोणेक प्रदेशाशीं संबंध पावला तो. २ (अव्य०) सदृशालंकारून.

दाखला (पु. ना.) कोणेक सांगण्याचा जो अर्थ त्याचे बळकटीसाठीं किं० शोभेसाठीं उपमादिकेंकरून जो अर्थांतराचा उपन्यास तो. २ निर्णययोग्य गोष्टींचा निश्चय करण्याविषयीं प्रमाणभूत जें साधन तो.

३ शब्दादिद्वारा समजल्या गोष्टीचा प्रत्यक्ष जो अनुभव तो.

**दाखलेवाईक** (वि०) ज्याच्या खरेपणाविषयीं दाखला झाला आहे तो.

**दाखवणें, दाखविणें, दाखिवणें** (धा. ना.) कांहीएक अर्थ कोणेकास दिसे असा करणें.

**दाग, दागें** (न. ना.) (ग्रं०) अरण्य.

**दाघ, दांघ** (पु. ना.) (ग्रं०) दहन.

**दाट** (वि०) जाड जो पातळ पदार्थ तो किं० वस्त्र इ० तें. २ अडच. ३ संप्रदायापेक्षां ज्यांत अवकाश थोडा असा अंगरखा, चोळी इ० पदार्थ तो. ४ दाट परिचय, ओळख इ० म्ह० अतिशयित असा अर्थ इ०.

**दाटण** (स्त्री. ना.) दाटीमुळें झाली अडचण ती.

**दाटणी** (स्त्री. ना.) दाटण. २ कापडाचें दिंड आवळण्याची दोरी ती.

**दाटणें** (धा. ना.) थोडे अवकाशांत पदार्थ अधिक झाल्यामुळें अडचणला जाणें. २ अंगरखा इ० अंगांत घट्ट होणें.

**दाटी** (स्त्री. ना.) अल्प स्थलामध्यें अधिक पदार्थांचा सन्निवेश झाल्यामुळें झाली जी अडचण ती.

**दाटुगें** (वि०) (ग्रं०) दांडगें. २ मोठें.

**दाटून** (अव्य०) वास्तविक निमित्त नसतां आपले बुद्धीचे बळानेंच निमित्त करून किं० उपस्थित झालेल्या निमित्ताचा त्याच बळानें अनादर करून कांहीएक गोष्ट करणें इ० कांचें वि०.

**दांड** (सं. दंड) (पु. ना.) वेळूची लांब काठी. २ पट्टा खेळायास यावा म्हणून अभ्यासासाठीं खेळायाकरितां घेतात जी काठी ती. ३ (वि०) दांडगा.

**दांडकें** (न. ना.) हात दोन हात वेळू इ० काठीचा तुकडा तें.

**दांडगा** (वि०) शरीरानें बळकट आणि ज्याचे अंगीं नम्रता नाहीं असा जो मनुष्यादिक तो. २ तलम नव्हे जें सूत्र, वस्त्र इ० तें.

**दांडगाई** (स्त्री. ना.) दांडगेपणाच्या ज्या चेष्टा ती.

**दांडा** (सं. दंड) (पु. ना.) तीन साडेतीन हातप्रमाण वांब इ० लांकडाचा तुकडा तो. २ कुऱ्हाड इ०कांचे नेढ्यांत घालितात जें गोलकाष्ठादिक तें. ३ पाट इ०कांचें पाणी भूमींत न जिरतां वाहावें ह्मणून भूमीपासून उंच बांदिस्त करितात तो. ४ पाठीचा कणा.

**दांडी** (दांडा) (स्त्री. ना.) वस्त्रें इ० वाळविण्यासाठीं जी उंच अडवी काठी बांधितात ती. २ घोड्याची शेंपटी. ३ पालखीस वांकडा वेळू असतो ती. ४ (ग्रं०) कान.

**दाढ** (सं. दाढा) (स्त्री. ना.) दंतपंक्तीचे शेवटीं जे मोठे दांत असतात ते प्र०. २ भाताचें रोप करायासाठीं जी जमीन भाजितात ती व ती जमीन भाजण्याचा गवत इ० सरंजाम तो. ३ त्या दाढींत होतें जें भाताचें रोप तें.

**दाढी** (सं. दाढिका) (स्त्री. ना.) हनवटीवरचे केंस ती.

**दाणा** (सं. धान्य) (पु. ना.) धान्य किं॰ धान्यसमुदायांतील एकेक व्यक्ति तो. २ मोत्याची एकेक व्यक्ति तो. ३ उत्तमगुणविशिष्ट जो मनुष्य, घोडा इ॰क त्यास म्हणतात ४ साकरेंत एक भेद आहे.

**दाणादाण** (स्त्री. ना.) समुदायरूपानें एकत्र स्थित जें सैन्यादिक त्याचा अकस्मात् भयादि कारणामुळें तो समुदाय अस्ताव्यस्तपणें चोहीकडे फुटून प्रसर होतो ती.

**दांत** (सं. अप. पु. ना.) दंत. २ त्याचा त्याजवर दांत आहे किं॰ त्याणें त्याजवर दांत राखिला आहे म्ह॰ द्वेष असा अर्थ. ३ दांत पडणें म्ह॰ पराजय किं॰ अप्रतिष्ठा होणें. ४ दांतीं तृण धरणें ह्म॰ अभिमान सोडून शत्रूस शरण येणें इ॰.

**दांतकिसाळी** (दांत) (स्त्री. ना.) सारावेळ शिव्या, शाप इ॰ दुर्भाषण ती.

**दांतखिळी,खीळ** (स्त्री. ना.) सन्निपातादि दोषामुळें वरील आणि खालील दांत जे परस्पर घट्ट मिळतात ती.

**दाता** (सं. वि॰) दान करण्याचा ज्याचा स्वभाव तो.

**दांताळी** (स्त्री. ना.) दांताड.

**दांतिरें** (वि॰) (ग्रं॰) दांताळ.

**दाथर** (पु. ना.) मोदक इ॰क वाफेनें शिजवायाकरितां पात्रांत पाणी घालून त्यांत जें कांहीं तृण, पानें इ॰ घालितात तो.

**दाद** (फा॰ स्त्री. ना.) दुर्बलानें राजादि प्रभूपाशीं निवेदन करण्याजोगें जें संकटादिक त्याचा त्या प्रभूंची हें मनास आणावें अशी प्रवृत्ति व्हावयाजोगा त्यापाशीं जो प्रवेश ती. २कोणेकास दाद देणें ह्म॰ त्यास गणनीय बुद्धीनें गणणें. ३ पित्तादि विकृतीनें त्वचेवर क्वचित् क्वचित् जाडपणा येतो असा रोग ती.

**दादर** (पु. ना.) लांकडी जिना तो. २ जिन्यापि वर जिना बंद करण्याचें अडवें पाडायाचें कवाड तो.

**दादरा** (पु. ना.) पात्रांतील पदार्थ झांकला राहावा ह्मणून पात्राचे तोंडास पान, वस्त्र इ॰ आच्छादन बांधितात तो.

**दादुला,दादल्या** (पु. ना.) ज्या स्त्रियेचा जो पति तो तिचा.

**दादुला** (पु. ना) (ग्रं॰) स्वामी, पति. २ (वि॰) श्रेष्ठ, समर्थ.

**दान** (सं. न. ना.) आपला जो पदार्थ त्यावरील आपलेपणा नाहींसा करून क्रयादिद्वारा इतरास देण्याचा व्यापार तें. २ ईश्वरप्रीत्यर्थ ब्राह्मणादिकास सुवर्णादि देतात तें. ३ हत्तीचें मदोदक तें.

**दाब** (पु. ना.) दबकावणी. २ अडवृद्धि इ॰ कांस आंवळायाकरितां रूप इ॰ कांचें बंधन करून ठेविलें असतें तो.

**दाबणें** (धा. ना.) कांहीं पदार्थ हात इ॰ कांनीं दडपणें. २ कोणेकास भय इ॰दाखवून दबे असा करणें. ३ कांहीएक गोष्ट गुप्त राही असें करणें.

दाबदूब, दूबी (स्त्री. ना.) वसूल देई-नासे झालेलें कुळ, चोर इ० कास भय होण्याजोगें कठोर भाषण, किं० आतां जसा मारील असें दिसायाजोगा व्यापार ती.

दांभिक (सं. वि०) लोकांनीं धार्मिक म्हणावें म्हणून दभानें जो कर्म करितो तो. २ तें त्याचें कर्म तें.

दाम (पु. ना.) कवडी, पैसा इ० धन तो. २ (स. न.) दावें. ३ पुष्पमाला.

दामटणें (धा. ना.) घोडा इ० कास त्वरेनें चालविणें. २ बलात्कारानें मनुष्य, पशु इ० कास कामास लावणें. ३ दुसऱ्याचा पदार्थ आपण बळें उपभोगणें.

दामटी (स्त्री. ना.) लहान भाकर

दायाद (स. पु. ना.) दायाचा विभागी जो तो. २ दाईज.

दार (स. द्वार) (न. ना.) लहान दरवाजा. २ उदकादिक बाहेर जाण्याचा मार्ग ते. ३ दारीं म्ह० दाराच्या बाहेःप्रदेशीं ओटी, अंगण इ० कांचे ठायीं. ४ (ग्रं०) स्त्री ५ (फा०) ज्याजवळ पैसा आहे तो.

दारा (सं. स्त्री. ना.) लग्नाची बायको.

दारिद्र्य (सं. न. ना.) दरिद्रीपणा.

दारु (स. न. ना.) काष्ठ.

दारुकायंत्र (न. ना.) (ग्रं०) लांकडाची बाहुली.

दारुण (स. वि०) ज्याचे दर्शन स्मरणादि संबंधानें भय वाटावें, ज्याचा निर्वाह करायास परम कठिण असा घोर जो अरण्य, अग्नि, तप, दुष्काळ इ० तो.

दारू (फा० स्त्री. ना.) मद्य. २ गंधक इ० द्रव्यें एकत्र करून कांहीं चूर्ण करितात; ज्याला अग्निसंयोग होतां होतां जळून जाते.

दाल (स्त्री. पु. ना.) सुमारें अंगुळभर रुंद असें जें रंगित रेशमी किं० सुती वस्त्र करितात तो ती.

दालन (फा. न. ना.) घर, वाडा इ० कांतील एकसारखा लांब जो कितीएक खणांचा प्रदेश तें.

दाली (स्त्री. ना.) कंबरेस तरवार अडकविण्यासाठीं शिपाई गळ्यांत जो कातड्याचा पट्टा घालितो ती.

दाव (स. पु. ना.) अरण्य. २ अरण्यास लागतो अग्नि तो.

दावण (स. दामनी) (स्त्री. ना.) अनेक दावीं ज्यास जागोजाग बांधलीं आहेत असा दोर असतो ती.

दावा (अर० पु. ना.) द्वेष. २ पदार्थावर जो आपला हक्क तो.

दावें (सं. दामन) गाई, म्हशी इ० बांधायाकरितां विरड्यानें युक्त जी दोरी करितात तें.

दाष्ट (वि०) दुसऱ्यास कठोर भाषण इ० कंकरून जाचण्याचा ज्याचा स्वभाव तो.

दास (स. पु. ना.) जो ज्याची केवळ हलकीही सेवा करितो असा जो तो त्याचा.

दासट (वि०) (ग्रं०) दाहक.

**दासटपण** (न. ना.) (ग्रं०) डाहक-पण. २ उद्धटपण. ३ सेवा.

**दासी** (सं. स्त्री. ना.) हलकी चाकरी करणारी स्त्री.

**दाक्षिण्य** (सं. न. ना.) दक्षपणा.

**दिक्** (सं. स्त्री. ना.) दिशा.

**दिक्क** (अर० वि०.) चकित. २ बेजार.

**दिक्कत** (अर० स्त्री. ना.) संशय.

**दिक्प्रदर्शन** (सं. न. ना.) कांहींएक गोष्टीचा सामान्याकार ध्यानांत यावयाजोगी चुणूक तें.

**दिगंबर** (सं. वि०) नग्न.

**दिग्भ्रम** (सं. पु. ना.) दिशाभूल.

**दिग्वल्कली** (सं. वि०)(ग्रं०) दिगंबर.

**दिग्विजय** (सं. पु. ना.) राजानें सैन्यादि बळेंकरून किं० पंडितादिकांनीं स्वस्वविद्येंकरून अनेक दिशांचे राजे किं० त्या त्या विद्येचे अभिमानी पंडित यांस जिंकण्याचा जो व्यापार तो. [कृपादृष्टिनुसार.

**दिठिवा** (सं. दृष्टि)(स्त्री. ना.) (ग्रं०)

**दिठी** (सं. दृष्टि) (स्त्री. ना.) (ग्रं०) अवलोकन. २ दृष्टि.

**दिंड** (न. ना.) कोरें कापडाचें लांबट बांधिलेलें ओझें तें. २ नागपंचमीचे दिवशीं आंत पुरण घालून पक्वान्न करितात तें.

**दिडका** (वि०) दीड पदरी असा.

**दिडकी** (स्त्री. ना.) दीड दुगाणीचें नाणें आहे ती.

**दिडदुमता** (वि०) (ग्रं०) दिडका.

**दिंडी** (स्त्री. ना.) दरवाज्यास किं० भिंतीस वांकून जाण्याजोगें लहान दार राखिलें असतें ती. २ देवाच्या उत्साहादिकांत छबिना निघतो ती. ३ कवितेंत एक प्रकार आहे ती.

**दिधणें** (सं. दान) (धा. ना.) (ग्रं०) देणें.

**दिन** (सं. पु. ना.) दिवस.

**दिनकर** (सं. पु. ना.) सूर्य.

**दिनचर्या** (सं. स्त्री. ना.) भोजनादिसंबंधी नित्याचा जो खर्च ती.

**दिनमान** (सं. न. ना.) सूर्योदयापासून अस्तमानपर्यंत जें कालमान तें.

**दिपणें** (सं. दीपन) (धा. ना.) पदार्थांचें तेज असह्य झाल्यामुळें त्यावर दृष्टि न ठरे असें व्याकूळ होणें. २ ज्या तेजाच्या योगानें दिसत असतें तें तेज अकस्मात् नाहींसें झाल्यामुळें क्षणमात्र दृष्टीनें अंधता पावणें. ३ अपरिचितानें कांहीं अपूर्व अद्भुतप्राय पाहिल्यामुळें चकित होणें.

**दिपमाळ** (सं. दीप, माला)(स्त्री.ना.) देवालयापुढें दिवे लावायाकरितां पाषाणादिकांचा स्तंभ केला असतो ती.

**दिपवाळी** (सं. दीपावली)(स्त्री. ना.) नरकचतुर्दशीपासून चार दिवस; ज्यामध्यें हिंदु दीपोत्साहपूर्वक सण करितात ती.

**दिमाख** (अर० पु. ना.) तोरा.

**दिम्मत** (अर० स्त्री. ना.) वस्तुतः दुसऱ्याचा जो पदार्थ त्याला स्वकीय संबंधानें वर्तवायाजोगा स्वाम्याज्ञादिद्वारा जो अधिकार ती.

**दिय** (पु. ना.) (ग्रं०) दिवस.

दिरंग,दिरिंग (फा० पु. ना.) उशीर.
दिल (फा० पु. न. ना.) अंतःकरण.
दिलगीर (फा० वि०) खेदयुक्त.
दिवटा (सं. दीप) (पु. ना.) काटूक इ०कास चिंधी गुंडाळून प्रकाशासाठीं जो काकडा करितात तो. २ कुलादिकास बट्टा लावण्याजोगा अयोग्य जो मनुष्य त्यास निंदासमयीं ह्मणतात. ३ (ग्रं०) भविष्य सांगणारा जोशी तो.
दिवटी (स्त्री. ना.) लहान दिवटा. २ देवास ओंवाळायाची धातुमय करितात ती.
दिवस (सं. पु. ना.) सूर्योदयापासून सूर्यास्तपर्यंत किं० दुसऱ्या सूर्योदयापर्यंत जो काळ तो. २ मृताची उत्तरक्रिया तो.
दिवसगत (स्त्री. ना.) कांहींएक कार्य होण्याविषयीं कितीएक दिवसरूप जो विलंब तो. [ण्यापूर्वी.
दिवसाउजेडीं (अव्य०) सूर्यास्त हो-
दिवसाढवळ्या (अव्य०) ढळढळीत दिवस असतां.
दिवसानदिवस (अव्य०) आजचे पेक्षां उद्यां उद्यापेक्षां परवां अशा क्रमानें आधिक्य किं० न्यूनता हे विषय असतां प्रयोग.
दिवसासकट (अव्य०) दिवसाउजेडीं.
दिवसेंदिवस (अव्य०) दिवसानदिवस.
दिवा (सं. दीप) (पु. ना.) पणती इ०कांत तेलानें किं० तुपानें भिजलेली जी प्रज्वलित वात ती. २ दिवटा.
दिवाण (फा० पु. ना.) राजा इ०कांचा मुख्य कारभारी तो.
दिवाणखाना (फा० पु. ना.) मोठ्या वाड्यांत माडीवर इतर जाग्यापेक्षां जी चांगली जागा केली असते तो.
दिवाभीत (सं. पु. ना.) घुबड.
दिवाळखोर (वि०) आपलें उत्पन्न काय व खर्च काय याचा विचार न पाहतां मनस्वी उधळपट्टी करण्याचा स्वभाव ज्याचा तो.
दिवाळी (स्त्री. ना.) दिपवाळी. २ भक्ष्यभोज्यादि यथेष्ट भोगपूर्वक काळ नेण्याचा प्रकार ती.
दिवाळें (न. ना.) सावकाराचा व्यवहार बुडाल्यामुळें त्याचे घेणेकऱ्यांनीं मिळून यथाविभाग जें द्रव्य असेल तें घ्यावें अशी जी त्या सावकाराची फजीती तें. २ जेवणाराची तृप्ति न होतां अन्न संपतें इ० रूप जी फजीती तें.
दिव्य (सं. न. ना.) साक्षी इ०प्रमाणांनीं वादाचा निर्णय न झाला असतां जर माझा वाद खोटा असेल तर ईश्वर माझा नाश करील इ० प्रतिज्ञापूर्वक शपथ किं० तप्त लोहादिक वादी किं० प्रतिवादी घेतात तें. २ (वि०) स्वर्गसंबंधी जो पदार्थादिक तो. ३ लोकोत्तर उत्कृष्ट जो पदार्थादिक तो. [प्रकाश.
दिव्यअलंकार (सं. पु. ना.) (ग्रं०)
दिव्यरस (सं. पु. ना.) (ग्रं०) अमृत.
दिशा (सं. स्त्री. ना.) गोल, वृत्त इ०कांचे मध्यापासून परिघाकडे जे

अनेक सरळ मार्ग ज्याचा अंत को-ठें होत नाहीं ते प्र० त्यांत पूर्व आ-दिकरून दाहा अति प्रसिद्ध आहेत. २ कांहींएक कार्याची ईषत् म्ह० किंचित् जी रीत; जिणेंकरून बुद्धि-मानाचे मनांत सर्व रीत येत्ये ती.

दिशाभूल (स्त्री. ना.) अपरिचित स्थळीं गेलें असतां पूर्व कोणती, प-श्चिम कोणती हें समजत नाहीं असा जो मोह ती.

दिसणें (सं. दर्शन) (धा. ना.) कां-हींएक विषय दृष्टिगोचर होणें. २ अनुमानादिकानें बुद्धिविषय होणें.

दिह (पु. ना.) (ग्रं०) दिवस.

दी (पु. ना.) (ग्रं.) दिवस.

दीठ (स्त्री. ना.) (ग्रं०) दिठी.

दीन (सं. वि०) दरिद्रादिकांमुळें दुसऱ्यानें आपणावर कृपा करावी असें इच्छायाजोग्या अवस्थेस पाव-ला तो. २ प्रकृतीनें गरीब, नम्र तो. ३ (अर० पु. ना.) यवनांत महंम-दानें स्थापिलेला धर्म तो.

दीप (सं. पु. ना.) दिवा.

दीपदर्शनीं (अव्य०) सायंकाळीं.

दीपी (सं.नदीप)(पु. ना.)(ग्रं०)समुद्र.

दीप्ति (सं. स्त्री. ना.) सूर्य, अग्नि, रत्न इ०कांची कांति ती.

दीर्घ (सं. वि०) क्षण, पळ, घटका इ०; किं० यव, अंगुल, हस्तादिक किं० लघु मात्रादिक हीं प्रमाणें अ-सावीं त्यापेक्षां ज्यास अधिक लागतात असा जो कालरूप किं० देशरूप किं० शब्दरूप पदार्थ तो.

दीर्घदर्शी (सं. वि०) दीर्घदृष्टि.

दीर्घदृष्टि (सं. स्त्री. ना.) कार्याचे सर्व परिणाम ध्यानांत आणून तदनु-सार वागण्याचा ज्याचा स्वभाव तो.

दीर्घद्वेष (सं. पु. ना.) चिरकाल रा-हणारा कोणेकाशीं कोणेकाचा जो द्वेष तो.

दीर्घप्रयत्न (सं. पु. ना.) मोठा प्रयत्न.

दीर्घसूत्री (सं. वि०)कांहीं कार्यास उ-शीर लावण्याचा स्वभाव ज्याचा तो.

दीस (पु. ना.) (ग्रं०) दिवस.

दीक्षा (सं. स्त्री. ना.) कांहींएक आ-रंभिलेलें जें व्रतादिक त्याचे समाप्ति-पर्यंत जे त्याविषयीं नियम सांगितले असतात त्यांचा जो स्वीकार तो. २ कांहींएक आचरणाची जी री-त ती.

दीक्षित (सं. पु. ना.) यज्ञ ज्याणें के-ला आहे तो. २ त्याचे संततिपुरु-षांसही ह्मणतात.

दुआळी (स्त्री. ना.)(ग्रं०) द्वेशबुद्धि.

दुई (स्त्री. ना.) विरोध.

दुकळ (सं. दुष्काल) (पु. ना.) धा-न्य न पिकल्यामुळें अतिशयित मह-र्गता होत्ये अशी जी क्वचित् देशीं कालदशा येत्ये ती. २ त्या त्या पदा-र्थांची अतिशयित दुर्लभता व्हावया-जोगें जें स्वल्पत्व तो.

दुकान (फा० न. ना.) पदार्थांचा विक्रा करण्याकरितां ते ते पदार्थ मां-डून बसायासाठीं केलें असतें जें घ-र किं० लोहार, कासार, सोनार, इ० कांचें ते ते पदार्थ घडण्यासाठीं

जे घर केलें असतें तें. २ विकण्यासाठीं मांडिला जो त्या त्या पदार्थांचा समुदाय तें. ३ कांहींएक व्यवहारार्थ पडलेला जो अनेक पदार्थांचा समुदाय तें. इ०.

दुकामी (वि०) दोहीं कामावर पडाया-जोगा जो मनुष्य, पदार्थ इ० तो.

दुकाळ (पु.ना.) दुकळ.

दुकूल (स.न.ना.) रेशमी वस्त्र कि० मुनाचें उंच वस्त्र तें.

दुःख (स.न.ना.) जीवमात्रास कांहींएक निमित्तामुळें दुःखरूप अनुभव येतो तें. २ दुःखरूप अनुभव ज्याचा असें जे रोगादिक तें. ३ उपद्रव इ०.

दुखणें (दु.ख) (न.ना.) मनुष्यास जी शरीरिक व्यथा तें. २ (धा.ना.) शरीर कि० शरीराचा अवयव रोगादिकांपासून उत्पन्न झालेल्या व्यथेनें युक्त होणें.

दुखवटा (पु.ना.) कोणिकास त्याचा स्वकीय मेल्यामुळें जें दुःख होतें तो. २ मृतमनुष्याचे पुत्रादिकांस त्याचें आप्त सुतक फिटल्यावर जी वस्त्रें देतात तो.

दुखवणें (धा.ना.) आघात झाल्यामुळें शरीराचा अवयव दुःखयुक्त होणें कि० आघातानें दुःखयुक्त करणें २ दुर्भाषण इ० कानीं कोणिकाचे मनास व्यथा होई असें करणें. ३ फळ इ० कांचे त्वचेस नख, शस्त्र इ० कांच्या योगानें छिन्नभिन्न करणें.

दुगाणी (स्त्री.ना.) एक तांब्याचें नाणें आहे ती. २ घोडा इ० पशूचे मागील दोन पाय. लाता मारणें त्यासमयींच प्र०. [डु. ३ ठेंगणें,

दुगुलें, ळें (वि०) (ग्र०) दुर्बळ. २ रो-

दुग्ध (स.न.ना.) मनुष्य, पशु यांच्या स्त्रियांच्या स्तनामध्यें जो श्वेत द्रव उत्पन्न होत असतो तें. २ रुई, वड इ० कांचा श्वेतवर्ण चीक तें.

दुग्धा (सं. द्विधा) (पु.ना.) कांहींएक कर्तव्य गोष्टीच्या एक प्रकारत्वाचा निश्चय न झाल्यामुळें जी द्विधा प्रकारता तो.

दुघई (वि०) दोन रस्ते ज्यास आहेत असें घर, वाडा इ० तें.

दुजा (वि०) (ग्र०) दुसरा. २ अन्य.

दुडदुड, दुडदुडां (अव्य०) जवळ जवळ आणि अतित्वरेनें पाऊल पडे असें चालण्याचें वि०.

दुंडा (पु.ना.) मध्यें दुमून न कापितां सलग्न जी पुस्तकाचीं दोन पत्रें राखिलीं असतात तो.

दुढ्ढाचार्य (पु.ना.) लोक विशेषेंकरून मानीत नसतां कि० मानाया जोगा अंगीं विद्यादि गुण नसतां जो विद्वत्तेचा डौल घालितो त्यास निंदाप्रसंगीं ह्मणतात. [रीं करणें.

दुणणें (धा.ना.) दुपडीं कि० दुपट-

दुणावणें (धा.ना.) दुप्पट होणें.

दुतर्फा (दु, तरफ) (अव्य०) दोनबाजूंस व्यापून. २ दोन राजे इ० अधिकारी यांजकडे देश, अंमल इ० विषयीं प्रयोग.

दुतर्फी (वि०) उभयसत्ताक जो देश, अंमल इ० तो. २ दोहों पक्षांस

अनुसरून केलेलें भाषण इ० तें.
दुथडी ( स्त्री. ना. ) ( ग्रं० ) नदी. २ (अव्य०) दोहीं तिरांस व्यापून.
दुंदुभि ( सं. पु. ना.) एक मोठें चर्म-वाद्य आहे.
दुधाणी ( स्त्री. ना.) दूध तापविण्याचें [पात्र.
दुधाणें (न. ना.) दुधाणी.
दुनया, दुनिया (फा० स्त्री. ना.) जग.
दुपतें (न. ना.) घरचें गाय, म्हैस इ०-कांपासून नित्य उत्पन्न होतें जें दूध, दहीं इ० तें.
दुपार (दु, प्रहर) ( स्त्री. ना. ) दिवसाचा मध्यभागरूप काळ तो.
दुपेटा (दु, पट) (पु. ना.) दरबार, सभा इ० स्थळीं जावयाचें असतां अंगावर घ्यावयाचें वस्त्र आहे तो.
दुफळी (स्त्री. ना.) खेळणें, मारामार करणें इ० कारणासाठीं समुदाय फुटून ज्या दोन फळ्या होतात ती.
दुबंदी (स्त्री. ना ) दोन बंद पडाया-जोगा जो कागद ती. २ घोड्याचे पुढले दोहीं पायांस जी नालबंदी करितात ती.
दुबळा (सं. दुर्बल) (वि०) विद्या, संपत्ति इ० कांचें बळ ज्यास नाहीं तो.
दुबार (सं. द्विवार)(अव्य०) दोनदां.
दुभणें (सं. दोहन) (धा. ना.) (ग्रं०) म्हैस, गाय इ० कानीं दोहिलें असतां दुग्धस्राव करणें.
दुभतें (न. ना.) दुपतें.
दुभाषी, ष्या (पु. ना.) उभयतां व्यवहार करणाऱ्यांस एकमेकांची भाषा न समजत असतां त्यांची मध्यस्थी करणारा दोन भाषा जाणणारा तो.
दुमची (फा० स्त्री. ना.) घोड्याचे मागले दोन पाय त्यांस लत्ताप्रहरप्रसंगीं म्हणतात.
दुमजला (वि०) दोन मजले ज्यास आहेत असें घर, वस्त्र इ० तें.
दुमाला (फा० पु. ना.) पृष्ठभाग. २ पाठबळानें जें संरक्षण तो. ३ उभयसत्ताक गांव इ० तो.
दुरडी (स्त्री. ना.) तांदूळ धुणें इ० उपयोगी एक वेळूचें पात्र आहे ती.
दुरत्यय (सं. वि०) ज्याचा नाश करून पार पडणें परम कठीण तो.
दुरवबोध (सं. वि०) दुर्बोध.
दुरस्ता (अव्य०) मार्गाचे दोहींकडांस व्यापून पंक्तीनें.
दुराग्रह (सं. पु. ना.) कांहींएक गोष्टीविषयीं लोकविरोध किं० शास्त्रविरोध इ० संकटें आलीं असतांहि ती गोष्ट सोडायाची नाहीं असा दृढ धरलेला जो आग्रह तो.
दुरात्मा (सं. वि०) दुष्ट आहे अंतःकरण ज्याचें तो.
दुरापस्त, पास्त (सं. दूरापास्त)(वि०) होईल अशी संभावना ज्याची शंभर वांट्यांनीं नाहीं असें दुर्घट कर्म तें.
दुरावणें (धा. ना.) जवळ असलेल्या मित्रादिकानीं एकमेकांशीं दूर पडणें.
दुराशा (सं. स्त्री. ना.) ज्या आशेची सिद्धि होणें दुरापस्त ती.
दुरित (सं. न. ना.) पाप.

दुरुक्ति (स. स्त्री. ना.) दुसऱ्यास वाईट वाटायाजोगें शिवीगाळ इ० भाषण तें.

दुरुत्तर (स. न. ना.) दुरुक्ति.

दुरुस्त (फा० वि०) यथायुक्त.

दुर्ग (स. पु. ना.) किल्ला.

दुर्गति (स. स्त्री. ना.) नरकादिक दुष्ट फलाची प्राप्ति ती.

दुर्गम (स. वि०) जावयास कठीण जो देशादिक तो.

दुर्घट (स. वि०) घडायास कठीण जी गोष्ट इ० ती.

दुर्जन (स. पु. ना.) दुष्ट जो मनुष्या- [दि तो.

दुर्दशा (स. स्त्री. ना.) वाईट अवस्था ती.

दुर्दैव (स. न. ना.) दुष्ट फल देणार, इष्टफलास प्रतिबंध करणार असें दैव तें. २ (वि०) तशा दैवाचा तो.

दुर्धर (स. वि०) धरायास कठीण सर्पादिक तो. २ सोसावयास कठीण तो.

दुर्निवार (स. वि०) निवारायास कठीण मृत्यु इ० तो.

दुर्बल, ळ (स. वि०) दुबळा.

दुर्बीण, न (फा० स्त्री. ना.) नळीत भिंगें बसवून यंत्र केलें असतें ज्याणें दूरचा पदार्थ स्पष्ट दिसतो ती.

दुर्बोध (स. वि०) समजायास कठीण जो ग्रंथादिक तो.

दुर्भर (स. वि०) भरून पूर्ण करायास कठीण तो. २ (न. ना.) (ग्र०) पोट.

दुर्भिक्ष (स. न. ना.) दुकळ.

दुर्मिल, ळ (स. वि०) दुर्लभ.

दुर्लभ (स. वि०) ज्याचा लाभ होणें परम कठीण तो.

दुर्लक्ष्य (स. न. ना.) (वि०) दुसऱ्या विषयाकडे चित्तवृत्ति लागल्यामुळें जवळच्या विषयाकडे ज्याचें चित्तानुसंधान राहिलें नाहीं तें कि० तसा स्वभाव ज्याचा तो.

दुर्लौकिक (स. पु. ना.) अपकीर्ति.

दुर्वासना (स. स्त्री. ना.) दुष्टवासना २ दुर्बुद्धि.

दुर्वृत्त (स. वि०) चोरी, मद्यपान इ० दुष्ट आहे आचार ज्याचा तो.

दुर्व्यसन (स. न. ना.) मद्यपान इ० दुष्ट व्यसन तें.

दुलई (स्त्री. ना.) आंत थोडा कापूस घालून सजाब इ० लावून शोभिवंत असें रजईसारखें पांघरायास वस्त्र करितात तो. [३ द्वैतरूप

दुवाड (वि०) (ग्र०) द्वाड. २ कठीण.

दुःशक (स. वि०) शक्य होण्यास परम कठीण तें.

दुशमन (फा० पु. ना.) शत्रु

दुशाला (स्त्री. ना.) शालजोडी.

दुश्चित (स. वि०) खिन्न झालें आहे ज्याचें मन तो.

दुश्चिन्ह (स. न. ना.) अशुभ फलाचें सूचक जें चिन्ह तें.

दुष्कर्म (स. न. ना.) पाप लागायाजोगें जें कर्म तें.

दुष्ट (स. वि०) दुसऱ्याचा घातपात करावा तें न होईल तर मत्सर तरी करावा असा स्वभाव ज्याचा तो.

दुस (पु. ना.) (ग्रं०) प्रमेय. [तो.
दुःसंग (सं. पु. ना.) दुष्टाचा जो संग
दुसमान —दुशमन. [ठीण तो.
दुःसह (सं. वि०) सोसावास जो क-
दुस्तर (सं. वि०) ज्यापासून पार हो-
णें अवघड तो.
दुहिता (सं. स्त्री. ना.) कन्या.
दूत (सं. पु. ना.) कोणेकास जाऊन निरोप सांगणें, बोलावून आणणें, किं० पत्र पोंचविणें इ० कामासाठीं जो चाकर ठेविला असतो तो.
दूध (न ना.) दुग्ध. २ नारळ इ० कांचा दुधासारिखा जो रस दिसतो तें.
दूरदृष्टि (सं. वि०) दीर्घदृष्टी.
दूषण (सं. न. ना.) दोष.
दूस (न. ना.) (ग्रं०) वस्त्र.
दृढ (सं. वि०) ज्याचें छेदन, भेदन, चलन इ० करण्याविषयीं बहुत प्रयत्न लागतो असा पदार्थादिक तो.
दृती (स्त्री. ना.) (ग्रं०) सुगंध.
दृश्य (सं. वि०) दिसण्याजोगें तें. [दृष्टि.
दृष्ट (सं. वि०) पाहिलेला तो. २ (स्त्री.)
दृष्टांत (सं. पु. ना.) वाक्यार्थरूप किं० कथारूप सांगितलेला जो कांहीं अर्थ त्यास साम्यरूप प्रमाण यावें ह्मणून तत्सदृशरूप वाक्यांतराचा किं० कथांतराचा उपन्यास तो. २ भूत, भविष्यादि गोष्टीचा सूचक जो कोणेकास स्वप्न पडतो तो.
दृष्टादृष्ट (सं. स्त्री. ना.) परस्परांचे नेत्रांचें जें परस्परांस दर्शन तें.
दृष्टि (सं. स्त्री. ना.) नेत्रगोलकांत राहणारें पाहण्यास साधन जें इंद्रिय आणि त्याची वृत्ति ती. २ कोणेक पदार्थाकडे जें लक्ष्यानुसंधान तें.
दृष्टिदेखत, देखतां (अव्य०) समक्ष.
दृष्टिबंधन (सं. न. ना.) मंत्रसामर्थ्यानें अन्यथारूपानें पदार्थ दिसावे असा जो दृष्टीस मोह करितात तें.
दृष्टिभेट (स्त्री. ना.) मरणोन्मुख मनुष्याचे जवळ नसणारे जे पुत्रादिक ते येऊन शेवटील जी त्यांची परस्पर भेट होण्ये ती. २ कुशलप्रश्नसंभाषणादिरहित कोणेकाशीं कोणेकाचें केवळ दर्शन मात्र तें.
दृष्टोत्पत्तीस (अव्य०) अनुभवदशेस.
देऊळ (सं. देवालय) (न. ना.) देवाचें स्वतंत्र घर तें.
देकार (पु. ना.) लग्न इ० उत्साहांत अनेक ब्राह्मणांस जी दक्षिणा वांटितात तो. [जो मनुष्य इ० तो.
देखणा (वि०) नाका डोळ्यानें सुरेख
देखत (अव्य०) डोळ्यांनीं प्रत्यक्ष पाहत असतां. २ जिवंत असतां.
देखतां (अव्य०) देखत.
देखरेख (स्त्री. ना.) कोणेक व्यवहारावर निरंतर चौकशी राखण्याचा व्यापार ती.
देखाऊ (वि०) देखणा. २ आंत बळकटी इ० तादृश गुण नसतां पाहण्यांत मात्र जो सुरेख तो.
देखीत, देखील (अव्य०) ज्याचें होणें चरमावधिस्थ आहे त्यापुढें हें अव्यय लागतें. उ० राजा देखील त्याच्या पायां पडतो; अर्थात् प्रधाना-

दिक पडतात हें सिद्धच आहे.

**देखोदेखी, वेखी** (अव्य०) कोणेक कर्म केलें असतां हेतें काय व करावें कोणीं इ० विचार न करितां दुसऱ्यानें केलें ह्मणून आपणही करावें अशा समजुतीनें कर इ० धा० वि०.

**देट** (पु. ना.) पानें, फुलें, फळें इ० कांस आधारभूत जो अवयव तो २ राजगिरा, माठ, अळू इ० कांचें कांड तो.

**देणगी** (स्त्री. ना.) कोणेकाचा गुण पाहून संतोष झाल्यामुळें जें त्यास द्रव्यादिक देतात ती.

**देणें** (सं. दा) (धा. ना.) आपल्या सत्तेंत किं० आपल्याजवळ असलेला पदार्थ दुसऱ्याच्या सत्तेखालीं करणें, यांत क्वचित् स्वसत्तेचा निरास असतो,क्वचित् नसतो. २(न.) ऋण.

**देय** (सं. वि०) द्यावयास जें योग्य किं० दिलेंच पाहिजे तो.

**देव** (सं. पु. ना.) ईश्वर. २ स्वर्गी राहणारे जे इंद्रादिक ते प्रत्येकीं. ३ ज्याचें पूजन, वंदन केलें असतां ईश्वरप्रसाद होतो असे जे पाषाणमूर्ति इ० तें.

**देवडी** (सं. देहली) (स्त्री. ना.) मोठ्या वाड्याचे पुढचे द्वारांत जी दोहोंकडे दोन उंच जोतीं करून शिपाई इ० बसायाजोगी जागा केली असते ती.

**देवढें** (वि०) (ग्रं०) अधिक.

**देवता** (सं. स्त्री. ना.) देव. २ इंद्रियादि सर्व पदार्थमात्राचे अभिमानी ईश्वरांश आहेत ते प्रत्येकीं.

**देवदेव** (पु. ना.) देवाचें पूजन, नामस्मरण,प्रदक्षिणा इ० जें अनुष्ठान तो.

**देवधर्म** (सं. पु. ना.)देवदेव. २ देवास नवस इ० करणें तो. [इ० तें.

**देवधान्य** (सं. न. ना.) यव, साळी

**देवब्राम्हण** (सं. पु. ना.) तीर्थादिकांच्याठायीं गेलें असतां देवास नैवेद्य, ब्राह्मणास भोजन अशा प्रकारचा समारंभ तो.

**देवभोळा** (पु. ना.) निरंतर देवाची नामस्मरणादि सेवा करावी असें लक्ष्य ज्याचें आणि देव, साधु यांचें असंभवित चरित जरी कोणीं सांगितलें तथापि कुतर्कानें त्यावर ज्याचा अविश्वास होत नाहीं असा जो सात्विक मनुष्य तो. [धुपारा इ० करितो तो.

**देवरुशी, रुषी** (पु. ना.) अंगारा

**देवलंड** (पु. ना.) देवांप्रीत्यर्थ करायाचें कर्म तें करीत नाहीं तो.

**देवलोक** (सं. पु. ना.) स्वर्ग.

**देवस्की** (स्त्री. ना.) पिशाचादिउपद्रवनिवारणार्थ अंगारा लावणें, आपले अंगांत पिशाचसंचार करून घेणें. इ० कर्म ती. [२ शपथ.

**देवांगण** (न. ना.) (ग्रं०) गंधर्वनगर.

**देवांगना** (सं. स्त्री. ना.) अप्सरा.

**देवालय** (सं. न. ना.) देऊळ.

**देवाज्ञा** (सं. स्त्री. ना.) देवाची आज्ञा. २ संकेतानें मृत्यूस म्हणतात.

**देविका** (स्त्री. ना.) (ग्रं०) देवी जी शमदमादि संपत्ति ती.

**देवी** (सं. स्त्री, ना.) जगदंबा. २ ज-

न्मांत सर्व मनुष्यांस एकवार होतो जो विस्फोटक रोग तो प्रत्येकीं.

**देव्हडा** (वि०) (ग्रं०) देहुडा.

**देव्हारा** (देव, गृह) (पु. ना.) नित्य पुजायाचे देव ठेवायाकरितां काष्ठादिकांचा मंचारी इ० आकाराचा केला असतो तो.

**देश** (सं. पु. ना.) कांहीं पदार्थ राहणें, उत्पन्न होणें इ० विषयीं अधिकरणरूपानें अभिमत जें भूतलादि तो. २ भाषासंप्रदाय इ० कांचे भेदानें भिन्न भिन्न मानिलेले जे भूतलविभाग ते प्रत्येकीं. ३ ज्योतिषमताप्रमाणें शंभर योजनें चौरसचौरस जो भूभाग तो.

**देशपांड्या** (पु. ना.) पाटलाच्या हाताखालीं गांवचा हिशेब राखणारा जसा कुळकरणी, तसा देशमुखाचे हाताखालीं देशाचा हिशेब राखणारा जो अधिकारी असतो तो.

**देशभाषा** (सं. स्त्री. ना.) ज्या ज्या देशांत ज्या ज्या भाषेनें व्यवहार होतो ती ती त्या त्याची.

**देशमुख** (पु. ना.) गांवांत जसा पाटील तसा देशादिकांत जो अधिकारी असतो तो.

**देशाटन** (सं. न. ना.) अनेक देशांच्याठायीं जो संचार तें.

**देशांतर** (सं. न. ना.) लंकेपासून मेरूपर्यंत जी दक्षिणोत्तर रेषा मानिली आहे तीपासून पूर्वेस किंवा पश्चिमेस इष्टदेशास जें अंतर तें २ इष्टदेशाहून जो अन्यदेश तें.

**देशावर** (पु. ना.) ब्राह्मण देशांतरास किं० ग्रामांतरास जाऊन प्रतिगृहीं एक एकवार जी भिक्षा मागतो तो किं० ती भिक्षा मागण्याचा व्यापार तो.

**देशिक** (सं. पु. ना.) गुरु.

**देशोधडीस** (अव्य०) देशांतरास.

**देसाई** (पु. ना.) देशमुख.

**देह** (सं. पु. ना.) काया. देहावर असणें, येणें इ० शुद्धीवर असणें, येणें.

**देहुडा** (वि०) (ग्रं०) एक्या पायावर भार घेऊन उभें राहून दुसऱ्या पायाचें पाऊल उचलून त्या पायावर टेंकिलें असतां वक्र होतो जो पाय तो.

**दैत्य** (सं. पु. ना.) देवांची प्रतिपक्षी पुराणप्रसिद्ध एक जाति आहे तो.

**दैनंदिनप्रलय** (सं. पु. ना.) ब्रह्मदेवाचे प्रतिदिवशीं या सृष्टीचा जो प्रलय होतो तो.

**दैना** (सं. दैन्य) (स्त्री. ना.) दुर्दशा.

**दैन्य** (सं. न. ना.) दरिद्रादिकांमुळें जें दीनत्व तें.

**दैव** (सं. न. ना.) प्राण्यास सुख दुःखादि होण्याविषयीं नियामक जो प्राचीनकर्मानुसार ईश्वरसंकल्प तें. २ स्वजातीय मनुष्यांचा समुदाय तें. दैव उघडणें, उपटणें इ० त्यानें सुखप्रद होणें. दैवफिरणें इ० अनुकूलाचें प्रतिकूल किं० प्रतिकूलाचें अनुकूल होणें इ०.

**दैवत** (सं. न. ना.) देवता.

**दैवयोग** (सं. पु. ना.) दैवाचा अनुकूल किं० प्रतिकूलपणा तो.

दैवज्ञ (सं. पु. ना.) जोशी.
दोघुलेपण (न. ना.) (ग्रं०) दोनीपण.
दोकडा (पु. ना.) दुगाणी. २. सोन्याचे वजनांत चवाचा शतांश तो.
दोणी (स्त्री. ना.) (ग्रं०) होडी.
दोंद (न. ना.) व्यायाम नसल्यामुळें मोठें वाढलेलें जें पोट तें.
दोर (सं. दोरक) (पु. ना.) पायाचे अंगठ्यायेवढी जाड केली जी दोरी तो.
दोरखंड (न. ना.) दोर इ० तें.
दोरवा (पु. ना.) वस्त्रांत एक भेद आहे.
दोरा (दोर) (पु. ना.) अनेक सुतें एकत्र वळून शिवणें इ०कासाठीं मोठें सूत्र करितात तो. २ लांकूळ, दगड, मोतीं इ०कांस जें सूत्राकार फुटायाचें चिन्ह असतें तो. ३ परस्पराचा काहिंएक परंपरेनें योनिसबंधादिक संबंध असतो तो इ०.
दोरी (स्त्री. ना.) बारीक जो दोर ती.
दोष (सं. पु. ना.) हा पदार्थ वाईट अशा व्यवहारास प्रयोजक, न्यूनता आधिक्य, अपराध इ०रूप धर्मविशेष तो.
दोस्त (फा० पु. ना.) मित्र.
दोहडा (पु. ना.) (ग्रं०) दोहरा.
दोहद (सं. पु. ना.) डोहळा.
दोहरा, दोहोरा (पु. ना.) हिंदुस्थानं भाषेंत छंदोविशेषबद्ध कविताजाति आहे तो.
दौत (अर० स्त्री. ना.) लिहावयासाठीं शाई घेण्याचें पात्र असतें तें.
दौलत (अर० स्त्री. ना.) संपत्ति
द्यूत (सं. पु. ना.) जुगार.
द्रव (सं. पु. ना.) पदार्थमात्राच्या ठायीं स्थित जो जलांश तो किं० सुवर्णादि घट्ट पदार्थांचा अग्निसंयोगादि उपाधीनें जलसदृश होतो परिणाम तो. २ दया इ०कांमुळें अंतःकरणास शैथिल्यरूप विकृति होते ती.
द्रवणें (धा. ना.) घृतादि घट्ट पदार्थानें द्रवरूप होणें. २ अंतःकरणानें दयादिकांमुळें मृदुत्व पावणें.
द्रव्य (सं. न. ना.) पृथ्वी, जल इ० तीं प्रत्येकीं. २ पैका. [जाणणारा.
द्रष्टा (सं. पु. ना.) पाहणारा किं०
द्राविडीप्राणायाम (पु. ना.) काहीं भाषण, कार्य इ०सरळपणानें होण्याजोगें असतां उगीच लांबणीच्या प्रकारानें करण्याचा जो व्यापार त्यास ह्मणतात. [ळ आहे
द्राक्ष (सं. द्राक्षा) (न. ना.) एक फ
द्राक्षासव (सं. पु. ना.) द्राक्षाचें मद्य तें
द्रु (सं. पु. ना.) द्रुम.
द्रुम (सं. पु. ना.) झाड.
द्रुहिण (सं. पु. ना.) ब्रह्मदेव.
द्रोह (सं. पु. ना.) वैर किं० वैरपूर्वक जो अपकार तो. २ कोणेकाचें वाईट केल्यामुळें त्याचा लागतो जो शाप तो.
द्वंद्व (सं. न. ना.) युग्म. २ परस्पराची लागली जी स्पर्धा तें. ३ व्याकरणांत एक समास आहे.
द्वाड (वि०) धिप्पाडेणें, चावणें, मारणें इ० दुर्गुण ज्यामध्यें आहेत असा मनुष्यादि तो.

द्वार ( सं. न. ना. ) दार. २ कोणेक व्यवहार, स्थान इ० कांत प्रवेशादि सिद्धीस साधनभूत जें कांहीं उपकारक, घटक, मध्यस्थ इ० तें.

द्वारपाल, ळ ( सं. पु. ना. ) राजादिकांचे द्वारांत रक्षक ठेविला असतो तो.

द्वाही (स्त्री. ना.) राजाची शपथ ती.

द्विज (सं. पु. ना.) ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य. २ अंडज जे पक्षी, सर्पादिक ते. ३ दांत.

द्विजराज (सं. पु. ना.) (ग्रं० ) चंद्र.

द्विजिव्ह (सं. पु. ना.) (ग्रं०) सर्प.

द्विदल ( सं. न. ना. ) ज्यामध्यें दोन डाळिंब्या आहेत असें जें हरभरा, तूर इ० धान्य तें.

द्विमुख (सं. पु. ना.) (ग्रं०) अग्नि.

द्विरद (सं. पु. ना.) (ग्रं०) हत्ती.

द्विरेफ, रेफकू (सं. पु. ना. ) ( ग्रं० भ्रमर.

द्वीप (सं. न. ना.) पाण्याच्या मध्यभागीं देशादि वसण्याजोगा स्वतंत्र व पृथक्‌ भूभाग तें.

द्वेष ( सं. पु. ना. ) परस्परें एकमेकांच्या किं० एकाच्या नमून एकाच्या मनांत जो अपकार करण्याचा भाव असतो तो.

द्वैत (सं. न. ना.) भेदबुद्धि.

---

## —ध—

ध— हा वर्ण एकोणिसावें व्यंजन आहे.

धका, धक्का ( पु. ना.) ढका. २ कोणेक पदार्थाचा कांहीं पदार्थावर बळकट जो आघात तो. ३ पाणी, वायु इ० कांचा नेट संभाळण्यासाठीं पाशाणादिकांनीं भिंतीसारखा बांधला असतो तो. ४ कांहींएक व्यवहारांत जो अनिष्टापात तो. [कांबुकी.

धकाधकी, धकाधकी (स्त्री. ना.) धधकाबुकी (स्त्री. ना.) कोणेकास धक्के आणि बुक्या यांचा मार ती.

धक्क (न. ना.) भयामुळें हृदयांत जो आंचका बसतो तें.

धग (स्त्री. ना.) आसमंतात् अग्नीची जी उष्णता पसरली असते ती. २थंडी जाण्यासाठीं पेटविला जो अग्नि ती.

धगड ( पु. ना.) कोणेक स्त्रीस पतीहून जो अन्य दुसरा पति असतो तो. २ प्रसंगीं नवऱ्यास निंदेनें ह्मणतात. ३जो ज्याचें निर्दलन पराजयादिकांविषयीं समर्थ तो त्याचा.

धगधगीत (वि०) ज्वरादिकांमुळें अत्यंत तापलें जें शरीर तें. २ (ग्रं०) पुण्यबळानें जें शरीर तेजःपुंज तें.

धजणें (धा. ना.) कांहीं काम करण्याविषयीं पुढें होणें.

धजावणें (धा. ना.) धजणें.

धट (पु. ना.) खजुराचीं कपातें इ० वजन करण्यासाठीं जी दांडी टांगिली असते ती. २ (ग्रं०) निश्चय. ३ (वि०) धट.

धटिंगण (वि०) शरीरानें बळकट, मोठा असून ज्यास दुसऱ्याची भीड मर्यादा नाहीं तो. २ (पु०) (ग्रं०) प्रसंगीं पुरुषमात्रास म्हणतात.

धट्ट (वि०) ज्याचे अंगीं भय व नम्रता नाहीं तो.

**धट्टाकट्टा, खट्टा** (वि०) ज्याचें शरीर निरोगी असून बळकट तो.

**धड** (न. ना.) मान तुटून अवशिष्ट राहिलें जें शरीर तें. २ (वि०) फुटकें, फाटकें नव्हे जें पात्र, वस्त्र इ० तें. ३ (अव्य०) पुरतेपणीं यथास्थित जसें असावें तसें.

**धडक** (स्त्री. ना.) धडक किं० ठोकर. २ (अव्य०) भय, शंका इ०कांनीं मध्यें संकोच किं० विराम न पावतां.

**धडकणें** (धा. ना.) अग्नि, काम इ० प्रज्वलित होऊन वृद्धिंगत होणें.

**धडका** (अव्य०) धडक.

**धडकी** (स्त्री.ना.)भयादिकानें हृदयांत धक्का बसल्यासारखी विकृति होणें ती.

**धडगत** (स्त्री. ना.) चांगला परिणाम होईल असें दिसायाजोगी जी दशा ती.

**धडधडीत** (वि०)अन्यथारूपता किं० गौणता यांची संभावनाही न भासे असें तें.

**धडधाकड** (वि० ) फाटकें, तुटकें नव्हे जें वस्त्रादि किं० धट्टाकट्टा जो मनुष्यादि तो.

**धडपड, फड** (स्त्री. ना.) कांहीं उद्योग करतेवेळेस क्षोभामुळें किं० अडाणीपणामुळें इकडचें तिकडे, तिकडचें इकडे असा जो आदळ, आपट इ० रूप व्यापार होतो ती.

**धडफुडें** (वि०)(प्रां०)खरें.२(अव्य०) खरोखरी. ३ हातोंपातीं. [भय.

**धडवता** (वि०) (प्रां०)निधडा. २निधडवती (स्त्री. ना.) नित्य नेसणें इ० उद्देशानें घेतलेलीं जी धोत्रें लुगडीं इ० वस्त्रें ती किं० इष्टकालमर्यादि नित्योपभोग्य वस्त्रांची पर्याप्ति ती.

**धडा** (पु. ना.) एक दिवसांत पाठ होत इतकीं अक्षरें किं० अंक पंतो जी मुलास लिहून देत असतो तो. २ कोणेक व्यवहाराविषयीं आपण करून दाखविल्यामुळें किं० या या प्रकारें करावें असें सांगितल्यामुळें दुसऱ्यास लागते जी रीत तो. ३ दाहा शेर जें वजन तो. ४ मनाचा निश्चय. ५ पोटांत एक रोग असतो तो.

**धडाका** (पु. ना.)कडाका. २ झपाटा.

**धडाखडा** (वि०) धट्टाकट्टा.

**धडीपगडी** (स्त्री. ना.) सभादिकांत जावयाचें असतां पुरुषास शेला, पागोटें इ० वस्त्रें लागतात ती.

**धडोती** (स्त्री. ना.) धडवती.

**धडोतें, डौतें** (वि०) (प्रां०) सुशोभित.

**धण** (स्त्री. ना.) एकाचा तोटा, नाश किं० प्रयत्न विफळ होऊन दुसऱ्यास अनायासें यथेष्ट धनादिकांचा लाभ होऊन होते जी त्याची भरती ती. २ (प्रां०) समृद्धि.

**धणी** (पु. ना.) धनी. २(प्रां०)इच्छा

**धणीवरी** (अव्य०) (प्रां०) यथेच्छ तृप्ति होईपर्यंत.

**धतुरा, धत्तुरा** (पु. ना.) दाखविणें याच्या योगीं प्र०. दुसऱ्याचें द्रव्यादि घेऊन दिवाळें काढणें किं० पळून जाणें अशा प्रकारें ठकविणें.

**धंदा** (पु. ना.) उद्योग.

धन (सं. न. ना.) रुपया, होन, सोनें, रुपें इ० जो अर्थ तो. २ विद्यादिकास आरोपानें म्हणतात.

धनको, धनकोनाम (पु. ना.) सावकार जो कर्जाऊ रुपये इ० देतो तो.

धनत्तर (वि०) प्रशस्तपणें मोठा जो वाडा, पर्वत, वृक्ष इ० तो.

धनाढ्य (सं. वि०) धनवान्.

धनिक (सं. वि०) धनाढ्य.

धनी (सं. पु. ना.) जो पदार्थ ज्याच्या सत्तेंत असतो त्या पदार्थाचा तो किं० जो मनुष्य ज्याचा चाकर त्याचा तो. [आहे ज्याणें तो.

धनुर्धर (सं. वि०) धनुष्य धारण केलें

धनुष्य (सं. न. ना.) तीर मारण्यास साधन जें कमान इ० करितात तें.

धन्य (सं. वि०) पुण्यवान्. २ कृतकृत्यता पावला जो तो.

धन्वंतरि (सं. पु. ना.) चवदा रत्नांत निघालेला एक वैद्य आहे. २ पद्महस्ती जो यशस्वी तो. ३ वैद्यास स्तुतीनें म्हणतात.

धन्वयी (वि०) (ग्रं०) धनुष्य धरणारा.

धबधबा (पु. ना.) खालीं पडणारा पाण्याचा मोठा स्रोत तो.

धबाबा (पु. ना.) (ग्रं०) धबधबा.

धमक (स्त्री. ना.) अमुक काम मी करीन असा जो स्वसामर्थ्याचा मनांत निश्चय असतो तो. २ उसण.

धमकणें (धा. ना.) वायुविकृतीनें शरीरांतील शीर, व्यथा होई अशी उडणें.

धमकावणी (स्त्री. ना.) धमकी.

धमकी (स्त्री. ना.) दबकावणी.

धमनी (सं. स्त्री. ना.) फुंकणी. २ शरीरांतील शीर, रक्तवाहिनी.

धर (पु. ना.) भाषण किं० मलमूत्रविसर्ग यांचा कांहींएक काल अटपून धरण्याविषयीं त्या त्या इंद्रियाचेठायीं जो शक्तिविशेष असतो तो. २ भाषणादि व्यवहारीं एकवार केलेला नियम इ० त्यास अन्यथा न होऊं देण्याविषयीं जी स्थिरता तो इ०. ३ (सं.) पर्वत.

धरण (सं. न. ना.) पाणी फुगून पाट इ० कांत चढायाकरितां नदी इ० कांस जो बांध घालितात तें.

धरणी (सं. स्त्री. ना.) पृथ्वी.

धरणीकंप (सं. पु. ना.) भूकंप.

धरणें (सं. धृ०) (धा. ना.) मुष्टि इ० कानें कांहींएक पदार्थ गवसून राही असा करणें. २ कांहींएक पदार्थ किं० गोष्ट लक्ष्यांत ठेवणें. ३ (पु.) (ग्रं०) तगादा.

धरणेंपारणें (न. ना.) एक दिवस जेवावें; एक दिवस उपवास करावा असें एक व्रत आहे तें.

धरबंद, बंध (पु. ना.) अमुक रीतीनें अमुक गोष्ट व्हावी अन्यथा होऊं नये असा प्रमाणपूर्वक जो एक नियम असतो तो. २ धर.

धरसोड (स्त्री. ना.) कोणेक पदार्थ, गोष्ट इ० कांतील कांहीं अंश धरणें व कांहीं सोडणें असा व्यापार तो.

धरा (सं. स्त्री. ना.) पृथ्वी.

धर्म (सं. पु. ना.) ज्याणें ज्याणें जें जें कर्म करावें म्हणून शास्त्रानें सांगितलें आहे त्या त्या मनुष्याचा तें तें कर्म तो किं० त्याच्या अनुष्ठानानें जें पुण्य उत्पन्न होतें तो. २ प्राणिमात्रापासून प्रतिदान किं० प्रत्युपकारादि न इच्छितां अन्न, उदक, द्रव्य इ०कांचें यथायोग्य दान तो. ३ पदार्थमात्रावर विशेषणत्वेंकरून भासमान जो गुण, जाति इ० तो. [तृण.

धर्मधेनु (स्त्री. ना.)(ग्रं०)हरळीनामक

धर्मपोई (स्त्री. ना.) दुष्काळांत किं० मार्गादिकांचेठायीं अन्न, उदक घेऊन बसून आल्यागेल्या भुकेल्या तान्हेल्यास धर्मार्थ अन्नउदकाचें दान करितात ती.

धर्मशाला, शाळा (सं. स्त्री. ना.) मार्गादिकांचे ठायीं पांथस्थांस उतरायासाठीं धर्मार्थ जें घर बांधून ठेविलें असतें ती.

धर्मशास्त्र (सं. न. ना.) वर्णाश्रमधर्मांचें प्रतिपादक जें मन्वादिप्रणीत शास्त्र तें.

धर्मात्मा (सं. वि०) निरंतर दान धर्म करीत असावें अशी ज्याची अंतःकरणवृत्ति तो. [दान तो.

धर्मादाय (सं. पु. ना.) धर्मार्थ जें

धर्माध्यक्ष (सं. पु. ना.) धर्मसंबंधी जो अधिकारी तो.

धव (सं. पु. ना.) नवरा.

धवल (सं. वि०) पांढरा.

धवळार (सं. धवल, आलय)(न.ना.) गच्ची इ० कानें सुशोभित मंदिर तें.

धश्चोट (वि०)मान अपमान न पाहतां मिळेल तेथें खावें, मनस्वी नाचत उडत असावें अशा स्वभावाचा जो त्यास म्हणतात.

धष्टपुष्ट (वि०) धट्टाकट्टा.

धसकट (न. ना.) तूर इ० लहान लहान झाडें किं० खांद्यांचीं अग्रें तोडिलीं असतां शरीर, वस्त्र इ०कांस लागाया जोगें खुंट किं० त्याच आकाराचें खिळ्याचें अग्र इ० तें.

धसका (पु. ना.) भयानें हृदयांत धक्का बसतो तो.

धसकावणें (धा. ना.) वांकडातिकडा पदार्थ चिरल्यानें इ० नासेल हें भय मनांत न धरितां तोडणें, फाडणें, ओढणें इ० करणें.

धसफस (स्त्री. ना.) कलहापूर्वीं परस्परांचें यत्किंचित् तुटकें भाषण ती.

धस्स (न. ना.) धक्का.

धसाळ, साळू (वि०) (ग्रं०) शिराळू. २ वेडा. ३ मोठें.

धाक (पु. ना.) भय.

धाकटा (वि०) लहान.

धाकला (वि०) धाकटा.

धाकुटा (वि०) (ग्रं०) धाकटा.

धांगडधिंगा (पु. ना.) ज्याम तालनत नाहीं अशा नाचण्याचा गोंधळ तो

धाटी (स्त्री. ना.) धाटणी, रीत, मार्ग.

धाड, धाडी (स्त्री. ना.) सर्वस्वनाशकारक जे अग्नि, चोर इ० त्यांचा अकस्मात् जो कोणेकावर त्या त्या प्रकारेंकरून पात ती. २ याचक,

पाहुणे इ०कांचेंही पतनास ह्मणतात.

धाडणें (धा. ना.) मनुष्य, कागद, निरोप इ० कोणेकस्थळीं कोणेक मनुष्याशीं आज्ञादिद्वारा जाई असा प्रवृत्त करणें.

धाडस (न. ना.) धारिष्ट.

धांडोळा (पु. ना.) (ग्रं०) शोध.

धाणें (धा. ना.) तृप्त होणें.

धात (सं. धातु) (स्त्री. ना.) रेत. २ (ग्रं०) कथा इ०कांत जी कल्पित गोष्ट सांगतात ती.

धातु (सं. स्त्री. ना.) धात. २ रक्त, मज्जा इ० सात प्रकारची ती. ३ सोनें, रुपें इ० ती प्रत्येक.

धातुराशी (पु. ना.) (ग्रं०) देह.

धातुर्वाद (पु. ना.) (ग्रं०) सुवर्ण इ० करण्याची विद्या.

धात्री (सं. स्त्री. ना.) आंवळी. २ आवळकटी. ३ दाई. ४ पृथ्वी.

धांदल (स्त्री. ना.) चित्त स्वस्थ नसल्यामुळें कांहींएक कार्याची जी अव्यवस्था होत्ये ती. २ चित्ताची व्यग्रता ती. [खंडत्व.

धांदा (पु. ना.) (ग्रं०) दोरा. २ अ-

धादांत (पु. ना.) शास्त्रमतास अनुकूल असो कीं नसो असें आपले अनुभवावरून च जो कोणेक गोष्टीविषयीं सिद्धांत वाटत असतो तो. २ (वि०) धडधडीत.

धादावणें (धा. ना.) कांहींएक पदार्थाचे प्राप्तीविषयीं अतिशयित उत्कंठित होणें. [तें.

धान्य (सं. न. ना.) गहूं, हरभरा इ०

धान्यबणवी (धान्य, वणवा) (ग्रं०) (स्त्री. ना.) अकस्मात् धान्य जळण्याचा व्यापार ती.

धाप (स्त्री. ना.) दमा. २ धांवणें इ० कामुळें जी श्वासाची अधिक गति होत्ये ती.

धाबळ,ळी (स्त्री. ना.) ऊर्णा वस्त्र आहे.

धाबें (न. ना.) घरावर मातीचा पेंडा घालून आच्छादन करितात तें. २ कोणेकास धाब्यावर बसविणें म्ह० त्यापासून द्रव्यादि घेऊन त्यास हिंगो दाखविणें किं० सर्वस्व हरण करून भिकेस लावणें.

धाम (सं. न. ना.) (ग्रं०) तेज. २ राहाण्याचें घर तें. ३ (प्रा. स्त्री. ना.) एकसमयावच्छेदेंकरून मनुष्य, पशु इ०कांस ज्वरादि उपद्रवाची व्याप्ति होते ती.

धामधूम (स्त्री. ना.) लोकांस उपद्रव व्हावयाजोगी परचक्रादिकृत गडबड ती.

धाय (स्त्री. ना.) (ग्रं०) रडण्याची मोठी आरोळी ती मोकल, फोड इ० योगीं प्र०. २ समाधान.

धायकंप (पु. ना.) (ग्रं०) संकल्पविकल्प.

धायपण (न. ना.) (ग्रं०) पालन, संरक्षण. २ समाधान.

धाया (स्त्री. ना.) (ग्रं०) दाई.

धार (सं. धारा) (स्त्री. ना.) जलादि पातळ पदार्थ वरून पडत असतां त्याचा जो दोरीसारखा आकार दिसतो ती. २ ज्यास वेग बहुत असा जो नद्यादिकांचा प्रवाह ती. ३ श-

स्त्रानें जिंकडून कापायाचें तिकडील जो शस्त्राचा भाग तो. ४ पर्वताची मस्तकप्रदेशाची कड ती. धार काढणें म्ह॰ दूध काढणें इ०.

धारक (सं॰ वि०) धारण करणारा जो तो. २(ग्रं०)(न.)युद्ध. ३ (पु.)धाक.

धारजिणा (वि०) जो मनुष्य, पशु, व्यवहार, देव इ० ज्या मनुष्यादिकानें सेविला असतां फलद्रूप होतो तो त्यास.

धारजिणें (न. ना.) मनुष्यादिक सेविलें असतां आपल्यास त्यानें फलद्रूप व्हावें असा जो काहीं दैवयोग असतो तें.

धारण (सं. न.ना.) धरण्याचा व्यापार तें. २ (स्त्री. ना.) धान्यादिविक्रयीं अमुक प्रमाण धान्यादिकास अमुक द्रव्य पडतें असा जो नियम चालला असतो ती. पांचावर धारण बसणें म्ह० भयानें विव्हळ होणें. ३ (पु.) घराचा आधारस्तंभ.

धारणा (सं. स्त्री. ना.) बुद्धि.

धारणू (पु. ना.)(ग्रं०)वाळलेलें काष्ठ.

धारणेंपारणें (न. ना.) धरणें पारणें.

धारसा (पु. ना.) (ग्रं०) लोकरूढी. २ जलाचा प्रवाह.

धारसें (न. ना.) (ग्रं०) धरण.

धारा (सं. पु. ना.) शेत इ० कांस जें राजकीय देय तो. २ अमुकानें अमुक करावें, अमुकास अमुक द्यावें असा जो भाडें, विक्रय, चाकरी इ० व्यवहाराविषयीं संप्रदाय पडला असतो.

धाराधरकाळ (पु. ना.) (ग्रं०) पर्जन्यकाळ.

धारिष्ट (सं. न. ना.) कोणेक कार्यापासून भय इ० कानें पराङ्मुख न होण्याविषयीं अंतःकरणाचा दृढतारूप गुण तें.

धारुष्ण (न. ना.) धातुपुष्टी इ० कांसाठीं कासेंतून काढिताच तें ऊन ऊन पितात दूध तें.

धारें (न. ना.) गवाक्ष.

धार्मिक (सं. वि०) धर्मात्मा.

धालेपण, पणा (पु. न. ना.) (ग्रं०) तृप्ति.

धांव (धावणें) (स्त्री. ना.) त्वरेनें चालण्याचा जो व्यापार ती. २ गाडीचे चाकाभोंवती जी लोखंडाची पट्टी मारिली असत्ये ती. ३ मोटेचे बैलास मोट वाहतांना जो प्रदेश चालावा लागतो ती. ४ कांहीं खर्चवेंच इ० करण्याविषयीं आपले शक्तीची किं० संकल्पाची कोणेक अवधीपर्यंत गति ती.

धांवकारू (पु. ना.) (ग्रं०) पाठराख करण्याविषयीं धांवणारा तो.

धांवणें (धा. ना.) (सं. धावन) अतिशयित वेगानें चालणें. २(न.ना.) चोरधरणें, आगविझाविणें इ०कांसाठीं राजसेवकाचें जें धांवत आगमन तें. ३ धांवत येणारे जे राजसेवकादिक तें. ४ (ग्रं०) जाळणें.

धांवा (धांवणें) (पु. ना.) स्वसंकटनिवृत्त्यर्थ ईश्वरादिकांस धांवत यावें अशी जी प्रार्थना तो. २ त्याच अर्थाचीं जीं गाणीं असतात तो.

धांवाधांव (स्त्री. ना.) कांहीं संकटादि

निवारणार्थ अनेक उपाय त्वरेनें केले पाहिजेत ह्मणून इकडे धांव तिकडे धांव इ० रूप जी खटपट ती.

**धाविन्नणें** (धा. ना.) (ग्र०) धांवणें.

**धास्त** (अर० स्त्री. ना.) एकवार घेतलेल्या भयाचा किं० शोकाचा वारंवार धस्स धस्स व्हावयाजोगा अंतःकरणांत जो संस्कार राहातो ती. २ दहशत.

**धास्ती** (स्त्री. ना.) धास्त.

**धिक्** (अव्य०) व्यर्थतादिमूलक तिरस्कार विधानाचें द्योतक.

**धिक्कार** (सं. पु. ना.) कोणेक गोष्टीची किं० पदार्थाची धिक्, वाईट, छिः इ० शब्दांनीं निंदा तो.

**धिंग** (पु. ना.) (ग्रं०) कीर्तन इत्यादिकांचा गजर तो.

**धिंगाणा** (पु. ना.) इकडून तिकडे उड्या मारणें, नाचणें इ० उनाडक्या करण्याचा व्यापार तो.

**धिंगामस्ती** (स्त्री. ना.) दांडगेपणानें मारामार करणें, उड्यामारणें इ० व्यापार ती.

**धिटीव** (स्त्री. ना.) (ग्रं०) धीटपणा.

**धिंड** (स्त्री. ना.) चोरादिकांस अप्रतिष्ठा होण्यासाठीं गाढवावर बसवून पांच पाट काढणें इ०कानें विशोभित करून ग्रामादिकांत वाद्यादिपूर्वक फिरवितात ती इ०.

**धिंडवडा** (पु. ना.) शिव्यागाळी देऊन जी अप्रतिष्ठा किं० कोणेकाचे कुकर्माचा बोभाटा तो.

**धिपाड, प्याड** (वि०) फार उंच तो.

**धिमा, धिम्मा** (वि०) क्रोधादिकानें उतावळा होत नाहीं असा स्वभाव ज्याचा तो.

**धिरा** (धीर०)(पु. ना.) तुळई इ०कांस खांबासारिखा जो टेंका देतात तो.

**धिरेधिरे** (अव्य०)अतित्वरा नकरितां.

**धिवसा** (पु. ना.) (ग्र०) धैर्य.

**धी** (सं. स्त्री. ना.) बुद्धि.

**धीट** (वि०) धट्ट.

**धीर** (सं. पु. ना.) धारिष्ट. २ कर्तव्यकार्य, प्राप्तव्यलाभ इ०कांसाठीं उतावळेपणा न होण्याविषयीं कारण जो अंतःकरणनिष्ठ धर्मविशेष तो. ३ (वि०) गंभीर.

**धीवर** (सं. पु. ना.)कोळी ह्मणून एक [जाति आहे तो.

**धुई** (स्त्री. ना.) थंडीचे दिवसांत किं० पर्जन्यकाळीं आकाशांत धुरासारिखें जे येतें ती.

**धुकट** (न. ना.) धुई.

**धुकें** (न. ना.) धुई.

**धुगधुगी** (स्त्री. ना.) बाकीचे अवयव सर्व निश्चेष्टित पडून केवळ कंठप्रदेशीं मात्र अवशिष्ट जो प्राणांश ती. २ गळ्यावरची खळी.

**धुगधुग** (स्त्री. ना.) धुगधुगी.

**धुडका** (पु. ना.) वस्त्रादिक फाटून झाल्या ज्या अनेक चिंध्या तो. २ वादी, प्रतिवादी इ०कांची जी दुर्दशा ती.

**धुडकावणें** (धा. ना.) वादी इ० कांस पराभूत करून टाकणें.

**धुडगूस** (पु. ना.) वस्त्रादिक चुरून मळून दुर्दशा पावे असा त्यांजवर

नाचणें लोळणें इ० व्यापार तो.
**धुंडणें** (धा. ना.) कांहीं पदार्थ सा- पडायासाठीं तें तें त्याचें स्थळ अवय- वशः पाहाणें.
**धुंडाळणें** (धा. ना.) धुंडणें.
**धुणी** (स्त्री. ना.) शरीर इ० कांतील मल रोगांश इ०कांच्या निःशेष जा- ण्याचा प्रकार ती. २ गोसावी, वै- रागी इ०क क्वचित् स्थलीं नेहेमीं अग्नि बाळगीत असतात ती.
**धुणें** (सं. धावन) (धा. ना.) जला- दिकानें वस्त्रादिक निर्मळ करणें. २ (न.) धुवायाचें जें वस्त्र तें.
**धुतारा** (सं. धूर्त) (वि०) लोकांस भोंदून ठकवितो तो.
**धुंद** (वि०) मद्यादि मदानें ज्याची शु- द्धि गेली आहे तो किं० त्याचे डोळे. २ दूरवर स्वच्छ न दिसायाजोगें धूळ, धूर इ० कांमुळें झालें जें आ- काश, दिशा इ० तें.
**धुंदाई** (स्त्री. ना.) राजादि धन्याचें भय न बाळगितां ज्यास बळ होईल त्यानें मारावें, लुटावें इ० जो राज्या- दिकांचेठायीं वर्तनप्रकार ती.
**धुंदी** (स्त्री. ना.) मद्यादिकांचा जो उन्माद ती. [२ दिवटीचा पोत तो.
**धुंधुरू** (पु. ना.) (ग्रं०) काजवा.
**धुपणें** (धा. ना.) धुतलें जाणें. २ अ- ग्निसंयुक्त काष्ठादिक न पेटतां धूमयु- क्त होणें. [डगाई.
**धुमश्चक्री** (स्त्री. ना.) झिंबड. २ दां-
**धुमाडू** (पु. ना.) (ग्रं०) अधिकपणा
**धुमाळी** (स्त्री. ना.) धुंदाई. २ झिंबड
**धुरंधर** (वि०) राजकार्यादि व्यवहारा- चा भार मुख्यत्वेंकरून ज्याजवर असतो तो. २ ज्या कार्यांत जो पुरा प्रवीण तो त्याविषयीं.
**धुरधूर** (अव्य०) (ग्रं०) पुढें पुढें.
**धुरळा** (पु. ना.) मार्गादिकांवर के- वळ बारीक झालेली जी मृत्तिका अ- सते तो.
**धुरसा** (पु. ना.) (ग्रं०) अग्रभाग.
**धुराडी** (स्त्री. ना.) अतिशयित धूर ती.
**धुराडें** (न. ना.) चूल इ०कांचे व- रील प्रदेशीं धूर बाहेर जावा म्हणून गवाक्ष राखितात तें.
**धुरी** (स्त्री. ना.) कांहीं कारणास्तव कांहीं औषधादिक अग्नींत घालून धू- र करितात ती. २ (ग्रं०) पुढीलप- णा अशा अर्थावरून विषयसन्मुख- ता ती.
**धुरे** (अव्य०) (ग्रं०) पुढें.
**धुरोळा** (पु. ना.) धुरळा.
**धुलाई** (स्त्री. ना.) वस्त्रें धुतल्याची परटास मजूरी देतात ती.
**धुवट** (वि०) धुतल्यामुळें कोरेपणा जाऊन स्वच्छ झालेलें वस्त्र तें.
**धुसमुसणें** (धा. ना.) आंतचे आंत फुंदून फुंदून रडणें.
**धुसर** (पु. ना.) (ग्रं०) गुलाल, बुक्का इ० उधळायाचें द्रव्य तो.
**धूड** (न. ना.) मोठ्या शरीराचा जो मनुष्यादि त्यास म्हणतात.
**धूप** (सं. पु. ना.) झाडाचा चीक आ- हे. २ सुगंधि धूर यावा म्हणून जा- ळितात जें ऊद इ० तो.

धूम (सं. पु. ना.) अग्नीस ओल्या लांकडाचा संयोग झाला असतां त्या ओलेपणाचा परिणाम होऊन जो ऊर्ध्वगति पावत असतो तो. २ (स्त्री.) धावप्रथमार्धी. ३ सैन्यादिकून दंगयास म्हणतात इ०.

धूमकेतु (सं. पु. ना.) शेंडेनक्षत्र.

धूम्र (सं. पु. ना.) धूर.

धूम्रपान (सं. न. ना.) गोसावी इ० तपश्चर्येसाठीं अग्नीवर उलटें टांगून ठेवून धूर भक्षण करितात तें. २ गुडगुडी ओढण्यास संकेतानें ह्मणतात.

धूर (पु. ना.) धूम्र. २ गाडा गाडी इ० कांचा अग्रभाग. ३ पायाचे अंगठ्याचे पाठीमागें उंच जो पावलाचा पृष्ठभाग तो.

धूर्त्त (सं. वि०) न बोलतां आकारादिकांवरून दुसऱ्याचें इंगितादि जाणणारा चतुर तो. २ दुसऱ्यास फसविण्याविषयीं अनेक कपटयुक्ति जाणणारा लबाड तो.

धूळ (स्त्री. ना.) बारीक झालेली मृत्तिका ती. २ कोणेक मनुष्यादि पदार्थ किं० व्यवहार यांची झाली जी दुर्दशा तिला ह्मणतात.

धूळधाणी (स्त्री. ना.) दुर्दशा.

धृति (सं. न. ना.) धैर्य.

धेंड (न. ना.) विद्या, पराक्रम इ० गुणानें, मान्यतेनें जो जड तें.

धेडगुजरी (वि०) अनेक भाषांचे शब्दांचा संकर ज्यामध्यें आहे असें भाषण तें.

धेनु (सं. स्त्री. ना.) गाय.

धैर्य (सं. न. ना.) धीर.

धैर्यवान् (सं. वि०) धैर्याचा.

धोकटी (स्त्री. ना.) (ग्रं०) शरीर.

धोकड (वि०) (ग्रं०) बळवान्.

धोका, धोंका (पु. ना.) कांहींएक अनिष्ट प्राप्त होईल अशी जी भयाची संभावना असते ती. २ व्यवहारादिकांत बसते चपेट ती.

धोंगटी (स्त्री. ना.) वस्त्रा इ० डोकी करण्याचें साहित्य न्हावी ज्यांत बाळगीत असतो असें चर्मपात्र आहे ती. २ पडशी.

धोंड (स्त्री. ना.) मोठा जो धोंडा ती.

धोंडी (स्त्री. ना.) (ग्रं०) धोंड. २ आकार.

धोंडभट्टी (स्त्री. ना.) जलस्नान न करितां स्नान केल्यासारिखें दिसावें म्हणून भस्म, गंध इ० कांचें धारण करितात ती.

धोंडा (पु. ना.) दगड. २ अधिक मास. ३ अधिक मासांत आंत पुरण घालून कणकीचें पक्वान्न करितात तो.

धोत (पु. ना.) पाण्याचा किं० अग्नीचा लोट तो.

धोतरा (सं. धत्तूर) (पु. ना.) एक फुलझाड आहे. २ त्याचें बीं तें.

धोधा (पु. ना.) उंच प्रदेशावरून मोठी जी पाण्याची धार पडत असते ती.

धोपट (वि०) लहान मोठे सर्व जावात येतात असा जो सरळ मोठा मार्ग तो.

धोपटणें (धा. ना.) काठी इ०कानें

काहींएक पदार्थ किं० मनुष्यादिक यास पुष्कळ बडविणें.

धोपाटी (स्त्री. ना.) दोहों हातांनीं काठी उचलून बळानें जो गुरूं इ० कांवर तडाखा देतात ती.

धोबी (पु. ना.) परीट.

धोरण (न. ना.) कोणेक कार्यादिक या या प्रकारें होईल, असेल इ०रूप अनुमानादिकांवरून जो तर्क मनांत येतो तें किं० तो तर्क करण्याविषयीं उपयुक्त जें बुद्धिपाटव तें. २ (ग्रं०) सुषुम्नानाडीचा मार्ग.

धोशा (पु. ना.) काहीं कार्यावर झटून प्रवृत्त होण्याचा प्रकार तो.

ध्यान (सं. न. ना.) ईश्वराचें स्वरूप मनांत आणून काहिंएक वेळ पाहाण्याचा व्यापार तें. २ अंतःकरण, मन. ३ आकृति. ४ चिन्ह.

ध्यानींमनीं (अव्य०) अंतःकरणाच्या अवस्थादिभेदेंकरून होणाऱ्या ज्या असंख्यात वृत्ति त्यांतील एकाही वृत्तींत, नसणें याच्या योगीं प्रयोग.

ध्यास (सं. पु. ना.) काहिंएक गोष्टीचा किं० पदार्थाचा क्षणमात्रही विसर पडत नाहीं असा जो अंतःकरणास भाव होतो तो.

ध्रुपद (सं. न. ना.) गाण्यांत एक चीज आहे. २ पालोपद.

ध्रुव (सं. पु. ना.) पृथ्वीचे उत्तरेस एक तारा आहे. २ (वि०) निश्चळ.

ध्वज (सं. पु. ना.) देवालय किं० राजद्वार इ० कांपुढें उंच स्तंभ पुरून चिन्हविशेषांकित त्याजवर वस्त्र लावितात तो. राजादिकांच्या स्वारीपुढें त्या स्तंभासुद्धां यशाचें चिन्ह ह्मणून चालत असतो तो.

ध्वजा (स्त्री. ना.) ध्वज.

ध्वनि (सं. स्त्री. पु. ना.) श्रोत्रेंद्रियास ग्रहणयोग्य जें शब्दसामान्य तो. २ (ग्रं०) भावार्थ, अभिप्राय. ३ संशय.

ध्वनित (सं. वि०) ध्वनीनें ज्ञापित जो अर्थ तो. २ (ग्रं०) अस्पष्ट, गुप्त.

---

—न—

न—हा वर्ण विसावें व्यंजन आहे. (अव्य०) निषेधार्थक.

नई (स्त्री. ना.) (ग्रं०) नदी.

नकटा (वि०) ज्याचें नाक कापलें आहे किं० अखूड आहे किं० बसकें आहे तो.

नकल, नक्कल (अर० स्त्री. ना.) दस्तऐवजीं कागद, ग्रंथ इ० कांची जी लिहून केली प्रत ती. २ चमत्कारजनक किं० हास्यजनक जो भाषणादि व्यापार तो. ३ काहिंएकासारखा दिसे असा केला दुसरा पदार्थ किं० भाषणादिक ती. ४ निर्वंश.

नकशा (अर० पु. ना.) गृहादिकांचा आकार कागद इ० कांवर काढितात तो. २ सर्वांनीं चांगलें म्हणायाजोगें जें काहिंएक कर्म तो. ३ दुसऱ्याचे ईर्ष्येनें केलें जें अधिक कर्म तो.

नकशी (अर० स्त्री. ना.) काष्ठ, वस्त्र इ० कांवर वेलबूट, जाळी इ० जें बारीक काम करितात ती.

नकार (पु. ना.) नाहीं म्हणणें असा जो व्यापार तो. [मार्थी.
नकाशा (अर० पु. ना.) नकशा प्रथ-
नकी, नक्की (अर० वि०) अंतर न ठेवितां निखालस सांगायाची जी किंमत इ० ती.
नकुल (सं. पु. ना.) मुंगूस.
नक्त (अर. वि०) रोकडें नाणें तें. २ (सं. न.) रात्र. ३ दिवसभर उपोषण करून रात्रीस जेवावें असें एक व्रत आहे तें.
नक्र (सं. पु. ना.) घोरपड. २ सुसर.
नखरा (फा० पु. ना.) शृंगारचेष्टाप्रदर्शक जो नेत्र इ० शरीराचे अवयवांचा हावभाव तो किं० शरीरावरील वस्त्र भूषणादिकांचा रचनाविशेष तो.
नखी (स्त्री. ना.) सतार, सारमंडळ इ० वाजवितेवेळेस जें तारेचें वलय करून बोटांत अडकवितात तीं. २ (ग्रं०) निश्चय.
नखुरडें (न. ना.) नखांत एक रोग होत असतो तें.
नग (सं. पु. ना.) सुवर्णादिकांचीं स्त्रियांचीं डोकींत घालायाचीं भूषणें आहेत तो. २ अलंकारमात्रासही ह्मणतात. ३ पर्वत.
नगद (अर० न. ना.) नक्त. [ग तें.
नगनगोटें (न. ना.) लाहान मोठे न-
नगर (सं. न. ना.) मोठी वस्ती असून प्रसंगीं प्रायशः सर्व पदार्थ ज्या स्थळीं मिळतात तें.
नंगा (सं. नग्न) (वि०) वस्त्रादिरहित जो मनुष्य तो. २ निर्द्रव्य जो मनुष्य त्यास ह्मणतात. [चर्मवाद्य आहे.
नगारा (अर० पु. ना.) एक थोर
नग्न (सं. वि०) नंगा.
नजर (अर० स्त्री. ना.) दृष्टि. २ राजादिकांची जी कृपा ती किं० ती संपादण्यासाठीं त्यास जो पदार्थ नेऊन देतात तो. [द्वितीयार्थक.
नजरनजराणा (अर० पु. ना.) नजर-
नजराणा (फा० पु. ना.) नजरद्वितीयार्थी. [प्रदेशीं.
नजीक, ख (फा० अव्य०) जवळच्या
नट (सं. पु. ना.) स्त्रिया इ०कांचा वेष धारण करून नाचतो किं० अनेक प्रकारचे खेळ करून उपजीवन करितो तो. २ नटण्याचा स्वभाव ज्याचा त्यास ह्मणतात. ३ मनुष्यांत एक जाति आहे.
नटणें (धा. ना.) अलंकार, वस्त्र इ०कांनीं, हावभावांनीं सुशोभित बनणें. २ कोणकाचा वेष धारण करणें.
नटी (सं. स्त्री. ना.) सूत्रधाराची जी स्त्री ती.
नठयाळ (वि०) (ग्रं०) नष्ट, द्वाड.
नड (स्त्री. ना.) कांहीं कार्याविषयीं जें प्रतिबंधक तें.
नडनाच, नाचू (पु. ना.) (ग्रं०) मिष. २ आधिक्य, उत्कर्ष.
नत (सं. वि०) नम्र.
नतद्रक्ष (वि०) अतिकृपण.
नथणी (स्त्री. ना.) नथ. २ बैल इ०-

कांचें नाक टोंचून जी दोरी घालितात ती. ३ दरवाजास कुलपाचे अभावीं कोंयड्यांत कडी अडकवून त्यांत खिळा इ०कांचीं वाळी करून घालितात ती.

नद (सं. पु. ना.) शोणभद्रादि तीन आहेत ते प्र०. यांचा आकार नदीसारखाच असतो.

नंदक (सं. पु. ना.) विष्णूचा खड्ग.

नंदन (सं. पु. ना.) पुत्र. २ स्वर्गीं देवांचा बाग आहे तो.

नंदादीप (सं. पु. ना.) जो दिवा रात्रंदिवस देवाजवळ जळत ठेवितात तो.

नदी (सं. स्त्री. ना.) भागीरथी, यमुना इ० त्या प्रत्येकीं.

नंदी (सं. पु. ना.) महादेवाचें वाहन जो बैल तो. २ मूर्ख.

नंदीबैल (पु. ना.) ज्या बैलास मान हलविणें इ० संकेत शिकवून त्याजवर वस्त्र, अलंकार इ० घालून घरोघर फिरवून उपजीविका करीत असतात तो जो बैल तो.

नदीमातृक (सं. वि०) ज्या देशादिकांच्याठायीं नदीचेंच उदकानें धान्यादि पिकतें तो देशादिक तो.

नपुंसक (सं. वि०) जो स्त्री नव्हे आणि जो पुरुष नव्हे तो प्राणी. २ व्याकरणांत शब्दांचीं तीन लिंगें आहेत त्यांतील एक. ३ पराक्रमहीन पुरुषास ह्मणतात.

नफा (अर० पु. ना.) दुकान इ० व्यवहारांत खर्च वेच फिटून व व्याजमुद्दल सुद्धां ऐवज उगवून वर जो पैका मिळतो तो. २ लाभमात्रास ह्मणतात.

नभ (सं. न. ना.) आकाश.

नमन (सं. न. ना.) हात जोडणें, नमस्कार करणें इ० व्यापार तें. २ पुराणादिकांचे आरंभीं ईश्वराच्या स्तुतीचे श्लोकादि ह्मणतात ते.

नमस्कार (सं. पु. ना.) नमनप्रथमार्थीं. २ परस्पर सत्कारार्थ ब्राह्मण हात जोडणें इ० व्यापार करितात तो. कोणेकास नमस्कार असो ह्म० त्याचें नांवही घेऊं नये असा अर्थ.

नमुना, नमोना (फा० पु. ना.) नकाशाप्रथमार्थीं. २ कांहींएक वस्तूचें परिज्ञान होण्यासाठीं जो केवळ त्या सारखाच पदार्थ पाहतात तो किं० समुदित पदार्थाचें स्वरूप समजायासाठीं त्याचा एक देश पाहातात तो.

नम्र (सं. वि०) भारादिकानें जो नमला तो. २ उद्धत नव्हे तो.

नयन (सं. न. ना.) डोळा.

नयोका (स्त्री. ना.) (ग्र०) नदी.

नर (सं. पु. ना.) मनुष्य. २ सर्व जातीय पुरुषव्यक्तिमात्र. ३ घोडा. ४ मळसूत्री खिळा व बिजाग्र अडकावा याचा खिळा तो. ५ (ग्रं०) अर्जुन.

नरक (सं. पु. ना.) यमाचे नगरींत पूय, विष्टा, रक्त इ०कांचा समुदाय आहे तो; ज्यामध्यें पातकी जनांस यम टाकितो. २ विष्टा.

नरडी (स्त्री. ना.) दाढीच्या खालचा जो गळ्याचा मध्यप्रदेश तो.

नरडें (न. ना.) नरडी.

नरम (फा० वि०) कठोर, कडक नव्हे असा जो मनुष्य, काष्ठ, वस्त्र इ० पदार्थ तो. २ ज्या ज्या पदार्थामध्यें जें जें तेज असावें तें ज्यांत न्यून आहे त्यास म्हणतात.

नरयान (सं. स्त्री. ना.) (ग्रं०) पालखी, मेणा इ० तें. [गंधि पदार्थ.

नलद (सं. पु. ना.) वाळा नामक सुं-

नलिन (सं. न. ना.) कमल.

नव (वि०) नऊ. २ नूतन.

नवचणें (धा. ना. (ग्रं०) नजाणें.

नवजणें (धा. ना.) (ग्रं०) नवचणें.

नवज्वर (स. पु. ना.) जो ज्वर सारखा नऊ दिवस असतो तो.

नवट (वि०) ज्याचें नवेपणाचें चिन्ह व गुण गेला नाहीं तो.

नवती ((स्त्री. ना.) तारुण्य दशा ती. २ वसंतऋतूमध्यें नागवेलीस नवी पानें फुटण्याची अवस्था ती.

नवनवती (स्त्री. ना.) तारुण्याची जी आरंभदशा ती.

नवनिशित (वि०) नवी धार लावलेला, पाजविलेला जो बाण इ० तो.

नवनीत (सं. न. ना.)लोणी. २ सार.

नवरस, रसू (पु. ना.) शृंगार, वीर, करुणा इ० नऊ रस ते प्र०. २ (प्र०) असार बोलणें तो.

नवरा (पु. ना.) विवाहयोग्यता आल्यापासून विवाह होईपर्यंत तो. २ ज्या स्त्रीचा जो पति तो तिचा.

नवरात्र (सं. न. ना.) नऊ अहोरात्रांचा जो चैत्रशुद्ध किं० आश्विनशुद्ध प्रतिपदेपासून नवमीपर्यंत समुदाय तें. २ त्या दिवसांत जो देवाचा उत्साह तें.

नवरी (स्त्री. ना.) विवाहयोग्यता आल्यापासून विवाह होईपर्यंत जी स्त्री ती. २ ज्या नवऱ्याची जी बायको ती त्याची परंतु प्राय: ऋतु प्राप्त होईपर्यंत व्यवहार.

नवल (न. ना.) आश्चर्य. २ सांगायाजोगी किं० ऐकायाजोगी. जी कांहीं नवी गोष्ट तें.

नवलपण (न. ना.) (ग्रं०) नवेपण. २ अनोळख. [त्या अर्थी.

नवलविशेष (न. ना.) नवलदुस-

नवली (स्त्री. ना.) उत्तम भक्षणादिक मिळाल्यामुळें किं० विशेष सुख झाल्यामुळें जी शरीरावर तेजगी येत्ये ती.

नववधू (सं. स्त्री. ना.) नवी नवरी.

नवस (पु. ना.) कांहींएक कार्य सिद्ध व्हावें ह्मणून देवादिकाची प्रार्थना करून त्यास कांहीं पदार्थाच्या अर्पणाविषयीं किं० सेवेविषयीं प्रतिज्ञा करितात तो किं० अर्पणविषयत्वेंकरून उद्दिष्ट जो पदार्थ तो.

नवससायास (पु. ना.) कांहींएक कार्यासाठीं जो नवसादिक प्रयत्न तो.

नवा (वि०) ज्याचे उत्पत्तीस बहुत दिवस झाले नाहींत तो. २ ज्या कार्याविषयीं जो योग्य तो त्या कार्यांत निपुण झाला नाहीं तोंपर्यंत तद्विषयीं तो आणि त्यास तें कार्यही. ३ जो पदार्थ उपभोगादिकेंकरून जर्जर झाला

नव्हे तो इ० ४ अपरिचित. [पूर्वता.
**नवाई** (स्त्री. ना.) (ग्रं०) नवल. २अ-
**नवाजणें** (धा. ना.) (ग्रं०) स्तुतिकरणें.
**नवानवशांचा** (वि०) ज्या पोराकारि-
तां बहुत नवस केले तो. २ बहुत प्रय-
त्नानें मिळाला जो पदार्थ त्यास ह्मण-
तात.
**नवार** (स्त्री. ना.) तीन, चार बोटें रुं-
दीचें आणि लांब पुष्कळ असें पलंग
विणायाचे उपयोगी वस्त्र आहे तें.
**नवाळ, नवाळी** (स्त्री. ना.) (ग्रं०) ट-
वटवीतपणा. २ प्राप्ति.
**नवीनवती** (स्त्री. ना.) नवनवती.
**नवीन** (सं. वि०) नवा.
**नवेंजुनें** (न. ना.) राज्यादिकामध्यें
कारभारी इ० कांच्या अदलाबदलीचा
प्रकार तें. २ नवें जुनें परस्पर बद-
लण्याचा प्रकार तें.
**नवोढा** (सं. स्त्री.) नववधू.
**नव्हाळी** (स्त्री. ना.) (ग्रं०) प्राप्ति. २न-
वेपणा, टवटवीतपणा. [व्हावयाचा तो.
**नश्वर** (सं. वि०) ज्याचा अवश्य नाश
**नष्ट** (सं. वि०) दुसऱ्याचा नाश किं०
वाईट करण्याचा ज्याचा स्वभाव तो.
२ जो नाश पावला किं० हरवला
इ० कारणांनीं नाहींसा झाला तो.
**नष्टचर्य** (सं. न. ना.) दुर्दैव.
**नसरतें** (वि०) (ग्रं०) हीन. २ निंद्य.
**नसीब, शीब** (अर० न. ना.) दैव.
**नस्त** (न. ना.) समुद्रांत गलबत चा-
लण्यास अवघड जागा तें.
**नस्य** (स. न. ना.) नाकांत औषध
घालितात किं० ओढितात तें.

**नहर** (अर० पु ना.) शहर इ० कांत
बाहेरचें पाणी आंत आणायासाठीं
किं० आंतलें बाहेर न्यावयासाठीं भू-
मींतून दांडा बांधून काढितात तो.
**नळ** (सं. नल) (पु. ना.) नहर.
२ पोटांत एक अवयव आहे, जो वा-
यूच्या योगानें फुगतो तो. ३ जमिनीं-
तून पाणी बांधून आणायासाठीं किं०
मोरीचें पाणी जावयासाठीं माती, नांबें
इ० कांचा फुंकणीचे आकारासारि-
खा करितात तो.
**नळा** (नळ) (पु. ना.) गृहादिकांवर
आच्छादनार्थ जीं कवलें करितात
त्यांत आकारविशेषाची जाति आहे.
२ दारूचीं फुलें उंच उडावीं ह्मणू-
न मृत्तिका इ० कांचें पात्र दारू भरून
करितात तो. ३ तेल इ० ठेवण्यासा-
ठीं वेळूनें पात्र करितात तो.
**नळी** (स्त्री. ना.) दोन तोंडें मोकळीं
असून मध्यें पोकळ असा जो वेळू-
धातु इ० कांचा तुकडा तो. २ बंदुक.
**नक्षत्र** (सं. न. ना.) निरभ्र आका-
शांत चंद्रावांचून ज्या तारका तें.
२ भचक्राचा २७ वा अंश.
**नक्षत्रनाथ** (सं. पु. ना.) चंद्र.
**नक्षत्रमाळ, माळा** (स्त्री. ना.) वि-
वाहांत समारंभासाठीं वधुवरें मिरवत
असतां कागद इ० कांचीं फुलें क-
रून त्याच्या माळा करून काठीस
बांधून पुढें चालवितात तो. २ देवा-
च्यापुढें शोभेसाठीं जीं पात्रें मांडून
ठेवितात तीं. [२ नाहीं.
**ना** (अव्य०) (ग्रं०) किंवा, अथवा.
**नाइक** (सं. नायक) (वि०) ज्याचे हा-

ताखालीं दाहा पांच मनुष्यें असा सरकार इ० कांचें कामकरणारा तो. २ भाड्याच्या डोल्या, घोडीं इ० कांचे अड्ड्याचा धनी तो. ३ जातीचा ब्राह्मण असून सराफीचें काम करितो त्यास मोठेपणाचा द्योतक त्याच्या नांवापुढें हा शब्द लागतो, कोठें नामावांचूनही प्रयोग होतो.

**नाक** (सं. नासिका) (न. ना.) मुखावरील एक अवयव आहे व त्यांत असणारें गंधग्रहण करणारें इंद्रिय तें. नाकावर माशी न बसूं देणें ह्म० दुसऱ्याचें उणें उत्तर किं० दुसऱ्यानें लाविलेला दोष त्याचें सहन न करणें. नाकीं नवयेणें ह्म० कांहीं कार्य सिद्धीस नेतां थकणें किं० क्लेश पावणें. नाक धरून बसणें ह्म० सर्वदा स्नानसंध्यादिकांत निमग्न असणें. इ० (सं. पु.) स्वर्ग.

**नाका** (पु. ना.) जाण्यायेण्याचे रहदारीचे अनेक मार्ग एकत्र मिळाले असतात अशी जी जागा तो.

**नाकाड** (न. ना.) मोठें नाक तें. २ नाकास निंदेनें ह्मणतात.

**नाकारणें** (धा. ना.) कोणेक पदार्थास किं० व्यापारास खोड ठेवणें. २ कांहीं व्यापार निषेधणें.

**नाकारा** (वि०) निकृष्ट.

**नाकें** (न. ना.) ज्या ठिकाणीं जकात घेतात तें. २ नाका.

**नाकेबंदी** (स्त्री. ना.) प्रतिनाक्यावर विवक्षित मनुष्यादिकांहून इतर मनुष्यास जाण्या येण्याविषयीं जो प्रतिबंध तो.

**नाखवा** (फा० पु. ना.) कोळ्यांमध्यें जो श्रेष्ठ महागिरीचा तांडेलपणा करितो तो किं० ज्याच्या घरचीं खुद्द एक दोन गलबतें आहेत तो.

**नाग** (सं. पु. ना.) सर्पविशेष तो. २ वचनाग. ३ हत्ती. ४ शिसें.

**नागर** (वि०) (ग्रं०) चांगला. २ नगरवासी. [क लोक.

**नागरलोक** (पु. ना.) (ग्रं०) नागरि-

**नांगर** (सं. लांगल) (पु. ना.) भूमि उकरायाचें काष्ठाचे फाळानें युक्त एक औत आहे. २ गलबत इ० पाण्यावर स्थिर राहावें ह्मणून लोखंड इ० कांचा करून गलबताखालीं टाकायासाठीं लांब दोरी बांधून गलबतावर ठेवितात तो. [लोक ते.

**नागरिक** (सं. वि०) नगरसंबंधी

**नागवण** (स्त्री. ना.) चोरांचा उपद्रव, सरकारसंबंधी खंड, दंड किं० व्यापारांत तोटा इ० कांनीं जी द्रव्याची हानि ती.

**नागवणें** (धा. ना.) चोर, राजा इ० कांच्या लुटणें इ० उपद्रवांमुळें त्यानीं कोणेकास द्रव्यादिहीन करणें. २ (ग्रं०) न सांपडणें. ३ लिप्त न होणें.

**नागवा** (वि०) नग्न.

**नागवी** (स्त्री. ना.) (ग्रं०) सर्प.

**नागवेल** (सं. नागवल्ली) (स्त्री. ना.) जिचीं पानें विड्याच्या उपयोगी पडतात अशी एक वेल आहे ती.

**नागा** (पु. ना.) खाडा.

**नांगा, नांगाडा** (पु. ना.) विंचवाच्या मागें ऊर्ध्व कंटकासारिखा अव-

यत्र असतो तो. २ खेंकड्याचा अं-
कड्यासारिखा अवयव तो.

**नांगी** (स्त्री. ना.) नांगाडा. २ शेर
नामक वृक्षाची जी डिरी ती.

**नागोवा** (पु. ना.) (ग्रं०) नागवण.

**नाच** (सं. नाट्य) (पु. ना.) वेश्या-
दिकांचा हावभावगानासहित तालावर
जो पादविक्षेपरूप व्यापार तो.

**नाच्या** (पु. ना.) स्त्रीचा वेष घेऊन
नाचतो तो.

**नाजूक** (फा० वि०) ज्यास उष्ण,
शीत, धकाधकी इ० सोसत नाहीं
किं० तीं झालीं असतां लवकर वि-
कार पावतो असा जो मनुष्य, पुष्पा-
दि पदार्थ व मऊ असून पातळ जो
पोळी इ० पदार्थ तो.

**नाट** (न. ना.) पांचा कवड्यांचा स-
मुदाय तें. २ कवड्या खेळायासाठीं
रंग इ० कांच्या रेषांनीं कोष्टकांकित
काढितात तें. ३ खट कूळ तें.
४ कांहीं दोषारोपानें कुळास लागला
बट्टा तें. ५ कोणेक कार्यास प्रतिबं-
धक जे अपशकुनादिक तें. ६ (ग्रं०)
आकार. ७ ठिकाण, ठाव.

**नाटक** (सं. न. ना.) काव्यांतील एक
जाति, आहे. २ अवतारादिकांचीं
सोंगें घेऊन खेळ करितात तें.
३ (वि०) (ग्रं०) सुंदर.

**नाटकशाळा** (स्त्री. ना.) पोरीस वि-
कत घेऊन नाचणें, गाणें शिकवून
उपभोगार्थ ठेवितात ती. २नृत्यशाळा.

**नाटकी** (वि०) नाटकाचा तमाशा
करितो तो. २ त्याचे कृतीचा धांग
लागत नाहीं तो. ३ (ग्रं०) बहुरूपी.

**नाट्य** (सं. न. ना.) नृत्य.

**नाड** (सं. नाडी) (स्त्री. ना.) शरी-
रांतील रक्त ज्या शिरांनीं वाहातें
त्या प्रत्येकीं ती. २ (ग्रं०) (पु.) प्र-
तिबंध. [नडणें. ३ अडकणें.

**नाडणें** (धा. ना.) नागवणें. २ (ग्रं०)

**नाडबंद** (वि०) स्त्रीचा उपभोग करा-
वयाजोगें वय असून स्त्रीचा संग
ज्यास घडला नाहीं तो.

**नाडर** (पु. ना.) (ग्रं०) थिल्लर.

**नाडळणें** (धा. ना.) (ग्रं०) न अड-
खळणें.

**नाडा** (पु. ना.) तमाशा करावया-
करितां बहुरूपी दोर लावून उंच
खांब रोवितात तो. २ फार जी
जाडी दोरी ती. ३ ताबुताचे दि-
वसांत फकीर गळ्यांत घालायासाठीं
सूत रंगवून करितात तो. ४ चो-
ळणा इ०कांस अरुंद नवारेसारि-
खें वस्त्र लावितात तो. [चतुर्थार्थी.

**नाडी** (सं. स्त्री. ना.)नाड. २ नाडा-

**नाणवठा** (पु. ना.) (ग्रं०) नाणेंवि-
क्रीची जागा.

**नाणें** (न. ना.) नाणक.

**नाणेवटी** (वि०) नाण्याचा व्यापार
करणारा सराफ.

**नातक** (पु. ना.) (ग्रं०) नाडीमार्ग.

**नातरी** (अव्य०)(ग्रं०) किंवा, अथवा.

**नातलग** (वि०) ज्यांचा परसरें वि-
वाहादिकेंकरून शरीरसंबंध झा-
ला आहे ते परसर.

नाते (अव्य०) (ग्रं०) नातरी.
नातें (न. ना.) योनिसंबंधादि संबंध तें.
नाथ (सं. पु. ना.) स्वामी.
नाथणें (धा. ना.) (ग्रं०) नसणें.
नाथिणें (वि०)(ग्रं०) नसलेलें, मिथ्या.
नांद (स्त्री. ना.) मोठा रांजण ती. २ शेगडीचे आकाराची स्नानादिकासाठीं मातीची करून ठेवितात ती.
नाद (सं. पु. ना.) ध्वनिविशेष तो. २ कांहींएक गोष्टीविषयीं किं० व्यसनाविषयीं जो छंद तो. ३ (ग्रं०) मध्यमा नावाची वाचा. ४ श्रवणसुख.
नांदणूक (स्त्री. ना.) कोणेक स्थळीं घर, दार, कुटुंबसुद्धां जी बहुत वर्षे स्थिति ती. २ कोणेकाच्या राज्यांत किं० हाताखालीं कांहीं कालपर्यंत टिकाव ती.
नांदणें (धा. ना.) एकादे गांव इ०कांमध्यें संसार करून बहुत दिवस राहाणें. [ह्मणतात.
नादब्रह्म (सं. न. ना.) गायनास
नादान (फा०वि०)निर्बळ. २ नाकारा.
नादार (फा० वि०) ज्याजवळ द्रव्य नाहीं तो. [आदिवाचा.
नादासळू (पु. ना. (ग्रं०) वैखरी-
नादिष्ट (वि०) ज्यास कांहीं नाद आहे तो. [व्यापार.
नादी (वि०) नादिष्ट. २ (ग्रं०)श्रवण-
नांदी (सं. स्त्री. ना.) नाटकाच्या आरंभीं मंगलाचरण श्लोक असतात ती.
नाना (सं. वि०) अनेक. २ (ग्रं०) (अव्य०) नातरी.
नानू (स्त्री. न. ना.) कांहींएक कार्याविषयीं नाहीं, नव्हे इ० संदेहरूप भाषण करण्याचा जो प्रकार ती तें.
नापत (स्त्री. ना.) देण्याघेण्याचे व्यवहारांत मुदतीस पैसा देण्यास न मिळाल्यामुळें त्याजबरोबर व्यवहार करण्याविषयीं अयोग्यता येते ती. २ (वि०) तसा पुरुष तो.
नापित (सं. पु. ना.) वस्त्र्यानें, कात्रीनें जो डोई इ० कांचे केंस काढितो अशी एक जाति आहे तो.
नाबर (फा० वि०) अशक्त.
नाभि (सं. पु. स्त्री. ना.) जीव मात्रांचे नाळ ज्या ठिकाणीं असतें असा जो पोटावरील छिद्राकार तो ती.
नाभिकार (पु. ना.) (ग्रं०) भिऊं नको असा अभय हस्तेंकरून खूण करण्याचा व्यापार तो.
नाभी (पु. ना.) (ग्रं०) नाभिकार.
नाम (सं. न. ना.) त्या त्या व्यक्तीचा वाचक जो शब्द तें. २ (पु. ना.) गंध इ० कांचा उभा टिळा लावितात तो. ३ तो लावण्यास तदाकार धातूचा केला असता तो.
नामांकित (सं. वि०) ज्याचे चांगलेपणाची ख्याति लोकांत आहे तो.
नामी (वि०) उत्कृष्ट.
नामोश (फा० पु. ना.) कीर्त्ति.
नायक (सं. वि०) ज्या ज्या समुदायांत जो जो श्रेष्ठ किं० मुख्य तो. २ स्वामी. ३ नाटकामध्यें ज्याचें मुख्यत्वेंकरून वर्णन केलें असतें तो. इ०
नायकीण (स्त्री. ना.) कळवंतिण.

नार (स्त्री. ना.) (ग्रं०) स्त्री.

नारकी (सं. वि०) (ग्रं०) नरकवासी किं० नरकवासास योग्य तो.

नारळ (सं. नारिकेल) (पु. ना.) झाड. २ नारळीचें फळ तो.

नारळीपदर (पु. ना.) वस्त्राचे पदरास जर घालण्याचा प्रकार आहे; ज्यावर नारळीचा आकार दिसतो तो.

नाराच (सं. पु. ना.) (ग्रं०) बाण, तीर.

नाराज (ग्रं०) नाराच. [ति.

नारानोक (पु. ना०) (ग्रं०) अविश्राति.

नारी (सं. स्त्री ना.) स्त्री.

नारू (पु. ना.) सुताचे दोऱ्यासारिखा एक रोग आहे तो; जो त्वचेखाली होतो.

नाल (अर० पु. ना.) घोड्याचे पायांस अर्द्धचंद्राकार लोखंडाचा बसवितात तो. २ (सं. न. ना.) कमलाचा देंट. ३ मनुष्यादि जरायुज प्राणी जन्मला असतां त्याचे नाभींत जो तंतु असतो तें. [वाहन आहे.

नालकी (स्त्री. ना.) पालखीसारिखें

नालस्ती (फा० स्त्री. ना.) फिर्याद.

नाला (पु. ना.) शहर इ० कांतील वाईट पाणी बाहेर काढायासाठीं जो नळ बांधितात तो. २ ओढ्यासही ह्मणतात.

नाव (सं. नौका) (स्त्री. ना.) नदी इ० उतरून पार होण्यासाठीं जी तर ठेवितात ती. २ नाम. नाव मिळविणें ह्म० कीर्त्ति मिळविणें. नाव ठेवणें ह्म० खोड ठेवणें. इ० (ग्रं०) (न.) देह.

नावड (स्त्री. ना.) अप्रीति.

नावडता (वि०) ज्यावर अप्रीति असा पदार्थ तो.

नावनिशी (फा० स्त्री. ना.) अनेक नांवें ज्या कागदावर लिहिलीं आहेत तो कागद किं० तीं नांवें तीं.

नावभर (अव्य०) (ग्रं०) क्षणभर.

नावरूप (न. ना.) कीर्त्ति, लौकिक.

नावलौकिक (पु. ना.) गुणादिकेंकरून जी नांवाची प्रसिद्धि ती.

नावाचा (वि०) पांडित्यादि तादृश गुण नसतां नाम मात्र पाउत इ० असतें ज्याचें तो.

नावांजणी (स्त्री. ना.) प्रशंसा.

नावाडी (वि०) नौका तारून नेतो तो.

नावाणिगें (वि०) (ग्रं) नामांकित.

नावानावा (अव्य०) (ग्रं०) वारंवार.

नावानिगें (वि०) (ग्रं०) नावाणिगें.

नाविक (सं. वि०) नावाडी.

नावेक (निमिष, एक) (अव्य०)(ग्रं०) क्षणभर. २ अंमळ. ३ (वि०) थोडेंसें.

नाश (सं. पु. ना.) कांहीं एक विकृतीमुळें कोणेक पदार्थ किं० व्यापार इ०कांचें मूळस्वरूप बिघडायाजोगी केली किं० झाली जी दुर्दशा तो. २ कांहीं एक व्यवहारामध्यें जी द्रव्यादिकांची हानि किं० द्रव्यादिहानिमूलक जी तत्स्वामीची हानि तो. ३ ध्वंस. ४ (ग्रं०) यम.

नाशा (वि०) नाश करण्याचा स्वभाव ज्याचा त्यास निंदेनें ह्मणतात.

नासाडी (स्त्री. ना.) अनेक प्रकारानें जो नाश तो.

नासिक (सं. न. ना.) नाक. २ (ग्रं) नाश.

नास्तिक (सं. वि०) ईश्वर, परलोक आहे असें मानीत नाहीं तो. २ सत्य वस्तु एक ब्रह्म आहे असें जो मानीत नाहीं तो. ३ (ग्रं०) (न. ना.) कर्मास ह्मणतात.

नाहक, नाहाक (फा० अव्य०) विचार न करितां किं० प्रयोजनावांचून.

नाहातीधुती (वि०) जिला नाहाण येऊन प्रौढ दशा पावली ती.

नाहावी (स्त्री. ना.) नुकसान.

नाहो (पु. ना.) (ग्रं०) पति, नवरा.

नाळ (न. ना.) नालदुसऱ्या तिसऱ्या अर्थी. २ (स्त्री. ना.) गलवताचा अग्रभाग ती. ३ तोफ. ४ घोडे इ० कांच्या पाठीस क्षत पडतें ती.

निअर्ती (स्त्री. ना.) (ग्रं०) उत्पत्ति.

निकट (सं. अव्य०) जवळ.

निकड (स्त्री. ना.) कोणेक कार्य त्वरेनें करण्याची जी अडचण प्राप्त होते ती.

निकर (पु. ना.) कांहींएक कार्य करण्याविषयीं सोईचा मार्ग सोडून क्रोधादि आवेशपूर्वक जी प्रवृत्ति ती. २ (सं. पु.) समूह.

निकरा (वि०) (ग्रं०) निरर्थक.

निकवडा (वि०) (ग्रं०) निष्कांचन.

निकषपाषाण (पु. ना.) (ग्रं०) कसवटीचा दगड.

निका (अर० वि०) (ग्रं०) चांगला. २ खरा. ३ स्वच्छ. ४ (पु. ना.) मुसलमान लोकांत जो गांधर्वविवाह करितात तो.

निकामी (वि०) इष्टकार्याच्या उपयोगी नव्हे तो.

निकाल (पु. ना.) उलगडा. २ मोरी इ० कांचें पाणी बाहेर जावयाची जी उतरती जागा तो.

निकुर (पु. ना.) (ग्रं०) निश्चय. २ (अव्य०) निश्चयेंकरून.

निकृष्ट (सं. वि०) असावे त्या गुणादिकेंकरून ज्याचें परिगणन उत्तमांत किं० मध्यमांत होत नाहीं तो.

निकृष्टपक्ष (सं. पु. ना.) कनिष्ठपक्ष.

निके (वि०) (ग्रं०) नेटकें, चांगलें.

निकोप (वि०) स्त्रीलिंगार्थक जी कोप ती ज्यास नाहीं असा काष्ठादिपदार्थ तो. २ रोगादि दोषरहित जो मनुष्यादि किं० व्याधिरहित त्याचें शरीर, गळा इ० तो.

निखंदणें (धा. ना.) (ग्रं०) निषेधणें.

निखळ (वि०) ज्या पदार्थांत दुसऱ्या पदार्थाची भेळ नाहीं तो पदार्थ. २ केवळ.

निखळणें (धा. ना.) घट्ट जडून राहिलेला पदार्थ हालविणें इ० कारणांनीं मोकळा करणें, किंवा होणें.

निखारा (पु. ना.) जिवंत कोळसा. २ क्षुधेस न गणून न खातां राहाण्याचा व्यापार तो.

निखालस (वि०) कोणेक संबंधरहित. २ निश्चित. ३ निखळ. ४ पृथक्. ५ भीडभाड न धरितां किं० लाभ लोभ न धरितां खरें बोलणें इ० वागण्याचा ज्याचा स्वभाव तो. व त्याचें भाषणादिक तो.

निखिल (सं. वि०) सर्व.

निगदणें (धा. ना.) (ग्रं०) बोलणें.

निगम (सं. पु. ना.) वेद.

निगा (फा० स्त्री. ना.) पदार्थ सुरक्षित राहावा किं० वृद्धिंगत व्हावा म्हणून त्या त्या कालीं लक्ष्यपूर्वक त्यास जो जो पदार्थ पाहिजे तो तो द्यावा इ० रीतीनें जपण्याचा जो प्रकार तो.

निगुता (वि०) (ग्रं०) नुकता. २ निभ्रांत, खरा, यथार्थ. [युक्ति.

निगुती (वि०)(ग्रं०) खरा. २ (स्त्री.)

निगूढ (सं. वि०) गुप्त.

निग्रह (सं. पु. ना.) लोकशास्त्रसिद्ध जी मर्यादा तद्रहित जे मनुष्यादिक त्यांस त्या मर्यादेंत आणण्यासाठीं जो दंडादि शिक्षाप्रकार तो. २ त्या त्या विषयापासून इंद्रियादिकाचें जें आकर्षण तो. ३ कांहींएक कार्य केल्यावांचून राहावयाचें नाहीं असा जो आग्रह तो.

निघणें (धा. ना.) जो पदार्थ ज्या संबंधानें ज्याशीं संबंध पावला त्याणें तो संबंध सुटायाजोगें त्यापासून वियुक्त होणें.

निघा (स्त्री. ना.) निगा, देखरेख.

निघोट (वि०) (ग्रं०) सघन,घनदाट,

निचरणें (धा. ना.) गळूं इ० कांतील किं० पोटांतील मलांश किं० पदार्थांतील जलांश पातळ होऊन झरून बाहेर पडणें. [व्यापार तो.

निचरा (पु. ना.) निचरण्याचा जो

निचाड (वि०) कांहींएक गुण किं० गुणविशिष्ट पदार्थ इ० कांचीं ज्यास चाड नाहीं तो.

निचाडा (वि०) निर्लज्ज.

निचेष्ट, निचेष्टित (वि०) निद्रा, मूर्च्छा इ० कंकरून ज्याचें देहभान गेलें आहे तो.

निज (सं. वि०) स्वकीय. २ (न. ना.) (ग्रं०) आत्मस्वरूप. ३ मनास झ०.

निजगुज (न. ना.) आपला जो परम इष्ट त्यापाशींच सांगावयाजोगा जो अंतःकरणांतील भाव तें.

निजणें (सं. निद्रा) (धा. ना.) निद्रेनें युक्त होणें. २ आंथरूण इ० कांवर आडवें पडणें. ३ स्त्रीपुरुषांनीं परस्परांचा संग करणें. ४ आघातादिकांमुळें कोणेकानें अकस्मात् मरणें. ५ ऋण, सावकारी इ० कांनीं बुडणें.

निजध्यास (पु. ना.) (ग्रं०) निदिध्यास. [स्वरूपभाव.

निजनिवाड (पु. ना.) (ग्रं०) निज

निजसुरा (वि०) ज्याचे डोळ्यांतील झोंप पुरती गेली नाहीं तो.

निजांगें (अव्य०) स्वतः

निटस (वि०) जसा असावा तसा नीट नेटका जो पदार्थ तो.

निटावणें (धा. ना.) पूर्वीं कांहींसा सिद्ध जो पदार्थ तो जसा पाहिजे तसा नीट करणें. २ अक्षर, मनुष्य इ० अति अभ्यासामुळें इच्छितानुरूप चांगलें होणें. ३ कांहींएक कार्याविषयीं दुसऱ्याची अपेक्षा न धरितां पुढें सरणें.

निटिल (सं. न. ना.) कपाळ.

निडळ (न. ना.) निटिल.

निडार (वि०) (ग्रं०) निवडक. २ (न.) निटिल.

निडारणें (धा. ना.) (ग्रं०) सर्व विषयमात्रांत निवडक जें भगवत्स्वरूप त्याच्या साक्षात्कारानें परिपक्वदशापन्न होणें. २ (न. ना.) परिपक्व दशा.

निढळ (न. ना.) निडळ.

निढाळें (अव्य०) (ग्रं०) केवळपणानें

नितंबिनी (सं. स्त्री. ना.) (ग्रं०) स्त्री.

नितळ (वि०) घोंटून घांसून साफ केला जो पदार्थ तो. २ ज्यामध्यें मलांश नाहीं असें जें तेल, जल इ० तें.

नित्य (सं. वि०) अविनाशी, शाश्वत. २ (अव्य०) प्रतिदिवशीं. ३ सर्वदा.

नित्यशः (अव्य०) नित्य.

नित्यावळ (स्त्री. ना.) एकाद्यास धर्मार्थ भोजनास नित्य येतजा असें एकदाच आमंत्रण देऊन भोजन देण्याचा प्रकार ती.

निथळणें (धा. ना.) जलादिकानें भिजलेला जो पदार्थ त्याचा तो जलादि अंश एकत्र होऊन थेंब थेंब गळून निःशेष होई असें करणें.

निथळा (पु. ना.) पात्रादिकांत निथळून जमला जो जलादि अंश तो.

निद (स्त्री. ना.) (ग्रं०) निद्रा.

निंदक (सं. वि०) निंदा करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

निदण, निंदण (न. ना.) पेरलेल्या शेतांत उनाड उगवलें जें तृणादिक तें.

निदणें, निंदणें (धा. ना.) शेतांतील निदण काढणें.

निदणें (धा. ना.) (ग्रं०) निजणें.

निदर्शनास (अव्य०) अनुभवास.

निदर्शनीं (अव्य०) परिणामीं.

निदसुरा (वि०) (ग्रं०) निजसुरा.

निंदा (सं. स्त्री. ना.) कोणिकाचें दोषयुक्तत्वेंकरून वर्णन ती.

निदाघ (वि०) (ग्रं०) निरर्थक. २ निस्तेज. ३ (पु. ना.) चिंता, काळजी.

निदान (सं. न. ना.) रोगादिकांचें बीजभूत कारण तें. २ निरुपायरूप अवस्था तें. ३ कांहींएक संख्या, परिमाण इ० कांच्या उत्कृष्ट निकृष्टतेचा परमावधि तें. ४ (अव्य०) निकृष्ट पक्ष अवलंबून. [ध्यास तो.

निदिध्यास (सं. पु. ना.) अतिशयित

निदेश (सं. पु. ना.) आज्ञा.

निंद्य (सं. वि०) निंदा करायास योग्य तो. [सरणें ती.

निद्रा (सं. स्त्री. ना.) झोंप, जागेपणा

निद्रिताचाघोळ (पु. ना.) (ग्रं०) अज्ञानाची मूढ दशा तो.

निधड, निधडा (वि०) कोणिक कार्याविषयीं मागें न सरतां निःशंकपणें प्रवृत्त व्हायाजोगें ज्यामध्यें सामर्थ्य आहे तो. २ (ग्रं०) पराक्रमी.

निधन (सं. न. ना.) मरण.

निधान (सं. न. ना.) ज्या ठेवीचा स्वामी प्रसिद्ध नाहीं अशी जी जमीन इ०कांत ठेव सांपडल्ये तें. २ रत्नादि ठेवा.

निधि (सं. पु. ना.) निधान [भ्रमण.
निधी, निधिय (पु. ना.)(ग्रं०) परि-
निनाद (सं. पु. ना.) (ग्रं० ) मोठा नाद. २ पडशब्द.
निपजणें (धा. ना.) उपजणें. २ तद्रूपेंकरून दृष्टोत्पत्तिस येणें.
निपट (वि०) केवळ.
निपटणें (धा. ना.) मध्यम, सद्रव, पातळ, पदार्थ जमीन इ०कांवरून निःशेष होई असा हस्तादिकानें काढणें. २ (ग्रं०) नाहींसा करणें.
निपटारा (वि०) कोणत्याही कार्याविषयीं जो अप्रयोजक तो. २ निर्लज्ज.
निःपात (सं. पु. ना.) मारणें, खाणें इ० कानीं निःशेष व्हावयाजोगा जो पदार्थाचा नाश तो. [तो.
निपुण (सं. वि०) जो ज्या कामांत पूर्ण
निबंध (सं. पु. ना.) काहिंएक गोष्टीवर बांधल्याप्रमाणें लिहिलें जें व्याख्यान तो. [२ (ग्रं०) वृद्ध.
निबर (वि०) जून जो पदार्थ तो.
निंबलोण (न. ना.) कोणास दृष्ट झालेली निघावी ह्मणून कडुनिंबाचीं पानें, लवण इ० पदार्थ मुखावरून टाकण्याचा प्रकार तें व तें सर्व पदार्थ मिळून तें.
निबळ (वि०) बलहीन जो पदार्थ तो. २ (ग्रं०) मऊ. [घनदाट.
निबिड (सं. वि०) गर्द. २ (ग्रं०)
निंबूर (पु. ना.) बाजरीचीं कणसें पक्क दशेस जीं आलीं तो. [तो.
निंबोळी (स्त्री. ना.) कडुनिंबाचें फळ
निभणें (धा. ना.) कोणेक पदार्थाची ज्या व्यापारापासून किं० संकटापासून नाश होण्याची संभावना आहे त्यापासून त्यानें पार पडणें. २ काहीं एक व्यापाराचा अभ्यास झाल्यामुळें तो सिद्धीस नेण्याविषयीं योग्य होणें. ३ काहिंएक आरंभिलेला व्यापार यथास्थितपणें सिद्धीस जाणें किं० तत्कर्त्ता पुरुष त्या त्या व्यापारापासून पारपडणें. [भलेपणा.
निभाव (सं. निर्वाह) (पु. ना.) नि-
निभावणी (स्त्री. ना.) निभाव.
निभावणें (धा. ना.) निभे असा करणें, होणें.
निभ्रांत (वि०) ज्या विषयांत ज्यास भ्रांति नाहीं तो त्या विषयांत. २ (अव्य०) संशय किं० भ्रांति न धरितां.
निमक (फा० पु. ना.) मीठ.
निमकहराम (फा० वि०) कृतघ्न.
निमकहलाल (फा० वि०) कृतज्ञ.
निमग्न (सं. वि०) जलादिकांत बुडला तो व व्यवहारांतर सुचेना असा काहिंएक व्यवहारांत पडला तो.
निमचा (फा० पु. ना.) लहान तरवार तो.
निमटणें (धा. ना.) (ग्रं०) निवटणें.
निमणें (धा. ना.) (ग्रं०) शांत होणें. संकेतानें मरणास ह्मणतात.
निमताना (पु. ना.) शेत इ०कांची पाहाणी करतेवेळेस यांत अमुक उत्पन्न होईल असा अजमास कळावा ह्मणून त्यांतील काहीं अंशाचा अ-

नुभव पाहून उत्पन्नाचा अजमास पाहाण्याचा प्रकार तो.

**निमंत्रण** (सं. न. ना.) आमंत्रण.

**निमथा** (पु. ना.) (ग्रं०) मस्तक, माथा.

**निमासुर** (वि०) (ग्रं०) सुरेख.

**निमित्त** ( सं. न. ना. ) कांहींएक व्यापार करण्याविषयीं जें उद्देश तें. २ कांहींएक व्यापाराचें जें कारण तें. ३ न करितां कांहींएक गोष्टीचा आळ तें. ४ कांहींएक व्यापाराचें वास्तविक कारण नसतां कल्पित कारण तें.

**निमिष** (सं. पु. ना.) नेत्राचे पांपण्याचा जो स्वभावसिद्ध उघडणें, मिटणें असा व्यापार त्यांतील मिटण्याचा व्यापार तो. २ तदुपलक्षित जो काळ तोही.

**निमुठणें** (धा. ना.) (ग्रं०) निमणें.

**निमे** (वि०) अर्धा.

**निमोळता** (वि०) क्रमानें उतरता.

**नियत** (सं. वि०) ज्याची संख्या किं० व्यापार इ० विषयक नियमाचा कधींही भंग होत नाहीं असा जो तो. २ (अव्य०) (ग्रं०) निरंतर.

**नियंता** (सं. वि०) मनुष्यादि पदार्थ अमुक नियमानें राहीं असें करणारा तो.

**नियम** (सं. पु. ना.) कोणेक गोष्टीविषयीं काल, देश, ईश्वर इ०कांनीं बांधला जो बंद तो.

**नियमित** (सं. वि०) ज्या पदार्थाचा कांहींएक नियम करून ठेविला तो. २ नियमानें संबंध पावला तो. ३ नियत.

**नियामक** (सं. वि०) नियम करणारा जो तो. २ नियमप्रदर्शक तो.

**नियुक्त** (सं. वि०) कांहींएक कार्याविषयीं योजिला तो.

**नियोग** (सं. पु. ना.) नियुक्त करण्याचा व्यापार तो. २ कांहीं कर्म करण्याविषयीं श्रेष्ठाची आज्ञा तो.

**निरंकुश** (सं. वि०) लोकशास्त्रसिद्ध मर्यादा न गणितां केवळ स्वच्छंदानें वागण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**निरख** (फा० पु. ना.) बाजारसंबंधी जिनसाचा भाव तो.

**निरखणें** (सं. निरीक्षण) (धा. ना.) एकाग्र दृष्टीनें चित्रादिक पाहाणें.

**निरज** (सं. वि०) (ग्रं०) निर्मळ.

**निरंजन** (सं. पु. ना.) जन्ममरणादिकास कारण जें प्रारब्ध तें ज्यास नाहीं असा ईश्वरादि तो. २ (वि०) अस्पष्ट, गुप्त. ३ (न.) देवापुढें दीप लावायास धातुमय पात्र करितात तें.

**निरण** (न. ना.) नाभीच्या खालचा आणि गुह्यावरचा जो भाग तें. २ गाय, म्हैस इ०कांची जी योनि तें.

**निरत** (सं. वि०) (ग्रं०) अत्यंतरत.

**निरंतर** (सं. वि०) अंतररहित तें. २ (अव्य०) सर्वदा.

**निरतावणें** (धा. ना.) (ग्रं०) गोडी घेणें.

**निरतिशयानंद** (सं. पु. ना.) ब्रम्हानंद.

**निरपणें** (धा. ना.) निपटणें. २ केलेलें कर्म निस्तरणें.

**निरय** (सं. पु. ना.) नरक.

**निरर्थक** (सं. वि०) ज्यास अर्थ नाहीं असा जो शब्द, प्रयोग आदिकरून तो. २ ज्याचा उपयोग नाहीं तो. ३ (अव्य०) उपयोगावांचून. [करणें.

**निरवकिणें** (धा. ना.) (ग्रं०) निश्चय

**निरवडी** (स्त्री. ना.) (ग्रं०) कौशल्य २ बळ. ३ मोठेपणा.

**निरवणें** (धा. ना.) ग्रामांतरास जाणारा, संन्यास घेणारा, इ०क जे त्यांणीं मागें राहाणार जे पुत्रादिक त्यांस अमुक रीतीनें अमुक करा किं० देणें, घेणें इ० व्यवस्था सांगणें. २ आपणास करायाचें जें कार्य तें आपले स्थानीं दुसरा कल्पून त्याजवर तें कार्य सोंपणें.

**निरवधि** (सं. वि०) अत्यंत, बहुत.

**निरवानिरव** (स्त्री. ना.) अनेक पदार्थ अनेकांजवळ निरवण्याचा व्यापार ती.

**निरशन** (न. ना.) उपवासमुख्यार्थी.

**निरस** (सं. नीरस) (वि०) सजातीय जे अनेक पदार्थ त्यांत ज्याची योग्यता कमी तो. २ रसरहित.

**निरसणें** (सं. निरसन) (धा. ना.) प्राप्त झालें जें विघ्नादिक किं० दोषादिक तें दूर होई असें करणें.

**निरसन** (सं. न. ना.) निरसण्याचा व्यापार तें.

**निरसें** (वि०) ज्यांत पाणी घातलें नाहीं व तापविलें नाहीं असें दूध तें.

**निरहर** (न. ना.) (ग्रं०) बुंदवळ इ० मोहरें.

**निराकरण** (सं. न. ना.) निरसन. २ जी गोष्ट आपल्याकडे आली तिचा जो परिहार तें.

**निराकार** (सं. वि०) ज्यास आकार नाहीं असा जो ईश्वरादि पदार्थ तो.

**निराश** (सं. वि०) ज्या पदार्थाविषयीं आशा असते तो पदार्थ मिळत नाहीं असा निश्चय झाल्यामुळें ज्याचा आशाभंग झाला तो. २ आतां हा पदार्थ नको अशी बुद्धि ज्यास झाली तो. [ती.

**निराशा** (सं. स्त्री. ना.) आशाभंग

**निरास** (सं. पु. ना.) निरसण्याचा व्यापार.

**निराळ** (न. ना.) (ग्रं०) आकाश.

**निराळा** (वि०) कोणेकाहून भिन्न तो.

**निरुज** (सं. वि०) (ग्रं०) निरोगी.

**निरुती** (स्त्री. ना.) (ग्रं०) प्राप्ति. २ विचारणा.

**निरुतीहान** (अव्य०) (ग्रं) खरोखरी.

**निरुतें** (वि०) (ग्रं०) खरें. २ शुद्ध. ३ (ना०) खरेपण. ४ निश्चय. ५(अव्य०) निश्चयेंकरून.

**निरुपाय** (सं. पु. ना.) कोणेककार्याविषयीं कोणेकाचा उपाय चालेनासा झाला अशी जी दशा तो. २ काहीं कार्याविषयीं ज्याचा उपाय चालेनासा झाला तो.

**निरूपण** (सं. न. ना.) काहींएक गोष्टीचें लक्षण, स्वरूप, प्रामाण्यादिकांनीं जें कथन तें.

**निरें** (वि०) (ग्रं०) शुद्ध.

**निरोध** (सं. पु. ना.) काहींएक कार्याविषयीं प्रतिबंध तो.

निरोप (सं. निरूपण) (पु. ना.) अमुकास अमुक जाऊन सांग अशी जी गोष्ट सांगितली तो. २ कोणेकास गमनाविषयीं जी आज्ञा तो.

निर्गुण (सं. वि०) सत्व, रज, तमादि गुणरहित तो.

निर्जन (सं. वि०) जेथें लोक नाहींत असा देश किं० काल तो.

निर्जल (सं. वि०) जल ज्या देशांत फारच कमी तो देशादिक. २ पाणीही प्यावयाचें नाहीं असें उपोषणादिक तो.

निर्जीव (सं. वि०) ज्यामध्यें जीव नाहीं असा पाषाणादिक तो. २ अशक्त.

निर्झर (सं. पु. ना.) झरा.

निर्णय (सं. पु. ना.) संदिग्धस्थल किं० भ्रमस्थल यांचा विचार करून जो ठराव तो.

निर्दय (सं. वि०) दयारहित.

निर्दलन,ळण (सं. न. ना.) कोणेक पदार्थाचा निःशेष जो नास तें.

निर्देश (सं. पु. ना.) अमुक ह्मणून दाखविण्याचा व्यापार तो.

निर्धार (सं. पु. ना.) ही गोष्ट अशीच असें जें निःसंदेहपणाचें ज्ञान तो.

निर्बंध (सं. पु. ना.) कोणत्याही गोष्टीविषयीं आग्रहपुरःसर निश्चय तो. २ कांहींएक गोष्ट अमुक रीतीनें राहावी अशी केली जी मर्यादा तो.

निर्बाणी (सं. निर्वाण) (वि०) कांहींएक कार्याविषयीं कोणाची अपेक्षा न धरितां स्वतंत्रपणानें तें कार्य करण्याविषयीं समर्थ तो.

निर्बुजणें (धा. ना.) (ग्रं०) अडखळणें. २ घाबरणें. ३ दीपणें.

निर्भय (सं. वि०) भयरहित.

निर्भर्त्सना (सं. स्त्री. ना.) कोणेकाचा पाणउतारा व्हावा ह्मणून केला जो प्रायः त्याचे मुखावर किं० मागें गालिप्रदानाचा किं० निंदावाक्य इ० बोलण्याचा व्यापार ती.

निर्माल्य (सं. पु. न. ना.) देवादिकांवर वाहिला जो पुष्पादि पदार्थ तो. २ तोच पदार्थ पादस्पर्शादि अनेक कारणांमुळें देवास वाहाण्याच्या उपयोगी पडत नाहीं तो. ३ ज्या मनुष्यादि पदार्थांत तेज राहिलें नाहीं किं० मुळचेंच नाहीं तो.

निर्मूल (सं. वि०) मुळासहवर्तमान नाश पावला जो वृक्षादिक तो. २ समूळ नाश पावल्यामुळें जो वृक्षादिकांचा अभाव तें. ३ ज्या वचनादिकांस मूळ आधार नाहीं असें वचन वर्तमानादि तें.

निर्याण (सं. न. ना.) स्थळ सोडून निघण्याचा व्यापार तें.

निर्लज्ज (सं. वि०) ज्यास लाज नाहीं तो.

निर्लेप (सं. वि०) जो पदार्थ शिजविल्यानें भाजल्यानें खरकटा होत नाहीं तो, किं० ज्याला खरकट्याचा स्पर्श नाहीं तो. २ (ग्रं०) अलिप्त. ३ शुद्ध.

निर्वचणें (धा. ना.) (ग्रं०) बोलणें.

निर्वंश (सं. पु. ना.) वंशक्षय, कुलक्षय.

निर्वाण (सं. न. ना.) निवातवृत्ति-पणा. २ मोक्ष. ३ (वि०) कठिण.

निर्वाह (सं. पु. ना.) कोणतेंही कामामध्यें अटकू न देतां तें काम चालविण्याचा किं० तडीस नेण्याचा जो प्रकार तो. २ कांहीं भाषण किं० लेख प्रमाणादिकेंकरून खरा करून देण्याचा प्रकार तो. ३ क्षुधा, थंडी इ०कांचा निर्वाह म्ह० आपणास त्यांचा उपद्रव न होई असा व्यापार.

निर्वाळणें (धा. ना.) (ग्रं०) निर्मळ करणें.

निर्वाळा (पु. ना.) (ग्रं०) निवाडा.

निलय (सं. न. ना.) स्थान.

निलाजरा (वि०) निर्लज्ज.

निवटणें (धा. ना.) (ग्रं०) निर्मूळ करणें. २ वध करणें. ३ छेदणें. ४ मरणें.

निवड (स्त्री. ना.) कोणेक समुदायांतून इष्टपदार्थास निराळें करण्याचा व्यापार तो.

निवडक (वि०) सजातीय समुदायांतून निवडून काढिला किं० निवडून काढायाजोगा जो पदार्थ तो.

निवडणें (धा. ना.) समुदायांतून इच्छितांश पृथक् करणें.

निवणें (धा. ना.) तापलेल्या पदार्थानें थंड होणें. २ क्रोधादिक जाक्रम कोणेकानें शांत होणें. ३ समाधान होणें. ४ (न. ना.) मडकें इ०कांच्या खालीं गवत इ०कांचें वलयाकार करून घालितात तें.

निवर्तन (सं. न. ना.) मागें फिरण्याचा व्यापार तें.

निवळ (वि०) गढूळ नव्हे जें उदकादिक तें. २ (स्त्री. ना.) ताक इ० कांनील जडांश तळीं बसून वर निर्मळ उदक राहतें तें. ३ (अव्य०) निःसंशयपणें.

निवळणें (धा. ना.) (ग्रं०) उदकादिकांनीं निवळ होणें. २ त्या त्या पदार्थांतील इष्ट जो गुणविशेष त्यास प्रतिबंधक जो त्या त्यांतीलच दोषविशेष तो जाऊन तो तो गुण प्रगट होई असें होणें.

निवळी (स्त्री. ना.) निवळ. २ एक झाड आहे. ३ त्या झाडाची बी; जिच्या योगानें गढूळ पाणी स्वच्छ होतें. ४ एक वेल आहे.

निवाडा (पु. ना.) निर्णय.

निवात (सं. निर्वात) (वि०) कांहींएक उपद्रवरहित जें स्थळादिक तें. २ (अव्य०) चलन, वलन, भाषणादि न करितां.

निवारण (सं. न. ना.) कोणेकास कांहींएक व्यापारापासून मागें फिरण्याचा जो व्यापार तें.

निवृत्त (सं. वि०) माघारा परतला तो.

निवृत्ति (सं. स्त्री. ना.) कांहींएक व्यापारापासून माघारें घेण्याचा जो व्यापार ती. २ दोषादिकांचा जो निरास ती. ३ (ग्रं०) मोक्ष.

निवेदन (सं. न. ना.) कथन. २ देवादिकांस पुष्पादि अर्पिण्याचा व्यापार तें.

निःशङ्क (सं. वि०) ज्यास शंका नाहीं तो.

निशा (सं. स्त्री. ना.) रात्र. २ (फा० स्त्री. ना.) खात्री. ३ कैफ.

निशाकर (सं. पु. ना.) चंद्र.

निशाचर (सं. पु. ना.) राक्षस, पिशाच, चोर इ० तो.

निशाण (फा० न. ना.) झेंडा. २ बाणादिकानें वेधायास योग्य जें लक्ष्य तें. ३ (ग्रं०) रणभेरी.

निशाणी (फा० स्त्री. ना.) एकाद्या पदार्थावर खुणेसाठीं जें चिन्ह करितात ती. २ कांहींएक कर्माच्या अंतीं दुष्ट फळ भोगण्याचा प्रसंग ती.

निःशेष (सं. वि०) समूळ.

निश्चक्र (सं. वि०) निरशन. २ परचक्ररहित.

निश्चय (सं. पु. ना.) कांहींएक गोष्टीविषयीं जो ठराव तो. २ अमुक असेंच असा जो एकरूप बुद्धीचा आकार तो. ३ विश्वास.

निश्चल, ळ (सं. वि०) चलनरहित.

निश्वास (पु. ना.) (ग्रं०) वेद.

निषिद्ध (सं. वि०) शास्त्र आणि लोक यांनीं ज्या ज्या कर्माविषयीं जो जो वर्जिला तो तो पदार्थ व तसें कर्मही.

निषेध (सं. पु. ना.) जें कर्म करूं नये किं० पदार्थ घेऊं नये इ०रूप शास्त्र इ० कांनीं केलें जें वर्जन तो.

निष्कंटक (सं. वि०), ज्या मार्गादिकामध्यें कांटा नाहीं तो मार्ग, राज्य इ० तो. २ (न.) कंटकराहित्य.

निष्कर्ष (सं. पु. ना.) सिद्धांत.

निष्काम (सं. वि०) फलेच्छारहित जें अनुष्ठानादिक तें.

निष्टंक (पु. ना.) (ग्रं०) निश्चय.

निष्ठा (सं. स्त्री. ना.) कांहींएक कार्याच्याठायीं किं० पदार्थाच्याठायीं जो अतिशयित प्रेमा ती. २ शास्त्रादिकांच्याठायीं हें सत्य अशी जी बुद्धि ती.

निष्ठुर (सं. वि०) कठोर जें मन, हृदय, भाषण इ० तें.

निष्णात (सं. वि०) निपुण.

निष्पन्न (सं. वि०) उत्पन्न.

निष्फल, ळ (सं. वि०) फलोत्पत्तिरहित.

निःसंग (सं. वि०) सर्व संग ज्याणें अंतःकरणापासून त्याग केला तो. २ ज्याणें लोकरीति सोडली तो.

निसंगळ (वि०) (ग्रं०) निर्लज्ज.

निसटणें (धा. ना.) अडचणींत सांपडलेला जो पदार्थ त्याणें जिकडे अडचण कमी तिकडे मार्ग करून सवेग बाहेर पडणें. २ कांहींएका स्थळापासून डोळा चुकवून किं० बलात्कार इ० उपायांनीं पळणें इ०.

निसणें (धा. ना.) पदार्थावरची त्वचा काढून तो त्वचादिरहित करणें. २ तांदूळ, भाजी इ० पदार्थ निवडणें.

निसंतान (सं. न. ना.) कुलक्षय.

निःसंदेह (सं. वि०) संदेहरहित.

निसबत (अर० स्त्री. ना.) हिंमत.

निसरडा (वि०) शेवाळ इ०कांनीं ज्यावर बुळबुळीतपणा झाला आहे असा दगड, वृक्ष इ० पदार्थ तो.

निसरणें (धा. ना.) बुळबुळीत किं०

सुळसुळीत असा जो जमीन इ०- कांचा प्रदेश त्यावर पाय न ठरतां पलीकडे सरणें.

निसरसांड (स्त्री. ना.) अवश्य जें कर्तव्यादिक त्यावर अप्रीति, गर्व इ० कारणामुळें उपेक्षारूप बुद्धि ठे- वण्याचा प्रकार ती.

निसवणें (धा. ना.) धान्यादिकांनीं आपलें कणीस बाहेर टाकणें. २ चो- री, छिनाली इ० दुष्कर्माविषयीं नि- र्लज्ज होणें. [स्त्र इ० तें.

निसळें (वि०) (ग्रं०) पाजविलेलें श-

निःसीम (सं. वि०) सीमेच्या पलीकडे पोहोंचला असा जो विद्यानिपुण तो. २ त्या त्या गुणानें विशिष्ट तो.

निसुगाई (स्त्री. ना.) (ग्रं०) निरुद्यो- गीपणा, आळस.

निसूग (वि०) ज्या प्रेरणेनें गोळी इ० प्रवृत्त झाली त्या प्रेरणेच्या ब- लाचा कांहींएक व्याघात इ० खंडन न होतां लाग, मार इ० धातूचें वि०.

निसूर (वि०) (ग्रं०) निश्चित, निः- काळजी. २ लोकशास्त्राची मर्यादा सोडून निर्लज्ज झाला तो.

निस्तरणें (धा. ना.) कांहींएक आरं- भिलेलें कार्य वाईट होऊं लागलें अस- तां श्रम करून तें तडीस नेणें किं० चांगलें होई असें करणें. २ कांहीं- एक केलें जें दुष्कर्म त्याच्या योगानें होणार जें वाईट फल तें भोगून त्याची निष्कृति करणें इ० परिहार करणें.

निस्तुक (वि०) केवळ. २ (अव्य०) अगदीं.

निस्तेज (सं. वि०) तेजोहीन.

नेस्तोष (अव्य०) निःशेष होई असें.

नेस्पृह (सं. वि०) निरिच्छ. २ इतर संबंध ज्यांत नाहीं असा.

निक्षूण (अव्य०) खरपूसपणानें सां- गणें बोलणें इ० धातूचें वि०.

नीच (सं. वि०) आकार, गुण, जा- ति इ० कानीं जो कोणेकापेक्षां क- मी तो. २ अधम. ३ (अव्य०)(ग्रं०) नित्य. [२ यथायोग्य.

नीट (वि०) वांकड्याचा प्रतियोगी.

नीटनेटका (वि०) जितक्यास तितका यथायोग्य सुशोभित दिसायाजोगा.

नीड (न. ना.) (ग्रं०) पक्ष्याचें घरटें, कोठा तें.

नीति (सं. स्त्री. ना.) अमुकानें अ- मुक तऱ्हेनें चालावें अशी शास्त्रांत लिहिली आहे किं० लोकसिद्ध जी रीति ती.

नीद (स्त्री. ना.) (ग्रं०) निद्रा.

नीर (सं. न. ना.) उदक.

नील (सं. वि०) एक रंग आहे तेणेंक- रून युक्त तो. २ (पु. ना.) एक रंग. ३ माणिकांत एक भेद आहे.

नीळ (वि०) नील. २ (स्त्री. ना.) निळा रंग ज्यापासून उत्पन्न होतो असें एक झाड आहे. ३ (पु. ना.) वानरांत एक जाति आहे.

नुकता (अव्य०) अलीकडेस, आतांसा.

नुकसान (अर० न. स्त्री. ना.) तोटा किं० कांहीं जिनसाचा नाश तें.

नुक्ता (अव्य०) नुकता किं० अलीक-

डेस. २ (पु. ना.) चांगल्या भाषणाचा किं० गायनाचा अंश तो.

नुपकर (वि०) (ग्रं०) असमर्थ.

नुपरतें (वि०) (ग्रं०) विषयासक्त.

नूतन (सं. वि०) नवीन.

नूर (अर० पु. ना.) शरीरावरील जो तेजोविशेष तो. [पार.

नृत्य (सं. न. ना.) नाचण्याचा व्या-

नृप (सं. पु. ना.) राजा.

नृपति (सं. पु. ना.) नृप.

नृपाल, ळ (सं. पु. ना.) राजा.

नेक (फा० स्त्री. ना.) ज्या ज्या व्यवहारांत किं० ज्याशीं ज्याशीं ज्या ज्या संप्रदायानें चालायाचें त्यांत छक्का पंजा न करितां त्या त्या संप्रदायानें चालण्याचा जो प्रकार तो.

नेचा (फा० पु. ना.) गुरगुडीस वेंटाळ्याची लांब नळी असते तो.

नेट (पु. न. ना.) लोटणें, ओझें उचलणें, इ० कांसाठीं सर्व शरीरांतील जें एकत्र झालें बळ तो. २ कांहींएक वस्तूचा कांहींएक पदार्थावर भार तो. ३ कांहींएक कार्य करण्याविषयीं कोणेकास लगादा तो. इ०.

नेटका (वि०) नीटनेटका.

नेटणें (धा. ना.) नेटानें कांहींएक पदार्थ पलीकडे ढकलणें. २ कांहींएक कार्य किं० मनुष्यादिसमुदाय अवधीजवळ येऊन ठेपणें.

नेटपाटें (अव्य०) (ग्रं०) नेटबोटें.

नेटबोटें (अव्य०) (ग्रं०) निश्चयेंकरून. २ हातोंपातीं.

नेडें, नेढें (न. ना.) सुई, दाभण, कुदळी इ० कांत दोरा, दांडा इ० अडकावयासाठीं छिद्र करितात तें.

नेण (वि०) अज्ञानी असें तें. २ (ग्रं०) (न. ना.) नेणीव.

नेणणें (धा. ना.) (ग्रं०) नजाणणें. २ (न. ना.) नेणीव.

नेणता (वि०) अज्ञानी, लहान तो.

नेणीव (स्त्री. ना.) (ग्रं०) अज्ञान.

नेत्र (सं. पु. ना.) डोळा.

नेपथ्य (सं. न. ना.) भूषण. २ नाटकाचेठायीं जो पडदा धरितात् त्याचे आंतील प्रदेश तें.

नेपाळा (पु. ना.) (ग्रं०) चूळ.

नेपुर (सं. नूपुर) (न. ना.) (ग्रं.) तोरडी.

नेफा (फा० पु. ना.) चोळणा इ० कांचा नाडी घालावयाचा प्रदेश तो.

नेबळा (वि०) ज्याचें शरीर पुष्ट असून फोंपसा तो व त्याचें शरीर व त्याणें धरिलें अस्ताव्यस्तपणें वस्त्रभूषणादिक किं० त्याचा तसा कारभार इ० तो.

नेभळा (वि०) नेबळा.

नेम (पु. ना.) नियम. २ (न. ना.) बाणादिक मारण्याचें लक्ष्य तें. ३ स्तंभादिक पुरण्याकरितां जो खळगा करितात तें. [चुकायाजोगा सरळपणें.

नेमका (अव्य०) लक्ष्यानुसंधान न

नेमणूक (स्त्री. ना.) सरकार इ० चाकर इ० कांस वेतनाचा नियम करून देतात तो. २ कोणेकाची कोणेकाकडे नियमानें जी योजना तो.

**नेमणें** (धा. ना.) नेमणूक करणें. २ बाणादिकेंकरून लक्ष्य वेधणें.

**नेमस्त** (वि०) न्यूनाधिकभावरहित.

**नेवाणें** (न. ना.) (ग्रं०) तिरस्कार.

**नेसणें** (धा. ना.) गुह्यावयव झांकायासाठीं वस्त्र कटिसंबद्ध करणें. २ (न.) नेसावयाचें वस्त्र तें. ३ (ग्रं०) ठेवणें.

**नेहटणें** (धा. ना.) (ग्रं०) निरखणें.

**नेहेमीं** (अव्य०) नित्यशः, निरंतर.

**नैय्यायिक** (सं. वि०) न्यायशास्त्र पढला तो.

**नैवेद्य** (सं. पु. ना.) देवास भक्षणार्थ अर्पितात जो भक्ष्य पदार्थ तो.

**नैश्वर** (वि०) (ग्रं०) नाशिवंत.

**नैष्ठिक** (सं. वि०) नियमनिष्ठा ज्यास आहे तो.

**नैष्ठिकब्रह्मचर्य** (सं. न. ना.) मुंज सुटल्यानंतर ब्रह्मचारिधर्मानें राहण्याचा जो प्रकार तें.

**नैसर्गिक** (सं. वि०) स्वाभाविक.

**नोक** (फा० स्त्री. ना.) खुबी. २ चुणूक. ३ भाला इ०कांची जी अणी ती.

**नोकल** (स्त्री. ना.)(ग्रं०)चुकवाचुकव.

**नोकिणें** (धा. ना.) (ग्रं०) पराभविणें.

**नोकुणें** (धा. ना.) (ग्रं०) चुकविणें.

**नोंदणें** (धा. ना.) हुंडी इ०कांची नक्कल करून ठेवणें.

**नोर** (पु. ना.) गलबतास जें भाडें पडतें तें.

**नौका** (सं. स्त्री. ना.) जलयान.

**न्यसणें** (धा. ना.) (ग्रं०) ठेवणें.

**न्याय** (सं. पु. ना.) इनसाफ. २ नीति. ३ एक शास्त्र आहे. ४ युक्ति.

**न्यायनिष्ठुर** (सं. वि०) न्याययोग्य निष्ठुर भाषण तें.

**न्याहार** (वि०) गुळगुळीत, साफ, चमत्कारिक पदार्थ तो. २ (पु. ना.) (ग्रं०) दृष्टि, अवलोकन.

**न्याहारी** (फा० स्त्री. ना.) प्रातःकाळीं स्वल्प भोजन करण्याचा जो प्रकार तो. २ स्वल्प भोजनासही म्ह०.

**न्याहाल** (फा० वि०) संपत्ति इ०कांनीं जो वृद्धिंगत तो.

**न्याहाळणें** (धा.ना.)(ग्रं०) निरखणें.

**न्यून** (सं. वि०) कमी.

**न्यूनाधिक** (सं. वि०) उणेंअधिक.

**न्हातीधुती** (स्त्री. ना.) नाहातीधुती.

**न्हावी** (पु. ना.) नाहावी. २ एक किडा आहे; जो बाभळ इ० कांचे काट्यांचें घर करित असतो.

---

## —प—

**प**— हा वर्ण एकविसावें व्यंजन आहे. संस्कृत शब्दमात्रावरून समासीं याचा प्रयोग होतो, याचा अर्थ रक्षिता किं० प्राशिता, उ० भूमिप म्ह० राजा, धनप म्ह० कुबेर, रक्तप म्ह० राक्षस, ढेंकूण इ०.

**पंक** (सं. पु. ना.) कर्दम.

**पंकज** (सं. न. ना.) कमळ.

**पकड** (स्त्री. ना.) मल्लयुद्धामध्यें दुसऱ्यास धरण्याचे किं० पाडण्याचे

उत्तरच तें प्रत्येकीं. २ प्रसंगानुसार पाहिजे तसा अर्थ व्हावयाजोगें भाषणामध्यें मर्म ठेविलें असतें किं० दुसऱ्याचा दसक आपणावर न चढतां आपला त्यावर चढावा अशी भाषणांत युक्ति असत्ये ती. ३ भाषणामध्यें दुसऱ्यानें आपणास मर्मी धरावें असा जो पूर्वापर विरोधादि भाषणदोष पडतो ती. ४ खिळा इ० उपटण्याचें हत्यार आहे.

पकडणें (धा. ना.) कोणेकास हस्तादिकानें धरणें. २ भाषणादिक मर्मी धरणें.

पक्का (सं. पक्क) (वि०) कच्चा नव्हे तो.

पंक्ति (सं. स्त्री. ना.) ओळ. २ अनेकांनीं मिळून भोजनकरण्याचे जे पर्याय ती प्रत्येक. ३ श्लोकांत एक छंद आहे. ४ (ग्रं०) दाहा संख्या.

पंक्तिपावन (सं. वि०) निर्दोषतेमुळें पंक्तीस भोजन करण्यास योग्य तो.

पंक्तिप्रपंच (सं. पु. ना.) पंक्तिभेद.

पंक्तिभेद (सं. पु. ना.) एका पंक्तीस भोजन करायास बसलेले जे अनेक त्यांमध्यें कोणेकास कांहीं पदार्थ वाढून कोणेकास वगळावें असा वाढण्याचा जो प्रकार तो. २ भोजनादिसमयीं व्यवधान, अवकाश, दिशाभेद इ० कृत जो परस्पर पंक्तींचा भेद तो.

पक्क (सं. वि०) काळानें किं० अग्नियोगानें शेवटील जो योग्य परिणाम त्यातें पावलें जें फलादिक किं० अन्नादिक तें. २ शास्त्र, व्यवहार इ० कांनीं प्रौढ झाली जी बुद्धि ती.

पक्कान्न (सं. न. ना.) लाडू, घिवर इ० जीं उंचीं अन्नें तें.

पंख (सं. पक्ष) (पु. ना.) पक्ष्याचा जो पक्ष किं० त्यांतील पीस तो.

पखरणें (सं. प्रसर) (धा. ना.) भूमि इ०कांवर पखरडा होई असें पुष्पें, धान्यें इ० प्रसृतपणें पडणें.

पखवाज (पु. ना.) मृदंग.

पंखा (सं. पक्ष) (पु. ना.) वारा घ्यावयाकरितां वस्त्र, वाळा, वेळू, ताडपत्र, कागद इ०कांचा पक्ष्याचे पक्षासारखा करीत असतात तो.

पखाल (सं. पयस, खल) (स्त्री. ना.) बैल इ० कांवर घालून पाणी आणायाकरितां गोणीसारखें जें चर्मपात्र करीत असतात ती.

पगडी (स्त्री. ना.) बांधलेल्या पागोट्याचे आकाराची शिवलेली जी टोपी असत्ये ती. २ पागोट्यासही डौलाचे भाषणांत ह्मणतात.

पंगत (स्त्री. ना.) पंक्ति.

पगार (पु. ना.) होडीमध्यें एक भेद आहे. २ मुशारा.

पंगिस्त (वि०) (ग्रं०) पराधीन.

पंगु, पंगू (सं. वि०) चालायाचे उपयोगीं ज्याचे पाय नाहींत तो. २ ज्या ज्या व्यापाराविषयीं जीं इंद्रियें किं० कांहीं पदार्थ उपयोगी त्या त्या इंद्रियादिकेंकरून जो विकल तो.

पघळ (वि०) विस्तृत.

पघळणें (धा. ना.) पसरणें. २ घट्ट जो घृतादि पदार्थ तो अग्न्यादिसंयोगानें पातळ होणें.

**पघा** (पु. ना.) लगड होण्याकरितां सुवर्णादिकांचा रस ज्या पात्रांत ओतितात तें पात्र तो.

**पंच** (सं. वि०) पांच. २ (पु. ना. वादी प्रतिवादी यांणीं आपल्या खटल्याचा निर्णय करून आपणास सांगण्याविषयीं मान्य केले जे लोक ते प्रत्येकीं. ते प्राय: पांच असतात. ३ कांहींएक कार्यावर तिन्हाइतपणें नेमलेले अधिकारी ते प्र०.

**पंचकडी** (स्त्री. ना.) कागदाचे पांच ताव किं० पांच रुपये इ० कांचा जो समुदाय तो.

**पचकळ** (वि०) ज्याचे भाषणामध्यें अभद्र, हलके शब्द बहुत येतात, ज्यामध्यें ताळतंत किं० सभ्यतेची रीत किमपि नाहीं असा जो मनुष्य किं० त्याचें भाषण तो.

**पंचक्रोशी** (सं. स्त्री. ना.) चार पांच कोशाचे आंत जे चार, पांच गांव परस्पर जवळ असतात त्यांचा समुदाय ती.

**पंचगव्य** (सं. न. ना.) गायीचें दूध, दहीं, तूप, शेण, आणि मूत्र हीं पांच मिळोन तें.

**पचणीं, पचणीस** (अव्य०) जिरणीस.

**पचणें** (सं. पचन) (धा. ना.) भक्षिल्या पदार्थानें जठराग्नीच्या योगानें यथास्थित परिणामातें पावणें. २ घेतलेलें द्रव्यादिक किं० केलेला अपराधादिक निस्तरायास न पडे असा होणें. २ भाकर इ० तव्यावर परिपक्क होणें. ३ दुखणें इ० कांत चिरकाळ क्लेश पावणें.

**पंचत्व** (सं. न. ना.) मरण.

**पचन** (सं. न. ना.) पचण्याचा व्यापार किं० फल तें.

**पचपचीत** (वि०) आंत जलांश बहुत झाल्यामुळें किं० भूमि इ० कांचे दोषामुळें किं० स्वभावामुळें चांगली रुचि ज्यास नाहीं असा भाजी, ऊंस इ० पदार्थ तो. २ केवळ निरस जें गायन, भाषण इ० तें.

**पंचपदी** (सं. स्त्री. ना.) कोणी साधु, संत इ० देवापुढें नित्य नियमानें कांहीं पदें किं० अभंग इ० ह्मणतात ती.

**पंचप्राण** (सं. पु. ना.) प्राणवायूचे मानिले जे पांच भेद ते.

**पचंबा** (पु. ना.) शाहीर लोक श्रावणाचे सर्व सोमवारीं देवप्रीत्यर्थ लावण्या गाणें इ० समारंभ करितात तो.

**पंचबाण** (सं. पु. ना.) (ग्रं०) मदन.

**पंचमहापातकें** (सं. न. ना.) ब्रह्महत्या, सुरापान, स्वर्णस्तेय, मातृगमन, तत्संसर्ग अशीं पांच जीं पातकें तीं.

**पंचवेउळी** (स्त्री. ना.) (ग्रं०) पांच नांग्यांची इंगळी.

**पंचशर** (सं. पु. ना.) (ग्रं०) मदन.

**पंचाइत** (स्त्री. ना.) पंचांनीं वादी प्रतिवादी यांचा पक्ष समजून घेऊन करायाचा निर्णय ती. २ पंचांनीं मनास आणायाजोगा जो खटला ती. ३ कोणेक गोष्टीच्या दुर्निर्वहतेमुळें जी संकटरूपता वाटते ती इ०.

**पंचानन** (सं. पु. ना.) सिंह किं० व्याघ्र तो. २ महादेव.

**पंचामृत** (सं. न. ना.) दूध, दहीं,

तूप, मध, साखर हीं पांच तें. २ मिरच्या, चिंच, गूळ इ० पदार्थ एकत्र करून तोंडीं लावणें करित असतात तें. ३ पक्वान्नादियुक्त जें मिष्टान्न त्यास म्हणतात.

पंचायतन (सं. न. ना.) शिव, विष्णु, सूर्य, गणपति, देवी या पांचांचा समुदाय तें. २ कोणेक कार्यांत पडलेले समान योग्यतेचे एकचित्त जे पांच पुरुष त्यांस म्हणतात.

पंचारती (स्त्री. ना.) तबक इ० पात्रात पांच दिवे ठेवून देवादिकांस ओंवाळण्याचा जो व्यापार ती. २ त्यासाठीं पात्रांत लावून ठेविले जे पांच दिवे ती. ३ पांच दिवे लावायाचे सोयीचें एक पात्र असतें, ज्यास मूठ असते ती.

पंचाक्षरी (सं. पु. ना.) पिशाच अंगांतून काढण्याचे मंत्र ज्यास येतात तो.

पंचीकरण (सं. न. ना.) एकमेकांच्या गुणाचा एकमेकांस संबंध नाहीं अशा रूपानें असलेलीं जीं आकाशादि भूतें त्यांचें देहादिकांच्या उत्पत्तीसाठीं ईश्वरशक्तीनें झालें जें परस्पर संमिश्रण तें.

पंचू (पु. ना.) (ग्रं०) पक्षी.

पच्ची (स्त्री. ना.)पाणउतारा. २ फजीती.

पंजर (सं. पु. ना.) पिंजरा.

पंजाबी (फा० वि०) पंजाब म्हणून देश आहे तत्संबंधी जो मनुष्यादि तो. २ भाषण इ० व्यवहारांत पुरा शाहाणा जो मनुष्य त्यास म्हणतात.

पट (सं. पु. ना.) वस्त्र. २ सोंकटीं, बुदबळें इ० खेळायाकरितां वस्त्रादिकांवर पाडितात जीं घरें तीं सर्व मिळून तो. ३ अमुकास अमुक द्यावें इ० पुढें मागें समजायाकरितां जो कागदावर लेख लिहिला असतो तो. ४ अनेक चित्रांचा जो मोठा कागद तो. ५ (ग्रं०) पाट.

पटकन, पटकर (अव्य०) त्वरेनें.

पटका (सं. पट्ट) (पु. ना.) वीत, दीडवीत रुंद पांच चार हात लांब असें एक कंबर इ०कास बांधायाचें उपयोगी वस्त्र आहे.

पटकावणें ( धा. ना.) कोणेकास पटकन जाऊन धरणें किं० भाषणादिकांत दुसऱ्यास युक्तीनें धरणें किं० दुर्मिळ पदार्थादिक पटकन आपलासा होई असें करणें.

पटणें (धा. ना.) दुसऱ्याकडून आलेला जो पैका इ०किं०हुंडी इ०लेखपत्र तें परिगृहीत होणें. २ दुसऱ्यानें सांगितलेली गोष्ट, प्रश्न इ० तें अनुभवास येणें इ०.

पटपट (अव्य०)पटकन पण बहुतवार.

पटल (सं. न. ना.) नेत्रांवर रोगानें जे दृष्टिबंधक पडदे येतात तें. २ छप्पर, धूळ इ० कांचा जो समूह तें. ३ आत्मस्वरूपदर्शनास प्रतिबंधक जे माया इ० तें. ४ आच्छादन.

पटवणें (धा. ना.) पुतळ्या, रुद्राक्ष इ० सुवर्ण, रेशीम इ०कांच्या तंतूनीं इकडचें तिकडे न होई असें गांठी इ० देऊन घट्ट ओंवणें.

पटाईत (पु. ना.) पट्टा खेळण्यामध्यें जो कुशल तो. २ जो जो ज्या ज्या विद्यादि व्यवहारांत निपुण तो. ३ देहाचे अंगावर कटारीचे आकाराचे काळे पिंवळे पट्टे असतात असा जो वाघ तो.

पटु (सं. वि०) कांहींएक कर्म करण्याविषयीं जो समर्थ किं० कुशल तो.

पट्टराणी (स्त्री. ना.) राजासहवर्तमान जीस राज्याभिषेक झाला असी जी राजाची स्त्री ती.

पट्टा (पु. ना.) खोवळ्याची मूठ ज्या तरवारीस असते अशी जी तरवार तो. २ कंबरपट्टा. ३ शिपाई इ०कांचे गळ्यांत किं० कंबरेस बांधलेली कंबरपट्ट्यासारिखी चर्माची वादी असल्ये किं० तदाकार सखलादीचा असतो तो. ४ शरीर, वस्त्र इ० कांवर कांहींएक रंगाचें इ० चिन्ह असतें तो.

पट्टाभिषेक (सं. पु. ना.) राजास सिंहासनावर बसवून जो राज्याभिषेक करितात तो.

पट्टी (सं. स्त्री. ना.) वस्त्र, कागद, फळी इ०कांचा दोन तीन अंगुळें रुंद लांबट जो तुकडा, क्षत इ०कांवर बांधणें किं० अन्य वस्त्र इ०कांस लावणें इ० उपयोगी पडतो ती. २ कोणेक कार्यावर किं०. कोणेकास द्रव्यादि देणें अ० घेणें यांचा जो अनेकांवर विभाग ती. ३ त्या विभागाप्रमाणें नांवनिशीवार याद करितात ती. ४ पागोट्याचे पदर सारखे बसावे म्हणून दुमड घालून करितात ती किं० नेसल्या वस्त्राची साफ जी चुणी बसवितात ती. ५ विड्याचे पानांत सुपारी, कात इ० घालून जो लांबट विडा करितात ती. [आहे.

पट्टू (सं. पट्ट) (पु. ना.) ऊर्णावस्त्र

पठण (स. न. ना.) श्लोकादि ग्रंथ म्हणण्याचा जो व्यापार तें.

पठाड (स्त्री. ना.) बैलाची मूठ आंवळ्याचें सुरळी इ० कांचे नगारेसारिखें केलें असतें जें साधन ती.

पठार (स्त्री. ना.) पठाड. २ (न. ना.) पर्वताचे मस्तकावरील जी सपाट भूमि तें.

पठिंगा, पठिंबा (पु. ना.) कोणेकास कोणेका व्यापारीं जो कोणी पाठबळ असतो तो.

पट्टा, पठ्ठया (वि०) तरूण असून शरीरानें पुष्ट व बळकट तो.

पड (पडणें) (स्त्री. ना.) वाद, युद्ध इ० प्रसंगीं अंगीं बळ असून कांहीं कारणामुळें तो तो आवेश सोडून राहाण्याचा जो प्रकार ती. २ झाडावरून भूमीवर पडलेले जे आंबे ती. ३ लागवड झाल्यावांचून राहिलें जें शेत ती.

पडकणें (धा. ना.) (ग्रं०) संवकणें.

पडखळणें (धा. ना.)(ग्रं०) उठावणें.

पडगादी (स्त्री. ना.) (ग्रं०) गालीचा इ०.

पडछाया (सं. प्रतिच्छाया)(स्त्री. ना.) दीपामुळें मनुष्य इ० कांची जी छाया पडते ती. २ प्रतिबिंब.

पडजीभ (प्रति, जिव्हा) (स्त्री. ना.)

जिव्हामूलावर एक मांसगोलरूप अवयव लोंबत असतो तो.

पडझड (स्त्री. ना.) तळावरून पदार्थ काढिला असतां किं॰ सैन्यादि निघालें असतां तळावर जें काहीं पडलेलें झडलेलें राहतें ती. २ इमारत इ॰ कांची झालेली मोड तोड ती.

पडणें (सं. पतन) (धा. ना.) कांहींएक पदार्थ वरून अधोभागस्थ आधारावर येणें. २ उभेपणीं असलेला पदार्थ त्याणें आडवेपणी आधाराशीं संबद्ध होणें. ३ किल्ला, वाडा इ॰ कोसळणें. ४ कोणेक सतत चाललेला व्यवहार थांबून राहणें.

पडतपोशी (स्त्री. ना.) पडदा, भित इ॰ कांच्या आश्रयामुळें कोणेकस्थळावर जो आवृत्तपणा येतो ती.

पडतळणें, ताळणें (धा. ना.) कांहींएक संदिग्ध गोष्ट पडताळ्यानें ताडून पाहाणें. २ ढाल, तरवार इ॰ निधनेसमयीं ज्या अवयवाचेठायीं ज्या प्रकारें धारण करायाचीं त्याप्रकारें धारण करणें.

पडताळा (पु. ना.) कोणेक गोष्टीविषयीं प्रामाण्यसंदेह आला असतां त्याच्या निरासासाठीं प्रमाणांतर, प्रकारांतर इ॰कानें ताडून पाहाण्याचा जो प्रकार तो.

पडदळ (न. ना.) ग्रामांतरास जावयाचे प्रसंगीं बरोबर न्यावयाचें जें ओझें त्यास म्हणतात. २ पडदळें.

पडदळें (न. ना.) शिपाई लोक तरवार इ॰ अडकवायाकरितां चर्म, बनात इ॰कांचा पट्टा गळ्यांत अडकवीत असतात तें.

पडदा (फा॰ पु. ना.) दृष्टि, वारा इ॰कांचे निरोधार्थ वस्त्र किं॰ वाळा, तृण इ॰कांचें वस्त्रासारखें करून जें मध्यें अंतर्धान लावितात तो. २ नेत्रावर जें पटल येत असतें तो. ३ शरीर, कांदा, लांकूड, दगड, घडीची पोळी इ॰कांचेठायीं एकाखालीं एक एकाखालीं एक असे जे त्वचारूप अंश असतात ते प्रत्येकीं. ४ उरावरील जो अंगरख्याचा अंश तो. ५ परस्परांनीं भाषणादि व्यवहारीं केवळ साफ न वागायाजोगें जें परस्परांचें अंतःकरण मिळण्यांत कांहीं अंतर असतें तो इ॰. [भित ती.

पडदी (स्त्री. ना.) एकेरी विटेची पातळ

पडप (न. ना.) कोणेकाची प्रतिष्ठा वर्णन करण्याविषयीं जो सर्वदा कोणेकास पक्षपात किंवा पक्षपातानें वर्णनीय जी प्रतिष्ठा ते. २ ओढून ताणून आणिलेली जी कोणेकानें प्रतिष्ठा तें. ३ (ग्रं॰) (स्त्री. ना.) बरोबरी. ४ शोभा. ५ शृंगार. ६ आवरण.

पडम (न. ना.) पडशी इ॰ करण्याच्या उपयोगी दुहेरी तिहेरी सुतानें विणलेलें अरुंद वस्त्र असतें तें.

पडवी (स्त्री. ना.) घराचे वासे संपून जेथें पाणोळ्या आल्या तेथें दुसरे वासे जोडून जो घराचा प्रदेश वाढवितात ती. २ एकपाखी इमारत ती.

पडशाळा (स्त्री. ना.) उतारकरू लोकांस उतराघासाठीं जी देवालयालगत धर्मशाळा बांधितात ती.

पडशी (स्त्री. ना.) दुमोट करायाच्या सोयीचें मध्यें तोंड ठेवून जें पडम इ०कांमें पोतें करितात तें.

पडसाई (स्त्री. ना.) (ग्रं०) अंधक अंधकपणा.

पडसाद (सं. प्रतिशब्द) (पु. ना.) (ग्रं०) प्रतिध्वनि. [जो साक्षी तो.

पडसाक्षी (पु. ना.) साक्षीदाराचा

पडसें (न. ना.) शैत्य इ० मस्तकांत झाल्यामुळें नाकांतून पाणी, शेंबूड इ० गळतो असा रोग तें.

पडळ (न. ना.) पटल.

पडाँव, पडाव (पु. ना.) गलबतांत एक भेद आहे.

पंडित (सं. पु. ना.) शास्त्रवेत्ता तो. २ पुरा जो चतुर त्यास किं० ज्या कामांत जो पुरा त्यास त्या कामांत म्हणतात. ३ लेखपत्रादि व्यवहारीं राजपुरुषादि थोर लोकांचे नांवापुढें याचा प्रयोग असतो.

पडिपाड, पाडू (पु. ना.) (ग्रं०) साम्यता. २ थोरी. ३ व्याप्ति.

पडिपाडें (अव्य०) (ग्रं०) सारखेपणें.

पडिभर (पु. ना.) (ग्रं०) अधिकता.

पडिभरू (वि०) (ग्रं०) श्रेष्ठ. २ (पु.) अधिपति. ३ अधिकपणा.

पडिसा (पु. ना.) (ग्रं०) पडशब्द.

पडीत (वि०) शेत व्हावयाजोगीं असून शेत न होतां उगीच पडलेली जागा ती. २ ज्याज्या कार्यास लागावयाचा त्या त्यास लागला नसतां उगीच रिकामा पडला जो पदार्थ तो.

पड़ोसा (पु. ना.) पडताळा. २ शेजार.

पढणें (सं. पठन) (धा. ना.) शास्त्रादि विद्यापठन करणें.

पढतमूर्ख (पढणें, मूर्ख) शास्त्र जाणता असून कार्याकार्य विचार न करितां वर्ततो त्यास म्हणतात.

पढियंता (वि०) (ग्रं०) आवडता.

पढियाव (पु. ना.) (ग्रं०) आवड, प्रेम.

पढियासणें (धा. ना.) (ग्रं०) भासणें.

पढियें (वि०) (ग्रं०) पढियंता.

पढीक (वि०) पढलेला.

पण (सं. पु. ना.) कांहीं कार्याविषयीं केला जो प्रतिज्ञापूर्वक नियम तो. २ द्यूतास जें द्रव्य जिंकण्याविषयीं मांडितात तें. ३ (अव्य) परंतु.

पणती (स्त्री. ना.) दीप लावण्याचें उपयोगी मृत्तिकेचें पात्र आहे.

पण्यांगना (सं. स्त्री. ना.) (ग्रं०) वेश्या, कळवंतीण.

पत (स्त्री. ना.) देणें, घेणें इ० व्यवहारीं प्रमाणिकपणानें चालल्यामुळें लोकांनीं गाहाण, जामीन इ०कांची अपेक्षा न धरितां त्याशीं केवळ विश्वासावर व्यवहार करावा अशी जी कोणेकास योग्यता आली असते ती.

पंत (सं. पंडित) (पु. ना.) राजाचे अष्टप्रधान ते प्रत्येकीं. २ ब्राम्हण असून प्राधान्येंकरून कारकुनीची विद्या जो जाणतो त्याच्या नांवापुढें हें नांव लागतें.

पतक (न. ना.) एकेक सरदाराचे

दिमतीस लावलेला जो राउतांचा समुदाय तें.

पतकर (पु. ना.) या कार्याचा निर्वाह माझेकडे लागला अशा प्रकारानें कोणेक कार्याविषयीं केला जो अंगीकार तो.

पतकरणें (धा. ना.) कोणेक कार्याचा निर्वाह करण्याविषयीं अंगिकारणें.

पतंग (सं. पु. ना.) दिव्यावर जो क्षुद्रजंतु मोहानें पडत असतो तो. २ पावडींत एक भेद आहे. ३ एक तांबड्या रंगाचे उपयोगी लांकूड आहे. ४ पक्षी. ५ सूर्य. [पार तें.

पतन (सं. न. ना.) पडण्याचा व्या-

पतळी (स्त्री. ना.) लोखंड, सोनें इ० तोडायाचें एक पोलादी शस्त्र आहे.

पताक (स्त्री. ना.) पताका.

पताका (सं. स्त्री. ना.) लाहान जो ध्वज तो. [जो नवरा तो.

पति (सं. पु. ना.) धनी. २ स्त्रियांचा

पतिकार (सं. अप. पु. ना.) (ग्रं०) प्रतिकार. २ अपायउपाय. ३ अंगीकार.

पतिकरू (पु. ना.) (ग्रं०) पतकर. २ अनुभव.

पतित (सं. वि०) कांहीं पातक केल्यामुळें जातिभ्रष्ट झाला तो. २ ऊर्ध्व गतीस कारण जें पुण्य त्याचा लेशही ज्याचे पदरीं नाहीं तो. ३ पडलेला.

पतिव्रता (सं. स्त्री. ना.) पतीचे आज्ञेचें कदापि उल्लंघन करूं नये अशा रीतीनें चालते जी स्त्री ती. २ जिनें कधीं व्यभिचार केला नाहीं तीस ह्मणतात.

पंतोजी (पु. ना.) वेतन घेऊन मुलांस व्यावहारिक लिहिणें शिकवितो तो. २ मनस्वी वर्तणूक केली असतां ज्यापासून शिक्षा होईल अशी संभावना असते असा जो धनी इ० त्यास ह्मणतात.

पत्ता (पु. ना.) कोणेक पदार्थाचें राहावयाचें जें ठिकाण, ज्याचे ज्ञानानें तो तेथें आहे अशा प्रकारें त्या पदार्थाचें ज्ञान होतें तो. २ तंबाखूचें चुरल्यावांचून सगळें पान तो. [स्त्री ती.

पत्नी (सं. स्त्री. ना.) विवाहाची जी

पत्र (सं. पु. ना.) पर्ण. २ कोणेकास कांहीं लिहून पाठविला जो कागद तें. ३ पोथीचे एक साच्याचे जे अनेक कागद असतात ते प्रत्येकीं.

पत्रक (सं. न. ना.) व्यवहारसंबंधी जमाखर्च इ० कांचे झाड्याचें टांचण ज्यावर लिहितात तो कागद तें.

पत्रदर्शनीं (सं. अव्य०) पत्र पाहताच.

पत्रा (सं. पत्र)(पु. ना.) सोनें, रुपें, तांबें इ० कांचा फळीसारखा पातळ जो आकार केला असतो तो.

पत्राज (स्त्री. ना.) मी थोर, मी शाहाणा इ०रूप जो प्रतिष्ठितपणाचा डौल मिरवितात तो.

पंथ (सं. पु. ना.) मार्ग. २ ज्या ज्या साधनें जो जो ईश्वरप्राप्तीचा मार्ग स्थापिला आहे तो तो. उ० नाथपंथ.

पथ (सं. पु. ना.) पंथ.

पथिक (सं. पु. ना.) वाटसरू.

पथें (वि०) (ग्रं०) बरें. २ मार्गाचें.

पथ्य (सं. न. ना.) झालेला रोग शा-

त न्हावा किं० जडू नये इ०कांसाठीं अमुकच पदार्थ खावे, अमुक सर्वथा वर्जावे इ० रूप जो नियम तें. २ दुखणेकरी, बाळंतीण इ०कांचें भोजनास ह्मणतात. ३ ज्या ज्या व्यापाराविषयीं जो जो पदार्थ किं० क्रिया हितकारक आहे तो त्या त्या विषयीं.

पद (स. न. ना.) पाऊल. २ राज्याधिकाररूप जें स्थान तें. ३ गाण्यांत कवितेचा भेद आहे.

पदक (न. ना.) कंठीं इ० कांचे मध्यभागीं सुवर्णाचें किं० जडावाचें अश्वत्थपत्राकार घालीत असतात तें

पदच्युत (स. वि०) राज्यादिअधिकारपदापासून जो भ्रष्ट झाला तो.

पदपिंड (पु. ना.) (ग्र०) जीव आणि परमात्मा यांचें ऐक्य तो.

पदर (स. पल्लव) (पु. ना.) वस्त्राचे दोहीं शेवटाचे दोन अंश ते प्रत्येकीं २ कोणिकाचा कोणिकाशीं साक्षात् किं० परंपरेनें झालेला जो योनिसंबंध तो ३ पडदा. पदरचा ह्म० भाषण, लेखन इ० प्रसंगीं मूळक्रम नसतां आपले कल्पनेनेंच कल्पिलेला जो अर्थ तो. पदर पसरणें ह्म० काहीं गोष्टीविषयीं फार काकळून करणें इ०.

पदरमोड (स्त्री. ना.) संसारकृत्यास गार्षिकादि कांहीं चालता लाभ नसल्यामुळें किं० कांहीं व्यवहारीं खर्च भागायाजोगता लाभ नसल्यामुळें पदरचे द्रव्याचा व्यय करावा लागतो ती.

पदवी (स. स्त्री. ना.) राजा, प्रधान इ० अधिकाररूप जें स्थान ती.

पदार्थ (स. पु. ना.) आहे किं० नाहीं असें ह्मणायास यावयाजोगा जो अर्थ तो. २ पदाचा जो अर्थ तो. ३ भोज्य, पक्वान्नें इ० जीं भक्ष्यें केलीं असतात तीं प्रत्येकीं. केवळ प्राकृत व्यवहारांत वृक्ष, पाषाण इ० अचेतन जे अमूर्त पदार्थ त्यांचेठायीं प्रसिद्धि. तू काय पदार्थ आहेस इ० स्थळीं गण्यकोटींत गणायाची योग्यता तुला नाहीं असा अर्थ.

पदोपदीं (अव्य०) प्रतिपदाच्या ठायीं. २ कार्यमात्राचे प्रति अवसराचे ठायीं.

पद्धत, पद्धति (स. स्त्री ना.) कांहीं एक कार्य करण्याचा या या प्रकारें असें असें करावें असा जो एक मार्ग असतो ती.

पद्म (स. न. ना.) कमळ. २ शतकोटिरूप संख्या तें. ३ सर्पाचे फणावर जें दशांक चिन्ह असतें तें.

पद्महस्ती (स. वि०) ज्याणें कोणेकास आरोग्य करण्याविषयीं किं० विद्या सांगण्याविषयीं इ० कांसाठीं हातांत धरलें असतां आरोग्यादि द्वारा त्याचें बरें होतें अशा दैवाचा पुरुष असतो तो. [विता तें.

पद्य (स. न. ना.) श्लोकादिरूप क-

पन्हासणें (धा. ना.) (ग्र०) वस्त्र भूषणादिकांनीं सुशोभित करणें, शृंगारणें

पन्हळ (स. प्रणालिका) (पु. ना.) कोणेक स्थळींचें पाणी जावें ह्मणून

लाकूड, दगड इ० गोळा करून मार्ग करितात तो. [रुंदी तो.

पऱ्हा (फा० पु. ना.) वस्त्राची जी

पऱ्हें (सं. पानक) (न. ना.) आंबा, चिंच इ० कांचें आंबट पाणी करून त्यामध्यें गूळ, साकर घालून जें प्या-वयास करितात तें.

पऱ्हेरी (स्त्री. ना.) उष्णकाळीं आल्या गेल्यानें पाणी प्यावें यासाठीं मार्गादि-कांवर जें जलस्थान करितात तें. २ झाडाच्या कलमांचा समुदाय.

पय (सं. न. ना.) दूध. २ उदक.

पयोधर (सं. पु. ना.) स्तन. २ मेघ.

पयोधि (सं. पु. ना.) (ग्रं०) समुद्र.

पर (सं. वि०) इतर. २ आत्मरूप किं० आत्मीय नव्हे तो. ३ परम. ४ शत्रु. ५ (पु. ना.) पीस. ६ (स्त्री.) प्रकार. ७ (अव्य०) प-लीकडे. ८ परंतु.

परखणें (धा. ना.) (ग्रं०) बाहेर जाणें.

परगणा (फा० पु. ना.) किल्ला किं० मोठें शहर याचे नांवाखालीं चाल-तात जे देश ते प्र०. २ कांहींएक का-माचें फारच मोठें खटलें पडलें अ-सतें त्यास म्हणतात.

परगा (पु. ना.) (ग्रं०) भ्रमर.

परचक्र (सं. न. ना.) एक राजाचे राज्यांत इतर राजकृत जो उपद्रव तें.

परज (पु. ना.) तरवारीची मूठ तो. २ तुरंग.

परजणें (धा. ना.) तरवार इ० मुठीं-●धरून कंपित होई अशी हाल-विणें किं० सभोवती फिरविणें.

परडें (न. ना.) नागडीच्या दोहीं शे-वटास जीं दोन वजन करण्याकरितां पात्रें बांधिलीं असतात तीं प्रत्येकीं. २ घराचे जवळ कुंपणाचे आंत शाक भाजी किं० फुलझाडें करायाकरितां जी जागा राखिली असते ते.

परतणें (धा. ना.) परत करणें, हो-णें, देणें, येणें, जाणें इ०. २ भूमि इ०कांवर एके अंगाकडे स्थित जो पदार्थ तो दुसरे अंगाकडे करणें किं० इकडचा तिकडे, तिकडचा इक-डे असा करणें. [भिन्न तो.

परतंत्र (सं. वि०) दुसऱ्याचे जो स्वा-

परतत्व (सं. न. ना.) (ग्रं०) ब्रह्म.

परतभाडें (न. ना.) भाडेकरी भाडें पोंचवून मागें स्वस्थानीं जाण्याचे प्रसं-गीं जें तिकडेंचेंच भाडें घेतकरितो तें.

परती (स्त्री. ना.) (ग्रं०) विरक्ति.

परंतु (सं. अव्य०) पूर्ववाक्यार्थ अंगी-कारून त्यास दोष प्रतिपादनादिरूप विरुद्ध वाक्याचा उपन्यास कर्तव्य असतां मध्यें याचा प्रयोग होतो.

परतून (अव्य०) पुनरपि, पुनः, फि-रून.

परत्वें (अव्य०) अनुरोधें.

परदेश (सं. पु. ना.) स्वदेशाहून भिन्न जो कांहीं दूर देश तो. २ प्रवास.

परदेशी (सं. वि०) स्वदेश सोडून परदेशांत आला जो मनुष्यादि त्यास तेथें म्हणतात. २ दक्षिणी लोक रज-पूत इ०कांस म्हणतात. ३ आईबाप इ० जे रक्षणकर्ते ते ज्यास नाहींत असें जें लाहान मूल तें.

परद्वार (सं. न. ना.) परस्त्रीशीं संग तें.
परंपरा (सं. स्त्री. ना.) एकापुढें एक किं० एकामागें एक अशा क्रमानें अनेक संबद्ध पदार्थांची जी माला ती.
परंपरागत (सं. वि०) वंशादिपरंपरेनें चालत आलेली जी वृत्ति, आचार इ० ती.
परभारां, रें (अव्य०) गमनावसरीं ज्या मध्यवर्ती स्थलावरून जाण्याची संभावना असते त्या स्थळास चुकवून जाणें, येणें या क्रियांचें वि०. २ कोणेक व्यवहार ज्या ज्या स्थळीं संबंध पावून होत असावा अशी योग्यता असतां त्या त्या स्थळीं संबद्ध न होतां. ३ आपले परोक्ष.
परम (सं. वि०) उत्कृष्ट.
परमहंस (सं. पु. ना.) संन्याश्यांत एक भेद आहे. [धातुरोग आहे
परमा (सं. प्रमेह) (पु. ना.) एक
परमाणु (सं. पु. ना.) पृथ्वी, जल, वायु यांचा केवळ जो सूक्ष्म अंश तो.
परमात्मा (सं. पु. ना.) सर्वव्यापी, सर्वसाक्षी समष्टिस्वरूप एक जो आत्मा तो.
परमार (पु. ना.) (ग्रं०) कर्म.
परमार्थ (सं. पु. ना.) ईश्वरसाधनरूप जो पुरुषार्थ तो. २ कांहींएक गोष्टींतील केवळ खरा जो अंश असतो तद्रूप जो अर्थ तो.
परमावधि (सं. स्त्री. ना.) कांहींएक व्यवहार, शक्ति इ०कांची केवळ शेवटची मर्यादा ती.
परमेश्वर (सं. पु. ना.) जगदीश्वर.
परलोक (सं. पु. ना.) पुण्य, पाप तारतम्यानें मेल्यानंतर प्राप्त होणारा स्वर्ग, नरक इ० लोक तो.
परवड (स्त्री. ना.) भोजन गोड व्हावें म्हणून जे शाकभाजी इ० अनेक प्रकार करावे लागतात ती. २ दुर्दशा. ३ (ग्रं०) उपचार. ४ प्रीति. ५ चातुर्य. [२ (अव्य०) पुनः.
परवडी (स्त्री. ना.) (ग्रं०) परवड.
परवश (सं. अव्य०) परतंत्र.
परवा (फा० स्त्री. ना.) कोणेक पदार्थादिकांच्याठायीं यास जपलें पाहिजे या अनुरोधानें वर्तलें पाहिजे इ० रूप जी उत्कृष्टताप्रद असती ती. २ कोणेक गोष्टीविषयीं ही कशी निभावेल इ० रूप जी चिंता वाटते ती.
परवां (अव्य०) वर्तमान दिवसाहून एक दिवस आड जाऊन पूर्व दिवशीं किं० उत्तर दिवशीं. २ (स्त्री. ना.) तो दिवस.
परवाणगी, नगी (फा० स्त्री. ना.) राजादिकांपासून कोणेक कार्य करण्याविषयीं मागून घेतली जी आज्ञा ती.
परसा (पु. ना.) शीतनिवारण इ०कांसाठीं जो चुलीवांचून इतरत्र भूमीवर अग्नि पेटवितात तो.
परस्पर (सं. वि०) याणें त्याजवर उपकारादि करावे त्याणें याजवर करावे अशाप्रकारें उपकारकरण, कलह, युद्ध इ० क्रियांच्याठायीं प्रवृत्त जे अपतां ते. २ (अव्य०) परभारें.

परस्वाधीन (सं. वि०) परतंत्र.

पराई (स्त्री. ना.) तारुण्य आणि वार्धक्य अशा दोन ज्या वयोवस्था त्या प्रत्येकी.

पराकाष्ठा (सं. स्त्री. ना.) कांहींएक गोष्टीचे अतिशयितपणाची शेवटची दशा जिचे पुढें अतिशय होण्याची मर्यादा राहिली नाहीं ती.

पराक्रम (सं. पु. ना.) लोकांनीं वाहवा ह्मणायाजोगें जें प्रबल शत्रूचा पराजय, बहुत धनसंपादन इ०असाधारण कर्म त्याचा निर्वाह व्हावयाजोगा पुरुषादि चेतन अचेतन सर्व पदार्थांचे अंगीं जो सामर्थ्यविशेष असतो तो.

पराग (सं. पु. ना.) पुष्पांत जे बारीक रजःकण असतात ते.

परागंदा (फा० वि०) आपलें जें गांव, घर, वतन, शेत इ० तें कांहीं कारणामुळें सोडून तेथील वस्ती मोडून ग्रामांतरास किं० देशांतरास गेला तो.

पराङ्मुख (सं. वि०) तोंड मागें फिरविलें आहे ज्याणें तो. २ कोणेक विषयाची किं० कार्याची वाट सोडिली तो त्यापासून.

परांची (स्त्री. ना.) चार लांकडें पुरून वर आडवीं लांकडें घालून गवंडी सुतार इ०कांस इमारतीचें काम करण्यासाठीं उभें रहाण्यास जी रचना करितात ती.

पराजय (सं. पु. ना.) वाद, युद्ध इ० कांमध्यें दुसऱ्याचा उत्कर्ष होऊन आपणाकडे अपकर्ष येतो तो.

पराजित (सं. वि०) ज्याचा पराजय झाला तो.

परान्न (सं. न. ना.) अन्यस्वामिक जें अन्न तें. २ त्या अन्नाचें भोजन तें.

पराभव (सं. पु. ना.) पराजय.

परामर्श (सं. पु. ना.) आपले स्वकीय जन किं० गोरगरीब इ०कांस कोणास काय पाहिजे, कोणास काय विपत्ति आहे तें जाणून घेऊन स्वसामर्थ्यानुसार पाहिजे तें देणें किं० विपत्ति दूर करणें इ० आचरणाचा जो प्रकार तो इ०.

परायण (सं. वि०) ज्या अर्थाकडे ज्या मनुष्यादिकाचें किं० भाषणादिकाचें मुख्यत्वेंकरून लक्ष्य असतें तो मनुष्य भाषण इ० त्या त्या अर्थाविषयीं.

परावा (वि०) परका.

परिखा (सं. स्त्री. ना.) चर, खंदक.

परिगुण (पु. ना.) (ग्रं०) सण. २ पाहुणचार.

परिघ (सं. पु. ना.) कांहींएक स्थलांत मनुष्यादिकांचे प्रतिबंधासाठीं भोंवतालें भिंत किं० कुंपण इ० करितात तो. २ एक आयुध आहे. ३ घेर.

परिचय (सं. पु. ना.) मनुष्यादिकांची परस्परें सहवासादिकांमुळें पुरतेपणी जी ओळख तो किं० कोणेक विषयाचे अ० गोष्टीचे सेवनादि अभ्यासामुळें यामध्यें या या प्रकारचे गुण आहेत किं० हें या या प्रकारें करावें लागतें इ० रूप ज्ञानसंस्कार होतो तो. २ प्रत्यय.

परिचर्या (सं. स्त्री. ना.) सेवा.

परिचित (सं. वि०) ज्याचा परिचय ज्यास झाला आहे तो त्याचा.

परिच्छिन्न (सं. वि०) कोणेक परिमाणानें किं० संख्येनें परिच्छेद झाला आहे ज्याचा तो. २ (अव्य०) अंत अन्यथा भावाचा यत्किंचित्‌ही प्रवेश न ठेवितां सांगणें इ० क्रियांचे विशेषण.

परिच्छेद (सं. पु. ना.) कोणेक परिमाणादिकेंकरून कांहीं पदार्थाचें इयत्ताकरण तो. २ ग्रंथादिकांचे प्रकरणादि संगतीनें भिन्न भिन्न केलेले जे विभाग ते प्रत्येकीं.

परिजन (सं. पु. ना.) सेवक.

परिणय (सं. पु. ना.) विवाह.

परिणाम (सं. पु. ना.) कोणेक पदार्थाचें किं० गोष्टीचें पूर्वरूप जाऊन रूपांतररूप अवस्था होते तो.

परित्याग (सं. पु. ना.) कोणेक मनुष्याचा किं० गोष्टीचा सर्वथा त्याग तो.

परिधान (सं. न. ना.) नेसणें किं० पांघरणें एतद्रूपेंकरून जें वस्त्राचें धारण तें.

परिधि (सं. पु. ना.) घेर. २ वेढा.

परिनाळिका (सं. प्रणालिका) (स्त्री. ना.) कोणेक कर्मामध्यें यापुढें हें करावें, त्यापुढें अमुक करावें इ० रूप जो क्रम तो. २ कंटाळा यावयाजोगी लांबच लांब गोष्ट ती.

परिपक्व (सं. वि०) पुरता जो पक्व तो.

परिपाक (सं. पु. ना.) पुण्यपापरूप कर्मांचा किं० अन्न, धान्य, फल इ० कांचा पुरतेपणीं जो पाक तो.

परिपाटी, पाठी (सं. स्त्री. ना.) परिनाळिका.

परिपाठ (सं. पु. ना.) कोणेक गोष्ट करण्याची चाल चालत असते तो.

परिभाषा (सं. स्त्री. ना.) लौकिक किं० शास्त्रीय जे भिन्न भिन्न व्यवहार त्यांचेठायीं विधिव्यवस्थेसाठीं अमुकास अमुक म्हणावें, अमुक प्राप्त झालें असतां अमुक करावें इ० रूप जे शब्दादि विषयक नियमित संकेत निरनिराळे असतात ती. २ ग्रंथांतील प्रतिपादित व्यवहारांतील संकेत समजावा म्हणून तद्विषयक जो ग्रंथांश असतो ती.

परिमल, मळ (सं. पु. ना.) सुगंध.

परिमाण (सं. न. ना.) हें एवढें, इतकें अशा व्यवहारास कारणीभूत जो पदार्थनिष्ठ संख्यागुणविशेष तें. २त्याणें युक्त पदार्थांचीं परिच्छेदक तोळा, पायली, गज, घटिका इ० साधनें तें.

परिमार्जन (सं. न. ना.) मळ आदिकरून दूर होण्यास जें प्रक्षालन तें. २ क्रोध इ०कांचें कांहीं उपायांनीं निरसन तें. [२ शोभा.

परिमान (पु. ना.) (ग्रं०) शुक्लपक्ष.

परिमित (सं. वि०) कांहींएक परिमाणानें जो मापलेला पदार्थ तो. २ जितक्यास तितकें भाषणादि तें.

परियाळें (न. ना.) (ग्रं०) फलाहाराचे पदार्थ तें.

परियें (न. ना.) (ग्रं०) झोंका.

परियेसणें (धा. ना.) (ग्रं०) ऐकणें.

परिरंभ (सं. पु. ना.) आलिंगन.

परिवर्जन (सं. न. ना.) कांहीं पदार्था चें सर्वथा वर्जन तें.

परिवर (पु. ना.) (ग्रं०) घर.

परिवसणें (धा. ना.) (ग्रं०) स्पर्शणें.

परिवार (सं. पु. ना.) आपले पदरचें दास, दासी, कारकून इ० खटलें तो २ (ग्रं०) आवार. ३ विस्तार. [रणें.

परिवारणें (धा. ना.) (ग्रं०) विस्ता-

परिवेष (सं. पु. ना.) परिधि. २ चं-द्रसूर्यभोंवतें खळें पडतें तें.

परिश्रम (सं. पु. ना.) कांहींएक कामांत शरीरास कष्ट होत असें करण्याचा व्यापार तो. २ तेणेंकरून होतात जे कष्ट ते.

परिसणें (धा. ना.) (ग्रं०) ऐकणें.

परिसर (सं. पु. ना.) स्थान . २ जवळचा प्रदेश.

परिहार (सं. पु. ना.) दोष, संकट इ०कांचें दूरीकरण तो.

परिहास (सं. पु. ना.) थट्टा मस्करी इ० विनोद तो.

परिज्ञान (सं. न. ना.) कांहीं गोष्टीचें किं० पदार्थाचें पुरतेपणीं जें ज्ञान किं० ओळख तें.

परी (अव्य०) आपआपले बुद्धीप्रमाणें किं० योग्यतेप्रमाणें. २ (ग्रं०) परंतु या अर्थी. ३ परस्पर अर्थाचें सादृश्य अशा अर्थी. ४ (स्त्री.ना.) प्रकार. ५ (फा० स्त्री. ना.) मनुष्यासारखें तोंड, पशूसारखें शरीर, व मोराचे पुच्छाप्रमाणें पुच्छ असें सरक्ष ताबुतांत चित्र करितात ती.

परीस (सं. स्पर्श) (पु. ना.) एक पाषाण आहे; ज्याचे स्पर्शानें लोहादिकांचें सुवर्ण होतें. २ (अव्य०) अधिक, उणा, चांगला, वाईट, जवळ, दूर इ० कांचें अवधिसहितत्वेंकरून सांगणें असतां अवधिभूतापुढें याचा प्रयोग होतो. उ० त्यापरीस हें चांगलें इ०.

परीक्षा (सं. स्त्री. ना.) कोणेक पदार्थ अमुक किं० यामध्यें अमुक गुण किं० दोष इ० आहे असें जाणण्याचा व्यापार ती.

परुता (अव्य०) (ग्रं०) पलीकडे.

परूस (न. ना.) परसूं, परस.

परोपकार (सं. पु. ना.) दुसऱ्यावर जो उपकार तो.

परोपरी (अव्य०) नानाप्रकारें.

परोक्ष (सं. अव्य०) असमक्ष.

पर्जन्य (सं. पु. ना.) मेघापासून पडतें जें उदक तें.

पर्ण (सं. न. ना.) वृक्षाचें पान तें.

पर्णकुटी (सं. स्त्री. ना.) वर पर्णांचेंच आच्छादन करून केलेलें लाहान घर तें. २ लहान जें तृणादिकांचें घर त्यासही म्हणतात.

पर्यंक (सं. पु. ना.) पलंग.

पर्यटन (सं. न. ना.) कोणेक देशीं इकडून तिकडे तिकडून इकडे किं० सभोंवार इ० अनेक गतींनीं फिरण्याचा जो व्यापार तें.

पर्यवसान (सं. न. ना.) कोणेक गोष्टीचा शेवट तें.

पर्या (पु. ना.) ओढा.

पर्याप्त (सं. वि०) आणखी कांहीं

पाहिजे अशी आकांक्षा न करे इतका झाला जो पदार्थ तो. २ आणखी पाहिजे अशी आकांक्षा ज्यास राहिली नाहीं तो.

**पर्याय** (सं. पु. ना.) एका अर्थाचे जे दोन शब्द ते परस्पर. २ कांहीं एक कार्यास साधक जे प्रकार परस्पर निरपेक्ष ते प्रत्येकीं. ३ कोणेक कार्याचा पूर्व ओघ फिरण्यास काढिला जो युक्तीचा मार्ग तो. ४ वयाद.

**पर्युषित** (सं. वि०) शिळें जें अन्न इ० तें

**पर्व** (सं. न. ना.) अमावास्या, पूर्णिमा इ० स्नानदानादि पुण्य कर्माविषयीं जे काल सांगितले आहेत ते प्रत्येकी. २ वेळू इ०कांचें जें पेर तें.

**पर्वत** (सं. पु. ना.) हिमालयादि पृथ्वीवरचे मोठमोठे उंचवटे आहेत ते प्रत्येकीं. २ निर्वाहास जडभारी जें दुःख, काम इ० त्यास त्याचा त्याचा पर्वत असें म्हणतात.

**पऱ्हा** (अव्य०) (ग्रं०) पलीकडे.

**पल** ( सं. न. ना. ) घटकेचा साठावा भाग. २ मांस.

**पलख** (पु. न. ना.) पल.

**पलंग** (पु. ना.) (सं. पर्यंक) वर निजायाजोगा लांकडाचा करितात जो आकारविशेष तो.

**पलटण, पलटन** (न. ना.) बंदूकवाले पायदळाचा सुमारें अकराशांचा समुदाय तें.

**पलाटण, टन** (न. ना.) पर्यटन.

**पलांडु** ( सं. पु. ना. ) कांदा म्हणून कंदविशेष आहे तो.

**पलायन** (सं. न. ना.) भयादिकामुळें दुसऱ्यास आपण न सांपडावें म्हणून शीघ्रगतीनें किं०त्याचा डोळा चुकवून इ० युक्तीनें गमन करितात तें.

**पलिकडे** (अव्य०) आपल्या संभावितालचा देशांश किं० भूतभविष्यरूप कालांश त्याचे बाहेर.

**पलिता** (फा० पु. ना.) हिलालीत घालायासाठीं चिरगुटाची वाटोळी गुंडाळी करितात तो.

**पलिस्त** ( फा० न. ना. ) अतिशयित पीडा देणारा जो वारा, पर्जन्य, झाड पेर इ० त्यास म्हणतात.

**पल्याण** (सं. न. ना.) खोगीर, जीन इ० तें.

**पल्लव** (सं. पु. ना. ) पर्णसमुदाययुक्त जें शाखाग्र तो. २ वस्त्राचा पदर तो.

**पल्ला** (पु. ना.) तीस पायलीरूप जें माप तो. २ पक्केकऱ्याचें दाणे इ० वाहायाचें पोतें तो. ३ एकशेंवीस शेरांचें पक्कें वजन तो. ४(फा०पु.ना.) चालणाराचे गतीनें प्राप्त होण्यास योग्य जो देश, काल, व्यवहार इ० रूप अवधि तो.

**पवन** (सं. पु. ना.) ज्यास रूप नाहीं असें असून ज्याचा स्पर्श होतो असें पंचमहाभूतांतील भूत आहे तो; ज्यास वारा म्हणतात.

**पवनचक्की** (स्त्री. ना.) कोणी हातानें न फिरवितां वाऱ्यानेंच फिरत असावें असें जातें केलें असतें तो.

पवमान (स. पु. ना.) पवन.

पवळ (पु ना.) (ग्र०) होडगें.

पवाड (पु. ना.) (ग्र० ) मोठेपणा. २ कीर्ति. ३ विस्तार. ४ अवकाश. ५ महत्व, थोरी.

पवाढणें (धा. ना.)(ग्र०) आंत शिरणें, घुसणें.

पंवोडा (पु ना.) कोणेक पराक्रमी पुरुषाचें ज्यांत वर्णन केलें असतें असा प्राकृत कविताविशेष आहे तो. २ कीर्ति.

पवित्र (स. वि०) ज्याचे भक्षण, स्पर्शन इ० झाल्यानें प्रत्यवाय लागत नाहीं किं० पापक्षय इ० चांगले फळ होतें तो अन्न, उदक, स्थळ इ० पदार्थ. २ प्रत्यवाय उत्पन्न न करणारें किं० पापक्षयकारक जें कर्म तें. ३ निष्पाप जो मनुष्यादि तो.

पव्हणी (स्त्री ना ) (ग्र०) नौका.

पव्हे (स्त्री ना.) (ग्र०) धर्मार्थ पाणी पिण्यास घालितात ती.

पशु (स. पु ना.) हत्ती आदिकरून मुगूसपर्यंत चतुष्पाद जीव तो. २केवळ जो मूर्ख मनुष्य त्यास ह्मणतात.

पश्चात् (स अव्य०) अनंतर. २ पाठीमागें.

पश्चात्ताप (स पु. ना.) कांहीं वाईट कर्म हातून झाल्यानंतर छी छी हें कर्म मी वाईट केलें असा मनास जो भाव उत्पन्न होतो तो.

पसंत, द (फा० वि०) चार लोकांनीं खोड न ठेवितां मान्य करायाजोगा जो पदार्थ, भाषणादि व्यवहार, पुरुष इ० तो. २ जो पदार्थ ज्यास मान्य झाला तो त्यास.

पसर (पु. ना.) (ग्र०) इच्छा.

पसरणें (धा. ना.) संकुचितपणें स्वल्प देश व्यापून स्थित जो पदार्थ तो अधिक देश व्यापी असा करणें किं० होणें.

पसवणें (धा ना.) घोडीनें प्रसूत होणें. २ केळीनें केळफूल, भात, नाचणी इ० कांनीं कणसें बाहेर टाकणें.

पसाय (पु. ना.) (ग्र०) प्रसाद.

पसारा (पु. ना.) कांहीएक पदार्थ किं० व्यवहार याची चहूंकडे पसरून जी स्थिति ती.

पसारी (पु. ना ) हिंग, जिरें, मिरें, कांदा, लसूण इ० किरकोळ जिन्नस विकणारा जो दुकानदार तो.

पसाव (पु. ना ) पसाय.

पस्तावा (पु. ना.) पश्चात्ताप. २ खेद.

पहांट (स्त्री ना. ) उषःकालापासून सूर्योदयपर्यंत जो काळ ती २ उत्तर रात्रीसही ह्मणतात.

पहाड (पु ना. )डोंगर. २फार उंच मोठा जो कंठध्वनि त्यास म्हणतात.

पहार (स्त्री. ना.) दगड फोडणें इ० उपयोगी एक लोखंडी औत आहे ती. २ प्रहर.

पहारा (पु. ना.) मार्गादिकांच्याठायीं भलत्याच मनुष्यादिकानें येऊं नये किं० ठेवलेला जिन्नसपानस कोणी नेऊं नये किं० बंदिवान इ०कांनीं कोणीकडे यथेच्छ जाऊं नये ह्मणून त्या त्या विषयीं जपत बसण्याचा व्या-

पार तो. २ त्या कामावर ठेवला जो शिपाई इ० तो. [सरती.

पहाळी (स्त्री. ना.) पावसाची मोठी

पहिलवान (पु. ना.) जेठी.

पहिलार (वि०) पहिल्यानेंच झालेली जी गर्भिणी किं० प्रसूत ती.

पहीपाहुणा (पु. ना.) पाहुणा इ० तो.

पहुडणें (धा. ना.) (ग्रं०) निजणें. २ आरोहण करणें.

पहुरणी (स्त्री. ना.) (ग्रं०) विई पर्यंत दूध देणारी गाय किं० म्हैस ती.

पळ (न. ना.) पल. २ दंगा इ०कामुळें गांवांतील किं० देशांतील सर्व मनुष्यादिकांनीं पळत सुटावें अशी जी अवस्था येते ती. ३ तसा पळत चाललेला मनुष्यादिसमुदाय तो.

पळण (स्त्री. ना.) पळ. [२ जळणें.

पळपणें (धा. ना.) (ग्रं०) पेटणें.

पळपळीत (वि०) ज्यांत खंबीरपणा नाहीं असें जें भाषण, व्यवहार इ० तें.

पळहें (न. ना.) कापसाचें झाड.

पक्ष (सं. पु. ना.) पंधरवडा. २ महालय श्राद्ध. ३ आकाश मार्गानें जाणारे जे पक्षी त्यांचे उड्डानास साधनभूत जे दोन अवयव असतात ते प्र०. ४ वाद, युद्ध इ० परस्पर विरुद्ध जे दोन किं० बहुत मतभेद असतात ते किं० तीं प्रकरणें प्रत्येकीं. ५ एकाच कार्याचे साधनाविषयीं परस्पर निरपेक्ष जे अनेक कृतिप्रकार असतात ते प्र०.

पक्षपात (सं. पु. ना.) वाद, युद्ध इ० संबंधी जे दोन पक्ष त्यांमध्यें एके पक्षाकडे कोणेकाचे अंतःकरणाचा त्याचे बऱ्याविषयीं जो ओढा असतो तो.

पक्षवायु (सं. पु. ना.) अर्धांग वायु.

पक्षी (सं. पु. ना.) पक्षांनीं आकाश मार्गें चालणारे जे प्राणी ते.

पक्षीं (सं. अव्य०) विकल्पेंकरून.

पा, पां (अव्य०) (ग्रं०) वाक्यालंकारार्थक. २ संबोधनार्थक.

पाइकपण (न. ना.) दास्य. २सेवन.

पाईक (पु. ना.) (ग्रं०) चाकर.

पाईंघालणें (धा. ना.) (ग्रं०) ऐकणें.

पाउटी (स्त्री. ना.) (ग्रं०) सकाम पाऊल, सकाम पुण्य. [क्षय होणें.

पाउटीसरणें (धा. ना.) (ग्रं०) पुण्य-

पाउडें (वि०) (ग्रं०) माघारलेलें.

पाउली (स्त्री. ना.) (ग्रं०) कृपा.

पाऊड (पु. न. ना.) पांगूळ इ० या शब्दानें पैसा मागतात तो. २ पैसासुपारी.

पाऊल (न. ना.) पायाचे घोंट्याखालचा जो भाग तें. २ चालतांना सहजरीतीनें जितकें लांब पाऊल पडतें तत्परिमित जें मार्गादि प्रमाण तें. पाऊल जपून टाकणें, ठेवणें म्ह० कोणेक गोष्ट विचारपूर्वक करणें इ०.

पाऊलवाट (स्त्री. ना.) गाडे, घोडीं इ० ज्या वाटेनें जात नाहींत अशी जी लहानशी वाट ती.

पाऊस (सं. प्रावृष) (पु. ना.) पर्जन्य.

पाऊसपाणी (न. पु. ना.) पाऊस इ०.

पाक (सं. पु. ना.) तांदुळ इ० पदार्थांचेठायीं अग्निसंयोगानें, आंबे इ०

फळाच्याठायीं कालयोगानें पक्वता उत्पन्न होण्याचा व्यापार होत असतो तो. २ स्वयपाक. ३ कांहीं औषधें एकत्र करून त्यांचा रांधा करितात तो. ४ (फा० वि०) निर्मळ, पवित्र.

पांक (पु. ना.) लाडू इ० करायाकरितां साखर इ०कांचा जो रांधा करितात तो.

पाकनिष्पत्ति (सं. स्त्री. ना.) शिजणें, भाजणें इ० क्रियाद्वारा जी स्वयपाकाची सिद्धता तो. [पाकघर.

पाकशाला, ळा (सं. स्त्री. ना.) स्व-

पाकशासन (सं. पु. ना.) (ग्रं०) इंद्र.

पांकळी, पाकळी (स्त्री. ना.) पत्राप्रमाणें पुष्पाचे जे अनेक अवयव ते प्र०.

पाक, पाख (पु. ना.) पक्ष.

पाखंड, पाखांड (सं. न. ना.) एक देवतेस पूज्यत्व मानून इतर देवांची निंदा करावी अशीं जीं कलियुगांत अनेक मतें झालीं आहेत तीं प्रत्येकीं. २ वेदशास्त्राचा आधार नसून बुद्धिबळानेंच एखादी गोष्ट रचली ते.

पाखर (सं. प्रखर) (स्त्री. ना.) घोड्यास गोळी, भाला इ० न लागावा ह्मणून धातूचे तारादिकांचें विणून कांहीं आच्छादन त्याचे अंगावर घालितात तो. २ पक्षी आपले पिलांवर जें पक्षरूप आच्छादन घालितात तो. ३ (ग्रं०) कृपा. ४ (वि०) कृपाळू.

पाखरणें (धा. ना.) (ग्रं०) उभारणें.

पांखरूं, पाखरूं (न. ना.) पक्षी.

पाखाडी (स्त्री. ना.) चिरेबंदी अरुंद वाट तो. २ गांवांत ज्या घरांच्या आळ्या असतात त्या प्रत्येकीं. ३ घराची जी पडवी तो. ४ पाळण्याचें आडवें लांकूड.

पाखाळणी (सं. प्रक्षालन)(स्त्री. ना.) यात्रादिप्रसंगीं अनेक समर्दामुळें देवापाशीं जमतो जो खळमळ तो धुण्याचा व्यापार तो.

पाखाळणें (धा. ना.) (ग्रं०) प्रक्षालन करणें इ० धुणें. [निर्मलत्व.

पाखाळी (स्त्री. ना.) (ग्रं०) शुद्धत्व,

पांखें (न. ना.) घरावरच्या आढ्यापासून पावसाचें पाणी उतरायाकरितां जे दोहींकडे दोन भाग किं० चहूंकडे चार भाग, पक्षाकार करितात ते प्र०.

पांग (पु. ना.) अन्न आच्छादनादिविषयक चिंता तो. २ नादारी. ३ ओशाळगत. ४ (ग्रं०) पराधीनपणा. ५ दुर्लभत्व.

पांगडा (पु. ना.) (ग्रं०) पराधीनत्व.

पांगणें (धा. ना.) समुदायरूप जे मनुष्यादि जीव त्यांनीं समुदाय फुटे असें चहूंकडे जाणें. २(ग्रं०) पसरणें.

पागळणें (धा. ना.) पाघळणें.

पांगळा (सं. पंगु) (वि०) जन्मापासून किं० कांहीं विकृतीनें मध्यंतरीं चालण्याचे उपयोगी नाहींत असे जे दोन पाय ते किं० तसा मनुष्य तो.

पागा (स्त्री. ना.) घोडशाळा. २ एक स्वामीसत्ताक जो अश्वसमुदाय तो.

पागित्व (न. ना.) (ग्रं०) प्रसर.

पांगूळ (वि०) पांगळा. २ नदीवेल

बाळगून भीक मागतो तो किं० पहा-टेस भीक मागायास फिरत असतो असा भिकारी आहे तो.

पांगूळणें (धा. ना.) (ग्रं०) गतीस कुंठितावस्था प्राप्त होणें. २ कुंठित-गतिविशिष्ट होणें.

पागोटें (न. ना.) डोकीस बांधायाचें सुमारें हातभर रुंद व पन्नासपासून सवाशें हात लांब असें एक वस्त्र आहे.

पागोरा, पांगोरा (पु. ना.) वृक्ष, व-ल्ली इ०कांचे मूलप्रदेशीं फूटून चो-होंकडे पसरतात ज्या ततुरूप मु ळ्या त्या प्र०.

पागोळी (स्त्री. ना.) पर्जन्याचे उद-काची धारा ज्या प्रदेशापासून पड-ते तो. घराचा प्रदेश तो. २ तेथून गळतात ज्या उदकधारा त्या. ३ त-दाकार कांहींएकापासून गळते जी उदकधारा ती.

पांघरणें (धा. ना.) पाठ, पोट इ० अवयव झांकत असें वस्त्र अंगावर घेणें. २ (ग्रं०) पाहाणें.

पांघरूण (सं. प्रावरण) (न. ना.) पांघरलें जाई अशा प्रकारें अंगावर घेतलें वस्त्र तें. २ अंगरखा, पागो-टें, शेला इ० शरीरावर धारण करायाचीं वस्त्रें तें. ३ आपले निर्वा-हाचा भार ज्याजवर असतो; ज्याचे योगानें आपणास तादृश चिंता क-रावी लागत नाहीं असे जे माता पितरें, यजमान त्यास म्हणतात. पांघरूण घालणें म्ह० कोणेकाचें दुष्कर्म आपणास समजलें असतां-ही बभ्रा न होई असें करणें.

पाघळ (पु. ना.) गूळ, साखर इ० पदार्थांस द्रव सुटतो तो.

पाघळणें (धा. ना.) जलादि द्रवयुक्त आर्द्रवस्त्रादिक जो पदार्थ त्यापासून जलादिक गळणें. २ गूळ, साखर इ० द्रवरूप होणें. [भूतात्मक देह.

पांचइखवलें (न. ना.) (ग्रं०) पंच-

पाचक (सं. पु. ना.) आचारी. २ (वि०) जेणेंकरून अन्नाचें पचन होतें असें औषधादिक तें.

पांचजन्य (सं. न. ना.) विष्णूचा शंख. २ संकेतानें बोंबेस म्हणतात.

पाचन (सं. न. ना.) भक्षिलेल्या अ-न्नाचें पचन तें. २ (वि०) पाचक.

पांचपाट (पु. ना.) चोरादिकांची बहुत अप्रतिष्ठा कर्तव्य असतां वस्त-ऱ्यानें डोकीचे पांच पट्टे काढितात तो.

पांचपिसें (न. ना. (ग्रं०) भ्रांति. २ वर्णन.

पांचपेंच (पु. ना.) मल्लयुद्धामध्यें जे डावपेंच करितात ते. २ वाद, युद्ध इ० व्यवहारांत दुसऱ्यास पाडाव कर-ण्याची अनेक प्रकारची युक्ति ती.

पाचर (स्त्री. ना.) खुंटा इ० घट्ट ब-सायाकरितां किं०छिद्र बुजवायाकरितां लाहानशी धलपी बसवितात ती. कोणेक कार्यांत पाचर मारणें म्ह० कांहीं विघ्न सर्वथा न होई असें करणें.

पांचवन्ही (पु. ना.)(ग्रं०)प्रलयानल, विद्युदानल, वडवानल, शिवनेत्रानल, आदित्यानल असे पंचवन्हि म्ह० पांच अग्नि ते. [व्यापार तें.

पाचारण (सं. न. ना.) बोलावण्याचा

**पाचिक** (वि०) (ग्रं०) हीनकस.

**पाचुंदा.** (पु. ना.) एक वृक्ष आहे; ह्या चें लांकडाचे मणि दुखणेकऱ्याच्या हातांस बांधितात. २ गवत, कडवा इ०कांचे पेंढ्याचें पचक तें. ३ भक्षणाच्या अतिशय वर्णनप्रसंगीं लाडू, पोळी इ०कांचे पचकास म्हणतात.

**पांचेपालव** (स. पंचपल्लव) (पु. ना.) (ग्रं०) अंतःकरणपंचकाची संज्ञा.

**पांजरणें** (धा. ना.) (ग्रं०) पिंजरणें. २ पसरणें.

**पांजरा** (सं. पंजर) (पु. ना.) वर आणि खालीं दोन फळ्या किं० पत्रे घेऊन त्यांस सभोंवार गज मारून राघू इ० राहाण्यास घर करितात तें. २ मनुष्यादिकांचे हाडांचा सांपळा.

**पाजवणें** (धा. ना.) शस्त्रास धार यावयासाठीं तें साहाण इ०कांवर घांसणें.

**पाजळणें** (धा. ना.) दिवटी, दिवा इ० उजळणें. २ कोणेकाचा टेंभा पाजळणें म्ह० राजदरबारादिकांच्या-ठायीं त्यास मोठी प्रतिष्ठा मिळणें.

**पाजी** (वि०) वीर, सभ्यपुरुष यांस उचित नव्हे असें जें युद्धांत पळणें इ० हलकें, अश्लाघ्य कर्म करायास लाजत नाहीं तो.

**पांजी** (पु. स्त्री. ना.) (ग्रं०) अग्रभाग.

**पाझर** (पु. ना.) गूळ, मीठ इ०कांस द्रव सुटतो तो. २ उदक, घृत इ०कानें भरलेल्या मडक्यापासून किं० खडक इ० कांपासून थोडथोडा द्रवाचा स्राव होतो तो.

**पाट** (सं. पीठ) (पु. ना.) बसावयासाठीं लांकडाचें आसन करितात तें. २ (ग्रं०) पट्टाभिषेक पदवी तो. ३ नदी, तळें इ०कांपासून खणून पाहिजे तेथें पाणी नेलें असतें तें किं० तें पाणी जावयाचा मार्ग तो. ४ शूद्रादिकांच्या स्त्रिया पुनर्विवाह करितात तो. ५ डोकीचे केसांचा वस्तऱ्यानें काढिला जो पट्टा तो इ०.

**पाटण** (स. पत्तन) (न. ना.) (ग्रं०) नगर.

**पाटणी** (स्त्री. ना.) पाटण्याचा व्यापार किं० तेणेंकरून झालें जें आच्छादन तें.

**पाटणें** (धा. ना.) तक्तपोशीनें घराचा प्रदेश आच्छादित करणें.

**पाटव** (स. न. ना.) पटुपणा.

**पाटस्थळ** (न. ना.) पाटाचे पाण्यानें शेत, आगर इ० होतें तें स्थळ.

**पाटाचें** (वि०) (ग्रं०) सर्वोत्कृष्ट. २ ऐक्याचें. [रेशमी वस्त्र आहे.

**पाटांव** (न. ना.) चित्रविचित्रांकित

**पाटी** (सं. पट्ट) (स्त्री. ना.) भुज्याक्षरादि लिहिण्याची जी फळी असते ती. २ मोठी टोपली.

**पाटीर** (सं. पु. ना.) चंदनाचा वृक्ष.

**पाटील** (पु. ना.) गांवचा कारभार करणारा वतनदार अधिकारी आहे तो. [कुळकरणी इ० तो.

**पाटीलपटवारी** (पु. ना.) पाटील

**पाटू** (वि०) (ग्रं०) श्रेष्ठ.

**पाटूबांध** (पु. ना.) (ग्रं०) पट्टाभिषेक.

**पाटोळा** (पु. ना.) (ग्रं०) पाटांव.

पाठ (स. पु. ना.) विद्यार्थी गुरूपासून प्रतिदिवशीं जें शास्त्रादिकांचें व्याख्यान घेतो तो. २ परिपाठ. ३ स्तोत्रादिकांची आवृत्ति तो. ४ (वि०) तोंडपाठ. ५ (स्त्री. ना.) कंबरेपासून मानेपर्यंत जो शरीराचा मागला भाग तो. ६ पाठ रिघणें, निघणें म्ह० भयादिकांमुळें कोणेक समर्थाचा आश्रय करणें इ०.

पाठकोरा (वि०) एक्या अंगानें लिहिल्यामुळें दुसरें अंग ज्याचें कोरें आहे तो कागद.

पाठपोट (अव्य०) दोहीं पृष्ठांकडून लिहिण्याचें किं० वाचण्यानें वि०.

पाठबळ (न. ना.) कोणेक कार्याविषयीं प्रवृत्त झालेल्यास मागून अनेक प्रकारें साहित्य होण्याविषयीं बंधु इ०कांचा किं० कोणेक समर्थाचा आश्रय असतो तें.

पाठमोरा (अव्य०) ज्याची पाठ ज्यासमोर आहे तो त्यास. २ चालतांना जिकडे तोंड असावें तिकडे पाठ करून राहिला तो.

पाठराखणा (वि०) नव्यानेंच मुलगी सासऱ्यास जातेवेळेस जो माहेरचा कोणी बरोबर जाऊन राहतो तो, पाठराखा.

पाठलाग (पु. ना.) चोरादिक कोणी पळाला असतां त्यास कोणी पाठवून धरण्याविषयीं जो उद्योग तो. २ विद्यादि साधनार्थ गुरु इ० कांचे संबंधांत सर्वदा राहण्याचा प्रकार तो.

पाठशाळा, शाळा (सं. स्त्री. ना.) शास्त्रादिकांचे पाठ सांगण्यासाठीं जी शाळा केली असते ती.

पाठांतर (सं. न. ना.) कोणेक ग्रंथामध्यें श्लोक, वाक्य, पद इ० विषयीं जो पाठ चालत असतो त्याहून विलक्षण इतर पाठ तें. २ तोंडपाठ जो श्लोकादि ग्रंथ त्याचा कोणेकापाशीं असतो जो भरणा तें किं० त्या भरण्यानें त्या पुरुषास असतें जें विशिष्टत्व तें. ३ तोंडपाठ.

पाठार (न. ना.) (ग्रं०) पाठीसच ह्मणतात. २ पर्वतादिकांचें पठार तें.

पाठाळ (न. ना.) पाठीवरून ओझें किं० स्वारी वाहण्याचे उपयोगी जें घोडें, बैल, उंट, इ० तें.

पाठिंगा, ठिंबा (पु. ना.) ज्याचें ज्यास पाठबळ आहे तो त्याचा.

पाठोपाठ (अव्य०) एकानें आरंभिली जी कांहीं क्रिया त्याच्या मागून तीच क्रिया आरंभ होई असें.

पाठोवाठी (अव्य०) (ग्रं०) पाठोपाठ.

पाड (पु. ना.) निरख. २ आंबा इ० फळें वृक्षावर कांहीं पिकूं लागण्याची दशा तो. ३ वृक्षावर किंचित् पिकला जो आंबा इ० तो. ४ (ग्रं०) थोरी, आधिक्य. ५ मोल. ६ बरोबरी.

पाडवा (पु. ना.) प्रतिपदा. २ वर्षप्रतिपदा.

पाडस (न. ना.) हरिणीचा वत्स तें. २ (ग्रं०) मनुष्यादिकांचे वत्सास ह्मणतात.

पाडाव (पु. ना.) पराजय. २ (वि०) पराजित.

पांडित्य (सं. न. ना.) शास्त्रार्थक-

थन, तत्वविवेचन इ० रूप जें पं-
डितकर्म तें. २ भाषणचातुर्य.

पाडूधरणें (धा. ना.) (ग्रं०) मानणें.

पांडु, पांडुर (सं. वि०) पांढरा.

पाडें (अव्य०) (ग्रं०) सारखें.

पाडिजणें (धा. ना.) (ग्रं०) विस्तारणें.

पांढर (स्त्री. ना.) देवतारूपेंकरून मानिली जी ग्रामाचे चतुःसीमेच्या आंतली भूमि ती. २ गावांत राहा-णारे वतनदारांचा किं० यच्चावत् सर्व मनुष्यांचा समुदाय ती.

पांढरपेशा (पु. ना.) ब्राह्मण, परभू, सोनार, कांसार इ० ह्या जाति मु-ख्यत्वेंकरून कृषिकर्म करीत नाहीं-त तो.

पांढरा (सं. पांडुर) (वि०) दुधाचे व-र्णासारिखा जो वर्ण तो.

पांढरापरीस (पु. ना.) पांढरे पायां-चा जो मनुष्यादि त्यास म्हणतात.

पांढराफटफटीत (वि०) केवळ पांढ-रा तो.

पांढरासफेत (वि०) स्वच्छ पांढरा.

पांढरी (स्त्री. ना.) पांढर.

पांढरेपायाचा (वि०) जेथें जाईल ते-थें वाटोळें होतें असा अपयशाचा जो मनुष्यादि त्यास म्हणतात.

पाणउतारा (पु. ना.) कठोर भाषण, शिवीगाळ, पराजय इ० केंकरून होतो जो तेजोभंग तो.

पाणचट (वि०) ज्यास गोडी कांहीं कमी असा जो सद्रव पदार्थ तो. २ ज्यांत रस नाहीं किं० ताळतंत नाहीं असें जें भाषण, गाणें इ० किं० तसें भाषणादि करणारा मनुष्य तो.

पाणथरी (स्त्री. ना.) पोटांत एक रोग होत असतो ती.

पाणथळ (पाणी, स्थळ) (न. ना.) प-र्जन्य गेला असताही जेथील ओल एकाएकीं उडत नाहीं व उष्णकाळीं खाणिलें असतां जवळच उदक लाग-तें अशी जी भूमि तें. २ ज्या स्थळीं पाटाचें पाणी इ० सोय असती अशी जी जमीन तें.

पाणधी (पु. ना.) (ग्रं०) मार्ग.

पाणपिसें (न. ना.)(ग्रं०) वेड. २(वि०) वेडगळ.

पाणपोई (स्त्री. ना.) पन्हेरी.

पाणबुडा, बुड्या (पु. ना.) नदी समु-द्र इ० कांत मोतीं इ० तळचा पदार्थ काढायासाठीं फारवेळ बुडण्याचा ज्या-णें अभ्यास केला असतो तो. २(ग्रं०) मासे धरणारा कोळी तो.

पाणवठा (पु. ना.) गांवचे लोकांनीं पाणी भरून आणण्याचें, वस्त्र धुण्या-चें इ० कर्माचें नदी इ० कांवर जें स्थळ असतें तो.

पाणवडा (पु. ना.) (ग्रं०) पाणवठा.

पाणि (सं. पु. ना.) हात.

पाणिग्रहण (सं. न. ना.) विवाहध-र्मानें जो स्त्रीचा स्वीकार तें.

पाणी (सं. पानीय) (न. ना.) उदक. २ लोहमय शस्त्रादि पदार्थांस तापवू-न पाण्यांत बुडविलें असतां त्या सं-स्कारानें जो गुणविशेष उत्पन्न हो-तो तें. ३ तेजलाक्षणिकार्थी. ४ (ग्रं०) निश्चय.

पाणीटाळ, ळू (पु. ना. (ग्रं०) ओ-होटी.
पाणीदार (वि०) ज्याचे अंगीं चांग-लें पाणी आहे तो रत्नादि पदार्थ किं० मनुष्यादि तो.
पाणीयाडें, ढें (न. ना.) (ग्रं०) नदी तळें इ० तें किं० त्याचा पाणवठा तें.
पाणीवणें (धा. ना.) (ग्रं०) पळणें.
पात (सं. पु. ना.) पतन. २ (स्त्री.) कांदा, लसूण इ०कांचें जें पान ती.
पातक (सं. न. ना.) अधर्म. २ त्याणें लागतो जो दोष तें.
पातणें (धा. ना.) (ग्रं०) येणें. २ प्राप्त होणें. ३ कळणें.
पातळ (वि०) ज्यामध्यें द्रवांश अधिक असा ताक इ० सद्रव पदार्थ तो. २ जाडपणास कमी असा फळी इ० पदार्थ तो. ३ विरल. ४ दाट नव्हे असें जें स्नेह, ममता इ० तो. ५ (न. ना.) स्त्रियांचें नेसायाचें वस्त्र आहे.
पातळाई (स्त्री. ना.) दाटी नव्हे ती.
पाताल, ळ (सं. न. ना.) पृथ्वीचे खाली सात लोक आहेत ते प्रत्येकीं. २ अतिशयेंकरून खोलपणा वर्णायाचा असतां अतिशयोक्तीनें त्या त्या प्रदेशास ह्मणतात.
पाताळयंत्री (वि०) ज्याची मसलत भारी खोल असत्ये तो. [गीदार.
पातिकर, करू (वि०) (ग्रं०) भा-
पातिव्रत्य (सं. न. ना.) पतिव्रतापणा.
पाती (स्त्री. ना.) अनेककृतव्यवहारांत अनेकांचे जे अंश असतात ते प्रत्येकीं. २ सोनें, रुपें इ०सांचे काम करण्याचे उपयोगी जो डांकाचा पत्रा असतो ती. ३ पात. ४ माड, सुपारी इ०कांचें पान ती. ५ (ग्रं०) बरोबरी.
पातें (न. ना.) डोळ्याची पापणी. २ तरवार, सुरी इ०कांचें पान तें.
पातेजणें (धा. ना.) (ग्रं०) विश्वासणें.
पातेरा (पु. ना.) वाळलेल्या पानांचा जो उपयोगी नव्हे असा समुदाय तो.
पात्र (सं. न. ना.) कांहींएक पदार्थ ठेवायास आधारभूत जें भांडें, पान इ० तें. २ नदीचें पाणी जितकी रुंदी व्यापून चालतें तो तितका प्रदेश तें. ३ दान, शाप इ० देण्यास उचित जो ब्राह्मण, अपराधी इ० तें. ४ नाटकामध्यें जीं सोंगें येतात तीं प्रत्येकीं. ५ वेश्या, रक्षा इ०कांस ह्मणतात.
पात्रा (स्त्री. ना.) वेश्या.
पाथर (पु. स्त्री. ना.) वस्त्रें धुणें इ० उपयोगी जो सपाट दगड तो ती.
पांथस्थ (सं. पंथस्थ) (पु. ना.) वाटसरू.
पाद (सं. पु. ना.) चरण.
पादप (सं. पु. ना.) वृक्ष.
पादशाह (फा० पु. ना.) यवनजातीय राजा तो.
पादाक्रांत (सं. वि०) पराक्रमानें पराजित करून आपले आज्ञांकित केले जे देश, शत्रु इ० ते.
पादुका (सं. स्त्री. ना.) देव, गुरु इ०

काच्या ज्या खडावा असतात त्या प्रत्येकीं.

**पान** (सं. ना.) प्राशन. २ पर्ण. ३ शस्त्राचा मुठीशिवाय जो भाग तें. ४ कागदाचा ताव किं० पोथीचें पत्र तें. ५ धोतरजोड्याचीं दोन धोतरें तीं प्रत्येकीं. ६ केवड्याच्या फुलाची पाकळी तें. ७ गंजिफांच्या ज्या चकत्या असतात त्या प्र०. ८ मद्यपानासही ह्मणतात. ९ पान लागणें म्ह० सर्प झोंबणें. १० पान खाणें म्ह० विडा खाणें.

**पानगा** (पु. ना.) तवा नसतां पानास पीठ लावून जी भाकरी करितात ती.

**पानगी** (स्त्री. ना.) लाहान पानगा ती.

**पानचट** (वि०) पाणचट.

**पानपणें** (भा. ना.) (ग्रं०) पावरें करणें, होणें.

**पानवठा, वडा** (पु. ना.) पाणवठा.

**पानसळ** (स्त्री. ना.) भूमि इ०कांचें समत्व पाहण्याचें एक औत आहे ती.

**पानशिसें** (न. ना.) (ग्रं०) शिशाची लेखणी तें.

**पानसुपारी** (स्त्री. ना.) विडा. २ आपलें काम दुसऱ्यापासून करून घ्यावयाचें असतां अल्प स्वल्प जें त्यास द्रव्यादि देतात त्यास ह्मणतात.

**पान्हा** (सं. प्रस्रव) (पु. ना.) पुत्रप्रेमादिकारणानें शरीरावयवबंध शिथिल झाल्यामुळें दुग्धादिकांची गति बाहेर व्हावयास कारणीभूत जो त्यावर वेग उत्पन्न होतो तो. २ दयेनें किं० प्रसन्नतेनें जो अंतःकरणास कळवळा येतो तो.

**पाप** (सं. न. ना.) पातक. २ मित्रादिकांविषयीं कुडाभाव तें.

**पापणी, पांपणी** (स्त्री. ना.) (सं.पक्ष्म) डोळ्यास खालीं आणि वर जीं सकेश आच्छादक चर्में आहेत तीं प्रत्येकीं.

**पापदरा** (पु. ना.) शरीर, फळ, कंद इ०कांवरील केवळ पातळ जो लगदा तो. २ पापोडा. [लात.

**पापर, पापरा** (स्त्री. ना.) (ग्रं०)

**पाभर** (स्त्री. ना.) शेतांत बीं पेरायाचें एक औत आहे.

**पामर** (सं. वि०) ज्यामध्यें कोणतेंही तेज नाहीं असा केवळ तुच्छ जो मनुष्यादि तो.

**पामरी, पांबरी** (स्त्री. ना.) रेशमाचें एक पांघरायाचें वस्त्र आहे.

**पाय** (सं. पाद.) (पु. ना.) चालण्यास साधनभूत शरीराचे अवयव असतात ते. २ पलंग, माचा इ०कांचा खूर तो. ईश्वर, गुरु इ०कांस उद्देशून नम्रतेनें भाषणादि प्रसंग असतां पाय या अवयवानें लक्ष्यून तो तो व्यवहार होतो. उ० आपले पायांची कृपा असल्यास मी तरेन. कोणेकाचे पाय धरणें म्ह० आपला सांभाळ होण्याविषयीं कोणेकाचा आश्रय धरणें, कोणेक व्यवहारादिकांत पाय घालणें किं० शिरविणें म्ह० त्या त्या व्यवहारीं आपण शिरणें. पाय काढणें म्ह० त्या त्या व्यवहारापासून बाहेर निघणें. कोणेकाच्या पोटावर

पाय देणें. म्ह० त्याचें पोटिस्थ बुडविणें. कोणेकाचे नाक इ०कांवर पाय देणें म्ह० त्यापेक्षां आपण वरचढ होणें इ०.

**पायउतार** (पु. ना.) नदी इ०कांत होडी इ० साधनावांचून पायांनीं उतरून जावयाजोगा उतार असतो तो.

**पायगुण** (पु. ना.) कोणी आपले घरीं उत्पन्न झाला किं० आला जो मनुष्य पशु इ० पदार्थ त्याचे संबंधानंतर आपणास बरें किं० वाईट फळ होतें त्यास कारण जें त्या मनुष्यादिकांतील सुलक्षण किं० दुर्लक्षण तो.

**पांयतण, तन** (सं. पादत्राण)(न. ना.) वाहाण किं० कुणब्याच्या उपयोगी जो दांडगा जोडा तें.

**पायथा** (पु. ना.) भूमि, डोंगर इ०कांचे निम्नतेकडील शेवटचा जो प्रदेश तो. [णारी फौज तें.

**पायदळ** (न. ना.) पायांनीं चाल-

**पायपोश, पोस** (फा० पु. ना.) चर्मी जोड्याचे जे दोन अवयव ते प्रत्येकीं. कोणेकास पायपोस मारणें म्ह० दुर्भाषणादिकेंकरून निर्भर्त्सना करणें. पायपोसासारिखें तोंड करणें म्ह० फजीती झाल्यामुळें तोंड वाईट करणें इ०.

**पायमल्ली, ल्ली** (स्त्री. ना.) सैन्य, गुरें इ०कांनीं देश, शेत इ०कांची केली जी तुडवातुडव ती. २ शेत इ० कांचे निगेचा अभाव ती.

**पायमोडा** (पु. ना.) (ग्रं०) पायघडी. २ पाऊलजंडा.

**पायरव** (पु. ना.) चाहूल. २ रसायन, दूध इ० नासायास किं० दुखणें अधिक व्हावयास कारणीभूत येणाऱ्या जाणाऱ्याच्या रहदारीनें जो विकार उत्पन्न होतो तो. ३ कोणेकाचें कोणेकाचे घरीं किं० कोणिक देशीं जाणें येणें इ० रूप जी वहिवाट असते ती.

**पायरी** (स्त्री. ना.) उच्चस्थलावर चढायाचा जो मार्ग त्याच्याठायीं एकापेक्षां एक उंच अशा क्रमानें पाय ठेवायास काष्ठपाषाणादिकांचे जे आधार केले असतात ते प्र०. २ एकापेक्षां एकानें उच्चपणानें वागावें एकानें नीचपणानें वागावें असे लोकशास्त्रव्यवहारसिद्ध जे अनेक अधिकार ते प्र०.

**पायवणी** (न. ना.) (ग्रं०)चरणतीर्थ.

**पायवाट** (स्त्री. ना.) भूमीवरील जो पायांनीं जाण्याचा मार्ग ती.

**पायस** (सं. न. ना.) खीर.

**पाया** (पु. ना.) भिंत, जोतें इ० करायाचें असतां पूर्वी भूमि खणून त्यामध्यें दगड, चुना इ० घालून जो बंदिस्त करितात तो. २ कांहींएक कर्त्तव्य गोष्टीचा जो प्रारंभांश तो.

**पायांतर** (न. ना.) (ग्रं०) पायरी.

**पायाशुद्ध** (वि०) कोणेक कार्यास जीं जीं साहित्यें असावीं किं० जी रीति असावी त्यामध्यें किंचित् उणेपणा नाहीं असें जें कार्य तें.

**पायाळ, ळू** (वि०) पायांकडून उत्पन्न होतो जो मनुष्य तो.

**पायीं** (अव्य०) मुळें. उ० शेताचे पायीं तो बुडाला.

पार (सं. पु. ना.) अंत. २ पिंपळ, वड इ०कांचे मुळीं सभोंवार जो ओटा बांधितात तो. ३ नदीस जो पायउतार असतो तो. पार पडणें म्ह० संकटादिकांतून मुक्त होणें किं० कांहीं कार्य शेवटास जाणें किं० काल, मार्ग इ० अतिक्रांत होणें इ०.

पारकेया (स्त्री. ना.) (ग्रं०) निवळी.

पारख (स्त्री. ना.) परीक्षा.

पारखी (वि०) पूर्वी ज्यास पाहिलें नाहीं किं० पाहून बहुत दिवस झाले म्हणून ज्याची ओळख पटत नाहीं असा मनुष्यादि तो. २ पूर्वी आपला असून कांहीं कारणामुळें ज्याजवर पूर्वीप्रमाणें हा आपला असें मानायास शंका वाटूं लागली अशा अवस्थेस पावला जो मनुष्यादि तो.

पारखी (वि०) परीक्षक. [न्मुख.

पारखें (वि०) (ग्रं०) परोक्ष. २ वि-

पारंगत (सं. वि०) आरंभिलेल्या व्यापाराचा ज्यास पार लागला गेला तो.

पारडें (न. ना.) परडें.

पारड्यांतघालणें (धा. ना.) (ग्रं०) प्रतिदिवशीं पारड्यांत घालून आराध्यास वजन करून कालचेपेक्षां आज कमी भरल्यास उत्तम न भरल्यास कमी भरायाजोगें त्याचे हाल करणें. इ०.

पारणें (सं. पारणा) (न. ना.) कांहीं-एक निमित्तानें उपोषण केलें असतां त्या नियमाची समाप्ति करून भोजन करितात तें. पारणें फिटणें म्ह० ज्या ज्या इंद्रियास ज्या ज्याविषयीं अतिशयित प्रीति आहे त्याचे लाभानें त्या इंद्रियास समाधान होणें.

पारध (स्त्री. ना.) अरण्यांतील पशु किं० पक्षी मारण्याचा किं० धरण्याचा व्यापार तो किं०ते पशु, पक्षी तो.

पारधी (वि०) पारध करणारा.

पारपत्य (सं. न. ना.) अपराध्यास शिक्षा लागावी म्हणून जें दंडन तें. २ (ग्रं०) धनीपण. ३ रक्षण.

पारंबी (पार. लोंबणें) (स्त्री.ना.) वड, पिंपरी इ० कांचे खांद्यांस ज्या मुळ्या फुटून खालीं लोंबतात ती.

पारलौकिक (सं. वि०) परलोकसंबंधी जो भोगादि तो.

पारवा (पु. ना.) एक पक्षी आहे. २ त्याचे अंगवर्णासारिखा रंग तो. ३ (वि०) त्या रंगानें युक्त तो.

पारायण (सं. न. ना.)पुराणादि ग्रंथांचें सांगून पठन तें.

पारावार (सं. पु. ना.) समुद्र.२ अतपार निषेधविषयीं प्रयोग. [प्रातु.

पारिजें (न. ना.) (ग्रं०) पारानामक

पारितोषिक (सं. न. ना.) वस्त्र, द्रव्य इ० देणगी तें.

पारिपत्य (न. ना.) पारपत्य.

पारियणें (धा. ना.) (ग्रं०) ऐकणें.

पारिसें (वि०) (ग्रं) पारोसें.

पारुखणें (धा. ना.) (ग्रं०) स्पर्श करणें. २ मौनावस्था पावणें.

पारुष (न. ना.) पारुष्य.

पारुषणें (धा. ना.) (ग्रं०) शब्द खुंटणें. २ तुच्छकरणें. ३ राहाणें.

पारुष्य (सं. न. ना.) कठोरपणा. २ दुरुत्तर इ० कठिण भाषण.

पारोसा (सं. पर्युषित) (वि०) रात्र अतिक्रमल्यामुळें धुऊन शुद्ध करण्याचे योग्यतेचा जो मनुष्य, वस्त्र इ० पदार्थ तो.

पार्थिव (सं. न. ना.) पूजा करायाकरितां जें मृत्तिकेचें लिंग करितात तें. (वि०) पृथ्वीसंबंधी जो पदार्थ तो. ३ (पु. ना.) राजा.

पार्श्वभाग (सं. पु. ना.) मनुष्यादि प्राणी किं० गृह इ० पदार्थ यांचा मागला पुढला भाग वर्जून अवशिष्ट जे दोन भाग ते प्रत्येकीं.

पाल (स्त्री. ना.) एक क्षुद्र जंतु आहे. २ (न. ना.) दाहा पांच सुताडें एकत्र जोडून बैठक घालणें किं० छाया करणें इ० कासाठीं जें वस्त्र करून ठेविलें असतें तें. ३ उडपाल. ४ मोठे लढाऊ गलबतांत एक भेद आहे. ५ (सं.) पालक. उ० भूपाल, महीपाल इ०. पाल घालणें, मांडणें ह्म० स्त्रीनें प्रसिद्धपणें व्यभिचारावर पैका मिळवूं लागणें.

पालक (सं.वि०) पालन कर्त्ता. (पु.ना.) (ग्रं०) पाळणा.

पालख (पु. ना.) (ग्रं०) पाळणा.

पालखी (स्त्री. ना.) राजादिकांनीं बसून जावयाचें मनुष्यांनीं वाहण्याचें लांकडी यान आहे जीस धनुष्याकार दांडी असत्ये ती.

पालट (पु. ना.) अदलाबदल.

पालटणें (धा. ना.) बुद्धि इ०कांनीं पूर्व अवस्थेहून भिन्नता पावणें. २ कांहींएक पदार्थ इकडचा तिकडे तिकडचा इकडे होई असें करणें.

पालती (पु. ना.) (ग्रं०) भाव.

पालन (सं. न. ना.) रक्षण.

पालव (सं. पल्लव) (पु. ना.) पदर. २ (ग्रं०) इंद्रियवृत्ति.

पालवणें (धा. ना.) वृक्षानें पल्लवयुक्त होणें. २ कोणेकास जवळ येण्याकरितां वस्त्रानें खुणावणें. ३ पदराच्या वाऱ्यानें किं० पुष्पादिकानें दिवा मालविणें. [२ अंकुर.

पालवियें (न. ना.) (ग्रं०) पालवी.

पालवी (स्त्री. ना.) वृक्षास नूतन फुटला जो पल्लवसमुदाय ती. २ (ग्रं०) (अव्य०) खालीं. [समुदाय तो.

पाला (सं. पल्लव) (पु. ना.) पानांचा

पालाणणें (धा. ना.)(ग्रं०) आच्छादणें. २ घोड्यावर खोगीर, जीन घालणें.

पालुपद (न. ना.) कवितादिकामध्यें वारंवार ह्मणायाचें ध्रुपद तें. [होणें.

पालेजणें (धा. ना.) वृक्षानें पल्लवयुक्त

पालोपद (न. ना.) पालुपद. २ भाषणांत वारंवार उगीच शब्द जो येतो तें.

पाल्हविणें (धा. ना.) (ग्रं०) पेरणें.

पाल्हाळ (पु. ना.) विस्तार.

पावक (सं. पु. ना.) अग्नि.

पावका (पु. ना.) शिडीस जीं लांकडें पाय ठेवण्यास बसविलीं असतात तीं प्रत्येकीं. २ घडोंची, मेज इ०काचा पाय तो. ३ ताड माड इ०कां-

वर चढायास किं० विहिरींत उतरायास ज्या खांची पाडितात तो.
पावडें (न. ना.) खोरें म्हणून माती ओढायाचें औत आहे. २ (वि०) (ग्रं०) पांगळें.
पावणें (धा. ना.) मनुष्यादि पदार्थानें गतिद्वारा मध्य प्रदेश आक्रमून इष्टदेशीं संबद्ध होणें. २ कोणेक मनुष्यादि पदार्थ किं० निरोप इ० नेऊन इच्छित स्थळीं संबद्ध करणें. ३ कोणेकापासून कोणेकास कांहीं विषय मिळणें. ४ आराध्यादि देवतेनें इष्टकामनापूरक होणें.
पावती (स्त्री. ना.) कोणेकापासून कोणेकास रुपये इ० द्रव्याचा जो पावलेपणा तो.२ त्याबदलचा जो लेख ती.
पावन (सं. वि०) पवित्र. २ पाप किं० अस्पृश्यत्व आदिकरून ज्याचा दोष गेला तो. ३ ज्याचे संबंधानें पापादि दोष जातो तो.
पावलोपावलीं (अव्य०) पदोपदीं.
पावशा (पु. ना.) चातक पक्षी.
पांवा (पु. ना.) वेळूचे नळीस अनेक छिद्रें पाडून सप्तसूर साधून वाद्य करितात तो.
पावो (पु. ना.) (ग्रं०) पाय.
पावोन (अव्य०) (ग्रं०) पावून.
पावोसरणें (धा. ना.) (ग्रं०) कळणें.
पाव्हणा (पु. ना.) पाहुणा.
पाश (सं. पु. ना.) दोरी इ०कांस गांठ मारून कांहीं पदार्थ बांधायाकारितां जो वलयाकार करितात तो. २ जेणेंकरून आपण गुंतला जातो असा जो संसार, स्नेह, चाकरी इ० त्यास म्हणतात. ३ सोंगटीं खेळायाचा फांसा तो.
पाशी (सं. पु. ना.)(ग्रं०) वरुण म्हणून पश्चिम दिशेचा स्वामी तो.
पाशुचीढेंपुळी (स्त्री. ना.)(ग्रं०)पृथ्वी.
पाशुता (स्त्री. ना.) (ग्रं०) माती.
पाषाण (सं. पु. ना.) दगड.
पास (स्त्री. ना.) जमीन साफ करण्याचे उपयोगी एक विखंड आहे तो.
पासंग (फा० न. ना.) तराजू, कांटा इ० कांस जो विषमपणा तें. २ तो विषमपणा जाऊन समता व्हावी म्हणून हलक्या पारड्यांत जे दगडादिक घालितात तें.
पासल (स्त्री. ना. ) भूमीवर शरीर अडवें टाकून जी स्थिति ती.
पासला (वि०) भूमीवर अडवा पडला जो मनुष्य, वृक्ष इ० पदार्थ तो. कोणेकास पासलें पाडणें म्ह० वाद, युद्ध इ० कांच्या ठायीं पराजित करणें.
पासवण (स्त्री. ना.) (ग्रं०) पाश.
पासवणें (धा. ना.)(ग्रं०)मार्ग पाहणें.
पासाय (पु. ना.) (ग्रं०) पसाय.
पासाव (अव्य०) (ग्रं०) पासून.
पासिक (पु. ना.) (ग्रं०) पाश.
पासिरा (पु. ना.) (ग्रं०) पाश.
पाहणी (स्त्री. ना.) शेत, आगर इ० कांत अमुक उत्पन्न होईल असा सरकारांतून अदमास करण्याचा व्यापार तो.
पाहणें (धा. ना.) अवलोकणें. २ जि-

च्हादि इंद्रियद्वारा तो तो विषय अनुभवणें. ३ संसार इ०कांचें खटलें अंगावर भार घेऊन करणें.
पाहाणें (धा. ना.) (ग्रं०) प्रकाशणें. २ उजेडणें.
पाहाल (पु. ना.) (ग्रं०) प्रातःकाळ.
पाहालणें (धा. ना.) (ग्रं०) उजेडणें.
पाहे (पु. ना.) (ग्रं०) पहाट. २ (अव्य.) उद्यां. [२ प्रवेशणें.
पाहेणें (धा. ना.) (ग्रं०) उजेडणें.
पाहुणचार (पु. ना.) कोणी पाहुणा आला असतां त्याचा यथायोग्य सत्कार तो.
पाहुणा (पु. ना.) (सं. प्राघूर्ण) (वि०) नातलग, ओळखी देखीचा कोणी गांवाहून आपले घरास आला तो. २ अतिथि, अभ्यागत जो कोणी आपले घरीं भोजनादिकांसाठीं येतो तो.
पाळ (सं. पालि) (स्त्री. ना.) तळें, विहिर यांच्या कांठचा जो प्रदेश तो. २ भोंत पाणी इ० राहावयासाठीं भोंवताला माती इ० कांचा परिधि करितात ती. ३ कानाच्या सभोंवतालची जी कड; जी किंचित् दुणलेली असते ती. ४ जात्याचें वरलें तळीचें जें तोंड त्याचे सभोंवती जी उंच कड राखिली असते; जींत वैरण घालितात ती. ५ वृक्षाचे मूळ प्रदेशापासून जे अवयव भूमींत प्रसृत झाले असतात ते प्रत्येकीं. ६ (ग्रं०) (पु.) समूह.
पाळणा (पु. ना.) आंत लाहानमूल निजवून त्यास झोंके द्यावे ह्मणून जो काष्ठाचा पदार्थ टांगायाजोगा करीत असतात तो. २ गाणें मुलास हलवितांना स्त्रिया ह्मणतात तो किं० देवाचे जन्मदिवशीं उत्साहांत हरिदास ह्मणतात तो.
पाळणें (धा. ना.) ज्याचे ज्याचे जीवनास जो जो अन्नादि पदार्थ हितकारक तो तो त्यास देऊन जगविणें. २ धर्ममर्यादा, व्रतादि नियम, शपथ इ० आचरणानें राखणें.
पाळत, थ (स्त्री. ना.) कोणेकाच्या कृत्याचें किं० त्यापाशीं काय आहे काय नाहीं इ० वर्तमानाचें गुप्तरूपें करून जें कोणी परिज्ञान घेतो ती.
पाळा (पु. ना.) (ग्रं०) वेढा, गरका. २ समुदाय. [२ विषयास ह्मणतात.
पाळिंगण (पु. ना.) (ग्रं०) सांठवण.
पाळिंगा (पु. ना.) (ग्रं) थवा.
पाळिजणें (धा. ना.) (ग्रं०) फाकणें.
पाळेगार (पु. ना.) राजास न गणितां रामोशी, भिल्ल, इ० लोक अभवून देशापासून खंड दंड घेणारा जो तो.
पिक (सं. पु. ना.) कोकिलपक्षी.
पिंक (स्त्री. ना.) तांबूलादि भक्षण करून जो थुंका टाकितात ती.
पिकणें (पाक, किं० पच) (धा. ना.) पर्ण, फल, धान्य इ० पक्व होणें. २ धान्य इ० त्या त्या देशांत उत्पन्न होणें. कोणेकाचें पिकणें ह्म० अनुकूल कालदशा प्राप्त होणें.
पिकलेंपान (न. ना.) केवळ वृद्ध मनुष्यास ह्मणतात.
पिकाऊ (वि०) पिकायाचे योग्यतेस

आला जो आंबा इ० पदार्थ तो.

पिंगळा (सं. पिंगलिका)(पु.ना.) एक पक्षी आहे. २ मेढेजोशास ह्मणतात. ३ (वि०) पिंगटवर्णविशिष्ट जो नेत्र इ० पदार्थ तो.

पिंगा (पु. ना.) मुलींच्या खेळांत एक प्रकार आहे. २ (वि०) पिंगटवर्ण जो नेत्रादि तो.

पिंगूळ (पु. ना.) एक किडा आहे.

पिचका (वि०) ज्या डोळ्यास सतत पाणी येतें अशा विकाराचा डोळा तो. २ ज्याला चीर पडली आहे असा जो चुडा बांगडी इ० पदार्थ तो. ३ इष्ट कामापुरतें ज्याचे अंगीं सामर्थ्य नाहीं असा काष्ट, वस्त्र इ० तो.

पिचकारी (स्त्री. ना.) रंग उडविण्याची नळी. २ रक्त, उदक इ०कांची चिरकांडी ती.

पिचणें (धा. ना.) बांगडी, कांच, भिंग, वस्त्र इ० फुटणें.

पिचुंडया, चोंड्या (स्त्री. ना.) पाठीमागें हात वळवून बांधिले जे दंड त्या.

पिच्छ (सं. न. ना.) पक्षाचें जें पीस तें.

पिच्छा (पु. ना.) कांहीं पदार्थाच्या पाठीकडील जो प्रदेश तो परंतु लाक्षणिक अर्थी प्रयोग होतात. कोणेक मनुष्यादिकाचे किं० व्यवहाराचे पिच्छास बसणें किं० लागणें, पिच्छा पुरविणें, घेणें, धरणें ह्म० पाठ पुरविणें इ० अर्थ होतात.

पिछाडी (स्त्री. ना.) घोड्याचे मागील जे पाय ती. २ पायबंद. ३ चाललेल्या सैन्यादि समुदायाचा मागील विभाग ती.

पिछोंडा, छोंडे (पु. ना.) पिचुंड्या.

पिंजणें (धा. ना.) वस्त्र, चिंधी इ० उभा फोडणें. २ कापूस, लोंकर विशकलावयव होत अशी करणें.

पिंजरा (सं. पंजर) (पु. ना.) पांजरा.

पिंजरी (स्त्री. ना.) पिंजरा. २ पालखीवर छायेसाठीं जें सुशोभित वस्त्र केलें असतें ती. ३ गाडीस छायेकरितां घुमटाकार आच्छादन करितात ती.

पिंजारणें (धा. ना.) पिंजणें. २ डोसक्यांचे केंस, पिसें पिंजरत असें करणें. ३ डोळे किं० नाक, पिसें इ० क्रोधादिकानें प्रफुल्लित करणें.

पिटणें (सं. पीडन) (धा. ना.) शत्रु इ०कांस पराभूत करून पळे असा करणें किं० जासूद इ० इच्छित देशीं त्वरेनें जाई असा करणें. २ घोडा, गाय इ० धांवविणें. ३ सुवर्ण, धान्य इ० हातोडा, मुसळ इ०कांच्या आघातानें बळकट चेंचणें. दौंडी, भांडोरा इ० पिटणें ह्म० तें तें वाजवीत गांवभर फिरणें. टाळी पिटणें ह्म० वाजविणें.

पिटाळणें (धा. ना.) पिटणें.

पिठा (वि०) केवळ भुसभुशीत जो दगड तो. २ मद्याचें दुकान तो.

पिठावें (न. ना.) (ग्रं०) निंदा.

पिंड (सं. पु. ना.) भात, मृत्तिका, धातु यांचा जो गोळा तो. २ देह. ३ देहाचेच दोन भाग करून मस्त-

कांतील पोकळीशिवाय जो देहभाग तो. ४ क्षेत्रव्यवहारीं पदार्थांचे जाडीस म्हणतात.

पिडा (स्त्री. ना.) पीडा. २ ज्यापासून आपणास पीडा होत्ये किं० ज्याचा आपणास कंटाळा आला त्यास ह्मणतात.

पिढी (सं. पीठिका) (स्त्री. ना.) पुत्र, नातू, पणतू, बाप, आजा, पणजा इ० जे वंशपरंपरेंतील पुरुष ते प्रत्येकी.

पिढीजाद (पिढी, जाद) (वि०) कुलीन. २ अनेक पिढ्यांपासून जो गुणादिक सतत चालत आला तेणेंकरून विशिष्ट जो त्या वंशींचा कोणी एक तो.

पिणें (सं. पान) (धा. ना.) जल, वायु इ० पातळ पदार्थ गळ्याखालीं मुखद्वारानें उतरणें. २ गुरगुडी, विडी यांचा धूर मुखांत प्राणवायूनें आकर्षून घेणें. ३ क्रोध, दुःख, अपराध इ० साहून जिरविणें.

पितर (सं. पु. ना.) अग्निष्वात्तादिक शास्त्रप्रसिद्ध देवताविशेष आहेत ते. २ (पु. ना.) आईबाप. ३ महालयश्राद्ध. ४ त्यांत ज्यांचा उच्चार ते.

पितरलंड, पितृलंड (वि०) पितरांचें श्राद्ध करायास चुकवितो त्यास ह्मणतात.

पिता (सं. पु. ना.) बाप.

पितांबर (सं. पीतांबर) (पु. ना.) एक रेशमाचें नेसायाचें वस्त्र आहे.

पितामह (सं. पु. ना.) बापाचा जो बाप तो. २ ब्रह्मदेव.

पितृपक्ष (सं. पु. ना.) भाद्रपदाचा कृष्णपक्ष. २ पितरसमूह.

पितृव्य (सं. पु. ना.) चुलता.

पित्त (सं. न. ना.) शरीरनिर्वाहक प्राणिमात्राचे शरीरांत एक पातळ पदार्थविशेष आहे. पित्त खवळणें, चढणें इ० कांहीं कारणामुळें अकस्मात् क्रोध येणें. [वमन.

पित्तकुरुपण (न. ना.) (ग्रं०) ज्वाला-

पित्तवायु (सं. पु. ना.) पित्ताचा अतिशय होऊन जो वातविकृति होत्ये तो.

पित्तक्षोभ (सं. पु. ना.) पित्ताचा अतिशय तो.

पिनाक (सं. न. ना.) महादेवाचें धनुष्य. क्वचित् त्रिशूळासही ह्मणतात.

पिंपळपान (न. ना.) मुलाचे कपाळावर बांधायाचें एक भूषण आहे.

पिंपळवण, वन (न. ना.) पिंपळपान.

पिपीलिका (सं. स्त्री. ना.) मुंगी.

पिरगळणें, गाळणें (धा. ना.) शरीरावयव, वृक्ष इ० धरून बळानें पीळ पडे असा फिरविणें.

पिरपिर (स्त्री. ना.) त्रास यावयाजोगा मला हें दे, तें दे; हें नको, तें नको इ० लांबच लांब बालक, याचक इ०कांचा भाषणादि व्यापार तो. २ केवळ मोठ्यानें पडूं नये व केवळ उघडूं नये असें चिरकाल जें पर्जन्याचें पतन तें.

पिलखाणा (फा० पु. ना.) हत्ती बांधायाची शाला तो. [धावणें.

पिलंगणें (धा. ना.) (ग्रं०) पुढें पुढें

पिलूं (न. ना.) पशु, पक्षी इ०कांचें बालक तें.

पिशवी (स्त्री. ना.) वस्त्र, चर्म इ० कांचें आंत कांहीं पदार्थ ठेवायाकरि- तां शिवून जें पात्र करितात तें.

पिशाच (सं. पु. ना.) देवयोनीमधी- ल जातिविशेष आहे. २ मरणसम- यीं कांहीं हेतु गुंतल्यामुळें मेल्यानंतर वायुरूपी होऊन मनुष्यादिकांस पी- डा करितो तो. ३ ज्याचे कृतीचा थांग कोणास लवकर लागत नाहीं असा मनस्वी वर्तणारा अघोरी, सा- हसी मनुष्य दि तो.

पिशित (सं. न. ना.) मांस.

पिशी (स्त्री. ना.) जोंधळें, सजगुरे यांचें धान्यरहित कणीस तें.

पिशुन (सं. वि०) चहाडखोर.

पिसा (वि०) पिशाचामारख्या चे- ष्टा करण्याचा स्वभाव ज्याचा तो २ (पु. ना.) (ग्रं०) कापूस.

पिसाट (वि०) पिसा. २ (न. ना.) पिशाचजनित कोणेकास बुद्धिभ्रंश व्हावयाजोगा उपद्रव होतो तो

पिसारा (पु. ना.) पिसांचा जो समु- दाय तो. २ तीराचे मूळप्रदेशीं पि- सांचे तुकडे बांधिले असतात तो.

पिसाळणें (धा. ना.) कुत्रा, कोल्हा इ०कांस एक रोग होत असतो जेणें- करून ते वेडावतात आणि त्यांस कांहींएक विचार प्राप्त होतो अशा रोगानें त्यांणीं युक्त होणें. २ तो कु त्रा इ० डसल्यामुळें मनुष्यादिकानें त्या रोगानें युक्त होणें. ३ पिशाचा- च्या उपद्रवामुळें किं० क्रोधादि आ- वेशामुळें कर्तव्याकर्तव्यविचार सुटे अशी दशेतें पावणें.

पिसुण (वि०) (ग्रं०) पिशुन.

पिसू (स्त्री.) पंखाची ऊ.

पिसें (न. ना.) वेड.

पिसोळा (पु. ना.) एक क्षुद्रजंतु आहे.

पेस्वाद (फा० पु. ना.) वेश्या नृत्य करितेसमयीं अंगांत जो झगा घाले- तात तो.

पिळणें (धा. ना.) आंतील द्रवांश बा हेर निघे असा कोणेक पदार्थ दाबणें किं० पिळवटणें. गाय, म्हैस इ०कां- स पिळून इ० त्यांचें दूध काढणें.

पिळवटणें (धा. ना.) हस्तादि शरी- रावयव, ऊंस इ० पदार्थ वळानें जि- तका पीळ पडेल तितक्या पिळानें युक्त करणें.

पीक (न. ना.) शेत, आगर इ० कां- पासून उत्पन्न होतें जें धान्यादिक तें. २ (स्त्री. ना.) पिक.

पीठ (सं. पिष्ट) धान्यादिक दळून कु- टून त्याचें करितात जें चूर्ण तें. खाऊन पीठ करणें इ० नाहींसें करणें.

पीडा (सं. स्त्री. ना.) दुःख.

पीत (सं. वि०) पिवळा. २ प्राशिला जो तो. ३ (ग्रं०) विक्षेपरूप भास.

पीन (सं. वि०) पुष्ट.

पीनस (सं. पीनास) (पु. ना.) नाका- मध्यें एक रोग होत असतो तो.

पीयूष (सं. न. ना.) अमृत.

पीस (न. ना.) पक्ष्याचे पक्षांस किं०

पुच्छास जे अनेक अवयव असतात ते प्रत्येकीं.

पीळ (पु. ना.) सूत्र, लता, तार इ० कांचें एक शेवट धरून दुसरें शेवट वर्तुलाकार फिरविलें असतां त्याचे अंगीं जो संस्कारविशेष उत्पन्न होतो तो. २ कोणेकाच्या अंगीं जो अभिमानाचा ताठा असतो तो. ३ कोणेकाविषयीं कोणेकाच्या अंतःकरणात जो वांक असतो तो.

पुकार (स्त्री. ना.) हाकाटा.

पुकारा (पु. ना.) पुकार.

पुंख (न. ना.)(ग्रं०) पुच्छ. २ पिसारा.

पुंगळ (पु. ना.) पिगूळ.

पुंगी (स्त्री. ना.) मुखानें वाजवायाचें गारुडी इ० कांचें एक वाद्य आहे. कोणेकाची पुंगी बंद करणें इ० म्हणजे कांहीं कार्याविषयीं आरंभिलेला प्रयत्न चालेनासा करणें इ०.

पुच्छ (स. न. ना.) पशु, पक्षी इ० प्राण्यांचे गुदाचे उपरिभागीं लांब अवयवविशेष असतो ते.

पुंज (स. पु. ना.) धान्यादिकांचा ढीग तो. २ (ग्रं०) मेळा. ३ समूह ४ तेज.

पुंजाळणें (धा. ना.) (ग्रं०) नेत्र तेजस्वी होऊन गभीर दिसू लागणें.

पुजारी (पु. ना.) देवालयांतील देवाची पूजा करण्याकरितां जो ब्राह्मण इ० वेतन देऊन ठेविला असतो तो.

पुंजी (स. पुंज) (स्त्री. ना.) दाणे, रुपये इ० पदार्थांचा लाहान जो ढीग तो. २ संग्रहास असलेला जो द्रव्य, विद्या इ० कांचा भरणा तो.

पुटपुटणें (धा. ना.) दुसऱ्यास स्पष्ट ऐकायास न येई असें कांहीं एक हळू हळू बोलणें कि० पढणें.

पुटपुट (स्त्री. ना.) लांबट, अस्पष्ट जें हळू हळू भाषण तें. २ (अव्य०) बेडकी, पोर इ० कांचें पटपट उड्या मारण्याचें विशेषण.

पुठा, पुढा (पु. ना.) घोडा इ० कांचे पुच्छाजवळचा भाग तो. २ वही चोपडी इ० कांचे खालीं वर लावितात जी कानडीं ती प्रत्येकीं.

पुंड (वि०) राजा, मातापितरें, धनी इ० कांची आज्ञा न मानितां स्वेच्छेनें अनेक प्रकारची कचाट करण्याचा ज्याचा स्वभाव तो.

पुडका, पुडकें (पु. न. ना.) कागद, पत्रावळी इ० अनेक पदार्थ एकत्र जुळून सूत्रादिकानें बांधिला असतां जो आकारविशेष होतो ते.

पुंडरीक (स. न. ना.) कमळ.

पुडा (पु. ना.) पुडका. २ साखर इ० पदार्थ कागद, पान इ० कांनीं गुंडाळून बांधिला असतां जो आकारविशेष होतो तो.

पुडाई, पुंडायकी (स्त्री. ना.) देशादिकांस उपद्रव करणें इ० रूप जें पुंडाचें कर्म तें. २ पुंडाचा जो देशादिकांस उपद्रव तो.

पुंडावकें, पुंडावें (न. ना.) पुंडाई.

पुडी (स्त्री. ना.) लाहान जो पुडा तो. २ संन्याशास देतात जी भोजनभिक्षा ती.

पुढां (अव्य०) (ग्रं०) पुढें. २ पुनः

पुढाईत (पु. ना.) पुढाकार.

पुढाकार (पु. ना.) पुढारी. [खेळणें.

पुढारणें (धा. ना.) (ग्रं०) पुढें होणें.

पुढारां (अव्य०) (ग्रं०) पुढें.

पुढारी (पु. ना.) काहींएक कार्याचा ज्याकडे मुख्यत्वेंकरून अधिकार दिला असतो. तो. २ अनेकांनीं साधायाजोगे कार्याविषयीं अनेकांस हातांखालीं घेऊन तें करावयाविषयीं एकानें पुढें सरण्याचा जो प्रकार तो ज्याणें घेतला आहे तो.

पुढासणें (धा. ना.)(ग्रं०) पुढें घालणें.

पुढील (वि०) पुढचा. २ (ग्रं०) अन्य, दुसरा.

पुढीलपाय (पु. ना.) (ग्रं०) प्रवृत्ति किं० प्रपचाकडील वृत्ति तो. [होणें.

पुढीवळणें (धा. ना.) (ग्रं०) वांकडें

पुण्य (स. न० ना.) उत्तमाचरण केल्यानें ईश्वरप्राप्तिद्वारा सुख प्राप्त करून देणारा आत्म्याचेठायीं जो धर्मविशेष होतो तें.

पुण्यतिथि (स. स्त्री. ना.) संन्यासी मृत झाला असतां बाराव्या दिवशीं किं० प्रतिवार्षिक मृत तिथीस त्याचे पुत्र, शिष्यादि श्राद्धस्थानीं जें कर्म करितात ती.

पुण्यलोक (सं. पु. ना.) स्वर्गलोक, ब्रह्मलोकादिक जे पुण्यानें प्राप्त होणार ते प्रत्येकीं.

पुण्यश्लोक (सं. वि०) ज्याचे नामस्मरणानें पुण्य लागतें असा ईश्वर, धर्मराज, नल इ० तो.

पुण्याई (स्त्री. ना.) इष्टकार्य करण्याविषयीं साधनत्वेंकरून जें पुण्य तीं.

पुत (पु. ना.) (ग्रं०) पुत्र.

पुतळा (पु. ना.) धातु, काष्ठ, मृत्तिका यांचे पुरुषाकार बाहुलें करितात तो.

पुतळी (स्त्री. ना.) स्त्रीच्या आकारानें बाहुलें काष्ठादिकांचें करितात ती. २ एक सुवर्णाचें नाणें आहे.

पुत्र (स. पु. ना.) ज्या आईबापापासून उत्पन्न झाला जो पुरुष तो त्यांचा. २ दुसऱ्यापासून दत्तक घेतला किं० अन्नदानादिकेंकरून पोशिल्यामुळें पुत्रत्वेंकरून मानिला इ० तो.

पुत्रेषणा (सं. स्त्री. ना.) पुत्राविषयीं लोभ ती.

पुनः (अव्य०) आणखी.

पुनः पुनः (सं. अव्य०) वारंवार.

पुनरपि (सं. अव्य०) पुनःहीं.

पुनरावृत्ति (सं. स्त्री. ना.) काहीं ग्रंथादिकांची दुसरी आवृत्ति ती.

पुनर्जन्म (स. न. पु. ना.) मृत्यु यावयाजोग्या रोगादि संकटापासून निभावून जी जिवंतपणें स्थिति तें तो. २ या जन्माहून होणारा जो अन्य जन्म तो.

पुनश्च (अव्य०) पुनः.

पुनीत (सं. वि०) प्रायश्चित्तादिकेंकरून शुद्ध झाला तो.

पुर (स. न. ना.) नगर.

पुरचुंडी (स्त्री. ना.) पदराकाठा नारळायेवढी मोठी मोटली ती. [पटा तो.

पुरजा (फा० पु. ना.) कागदाचा क-

पुरण (सं. पूरण) (न. ना.) पोळ्या, मोदक इ०कांत घालायाकरितां शिजविलेली डाळ, नारळाचा कीस इ०कांत गूळ, साखर घालून जो पदार्थ करितात तें. २ सोन्याची पाटली इ०कांचे पोटीं जें ताम्रादि घालितात तें.

पुरणें (धा. ना.) कांहींएक पदार्थ भूमि इ०कांचे खळीमध्यें घालून आच्छादित करणें किं० मेढ, खांब इ०कांचा मूलादि अवयव भूम्यादिकांत घट्ट बसवून तो पदार्थ स्थिर राही असा करणें. २ कांहींएक पदार्थ कांहीं कार्यास किं० इष्टप्रमाणाशीं तुल्य व्हावयास जितका पाहिजे त्यापेक्षां न्यून न होणें. ३ इच्छा, हौस इ० पूर्ण होणें.

पुरता (वि०) ज्यामध्यें अवयव, अवस्था इ० संबंधीं न्यूनत्व कमी तो. २ कांहींएक कार्यास किं० कांहींएक प्रमाणाशीं तुल्य होण्यास पुरायाजोगा तो.

पुरंदर (सं. पु. ना.) साम्रत स्वर्गांत जो इंद्र आहे तो.

पुरंदरी (सं. पुरंध्री) (स्त्री. ना.) विलासी स्त्री ती.

पुरपुराट (पु. ना.) कांहींएक पदार्थाची कोणेएक कार्यास पुरून उरायाजोगी जी विपुलता ती.

पुरवटा, पुरवठा (पु. ना.) कांहीं कार्याविषयीं योजिलेला जो अन्न, द्रव्य इ० पदार्थ त्याचा त्या कार्याविषयीं तोटा न येतां पुरण्याचा किं० पुरून उरण्याचा जो प्रकार तो.

पुरवणी (स्त्री. ना.) कागदामध्यें लिहिल्या मजकुराचें शेष तो कागद संपल्यामुळें दुसरे कागदावर लिहितात ती. २ तो जो दुसरा कागद तो. ३ कांहींएक बोललेल्या गोष्टींचा साक्षी लेख इ० प्रमाणांनीं खरें करून देण्याचा व्यापार तो इ०.

पुरवणें (धा. ना.) कांहींएक गोष्ट किं० पदार्थ हें मला येईल कामास अशा बुद्धीनें मान्य होणें. २ कांहींएक पदार्थानें कांहींएक विषयास व्यापून राहाणें. ३ कांहींएक कार्याविषयीं साधनभूत कांहींएक पदार्थ जितका पाहिजे तितका देणें किं० युक्तीयुक्तीनें खर्चून इष्टकार्याचे समाप्तिपर्यंत पुरायाजोगा करणें.

पुरशीस, सीस (फा० स्त्री. ना.) प्रश्न, सवाल. २ तो ज्यावर लिहिला तो कागद.

पुरश्चरण (सं. न. ना.) आपणास मंत्र सिद्ध व्हावा म्हणून त्या मंत्राचा अमुक संख्याक जप करावा इ० मंत्रशास्त्रामध्यें अनुष्ठान सांगितलें आहे तें.

पुरस्कर (अव्य०) पुरस्सर.

पुरस्करणें (धा. ना.) (ग्रं०) सावध करणें. २ सहाय करणें.

पुरस्कर्ता (सं. पु. ना.) राजकीय व्यवहारादिकांत आपलें कांहीं काम असतां तेथें आपला प्रवेश करून अनेक प्रकारें आपलें साहित्य करणारा जो आपला पक्षपाती असतो तो.

पुरळ (पु. ना.) पित्तादि विकृतीमुळ अंगावर जो पुळ्यांचा समुदाय येतो तो.

पुरा (वि०) पुरता. २ ज्या कर्मांमध्यें जो निपुण तो त्याविषयीं. ३ (पु. ना.) एक जातीचे किं० कसबाचे लोक जेथें राहातात असा नगराचा भाग असतो तो.

पुराण (सं. न. ना.) सृष्टीची उत्पत्ति, स्थिति, प्रलय इ० ईश्वरचरित्र ज्यामध्यें सांगितलें असतें ते ग्रंथ तें. २ (सं. वि०) पुरातन. ३ संसारादिसंबंधी भारी झोंबट जी गोष्ट तिला ह्मणतात.

पुराणिक (सं. पौराणिक) (पु. ना.) पुराण वाचून त्याचा अर्थ सांगणारा जो तो. २ देवालयादिकांच्याठायीं पुराण सांगण्याची वृत्ति ज्यास आहे तो तेथील.

पुरातन (सं. वि०) जुना.

पुरावा (पु. ना.) कांहीं कार्याविषयीं राहिजे तो पदार्थ पुरविण्याचा व्यापार तो. २ पुरवणीतृतीयार्थी.

पुरी (सं. स्त्री. ना.) नगरी. २ एक पक्वान्न आहे.

पुरीष (सं. न. ना.) विष्ठा.

पुरुष (सं. पु. ना.) ज्याचे अंगीं प्रजोत्पादक बीज आहे असा जो मनुष्यादि प्राणी तो. २ बाप्या. ३ पुंलिंग नामानें वाच्य जो अर्थ तो. ४ साडेतीन हात उंचीचें जें प्रमाण तो.

पुरुषार्थ (सं. पु. ना.) मनुष्यादि जन्मच्या प्राण्यानें साधायास योग्य जे धर्म, अर्थ, काम, मोक्ष हे चार ते प्रत्येकीं. २ लोकांनी वाहवा ह्मणायाजोगा केला जो शत्रुपराजयादि पराक्रम तो.

पुरोहित (सं. पु. ना.) उपाध्याय.

पुरोहितगुण (पु. ना.) (ग्रं०) पराधीनता.

पुलिका (स्त्री. ना.) (ग्र०) ज्याचा जो धर्म तो त्याचा तो. २ बोळका.

पुलॅशोभणें (धा. ना.) (ग्र०) प्रकाशणें. [णी स्त्री.

पुंश्चली (सं. स्त्री. ना.) व्यभिचारि-

पुष्कर (सं. न. ना.) हत्तीच्या सोंडेचा अग्रभाग तें. २ कमल.

पुष्करिणी (सं. स्त्री. ना.) लाहान जें सरोवर तें.

पुष्ट (सं. वि०) लठ्ठ.

पुष्टि (सं. स्त्री. ना.) पुष्टता. २ भाषणादि व्यवहारांत अपरांचें प्रेरण तें.

पुष्टिपत्र (सं. न. ना.) पुस्तक न मळावें न चुरावें ह्मणून त्याचे मागेंपुढें जाडा कागद इ० लावितात तें. २ लिहितसमयीं त्या कागदाचे खालीं आधारासाठीं दुसरा कागद धरितात तें.

पुष्टीकरण (न. ना.) भाषणादि व्यवहारांनीं पुष्टि करण्याचा व्यापार तें.

पुष्प (सं. न. ना.) फूल.

पुष्पवाटिका, वाटिका (सं. स्त्री. ना.) अनेक प्रकारचीं पुष्पांचीं झाडें लावून जें सुशोभित स्थळ करितात तीं.

पुसणें (धा. ना.) कागद, शरीर, वस्त्र इ० कांस लागलेला मलादिक किं० अक्षर, रेषा इ० चिन्ह फडकें इ०कानें चोळून नाहीं असें करणें.

२ निवारणें. ३ (न.) पुसायाचें साधन जें फडकें इ० तें.

पुसणारा, पुसता (पु. ना.) कोणी अपराध इ० केला असतां तूं हें कां केलेंस असें पुसण्याविषयीं जो धनी इ० अधिकारी तो.

पुस्तक (सं. न. ना.) वेद, शास्त्र, पुराण इ० ग्रंथ ज्या कागदांवर लिहिले आहेत असा जो त्या कागदांचा समुदाय तें.

पुस्तापास्त (स्त्री. ना.) तू कोण कोठें जातोस इ० वाटसरू इ०कांस जो प्रश्न करितात ती.

पुस्ती (फा० स्त्री. ना.) अक्षर कोठपर्यंत वळलें याची परीक्षा पाहावयासाठीं मुलापासून कागद लिहून घेतात ती. २ जोडा इ०कांस कातड्याचें ठिगळ देतात तें. ३ पाठबळ इ०.

पुळिका (स्त्री. ना.) (प्र०) काजळी.

पुळी (स्त्री. ना.) फुटकुळी.

पूगीफल (सं. न. ना.) पोफळीचें फळ तें.

पूजन (सं. न. ना.) अर्चन.

पूजा (सं. स्त्री. ना.) पूजन. २ देवादिकांचे पूजनासाठीं आणिली जी पुष्पादि सामग्री ती.

पूज्य (सं. वि०) पूजा करण्यास योग्य जो देव, गुरु इ० तो. २ ज्याची आज्ञा अवश्य पाळिली पाहिजे असे जे माता, पिता, गुरु, शास्त्र इ० तो.

पूट (न. ना.) कांहींएक पदार्थांत विशेष गुण उत्पन्न व्हावा म्हणून कांहींएक रसादिकांचा त्या पदार्थास लेप देऊन सुकवून त्याच्या अंगीं तो रस भिने असा जो संस्कार करितात तें. २ तें रसादि द्रव्य तें.

पूड (स्त्री. ना.) कांहींएक पदार्थांचें केलें जें चूर्ण ती. २ (न.) नगारा, नौबत इ० कांचें जें पात्र तें. ३ चौफुला, पानपूड, बटवा इ० कांच्या पाटी जीं घरें असतात तीं प्रत्येकीं. ४ चुनाळाची दोन टोपणें तीं कि० मृदंगास दोहींकडे दोन जीं चर्में लाविलीं असतात तीं प्रत्येकीं.

पूत (पु. ना.) पुत्र. २ (सं. वि०) पुनीत.

पूर (पु. ना.) नदी, ओढा यांस पर्जन्योदक आंत मिळाल्यामुळें जी त्या उदकाची अतिशयित वृद्धि होत्ये ती.

पूर्ण (सं. वि०) पुरता. २ जलादिकानें भरण्याविषयीं ज्यामध्यें यत्किंचित् रिकामेपणा राहिला नाहीं तो.

पूर्णिमा (सं. स्त्री. ना.) ज्या तिथीस सर्व चंद्रबिंबतेजानें पूर्ण होतें ती तिथि.

पूर्त्त (सं. न. ना.) विहीर, तळें, देवालय इ० बांधण्याचें जें धर्मकृत्य तें. २ (वि०) पूर्ण.

पूर्वज (सं. वि०) आपला बाप, आजा, पणजा, ज्येष्ठबंधु इ० जे वडील ते.

पूर्वपक्ष (सं. पु. ना.) दुसऱ्यानें वर उत्तर करावें अशा बुद्धीनें पंडितापुढें कांहीं एक मताचा केला जो उपन्यास तो. २ उपन्यास करायाजोगा दोषाभासविशिष्ट जो ग्रंथप्रतिपादित विषय तो.

पूर्वपीठिका (सं. स्त्री. ना.) कोणेक

पुरुषादिकांचें कांहीं एक समयापासून पूर्वींचें इत्थंभूत जें वृत्त तें. २ कांहीं एक गोष्टीचा इष्ट अंशापासून पूर्वींचा जो अंश तो.

पूर्वरात्र (सं. स्त्री. ना.) मध्यरात्रीच्या पूर्वींचा जो रात्रविभाग तो.

पूर्ववत् (सं. अव्य०) पूर्वींच्याप्रमाणें.

पूर्वापर (अव्य०) विवक्षितकाल, देश, ग्रंथ इ० कांचा पूर्वींचा आणि अनंतरचा असे जे दोन विभाग त्यांतें अनुलक्षून.

पूल (फा० पु. ना.) नदी इ० उलटून जावयाकरितां पाषाण, लांकडें इ०कांनीं खालून पाणी जावयास मार्ग ठेवून जो मार्ग बांधितात तो [पुरुष

पूंस (न. ना.) (ग्रा०) पुच्छ २ (पु.)

पृच्छा (सं. स्त्री. ना.) हें कसें काय इ० दुसऱ्यास विचारण्याचा व्यापार तो

पृतना (सं. स्त्री. ना.) सेना.

पृथक् (सं. वि०) निराळा

पृथक्करण (सं. न. ना.) मिश्रितपणें एकत्रस्थित पदार्थ निरनिराळे करण्याचा व्यापार तें

पृथिवी, पृथ्वी (सं. स्त्री. ना.) जेथें गंधरूप गुण राहतो असें जें पंचमहाभूतांतील भूत ज्यावर नद्या, सरोवरें, समुद्र, पर्वत, वनें, नगरें, मनुष्य, पशु इ० राहतात असा जो ईश्वरनिर्मित पदार्थ तो. २ तिजवर राहणारे जे मनुष्य, पशु, वृक्ष इ० सर्व ते.

पृथुक (सं. पु. ना.) पोहा. २ बालक.

पृष्ठ (सं. न. ना.) मनुष्यादि पदार्थांची जी पाठ ते. २ कागदाची दोन जीं अंगें तीं प्रत्येकीं.

पृष्ठफल (सं. न. ना.) भरींव पदार्थांचें वरील जें क्षेत्रफळ तें.

पेकट, पेंकट (न. ना.) कंबरेचा जो सांधा तें.

पेखण (न. ना.) (ग्रा०) कल्पित कथा, वार्ता तें. २ कार्याकूट. ३ छंद.

पेंगणें (धा. ना.) बसून डुकल्या येऊं लागणें. २ लगडणें. ३ रोगादिकानें अशक्त होणें.

पेगम (फा० पु. ना.) परामर्शित दुर्घट कार्यांचे सिद्धीविषयीं अनेक युक्तींनीं चालिलें जें संधान तो.

पेंच, पेच (फा० पु. ना.) मल्लयुद्धांत दुसऱ्यास पाडावयाच्या ज्या अनेक युक्ति त्या प्रत्येकीं. २ अनेक प्रकारचीं संकटें प्राप्त झाल्यामुळें जी अडचण प्राप्त होते ती किं० तीं संकटें तो. ३ डावपेंच. ४ पागोट्याचे जे वेढे किं० जे सारखे पीळ पडतात ते प्र०.

पेंचणें (धा. ना.) हात, पाय इ० अवयव किं० वृक्ष, शाखा इ० पिळवटणें, दुमडणें इ० कारणानें आंत मुरगळून जाणें. २ कोणाकास भाषणानें कोंडणें. ३ कागदादिक पिंजलें जाणें इ०.

पेज (सं. पेया) (स्त्री. ना.) तांदूळ शिजल्यानंतर जें पाणी वेळून काढितात तें. २ पुष्कळ पाण्यांत थोडे तांदूळ शिजवून प्यावयाजोगा जो पदार्थ करितात तो.

पेटणें (धा. ना.) अग्नीनें प्रदीप्त होणें

क्रि० कामादिकानीं पेट घेणें. २ कलह, क्रोध इ०कानीं अतिशयपूर्वक प्रवृत्त होणें. ३ भूमि चोपणें. ४ बैल, टोणगा इ० नांगर, गाडा इ०कास जुपायाजोगा शिक्षित होणें.

पेटारा (पु. ना.) वेळू, वेत इ० कांचा पेटीसारिखा जो मोठा करंड करितात तो.

पेटी (स्त्री. ना.) रुपये, दागिने इ० ठेवायाचें लांकूड इ० कांचें आच्छादनसहित एक पात्र आहे ती. २ स्त्रियांचें गळ्यांतील एक भूषणावयव आहे; ज्या अनेक ओंवून गळ्यांत घालितात ती. ३ दंडादिकांत बांधायाचें चतुष्कोण भूषण आहे ती. ४ फटाकड्यांच्या माळा एका कागदांत गुंडाळून जो पेटीसारिखा आकार करितात ती. ५ (ग्रं०) पेटें.

पेटें (न. ना.) अनेक भोंपळे एकत्र बांधून नदी इ० कांत तरायाचें साधन करितात तें.

पेठ (न.स्त्री.ना.) देशोदेशाहून अनेक जिन्नस येऊन जेथें त्यांची घडामोड होते किं० अनेक प्रकारच्या जेथें वस्तु निर्माण होऊन देशोदेशीं जातात असें जें अनेक उदमी लोकांनीं वसलेलें स्थल ती. २ शहराचे जे अनेक विभाग ते प्रत्येकीं, जेथें प्रायः थोडाबहुत बाजार असतो. ३ सावकार लोक पेठोंपेठच्या जिनसांचा भाव इ० बातमी देशांतरींच्या सावकारास लिहून पाठवितात ती. ४ गुप्त बातमी.

पेंड (स्त्री. ना.) (सं. पिण्याक) तीळ, खोबरें इ० कांतील तेल काढून घेऊन जो चोथा राहतो तो. २ नारळाचा चव इ० जो दुखवलेल्या हात इ०कांवर बांधितात तो. ३ हजीरवेगारानें चालत आलें जें अनुक्रमानें ओझें तो. ४ घराचे पाटणीवर किं० ओमणावर जो दाट चिखलाचा लेप दिला असतो तो. ५ भिजलेले चिकट मातीतून चाललें असतां पायांस किं० जोड्यास जो लेप बसतो तो.

पेड (पु. ना.) दोरी, वेणी, यांचे पोटचे जे अनेक पदर ते प्र०.

पेंडकें (न. ना.) गवत, कडबा इ०कांचें जे लहान ओझें तें.

पेंडवळें (न. ना.) (ग्रा०) मर्यादा.

पेंडळी (स्त्री. ना.) (ग्रा०) पुष्टता.

पेंडें (न. ना.) मोत्यांचे अनेक सर एकत्र करून चें कंठभूषण करितात तें. २ दावें, दावण यांस पशूचा गळा बांधायाजोगा बिरड्यानें युक्त जो अवयव असतो तें.

पेढा, पेडा (पु. ना.) दुधाचा खवा करून आंत साखर इ० घालून ज्या गोळ्या करितात त्याप्र०.

पेंढा (पु. ना.) भाताचें तृण तो.

पेंढार (न. ना.) पेंढारी लोकांचा समुदाय तें.

पेंढारी (पु. ना.) स्वार असून जे अनेक मिळून गांव किं० देश लुटितात ते प्र०.

पेंढी (स्त्री. ना) तृण, कडबा इ० कांच्या अनेक व्यक्ति एकत्र बांधून जो आकारविशेष होतो ती.

पेढी (स. पीठ) (स्त्री. ना.) सराफ, हुंडीवाला यांचें जें दुकान ती.
पेणा,पेणें (पु. न. ना.) मुक्कामाची जागा किं० निजवर मी मार्गस्थाची स्थिति तो तें.
पेंधा (वि०) (ग्रं०) पांगळा.
पेर (सं. पर्व.) (न. ना.) बोट, ऊंस, वेळू इ० कांचें जें कांडें तें.
पेरणी (स्त्री. ना.) भूमीत दाणा इ० वी पेरण्याचा व्यापार ती.
पेरणें (धा. ना.) भूमीवर उगवायासाठीं बी टाकणें. २ आपणांत असलेल्या विद्यादि गुण प्रसन्न व्हायासाठीं शिष्यादिकांस शिकविणें. ३ व्याजाच्या बोलीनें धनादिक अनेकांस देऊन ठेवणें.
पेरा (पु. ना.) पेरणी.
पेलणें (धा. ना.) मुद्गल, डेंजीम इ० शरीर दृढ व्हावयासाठीं हातीं धरून फिरविणें. २ ओझें इ० इकडे तिकडे न होऊं देतां किं० न पडूं देतां संभाळून धरणें. ३ (ग्रं०) पोहणें. ४ लोटणें. ५ भरणें.
पेलिणें (धा. ना.) (ग्रं०) रोसणें.
पेलोवेली (स्त्री. ना.) (ग्रं०) वृद्धि.
पेव (न. ना.) जमिनींत धान्यादि ठेवायाकरितां जी जागा करितात तें.
पेशजीं (फा० अव्य०) वर्तमानकाळाचे पूर्वी.
पेशा (फा० पु. ना.) कारकूनपणा, शागिर्दपणा इ०रूप जें नातें तो.
पेषकबज, बाज (फा० न. ना.) एक कटारीसारिखें शस्त्र आहे.
पेषकळी (स्त्री. ना.) अंगरख्यास ज्या लहान लहान कळ्या असतात त्या प्रत्येकीं.
पेस्तर (फा० वि०) पुढील काळचें.
पेह (पु. ना.) (ग्रं०) पोटफुगीचा रोग तो.
पेहराव, वा (पु. ना.) जाति, देश इ० भेदेंकरून मनुष्यांचा पोषाखकार धारण करण्याचा भिन्नभिन्न जो प्रकार तो. २ कित्येक पोषाकासही म्हणतात. ३ आंगरखा.
पेळू (स्त्री. ना.) सूत काढायाकरितां कापसास पीळ घालून जो वातीसारिखा आकारविशेष होतो तो.
पै, पैं (अव्य०) (ग्रं०) वाक्यालंकारार्थक. २ निश्चयार्थक.
पैक (स्त्री. ना.) (ग्रं०) समुदाय.
पैका (पु. ना.) रुपये, मोहरा इ० व्यावहारिक नाण्याचा समुदाय तो. २ रुपयाचा चतुर्थांश तो.
पैज (स्त्री. ना.) कोणेकाशीं कोहीएक कार्याविषयीं हें या या प्रकारें निश्चय होईल, किं० मी करीन अन्यथा झाल्यास मी अमुक द्रव्यादि देईन इ० जी कोणीएक प्रतिज्ञा करितो ती.
पैठणें (धा. ना.)(ग्रं०) बसणें.
पैल (वि०) (ग्रं०) पलीकडचा. २ (अव्य०) पलीकडे.
पैलपार (अव्य०) (ग्रं०) पैलाड.
पैलाड (अव्य०) (ग्रं०) पलीकडे.
पैलू (फा० पु. ना.) हिरा, माणीक इ०कांस कोन पाडिले असतां दोहों

कोनाच्या मध्ये सपाट प्रदेश पडतात ते प्रत्येकीं.

पैवस्ती (फा० स्त्री. ना.) कोणेक स्थलापासून कागद आला असतां कालांतरीं हा अमुक दिवशीं आला हें समजावें ह्मणून तो समय त्या कागदावर मांडून ठेवितात ती. २ कांहींएक दिवस कोणेक मनुष्याची कोणेक गांवांत जी वसति ती इ०.

पैशुन्य (सं० न. ना.) अप्रसिद्ध व्हावयाजोगा कोणेकाचा दुराचरणादिरूप दोष असतो तो प्रसिद्ध करण्याचा व्यापार तें.

पैस (वि०) प्रवास. २ (अव्य०) दाटी, अडचण न होइ असें दूर होणें, करणें, बसणें, अक्षरादि लिहिणें इ०कांचें वि० ३ (ग्रं०) विस्तार. ४ विचार.

पैसणें (धा. ना.) (ग्रं०) नासणें.

पैसा (पु. ना.) एक तांब्याचें नाणें आहे. २ पैकापर्यायी.

पैसार, सारू (पु. ना.) (ग्रं०) अवकाश. २ विस्तार.

पैसावणें (धा. ना.) दाटीनें स्थित जे मनुष्यादिक त्यांस पैस होत असें करणें. २ (ग्रं०) विस्तारणें.

पाई (स्त्री. ना.) मोठ्या नदीस जे लहान लहान ओहळ मिळाले असतात त्यांचीत नदीचें पाणी वाढलें असतां जेथपर्यंत तुंबून जातें तितका त्या ओहळ्याचा प्रदेश तो. २ धर्मोई. ३ नारळाची पोगी.

पोंक (न. ना.) पोंग.

पोकळ (वि०) भरींव नव्हे तो. २ सईल. ३ ज्यामध्यें असावा तो अर्थांश, तेजोंश किं० लभ्यांश नाहीं असा जो उद्योग, भाषण इ० तो.

पोक्त, पोक्ता (फा० वि०) प्रौढ.

पोखर, पोंखर (वि०) आंतील अंश पोखरून काढिल्यामुळें पोकळ झाला जो काष्ठ, धान्य इ० पदार्थ तो. २ (पु.) पोखरून काढिलेला जो काष्ठादिकांतील चूर्णप्राय अंश तो.

पोखरण, पोखरणी (स्त्री. ना.) पुष्करणी. २ (ग्रं०) विहीर, तळें इ० ती.

पोखरणें (धा. ना.) काष्ठ, धान्य इ० पदार्थ आंतील अंश कोरून काढून पोकळ करणें.

पोंग (न. ना.) मनुष्याची पाठ, भिंत, भांडें इ०कांस वांकून येथें वकता तें.

पोगी (स्त्री. ना.) नारळ, सुरमाड इ०कांचें कणीस बाहेर पडतें तें.

पोंच (स्त्री. ना.) पावती. २ (पु.) अमुक केलें असतां अमुक होईल इ० दूरचा तर्क करण्याविषयीं जें बुद्धीचें सामर्थ्य तें.

पोचट, पोंचट (वि०) आंत पोकळ असल्यामुळें ज्याचे अंगीं ताठपणा नाहीं; हात इ०कानें ओंवळला असतां चिबतो असा जो धान्य, तृण इ० पदार्थ तो. २ पोंच्यानें युक्त जें पात्रादिक तें.

पोंचा, पोचा (पु. ना.) धातुमय पात्रास, अलंकारास कांहीं आघातादि झाल्यामुळें पडते जी खळी ती.

पोट (न. ना.) ज्यामध्यें अन्नोदक इ० किं० गर्भ राहातो असा जो शरी-

त्याचा भाग तें. २ पदार्थमात्राच्या आंतील गर्भांश किं० पोकळी तें. ३ क्षुधाशांत्यर्थ जें खर्चाचें प्रकरण त्यास ह्मणतात पोट जाणें म्ह० दुसऱ्याचें द्रव्यादि हरण करून आपलें कार्य करून घेणें किं० करूनये तें करून पोट भरणें किं० निंदनें जेवणासच म्हणत. पोटांत शिरणें म्ह० कोणिकाचा चित्ताभिप्राय ओळखाया इ०कासाठीं फेळ आल्यावर त्याचा विश्वास होय असें आजेरादिद्वारा करणें पोटाशीं धरणें म्ह० कोणिकास ममतेनें आपल्यासा मानणें अपराधादि पोटांत घालणें म्ह० क्षमा करणें. इ० अनेक अर्थ होतात.

पोटगी (स्त्री. ना.) निर्वाहासाठीं घेतलेलें द्रव्यादिक तें. २ निर्वाहा-चें साधन जें वतन, वृत्ति इ० कांहीं लोकांचें असतें त्यास ह्मणतात.

पोटफोड (स्त्री ना.) कांहींएक गु-प्त बहार निर्माण मनांत ती प्रसिद्ध करणें. २ मनांत ठेवितां येत नाहीं असा हलका जो गोष्ट सांगणारा तो.

पोटबाबू (पु. ना.) पोटाचे मिष्टान्न मिळावें ह्मणजे कार्यांना मानून कांहीं उद्योगांत राहणें बाळगीत नाहीं असा जो मनुष्य तो.

पोटभरू (पु. ना.) पोटभरू २ पोट भरावें ह्या उद्देशानें जो प्रवासास गेला तो. ३ ज्यामध्यें रूच्यादि गुण असो नसो परंतु अन्न भक्ष्याचा बहुत असतात ह्याच्या भक्षणीं पोट-भरतें असा जो फलादि पदार्थ तो.

पोटमारा (पु. ना.) पोटाची जी आ-बाळ तो.

पोटरी, पोठरी (स्त्री. ना.) पायाचे नडगीचे मागला जो प्रदेश ती. २ धान्य, तृण यांचे बाहेर पडावयाच्या पूर्वीस आलेलें कणीस, कणसी, तुरा इ० ती.

पोटा (पु. ना.) गवतांत एक जाति आहे. २ (स्त्री. ना.) ज्या स्त्रीस दाढी, मिशा इ० पुरुषाचें चिन्ह आहे ती.

पोटाग (स्त्री. ना.) कांहींएक कार्य करण्याविषयीं कोणिकास मनापासून जो अगत्यवाद ती.

पोटाळणें (सा. ना.) गोमहिष्यादि स्त्रीनें आंतील गर्भ वाढू लागल्यामुळें पोटानें वृद्धीनें विशिष्ट होणें. २ मनुष्य, वृक्ष इ०कास पोटाशीं कवळून धरणें.

पोटिस्थ (न. ना.) निर्वाहास साधन जें वृत्त्यादिक तें. २ गुप्त लाभ.

पोत (फा० पु. ना.) एकावर एक चिरगुटें गुंडाळून जो मशालीसारिखा पदार्थ भुयार करितां घेतो तो. २ दिवटीचें जो मशाल तो. ३ (स्त्री. पु.) कांचेचे किं० सुवर्णाचे आणि मौक्तिक मण्याचा समुदाय तो ती. ४ पोत. ५ (स. पु. ना.) नौका. ६ (प्र०) पुत्र.

पोंत (न. ना.) कांहींएक शरीरांतील रोग निघून जावा ह्मणून हात, पाय इ०कास भाजून किं० बिबा इ० लावून जो व्रण करून घेतात तें.

पोतडी (स्त्री. ना.) मोती, हिरा यांची जी पुरचुंडी किं० पिशवी ती. २ सोनार, सराफ इ०कांचा जो त्या त्या व्यवहाराच्या उपयोगी सामग्री ठेवायाचा बटवा असतो ती. [पोतडी.

पोतडें (न. ना.) सोनार इ०कांची

पोतदार (फा० पु. ना.) सरकारांत आलेले रुपये इ० नाणें पारखून घ्यावयाचा अधिकारी तो.

पोतास, सू (पु. ना.)(ग्रं०) कापूर.

पोतें (फा० न. ना.) थैला. २ सरकारी पैका ठेवण्याचें जें स्थान तें.

पोतेरें (न. ना.) गृहादिकांतील भूमि, भिंत इ० शेणमातीनें सारवायाकरितां जो वस्त्रादिकांचा बोळा घेतात तें. २ तेणेंकरून जें सारवण तें.

पोथी (स्त्री. ना.) पुस्तक.

पोपट (पु. ना.) कीर.

पोपडा (पु. ना.) सारवलेली जमीन भाकरी, शरीर इ०कांवरील त्वचेसारखा किं० त्वचारूप अंश निघतो तो.

पोपणें (भा. ना.) (ग्रं०) विकणें.

पोफळ (सं. पूगफल) (न. ना.) सुपारीचें झाड तो. २ तिचें जें फळ तें. ३ (ग्रं०) प्रतिज्ञा, पैज.

पोय (स्त्री. ना.) पोगी. २ पोई.

पोर (न. ना.) मुलगें. २ तारुण्यावयास आलेला नाहीं असा अल्पवयस्क जो मनुष्य, पशु इ० प्राणी तें.

पोरका (वि०) भव्य, गंभीर, प्रौढ इ० दिसायाजोगा नव्हे असें भाषण, वस्त्र, अलंकार इ० तो. २ ज्यास कोणी आईबाप इ० नाहींत त्यास म्हणतात. ३ केवळ मातृहीनासही म्हणतात.

पोरगा (पु. ना.) पोर. २ खिजमतगारीवर जो पोरगा ठेवितात त्यास म्हणतात. ३ ज्या पुरुषास नाचायाकरितां स्त्रीचा वेष देतात त्यास म्हणतात.

पोरटा (वि०) पोरका.

पोरवडा (पु. ना.) गृह, ग्राम इ०कांमध्यें किं० राज्यादि कारभारामध्यें कोणी प्रौढ मनुष्य नाहींसा झाल्यामुळें होतें जें पोरांचें प्राधान्य तो. २ अनेक पोरेंपोरीं यांचा आई, बाप यांच्या मागें खटला तो.

पोऱ्या, पोर्या (पु. ना.) पोरगाद्वितीयतृतीयार्थी. २ पोरकिडा.

पोंवळ, पोंवळी (स्त्री. ना.) देवालयादिकांच्या भोंवताली जी भिंत असते ती.

पोंवाडा (पु. ना.) पंवाडा.

पोशाक, ख, ग (फा० पु. ना.) शोभार्थ जो अंगावर घ्यावयाची शेला पागोटें इ० वस्त्रें तो.

पोशाकी, खी, गी (वि०) पोशाकानें मात्र उपयोगी तादृश टिकाऊ नव्हे असें जें पागोटें इ० तो. २ पाहण्यामध्यें सुरेख, डौलदार दिसून श्रमामध्यें तादृश सामर्थ्यादि नाहीं असें मनुष्य, भांडें, वस्त्र इ० तो.

पोशिंदा (सं. पोषण) (पु. ना.) जो गुणी लोक, शिपाई, घोडे इ०कांचें प्रीतिपूर्वक इतमामाप्रमाणें पालन करणारा तो.

पोषण (स. न. ना.) भक्षणादि पदार्थ ज्याचे जीवनास जितका पाहिजे तितका देऊन कोणेकाचें जें रक्षण तें.
पोषाक (पु. ना.) पोशाक.
पोष्णा (वि०) दत्तक. २ आपल्यास पोसायाचें सामर्थ्य नाहीं ह्मणून पोसायाकरितां दुसऱ्याचे स्वाधीन केलें जें मूल इ० तो.
पोष्य (स. वि०) ज्याचें ज्यानें अवश्य पोषण केलें पाहिजे तो पुत्र, स्त्री इ० त्याचा. २ आपले यजमान इ०-कास पत्र लिहायाचे असतां आपलें नांव ह्या विशेषणानें युक्त लिहितात.
पोष्यवर्ग (स. पु. ना.) पोष्य जे पुत्रादि त्यांचा जो समुदाय तो.
पोसणें (धा. ना.) पोषण करणें. २ पुष्ट होणें. ३ (ग्रा०) दत्तक, पोसलेलें.
पोस्त (न. ना.) शिमग्यांतील सणांत पोरें, लोकांपासून द्रव्य मिळवून जो भोजनसमारंभ करितात तें. २ त्यासाठीं लोकांपासून द्रव्य घेतात तें. ३ कामकरी इ०कांस कामाबद्दल द्रव्य द्यावयाचें तें देऊन श्रमपरिहारार्थ मद्यादि प्राशनार्थ अधिक द्रव्य देतात तें इ०.
पोहणें (धा. ना.) (स. प्लवन) हातपायांनीं पाणी तोडून नदी इ०कांच्या डोहांतरणें कि० तरून गमन करणें.
पोहोच, हच (पु. ना.) कुठ्यापासून माणकार इ०कांस पावलेलें जें द्रव्यादिक तो. २ पोंचद्विर्तायार्थी.
पोहोरा, पोहरा (पु. ना.) विहीर इ०कांतून पाणी काढायाचें एक पात्र आहे.
पोळ (पु. ना.) पितरादिकांच्या उद्देशानें त्रिशूलादि आकाराचे चिन्हानें युक्त करून जो बैल सोडिला असतो तो. २ वृथा पुष्ट मनुष्यास ह्मणतात.
पोळणें (धा. ना.) अग्नि, सूर्य, तिखट इ०कानें शरीर, जिव्हा वेदनायुक्त होणें. २ कांहीएक व्यवहारापासून कांहींकाल सरकार राहावयाजोग्या दुःखास अनुभविणें. ३ कांहीएक शोकानें व्यापित होणें.
पोळी (स. पोलिका) (स्त्री. ना.) भाकरीचे आकाराची कणीक, रवा इ०कांची लाटून, भाजून करितात ती. २ अळियानें कापूस भिजवून जी भाकरीचें आकाराची करितात ती. ३ मोहोळांत भाकरीच्या आकाराचें जें मधमाशांचें घर तो.
पौगंड, पौंगड (स. न. ना.) मनुष्यांचें पांच वर्षांपासून सातवर्षांपर्यंत जी वयोवस्था ते.
पौरज (वि०) (ग्रा०) पौर.
पौराणिक (स. पु. ना.) पुराणिक.
पौरुष (सं. न. ना.) पराक्रम. २ पुरुषसंबंधीं जें कर्म इ० तो.
पौष्टिक (सं. वि०) धातु पुष्टकरणार जें रसायन इ० तो. २ संतति, आयुष्य इ०कांची वृद्धि व्हावी ह्मणून जें होमादि कर्म करितात तें.
पौळी (स्त्री. ना.) (ग्रा०) मूढदशा तो. २ पोई. ३ अवार.

प्यादा (फा० पु. ना.) पायानें चालणारा जो शिपाई तो. २ मोहोर्यावांचून बुदबळांतील बुदबळ तो.
प्यादेमात (फा० स्त्री. ना.) बुदबळांतील प्याद्यानें केली जी मात ती.
प्यार (स्त्री. ना.) प्रीति.
प्रकट (सं. वि०) गुप्तदशा सोडून सर्वांस विदित व्हावयाजोगा झाला तो.
प्रकंपन (सं पु. ना.) वायु.
प्रकर (सं. पु. ना.) समुदाय.
प्रकरण (सं. न. ना.) कांहींएक साध्य विषयानें किं० प्रकाराचे भेदानें भिन्न भिन्न व्यवहार ते प्रत्येकीं ज्याचे पोटीं एक विषयरूपानें परस्पर संगत असे व्यापार अनेक असतात तें. २ सांगायाजोग्या विषयांच्या भेदांनीं भिन्न भिन्न जे ग्रंथविभाग केले असतात ते प्र० तें. ३ ज्या व्यवहारास कर्त्ता करण इ० अनेक साहित्यें लागतात त्या साहित्यांसहित जो व्यवहार तें. ४ विद्या, कुल, जाति, गुण, मत इ० केकरून एकरूपत्वानें विवक्षित जे मनुष्यादि त्यांचा जो समुदाय तें.
प्रकर्ष (सं. पु. ना.) उत्कर्ष.
प्रकार (सं. पु. ना.) सर्व पदार्थांचें भिन्न भिन्न रूपानें ज्ञान होण्यास त्या त्या पदार्थांत भेदक जो धर्मविशेष असतो तो. २ प्रकारभेदानें भिन्न भिन्न जे पदार्थ ते प्रत्येकीं. [ज्ञान.
प्रकाश (सं. पु. ना.) उजेड. २ (ग्रं०)
प्रकाशणें (धा. ना.) सूर्यादिकांनीं प्रकाशद्वारा कांहीं पदार्थ दिसे असा करणें किं० सूर्यादितेजोरूप पदार्थानीं स्फुरद्रूप होणें. २ गुप्त जो विषय तो प्रसिद्धीस आणणें.
प्रकाशित (सं. वि०) प्रकाशला किं० प्रकाशिला तो.
प्रकृत (सं. वि०) प्रस्तुतकालीं वक्ता, कर्ता इ०कांस इष्ट जो विषय तो. २ (स्त्री. ना.) प्रकृति.
प्रकृति (सं. स्त्री. ना.) आदिमाया. २ ज्या कारणापासून जें कार्य उत्पन्न होतें त्या कार्याची ती.
प्रकोप (सं. पु. ना) वात, पित्त इ०कांचा जो क्षोभ तो.
प्रक्रिया (सं. स्त्री. ना) कांहींएक कार्याची या या प्रकारें करावें अशी जी कृति असते ती. [अग्नि इ० तो.
प्रखर (सं. वि०) अति तीव्र जो शस्त्र,
प्रख्यात (सं. वि०) प्रसिद्ध.
प्रगट (वि०) प्रकट.
प्रगल्भ (सं. वि०) प्रौढ जो मनुष्य किं० भाषण इ० तो.
प्रघात (सं. पु. ना.) परिपाठ.
प्रचंड (सं. वि०) क्रोध, पराक्रम, विद्या, बल इ० गुणांनीं भारी तो.
प्रचार (सं. पु. ना.) प्रघात.
प्रचीत (स्त्री. ना.) प्रतीति.
प्रचुर (सं. वि०) पुष्कळ.
प्रजा (सं. स्त्री. ना.) राजास करभार देऊन त्याचे राज्यांत ज्या राहतात ती त्याची. २ संतति.
प्रजापति (सं. पु. ना.) ब्रह्मदेव. २ दक्ष कर्दमादि ऋषि ते प्रत्येकीं. ३ शिश्न.

प्रणत (सं. वि०) नम्र. २ कोणेकानें आपणावर कृपा करावी ह्मणून नमस्कार इ०केंकरून स्पष्ट दिसेसा विनय धरिला आहे ज्याणें तो.

प्रणति (सं. स्त्री. ना.) नमून जो नमस्कार तो.

प्रणय (सं. पु. ना.) प्रीति.

प्रणव (सं. पु. ना.) अकार, उकार, मकार, ह्या तीन मात्रांनीं युक्त जो अक्षरविशेष तो; ज्यास ओंकार ह्मणतात.

प्रणाम (सं. पु. ना.) नमस्कार.

प्रणिपात (सं. पु. ना.) नमस्कार.

प्रणीत (सं. वि०) ज्याणें रचिला जो शास्त्रादि ग्रंथ तो तत्प्रणीत.

प्रत (स्त्री. ना.) काहींएक ग्रंथाचें पुस्तकरूप जें स्वरूप तें. २ ज्या लेखावरून लेखावर करितात कि० पाहून काहीं कर्मादि करितात तो पुस्तकादि लेख कि० त्यावरून लिहिलेलें पुस्तकादि तें. ३ चित्रादि पाहून त्यासारखें दुसरें चित्रादि करितात त्यास ह्मणतात. ४ मासला. ५ उत्तम, मध्यम, कनिष्ठ इ० पदार्थाचा आश्रयकरून काहीं पदार्थाचे केले जे अनेक विभाग ते प्रत्येकीं.

प्रतवार (अव्य०) समुदायाचे गोटचे अनेक प्रतीचे जे अवयव ते लक्षून.

प्रताप (सं. पु. ना.) पराक्रम. २ शत्रु, रोग इ०कांचे निर्दलनाविषयीं जो मनुष्य, औषध इ०कांच्याठायीं सामर्थ्यविशेष असतो तो.

प्रतारणा (सं. स्त्री. ना.) वास्तविकाला कपटानें आच्छादून कोणेकास ठकविण्याचा जो व्यापार तो.

प्रति (सं. स्त्री. ना.) प्रत. २ (अव्य०) प्रत्येकास. [नुभव.

प्रतिकर, करू (पु. ना.) (प्र०) अ-

प्रतिकार (सं. पु. ना.) अपकार. २ कोणी काहीं केलेले विघ्नादिकाचे दूरीकरण तो.

प्रतिकुंचक (वि०) (प्र०) प्रतिकूल.

प्रतिकूल, कूळ (सं. वि०) अनुकूलाचा विपरीत तो. २ (न. ना.) विवाहादि मगलकार्याचा निश्चय झाल्यावर कोणी सपिंड मरण पावला असता जें त्या कार्यास अशुभता तें.

प्रतिग्रह (सं. पु. ना.) दुसऱ्यानें दिलेल्या दानाचा जो अंगीकार तो.

प्रतिछाया (सं. स्त्री. ना.) पडसावली. २ प्रतिबिंब.

प्रतिती (स्त्री. ना.) (प्र०) प्रतीति.

प्रतिध्वनि (सं. पु. ना.) भेरी इ०काच्या ध्वनीपासून गुहा इ०कांच्याठायीं जो दुसरा ध्वनि उठतो तो.

प्रतिपत्ति (सं. स्त्री. ना.) (प्र०) प्रथग्चना. २ वेदाचें जें विधान तें.

प्रतिपक्षि (सं. पु. ना.) विरुद्ध उभय पक्षाश्रित जे ते परस्पर.

प्रतिपादणें (सं. प्रतिपादन) (धा. ना.) काहींएक अर्थसाक्षी, लेखादि प्रमाणानें खरा करून देणें. २ (प्र०) सांगणें, बोलणें.

प्रतिपादन (सं. न. ना.) कोणेक पक्षाचे दोष निरास करून जें स्थापन तें. २ दान करण्याचा व्यापार तें.

प्रतिपाल, पाळ (सं. पु. ना.) अन्नवस्त्रादिद्वारा जें संरक्षण तें.
प्रतिपालन (सं. न. ना.) प्रतिपाल.
प्रतिबंध (सं. पु. ना.) कांहींएक कार्य होण्याविषयीं किं० कोणेकास गमनादि व्यापारीं स्वच्छंदें वागण्याविषयीं शास्त्र, राजा इ० कृत आज्ञेनें असतो जो अवरोध तो.
प्रतिबंधक (सं. वि०) प्रतिबंध करणारा तो. २ (न. ना.) प्रतिबंध जेणेंकरून होतो तें. [आहे ज्यास तो.
प्रतिबद्ध (सं. वि०) प्रतिबंध झाला
प्रतिबिंब (सं. न. ना.) जलादिकांच्याठायीं कांहींएक पदार्थाचें जें स्वरूपांतर दिसतें तें. [प्रतिबिंब.
प्रतिभा–भास (स्त्री. पु. ना.) (ग्रं०)
प्रतिमा (सं. स्त्री. ना.) धातु, पाषाण इ०कांची केली जी देवादिकांची मूर्ति ती.
प्रतिवचन (सं. न. ना.) कोणी प्रश्नादिरूप केलेल्या भाषणावर उत्तरादिरूप जें भाषण तें.
प्रतिवादी (सं. पु. ना.) एका वादानें स्वमत सांगितल्यानंतर त्यावर उत्तरादि भाषण करितो जो वादी तो.
प्रतिशब्द (सं. पु. ना.) प्रतिध्वनि.
प्रतिष्ठा (सं. स्त्री. ना.) लोकांनीं श्रेष्ठत्वेंकरून मानायास कारणीभूत जें विद्यादि सद्गुणामुळें कोणेकाच्याठायीं महत्त्व असतें तें. २ कोणेक अधिकारावर मनुष्याचें किं० देवालयादिकांत नवीन देवमूर्तीचें जें स्थापन तें. ३ कोणेकस्थळीं कोणेकाची जी स्थिति ती. [तीयर्थी.
प्रतिष्ठापन (सं. न. ना.) प्रतिष्ठाद्वि-
प्रतिष्ठिणें (धा. ना.) (ग्रं०) स्थापन करणें २ सांगणें. ३ प्रवेश करून स्थित होणें.
प्रतिष्ठित (सं. वि०) प्रथमार्थक जी प्रतिष्ठा तिणेंकरून युक्त तो. २ अधिकार, देवालय इ०कांच्याठायीं स्थापित झाला जो मनुष्य, देव इ० तो.
प्रतिस्पर्धा (सं. स्त्री. ना.) कोणेकाबरोबर जी स्पर्धा ती.
प्रतिज्ञा (सं. स्त्री. ना.) अमुक गोष्ट अमुक रीतीनेंच घडेल किं० मी अमुकच करीन इ० रूप कोणेकानें केला निश्चय तो.
प्रतीक (सं. पु. ना.) व्याख्या करायाकरितां मूळ ग्रंथाचें जें पदादिक तें. २ वाद्याचें भाषणांतील खरा करून घ्यावा किं० खंडन करून घ्यावा इ०कांसाठीं घेतला जो दुसऱ्या वाद्यानें कांहीं अंश तें इ०.
प्रतीकार (सं. पु. ना.) आपणास उद्देशून कोणेकानें बरी किं० वाईट क्रिया केली ह्मणून आपण त्यास उद्देशून तशीच क्रिया करितो किं० ज्या क्रियेपासून जें फळ झालें त्याच्या निरासासाठीं जें क्रियांतर तो, निरास.
प्रतीचा (वि०) जो ज्याशीं गुणादिकेंकरून तुल्य तो त्याच्या.
प्रतीत (स्त्री. ना.) प्रतीति.
प्रतीति (सं. स्त्री. ना.) शब्दादिद्वारा विदित जे गुणादिक त्यांच्या सेवनादिकेंकरून तदनुरूप आला जो अ-

नुभव तो. २ शब्दादिक जें ज्ञापक त्यापासून अंतःकरणाच्याठायीं काहीं-एक आकारात्मक होणें जें ज्ञान तो.

प्रतीहार (सं. पु. ना.) राजादिकांचे द्वारांत जो द्वाररक्षक असतो तो.

प्रतोद (सं. पु. ना.) अश्वादिकांस मारायाचा जो चाबूक तो.

प्रत्यग्बोध (सं. पु. ना.) (ग्र०) प्रत्यगात्मा ब्रह्मच असा जो बोध तो.

प्रत्यगात्मा (सं. पु. ना.) (ग्र.) देहांत जें त्यापून आहे ब्रह्म तो. २ आत्म्याचें लक्ष्य तो. [२ अनुभव.

प्रत्यंतर (सं. न. ना.) अन्यप्रमाण.

प्रत्यय (सं. पु. ना.) अनुभव.

प्रत्यवाय (सं. पु. ना.) जें अवश्य करावें तें न केल्यामुळें किं० न करावें तें केल्यामुळें जो दोष लागतो तो. २ पदार्थ किं० क्रिया यांच्या सेवनानें किं० करण्यानें पाप लागायाजोगा जो दोष असतो तो.

प्रत्यवायजाणें (प्रा. ना.) (ग्र०) आलेला पाप दूर होणें. २ निश्चयास येणें.

प्रत्यहीं (अव्य०) प्रतिदिवशीं.

प्रत्यक्ष (सं. अव्य०) परोक्षाचा प्रतियोगी. २ साक्षात. ३ (न. ना.) चक्षुरादि इंद्रियानें रूपादि विषयांची जी गोचरता तें.

प्रत्यारंभ (पु. ना.) (ग्रं०) नित्यनेम.

प्रत्याहार (सं. पु. ना.) योगादिवलें-करून सर्व इंद्रियांचें विषयापासून जें परावर्तन तो. २ (ग्र०) नियमन.

प्रत्युत्तर (सं. न. ना.) प्रतिवचन.

प्रत्युपकार (सं. पु. ना.) दुसऱ्यानें आपणावर केलेला उपकार फिटावा म्हणून त्याजवर आपण करितात जो उपकार तो.

प्रत्यूष (सं. न. ना.) प्रातःकाळ.

प्रत्यूह (सं. पु. ना.) (ग्र०) विघ्न.

प्रत्येक (सं. अव्य०) समुदायांतर्गत ह्या व्यक्ति त्यांवर पृथक् पृथक् अन्वय होई असें. २ (वि०) पृथक् पृथक् समुदायांतर्गत व्यक्ति ते.

प्रथम (सं. वि०) पहिला. २ (अव्य०) पहिल्यानें.

प्रथमतः (सं. अव्य०) पहिल्यानें.

प्रथमदर्शनीं (अव्य०) काहीं कार्याच्या आरंभसमयीं. [सिद्धि.

प्रथा (सं. स्त्री. ना.) प्रघात. २ प्रसिद्धि.

प्रथुत (अव्य०) (ग्रं०) सत्वर.

प्रदर्शन (सं. न. ना.) काहींएक पदार्थादिकांचा दाखविण्याचा व्यापार तें.

प्रदक्षिणा (सं. स्त्री. ना.) देव, ब्राह्मण इ०कांस उजव्या हाताकडे करून त्यांचे भोंवतालें एकवेळ फिरण्याचा जो व्यापार तो.

प्रदीप्त (सं. वि०) प्रज्वलित.

प्रदेश (सं. पु. ना.) काहीं पदार्थांच्या किं० दिशेच्या संबंधानें परिच्छिन्न जो देश तो.

प्रधान (सं. पु. ना.) राज्यकारभार करणारे जे अमात्य, सचिव, मंत्री, इ० राजाचे हस्तक ते प्र०. (न.) प्रपंच उत्पन्न होण्यास मुख्यत्वेंकरून कारणभूत जें मायास्वरूप तें. ३(वि०) मुख्य.

प्रपंच (सं. पु. ना.) ईश्वरमायेपासून

जीवांनीं मरावें, उत्पन्न व्हावें, अनेक सुखदुःखादि भोगावीं इ० रूप जो व्यवहार उत्पन्न झाला तो. २ मनुष्यादिकांचा बायका, मुलें, घर, शेत इ० जो खटला तो. ३ कांहीं देणें, वाटणें, सांगणें इ० क्रियांच्याठायीं एकास एक, एकास एक द्यावें इ० भेद करण्याचा प्रकार तो. ४ प्रतारणा. ५ ग्रंथ, पुरुष इ०कांचा व्याख्या, संतति इ० रूपेंकरून झाला जो विस्तार तो.

प्रफुल्लित (स. वि०) चांगलें विकसित झालें जें पुष्प, मुख इ० तें. २ तद्विशिष्ट वृक्षादि तो.

प्रबंध (स. पु. ना.) गाण्यांतील एक चीज आहे. २ श्लोकादिकांची जी रचना ती. ३ (प्र०) भाषण.

प्रबंधहोड, होडा (स्त्री. पु. ना.) (प्र०) कवित्व करण्याची पैज

प्रबल, ळ (स. वि०) अतिशयित बलवान्.

प्रबुद्ध (स. वि०) प्रौढ. २ निद्रा जाऊन जागृति दशा किं० प्रपंचादि रूप अज्ञान जाऊन आत्मज्ञान पावला तो. ३ अतिशयित जो बुद्धिमान् तो

प्रबोध (स. पु. ना.) निद्रा, माया इ० संबंधी मोहाचें पटल अंतःकरणावर पडल्यामुळें प्रापंचिक किं० पारमार्थिक विषय यथार्थपणें न समजायाजोगा आला असतो जो नेणतेपणा तो जाऊन जागृत्यादिरूप येतें जो अगीं जाणतेपणा तो. [वायु.

प्रभंजन (स. पु. ना.) मोठा वेगवान्

प्रभव (स. पु. ना.) उत्पत्ति. २ (प्र०) सुख दुःख.

प्रभवी (स्त्री. ना.) (प्र०) प्रभव.

प्रभा (सं. स्त्री. ना.) कांति. २ सूर्यादि तेजाच्या उपाधीमुळें जी पदार्थाची छाया पडते ती.

प्रभात (स. न. ना.) सूर्योदयाच्या पूर्वीचा कांहीं प्रकाश झालेला जो समय तें.

प्रभाव (स. पु. ना) प्रताप. २ (प्र०) सामर्थ्य ३ तेज ४ प्रवेश.

प्रभु (स. पु. ना.) ईश्वर, राजा इ० जो धनी तो. २ जी गोष्ट करण्याविषयीं जो समर्थ तो तोविषयीं.

प्रभूति (स्त्री. ना) (प्र०) बाहुल्य, पुष्कळपणा. २ आकार

प्रभृति (स अ य०) कांहींएक काल, देश इ०कांचा अवयव आद्यरूप धरून. २ कांहींएक समुदायामध्यें कोणेक व्यक्तीस आद्यरूपानें गणून.

प्रमत्त (सं. वि०) अतिशयित जो मत्त तो.

प्रमदा (स स्त्री. ना) स्त्री

प्रमा (स. स्त्री. ना) यथार्थ ज्ञान तो. २ (प्र०) प्रमाण.

प्रमाण (स. न ना.) प्रमा उत्पन्न होण्यास कारणीभूत जें आप्तवाक्य, अनुमान इ० तें प्रत्येकीं. २ विवादविषयाचा निर्णय करणारें जें लेख, भोग, साक्ष इ० तें प्रत्येकीं. ३ तप्तलोहादि धारणरूप जें दिव्य तें. ४ कांहींएक गोष्ट होईलच किं० नाहींच होणार इ० रूप जो नि-

श्रय तें ५ काहीएक गोष्टीची जी इयत्ता तें. ६ परिमाण. ७ (वि०) खोटेपणा जीत नाहीं अशी जी गोष्ट ती. ८ (प्र०) प्रत्यंतर. ९ अनुकरणवृत्ति.

प्रमाणीक (स. वि०) सप्रमाण जो भाषणादि व्यवहार किं० तसा व्यवहार करणारा पुरुष तो. २ प्रथाशिवाय आपल्या पदरचें भाषण करणारा न हे तो.

प्रमाद (स. पु. ना.) अनवधानता किं० वेणेकरून जो पडतो दोषादि तो

प्रमिति (स. स्त्री ना.) प्रमा.

प्रमुख (स. वि०) ज्या समुदायामध्यें जो मुख्य तो.

प्रमुदित (स. वि०) हर्षित.

प्रमेय (स. न ना.) प्रमाणानें ज्याची प्रमिति करण्यास योग्य आहे तो अर्थ किं० प्रमाणानें साध्य जो अर्थ तें. २ भाषणादि व्यवहाराचा ज्या साध्य अर्थावर अभिप्राय असतो तो अर्थ तें. ३ (प्र०) विषय. ४ सारांश ५ ज्ञान.

प्रमोद (स. पु ना.) आनंद.

प्रयत्न (स. पु. ना.) काही एका फलावर लक्ष्य ठेवून त्याचे सिद्धीसाठी जसा साधेल तसा अनेक प्रकारचा अनेकवार जो उद्योग तो.

प्रयाग (स. पु. ना.) भागीरथी आणि यमुना यांचा संगम जेथें झाला आहे तें क्षेत्र तो. २ (प्र०) ऐक्यता.

प्रयाण (स. न. ना.) देशांतरादिकांकडे जें गमन तें.

प्रयास (स. पु. ना.) आयास.

प्रयोग (स. पु. ना.) वाक्यामध्ये किं० श्लोकादिकांमध्यें पदाची किं० वाक्याची अर्थानुसंधानपूर्वक योजना तो. २ व्याकरणांत कर्ता, कर्म इ० भेदानें वाक्यरचनेचे प्रकार होतात ते प्र०. ३ मंत्र इ०कांची जी त्याचे त्याचे निर्वाह कार्यावर योजना तो. ४ शास्त्रोक्त कर्मातील अनुष्ठानांश तो. ५ शास्त्रादि ग्रंथांत सांगितल्या क्रियेचा त्या त्या प्रमाणें जो व्यापार तो. ६ जारण मारणादि मंत्रांचा जो प्रयोग यास संकेतानें म्हणतात. ७ (प्र०) यत्न.

प्रयोजन (स. न. ना.) काहीएक क्रिया होण्यास जें निमित्त तें २ काहीं कर्तव्य जें कार्य त्याचे सिद्धीसाठीं त्यास साधनभूत पदार्थांची किं० कांहीं क्रियेची असते जी आवश्यकता तें ३ लग्न, मुंज, ब्राह्मणभोजन इ०रूप जें कर्म तें.

प्ररोह (स पु ना) बीजापासून उत्पन्न होतो जो अंकुर तो. २ (प्र०) उदय.

प्रलय, प्रळय (सं. पु. ना.) कल्पांतादिसमयीं जो सृष्टीचा उपसंहार तो. २ महामारी, दुष्काल इ०कारणांमुळें देश उजाड पडावे असा जो संहार होतो त्यास म्हणतात ३ कोणिक कर्त्यानें स्वनिष्ठ व्यापाराचीं दुसऱ्यास त्रास, दुःख व्हावयाजोगी केली जी पराकाष्ठा तिला म्हण०

प्रलाप (स. पु. ना.) शोक, मद, निद्रा इ०कांनीं जो विव्हल त्याचें जें

तसें भाषण तो. २ असंगत, असमंजस, अतिरिक्त अशा भाषणास ह्मणतात.

प्रवर्त्तणें (धा. ना.) कर्त्यानें करायाच्या उद्देशानें कांहींएक व्यापारीं लागणें किं० कांहींएक व्यापार चालू होणें.

प्रवर्त्तन (सं. न. ना.) कोणेक व्यापारीं कोणेकास किं० कोणेक व्यापार प्रवृत्त करण्याचा जो व्यापार तें.

प्रवसर (पु. ना.) (ग्रं०) मोह.

प्रवाद (सं. पु. ना.) कांहींएक गोष्टीचे मूळाची उपलब्धि किं० फलादिकांचा अनुभव नसून केवळ लोकांमध्यें भाषण मात्र चाललें असतें तो. २ (ग्रं०) भाषण.

प्रवास (सं. पु. ना.) स्वदेश सोडून परदेशीं जी द्रव्यादि संपादनार्थ स्थिति तो. २ (ग्रं०) परदेश.

प्रवाह (सं. पु. ना.) सतत चाललेले जे वायु, जळ, अग्नि इ०क त्यांची कोणी एकीकडे जी गति तो. २ तद्विशिष्ट जें जलादि तो. ३ चिरकाळ चाललेले जे संसारादि व्यवहार, काळ इ० त्यांची जी गति तो. ४ बुद्धि, ममता इ० कांचा जो त्या त्या विषयाकडे सतत ओघ तो इ०.

प्रविष्ट (सं. वि०) ज्यामध्यें ज्याचा प्रवेश झाला तो त्यामध्यें.

प्रवीण (सं. वि०) निपुण.

प्रवृत्त (सं. वि०) लोकव्यवहारविषयतेस आलें जें शास्त्र, धर्म, व्यवहार इ० तो. २ आरंभ होऊन चालू झालें जें कर्मादि तें. ३ कांहींएक कार्याच्याठायीं करावें, जाणावें इ० उद्देशानें त्या त्या व्यापारीं लागला जो कोणीएक तो.

प्रवृत्ति (सं. स्त्री. ना.) आत्मस्वरूपाचा विसर पडून प्रापंचिक व्यवहारोन्मुखतारूप जो जीवाचा वृत्तिविशेष तो. २ कोणेकाचा कार्यादिकांच्याठायीं किं० शास्त्रादिकांचा लोकव्यवहाराचेठायीं जो प्रवर्त्तपणा तो. ३ प्रघात. ४ (ग्रं०) प्रपंच. ५ कर्म.

प्रवृद्ध (सं. वि०) अतिशय वाढून मोठेपणा पावला जो अग्नि, ज्ञान, वैर इ० तो.

प्रवेश (सं. पु. ना.) मध्यवर्ति व्यवधानाचें वेगादिकानें उल्लंघन करून गतिद्वारा इष्ट स्थलाचें जें आक्रमण तो. २ बुद्धीचा शास्त्रादि विषयाच्याठायीं किं० कोणेक पुरुषादिकांचा राजकीय व्यवहारादिकांच्याठायीं जो गतीनें संबंध तो.

प्रशंसा (सं. स्त्री. ना.) कोणेकाचें उत्तमतेंकरून जें वर्णन तो.

प्रशस्त (सं. वि०) निर्दोष. २ अघळपघळ जें भाषण, स्थळ, वस्त्र इ० तो. ३ ज्याच्या संबंधानें अंतःकरणास कंटाळा, त्रास, भय इ० मूलक संकोच होत नाहीं तें कर्म किं० पदार्थ तो.

प्रश्न (सं. पु. ना.) पृच्छा. २ गांवास जावयाकरितां घरांतून जो निघाला त्यास पुढें होणारें शुभाशुभाचें सूचक जें चिन्ह होतें तो इ०.

प्रसंग (सं. पु. ना.) कांहीं दुर्निर्वह संकटाचा जो समय तो. २ परस्त्रीचा बोलणें, चालणें इ० व्यवहार.

निमित्त जो संबंध तो. ३ काहीं क्रियेच्या अनुरोधामुळें कोणेकास काहीं पदार्थाशीं गांठ पडणें, जेथें भोगादिकानें अवश्य निर्वाह करावा लागतो तो.

प्रसंगोपात्त (सं. अव्य०) प्रसंगाच्या अनुरोधानें काहीं गोष्ट निघणें, सुचणें इ०कांचें वि०.

प्रसन्न (सं. वि०) समाधानयुक्त किं० कोणेकावर अनुग्रहोन्मुख जें अंतःकरण किं० तद्विशिष्ट मनुष्यादि तो. २ त्या प्रसन्नतेच्या चिन्हानें युक्त जें मुख, नेत्र इ० तो. ३ ज्यामध्यें चांचल्य, पोंपो असा शब्द इ० नाहीं असें जें नदी इ०कांचें निर्मळ उदक किं० मळ, मेघाडंबर इ० रहित ज्या दिशा किं० आकाश; ज्याच्या दर्शनानें अंतःकरणास बरें वाटतें तो

प्रसर (सं. पु. ना.) विद्या, धर्म, रोग, शत्रु इ०कांचा विवक्षित देश, कालव्याप्त व्हावयाजोगा जो विस्तार तो. २ (ग्रं०) प्राप्ति.

प्रसरण (सं. न. ना.) पसरण्याचा व्यापार तें.

प्रसव (सं. पु. ना.) मातेच्या उदरापासून गर्भस्थ प्राण्याचें जें बाहेर निघणें तें.

प्रसवणें (धा. ना.) गरोदर स्त्रीनें गर्भस्थ प्राण्यानें बाहेर येई असें करणें. २ त्या अपत्यानें गर्भापासून बाहेर निघणें. ३ काहींएक कारणरूप पदार्थापासून काहीं कार्यरूप पदार्थ उत्पन्न होणें किं० त्या कारणानें कार्यास उत्पन्न करणें. ४ (ग्रं०) काहीं एकापासून काहींएक अभिव्यक्त होणें किं० त्यानें त्यास अभिव्यक्त करणें.

प्रसाद (सं. पु. ना.) प्रसन्नता. २ भक्तीनें, देव, गुरु इ०कांनी प्रसन्न होऊन दिला जो फल, पुष्प, अन्न इ० पदार्थ तो. ३ देव, गुरु इ०कांकडील भक्तीनें सेवन करावयाचें जें अन्न त्यास म्हणतात. ४ पुराण, कीर्तन इ०कांच्या समाप्तीस सर्व श्रोत्यांस जें फळ, मिठाई वांटितात त्यास म्हणतात. ५ देवास शुभाशुभ विचारावयाकरितां त्याचे अंगास जो कौल लावितात तो. ६ (ग्रं०) प्रासाद.

प्रसारण (सं. न. ना.) पसरून करण्याचा व्यापार तें.

प्रसिद्ध (सं. वि०) अनेकांस जो विदित तो. २ ज्या पदार्थास अस्तित्व आहे तो. ३ (अव्य०) उघडपणें.

प्रसिद्धि (सं. स्त्री. ना.) प्रसिद्धपणा. २ काहींएक गोष्टीचा उघडीक ती.

प्रसूत (सं. वि०) बाळंत.

प्रसृत (सं. वि०) प्रसर पावला तो.

प्रस्तावना (सं. स्त्री. ना.) नाटकाच्या प्रारंभीं सूत्रधार इ० सोंग येऊन कथेच्या संदर्भासाठीं जो ग्रंथ बोलतात ती. २ ग्रंथाच्या आरंभीं ग्रंथाचें कारण, तात्पर्य, इ० सूचक भाग लिहितात ती.

प्रस्तावणें (धा. ना.) (ग्रं०) सांगणें. २ पश्चात्ताप पावणें.

प्रस्तावा (पु. ना.) (ग्रं०) पश्चात्ताप.

प्रस्तुत (सं. अव्य०) विद्यमानकाळीं.

२ (वि०) ज्याचा प्रस्ताव निघाला आहे तो.

प्रस्थ (सं. न. ना.) विद्या, द्रव्य इ०-कांच्या विशेषामुळें सामान्य कोटींत परिगणनीय नव्हे पृथक्त्वेंकरून गणावा असा जो मनुष्यादि त्यास म्हणतात. २ कोणी थोर मनुष्य प्रवासास जाणार किं० लग्नादिक होणार इ० कांहीं मोठें कार्य उपस्थित झालें असतां तन्निमित्तक जें खटलें पडतें तें. ३ प्रस्थ माजविणें, वाढविणें म्ह० ढोंग असा अर्थ.

प्रस्थान (सं. न. ना.) राहिलेल्या स्थळापासून ग्रामांतरादि स्थळीं जाण्याकरितां निघण्याचा जो व्यापार तें. २ मुहूर्तावर प्रस्थान करून लागलीच गांव सोडून दूर जावयास अनुकूल नसतां जो शेजारीं पाजारीं स्थित करितात तें. ३ निघायाचा जो मुहूर्त त्याजवर निघायास अनुकूळ नसतां सुवर्ण, हळकुंड, तांदूळ इ० दुसऱ्याचे घरीं नेऊन ठेवितात तें; जें जातांना घेऊन इष्टस्थळीं जातात. ४ प्रस्थान करणें इ० म्ह० मरणें. ५ ईश्वरप्राप्तीचे जे योग, सांख्य, वेदांत इ० अनेक मार्ग आहेत ते प्रत्येकी.

प्रस्फुट (सं. वि०) बहुत जनांस समजली अशी जी गोष्ट इ० ती २ चांगलें विकसित जें पुष्पादिक तें

प्रहर (सं. पु. ना.) दिवसाचा किं० रात्रीचा जो चतुर्थांश तो.

प्रहार (सं. पु. ना.) शस्त्र, काष्ठ, हस्त इ०कानें मनुष्य, वृक्ष इ०कांवर जो आघात तो. २ कठोर भाषणादिकांचा जो कोणेकावर प्रक्षेप तो.

प्रक्षिप्त (सं. वि०) ज्याचा प्रक्षेप केला तो.

प्रक्षेप (सं. पु. ना.) कांहींएक अधिकरणावर कांहीं पदार्थ टाकण्याचा किं० कांहींएक अधिकरणांत कांहीं पदार्थ घालण्याचा व्यापार तो.

प्रज्ञा (सं. स्त्री. ना.) शास्त्रादि विषयांचें आकलन करण्याविषयीं जो अंतःकरणाच्याठायीं सामर्थ्यविशेष असतो तो. २ बुद्धि. ३ (ग्रं०) ज्ञान.

प्रज्ञाचक्षु (सं. वि०) जन्मांध. [शेकडे.

प्राक् (सं. अव्य०) पूर्वी. २ पूर्वदि-

प्राकार (सं. पु. ना.) किल्ला, गांव इ०कांभोंवताला तट, कुंपण इ०कांचा जो परिधि असतो तो.

प्राकृत (सं. वि०) संस्कृत नव्हे जो शब्द, भाषा इ० तो. २ ज्यास शास्त्रामध्यें ज्ञान नाहीं असा जो अज्ञ मनुष्य तो. ३ (ग्रं०) प्रकृतिसंबंधी जो पदार्थादि तो. ४ प्रकट.

प्राक्तन (सं. न. ना.) दैव. २ (वि०) पूर्वकाळचा तो. [पूर्व कर्म.

प्राचीन (सं. वि०) पुरातन. २ (ग्रं०)

प्रांजळ (सं. वि०) ज्यामध्यें कपट, संकोच, मालिन्य इ० नाहीं असें जें भाषण, अंतःकरण, स्थळ इ० तें.

प्राण (सं. पु. ना.) शरीराच्या निर्वाहास कारणीभूत जो आंत वायु आहे तो त्याचे स्थानभेदेंकरून पांच भेद मानिले आहेत त्यामध्यें हृदयदेशीं जो स्थित त्यास विशेषेंकरून संज्ञा.

जीव शब्दावरील सर्व बोलण्याचे स-प्रमाण येथेंही जाणावें.

प्राणतिया (स्त्री. ना.) (प्र०) परळ

प्राणधारण (स. न.ना.) शरीराच्याठायीं प्राण संभाळून धरण्याचा जो व्यापार ते २ जीवन

प्राणसंकट (स न ना ) प्राण जाण्याचे संभावनेचे जें मोठें संकट तें.

प्राणी (स पु ना ) सजीव जो पदार्थ तो. २ क्षत्रादिकांमध्यें जे शारीरिक जीव उत्पन्न होतात ते प्रत्येकी.

प्राणोत्क्रमण (स न ना ) प्राणाचें मरणकाळीं शरीरांतून गमन तें.

प्रांत (स पु ना ) कोणिक मोठा गांव मुख्यत्वेंकरून धरून त्याचे आसपासचे गांवांचा समुदाय त्याखालीं मानून जे देशविभाग कल्पिले आहेत ते प्रत्येका. २ भाषादिभेदानें जे भिन्न भिन्न देश ते प्रत्येकी ३ कोणिक पदार्थाचा जो शेवट तो. ४ प्रदेश.

प्रातः (स अव्य०) प्रात काळीं

प्रातःकाल, काळ (स. पु ना.) पाहांटेच्या दोन घटिकांपासून चार साहा घटिका दिवसपर्यंत जो काल तो.

प्रादुर्भाव (स पु. ना ) कांहीं अधिकरणाच्याठायीं कांहीं पदार्थांची समजून न यावयाजोगी उत्पत्ति तो.

प्रादेशमात्र (स वि०) वीतभर.

प्राधान्य (स. न ना ) प्रधानपणा, मुख्यत्व.

प्रापंचिक (स वि० ) प्रपंचसंबंधी जो व्यवहार, ज्ञान इ० तो.

प्राप्त (स वि०) सगतीनें किं० परगतीनें किं० कालादि गतीनें संबद्ध व्हावया जोगा जो उपस्थित झाला ते उभयतां परस्परें: २ जें गतीनां गत्यंतर नाहीं अशा प्रकारें उपस्थित झालें कांहींएक कर्म या अर्थी.

प्राप्ति (स. स्त्री ना ) शेत, साकारी इ० कोठासून मिळते जे द्रव्यादिक किं० त्याचा लाभ तो २ सुख दुःखादिकांची जी लब्धि ती ३ अधिष्ठान

प्राबल्य (स. न ना ) प्रबलपणा.

प्रामाणिक (स. वि०) सप्रमाण जो भाषणादि व्यवहार किं० तसा व्यवहार करणारा पुरुष तो

प्रामाण्य (स न. ना.) सप्रमाणता

प्रायः (स अव्य०) बहुतकरून.

प्रायश्चित्त (स न. ना ) केलेल्या पापाचा किं० कर्मामध्यें वैगुण्य झालें असतां तज्जनित प्रत्यवायाचा परिहार व्हावा म्हणून शास्त्रांत उपवासादि कर्में सांगितलीं आहेत ते. २ कांहीं लहान मोठी चूक आली असतां तदनुसार राजा, ईश्वर, भर्ता यांपासून दंड होतो त्यास म्हणतात.

प्रारब्ध ( स न. ना. ) सांप्रत प्राप्त झाल्या देहाचें आरंभक कर्म जें या देहानें भोगिल्यावांचून चुकत नाहीं तें. २ (वि०) आरंभिलें जें कर्मादिक ते.

प्रारंभ (स पु ना.) आरंभ.

प्रार्थना (स. स्त्री ना.) ईश्वर, राजा इ० कोणी आपल्या इष्ट कार्यास अ-

नुकूल व्हावें ह्मणून किं० आपणास कांहीं द्यावें ह्मणून जी विनयपूर्वक याचना करितात ती.

**प्रावरण** (सं. न. ना.) शरीरावर जें वस्त्रादि पांघरूण असतें तें.[पान तें.

**प्राशन** (सं. न. ना.) जलादिकाचें जें

**प्रास** (सं. पु. ना.) कवितेंत एका मागें एक, दोन, तीन, चार अक्षरांचे शब्द आले ते पुनः पुनः अर्थ भेद असून यावे असा जो शब्दालंकार असतो तो. २ भाला. [प्राप्त तो.

**प्रासंगिक** ( सं. वि० ) प्रसंगानें जो

**प्रासाद** (सं. पु. ना.) देव, राजा इ० कांचें जें मंदिर तें.

**प्रासादिक** (सं. वि०) देव, गुरु इ० कांपासून प्रसादरूपेंकरून मिळाला जो पदार्थ तो. २ ईश्वरकृपाविशिष्ट मनुष्यानें केला जो ग्रंथादिक तो ज्यावर सर्वांची भक्ति असल्ये, भक्तीनें श्रवण केलें असतां तदनुरूप ज्ञानादि होतें तो.

**प्राज्ञ** (सं. वि०) बुद्धिमान असून शास्त्रादि विषय जो जाणतो तो.

**प्रिय** (सं. वि०) जो ज्यास आवडता मनुष्य, पदार्थ, गोष्ट इ० तो. २नायिकेस जो नायक तो. ३ (ग्रं०) (पु.) आनंद.

**प्रियकर** (सं. वि०) प्रिय.

**प्रियू** (पु. ना.) (ग्रं०) पति.

**प्रीत** (स्त्री. ना.) प्रीति. २ ( वि० ) प्रीति पावला जो तो.

**प्रीति** (सं. स्त्री. ना.) आवड. २ कोणेकाचें परस्पर जें सौरस्य ती.

**प्रीतिपात्र** ( सं. न. ना. ) कोणेकाचें अत्यंत प्रीतीचें जें स्थिय इ० मनुष्य त्यास ह्मणतात.

**प्रीतिविवाह** (सं. पु. ना.) वधुवरांचें परस्पर घटित नपाहतां जो विवाह करितात तो. [शानें.

**प्रीत्यर्थ** (सं. अव्य०) कोणेकाचे उद्दे-

**प्रेत** (सं. न. ना. ) जीव गेल्यानंतर जो देह अवशेष असतो तें.

**प्रेम** (सं. न. ना ) परस्परांचें अत्यंत जें सौरस्य तें. २ प्रिय पदार्थाचा संबंध झाला असतां त्याच्या प्रीतीनें अंतःकरण केवळ तदेकाग्र होतें असा जो अवस्थाविशेष होतो तें. ३ कोणेक विषयाच्या ठायीं किं० पुत्रादि पदार्थाच्या ठायीं जी अतिशयित प्रीति असते तें.

**प्रेमल, ळ** (सं. वि०) ईश्वरभक्ति, कथा इ०कांच्या ठायीं अतिशयित ज्यास प्रेम असतें तो.

**प्रेमा** (सं. पु. ना.) प्रेम.

**प्रेरण** (सं. न. ना.) कोणेकास गमनादि कार्याच्या ठायीं प्रवृत्त करण्याचा व्यापार तें.

**प्रेरणा** (सं. स्त्री. ना.) प्रेरण.

**प्रेरित** (सं. वि०) प्रेरणा केली आहे ज्यास तो. [व्यापार तें.

**प्रेषण** (सं. न. ना.) पाठविण्याचा

**प्रेक्षण** (सं. न. ना.) अवलोकन.

**प्रोत्सहन** (सं. न. ना.) युद्धादिकांच्या ठायीं कोणेकास स्तुति इ० द्वारा उत्साह आणण्याचा व्यापार तें.

**प्रोत्साह** (सं. पु. ना.) युद्ध, दान

इ०कांच्या ठायीं कोणेकास उत्कृष्ट झाला जो उत्साह तो.

प्रोक्षण (स. न. ना.) पदार्थांचा अपवित्रपणा जाऊन शुद्ध व्हावा म्हणून जल, गोमूत्र इ०कानें सेचन तें.

प्रौढ (स. वि०) वयानें कि० बुद्धीनें जो प्रगल्भ तो. २ कोंवळेपणा ज्यामध्यें नाहीं सभ्यांस मान्य असा शब्द, भाषण, व्यवहार इ० तो.

प्रौढी (स. स्त्री. ना.) प्रौढपणा ती.

प्लवंग (सं. पु. ना.) वानर.

प्लवग (स. पु. ना.) वानर.

प्लवगम (पु. ना.) प्लवग.

प्लुत (स पु. ना ) तीन मात्रा ज्यांत उच्चार ज्याचा असा जो आकारादि स्वर तो.

---

—फ—

फ— हा वर्ण बाविसावें व्यंजन आहे.

फकडी (वि०) ज्यास पाकल्या एकेरी असतात असें जें जासन, तगर इ० फूल तो आणि तशीं पुष्पें ज्यावर येतात असें जें जासन इ० फुलझाड तें.

फकिका (स्त्री. ना.) कांहींएक अर्थाचे प्रतिपादनार्थ छद, अलकारादिरहित ग्रंथकारानें रचित जी वाक्यें तो प्र०.

फकीर (अर० पु. ना.) जातीचा यवन असून प्रपंच सोडून विरक्त होत्साता ईश्वरभजनीं लागलेला जो तो. २ डल्याचे दिवसांत त्या देवतेच्या प्रीत्यर्थ अंगावर नाडे घालते, उपास करतात, भिक्षा मागती इ० रूप वत ज्यानें घेतलें आहे तो त्या दिवसांत. ३ ज्यास मागें पुढें कोणी नाहीं असा जो संसारांत एकटा त्यास म्हणतात.

फकीरफुकरा (अर० पु. ना.) फकीर, गोसावी इ० जो कोणी तो.

फक्कड (स. फक्क) (वि०) लोकांस न गणितां, कोणाची अपेक्षा न धरितां आपल्या उत्साहानें स्वतंत्रपणें वर्तणारा असा जो तो.

फक्का (पु. ना.) पोहे, लाहीपीठ, औषधादि चूर्ण इ० कोरड्या पदार्थांचा हातानें तोंडांत टाकितात जो ग्रास तो. [हात जो फक्का ती.

फक्की (स्त्री. ना.) चूर्णादिकांचा ला-

फक्त (अर० अव्य०) कोणेक अर्थाशीं सहवर्त्तणारे जे इतर कोणी अर्थ त्यांच्या निरासद्वारा त्या इष्ट अर्थाचें वर्गितत्व जें केवलत्व त्याचें वाचक हें अव्यय.

फजिता (पु. ना.) फजिती. २ ज्यामध्यें पाणी, पीठ इ० अधिक झाल्यामुळें कि० स्वादिष्टपणास कारण जें मसाला, फोडणी इ० तें नसल्यामुळें वाईट लागायासारिखा झालेला जो वरण, सांबार, आंवरस इ० पदार्थ त्यास म्हणतात.

फजिती (अर० स्त्री. ना.) लोकांत उपहास व्हावयाजोगी जी कोणेकास अप्रतिष्ठा प्राप्त होते ती. २ आपले शक्तीपेक्षा अधिक जड कांहीं संकटादि प्राप्त झाल्यामुळें कसें करूं काय करूं असें वाटायाजोगी होते जी अवस्था ती.

फजीती (स्त्री. ना.) फजिती..

फट (स्त्री. ना.) दोन पदार्थ परस्परें केवळ मिळून घट्ट संयोग न पावल्यामुळें मध्यें राहिला असतो जो यत्किंचित् अवकाश तो. २ कोणिकास फट ह्मणणें इ० धिक्कारार्थ यत्किंचित् दुःशब्द बोलणें. ३ रांड, लंडी, फजीती इ० शब्दांचे मागें याचा योग झाला असतां अतिशयत्व दाखवितो. उ० हें काम जो न करील तो फटलंडी. त्याची फटफजीती उडाली इ०.

फटकणें (धा. ना.) फटफट शब्द होई असें सूप इ०कानें धान्यादि झपाट्यानें पाखडणें. २ कोणिकानें अभिप्रिलेलें स्थळ, समुदाय, अनेकांनीं आरंभिलेला व्यवहार इ० झटकन सोडून एकीकडे होणें. ४ (न.) अग्नि इ० पेटवावयास साधनभूत जो विझण्यासारिखा पदार्थ केला असतो तो.

फटकळ (वि०) मागें पुढें न पाहतां फटकन एकाद्यास शिवी द्यावी कि० बीभत्स भाषण करावें अशा स्वभावाचा जो तो आणि त्याचें तें भाषण न तोंड तो. २ ज्यामध्यें अनेक संकटें असा विषमकाळ तो.

फटका (पु. ना.) काठी, चाबूक, शाल, हात, तोबा इ०वांनी फट शब्द होई असा ताडनादिकासाठीं करितात जो प्रहार तो. २ रस्ता बंद करण्याची लहान वेस.

फटकाळ (पु. ना.) विषमकाळ २ (वि०) (पं०) वाईट, नाकारा. ३ दुर्भाषण करणारा. ४ चोरटा.

फटकून (अव्य०) कोणिकापासून एकीकडे होऊन वेगळेपणें राहाणें, असणें इ० कांचें वि०.

फटफट (अव्य०) अनेकवार एकामागून एक, एकामागून एक अशा प्रकारें सारखे कोणिकास अपशब्द बोलणें, काठी इ० कानें मारणें इ० कांचें वि०.

फटफटीत (वि०) रक्तरहित जें शरीर त्याचा अवयव, वस्त्र, रौप्य, चांदणें, प्रातःकाळचा उजेड इ०कांचें त्यांच्या पांढरेपणाचा अतिशय द्योत्य असतां विशेषण होतें.

फटवण (स्त्री. ना.) कोणिकास ठकविण्याकरितां लबाडीची करितात रचना ती. २ मुलांस फटवायाकरितां त्यांचे हातावर जें कांहीं खाऊ इ० देतात तो.

फटाका (पु. ना.) पोटीं दारू घालून कागदाची घडी कि० गुंडाळी असते; जिला आग लाविली असतां आवाज होतो.

फटिंग (पु. ना.) रांड, पोर इ० खटलें ज्याच्या पाठीशीं नाहीं असा जो प्रपंचात एकाकी तो.

फड (पु. ना.) लिहिणें, नाचणें, पचाईत करणें इ० व्यवहारांची आपआपल्या मांडणीनें सहित अशी प्रवृत्तपणें जी स्थिति ती. २ फडमारणें, संभाळणें इ० स्थळीं प्रसंगीं जें उचित त्याच्या योगानें तो प्रसंग सुशोभितपणें पार पाडणें.

फडकणें (धा. ना.) ध्वजादिकांस सबद्ध होऊन लोंबत राहिलें जें वस्त्र-

दिक त्याणें फड फड शब्द करीत हालणें.

फडनवीस (पु. ना.) सरकारी कारभाराचें जें लिहिणें त्यावर जो मुख्य अधिकारी असतो तो.

फडफडणें (धा. ना.) वस्त्र, कागद इ० कांनीं फड फड वाजणें.

फडशा (पु. ना.) देणें, घेणें इ० व्यापाराचीं देणें, घेणें इ०कॅकरून किं० कोणेक पदार्थाची खरचणें भगणें इ०कॅकरून जी निःशेषता तो.

फडा (पु. ना.) दशाकचिन्हविशिष्ट जो सर्प त्याचा विस्तीर्ण झालेला कठापासून वरचा विभाग तो. २ (पु. स्त्री. ना.) निवडुंगास सर्पाच्या फडेसारखे जे अवयव असतात ते प्र०. ३ आलें वेखंड इ०कांचा अनेक अवयव फुटलेला असा कंद तो तो. ४ शिंदी इ० कांचे झावळीचा केरसुणी इ० करायाचे उपयोगी अनेक पात्यांनीं युक्त जो तुकडा तो.

फडी (स्त्री. ना.) फडाप्रथमार्थी.

फणका (पु. ना.) मोहरी, मिरची इ० पदार्थ शरीरास लागल्यामुळें अतिशयित होयि जी आग किं० ज्वरादियोगानें त्यासारिखा होतो संताप तो. २ कोणी आपलें मर्म काढल्यामुळें अकस्मात् येतो क्रोधाचा वेग तो. ३ विंचू आपल्या नांगीनें करितो जो कोणेकावर प्रहार तो.

फणकावणें (धा. ना.) विंचवानें कोणेकास फणक्यानें युक्त करणें.

फणफणणें (धा. ना.) ज्वर, क्रोध इ० कांच्या योगानें शरीर अति संतप्त होणें. २ नाक, दही इ० अतिशयित आंबट झाल्यामुळें किं० मोहरी अतिशयित चढल्यामुळें वर फेस यावा, कांहीं शब्द व्हावा असे दशेनें वागणें.

फणा (स. फण) (स्त्री. ना.) फडाप्रथमार्थी. २ (पु.) फडातृतीयार्थी. ३ केळवंडीचे शेंड्यास जे अनेक घड असतात ते प्र० तो.

फणी (सं. पु. ना.) सर्प.

फणी (प्रा. स्त्री. ना.) केंस इ० विचरायास साधनभूत जो हस्तिदंत, काष्ठ, धातु इ० कांचा अनेक दांत्यांचा पदार्थ तो. २ वस्त्र विणतेसमयी तंतु दाटून बसायाचे उपयोगी एक औत असतें तो. ३ फडी. ४ सर्प.

फताडा (वि०) विशेषित दिसायाजोगा चापट असून पसरट जो पदार्थ तो. २ आडवीं बाहेर पडत गेलेलीं जीं शिंगें किं० त्यांनीं युक्त झेंस, टोणगा इ० पशु तो.

फते (अर० स्त्री. ना.) उत्कर्ष, जय.

फतेमारी (स्त्री. ना.) गलबतांत एक भेद आहे.

फत्तर (पु. ना.) दगड.

फत्ते (स्त्री. ना.) फते.

फंद (पु. ना.) बंड उठवावें, लोकांस लुटावें, दुसऱ्यावर नाहीं नाहीं तीं कुभांडें घालावीं, फितूर करावा इ० रूप जे खेळ ते प्र०. २ अब्रदार सभ्य जे लोक त्यांचे रीतीस विरुद्ध जे रांडबाजी, लावण्या गाणें व ऐकणें, तमाशा करणें इ० मनस्वी खेळ

ते प्रत्येकीं. ३ अयोग्यत्वेंकरून विव-क्षित जो कोणेक व्यापार त्यास ह्म-णतात. [द तो.

फंदाफितूर (पु. ना.) फितूर इ० फं-

फंदी (पु. ना.) नाच, तमाशा, दारू, भांग इ० व्यसनें प्रसिद्धपणें बाळगू-न लोकमर्यादा न गणितां स्वच्छंदपणें वर्तणारा जो तो. २ (वि०) फंद फि-तूर करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

फना, फन्ना (अर० पु. ना.) कोणेक वस्तूचा खाणें, खरचणें, लुटणें, जा-ळणें इ० कांच्या योगें निःशेषपणें जो नाश तो.

फरक (अर० पु. ना.) परस्पर अ-र्थांचें परस्परांशीं देशरूप, काळरू-प किं० न्यूनाधिकभावरूप जें अं-तर तो.

फरडा (पु. ना.) आपआपल्या कस-बांत पुरा पटाईत जो वक्ता, लिहि-णार, गाणार, मसलती इ० त्यास ह्मणतात.

फरपटणें (धा. ना.) भूमीशीं कुले, मांड्या इ० घसवटलें जाई असें अधि-ष्ठित स्थलापासून एकीकडे सरकणें.

फरफर (अव्य०) मनुष्यादिकास भू-मीवरून ओढीत नेणें, वस्त्रादि फा-डणें, किं० त्यानें फाटतेसमयीं वा-जणें इ० कांचें वि०.

फरफरा (अव्य०) फरफर.

फरशी (स्त्री. ना.) दगडाची जी चीप ती. २ त्या चिपांनीं करितात जी फरसबंदी ती. ३ परशु.

फरस (अर० पु. ना.) चिरेबंदी भूमि.

फरसबंदी (फा० स्त्री. ना.) फरस-रूप जी बंदिस्त ती.

फरसाळ (पु. ना.)(ग्रं०) भिन्नवाद.

फरा (पु. ना.) पायाचे मूळ प्रदेशा-चे संधीस रुंदट झालेलें जें पायाचें हाड असतें तो. २ मनुष्यें, घोडीं इ० क्रमानें उभीं राहिलीं असतां होत्ये जी पंक्ति ती. ३ धान्यादि मोजायाचें एक माप आहे. ४ कपाळावर सरा-सरी कुंकवाचा ओढला जो मोठा पट्टा तो. ५ (ग्रं०) पिंपळवणास ह्म-णतात.

फरारी (स्त्री. ना.) (ग्रं०) अंतःकर-णादिकांची ओढ. २ अधिकपण, थोरपण. ३ (वि०) परागंदा.

फरासखाना (फा० पु. ना.) राहु-ट्या, डेरे, बैठका इ० ठेवण्याचें जें स्थळ तो.

फराळ (सं. फलाहार)(पु. ना.) उ-पाहार. २ पोहे, पीठ, फळ, मूळ इ० जें उपहाराचें साहित्य तो. ३ लि-हिणें, म्हणणें इ०कांत जो कांहीं अ-क्षरें गाळण्याचा व्यापार तो.

फरोक्त (फा० वि०) विक्रीत.

फर्द (अर० पु. ना.) वस्त्र, अलंकार इ०कांतील एक अवयव तो. २ लफफा.

फर्मा (पु. ना.) कोणेक अर्थाचे स्व-रूपाची बोधक जी त्याची प्रत तो.

फर्मान, फर्माना (फा० पु. ना.) ठि-काण, वतन इ० संबंधी जी पाद-शाही सनद तो.

फर्मावणें (धा. ना.) कांहींएक गोष्ट राजादिकांनीं सेवकांस आज्ञापिणें.

फर्मास (फा० स्त्री. ना.) अमुक काम कर किं० अमुक पदार्थ तूं पाठवून दे इ० रूप राजादिक सेवकादिकांस करितात जी आज्ञा ती. २ राजादि जे आज्ञाकर्ते यांजकडे आज्ञा झालेले सेवकादिकांनीं पाठविलेला जो कोणेक पदार्थ त्यास म्हणतात.

फल, फळ (सं. न. ना.) कित्तीएक ओषधी वनस्पति यांस प्राय: पुष्पानंतर जो अवयवविशेष उत्पन्न होतो; त्यामध्यें प्राय: बीज असतें तें. २ पदार्थ व्यापारमात्रापासून निष्पन्न होतें जें पुण्य, पाप, सुख, दु:ख, द्रव्य, गुण इ० कांहींएक अपूर्व तें. ३ लाभ.

फलद्रूप (सं. वि०) इच्छित फळ ज्यापासून उत्पन्न झालें असा जो कोणेक अर्थ तो.

फलश्रुति (सं. स्त्री. ना.) व्रत, स्तोत्र, यज्ञादि कर्म इ० विषयक जो ग्रंथ त्यामध्यें त्याचें त्याचें फळ सांगितलें असतें असा जो त्याचा विभाग तो. २ फलद्वितीयार्थी.

फलाणाबिस्तान (फा० न. ना.) सटरफटर. [तीयार्थीवांचून

फलाहार (सं. पु. ना.) फराळ तू.

फवारा (अर० पु. ना.) हजारी कारंजें इ०कांचें छिद्रयुक्त बोंड तो. २ त्यांतून उडतें पाणी तो.

फशीं (अव्य०) फसून संकटावस्थेंत पडणें, देणें इ० प्र०. [पडपडणें

फसकटणें (धा. ना.) मसकत इ० फसकणें (धा. ना.) फसकटणें.

फसकी (स्त्री. ना.) सरकारचा फड पेंठ इ०कांच्याठायीं धान्यादिकांचें माप घेणारा जो शेट्या इ० अधिकारी तो मणास पसा इ० रूप जें हक्काचें धान्य इ० घेतो तीं. २ शाळेंतील पोरें उजळणीचे दिवशीं पंतोजीस ओंजळ ओंजळ पसा पसा धान्य देतात ती इ०.

फसगत (स्त्री. ना.) फशींपडलेपणा.

फसणें (धा. ना.) चिखल, रेती इ०युक्त स्थलांत मनुष्यादिकांनीं फसकन आंत जाणें. २ कोणेकानें कोणेक व्यवहाराचा परिणाम प्रतिकूळ झाल्यामुळें अनिष्टावस्थेंत पडणें. ३ कोणेक व्यवहारानें कर्त्याच्या अनवधानतेमुळें प्रतिकूळपरिणामयुक्त होणें. ४ कोणेकाजवळ ठेविलेलें किं० कर्जी दिलेलें द्रव्यादि तें आपले हातास न येई असा अवस्थेंत पडणें.

फस्त (फा० वि०) लुटणें, जाळणें, खाणें इ० द्वारा निःशेष नाशास करून टाकिला जो गांव, देश, अन्नादिपदार्थ तो.

फळ (न. ना.) फल. २ विठाचा एक भक्ष्यपदार्थ करीत असतात तें. ३ भाला, बरची इ०कांस जें पातें बसवीत असतात तें.

फळणें (धा. ना.) कोणेकानें कोणेकास फलद्रूप होणें. २ गोमहिष्यादि पशु किं० पक्षी इ०कांचे स्त्रियांनीं गर्भधारणार्थ मैथुनसंस्कारविशिष्ट होणें.

फळफळणें (धा. ना.) दैव इ०कानें उत्कर्षास येणें, उघडणें. २ म्हैस इ०कानीं मुतणें.

फळफळाट (पु. ना.) फळफळण्याचा अतिशय तो.

फळफळावळ (स्त्री. ना.) अनेक जातीचीं बरीं, वाईट, मोठीं, लहान जीं फळें तीं.

फळी (स्त्री. ना.) लहान मोठा जा नम्याचा तुकडा तो. २ आंत दुसऱ्याचा प्रवेश न व्हावयाजोगी कटाक्षानें अवस्थित मनुष्य, पशु, मेघ इ०कांची जी पंक्ति ती. ३ परस्पर स्पर्धेनें होतात जे अनेक पक्ष त्या त्या पक्षास अवलंबून होतात जे पृथक् पृथक् समुदाय ते प्रत्येकीं. ४ (ग्रं०) खेळ. ५ कलह किं० युद्ध.

फांक (स्त्री. ना.) आंबा, खरबूज इ० फळांचा किं० सुरणादि कंदाचा पुढ्याचे पाकळीसारिखा लांब जो तुकडा तो. २ शिमग्याचे महिन्यांतील बोंब मारण्याचे पूर्वी जीं बीभत्स वचनें म्हणतात तीं प्र०.

फांकटणें (धा. ना.) मनुष्यादिकांचे पाय किं० त्यासारखें जें दुबेळकें इ० संबंधी दोन अवयव ते मध्यें ताण बसे असे दोहोंकडे दोन पसरणें.

फाकंड (न. ना.) न्यायरीत सोडून वितंडवादाचें जें फरडूक तें.

फांकडा (वि०) अकडबाज जो शिपाई, नायका, कारकून इ० तो.

फांकणें (धा. ना.) फांकटणें. २ एकत्र जमून राहिला जो मनुष्यादि समुदाय, प्रभा, रक्त इ० त्याणें चहूंकडे पसरणें. दिशा फांकणें म्ह० दिशांच्याठायीं प्रकाश फांकणें. बुद्धि, दृष्टि इ०कानीं फांकणें म्ह० एकावर सूक्ष्मरूपेंकरून न राहतां चहूंकडे पसरणें. ३ पीक इ०पदार्थ फक्या मारमारून खाणें. ४ फांकी पडत असें फलादि कापणें.

फांका (पु. ना.) फक्का. कोणेकानें फांके मारीत फिरणें म्ह० कांहीं लाभ इ० नसून व्यर्थ भटकत फिरणें. २ अन्नाचे प्रतिकूलतेमुळें भोजन न घडतां दिवस जावा असा जो खाडा तो. ३ (वि०) नियमानें लाभादि व्हावयाचा तो न होतां गेला जो दिवस, मास इ० काल तो.

फाजील (अर० वि०) सरकार, सावकार इ० कांस द्यावयाचें जें द्रव्यादि त्याहून अधिक पावलें तें.

फाट (पु. ना.) परस्परें एक मतानें वर्तणारे जे त्यांचें परस्पर जमेनासें झाल्यामुळें व्यवहारीं होतो जो भिन्नपणा तो.

फांट (पु. ना.) फाट. २ जुळत आलेला पंचाईत इ० व्यवहार त्याविषयीं प्रतिकूळ जो कोणी घेतो आडफांटा तो. ३ भाषण, लेख इ०कांत पूर्वोत्तर विरोध दिसायाजोगें पडतें अंतर तो.

फाटक (न. ना.) जुनेर. २ आवार इ०कांचे द्वारास फळ्याचे अभावीं आडवीं उभीं लांकडें लावून जी कवाडी करितात तें.

फाटणें (धा. ना.) वस्त्र, कागद, चर्म इ० पदार्थांनीं ताण बसणें इ० कारणानें भेदविशिष्ट होणें. २ एक

तंत्रानें चालणारे जे कोणी त्यांचा परस्परें भिन्नभाव होणें.

फांटा (पु. ना.) एकेरी अंगानें चाललें जें वृक्षाचें खोड, नदी, मार्ग इ० त्यास अडवानिडवा त्यासारखाच फुटला असतो जो अवयव तो. २ लिहिलेलें अक्षरादि खोडायाचें असतां कि० कांहीं अन्य संकेत असतां तेथें जें रेषारूप चिन्ह करितात तो. भाषण इ० व्यवहारांत फांटा फोडणें म्ह० आडफांटा घेणें. नांव, रकम इ०कास फांटा देणें म्ह० दूर करणें. कोणेकास फांटा फुटणें म्ह० मंत्र-चळ, पिशाच इ०कांनीं वेड लागणें. ३ (ग्रं०) वडवड.

फाटाफाट (स्त्री. ना.) मिळून व्यवहार करणारे जे कोणी त्यांची कांहीं कारणानें एकमेकाशीं होत्ये तुटातूट तो.

फाटाफूट (स्त्री. ना.) समुदायरूपानें एकत्र जमून स्थित जे मनुष्यादि कोणेक अर्थ त्यांतून एक एकीकडे गेला, एक एकीकडे गेला असें झाल्यामुळें होतो जो परस्परांचा वियोग तो. २ फाटाफाट.

फाड (पु. ना.) गळूं इ०काप आंतील अंश बाहेर निघायाजोगा पडतो जो छेद तो आणि छेद करण्याचा व्यापार तो. २ आंतील सर्व दर्द स्पष्ट व्हावयाजोगा कोणेक विषयाचा परिस्फोट तो.

फाडणें (धा. ना.) वस्त्र, कागद इ० फाटे असें करणें. डोळे फाडणें म्ह० वटारणें.

फाडोवाड (पु. ना.) (ग्रं०) मोठेपणा. २ पुष्कळपणा. ३ (वि०) पुष्कळ. ४ स्पष्ट.

फांदी (स्त्री. ना.) खादी. २ मेणवत्ती उदवत्ती इ० लावायाकरितां भिंत, खांब इ०कास जो अंकुडा बसवितात तो.

फानस (फा० पु. ना.) कंदील.

फांपावणें (धा. ना.) (ग्रं०) वेल इ०कानें विस्तारणें.

फांफूं (न. ना.) टाणाटोणा.

फाम (अर० स्त्री. ना.) कोणेक गोष्टीविषयींचें अवधान तो.

फायदा (अर० पु. ना.) लाभ.

फारकत, कती (स्त्री. ना.) फारखत.

फारखत (अर० स्त्री. न. ना.) उभयतांचा देणें, घेणें इ० व्यवहारसंबंध तुटला असतां त्याविषयींचा जो एकमेकापासून लेख करून घेतात तो तें.

फारफेर (पु. ना.) परस्पराशीं न्यूनाधिकभावकृत जें थोडेंबहुत अंतर तो.

फाव (स्त्री. ना.) (ग्रं०) अवकाश.

फावणें (धा. ना.) कांहीं कार्य करण्याविषयीं कोणेकास सवड सांपडणें. २ (ग्रं०) प्राप्त होणें. ३ समजणें.

फावल (पु. ना.) (ग्रं०) सुस्वाद.

फांशी (स्त्री. ना.) गाय, म्हैस इ०कास वेळेस पाणी प्यावयास न मिळाल्यामुळें एक रोग होत असतो तो.

फांस (सं. पाश) (पु. ना.) गांठ मागें पुढें होऊन जो वलयाकार लाहान मोठा होतो त्याविषयीं प्रयोग. २ बाभूळ इ०कांचे कांट्यांचा भारा

नो. कोणिकास फांशीं देणें म्ह० ग-ळी देणें.

फासणी (स्त्री. ना.) शरीरांतील रक्त निघावें म्हणून वस्त्रा इ० शस्त्रानें जे बारीक बारीक छेद करितात ते प्र०. दुःखावर फासण्या टाकणें म्ह० दुः-खावर आणखी दुःख देणें.

फासणें (धा. ना.) भस्म, चिखल, रंग इ० पदार्थ हस्तादिकेंकरून घे-ऊन तो हस्तादिक झरकून शरीरा-वरून ओढून तें भस्मादि शरीरास लावणें.

फांसाटी (स्त्री. ना.) (ग्र०) फांस.

फांसेपारधी (पु. ना.) दोऱ्याचे फांस करून पशु कि० पक्षी यांस धरितो तो २ दुसऱ्यास एकादे पेंचाटींत घालण्या-चा स्वभाव ज्याचा त्यास म्हणतात.

फांसोळी (स्त्री. ना.) पाठीचे कण्या-पासून उरापर्यंत आडवीं लागून आ-लेलीं जी हाडें ती प्रत्येकी.

फाळ (पु. ना.) नांगराचे अग्रास प-र्णाकार जो लोखंडाचा अवयव ला-वितात तो.

फाळका (पु. ना.) केळ, चवेण इ० कांचे डांगेचे एकीकडल्या भागाचा तुकडा तो.

फिका (वि०) काळेपणा, पिंवळेपणा, तांबडेपणा इ० जो गुण तो ज्याम-ध्यें कमी असा जो काळा, पिंवळा, तांबडा इ० रंग तो आणि तद्विशिष्ट जो पदार्थ तो. २ असावी तितकी रुचि ज्यास कमी तो मधुरादि रस आणि तद्विशिष्ट जो भक्ष्य भोज्यादि पदार्थ तो. ३ ज्यास ज्याचे योगानें योग्यता येत्ये, शोभा येत्ये असें जें तेज तेणेंकरून हीन जो अधिकारच्युत मनुष्य, नीरस भाषण इ० अर्थ तो.

फिकीर, फिकर (अर० स्त्री ना.) चिंता.

फिटणें (धा. ना.) आपणावर चढलेलें दुसऱ्याचें ऋण, शपथ, शंका, सं-शय, उपकार, सूतक इ० जें कांहीं एक अवश्य निरसनीय त्याणें द्रव्य-दान, प्रत्युपकार इ०कें करून नि-रस्त होणें. २ नेसलेलें जें लुगडें, धो-तर इ० वस्त्र कि० त्याच्या चुण्या, कांसोटा इ० त्याणें सुटणें. ३ (ग्र०) उघडणें. ४ क्षीण कि० नाहींसें होणें.

फिटंफाट (वि०) फिटून निःशेष झालें जें ऋण, डाग, उपकार इ० तो.

फिटाफिट (स्त्री. ना.) परस्पर ऋ-णादिकांचा जो निःशेष फिटलेपणा तो.

फितणें (धा. ना.) एका पक्षावर आ-नुकूल्य आणि दुसऱ्या पक्षावर प्राति-कूल्य अशा भावानें असतो जो को-णी त्याणें तद्विरुद्ध भावविशिष्ट होणें. २ मूल इ० कानें कोणी खाऊ इ०-कांचा लोभ दाखविल्यामुळें ठकणें.

फितुरी (वि०) ज्या पक्षास जो आश्र-यून राहतो तद्विरुद्ध पक्षास मिळून स्वपक्षांत फितूर करण्याचा स्वभाव ज्याचा तो. २ बलात्कारी ज्या पक्षा-चा म्हणवितो तद्विरुद्ध पक्षाचा आ-तून ज्यास पक्षपात तो

फितूर (पु. ना.) स्वपक्षाशीं विरुद्ध होऊन परपक्षास अनुकूल व्हावें अ-सा जो राजकीय लोकादिकांचे अ-तःकरणाचा धन लोभादिकांमुळें होतो

भेद तो. २ (वि०) तादृश भेद वि-
शिष्ट झाला जो तो.

फिदा (अर० वि०) ज्याविषयीं आ-
पल्या प्राणापेक्षांहीं हा मला प्रिय अ-
शा भावनेनें विशिष्ट तो त्याविषयावर.

फिदारणें (धा. ना.) क्रोधावेशानें ना-
क, डोळे इ० शरीरावयव विजारणें.

फिरक (स्त्री. ना.) गायनसमयीं घेतात
जो कंप तो. २ फिरण्याचा व्यापार.

फिरकणें (धा. ना.) अधिष्ठित स्थळ
सोडून आसपासचे प्रदेशीं यत्किंचित्
संचारविशिष्ट होणें.

फिरकी (स्त्री. ना.) फिरक. २ वेश्या-
दिक नृत्यादिसमयीं माग्नितात जो
गरका तो. ३ मळसूत्राचा नर म्हणून
जो अवयव असतो तो. ४ कठडा,
पाळणा इ०कांस शोभेसाठीं इ० ज्या
कांबीव अनेक खुंट्या ओळीनें ला-
वितात त्या प्रत्येकी. ५ कातणें इ०-
कांस गरगर फिरायाजोगा चक्रा-
कार अवयव असतो तो. ६ सोनें
इ० वजन करायाचा लाहान ताज-
वा आहे.

फिरंग (स्त्री. ना.) (पं०) तरवार.

फिरणें (धा. ना.) चक्र इ०कांनी मं-
डलाकार गतिविशिष्ट होणें. २ ज्या
दिशेस लक्ष्यून चाललेला जो मनु-
ष्यादि जीव, मार्ग, नदी इ० त्याणें ती
दिशा सोडून इतर दिशेकडे होणें.
३ पुढें यावें, मागें जावें, निर्कस चा-
लावें इ०रूप अनेक प्रकारच्या ग-
तींनीं जो कोणेक स्थळीं संचार त-
द्विशिष्ट कोणेकानें होणें. ४ कोणेक
अर्थानें पालटलें जाणें. कोणेकानें
कोणेकांवर फिरणें म्ह० विरुद्धभाव-
युक्त होणें.

फिरवाफिरव (स्त्री. ना.) इकडलें
तिकडे नें, तिकडचें इकडे आण इ०
जो व्यापार तो.

फिरस्त, फिरस्ता (पु. ना.) जो जे-
थला स्थायी नव्हे; देशांत राहून
फिरत फिरत आलेला तो तेथें. २ ए-
का स्थळीं दुकान न घालितां गांवांत
घरोघर हिंडून जिन्नस विकणारा तो.

फिर्याद (फा० स्त्री. ना.) आपला
कोणी अपराध केला असतां त्या
अपराध्याचा शासनकर्ता जो कोणी
त्यापाशीं किं० अन्य कांहीं कारणानें
होतो जो तोटा त्याचा निरास कर-
णारा जो राजा इ० कोणी त्यापाशीं
करितात जें निवेदन तें.

फिसकटणें (धा. ना.) फसकटणें.
२ कोणेक कार्याविषयीं अनुकूल भा-
वानें वागत असतो जो कोणी त्याणें
रुसवा, तिरस्कार इ० कारणानें वि-
थरणें. [फिटलेपणा तो.

फीट (स्त्री. ना.) ऋणादिकाचा जो

फीत (स्त्री. ना.) स्फीत. २ रेशीम,
सूत इ० विणून दालीसारखा पदा-
र्थ करितात तो. [षार, शिनोडा.

फुई (स्त्री. ना.) भान. २ (पं०) तु-

फुकट (अव्य०) कोणेकापासून कांहीं-
एक पदार्थ घेतला असतां त्याचें मो-
ल जें द्यावें लागतें त्यावांचून कोणेक
अर्थ देणें, घेणें, मिळणें इ० कांचें
वि० २ वृथा.

फुकटचा (वि०) फुकट दिलेला, मे-

च्छिलेला जो कोणेक अर्थ तो. हें काम फुकटचें नव्हे ह्म० भनायासें महजांत पडायासारखें नव्हे असा अर्थ.

फुकटचोट (पु. ना.) कोणेक कार्यांत कराया लागतो जो खर्च वेच किं० अंगमेहेनत तें न करितां त्याविषयीच्या फुकट गोष्टी मात्र सांगाव्या आणि लाभसमयीं मात्र पुढें व्हावें अशा स्वभावाचा जो त्यास ह्मणतात.

फुकटावारी (अव्य०) फुकट अशा प्रकारें मिळणें, खरचणें इ०कांचेंवि०.

फुकट्या (वि०) फुकटचोट.

फुंकणें, फुकणें (धा. ना.) मुखवायूनें किं० भात्याच्या वायूनें अग्नि इ० संवद्ध करणें. २ सनई, करणा इ० मुखवाद्य वाजवायासाठीं मुखवायूनें संवद्ध करणें. ३ आंतून वायु निघायाजोगा भाता हालविणें. ४ सर्प इ०कांवर साबरी मंत्र प्रयुक्त करणें. कोणेकाचे कान फुंकणें ह्म० त्यास मंत्रोपदेश करणें, किं० अंतःकरणवृत्ति वळवायासाठीं कांहीं कानमंत्र सांगणें. इ०.

फुंग (पु. ना.) (ग्रं०) फुगारा, अभिमान.

फुगट (वि०) फुगीर.

फुगडी (स्त्री. ना.) एकमेकाचे हात किं० दंड धरून मंडलाकार फिरावें किं० एकमेकासमोर बसून उड्या मारित पुढें जावें इ० रूप फुगडीफू असा शब्द करीत ज्या करायाच्या अनेक क्रीडा आहेत त्या प्र०.

फुगणें (धा. ना.) वायु आंत भरल्यामुळें कोणेक पदार्थानें स्थूळ होणें. २ आंत कांहींएक द्रव्यादि भरल्यामुळें पोट, पिशवी, गांठोडें इ० कानें वरील आवरण ताठलें जाई असें स्थूळ होणें. ३ वायूनें किं० जलानें गतिनिरोध झाल्यामुळें तुंबणें. ४ रुसणें. ५ फुशारणें.

फुगवटी (स्त्री. ना.) पोट इ० शरीरावयवास वातविकृतीनें किं० वायु, जल यांचा गतिनिरोध झाल्यामुळ त्यास येतो जो फुगलेपणा तो.

फुगवशी (स्त्री. ना.) फुगवटी.

फुगा (पु. ना.) कागद इ०कांचा पिशवीसारिखा आकार करून आंत वायु किं० उदक इ० कोंडिलें असतां फुगून तटतटीत जो आकार होतो तो. २ जलादिकांचा बुडबुडा तो. ३ (ग्रं०) अभिमान.

फुगारा (पु. ना.) अग्निसंयोगादि कारणानें शरीरादिकांवर जो उंचवटा उठतो तो. २ हजारी कारंजें इ०कांचा फुगीर जो मुखावयव असतो तो. ३ जल, वायु, पोट इ० कांचा फुगलेपणानें विशिष्ट जी स्थिति तो.

फुगीर (वि०) कांहींसा फुगलेल्यासारिखा दिसतो जो आकार आणि तद्विशिष्ट मुखादि शरीरावयव, अलंकार, भांडें इ० पदार्थ तो.

फुंज (पु. ना.) (ग्रं०) अभिमान.

फुटकळ (वि०) विवक्षित जो विशिष्ट समुदाय तद्रूप नव्हे असा जो विभागरूपता पावलेला कोणेक अर्थ तो. २ ज्याचे मधले मधले अंश गेले आहेत अतएव अखंड नव्हे असा जो ग्रंथ, शेताचा बांध, तट इ० तो.

फुटणें (सं. स्फुटन) (धा. ना.) दगड, काष्ठ, पात्र, फोड इ० मूर्त पदार्थ त्याणें किं० संसार, व्यापार, मसलत इ० अमूर्त पदार्थ त्याणें आंतील अंश उघड व्हावयाजोगें भेदविशिष्ट होणें किं० भेद पावून अनेक खंडरूप होणें किं० विशिष्ट जो कोणी एक अवयवी त्यापासून कोणेक विभागानें खंडरूनेंकरून भिन्न होणें. २ अनेक व्यक्ति एकत्र जमून झालेला जो सेना इ० समुदाय त्याणें विसकळीत होणें किं० त्याचे अंतर अवयवानीं त्यापासून निराळें होणें. ३ एक मतपणानें कोणिकाशीं कोणेक जो पावला एकरूपता त्याणें तें मत सोडुन भिन्न होणें. ४ कोणिक अधिकरणांत अव्यक्त रूपानें असलेला कांहीं अवयवादि त्याणें व्यक्त होणें कागद, शाई, डोळे, कान, दैव इ० फुटणें इ० कांचें अर्थ स्पष्टच आहेत. ५ (ग्रं०) उजेडणें.

फुटाणा (पु. ना.) भिजवून, भाजून, भक्षावयासाठीं खुसखुशीत केलेला जो हरभऱ्याचा दाणा तो. फुटाणे फुटणें किं० उडणें इ० सर्वत्र किं० तरेचें भाषण एतत्संबंधी शब्द होणें.

फुटाफूट (स्त्री. ना.) समुदायांतून किं० ऐकमत्यांतून याणें फुटावें, त्याणें फुटावें असा जो व्यापार तो, किं० त्यामुळें झालेला समुदायाचा किं० ऐकमत्याचा फुटलेपणा तो.

फुटी (स्त्री. ना.) (ग्रं०) दीप्ति, तेज. २ भेद.

फुडें (अव्य०) पुढें. २ (ग्रं०) (वि०) खरें. ३ बरें. ४ (अव्य०) निश्चयें.

फुणगा (पु. ना.) (ग्रं०) फुणगी.

फुणगी (सं. स्फुलिंग) (स्त्री. ना.) ठिणगी. फुणगी लावणें, टाकणें इ० कज्जा इ० पेटविणें.

फुणफुणणें (धा. ना.) क्रोधावेशानें संतापलें असतां डोळे लाल व्हावे, नाक पिंजारावें, वारंवार सुसकारे टाकावे अशी जी अवस्था होत असते तीणेंकरून युक्त कोणिकानें होणें. २ हात इ० कानें फुणफुणीनें युक्त होणें.

फुणफूण (स्त्री. ना.) अग्नीनें भाजलें असतां किं० वृश्चिकादिकांचा दंश झाला असतां पहिला जो दुःसह वेग तो गेल्यानंतर कांहीं काल राहातो जी यत्किंचित् व्यथा ती.

फुंदणें (धा. ना.) स्फुंदणें.

फुनगा (पु. ना.) (ग्रं०) फुणगा.

फुंपाटा, फुपाटा (पु. ना.) चूल, आगटी इ० कांमध्यें पेटलेला जो अग्नि तो विझाल्यावर अग्निकणांनीं विशिष्ट जी धगधगीत राख असते ती. २ सूर्यकिरणांनीं फार तापलेली जी धूळ, वाळू इ० त्यास ह्मणतात.

फुप्फुस (सं. पु. ना.) हृदयकमलांत भिंवरासारिखा अनेक छिद्रांनीं युक्त एक पदार्थ आहे तो.

फुरण (सं. स्फुरण) (न. ना.) युद्धादि कोणेक कर्मांविषयींचा जो उत्साह त्याचा आवेश शरीरांत होऊं लागला ह्मणजे जो कांप सुटल्यासारखा शरीरांत विकार उत्पन्न होतो तें.

फुरफुरणें ( धा. ना. ) घोडा, गाढव याच्या नाकानें जो फुर फुर शब्द होतो तद्विशिष्ट त्यांणीं होणें. २ करवंटी इ० कानीं वाजल्यें समयीं फुर फुर वाजणें. ३ लाहान बालकानें ओंठानीं जो फुर असा शब्द होतो तद्विशिष्ट होणें. ४ नेत्र इ० शरीराचे अवयवानें स्फुरणविशिष्ट होणें इ०.

फुरसत, द,फुरसूत (अर० स्त्री.ना.) एका कार्याकडेस गुंतलेला जो कोणी त्यास कार्यांतराकडेस लागण्याविषयीं मध्यें मिळतो जो कांहीं अवकाश तो. २ पुढें होणार जें कोणेक कार्य त्याला कांहिंएक अवधीपासून मध्यें असतो जो कालरूप अवकाश तो.

फुरसें (न. ना.) एक विषारी जिवाणू आहे.

फुलणें (सं.फुल्ल) (धा. ना.) पुष्पकलिकेनें पुष्परूपता येई असें विकसित होणें. २ तांदूळ, जोंधळा इ०कानीं लाही इ०परिणाम व्हायाजोगें उमलणें. ३ छिद्रादिकांत बसविलेला खिळा इ०कानें ठोकल्यामुळें अग्रभागीं रुंदावून फुलासारखा आकारानें युक्त होणें. ४ वृक्ष, लता इ०कानीं पुष्पविशिष्ट होणें.

फुलवरा (पु. ना.) बाजरीचे कणसाभोंवता असतो जो पुष्प समुदाय तो. २ अनेक पुष्पें एकत्र गुंफून चंद्र, पिंपळाचें पान इ० आकाराची करितात रचना तो. ३ देवावर पुष्पें, फळें लोंबत बांधून जो रचनाविशेष करितात तो. [क्षितपणा.

फुलावणी (स्त्री. ना.) (ग्रं०) प्रफु-

फुलिंग (स्त्री. ना.) (ग्रं०) ठिणगी.

फुली (स्त्री. ना.) देंठाशिवाय जें पुष्प त्याचा जो कागद इ०कांवर रेषांनीं आकार काढितात ती. २ त्यासारखा जो कागद, धातूचा पत्रा इ०कांचा आकार करितात ती. ३ कागदाची पंचकडी ती. ४ (ग्रं०) फुलण्याचा भर ती. ५ बाळपणा.

फुलेल (न. ना.) मोगरा, चमेली इ० पुष्पांचे सुगंधानें सुगंधित केलेलें जें तीळ त्यांचें तेल तें.

फुशारकी (स्त्री. ना.) अंगीं तादृश योग्यता नसतां लोकांत अतिरिक्त दिसायाजोगी कोणी बाळगितो जी कोरडी प्रतिष्ठा ती. २ बडिवार.

फुसकट (वि०) फुसक्या पदार्थाच्या कोटींत गणायाजोगा जो पदार्थ तो.

फुसका (वि०) जी बळकटी ज्यांत असावी त्या बळकटीनें राहित जो काष्ठ, पाषाण, कागद, मनुष्य इ० पदार्थ तो.

फुसकारणें (धा. ना.) सर्प इ०कानें फुसकाऱ्यानें युक्त होणें.

फुसकारा (पु. ना.) क्रोधावेशानें सर्प, मार्जार, गुरूं, मनुष्य इ०कांचा जो फुं असा शब्द तो.

फुसकुली (स्त्री. ना.) मोठ्यानें शब्द न होतां हळूच येतो जो अपानवायु तो. २ दुसऱ्याचे मर्मास लागावें इ० रूप कोणी समोर न येतां अडून हळूच बोलतो जें कांहिंएक कुत्सित भाषण त्यास म्हणतात.

फुसफुशीत (वि०) ज्याचे अंगीं कठिणपणा नाहीं म्हणून फोडायास भे-

दायास विशेष बळ लागत नाहीं असा जो कुजके काष्ट, वाळवंट जमीन इ० पदार्थ तो.

फुसफुसणें (धा. ना.) सर्पादिकांनीं फुसफुस असा शब्द करणें. २ मनुष्यानें फुसफुस असा शब्द मात्र ऐकायास जावयाजोगें दूर हळू हळू बोलणें.

फुसलावणें (धा. ना.) कोणेक कार्य साधून घेण्याविषयीं खोटी स्तुति करावी, कांहीं आशा दाखवावी अशा अनेक कपट युक्तींनीं कोणेकास स्ववश करून घेणें.

फूं (अव्य०) सर्पादिकांचे फुत्काराचें अनुकरण. कोणेकानें फु होणें म्ह० पराकाष्ठेचा रोष चढल्यामुळें सर्व क्रिया सोडून नाकपुड्या फुगवून सुसकारे टाकीत राहाणें. .

फूट (स्त्री. ना.) दगड इ० कोणेक पदार्थास फुटल्यामुळें जी चीर पडत असत्ये ती. २ संघरूप जे अनेक अर्थ किं० एकोप्यानें स्थित जे अनेक मनुष्यादि त्यांचा तो संघ किं० एकोपा बिघडायाजोगा होतो जो भेद तो. ३ गुप्तमसलत इ०कांची जी परिस्फुटता ती. ४ वायु इ० कांचे विकृतीनें तो तो शरीरावयव फुटतो आहे असें वाटायाजोगी जी अवस्था अनुभवास येत्ये ती. ५ (न. ना.) झाडावरून पडून फुटलेलें जें फळ तें.

फूत्कार (पु. ना.) ओंठ संकुचित करून बळानें वायु बाहेर किं० आंत घेतला असतां जो शब्द होतो तो. २ सर्प, गाय, म्हैस इ० पशु इ०कांनीं क्रोधविशादि कारणानें मोठ्यानें वायु बाहेर टाकिला असतां जो शब्द होतो तो.

फूल (सं. फुल्ल) (न. ना.) वृक्ष, वल्ली इ०कांस तारुण्यावस्था प्राप्त झाली असतां जो अवयवविशेष येत असतो तें; जें प्राय: फलोत्पत्तीस कारण असतें. २ कोणेक वृक्षाचे फुलासारिखा सोनें इ० धातु, कागद, हस्तिदंत इ०कांचा भूषणार्थ पदार्थ करितात तें. ३ दारू इ० संबंधी जो अग्नि त्यापासून जे फुलासारिखे अग्नीचे आकार निघतात ते प्र०. ४ गालीचा, सखलाद इ० कांवर जो केसरासारिखा अवयव दिसतो तें. ५ डोळ्याचे बुबळावर जो पांढरा ठिपका उत्पन्न होतो तें इ०.

फूस (स्त्री. ना.) कांहीं वाईट गोष्ट केली असतां तन्निमित्त शासन करणारा जो राजा, पति, मातापितरें इ० कोणी अधिकारी त्यांचें जें त्या वाईट गोष्टीविषयीं गुप्तरूपें अनुमत तद्रूप जें त्या अपराध करणारास बळ असतें ती.

फेकणें, फेंकणें (धा. ना.) पाषाणादि पदार्थ दूर जाई असा झुगारणें. पगडी, पागोटें इ० फेकणें म्ह० अकड दिसायाजोगें डौलानें घालणें. जासूद, शिपाई, घोडा इ० फेंकणें म्ह० इच्छित स्थळीं वेगानें जाई असा करणें.

फेंगडा (वि०) मधल्या सांध्याजवळ धनुष्याकार झालेला पाय तो आणि तद्विशिष्ट मनुष्यादि तो व त्याचें चालणें तो.

फेटा, फेंटा (पु. ना.) लाहान जें पागोटें तें.

फेड (स्त्री. ना.) आपणावर चढलेलें जें ऋण, उपकार इ० त्याचा प्रतिदानादिद्वारा फेडण्यानें जो निरास तो.

फेडणें (धा. ना.) फिटे असें करणें. २ (ग्रं०) दूर करणें. ३ उघड करणें.

फेण (पु. ना.) (ग्रं०) फेस.

फेंफरें (न. ना.) अपस्मार वायूचे योगानें शरीरास कंप सुटून मुखास फेस यावा आणि मूर्च्छा येऊन पडावें असा जो विकार होतो तें. २ त्यासारखा पिशाच्च बाधेनें जो विकार होतो त्यासही ह्मणतात.

फेफळ (स्त्री. ना.) (ग्रं०) प्रतिज्ञा.

फेंफें (न. ना.) बेंबें.

फेर (पु. ना.) घेर. २ कोणेक पदार्थाभोंवता जो दोरी इ० चा फेरा तो. ३ अंतर. ४ मार्गादिकास जी वक्रता असते तो. ५ फेरफटका.

फेरघोंडी (स्त्री. ना.) ज्याचे आज्ञेंत वागणारा जो कोणी तो त्यालाच उलटून गोष्ट सांगावी, त्याणें एक ह्मटलें असतां आपण वेंक ह्मणावें असा अपले वृत्तीचा करितो उलट ती. २ एकदां पराजयादि होऊन परावृत्त झालेला जो कोणी तो पुनः खातो जी उचट ती.

फेरणी (स्त्री. ना.) क्रमानें कोणेक अर्थावर जो उलटापालट इ० द्वारा चालनसंस्कार होत जातो तो मूळच्या व्यक्तीपासून शेवटचे व्यक्तीपर्यंत झाला ह्मणजे होतो जो त्या क्रियेचा पर्याय तो.

फेरणें (धा. ना.) घोड्यास अनेक प्रकारच्या गतीनीं व्यायामासाठीं किं० शिकवण्यासाठीं आसमंताद्भागीं चालविणें. २ या अंगचा त्या अंगावर, इकडचा तिकडे, तिकडचा इकडे इ० प्रकारें कोणेक अर्थ चालित करणें.

फेरपगडी (स्त्री. ना.) फेरघोंडी.

फेरफटका (पु. ना.) घोड्यास जो फेरण्याचा संस्कार तो. २ एका ठिकाणीं स्थित जो मनुष्यादि तो इकडे तिकडे फिरल्यामुळें जो त्यास चालनसंस्कार होतो तो. ३ शास्त्रादिकांस आवृत्ति, अध्यापन इ० द्वारा जो चालनसंस्कार तो.

फेरा (पु. ना.) कोणेक पदार्थास मध्यें घेऊन त्याचे भोंवतें सूत्र इ० फिरून पूर्वस्थळीं आलें असतां त्या सूत्रादिकांची त्या पदार्थाभोंवती होते जी व्याप्ति तो. २ कोणेक पदार्थाची मंडलाकार फिरण्यानें जेथून फिरायास आरंभ झाला तेथपर्यंत पुनः यावें इतकी जी गति तो. ३ फेरचतुर्थी. ४ फेरी. ५ फिरकांडा.

फेरिस्त (फा० न. ना.) व्यावहारिक लिहिण्याचे कागदांचा जो समुदाय त्यामध्यें कोणकोणत्या प्रकरणाचे किती किती कागद आहेत हें समजावें ह्मणून त्याचें टांचण करून ठेविलें असतें तें.

फेरी (स्त्री. ना.) कोणेकाची कोणेकाचे भोंवताली जेथून निघावें तेथें

फिरून यावें इतकी जी गति ती. किं० कोणेक स्थळीं जाऊन पुनः माघारें पूर्वस्थळीं यावें इतकी जी गति ती. २ मंडलाकार किं० इकडे तिकडे फिरत फिरत चालणारा जो कोणी त्याची तीं तीं स्थळें आक्रांत करित होत्ये जी गति ती.

फेस (पु. ना.) दूध, तेल, पाणी, मद्य इ० सद्रव पदार्थाचे कांहीं अंशाचा कांहीं कारणानें होतो जो हलका परिणाम तो.

फैल (पु. ना.) तंटा बखेडा इ० दंगा.

फैलाव (पु. ना.) मनुष्य, वृक्ष, श्लोक इ० कोणेक अर्थाची पुत्रपौत्र, शाखा पल्लव, विवरण टीका इ० स्वस्वविस्तारद्वारा पसरून जी स्थिति ती. सावकारी इ० व्यवहार तोही त्या त्या पुरुषाचा विस्तार असें मानून या सावकाराचा फैलाव या देशांत पुष्कळ आहे इ० प्रयोग होतात.

फैसल, फैसला (अर० पु. ना.) विवादरूप अर्थाचा जो एकरूप निर्णय, जेणेंकरून त्या वादाची समाप्ति होते तो. २ ऋण किं० कोणेक पदार्थ इ०कांचा फिटणें, खरचणें इ०कें करून फडशा तो.

फोक (पु. ना.) मध्यें वांकडें तिकडें न होतां, शाखा न फुटतां नीट सरळ गेलें असतें जें वृक्षादिकांचें ओलें शाखाकांड तो. २ सवेग रेघ.

फोकरणें (धा. ना.) (ग्रं०) प्रकट करणें. २ वर्णन करणें. ३ बोलणें.

फोड (पु. ना.) शरीरावर भाजल्यामुळें किं० खरूज इ० रोगामुळें जो बुडबुड्यासारिखा आकार उठतो तो. २ भाजलेला पापड, उंबर इ०कांचें पान इ०कांवर जे तसे आकार असतात त्यास म्हणतात. ३ (स्त्री. न. ना.) आंबा इ० फळ किं० सुरण इ० कंद यांचे भाजी इ० करायासाठीं केलेले जे लाहान लाहान तुकडे ते प्रत्येकीं. ४ मुग्धपणेंकरून स्थित जी कोणेक गोष्ट तिचा जो परिस्फोट तो. ५ एकमत्यानें किं० समुदितपणानें राहिलेले जे कोणेक अर्थ त्यांची परस्परें एकमेकांशीं भिन्नता ती.

फोडणी (स्त्री. ना.) तेल किं० तूप तापवून त्यांत मोहऱ्या, हिंग इ० घालून भाजी इ०कांस मिष्ट वास लागावा ह्मणून जें तशा संस्काराचें द्रव्य सिद्ध करितात ती. [२ स्पष्ट करणें.

फोडणें (धा. ना.) फुटे असा करणें.

फोपशा, फोपसा (वि०) केवळ घटमूट नव्हे असें मेदाच्या वृद्धीनें स्थूळ झालेलें शिथिल शरीर तो, आणि तद्विशिष्ट मनुष्यादि तो.

फोल (न. ना.) ज्याचे पोटीं कणांश नाहीं असा जो भाग इ० धान्याचा पोकळ दाणा तें. २ आंतील कणांश वेगळा निघाला असतां जें धान्याचें नुस्तें टरफल राहातें तें. ३ असावा तो तत्वांश ज्यांत नाहीं असें जें भाषण, व्यवहार इ० त्यास म्हणतात.

फोस, फोसें (वि०)(ग्रं०)व्यर्थ,तुच्छ.

फौकारणें (धा. ना.) (ग्रं०) कीर्ति सांगणें.

फौज (अर० स्त्री. ना.) सैन्य.

फौजदार (फा० पु. ना.) चोरी, मारामारी इ०कांचे चौकशी इ० कामावर जो सरकारांतून अधिकारी ठेविला असतो तो. २ महात.

फौजदारी (फा० स्त्री. ना.) फौजदाराचा जो अधिकार तो. २ खोटा कागद करणें इ०कांबद्दल जो कोणेकावर सरकार इ०कांतून चालतो खटला तो.

फौजफांटा (पु. ना.) फौज, तोफखाना इ० जो खटला तो.

---

## —ब—

ब— हा वर्ण तेविसावें व्यंजन आहे. (स्त्री. ना.) मुलें आपल्या आईस ह्मणतात.

बक (सं. पु. ना.) एक पक्षी आहे. २ केवळ अल्पवयस्क जें पिलूं तो. ३ (स्त्री.) ज्याला लेखपत्रादि प्रमाण नाहीं अतएव सत्य मानितां येत नाहीं असें जें प्रतिज्ञादिविषयक तोंडचें भाषण तो.

बंक (स्त्री. ना.) (ग्रं०) चौकी.

बकई (स्त्री. ना.) चाकूंत एक भेद आहे; ज्याचा आकार बकत्र्यासारिखा असतो ती.

बकणें (धा. ना.) अहंकारादिकानें आंत काहीं अतिशय दिसायाजोगें मनस्वी बोलणें.

बकतणें (धा. ना.) (ग्रं०) राहाणें.

बकध्यान (सं. न. ना.) बकाची मत्स्य धरण्याविषयीं जी ध्यानस्थ बसल्यासारखी स्थिति तें. २ कांहीएक कार्यसिद्धीसाठीं लोभादि पोटांत ठेवून बाह्यात्कारीं शांतपणें जी स्थिति कोणी धरितो तें.

बकबक (स्त्री. ना.) मनस्वी बकण्याचा जो व्यापार तो.

बकवा (पु. ना.) बकबक.

बकाबक (अव्य०) कोणेकास बुक्यांनीं मारणें, पोहे इ० मुठींनीं घेऊन भराभर खाणें, भराभर सशब्द ओकणें इ०कांचें वि०.

बकाल (अर० पु. ना.)धान्य, कापड, किराणा इ०कांचा व्यापार करणारा उदमी तो. २ (न.) बकाललोकांचा समुदाय तें.

बखर (स्त्री. ना.) प्राकृत भाषेनें राजादिकांचें चरित्र लिहिलें असतें तें.

बखळ (स्त्री. ना.) गांवांतली गृहादिरूप जी बंदिस्त तिनें रुंधलेली नव्हे अशी रिकामी जी जागा ती. २ मनुष्यादि वसतीनें रहित गृहादिसंबंधी जें विस्तीर्ण स्थळ त्यास आरोपानें ह्मणतात.

बखा (अर० स्त्री. ना.) केवा.

बखेडा (पु. ना.) स्वस्त वृत्तीनें चालणाऱ्या व्यवहारास अडचण करणारें जें कांहींएक खटलें तो आणि तेणेंकरून त्या व्यवहारांत होतो जो विक्षेप तो, किं० त्या व्यवहाराची होये दुर्दशा तो.

बख्शीस (फा० न. ना.) कोण एकाचे शौर्यादि गुण पाहून राजा इ०

संतोषयुक्त होऊन त्यास जें द्रव्यादि देतात तें. २ (वि०) माफ.

बंगला (पु. ना.) क्रीडा, बैठक इ०-कांसाठीं भूमिवर किं० दरवाजा इ०कांवर मजला देऊन तेथें गृहासारखी बंदिस्त करून करितात जें रम्य स्थळ तें. [पावि.

बगा (पु. ना.)(ग्रं०) आकार. २ उ-

बगाड (न. ना.) देवापुढें मनुष्यास नवसाचे गळ टोंचायासाठीं एक यंत्र करून ठेवितात तें.

बंगी (स्त्री. ना.) फळें, फुलें इ० जिन्नस वाहावयासाठीं दोहोंकडे शिंकीं लावून जी कावड करितात ती.

बगीचा (फा० पु. ना.) लाहान जो बाग तो.

बगें (अव्य०) (ग्रं०) योगें.

बगोटी, बगोटें (स्त्री. न. ना.) नरडें.

बघणें (धा. ना.) पाहाणें.

बचक (स्त्री. ना.) पीठ इ० पदार्थ, राशींतून काढून घ्यावयासाठीं केला जो कमलाकार हस्त तो.

बंचकणी (वि०) बचकणा. २ (स्त्री.) मुख्य संप्रदायापेक्षां लांबीरुंदीस कमी जो धोत्रजोडा, प्रायः लहान मुलांस नेसायाच्या उपयोगी तो. ३ मद्यानें भरलेला जो शिसा तो.

बचनाग (पु. ना.) एक विषयुक्त कंद आहे. २ त्याचें जें झाड तें.

बचबच (स्त्री. ना.) कोणेक कार्याची व त्या कार्यकर्त्यांची दगदग ती.

बचाव (पु. ना.) उपद्रवकारक जें कांहींएक त्यापासून तो उपद्रव न बाधतां कोणेकाचे योगानें सुरक्षितपणें होणें जी स्थिति ती.

बचावणें (धा. ना.) कोणेकास बचावानें विशिष्ट करणें.

बचेरी (स्त्री. ना.) उपहास्यता.

(फा. पु. ना.) मनुष्य, पशु इ०कांचें लाहान जें अपत्य तें.

बच्छान (फा० स्त्री. ना.) छानेचा विघडलेपणा तो.

बछडा, बछडी, बछडें (पु. स्त्री. न. ना.) लहान जें मनुष्य, पशु इ० कांचें पुरुष स्त्रीरूपादि अपत्य तो ती तें. [२ त्याची बी तो.

बजरबट्टू (पु. ना.) एक वृक्ष आहे.

बजाज (अर० पु. ना.) कापडाचा क्रयविक्रय व्यापार करणारा तो. २ (वि०) भांडखोर.

बजावणें (धा. ना.) कांहींएक गोष्टीविषयीं संभाळ विसरूं नको इ० प्रकारें पुनः पुनः सांगणें. २ कांहीं एक दुर्घट काम अंगावर घेऊन सिद्धीस नेणें.

बजिन्नस (अव्य०) प्रत्यक्ष या अर्थी सांगणें, बोलणें, पाहाणें, जाणें इ०-कांचें वि०.

बट (पु. ना.) स्वभावानें ठेंगणा, पुष्ट, आणि चालीस चांगला जो घोडा तो. २ (न. ना.) लोखंडांत एक जाति आहे. ३ (स्त्री. ना.) अंबाडी, ताग इ०कांचे दाहावीस इ० तंतु एकत्र संबद्ध होऊन झाला असतो जो समुदाय तो. ४ केसांची जी जटा तीस म्हणतात.

बटकूर (न. ना.) निंदेनें बटकीस म्हणतात.

बटछपाई (स्त्री. ना.) सरकारांतून न्यूनाधिक मापाची चौकशी होऊन खरें मापांवर छाप मारण्याचा व्यापार करितात ती. २ ज्याचे मापावर छाप मारिला त्याबद्दल त्यापासून द्रव्य घेतात ती.

बटणावळ (स्त्री. ना.) चालींचे नाण्यापेक्षां कमी जें नाणें तें बटाविलें असतां वर जो बट्टा द्यावा लागतो ती.

बटवडा (पु. ना.) पगार इ० वांटण्याचा व्यापार तो.

बटवा (पु. ना.) ज्यास पांच चार पुडें असतात आणि झांकदोरा, उघड दोरा लाविला असतो अशी एक पिशवी आहे.

बटवाळ (वि०) (ग्रं०) भ्रष्ट. २ अनाचारी. ३ दोषी.

बटवी (स्त्री. ना.) लहान जो बटवा ती. [निजिनशी सारा तो.

बटाई (स्त्री. ना.) बटणावळ. २ ऐ-

बटिकार (पु. ना.) (ग्रं०) बाह्यात्कार.

बटीक (स्त्री. ना.) कुणबीण. २ मूळची गरत असून व्यभिचारांत प्रवृत्त होऊन त्याजवरच उपजीविका करत्ये अशी जी ती व त्याच मार्गें वर्तूं लागली तिची कन्या तीही.

बटु (सं. पु. ना.) मुलाची मुंज झाल्यापासून सोडमुंज होईपर्यंत किं० तारुण्य प्राप्त होईपर्यंत तो.

बट्टा (पु. ना.) आपले जवळचे नाण्यास त्याच जातीचे नाण्यापेक्षां मोलानें जी हीनता असत्ये ती किं० तें नाणें देऊन त्याच जातीचें दुसरें नाणें घ्यावयाचें असतां समसंख्याक देऊन मूल्यकृत समता व्हावयास वर जो द्रव्यांश द्यावा लागतो तो. २ त्या सजातीय नाण्यास मूल्यकृत जें आधिक्य त्यास आणि तें विकलें असतां येतो जो वरताळा त्यासही म्हणतात. ३ लोकांनीं नांव ठेवण्यास कारणभूत जो दोष तो.

बंड (फा० न. ना.) राजाज्ञा नसतां सैन्यादि जमवून एकानें धनी व्हावें, एकानें कारभारी इ० व्हावें आणि प्रजांपासून खंडणी घ्यावी, मुलूख मारावा असें काहीं उत्पन्न होतें जें प्रकरण तें. २ तोतया. ३ साधुता इ० गुण अंगीं नसतां लोकांस वंचायाकरितां त्यांचें कोणी धरितो जें सोंग तें. ४ (ग्रं०) आघात. ५ (वि०) बखेडखोर.

बडगा (पु. ना.) टोणपा.

बडबड (स्त्री. ना.) प्रयोजनशून्य जें बहुत भाषण ती. २ असंगत, निर्मूल, अशुद्ध इ० दोषयुक्त जें भाषण, ग्रंथ इ० ती.

बडवणें (धा. ना.) काठी, सोटा, घण इ० कानीं काहींएक पदार्थ ठोकणें किं० वस्त्र इ० पाषाणादिकांवर उचलून आपटणें. २ बैल, टोणगा इ०कांचे अांड ठेंचणें किं० त्यांस त्या संस्कारानें विशिष्ट करणें. ३ (न. ना.) बडवण्याचें साधन टोणपा इ० तें.

बडा (वि०) मोठा.

बंडाळी (स्त्री. ना.) एकमतपणा, द्रव्य

इ० कांचे अभावादि निमित्तानें जी अव्यवस्था ती.

बडिवार, वारू (पु. ना.) अतिशयोक्ति इ० रीतीनें वर्णनविषय जो कोणिकाचा मोठेपणा तो.

बडेजाव (स्त्री. ना.) कोणिकाचा संपत्तिमूलक जो उत्कर्ष त्यास ह्मणतात. २ राजादिकांपुढें चोपदारांनीं म्हणायाचा शब्द आहे.

बढई (पु. ना.) सुतारकाम करणारी एक जाति आहे.

बढती (स्त्री. ना.) संपत्ति, प्रतिष्ठा यांची जी चढती कळा ती.

बढाई (स्त्री. ना.) फुशारकी.

बणवी (स्त्री. ना.) (प्र०) वणवा.

बताडा (वि०)सामान्य रीतिपेक्षां आकारपरिमाण ज्याचें मोठें असा पदार्थ तो.

बताना, णा (पु. ना.) पागोट्याचे आंत दुसरें लाहान सहान पागोटें घालतात तो.

बतावणी (स्त्री. ना.) ज्याचें सोंग आणिलें त्याच्या वर्तनाचें अनुकरणद्वारा जें प्रदर्शन सोंगाडी करितो तें. २ अल्प किं० नीरस जी कांहीं गोष्ट ती श्रोत्यांस नीट दिसे अशी बनावून सांगण्याचा प्रकार तो.

बत्ती (स्त्री. ना.) दारूचे बाण, फटाके इ०कांस पेटवायाकरितां दारूंत घोळलेलें सूत इ० त्यांस संबद्ध करितात ती. २ दिवा इ०कांचे वातीसही कदाचित् ह्मणतात. बत्ती लावणें म्ह० घर इ०कांस आग लावणें किं० कज्जा लावणें. ३ एक पागोटें उभें चिरून जीं अरुंद दोन पागोटीं कैरितात तीं प्रत्येकीं किं० तितक्या रुंदीचेंच विणलें असतें जें पागोटें तें.

बत्तीसलक्षणी (वि०) शास्त्रामध्यें स्त्रिया, पुरुष यांचीं उत्तम लक्षणें बत्तीस लिहिलीं आहेत तींहीकरून युक्त तो.

बद (पु. ना.) आडसंधीस गर्मीमुळें एक निर्मुख गळवासारिखें उठाणूं होतें तो.

बंद (फा० पु. ना.) कांहींएक पदार्थ बांधायासाठीं साधनभूत जो दोरी इ० कांचा तुकडा तो. २ तेणेंकरून बांधिलें असतां पदार्थाभोंवता होतो जो रचनाविशेष तो. ३ अंगरखा, पालखीचा पडदा इ०कांस लाविला असतो जो कसा तो. ४ कोणिक गोष्टीविषयीं अमुकानें, अमुक काळीं, अमुक रीतीनें, अमुक करावें या बाहेर वर्तूं नये असा शास्त्र, राजा, लोक इ०कांनी केला असतो जो नियम तो. ५ कारागृहादिकांच्याठायीं जी प्रतिबद्धता ती. ६ दोन वर्खांचा जो कागदाचा तुकडा तो. ७ (वि०) गति कुंठित होऊन प्रतिबद्ध झाला जो मार्ग, व्यवहार, उदक, भाषण इ० तो.

बदकर्म (न. ना.) व्यभिचार इ० दुष्कर्म तें.

बदका (पु. ना.) शरीरादिकांवर बुक्कीनें जो प्रहार तो. २ भिंत इ०कांवर टाकणें, मारणें इ०कांसाठीं घेतला किं० घेण्यास उद्देशिला जो बचक-

भर चिखल, शेण, लेंडी इ०कांचा गोळा तो.

**बदनकशा** (फा० पु. ना.) कोणेकानें कीर्तीसाठीं आरंभिला जो व्यापार तें इच्छिल्याप्रमाणें सिद्धीस न गेल्यामुळें होय जी वचेरी तो.

**बदनामी** (फा०स्त्री. ना.) युद्धाच्या ठायीं पलायन किं० आरंभिलेलें कार्य तडीस न गेलें इ० कारणामुळें आजाऊन होतो जो दुर्लौकिक तो.

**बदफैल** (फा० वि०) नीतिविरुद्ध आचार करितो तो. [न्मत्त

**बदमस्त** (फा० वि०) पराकाष्ठेचा उ-

**बंदर** (फा० न. ना.) ग्रामादिकांच्या आश्रयानें समुद्राचे किं० खाडीचे कांठीं जी गलबतें लागायाची जागा असते तें किं० तद्विशिष्ट गांवही तें २ समुद्राचा जो कांठ तो.

**बंदरसई, सही** (वि०) जलमार्गानें किं० खुशकीनें बंदरांत दाखल झाला जो पदार्थ तो.

**बदल** (अर० अव्य०) कांहीं आपल्या जवळील वस्तु दुसऱ्यास देऊन त्यापासून विक्रय व्यवहारावांचून तत्प्रतिनिधिलेंकरू । कांहीं दुसरें घ्यावें अशा संकेतानें देणें, करणें इ०कांचें वि०. २ अवश्य द्यावयाचें, घ्यावयाचें, करावयाचें जें कांहीं तदभावीं त्या स्थानीं त्याच्या प्रतिनिधिलेंकरून देणें, घेणें, करणें इ०कांचे वि०. ३ कांहींएक निमित्तामुळें.

**बदलणें** (धा. ना.) मूळचा जो पदार्थ तो अन्यत्र नेऊन त्या ठिकाणीं दुसरा त्याच जातीचा आणणें. २ फिरणें- तृतीयार्थी.

**बदला** (अर० अव्य०) बदलप्रथम- द्वितीयार्थी. २ (पु. ना.) कोणेकास रुपये इ० नाणें द्यावयाचें असतां पारखून देतेसमयीं त्यांत जो वाईट ऐवज निघतो; जो पुनः बदलून द्यावा लागतो तो.

**बदलामी** (फा० स्त्री. ना.) आपण अपराध इ० मुळींच केला नसतां किं० बुद्ध्या केला नसतां जें एखादें दुर्निमित्त प्राप्त होतें तें.

**बदली** (स्त्री. ना.) अधिकारादिक जीं अनेक स्थानें आणि अधिकारी इ० जे अनेक स्थानीं त्यांचा या स्थानींचा त्या स्थानीं त्या स्थानींचा तिसऱ्या स्थानीं इ० रूप जो स्थानभेद तो.

**बदलौकीक** (फा० सं.) (पु. ना.) दुष्कर्मादि आचरणमूलक जी अपकीर्ति तो.

**बदसुरत** (फा० वि०) कुरूप.

**दसूर** (फा० सं.) (पु.ना.) अपसूर.

**बंदा** (फा० पु. ना.) आपले दासीचा जो पुत्र तो. २ ओशाळगतीमुळें दुसऱ्याचे आज्ञेत वागतो तो त्याचा. ३ (वि०) खुर्दा, पैसे, कवड्या इ० रूपेंकरून खंडरूप झालेला नव्हे असा अखंड जो रुपया, पैसा इ०तो.

**बदाबद** (अव्य०) वृक्षादिकांवरून आंबे, फणस इ० पडणें किं० निसरड्या भुयीवर पाय निसरून माणसें इ० पडणें किं० शरीरावर बुक्या मारणें इ०कांचें वि०.

बंदिखाना (फा० पु. ना) कारागृह.

बंदिवान (पु. ना.) राजादि प्रभूनी स्वतंत्रपणें वागण्याविषयीं प्रतिबंध करून कारागृहादिकांच्याठायीं ठेविला असतो जो चोर इ० अपराधी तो.

बंदिशाळा (स्त्री. ना.) बंदिखाना.

बंदिस्त (फा० स्त्री. ना.) किल्ला, वाडा, चौथरा, देऊळ, शेताचा बांध इ०कांची विटा, दगड, चुना इ०कांनीं जी रचना ती. २ किल्ला, वाडा इ० इमारत ती.

बंदी (फा० स्त्री. ना.) कांहींएक कारणानें कांहींएक कार्यास जो प्रतिबंध तो. २ चालता जो व्यवहार इ० त्याची गति कुंठित होऊन जी अवस्थिति ती. ३ (सं. पु. ना.) राजादिकांपाशीं जो स्तुतिपाठक असतो तो.

बंदीजन (पु. ना.) स्तुतिपाठक.

बंदूक (तुर्कीभाषेंत) (स्त्री. ना.) दारूच्या योगानें गोळी माराव्याचें लोखंडाची नळी, दस्ता एतद्विशिष्ट यंत्र आहे तें.

बंदोबस्त (फा० पु. ना.) चेतनाचेतन पदार्थ किं० कोणेक व्यवहार अव्यवस्थित होऊं नये ह्मणून त्यांचें कांहींएक नियामक साधनानें इष्ट व्यवस्थेंत जें स्थापन तो किं० तेणेंकरून त्यांची होत्ये जी तशा व्यवस्थेंत स्थिति तो किं० अव्यवस्थित नहोतां राहावें असा जो त्या व्यवहारादिकांचा स्थितिप्रकार तो.

बद्द (अव्य०) कांहींएक संख्यापरिमाणांत किंचिन्मात्र न्यूनता किं० आधिक्य यांचा जो अभाव त्याचें द्योतक त्या संख्यापरिमाणाचें वि०. उ० तो गांव येथून बद्द चार कोस आहे.

बद्दू (वि०) दैववशात् व्यभिचारादि दुष्कर्म झाल्यामुळें लोकांनीं हा वाईट आहे असें मानायाजोग्या योग्यतेस पावला जो तो.

बद्ध (सं. वि०) बंधन पावला तो.

बद्धक (सं. न. ना.) पोटामध्यें अजीर्णादि विकृतीमुळें जी स्तब्धता तें. २ आपणास जाचायाजोग्या रूपानें परिणाम पावलें जें सत्कर्मादि तें.

बद्धकटाक्ष (स. न. ना.) परस्पराचें तें परम वैर तें.

बंध (सं. पु. ना.) बद्द तिसऱ्या, साहाव्या, सातव्या अर्थावांचून.
२ जेणेंकरून गुंतला जातो असा स्नेह, माया, प्रपंच इ० तो.

बंधक (वि०) (ग्रं०) लोभी. २ (पु.) विषयादिक.

बंधकी (सं. स्त्री. ना.) दासी. २ व्यभिचारिणी.

बंधणें (धा. ना.) कोणेक गोष्टीविषयीं वशकर्ता जो कोणेक त्यास कोणेकानें तद्विषयीं वश होणें. २ उभयसाध्य जो सवदा, विवाह इ० तो उभयतांस वश करून तिसऱ्यानें बनविला जाणें.

बंधन (सं. न. ना.) बांधण्याचा जो व्यापार तें. किं० तेणेंकरून होतो जो बांधलेपणा तें किं० त्याचें साधन जें दोरी इ० तें. २ संसारादिकांत गुंतायास कारण जें मोहादिक तें.

बंधाटी (स्त्री. ना.) बंदप्रथमार्थी.

बंधारण (न. ना.) बद्धचतुर्थार्थी.

बधिर (स. वि०) बहिरा.

बंधु (सं. पु. ना.) ज्याचे आईबापांचा जो पुत्र तो त्याचा. २ चुलता, मामा, भाव, मावशी, गुरु इ० जे माता पितृ सस्थानिक त्यांचे जे पुत्र ते प्रत्येकी. ३ धनी, गुरु, वतन, व्यवहार इ० एक आहे ज्यांचा असे जे ते परस्पर म्हणवितात. ४ आपला उपकारकर्ता, कैवारी जो कोणेक ईश्वरादिक त्यास म्हणतात ५ बांधव

बंधुत्व (स. न ना ) पराकाष्ठेचें जें सख्य त्यास म्हणतात.

बंधुवर्ग (स. पु. ना.) भाऊ इ० जो बंधूंचा समुदाय तो.

बन (स. वन) (न. ना.)(ग्र०) वृक्षसमुदायांनी विशिष्ट जो भूप्रभाग तें.

बनणें (धा. ना.) कोणेकास कोणेक कार्य करण्याविषयीं कालावकाश, अंतःकरणवृत्ति, द्रव्य इ० अपेक्षित असत्ये जी सामग्री त्यांचे आनुकूल्याने अनुकूळ पडणें. २ अनेकांचे अनुमतानें व्हावयाचा देव, घेव, विवाह इ० व्यवहार तो सर्व अनुमतें परस्पर अनुकूळ होऊन घटनेस येणें. ३ कोणेकानें सुशोभित दिसायाजोगे वस्त्रालंकारादि रचनेनें विशिष्ट होणें इ०. [गी एक ऊर्णावस्त्र आहे.

बनात (स्त्री. ना.) प्रावरणाचे उपयो-

बनाव (पु. ना.) कार्य यथास्थित होण्यास जीं अनेक साहित्यें पाहिजेत त्यांचें आनुकूल्यानें तें कार्य सिद्ध झालें असतां त्याजवर येतो जो सुघटितपणा तो. २ परस्परांचे संयोगानें कांहीं विशिष्ट गुणादि उत्पन्न व्हावें असा कांहीं पदार्थांचा असतो जो अनुकूल भाव तो. ३ सख्य.

बनावणें (धा. ना.) कांहीं कार्य, गोष्ट इ० त्याच्या अनुकूल व्यापारानें बनावानें विशिष्ट दिसे असें सिद्ध करणें.

बंब (पु ना.) जलादिक उंच उडविण्याचें यंत्र आहे. २ पदार्थांचें स्थूलत्व वर्णायाचें असतां हें विशेषण करितात

बंबाळ (वि०) भव्य. २ (पु. ना.) (ग्र०) समुदाय. ३ मोठा नाद.

बंब्या (पु. ना ) विद्यादि गुणांनीं रहित असून शरीरानें जो धष्टपुष्ट आणि दांडगा त्यास म्हणतात.

बभ्रा (पु. ना.) गुप्तरूपानें राखून ठेवायाची कांहीं गोष्ट तिची जी जनांत प्रसिद्धि तो. २ कोणेकाचे दुष्कर्मादि बाहेर पडल्यामुळें जी लोकांमध्यें त्याची होत्ये उपहास्यता तो.

बयाद (अर० पु. ना.) तपशील.

बरकत (अर० स्त्री. न. ना.) द्रव्यादि लाभासाठीं आरंभिला जो कांहींएक व्यापार त्याची जी संभाविलेल्या फलानुरूप फलद्रूपता ती. कि० त्या व्यवहारापासून त्या कर्त्यास होत्ये जी लब्धता ती. २ कांहींएक पदार्थ या या प्रकारें इतका व्यय झाला असतां सरावा अशी संभावना असत्ये तो तितका व्यय झाला तरी कांहीं अवशेष राहातोच असें जें त्या पदार्थास आधिक्य येतें तें.

बरकंदाज (फा० वि०) बंदूकवाला शिपाई तो. [रवर्षा.

बरकशी, बरकस (फा० स्त्री. ना.)

बरखास (फा० वि०) विसर्जित, कचेरी इ०कांचें वि०. [शरल आहे.

बरची (स्त्री. ना.) भाल्यासारिखें एक

बरट (पु. ना.) (ग्रं०) चिखल.

बरटवेबळणें (धा. ना.) (ग्रं०) सारवणें.

बरड (पु. ना.) एक क्षुद्र जंतु आहे; जो हरभरे, तुरी इ०कांत उत्पन्न होऊन तेंच धान्य पोंखरून खातो तो. २ (स्त्री.) माळजमीन.

बरतरफ (फा० वि०) अपराधादि झाल्यामुळें धन्यानें मामलत इ० अधिकारावरून केला जो च्युत तो.

बरदास्त (फा० स्त्री. ना.) पहीपाहुणा, शिष्ट, संभावित इ० जो कोणी त्याला पाहिजे काय, नको काय इ विचारून न्यूनता असेल तिचें पूरण करावें इ० रूप त्याचा समाचार घेण्याचा प्रकार तो. २ पशु, मुलें, बाल इ० पदार्थांची निगा तो.

बरबटणें (धा. ना.) चिखल, इ०कानें हात इ० पदार्थ लिप्त होणें.

बरवंटा (वि०) (ग्रं०) बरवा.

बरव (स्त्री. ना.) (ग्रं०) बरवेपणा शोभा.

बरवा (वि०) (ग्रं०) चांगला, सुंदर

बरसात, साती (स्त्री. ना.) पावसाळा. २ घोड्यास एक शैत्यापासून रोग होत असतो तो.

बरहुकूम (फा० अव्य०) त्याप्रमाणें.

रळणें (धा. ना.) निद्रा, मूर्छा इ०कांत कोणेकानें असंगत बडबडणें.

रा (वि०) उत्कृष्ट चांगला असो कीं नसो परंतु हा वाईट असें नांव ज्याला ठेवतां येत नाहीं म्ह० कोणेक कार्याचा निर्वाह सरासरी जेणेंकरून होईल अशा योग्यतेचा जो मनुष्य गोष्ट, पदार्थ इ० तो. २ दुखण्यापासून मुक्त झाला जो दुखणाईत तो.

बराडी (वि०) खाण्या पिण्याचे पदार्थांची चव न पाहतां अरब चरब पुष्कळ खाण्याचा स्वभाव ज्याचा त्यास निंदेनें म्हणतात. २ खाण्या पिण्याचा पदार्थ पाहिला असतां भीड न धरितां मागावा, दुसऱ्यानें कितीं दिलें तरी तृप्त होऊं नये असा स्वभाव ज्याचा तो.

बराबर (फा० वि०) तुल्य, समान. २ अधिक उणा नव्हे तो. ३ सहवर्तमान इ०.

बराबरी (फा० स्त्री. ना.) समता. २ अधिक द्रव्यादि लाभासाठीं आरंभिला जो साहुकारी इ० व्यापार त्यांत तोटा किं० नफा न होतां जे मूळचें द्रव्य त्याची मूळ परिमाणरूपानें जी स्थिति ती. ३ धनी आणि चाकर इ० जे उत्कृष्ट निकृष्ट त्यांचा परस्पर सख्यादि संबंध झाला असतां होत्ये जी समान योग्यता ती.

बरीक (अव्य०) वाक्यालंकार आहे.

बरीगत (स्त्री. ना.) धडगत.

बरू (पु. ना.) ज्याची प्राय: लेखणी करितात असा एक तृणवृक्ष आहे.

बरें (वि०) हितरूपेंकरून विवक्षित जें लाभ, आरोग्य इ० तें. २ (अव्य०) कांहींएक गोष्ट मनांत घेऊन अंगी-कारली अशा अर्थाचें द्योतक उद्गा-रामारिखें अव्यय आहे. केवळ वाक्या-लंकारत्वेंकरूनही प्रयोग होतो.

बरेंवाईट (नं. ना.) आरोग्यादिरूप बरें आणि रोगादिरूप वाईट तें.

बर्फ (फा० न. ना.) आकाशांतून द-हिंवर पडून थंडीच्या योगानें थिजतें तें

बल, ळ (सं. न. ना.) अर्थमात्राचे अंगीं शरीरदृढता, विद्वत्ता, धनि-कता इ० जो धर्मविशेष असतो तें. २ सैन्य.

बलक (पु. ना.) कोरफड इ०कांत जो बुळबुळीत केवळ पातळ नव्हे, केवळ दाट नव्हे असा द्रव्यांश वि-शेष असतो तो आणि तत्सजातीय कित्येक पुष्पें, फळें, पत्रें इ०कां-पासून निघतो जो द्रव्यांश तो.

बलकुबल (स्त्री. ना.) कांहींएक सं-भाव्यमान जो संकटप्रसंग तो.

बलंगी (स्त्री. ना) (ग्रं०) बाजरीच्या निबुराचें कसपट किं० नें दांतांत अ-डकल्यानें होतें दुःख तें. [लाढ्य तो.

बलवत्तर (वि०) अतिशयित जो ब-

बलहा (सं. पु. ना) इंद्र.

बलाई (स्त्री. ना.) बलाय.

बलागत (स्त्री. ना.) आपण उद्योग न करितां बळेंच प्राप्त होतें जें क-ज्जा इ० लचांड तें.

बलांडा वि०) (ग्रं०) विद्या, बुद्धि, पराक्रम इ०कानें मोठा तो.

बलाढ्य (सं. वि०) विशेष बल आहे ज्यास तो.

बलात्कार (सं. पु. ना.) तें तें कर्मादि होण्यास कर्त्याची प्रीति, नीति, का-लमाहात्म्य इ० जी प्रसिद्ध अनेक निमित्तें आहेत त्यांचा अभाव अस-तांही तें तें कर्मादि प्रवृत्त व्हावें म्हणून त्यावर केवळ बलाचा प्रयोग करि-तात तो.

बलाबल (सं. न. ना.) वाद प्रतिवा-दादि दोन पक्ष त्यांतून एकास सबलत्व आणि दुसऱ्यास दुर्बलत्व असतें तें.

बलामत (फा० स्त्री. ना.) बलागत.

बलाय (स्त्री. ना.) इडापिडा.

बलावणें (धा. ना.) पाचारणें. २ (न.) आमंत्रण.

बलाहक (सं. पु. ना.) (ग्रं०) मेघ.

बलि, ळी (सं. पु. ना.) देवता, पि-शाच इ०कांचे प्रीत्यर्थ अन्नाचा गो-ळा इ० किं० मांस, पशुपक्षी मारून किं० जिताच अर्पितात तो.

बलिष्ठ बळिष्ट (सं. वि०) अति-बलाढ्य तो.

बली, ळी (सं. वि०) बलाढ्य. २ बाली.

बलुतें (न. ना.) गांवचे वतनदार जे उपाध्या, जोशी न्हावी, परीट, इ० त्यांस चाकरी बद्दल द्यावें लाग-तें शेतावर धान्यादि तें. २ तीं जी बारा वतनें त्यांस प्रसंगविशेषीं म्हणतात.

बल्लम (पु. ना.) भाल्यासारिखा एक शस्त्रविशेष आहे.

**बशर्त** (फा० स्त्री. ना.) कांहीं कार्याविषयीं यत्नाची पराकाष्ठा ती. २ (अव्य०) यत्नाची पराकाष्ठा करून.

**बस** (फा० अव्य०) पुरे. २ (स्त्री.) यापुढें उत्कर्ष व्हावयाचा राहिला नाहीं अशी कोणेक व्यवहाराची पराकाष्ठेची पूर्तता ती.

**बसक** (स्त्री. ना.) अनेकांनीं बसावें ह्मणून सभामंडप इ०कांत आस्तरलेलें रुजामा, सतरंजी इ० ती. २ पदार्थमात्राचा आधाराशीं संबंध होऊन राहायाचा जो अधोभाग ती इ०.

**बसकर** (स्त्री. पु. न. ना.) सभा इ०कांच्या ठायीं बसायास घालायाच्या उपयोगी रुजामा, सतरंजी इ० तो ती तें.

**बसणें** (धा. ना.) केवळ आडवें न पडतां पायांचे संबंधानें जी शरीरास उच्चता येत्ये तिनकी मात्र नाहींशी व्हायाजोगें पायांचे आकुंचनानें किं० इतर अंगठें टेकल्यानें जो स्थितिविशेष होतो तेणेंकरून राहणें. २ पक्ष्यांनीं वृक्षादि आधारावर पक्ष संकुचित करून कांहींएक काळ स्थितिविशिष्ट होणें. ३ चाबूक, छडी इ० शरीरादिकांवर प्रहार होई असा लागू होणें किं० तो प्रहार, सपाटा इ० लागू होणें. ४ सावकारी इ० व्यवहार, संपत्ति इ०कांनीं बसणें ह्म० अपकर्षदशेतें पावणें. ५ कांहींएक व्यापाराचेठायीं प्रवृत्त जो कोणीएक त्याणें तो व्यापार सोडून उगीच राहणें. ६ जेऊं लागणें इ०.

**बसवण्णा** (पु. ना.) जंगमाचे देवळांत देवतारूप नंदी असतो तो.

**बसवा** (सं. वसु) (पु. ना.) महादेवाचे पुढचा नंदी.

**बसवी** (स्त्री. ना.) कसबीण इ०कांस निंदेनें ह्मणतात आणि तिच्या आरोपानें निर्लज्जत्वादिगुणविशिष्ट जो गरत तिलाही ह्मणतात. २ जगममताची कसबीण ती.

**बस्त** (सं. पु. ना.) (ग्रं०) बोकड.

**बस्ता** (फा० पु. ना.) वस्त्राचें लाहान दिंडासारखें बांधितात गांठोडें तो. २ (वि०) राजादिकांचा बसायाचा नेहमीचा खासा घोडा तो.

**बस्तान** (न. ना.) कांहींएक कार्य, गोष्ट इ०कांचा बेनवात तें.

**बहकणें** (धा. ना.) कोणेकानें उद्देशिलेले स्थळीं जावयाचा जो मार्ग त्यापासून भ्रष्ट होऊन केवळ भलत्याच मार्गास लागणें. २ गृहस्थपणा, सभ्यपणा इ०कांचा उचित जो व्यवहारमार्ग, रीति त्यास सोडून दुर्व्यसनादि छंद लागल्यामुळें केवळ भलत्याच रीतींत शिरणें. ३ कोणेकविषयीं कल्पना चालायाचें जें संधान तें सुटून अंतःकरणवृत्ति भलत्याच संधानाकडे लागणें किं० कोणतेंच संधान न लागतां भ्रमांत पडणें. ४ त्या मनुष्यानें तशा प्रकारानें युक्त होणें. ५ मालाची किंमत इ० मनस्वी हाकणें.

**बहर** (फा० पु. स्त्री. ना.) कोणेक पदार्थांची आकर्षाचे पूर्वींची उत्कर्षाच्या पूर्णतेनें विशिष्ट जी दशा ती.

२ नृत्य, गायन इ०कांचा पराकाष्ठे-
चा जो रंग तो.

बहळ (सं. बहल) (वि०) उपयोगा-
पेक्षां मोठें जें स्थळ तो. २ (ग्रं०)
बहुत.

बहाणा (फा० पु. ना.) वास्तविक
अंश आच्छादित करून दुसऱ्यास
वंचावें ह्मणून करितात जें मिष तो.

बहादर, दूर (फा० वि०) वीर,
युद्ध इ०कांत जो शूर तो. २ अ-
सावी ती विद्या, कला इ०कांत धु-
रा जो प्रवीण तो.

बहार (पु. स्त्री. ना.) बहर.

बहाळी (स्त्री. ना.)(ग्रं०) साजुकपणा.
२ बहुतपणा. [बहिरा तो.

बहिरट (वि०) बहिरा. २ किंचित्

बहिरा (सं. बधिर) (वि०) ज्याला
कांहीं ऐकूं येत नाहीं असा जो
कान तो. आणि तशा कानाचा म-
नुष्य तो. २ वायु इ० विकृतीमुळें
ज्याची शुद्धि गेली असा जो हात,
पाय इ० अवयव तो. [साकडेस जाणें.

बहिर्दिशेसजाणें (धा. ना.) पर-

बहिर्मुख (वि०) आत्मसुखाची गोडी
ज्यास लागली नाहीं अतएव संसारिक
विषयाकडे ज्याचे चित्ताचा ओघ तो
आणि तें त्याचें अंतःकरण तो.

बहिर्लापिका (स्त्री. ना.) ज्याचे अ-
र्थ पूरणास बाहेरचें पदादि घ्यावें
लागतें असा कूटरूप कवितेचा एक
प्रकार आहे.

बहिष्कार (सं. पु. ना.) कोणेकापा-
सून अगम्यागमनादि दुष्ट कर्म घड-
ल्यामुळें जातीच्या बाहेर जी त्याची
स्थिति करितात तो. [तो.

बहुचक (वि०) चावट जो मनुष्यादि

बहुड (पु. ना.) (ग्रं०) कृपादृष्टीचा
वर्षाव. [२ फिरणें. ३ उडणें.

बहुडणें (धा. ना.)(ग्रं०) मागें सरणें.

बहुडा (पु. ना.) (ग्रं०) वर्षाव.

बहुतकरून (अव्य०) प्रायशः.

बहुतेक (वि०) यत्किंचित् अंश सोडू-
न सर्व.

बहुधा (सं. अव्य०) बहुतकरून.

बहुनायकी (स्त्री. ना.) राज्यादि व्य-
वहारांवर अनेक मतांचे जे अनेक
मनुष्य त्यांचें जें सत्ताक्रांतत्व तो.

बहुभाष, भाषी (वि०) निष्कारण
बहुत बोलतो तो.

बहुमत (सं. न. ना.) कोणेक गोष्टी-
विषयीं असतें जें बहुतांचें संमत तें.
२ (वि०) बहुतांचें संमत आहे ज्या-
विषयीं असा जो शास्त्रार्थ इ० तो.

बहुमान (सं. पु. ना.) शिष्टादिकांचा
आदरपूर्वक सन्मान तो.

बहुरणी (वि०) (ग्रं०) गाभणी जी
गाय म्हैस इ० तो.

बहुरूपी (पु. ना.) नटांमध्यें एक
जाति आहे;जो नानाप्रकारचीं सोंगें
आणून उपजीविका करितो तो.

बहुल (सं. पु. ना.) कृष्णपक्ष.
२ (वि०) बहु.

बहुवस (वि०) (ग्रं०) बहुत. २. सर्वज्ञ.

बहुवसपण (न. ना.)(ग्रं०) सर्वज्ञत्व.
२ पुष्कळपण.

बहुशः, बहुशा (सं. अव्य०) बहुधा.

बहुश्रुत (पु. ना.) थोडथोड्या सर्व विद्या ज्याणें पाहिल्या आहेत असा तो.

बहुसाल, साळ (वि०) (ग्रं०) बहुत.

बहुळ (वि०) (ग्रं०) अमित. २ वद्य.

बहुळणें (धा. ना.) (ग्रं०) व्याकुळ होणें.

बळकावणें (धा. ना.) दुसऱ्याचा पदार्थ हाताखालीं आला तो परत द्यावा असें न्यायतः असतांही न देतां बळानें आपणापाशीं राखणें.

बळजोरी (स्त्री. ना.) बलात्कार.

बळद (न. ना.) दाणे इ० साठवायाकरितां भिंतीमध्यें पोकळी राखून जें स्थळ करितात तें. २ सांचवायाचे पदार्थ, लोणचें इ० ठेवायासाठीं भोंवतालीं विटा, माती इ०कांचा परिघ करून जें आवृत स्थळ करितात तें.

बळबंड (वि०) (ग्रं०) दांडगा.

बळस, बळसें (पु. न. ना.) मुखांतून जो द्रवरूप बुळबुळीत मलांश निघतो तें.

बळावणें (धा. ना.) उत्तरोत्तर उत्कर्षदशा पावायास कारणभूत जें बळ तद्विशिष्ट रोग, शत्रु, पाऊस इ० कांनीं होणें.

बळिभद्र, भद्रा (वि०) कपाळकरंटा जो त्यास म्हणतात.

बळीकरण (न. ना.) (ग्रं०) निरोगीकरण. २ उतार.

बळें (अव्य०) दाटून.

बक्षी (पु. ना.) बक्षी.

बक्षीस (न. ना.) बक्षीस.

बा (पु. ना.) बाप. २ प्रायः मनुष्य, देव यांच्या नामापुढें बहुमानार्थ हा शब्द लागतो. उ० मोरोबा, विठोबा इ०. प्रेमानें पुत्रादिकांसही या शब्दानें व्यवहार करितात. ३ संबोधनार्थक अव्यय. [वागतो तो.

बाइलबुद्ध्या (वि०) बाइलेचे बुद्धीनें

बाई (स्त्री. ना.) मातोश्रीस किं० तिचसारिखी कोणी वडील प्रतिष्ठित जी स्त्री तीस या नांवानें व्यवहारितात. २ स्त्रियांचे व्यावहारिक नांवापुढें आदरार्थ याचा प्रयोग होतो. ३ वडील जावेस किं० कोणी प्रतिष्ठित श्रीमंत स्त्री तीस म्हणतात.

बाईल (स्त्री. ना.) ज्याबरोबर जिचें लग्न किं० पाट झाला ती त्याची.

बाउला (पु. ना.) (ग्रं०) बाहुला, पुतळा.

बाऊ (पु. ना.) मुलांस भय दाखवितेसमयीं भयंकर जे सर्व व्याघ्रापासून किडा, मुंगी इ० सर्व पदार्थ त्यास म्हणतात, किं० तसेंच शरीरावरील फोड, क्षत इ० त्यास म्हणतात.

बांक (पु. ना.) बसावयाकरितां घडोंचीसारिखा काष्ठाचा पदार्थ करितात तो. २ काष्ठादिकांचे अंगीं असणारी जी वक्रता तो. ३ परस्परांच्या अंतःकरणाचा जो विरुद्धभाव तो.

बाकस (वि०) असावा त्या सत्वांशेंकरून जो रहित तो. २ (पु. ना.) (ग्रं०) रस काढून घेतल्यावर अवशिष्ट जी उंसाची चोपटी इ० राहाते ती.

बाँका (वि०) दुसऱ्यानें जिंकून हस्तगत करायास अशक्य असा जो किल्ला, शिपाई इ० तो. २ (पु. ना.) मुखानें वाजवायाचें एक वाद्य आहे तें.

बाकी (अर० स्त्री. ना.) कांहींएक पदार्थ, गोष्ट इ०कांचा देणें, घेणें, बोलणें इ० क्रियांनीं निःशेष न होतां जो राहिला उर्वरित अंश तो.

बाकीसाकी (स्त्री. ना.) बाकी इ० तो.

बाग (फा० पु. स्त्री. ना.) उपवन.

बागडणें (धा. ना.) कुत्रीं, मांजरें इ० कांनीं आनंदांत उड्या मारणें, खेळणें.

बागडी (स्त्री. ना.) (ग्रं०) चेष्टा. २ बहुरूप खेळ. [इ० तो.

बागबगीचा (फा० पु. ना.) बाग

बागशाई (स्त्री. ना.) गृहादिकांपुढें स्थळास रम्यता यावी ह्मणून फुलझाडें केळी इ० वृक्ष लावितात ती.

बागा (पु. ना.) (ग्रं०) आकार. २ मार्ग.

बागाईत (फा० न. ना.) पाटाच्या किं० विहिरीच्या पाण्यानें करितात जें नारळी, पोफळी, केळी इ० जिन्नस तें किं० तें जिन्नस करायाजोगें सोयीचें स्थळ तें.

बागीबळ (न. ना.) (ग्रं०) कर.

बागु (पु. ना.) (ग्रं०) मार्ग. २ बाग.

बागूल (पु. ना.) मुलांस भय दाखविण्यासाठीं एक भयंकर प्राणी कल्पून त्यास हें नाम ठेविलें आहे. २ मुलांनीं भ्यावें ह्मणून भयंकर जें सोंग आणितात त्यास ह्मणतात.

बागेसरी (स्त्री. ना.) कानड्या रागांत एक भेद आहे. २ सोनाराची जी शेगडी ती.

बाचकणें (धा. ना.) कांहींएक गोष्टीविषयीं अंतःकरणानें धरिलें असतें जें संधान त्यापासून कांहीं कारणानें भ्रष्ट होऊन चकितप्राय होणें.

बाचणें (धा. ना.) तंडणें.

बाज (स्त्री. ना.) खाटलें. २ वचक.

बाजत (फा० अव्य०) शिवाय.

बाजा (पु. ना.) (ग्रं०) पलंग.

बाजा (पु. ना.) अनेक वाद्यांचा गजर तो.

बाजार (फा० पु. ना.) दुकानें मांडून क्रयविक्रयादि व्यवहार जेथें होत असतो ती जागा तो. २ तीं दुकानें व उदमीलोक यांचा जमलेला जो समुदाय तो. ३ गुप्त गोष्टीची सर्वत्र प्रसिद्धि तो. ४ अव्यवस्थेनें कोणिकाचे घरीं चालला असतो जो संसारादि व्यवहार त्यास आणि त्या घरासही ह्मणतात.

बाजारअफवा, आफवा (स्त्री. ना.) कोणेक वर्तमानाविषयीं लेखपत्रादि प्रमाणाचें प्रत्यक्ष नसतां त्याविषयीं जनमुखानें श्रवण होत असत्ये जी अफवा ती.

बाजारकरी (पु. ना.) बाजारांतील जे दुकानदार किं० बाजारांत जिन्नसपानस घ्यावयास गेले जे मनुष्य ते प्रत्येकीं. [अफवा.

बाजारबातमी (स्त्री. ना.) बाजार

बाजारबुणगें (फा० न. ना.) लढाऊ फौज सोडून दुकानदार, बायका पोरें इ० जें लष्करांत खटलें असतें तें. २ कांहींएक कार्यविषयीं उपयोगी मनुष्यांशिवाय जो मनुष्यसमुदाय जमला असतो त्यास ह्मणतात.

बाजारभाव ( पु. ना.) बाजारांत चालला असतो जो जिनसापानसाचा दर तो. [मर्थ्यविद्या ती.

बाजीगरी (स्त्री. ना.)(ग्रं०) मंत्रसा-

बाजू (फा० स्त्री. ना.) पदार्थमात्राचे वाम दक्षिण जे पार्श्वभाग ते प्र० किं० तदुपलक्षित जे दिग्विभाग ते प्रत्येकीं. २ पदार्थमात्राचे सभोंवते जे विभाग ते प्रत्येकीं किं० तदुपलक्षित जे दिग्विभाग ते प्र०. ३ फार मोठी जी सतरंजी ती. ४ परस्पर स्पर्धेनें प्रवृत्त जे वाद, युद्ध इ० त्यांचे जे दोन पक्ष ते प्र०. ५ अब्रू जावी, सर्वस्वें नाश व्हावा असा जो कोणेकावर येतो संकटसमय तो. ६ बाजी.

बाट ( पु. ना.) बाटलेपणारूप जो दोष तो. २ (वि०) बाडगा.

बाटगा (वि०) भ्रष्ट जो मनुष्य तो.

बाटणें (धा. ना.) नीच जातीशीं योनिसंबंधादि संबंध किं० अभक्ष्यभक्षणादि दुष्कर्म केल्यामुळें स्वजातीयांशीं अव्यवहार्यताप्रयोजक दोष तेणेंकरून युक्त होणें.

बाटूक (न. ना.) जोंधळ्याचीं ओलीं लाहान जीं ताटें तीं प्रत्येकीं.

बाटया (वि०)बाटलेला जो मनुष्य तो.

बाँठ (स्त्री. ना.) आंबा जून झाला ह्मणजे त्याचे बविर कठिण होतें जें कवच तीं.

बाड (न. ना.) वैद्यक, ज्योतिष इ० ग्रंथांचे वेंचे वेंचे लिहून जी वही केली असत्ये तें. २ कोणेक स्थळ आवृत्त व्हावें ह्मणून कनाथाचें किं० शेर, निवडुंग इ०कांचें करितात आवरण तें.

बांड ( पु. ना.) बणाख लुगड्यांत एक भेद आहे. तो तरणा बांड आहे ह्मणजे तरुण असून निरोगी आहे. २ कणसावांचून जोंधळ्याचें ताट तो.

बाडगा (वि०) मोठा हरामी जो मनुष्यादि तो.

बांडा (वि०) ज्याचे अंगाची भुई एका रंगाची असत्ये आणि पट्टे इतर रंगाचे असतात असा जो बैल, कुत्रा इ० पशु तो. २ कदाचित तशा रंगाचे वस्त्रासही ह्मणतात.

बाण (सं. पु. ना.) धनुष्यानें मारावयाचा जो तीर तो. २ लोखंडाचे नळींत दारू खचून त्यास काठी बांधून केला असतो जो आयुधविशेष तो. ३ तसाच कागदाचे तोट्यांत किं० कळकाचे नळकंड्यांत दारू भरून करितात जो पदार्थ तो. हातचा बाण गमावणें म्ह० वादादि व्यवहारीं आपले इच्छितानुरूप सिद्धि होण्यास आपल्यापाशीं असतें जें कांहीं साधन तें दवडणें. ४ मनुष्यनिर्मित नव्हे जें शिवलिंग तो.

बाणणें (धा. ना.) कांहींएक गोष्ट मनांत पुरतेपणीं ठसणें. २ (ग्रं०) अनुभवास येणें. ३ प्रवेशणें, प्रवेश होणें.

बाणा (पु. ना.) विद्वत्ता, धनिकता, शूरत्व इ० गुणसमुदाय जो त्यांतील ज्या गुणास पुढें करून वागतो तो त्याचा.

बाणी (स्त्री. ना.) ध्रुपद, ख्याल, श्लोक इ० एकच असतां ह्मणायाच्या ज्या अनेक चाली त्या प्रत्येकीं. बाणीवर येणें म्ह० निकरावर येणें. २ जेथें जो उद्योगादि करायाचा त्यांत किंचित् अंतर पडल्यास जें प्राप्त होतें मोठें संकट असा जो त्या त्या व्यवहाराचा जपून संभाळायाचा समय तो. ३ बाणा.

बाणीदार (वि०) चांगली आहे बाणी ज्याची असें जें गाणें, ह्मणणें इ० तें. २ ज्या ज्या विद्याकलादिकांचा जो बाणा बाळगतो तो त्या त्या विषयीं.

बात (स्त्री. ना.) गप.

बातमी (स्त्री. ना.) दूर देशादिपरोक्ष स्थळींचें जें कांहीं वर्तमान तें.

बातल (अर० वि०) खोटें जें वर्तमान, भाषण, लेख इ० तें. २ तें बोलण्याचा स्वभाव ज्याचा असा मनुष्य तो.

बात्या (वि०) निर्मूळ खोटेंच कांहीं वर्तमान करून सांगण्याचा स्वभाव ज्याचा तो.

बाद (वि०) वजा केला तो.

बादशाह (फा० पु. ना.) पातशाह.

बांदवडी (स्त्री. ना.)(ग्रं०) अधीनता.

बांध (पु. ना.) उदकादिकांच्या प्रतिबंधार्थ दगड, चुना, किं० माती इ०-कांचा जो रचनाविशेष करितात तो. २ बंदप्रथमद्विनिर्गार्थी. ३ शेतजमीनींत पेरल्यावांचून राखिली जी पट्टी ती.

बाध (सं. पु. ना.) शब्दादि प्रमाणानें कोणेक कर्मादिकास येत्ये जी प्रतिषिद्धता तो किं० कोणेक कर्मादिकास असत्ये जी प्रतिषेधकता तो. २ प्रत्यवाय.

बाधक (सं. वि०) ज्या वचनादिकांचें स्वविषयीं बाध करणारें जें विशेषविधि आदिरूप प्रमाण तो त्याचा. २ कोणेक व्यवहारास प्रतिकूल जें लेख, पत्र, कर्म इ० तें. ३ प्रत्यवायकारक.

बांधणी (स्त्री. ना.) गृह इ० बांधण्याचा प्रकार तो. २ घर इ० बांधण्याचा जो व्यापार तो.

बाधणें (धा. ना.) केलेलें कर्म, सेविलेला पदार्थ किं० झालेली कांहीं गोष्ट इ० तो उपद्रवरूपानें परिणत होणें. २ पिशाचानें कोणिकास उपद्रवदायक होणें. ३ कांहींएक वचनादिकानें कोणेक वचनादिक बाधयुक्त होणें.

बांधणें (सं. बंधन) (धा. ना.) वस्तुतः निराळे निराळे जे पदार्थ ते एकत्र संयुक्त करून त्यांणीं वियुक्त न होतां तसेंच संयुक्तपणें राहावें ह्मणून सूत्र, वल्क इ० कांचे वेष्टनानें इ० विशिष्ट करणें. २ घर, फूल, नौका इ० दगड, चुना, माती, लांकूड इ० पदार्थांनीं तत्तदाकारविशिष्ट रचनेनें निर्मिणें. याचे अर्थ अनेक आहेत ते विस्तारभयास्तव घेतले नाहींत.

बांधव (सं. पु. ना.) भाऊ, चुलता इ० जे सगोत्रींचे किं० मामा, अ-

शुर इ० जे सोयरे धायरे इ० स-संबंधी ते प्र०.

बाधा (सं. स्त्री. ना.) पिशाचादि-कृत जी पीडा ती. २ (ग्रं०) निरास.

बांधा (पु. ना.) शरीराचे हस्तपादादि अवयवांच्या सन्निवेशाचा जो प्रकार तो.

बांधाटी (स्त्री. ना.) ओंवण इ०कांस बळकटी यावी ह्मणून ज्या त्यास मध्यें मध्यें उभ्या काठ्या बांधितात त्या-प्र०.

बांधाबांध (स्त्री. ना.) अनेक ओझीं-गाठीं इ० बांधण्याचा जो व्यापार ती.

बाप (पु. ना.) ज्याचे वीर्यापासून जो उत्पन्न झाला त्याचा तो. २ दत्तकत्वादिरूप जें गौण पुत्रत्व किं० कन्यात्व ज्यास आहे त्याचा तो. ३ ग्रंथादिकांत सत्कारानें या शब्दानें संबोधन करितात. तो बापास बाप म्हणायाचा नाहीं म्ह० हिशेबाचे वाजवी गोष्टीस कोणाची मुरवत धरायाचा नाहीं असा खडखडीत स्वभावाचा.

बापजन्मांत, बापजन्मीं (अव्य०) जन्मल्यापासून हाकाळपर्यंत.

बापजादे (पु. ना.) वाडवडील.

बापडा (पु. ना.) प्रकृतीचा गरीब निरपराध असून काहीं संकटांत सांपडलेला जो मनुष्यादि त्यास करुणेच्या कळवळ्यानें त्यासमयीं म्हणतात. २ उदासीनपणा असतां त्याचे द्योतनार्थ याचा प्रयोग होतो. उ० करा बापडे माझें काय गेलें.

बापया (पु. ना.) बाप्या. २ (ग्रं०) चातक पक्षी.

बापिक (पु. ना.) (ग्रं०) कुळपरंपरागत धर्म, कुळधर्म. [नाथ, दीन.

बापुडा (वि०) (ग्रं०) बापडा, अ-

बापैया (पु. ना.)(ग्रं०) चातक पक्षी.

बाप्या (पु. ना.) बाल्य जाऊन प्रौढ दशा प्राप्त झाली ज्यास तो.

बाब (अर० स्त्री. ना.) कानू.

बाबडें (वि०) (ग्रं०) भाजलेलें.

बाबत, द (फा० अव्य०) कांहींएकानिमित्तें. २ (स्त्री. ना.) कांहीं निमित्त. [तो ज्या जमिनींत तें.

बाबर (न. ना.) सर्वदा चिखल अस-

बाबरझोंटी (स्त्री. ना.) (ग्रं०) खालीं लोंबायाजोगे मस्तकावर वाढलेले केंस ती. २ भयंकर जे सुटलेले मोकळे केंस ती.

बाबळपडणें (धा. ना.) (ग्रं०) बहुत होणें. २ वृक्ष इ०कानें विस्तारणें.

बाबळैजणें (धा. ना.) (ग्रं०) बाबळ पडणें.

बाबुळी (स्त्री. ना.) (ग्रं०) शेवाळ.

बायको (स्त्री. ना.) मनुष्यादि जीवजातीमध्यें अवांतर दोन दोन भेद आहेत त्यामध्यें ज्याच्या पोटीं गर्भ राहून प्रसव होतो तो जीव ती.

बायणी (स्त्री. ना.) (ग्रं०) बायदा.

बार (फा० पु. ना.) तोफ, बंदूक इ० कांत आवाज काढायासाठीं भरली असते जी दारू तो किं० तेणेंकरून होतो जो अवाज तो. २ फटाका इ०-

कांचा तसा जो अवाज त्यास प्रसंगानुरूप ह्मणतात. बार भरणें म्ह० कोणेकास कांहीं व्यवहारीं आपल्या इच्छेनुरूप वर्तण्याविषयीं एकांतीं शिकवून ठेवणें. बार उडविणें म्ह० कांहींएक कामास साधक जी सामग्री तिची सिद्धता गुप्तरूपें यथास्थित करून ठेवून तें इच्छित काम अकस्मात आरंभून एकाएकीं संपवून टाकणें. ३ वृक्ष लतादिकांस त्या त्या कालाच्या अनुरोधानें फळें, पुष्पें, किं० पानें यांचा उद्गम होऊन तीहीं तीहीं करून समृद्ध असावें अशा ज्या वारंवार अवस्था प्राप्त होतात त्या प्रत्येकीं. बार करणें म्ह० हुंडी, रोखा, चिटी इ० वही इ० कांवर लिहून ठेवणें.

बारगळ (वि०) स्वच्छंदी.

बारगिर (फा० पु. ना.) सरकारचे पागेचे घोड्यावर स्वार होऊन लष्कर इ० दिकांत चाकरी करितो तो.

बारदान (फा० न. ना) तेल, तूप, धान्य इ० जिन्नस साठवून ठेवायाचे उपयोगीं जें बुधला, कणिग, पोतें इ० तें. २ जहाज इ० कांवर माल, मनुष्य इ० रूप येते ओझें तें.

बारनिशी (स्त्री. ना.) कागदपत्र, हुंडी, इ० बार करण्याचा जो व्यापार तो.

बारभाई (स्त्री. ना.) कोणेक व्यवहारीं अव्यवस्थाप्रयोजक अनेक मतांचे जे अनेक त्यांचें सत्ताक्रांतत्व जें येतें ती.

बारमहा (अव्य०) बारा महिने.

बारमास (अव्य०) बारमहा.

बारव (स्त्री. ना.) थोर जी विहिर ती.

बारि (स्त्री. ना.) डोंगर, झाडी यांच्या आश्रयामुळें जेथें चोर, व्याघ्र इ० कांची संभावना असत्ये अतएव मार्गस्थांस भयंकर असें जें स्थळ ती. २ पालटप्रथमार्थी. ३ वारा किं० प्रकाश यावा म्हणून गृहादिकांस जी खिडकी राखिली असत्ये ती. ४ (ग्रं०) (पु. ना.) छत्र धरणारा तो.

बाल (सं. न. पु. ना.) अर्भक. २ पुरुषरूप जें अर्भक तो. ३ अज्ञान जो त्यास म्हणतात. ४ केश. वालबालखुष होणें म्ह० पराकाष्टेचें खुष होणें.

बालक (सं. पु. ना.) बाल.

बालत्व (सं. न. ना.) बाळपणा.

बालबोध (सं. वि०) अज्ञान जनांसही समजायाजोगा म्ह० अतिसुगम.

बालब्रह्मचारी (पु. ना.) लहानपणापासून ज्याला स्त्रीसंग घडला नाहीं आणि लग्नही ज्याचें झालें नाहीं तो.

बालभाषा (सं. स्त्री. ना.) नाटकादिकांत शूद्र, स्त्रिया इ० हलक्या पात्रांनीं बोलायाची संस्कृताची अपभ्रंशरूप एक भाषा आहे ती. २ पाण्यास हम्मा, भाकरीस पापा इ० संकेताची अर्भकाची भाषा ती.

बालमित्र (सं. पु. ना.) उभयतां बाळपणांत असतां ज्या परस्परांचें मित्रत्व झालें आहे ते परस्पर.

बालविधवा (सं. स्त्री. ना.) न्हाण आल्याच्या पूर्वी जिचा नवरा मेला ती.

बाला (सं. स्त्री.) जिला पुरती ता-रूण्यदशा प्राप्त झाली नाहीं अशी जी स्त्री ती. २ (पु. ना.) नाण्यावर ठोकायाचा शिक्का तो. ३ कोणी कोणास बाला देणें म्ह० आपण पळून जाऊन दगा देणें.

बालांट (न. ना.) ज्याचे हातून जें दुष्कर्मादि घडलें नाहीं त्यावर त्या दुष्कर्माचा आरोप करावा ह्मणून लबाडीच्या कल्पनेनें रचिली जी तद्विषयींची गोष्ट तें. [ष्यादि तो.

बालिश (सं. वि०) अज्ञान जो मनु-

बालेकिल्ला (फा० पु. ना.) पहाडी किल्ल्याच्या इतर भागांपेक्षां अति-उच्च जो भाग असतो तो.

बाल्य (सं. न. ना.) बालत्व. [विहीर.

बाव (स्त्री. ना.) मोठ्या तोंडाची

बावटा (पु. ना.) ध्वज. २ बाहुटा.

बावडी (स्त्री. ना.) बारव.

बावणें (धा. ना.) कोमेजणें. [सोनें.

बावनकशी (वि०) पराकाष्ठेचें उत्तम

बावनया, बावना (पु. ना.) (ग्रं०) मैलागरू चंदन तो. २ सार्थक.

बावरणें (धा. ना.) अद्भुतदर्शन, भय, हर्ष, पिशाचोपद्रव इ० कारणामुळें सम्रांतचित्त होणें.

बावरा (वि०) बावरला तो.

बावळा (वि०) वेडसर मुद्रा ज्याची दिसत्ये तो किं० त्याची ती मुद्रा तो.

बावा (पु. ना.) तपस्वी, गोसावी, साधु, विद्वान् इ० जे थोर त्यांस हें प्रतिष्ठानाम आहे. याचा प्रयोग नामपूर्वक किं० केवळाचा होतो.

बाव्हळ (पु. ना.) हत्याचा जो मूळ भाग तो.

बाशिंग (न. ना.) विवाहांत नवरा आणि नवरी याचें कपाळीं बांधायाचें कागदाचें भूषण आहे.

बाशिंगबळ (न. ना.) कोणेकाचा विवाह होण्यास प्रयोजक जें दैवबळ तें.

बाष्कळ (वि०) ज्याचे आचरणांत, बोलण्यांत तात्पर्य नाहीं अशा स्वभावाचा जो मनुष्य तो किं० त्याचें तें तदनुरूप भाषणादि तो.

बाष्प (सं. पु. ना.) अश्रु. २ वाफ.

बाष्ट (न. ना.) (ग्रं०) बासट.

बाँस (पु. ना.) कळक.

बासट (न. ना.) ज्या पदार्थावर जो पदार्थ भक्षिला असतां विकार होतो असे जे परस्पर विरुद्ध पदार्थ ते एकमेकाचें. २ (ग्रं०)(वि०) ओशट.

बासन (न. ना.) आंत वस्त्रें बांधून ठेवायासाठीं खारवा, छीट इ०काचा आस्तरण लाविलेला जो चतुष्कोण तुकडा केला असतो तें. २ त्यांत वस्त्रें बांधून जें गांठोडें होतें तें. ३ धातुमय किं० मृन्मय पात्र तें.

बाहणें, होणें (धा. ना.)(ग्रं०) कोणेकास शब्दानें हाकमारणें.

बाहाळी (स्त्री. ना.)(ग्रं०) बहाळी.

बाहिली (स्त्री. ना.) (ग्रं०) महत्व. २ साजुकपणा. ३ अतिशयता.

बाही (सं. बाहु ) (स्त्री. ना.) बाहुमूळाचे संधीपासून मणगटपर्यंत जो हात ती. २ अस्तनी. ३ दार इ०

काचे चौकटीचे दोहाबाजूंचे. उभ दोन अवयव ते प्रत्येकीं.

बाहु (सं. पु. ना.) भुज.

बाहुटा (पु. ना.) बाहुमूळापासून कोंपरापर्यंत जो हाताचा अवयव तो. २ स्त्रियांचें बाहुभूषण आहे.

बाहुनेह (पु. ना.) (ग्रं०) पाहुणचार.

बाहे (पु. ना.) (ग्रं०) बाहु.

बाहेर (अव्य०) कांहींएक देश, काल, पदार्थ, गोष्ट इ० कांचा अंत.प्रदेश त्याहून इतर प्रदेशीं. बाहेर जाणें म्ह० परसाकडे, लघुशंकेस जाणें.

बाहेरसवाडियाभंगी (अव्य०) (ग्रं०) अट्टाच, वरून वरून.

बाह्य (वि.) बाहेरील. २ (पु. ना.) (ग्रं) विषयांस म्हणतात. ३ इंद्रियें.

बाह्याकारीं (अव्य०) अंतःकरणांत कांहीं निराळा भाव राखून दुसऱ्या भावानें. २ बाहेरचा जो आकार त्याच्याठायीं.

बाळ (न. ना.) बाल. [तिविव.

बाळकें (न. ना.)(ग्रं०) छाया. २प्र-

बाळगण (स्त्री. ना.) लाहान मुलाचे संरक्षणाचा व्यापार तो.

बाळगणें (धा. ना.) पोर, पशु इ० कास पालन, पोषण इ०योग्य उपचारांनीं संभाळणें. २ कांहीं मूर्तामूर्त पदार्थ स्वसत्ताविषयांत ठेवणें; जेणेंकरून भारण तद्वान् होतो.

बाळगोपाळ (पु. ना.) ग्रामादिकांतील सर्व लाहानथोर जे मनुष्य त्यांस म्हणतात. [लेली जी स्त्री ती.

बाळंत (वि. ना.) नूतन प्रसूत झा-

बाळंतिण (स्त्री. ना) बाळंत.

बाळंतें (न. ना) बाळंतिणीचे मुलाचीं अंथरायाचीं इ० जीं मळीन वस्त्रें तीं प्रत्येकीं. २ त्या संबंधानें मळीन झालें जें बाळंतिणीच्या अंगावरचें वस्त्र त्यासही म्हणतात.

बाळपरवेशी (स्त्री. ना.) स्वामिकार्यावर मेला जो कोणी शिपाई इ० त्याचे पोरांबाळांस उपजीविकेसाठीं निरंतर चालायाजोगें देतात जें भूमि, द्रव्य इ० ती. २(वि०) बाळपणापासून जोडलेला जो चाकरी, मित्रत्व इ०कोणेकाचा संबंध तो किं० ते चाकर, मित्र इ० संबंधी तो.

बाळबद (न. ना.) महाराष्ट्र लोकांची एक लिपि आहे तें. २ (वि०) कपटकूरतादिरहित जो मनुष्यादिक ते. किं० त्याचा जो सर्वांस समजायाजोगा सरळ भाषणादि व्यवहार तो.

बाळबोध (वि०) बालबोध. २बाळबद.

बाळवाटी (स्त्री. ना.) भोजनास उशीर होईल म्हणून सकाळचे प्रहरीं जो कांहीं अल्प उपहार करितात ती.

बाळसंतोष (पु. ना.) भिकाऱ्यांत एक जाति आहे; जे प्रायः वस्त्रें मागतात.

बाळसें (न. ना.) वर्ष साहा महिन्यांचे आंत मुलाचे अंगावर जी पुष्टता येत्ये तें.

बाळस्वार (वि०) ज्या गोष्टीविषयीं ज्याचा जन्माभ्यास तो त्या गोष्टीविषयीं.

बिकट (सं. विकट) (वि०) अवघड.

बिकलम (न. ना.) खत, पत्र इ० कां-वर हें अमक्याचे हातचें अक्षर असें समजायाकरितां एतच्छब्दपूर्वक किं० हस्ताक्षरशब्दपूर्वक आपल्या नावाचा लेखकानें जो शेवटीं लेख केला असतो तें.

बिगार (स्त्री. ना.) मोल नघेतां सरकार इ० कांचें काम करावें लागतें तो किं० तसें काम करण्याचा जो प्रकार तो. २ तशा प्रकारानें ग्रामांतरादिकांस पोहोंचावयाचें जें ओझें इ० त्यास म्हणतात. ३ अनास्थेनें जें सरासरी काम करितात त्यास म्हणतात.

बिंगें (सं. व्यंग) (न. ना.) अपेक्षित जो साहित्यसमुदाय त्यामध्यें एकादे पदार्थाचे अभावामुळें कार्य यथास्थित शोभिवंत दिसूं नये असें जें त्या कार्यांत कांहीं उणें पडतें तें.

बिघडणें (धा. ना.) कोणेक पदार्थ, गोष्ट, इ० कांचे अंगीं कांहींएक कर्मास उपयोगीं असतो जो गुण तो नसल्यामुळें किं० कांहीं विरुद्ध गुण असल्यामुळें तो पदार्थ, गोष्ट इ० त्या कर्माविषयीं निरुपयोगयुक्त करणें. कोणेकानें कोणेकाशीं बिघडणें म्ह० परस्परांचीं अंतःकरणें विरुद्धभावविशिष्ट होणें.

बिघडाबिघड (स्त्री. ना.) कोणेक कार्यसाधकभूत जे अनेक पदार्थ त्यांचा जो बिघडलेपणा किं० त्याच्या मूळभूतकार्याचा बिघडलेपणा तो.

बिघाड (पु. ना.) परस्परांचे अंतःकरणाचा किं० घडायास आली जी गोष्ट तिचा बिघडलेपणा तो.

बिचकणें (धा. ना.) अकस्मात् अद्भुत किं० भयानक कांहीं पाहिल्यामुळें साधारण जो अंतःकरणवृत्तीचा ओघ चालला असतो तो परावृत्त होऊन क्षणमात्र सभ्रांतप्राय होणें. [करणें.

बिचकावणें (धा. ना.) बिचके असा

बिचलणें (धा. ना.) पोर, गुरूं, घोडें इ० कानें पूर्वींचा योग्य रीतीचा स्वभाव सोडून कोणेकानें ऐकूं नये, कोणाला मारावें, शिव्या द्याव्या, पळावें इ० अयोग्य स्वभावविशिष्ट पोर इ० कांस कोणेकानें करणें.

बिचवा (फा० पु. ना.) ज्यास मध्यें खांब नाहीं असा लाहान डेरा, तंबू तो. २ एकप्रकारचें शस्त्र आहे.

बिचारा (फा० वि०) बापडा.

बिछाइती (पु. ना.) पेंठ, बाजार यांत बाहेरून कांहीं माल घेऊन विकावयाकरितां आलेला उदमी तो. २ बांदस्तीचें दुकान नसतां रस्त्यांत किं० कोणाचे ओट्यावर कांहीं किरकोळ माल घेऊन विकायास बसलेला जो उदमी तो. ३ (वि०) त्याजवळचा तसा जो माल तो.

बिछाईत (अर० स्त्री. ना.) अनेकांनीं बसावें इ० कारणासाठीं भूमि इ० कांवर सत्रंजी, रुजामा, इ० कांचें जें आंतरण करितात तें. २ बाहेरून माल घेऊन आलेला उदमी. [रुदणें.

बिजणें (धा. ना.) (ग्रं०) बीज वि-

**बिजवर** (पु. ना.) दुसरें लग्न करायास जो नवरा झाला तो.

**बिजागरें** (न. ना.) पेटी, फडताळ इ० काचें झाकण उघडावें, पुनः मिटावें म्हणून त्या उभयतांच्या संधीस सांध्यांची पट्टी मारितात तें.

**बिजावळी** (स्त्री. ना.) (ग्रं०) भेद, भिन्नता.

**बिडती** (स्त्री. ना०) दोहोंकडून जो संकटप्रसंग प्राप्त होतो ती. २ दुर्निर्वह जें संकट तेथेंही प्रयोग करितात.

**बिंडा** (पु. ना.) सूत, दोरी इ०काचें गुंडाळून केलें जें भेंडोळें तो. २पर्वताचे मस्तकावर किं० भूमीवर ठेवल्यासारखा जो गोलाकार अवयव वाढला असतो तो. ३ काष्ठ, गवत इ० कांचा जो लहान भारा तो.

**बिडाल, ळ, लक, ळक** (सं. पु.ना.) मांजर.

**बिडी** (स्त्री. ना.) अपराध्याचे पायांत प्रतिबंधार्थ शृंखला घालितात ती. २ शूद्रादिक रुप्याचें वलय करून शोभेसाठीं पायांत घालितात ती. ३ स्त्री पुत्र ममता स्नेह इ० ज्याचे योगानें जडकला जातो त्यास म्हणतात.

**बिडीस** (न. ना.) (ग्रं०) आमिष.

**बिडौज** (सं. पु. ना.) इंद्र.

**बिढार** (न. ना.) बिऱ्हाड.

**बितणें** (धा. ना.) कांहींएक गोष्ट मध्यें कालावकाश नाहीं अशी समीप येऊन ठेपणें. २ भाररूप किं० संकटरूप कर्मादिक जें तें कोणेकावर येऊन पडणें. ३ कज्जा, लढाई इ० प्रवृत्त होणें. [लवार.

**बितपशील** (फा० अव्य०) तपशी-

**बित्तीम** (अर०वि०) वास्तविक, खरें, निश्चयात्मक वर्तमान इ० तें.

**बिथरणें** (धा.ना.) कोणेक कर्माविषयीं कोणेकाशीं अनुकूल भावानें वागणारा जो कोणीएक त्यास प्रतिकूल भावानें विशिष्ट करणें किंवा त्यानें तसें होणें. २ घटनेस आलेलें जें कांहीं काम तें बिघडणें. ३ सोयीनें वागत असतो जो कोणी त्याणें कांहीं कारणामुळें क्षोभणें.

**बिंदडी** (स्त्री. ना.) वस्ताप्रथमार्थी.

**बिदा, बिदाई, बिदागी** (अर० स्त्री. ना.) पाठवणी.

**बिंदु** (सं. पु. ना.) ठिपका २ अनुस्वारबोधक किं० विसर्गबोधक जें चिन्ह तो.

**बिंदुलें** (न. ना.) (ग्रं०) बिंदुशून्य.

**बिन** (सं. विना.) (अव्य०) रहिततेंकरून, वांचून, शिवाय. २ (अर०) (पु. ना.) पुत्र. उ० रामभट बिन कृष्णभट. [बिघडणें.

**बिनसणें** (सं. विनाश) (धा. ना.)

**बिनाखी** (स्त्री. ना.) कांहीं एक गोष्टीचा संदेह न राहण्याजोगा चौकशी इ० कानें फाड ती.

**बिनी** (फा. स्त्री. ना.) सैन्यादिकांचा अग्रभाग तो. २ कपाळावर यावयाचा जो पागोटें, पगडी इ०-

कांचा अग्रभाग तो. ३ दाराचे चौकटीचा जो वरचा भाग तो.
बिंब (सं. न. ना.) सूर्य, चंद्र यांचीं जीं मंडलें तीं प्रत्येकीं. २ आरसा, जल इ० कांत ज्या रूपाचें प्रतिबिंब दिसतें असें जें मुख्य रूप तें. ३ तोंडलें. ४ दृष्टांत इ० अलंकारविशिष्ट भाषणामध्यें दार्ष्टांतिकादिरूप जो प्रतिपाद्य अर्थ तें. [ओलो भूमि.
बिबडु (पु. ना.) (ग्रं०) नीट केलेली
बिंबणें (धा. ना.) कांहींएक गोष्ट इ० अर्थ, आरसा इ० कांत जसें पदार्थाचें प्रतिबिंब पडतें तसें अंतःकरणांत प्रतिबिंब पडे असा जाणला जाणें.
बिबुड (न. स्त्री. ना.) पर्जन्य नसल्या कारणामुळें शेत इ०कांत बियापुरतेंही धान्य उत्पन्न होऊं नये असा जो अभाव होतो तें तो. २ मनुष्यादि जाति किं० कांहीं इतर पदार्थ यांचा रोगादि कारणामुळें बीजभूत ईषन्मात्रही अंश राहूं नये असा जो अभाव होतो तो.
बियाणें (न. ना.) भूमींत घालून त्या त्या वृक्ष, धान्य इ०कांची उत्पत्ति करावी म्हणून उद्दिष्ट जें धान्य इ० कांचें बीज तें.
बियांवळ (स्त्री. ना.) भेंड्या, काकड्या इ० कांचें बीं दुसरे सालीं पेरावयासाठीं ठेवितात तो.
बिराणा (पु. ना.) (ग्रं०) वीरपुरुष किं० वीरभद्र. २ बाराच्या दारूचा दाणा.
बिरार (पु. ना.) (ग्रं०) विकार.
बिरीद (सं. बिरुद) (न. ना.) जो कोणी ज्या विद्या, कलादि गुणाविषयीं बाणा बाळगतो त्याचें ज्ञापकचिन्ह हस्तादिकांच्या ठायीं जें बाळगितो तें. २ बाणा.
बिरुद (सं. न. ना.) बिरीद.
बिऱ्हाड (न. ना.) परसत्ताक असून कांहीं दिवस राहाण्याकरितां आपल्याकडे घेतात जें घर किं० घराचा कांहीं भाग इ० स्थळ तें. २ त्या स्थळीं राहाणाराचें असतें जें हांडें भांडें, वस्त्र पात्र इ० खटलें तें. इ०.
बिलगणें (धा. ना.) कोणेकापासून कांहीं काढून घ्यावें किं० कोणेकास पराजित करावें, लुटावें इ० कारणासाठीं त्या त्याशीं तिकडचा वेग अंगीं धरून भिडणें.
बिलंद (फा० वि०) अट्टल.
बिलवर (न. ना.) बिलोर. [कांच तें.
बिलोर (फा० न. ना.) उंची जी
बिशाद, शात (स्त्री. ना.) पैका किं० ज्यापासून विक्रयादिद्वारा पैका उत्पन्न होतो असा जो वस्त्र, पात्र, भूषण इ० पदार्थ तो. २ विशेष नगांशामुळें पदार्थाचे अंगीं असत्ये जी गणनीयरूपता ती किं० तीस कारणभूत जो पदार्थनिष्ठ तत्वांश तो.
बिसाट (वि०)(ग्रं०)सामान्य.२भलता.
बिसाटणें (धा. ना.) (ग्रं०) पसरणें.
बिहणें (धा. ना.) (ग्रं०) भिणें.
बिहिती (स्त्री. ना.) (ग्रं०) भीति.
बिहीक (स्त्री. ना.) (ग्रं०) भय.
बी (सं. बीज) (स्त्री. ना.) फलाचे आंतील जी बीजांशरूप व्यक्ति ती.

बीं (बी) (न. ना.) राजगिरा, माठ इ० कांवर येतो जो बीजसमुदाय तें २ बियाणें.

बीक (स्त्री. ना.) (ग्रं०) आवड २ सौंदर्य, शोभा, तेज. ३ सामर्थ्य.

बीज (सं. न. ना.) मनुष्य, पशु, पक्षी, वृक्ष, लता इ० पदार्थांचें मूल भूत मुख्य जें उत्पत्तिकारण रेत इ० जें त्या त्या पदार्थांचें सूक्ष्मरूप होय तें. २ कांहीं व्यवहार, कलह इ०कांचें मूळकारण तें.

बीजावळी (स्त्री. ना.) (ग्रं०) भिन्नता.

बीद (स्त्री. ना.) गांवांतील लाहान मोठा मार्ग तो.

बीभत्स (सं. पु. ना.) नवरसांतील एक रस आहे. २ (वि०) रक्त, कुजलेलें मांस, पू, विष्ठा, शिश्न, योनि इ० ओंगळ पदार्थ किं० तद्विशिष्ट स्थळ किं० तद्वाचक शब्द इ० तो. ३ बिभत्स शब्द बोलण्याचा स्वभाव ज्याचा तो.

बीर (सं. वीर) (पु. ना.) मंत्रसाध्य देवता आहे. कोणेकास बीर भरणें, देणें म्ह०कलहादिकांविषयीं तेथानें प्रवृत्त होई असा उत्तेजनव्यापार करणें.

बीरभाटीव (पु. ना.) (ग्रं०) वीररस.

बीळ (न. ना.) उंदीर इ० कांचे राहण्याचें जमीन इ० कांतील भोंक.

बुकटी (स्त्री. ना.) औषधादिकांचें चूर्ण तें.

बुकणी (स्त्री. ना.) बुकटी.

बुकलणें (धा. ना.) मनुष्यादिकास बुक्यांनीं मारणें.

बुकी (स्त्री. ना.) मारण्यासाठीं केली जी हाताची मूठ ती. २ बुकणी.

बुचकळणें (धा. ना.) कांहीएक पदार्थ जलादिद्रवरूप पदार्थांत बुडवून बाहेर काढणें. २ कांहीएक व्यवहारांत कर्तव्याचा निश्चय होईनासा झाल्यामुळें असें करावें कीं तसें करावें इ० अनेकवार बुद्धि होई अशा दशेनें पावणें किं० बुद्धीनें कुंठित होऊन जडप्रायता पावणें. ३ (ग्रं०) निमग्न होणें.

बुचकळी (स्त्री. ना.) मनुष्यादिकानें उदकादिकांत पटकन बुडून वर यावें इतका जो व्यापार ती.

बुचकुली (स्त्री. ना.) पीठ इ० पदार्थ घेण्याकरितां पालथा कमलाकार केला जो हस्त ती.

बुचडा (पु. ना.) डोकीचे केसांचीं अग्रें एकत्र करून गांठ द्यावी आणि ते केस गुंडाळून आंतले आंत गुंतविले असतां किं० वेणी करून गुंडाळून तें गुंडाळें केसांत गुंतविलें असतां जो रचनाविशेष होतो तो.

बुचबुचणें (धा. ना.) कृमि, उवा इ०कांचा क्षत, केश इ०कांच्याठायीं बुचबुचाट झाल्यामुळें कृमि इ०कांनीं चलनवलनविशिष्ट होणें.

बुचा (वि०) ज्या शरीरावयवाच्याठायीं जें भूषण असावें तद्रहित जो अवयव तो.

बुचाटणें, बुचाडणें (धा. ना.) अंगावरचे अलंकार, वस्त्रादिक पदार्थ, तो पदार्थ मोडेल, तुटेल, फाटेल हें न पाहतां त्वरेनें ओरबडून घेणें.

२ कोणेकापासून चोर इ० कानें काहींएक विषय लुबाडून घेणें.

बुजगवणें, गावणें (न. ना.) पशु, पक्षी इ० कानीं भ्याचें म्हणून शेत इ० काच्याठायीं केलें असतें जें तृणादिकांचें मनुष्य, सिंह इ० कांचें बाहुलें इ० तें. २ प्रसंग पडला असतां चोर इ० कांचा पराभव करण्याचें सामर्थ्य नसतांही ज्याला बाह्यात्कारावरूनच ते चोर इ० क भीत असावे असें जें काहीं वस्तु, क्रिया इ० तें.

बुजट (वि०) बुजण्याचा स्वभाव ज्याचा तो.

बुजणें (धा. ना.) भयचकित होणें. २ कोणेक छिद्र भरलें जाणें किं० भरे असें करणें.

बुजरा (वि०) बुजट.

बुजावणें (न. ना.) बुजगावणें.

बुजीर (वि०) बुजट.

बुझणें (धा. ना.) बुजणें. २ (ग्रं०) समजणें. ३ जाणणें.

बुटका (वि०) आखूड.

बुटबूट (स्त्री. ना.) पुटपूट.

बुटी (स्त्री. ना.) वस्त्रादिकांवर रंगादिकानें जीं पुष्प, पर्ण, फल इ०-कांचीं चिन्हें केलीं असतात तीं. २ विलक्षण गुणकारक कोणेकापाशीं असतें गुप्त औषध तें.

बुडकी (स्त्री. ना.) उन्हाळ्यांत नदी, ओढा इ० कांचे काठीं मोट इ० लावायाकरितां नदी इ०कांचें पाणी येऊन सांचे अशी जी खळी खणितात ती. २ बुडी.

बुडखा (पु. ना.) वृक्ष, काष्ठ, पान, गोष्ट इ० पदार्थांचें मूळ आणि अग्र असे जे दोन प्रांत असतात त्यामध्यें मूळरूप विभाग किं० मूळाकडील विभाग तो.

बुडणें (धा. ना.) कोणेकानें जलादिकांत अंतर्हित होणें. २ विद्या, व्यापार, देणें, घेणें, दुःख, सुख इ०कांकरून कोणेकानें केवळ व्यापलें जाणें. ३ द्रव्य इ०कानीं हानीतें पावणें किं० त्यास मूळकारण जी अपकर्षदशा तिणेंकरून युक्त मनुष्य, देश इ०कानें होणें इ०.

बुडताकाळ (पु. ना.) संवत्सरादिकांचा उत्तरोत्तर अपकर्ष होण्यास कारण जो काळ तो.

बुडतापाया (पु. ना.) बुडत्या काळाची आरंभअवस्था तो.

बुडबुडा (पु. ना.) उदक, दूध इ० सद्रव पदार्थांचा मौक्तिकाकार जो क्षणिक विकारविशेष उत्पन्न होतो तो.

बुडसळ (पु. ना.) (ग्रं०) पानें झडून वाळलेला जो वृक्ष तो.

बुडी (स्त्री. ना.) उदकादिकांच्याठायीं प्रायः बुद्धिपूर्वक बुडण्याचा व्यापार तो. २ देशांतराच्याठायीं काहीं काळ जाऊन राहण्याचा व्यापार तोसही म्हणतात.

बुडीं (अव्य०) तळीं.

बुडीत (न. ना.) कोणेक व्यवहारीं फलादिकांवर दृष्टि न ठेवितां केवळ हें बुडालें अशा बुद्धीनें कोणेकास देणें इ० द्वारा खर्चावें लागतें जें द्रव्यादिक तें.

बुडूख (न. ना.) बुडखा.
बुणगें (फा० न. ना.) बाजार बुणगें.
बुंथी (स्त्री. ना.) (ग्रं०) घुंगट.
बुंद (पु. ना.) एक औषधीचें फळ आहे. २ बिंदुप्रथमार्थी. ३ (वि०) लालपणाचा अतिशय वर्णनीय असता हें वि०.
बुद्ध (सं. पु. ना.) नास्तिकमतप्रवर्तक देव आहे. २ (वि०) जाणलागेला जो कांहीं अर्थ तो. ३ बोध झाला आहे ज्यास तो.
बुद्धि (सं. स्त्री. ना.) निश्चयात्मक जी अंत:करणवृत्ति ती. २ विद्या, कला, लोकव्यवहार, दुसऱ्याचें इंगित इ० जाणणें, पाठकरणें, न विसरतां धरणें इ० विषयीं साधनभूत जी अंत:करणशक्ति ती.
बुद्धिपुर:सर (सं. अव्य०) सहजगतीनें नव्हे असें अंत:करणानें तोच उद्देश धरून उठली जी वृत्ति तीणेंकरून.
बुद्धिपूर्वक (अव्य०) बुद्धिपुर:सर.
बुद्धिवाद (सं. पु. ना.) कोणी कोणेकास तूं याप्रकारें असें असें कर त्यांत तुझें बरें होईल इ० रूप कथितो जें बुद्धीविषयीं उपदेशात्मक वाक्य तो.
बुद्ध्या (सं. अव्य०) बुद्धिपूर्वक.
बुद्बुद (सं. पु. ना.) बुडबुडा.
बुद्रूख (फा० वि०) कोणेक सजातीय मंडळींत वयानें थोर, बुद्धीनें प्रौढ असा जो मनुष्यादिक तो. २ एक प्रांत, परगणा इ०कांत एका नावाचे दोन गांव, दोन पुरुष इ० असतां त्यांत जो अगोदरचा किं० मोठा किं० प्रतिष्ठित त्याचें हें वि०.
बुंध (न. ना.) वृक्ष, तृण, केरसुणी इ०कांचा मूलरूप विभाग तें. २ पर्वतादिकांचा तळ म्हणून जो विभाग तें.
बुधनालदांडा (पु. ना.) (ग्रं०) झाडाचे बुंधाशीं नालाप्रमाणें वांकवून बांधून दांड्यानें मारण्याचा व्यापार तो.
बुधलेमार (पु. ना.) (ग्रं०) आंत दारू भरलेल्या बुधल्याशीं बांधून दारूस आग लावून कोणेकास मारण्याचा व्यापार तो.
बुंधा (पु. ना.) वृक्षादिकांचा बुडख्याकडील प्रदेश तो.
बुबूळ (न. पु. ना.) नेत्रांतील जो मांसगोलक तें तो किं० त्यांतील काळा व पांढरा असे जे दोन विभाग ते प्र०.
बुभुक्षा (सं. स्त्री. ना.) क्षुधा.
बुरखा (अर० पु. ना.) मराठे यवन इ०कांच्या स्त्रिया कोठें बाहेर जातांना मुखादि अवयव झांकले जात असें डोईवरून घेतात जें वस्त्राचें प्रावरण तो. २ पालखी इ०कांवरचें आच्छादन वस्त्र तो.
बुरंगट (न. ना.) केवळ बारीक असून दाट जो पर्जन्य तें.
बुरट (वि०) जीस दूध थोडें अशी जी गाय किं० म्हैस इ० पशु तो. २ बुरंट.
बुरँट (न. ना.) तृणें, लाहान लाहान

झाड यांचें दाटीनें गच्च झालेलें जें स्थळ तें.

बुरटाचोर (पु. ना.) केवळ दरोडेखोर नव्हे, मनुष्याची दृष्टि चुकवून निजलेलें पाहून हळूच चोरी करून जाणारा जो चोर तो.

बुरु (वि०) (ग्रं०) वाईट.

बुरूज (फा० पु. ना.) तोफ इ० ठेवायासाठीं किल्ला इ० कांची तटबंदी इ० स्थळीं वर्तुळाकार बांदिस्त करितात तो. २ त्या आकाराची सेनेची रचना तो. [हाल.

बुरेहाल (अर० पु. ना.) पराकाष्ठेचे

बुळकी (स्त्री. ना.) अतिसारादि विकृतीमुळें गुदद्वाराचा आवरबंध शिथिल होऊन पातळ विष्ठेची धारा लागत्ये ती.

बुळबुळीत (वि०) ज्याचा लेप भूमि इ०कांवर झाला असतां तेथून हात पाय इ० अवयव निसरतात असा जो तेल, तूप, शेवाळ, कोरफड, भोंकर इ० पदार्थ तो. २ तेणेंकरून लिप्त जो पदार्थ, अवयव तो. ३ ज्या भाषण, कारभार इ०कांत तेज नाहीं तो भाषणादि व्यापारही. ४ (न.) बुळबुळीतपणा.

बुळा (वि०) नपुंसक.

बूच (पु. ना.) गुडदी.

बूज (स्त्री. ना.) विद्वान् इ० जो गुणी किं० शूर इ०त्यांची किं० त्याचे गुणाची राजा, धनी इ० कांजवळ त्यांणीं तें गुणादिक जाणून यथायोग्य प्रशंसा पूजादि करावें अशी असत्ये जी मान्यता ती. किं० तसा प्रशंसादिरूप होतो जो सन्मान ती. २ गंजिफांचे खेळांत लागतात जीं पानें ती.

बूट (पु. ना.) भांगेचा जो पुष्पगुच्छ तो. २ वस्त्रादिकांवर पुष्प, पर्ण इ०कांचीं रंगादिनिर्मित अनेक चिन्हें असतात तीं प्रत्येकीं. २ अपूर्व चमत्कारिक गोष्ट, श्लोक, वाक्य, कल्पना इ० कांस म्हणतात,

बूड (न. ना.) वृक्ष, पात्र, इ०कांचा तळ तें. २ (स्त्री. ना.) सावकारी, शेतकी इ० व्यवहारांत येतो जो तोटा ती.

बेअदबी (फा० स्त्री. ना.) धनी इ० कांशीं मर्यादा सोडून अमर्यादपणें जें वर्तन ती.

बेइमान, इमानी (फा० वि.) आपलें इमान ज्याणें सोडलें तो.

बेकार (फा० वि०) धंदा, रोजगार नाहीं म्हणून घरीं रिकामा बसलेला जो कारकून, शिपाई इ० तो.

बेकूब (फा० वि०) वेडझंवा, मूर्ख.

बेगड (स्त्री. ना.) पिंवळा, तांबडा इ० रंगांचा धूर देऊन करितात जो कथलाचा वर्ख तो.

बेगम (तुर्की भाषेंत) (स्त्री. ना.) उपवर होऊन जिचा विवाह झाला नाहीं अशी जी स्त्री ती. २ मुसलमान लोकांतील मोठा प्रतिष्ठित जो मनुष्य त्याची स्त्री ती.

बेगमी (स्त्री. ना.) कोणेक कार्याचे निर्वाहास अपेक्षित जी सामग्री तिच्या संपन्नतेनें होत्ये जी कार्यास प-

निर्गुणतारूप दशा ती. २ संसारादिकाचे निर्वाहाविषयीं संपादित जो धान्यादिसामग्रीसमुदाय तो. ३ निश्चिती. [वाक्ष.

बेगे (न. ना.) (ग्रं०) खिडकी. २ ग-

बेच (न. ना.)(ग्रं०) पानांत पान तें.

बेचक (न. स्त्री. ना.) हात, पाय, वृक्ष इ०कांस जेथें बोटें, शाखा इ० दोन अवयव फुटतात त्यांचा जो तेथील मधला संधिप्रदेश तें ती.

बेचळ (न. ना.) (ग्रं०) जुंवाड.

बेचाड (न. ना.) (ग्रं०) बेचळ.

बेचाळीस (वि०) एक संख्या आहे. २ मातृवंशाकडील एकवीस आणि पितृवंशाकडील एकवीस असे बेचाळीस जे पितर त्यांस लक्षून शपथ गालिप्रदानादि प्रसंगीं विशेष जे पितर त्यांवांचूनहीं प्रयोग करितात.

बेजार (फा० वि०) काहीं दुखणें कि० व्यापार, व्यवहार इ० संबंधी परिश्रम भोगतां भोगतां पुढें कंठायाविषयीं असमर्थ झाला तो.

बेजें (न. ना.) (ग्रं०) युक्ति.

बेट (न. ना.) ज्याचे सभोंवता नदी, समुद्र, तळें इ० कांचें पाण्याचा परिधि असतो असा जो स्थलविभाग तें. २ ज्या वृक्षादिकांच्या मुळ्यांस अंकुर फुटून अनेक वृक्षादिक होतात असे जे केळ, वेळू, दर्भ इ० त्यांचा एकापासून अनेक व्यक्ति होऊन झालेला समुदाय तें.

बेटा (हिंदु०) (पु. ना.) पुत्र. २ (अव्य०) वाक्यालंकारार्थ याचा प्रयोग करितात. उ० काय बेटा बोलतो इ०.

बेंड (न. ना.) गळूं इ० जें उठाणूं तें. २ वेवीं उंच वाढलेली असते तें.

बेडी (स्त्री. ना.) बिडी.

बेडौल (वि०) ज्या पदार्थांचा डौल चांगला नाहीं तो. [वाईट चेष्टा तो.

बेढंग (पु. ना.) सोदेगिरी इ० ज्या

बेढब (वि०) बेडौल.

बेणणें (धा. ना.) शेत इ० स्थलांतील अनिष्ट जें तृणादिक तें काढून स्वच्छ करणें.

बेत (पु. ना.) कर्तव्य कार्याचा असें या या प्रकारें करावें इ० रूप योजतात आकार तो. २ कोणिक कार्याविषयीं अंतःकरणांत झाला असतो जो संकल्प तो. ३ कोणिक व्यवहाराविषयीं केला असतो जो व्यवस्थारूप नियम तो. ४ कर्तव्य कार्याचें काडी, आंकणी इ० द्वारा जे आकारपरिमाण करितात तो.

बेतणें (धा. ना.) अंगरखा, चोळी, जोडा इ० जितके असावे तितक्या आकारांत अंतर न पडावें म्हणून त्या त्या बेतानें अंकनादिद्वारा अन्वित करणें. २ विनणें.

बेतबात (पु. ना.) काहींएक कार्याचा बेत, व्यवस्था इ० तो.

बेताल (वि०) तालप्रमाणाची व्यवस्था ज्यांत नाहीं असें जें गाणें तो. २ तसें गाणारा जो तो. ३ क्षोभादि कारणानें पूर्व प्रकृतीची मर्यादा सुटून मनस्वी झाला जो मनुष्य, त्याची प्र-

कृति, घोडा, रोग इ० तो.
बेथु, थू (वि०) (ग्रं०) दांडगा.
बेदर्दी (वि०) भय न बाळगतां स्वच्छंदपणें वागण्याचा स्वभाव ज्याचा तो.
बेदावा (फा० पु. ना.) कोणेक विषयावर वादी किं० प्रतिवादी यांचे शब्याचा होतो जो रहितपणा तो.
बेपरवा (फा० वि०) जो कशाचीं किं० कोणाची पर्वा बाळगित नाहीं तो.
बेफाम (फा० वि०) असावध.
बेफिकीर (फा० वि०) ज्यास काळजी नाहीं तो.
बेबंद (फा० वि०) ज्यांत बंदोबस्त नाहीं असें जें राज्य, कारभार इ० तो.
बेबळ (वि०) (ग्रं०) ढिलें.
बेमालूम (वि०) कोणेक स्थळीं संबद्ध झालेलें जें चीर, रेषा इ० कांहींएक तें नीट करणें, पुसून टाकणें, साधणें इ० संस्कारांनीं त्याची खूणही राहूं नये असें दूर झालें जें तें रेषादिक तो किं० तें स्थळ तो.
बेमुरवत (फा० अव्य०) मुरवत न धरितां मारणें, जाणें इ० कांचें वि०.
बेरकटणें (भा० ना०) समई, तेलाचें भांडें इ० बेरीचें कटानें लिप्त होणें.
बेरंग (फा० पु. ना.) कथा, पुराण, गोष्ट इ० कांत चालला असतो जो रंग त्याचा कांहीं कारणामुळें होतो जो भंग तो. २ (वि०) ज्याचा रंग बिघडला तो.
बेरी (स्त्री. ना.) तेल, तूप यांचे पोटचा जो मळ ती. २ गुळाची जी मळी ती.
बेलगाम, मी (वि०) आडवळणी.
बेलदार (फा० पु. ना.) खाण इ० कांतून दगड काढून आणून विकून उपजीविका करणारी अशी एक मनुष्यांत जाति आहे.
बेलभंडार (पु. ना.) दिव्य, शपथ इ० करण्याविषयीं उचलितात जो देवावरील बेल, भंडार इ० तो. २ तत्पूर्वक जी आणभाक तो.
बेलाग (फा० वि०) ज्यावर कोणीकडून लाग चालत नाहीं असा जो दुर्गम किल्ला, दुःसाध्य गोष्ट, दुखणें इ० तो.
बेलाशक (अर० वि०) बेधडक.
बेलिया (पु. ना.) एक मोगरीचा भेद आहे. २ तिचीं जीं फुलें तीं. ३ त्याणें सुगंधित केलेल्या तिळांचें काढितात जें तेल तो. ४ त्या फुलांचें अत्तर तो.
बेवकूफ (फा० वि०) बेकूब.
बेवारसा (फा० पु. ना.) कोणेक विषयावर कोणेकाचे वारशाचा होतो जो अभाव तो.
बेवारा (पु. ना.) देणें, घेणें इ० कांचा उलगडा तो.
बेश (फा० वि०) चांगला.
बेशखासा (फा० वि०) अतिशयित बेश.
बेशर्मी (फा० अव्य०) कोणेकाचे नांवामागें सरकारी इ० लिहिण्यांत याचा प्रयोग होतो. उ० दस्तक बेशर्मी नारायण चोगुले.
बेशरम (फा० वि०) निर्लज्ज.
बेशिस्त (फा० वि०) गैरशिस्त.

बेशुद्ध (वि०) मूर्च्छा इ०कांनीं ज्याची शुद्धि गेली तो.

बेष (वि०) वेश.

बेसुमार (फा० वि०) करावें किती न करावें किती इ० रूप सुमार तो न राखितां अतिरिक्त जें भाषण, भोजन, इ० क्रिया किं० कांहीं गुण इ० तो.

बेहतनमाल (अर० पु. ना.) ज्यास वारस नाहीं असा माल तो.

बेहद, हद्द (फा० स्त्री. ना.) कांहींएक व्यापार, गुण इ०कांची हद्द सुटून जी पराकाष्ठा ती. २ (अव्य०) पराकाष्ठेचा.

बेहडा (सं. बिभीतक)(पु. ना.) एक वृक्षाचें औषधि फळ आहे तो व त्याचें झाड. २ किल्ला, मुलूख, परगणा, गांव, इ०कांची वहिवाट करणारे जे मामलेदार, सुभेदार इ० त्यांणी भलतशी वहिवाट करूं नये ह्मणून सरकारांतून अमुक रीतीनें वहिवाट करावी, अमुक शिबंदी राखावी, अमुक इनाम धर्मादाय चालवावे, अमुक रीतीनें वसूल घ्यावा इ० लेखपूर्वक बांधून देतात जो नियम तो किं० तशा नियमाचा करितात लेख तो. बेहडापारकरणें, होणें म्ह० पतकरलेलें किं० आरंभिलेलें कार्य कसेंही करून एकवेळ शेवटास नेणें.

बेहोश (फा० वि०) वेशुद्ध.

बैठक (स्त्री. ना.) वसक. २ मनुष्याचे भूम्यादिकांवर बसण्याचे जे अनेक प्रकार ते प्रत्येकीं. ३ गमनादि उद्देशानें प्रवृत्त जो कोणी त्याची कांहींएक निमित्तानें तो व्यापार राहून कोणेकस्थलीं कांहींकाल होत्ये जी स्थिति ती. ४ कोणेक स्थळीं कोणेकाची कोणेक उद्देशानें बसलेपणानें जी स्थिति ती. ५ गवई, वेश्या इ०कांनीं बसून गावें असा जो गायनसमारंभ करितात ती.

बैत (अर० स्त्री. ना.) फारशी भाषेची श्लोकासारखी छंदोबद्ध कविता असत्ये ती.

बैदा (पु. ना.) सैन्यादिकृत जो दंगा तो. २ फंद, फितूर, चाहाडी इ०रूप कोणी करितो जे लबाडीचे खेळ तो.

बैरागी (पु. ना.) प्रपंचापासून विरक्त होऊन विष्णुसेवा करण्याचा एक संप्रदाय आहे त्याप्रमाणें चालणारा जो तो.

बैल (सं. बलद) (पु. ना.) गायीच्या जातीतील तारुण्यांत आलेल्यातरची पुरुषव्यक्ति तो. २ निरक्षर, निर्बुद्ध, मूर्ख जो पुरुष त्यास आरोपानें ह्मणतात.

बैला (पु. ना.) एक आणीदार लांकूड घेऊन त्यास मध्यें ओझें सावरायाजोगें कांहीं अडकवण संबद्ध करून कांट्या इ०कांचें ओझें वाहायास साधन करितात तो.

बैसणें (धा. ना.) (ग्रं०) बसणें.

बोंकलणें, ळणें (धा. ना.) गुरें, वासरें इ० कांनीं आनंदानें येऊन पुच्छें वर करून आरडत ओरडत अनेक प्रकारच्या उड्या माराव्या, धांवावें अशा प्रकारें क्रीडा करणें. २ पोरा-

नींही आनंदांत येऊन तसें करणें.

बोकांडी (स्त्री. ना.) मान ह्मणून जो शरीरावयव तो, परंतु व्याघ्र, शत्रु, पिशाच इ०कृत उपद्रवसंबंधीं वर्णन करणें असतां प्रयोग.

बोकाणा (पु. ना.) गहूं इ० शुष्क पदार्थांचा तोंड भरायाजोगा मोठा जो ग्रास तो.

बोकाळणें (धा. ना.) (ग्रं०) माजणें.

बोंगा (पु. ना.) नेसलेल्या वस्त्राच्या निऱ्या खोंवायाचे ठिकाणीं वस्त्र मोठें असल्यामुळें किं० निऱ्या चोपून न बसल्यामुळें विशोभित दिसायाजोगा त्याचाच येतो जो उंचवटा तो.

बोचकें (न. ना.) चापचोप घड्या न करितां सरासरी वस्त्रें बांधून केलें जें गांठोडें तें.

बोंचणें (धा. ना.) कांटा, सुई इ० पदार्थ तो शरीर इ०कांचेठायीं आपल्या अग्रानेंच छिद्र करून आंत शिरे असा करणें. २ कांटा, चोंच इ०कांचे अग्रप्रहारानें कोणेकास क्षतयुक्त करणें. ३ चाकर इ०कांस शब्द प्रहारानीं टोंचणें.

बोंचरा (वि०) बोंथरा.

बोज (पु. ना.) विद्यादिकृत कोणेकाचे अंगीं असतें जें महत्व. तो.

बोजड (वि०) आटोपसार, बेताबाताचें, जितक्यास तितकें असें नव्हे जें शरीर, शरीरावयव, पागोटें इ० वस्तु तें.

बोजवार (पु. ना.) भाजी, पाला, लोणचें इ०कांत घालायाचा हिंग, जिरें, मिरें इ० मसाला तो. २ कांहींएक कार्याची दुर्दशा तीस ह्मणतात.

बोजा, झा (पु. ना.) ओझें.

बोट (न. ना.) अंगुलि. २ अंगुल. बोट दाखविणें म्ह० कांहीं वस्तूकडे अंगुली दाखविणें. वाक्य, ग्रंथ इ०कांस बोट लावणें म्ह० त्यांची अमर्यादा करणें. बोट शिरकणें म्ह० राजदर्बार, व्यवहार इ०कांत किंचित्प्रवेश होणें. तोंडांत बोट घालणें म्ह० आश्चर्यानें थक्क झालेपणाचा अभिनय करणें इ०

बोटूक (न. ना.) आखूड जें चिंचेचें फळ तें. २ एक चिंचोका आहे ज्यामध्यें इतका जो चिंचेचा तुकडा तें.

बोंड (न. ना.) कापूस, तीळ, अफू इ०कांस फलभूत जो अवयव येतो तें. २ बिब्बा, काजू यांचे फळामागें जो अवयव असतो तें. ३ तदाकार हरभरा इ०कांचे पिठाचें तळून तोंडीं लावणें करितात तें. ४ तदाकारच संधेची पळी, समई इ०कांचा अवयव असतो तें. ५ केळफूल. ६ मक्याचें कणीस.

बोडका (वि०) पागोटें, टोपी इ० जें शिरोवेष्टन त्यावांचून जें डोकें किं० मनुष्य तो. २ ज्याचे योगानें त्या त्या पदार्थाचे शिरोभागीं शोभा येते असे जे शृंग, कळस, टिकशा इ० पदार्थ तद्रहित अतएव कांहीं विशोभित जो पशु, देवालय, वृक्ष इ० तो.

बोडणी (स्त्री. ना.) खरडपट्टी.

बोडणें (धा. ना.) कोणेकाचें वपन करणें. २ द्रव्यादि घेऊन कोणेकास मुंडणें.

बोडंती (स्त्री. ना.) बोडणी.

बोंडी (स्त्री. ना.) नाक, स्तन इ० कांचा जो अग्रभाग तो. २ त्या सारखा मोदक इ०कांचा जो अग्रभाग तो.

बोंडूक (न. ना.) नाक इ०कांची लहान बोंडी किं० तीळ, कापूस इ०कांचें लहान जें बोंड तें.

बोडेफकीर (पु. ना.) निर्धन किं० ज्याचे मागें कुटुंबादि कांहिंएक नाहीं तो.

बोंणें (न. ना.) (ग्रं०) नैवेद्य. २ बलि.

बोंथट (वि०) तरवार इ०कांची बसली जी धार ती. २ ज्याची धार किं० अणी बसली तें शस्त्रादिक.

बोंथटणें (धा. ना.) शस्त्रादिकांची धार, अणी बोंथट होणें.

बोंथरखिंड (स्त्री. ना.) मधले मधले दांत पडल्यामुळें जी खिंड पडत्ये ती.

बोंथरा (वि०) ज्याचे मधले मधले किं० अवघे दांत पडले आहेत तो.

बोंथाटी (स्त्री. ना.) हातांपुढें चालायासाठीं किं० खेळायासाठीं अग्रासचेंडूसारखा वस्त्रादिकांचा गोळा बांधून करितात जी काठी ती.

बोध (सं. पु. ना.) कोणेक विषयाचें हा असा आहे इ० रूप शब्दादि प्रमाणानें होतें जें ज्ञान तो. २ कोणेक गोष्टीविषयीं अन्यथाग्रह झाला असतो तो जाऊन जसें समजायाचें तसेंच समजावें असा जो बुद्धीचा परिणाम तो. ३ (ग्रं०) चित्स्वरूप ब्रम्ह तो. ४ मार्ग. ५ उपदेश.

बोधक (सं. वि०) कोणेक अर्थाचा बोध करणारा शब्द, चिन्ह इ० तो किं० उपदेशादिद्वारा बोध करणारा गुरु इ० तो. [चा व्यापार तें.

बोधन (सं. न. ना.) बोध करण्या-

बोधविणें (धा. ना.) कोणेकास कोणेकानें कोणेक अर्थ, अनुमान इ० द्वारा जाणविणें. [२ मार्ग.

बोधा (पु. ना.) (ग्रं०) उपदेश.

बोंब (स्त्री. ना.) मुखविकास करून कंठानें ध्वनि होत असून मुखावर हस्तप्रहार केला असतां जो विलक्षण शब्द होतो तो शब्द शिमग्याचे दिवसांत किं० मोठें संकट प्राप्त झालें असतां करितात तो मारणें, ठोकणें, इ० धातूचे योगीं प्रयोग. धान्य, पर्जन्य इ०कांची बोंब होणें, पडणें, वाजणें इ० त्या त्या पदार्थाच्या दुर्मीळतेमुळें त्याची हाकाटी पडणें इ०.

बोबडा (वि०) सर्व वर्ण ज्याच्यानें स्पष्ट उच्चारले जात नाहींत असें जें वागिंद्रिय किं० तद्विशिष्ट पुरुष इ० किं० तत्कृत भाषण इ० तो.

बोबडी (स्त्री. ना.) भयादिकानें घाबरून जिव्हा आखडून स्पष्ट शब्दोच्चार न होई अशी होते जी कोणेकाची अवस्था ती वळणें धातूचे योगीं प्रयोग.

बोंबणें (धा. ना.) (ग्रं०) बुजवून टाकणें. २ रोध करणें.

बोंबलणें (धा. ना.) बोंब मारणें. २ कांहिंएक कार्य इच्छितानुरूप

कडेस न लागतां मध्येंच फसणें.
बोंबलभिक्या (वि०) कपाळकरंटा.
बोंबाणें (धा. ना.) (ग्रं०) बोभाटणें, हाक मारणें.
बोंबाबोंब (स्त्री. ना.) अनर्थप्रयुक्त जो ओरडा आरडा तो.
बोभाइणें (धा. ना.) (ग्रं०) दीर्घस्वरानें कोणी धांवे अशा हाका मारणें.
बोभाट (पु. ना.) गुप्तगोष्टीची लोकांत प्रसिद्धि तो. २ कागाळी.
बोभाटा (पु. ना.) बोभाट.
बोरबार (स्त्री. ना.) (ग्रं०) खटपट. २ शीण. ३ सुखदुःख.
बोरांटी (स्त्री. ना.) बोरीची कांटी ती.
बोऱ्या (वि०) दरिद्री. २ (पु. ना.) शिंदी, ताड इ०कांचे पान्यांची अंथरी तो. कोणिकाचा बोऱ्या उडणें, वाजणें इ० स्थळीं फटफजीती होणें.
बोल (पु. ना.) भाषणाचे अवयवभूत शब्द किं० वाक्यें ते प्रत्येकीं. २ वाक्य किं० शब्द.
बोलका (वि०) चांगलें आणि बहुत बोलतो तो.
बोलघेवडा (वि०) बोलायाचें कारण असो कीं नसो परंतु पुष्कळ बोलण्याचा स्वभाव ज्याचा तो.
बोलणें (धा. ना.) वाणीच्या व्यापारानें शब्दप्रयोग करणें. २ धनी इ०कांनीं चाकर इ० कांस बोल लावणें.
बोलधलणें (धा. ना.) (ग्रं०) वरपडें होणें.
बोलबाला (पु. ना.) चढती कमान.
बोलवा (स्त्री. पु. ना.) लेखपत्रादि प्रमाण उपलभ्यमान नाहीं असें असतांहीं अमुक गोष्ट अमुक स्थळीं झाली किं० अमुक दिवसीं अमुक होणार असा जो जनांत विरळ विरळ भाषणप्रचार चालला असतो तो.
बोलाचाली (स्त्री. ना.) हर्षामर्ष होइ असा परस्पराचा वाग्व्यापार तो.
बोलावणें (धा. ना.) बलावणें. २ (ग्रं०) भोगणें. ३ (न.) बलावण्याचा व्यापार तें.
बोली (स्त्री. ना.) देश, जाति, शब्द इ० भेदेंकरून भिन्नभिन्न जे बोलण्याचे प्रकार अनेक आहेत ते प्रत्येकीं. २ दुसऱ्याशीं कांहीं करायाचा जो व्यवहार त्याचे वर्त्तनाविषयीं तूं असें कर, मी असें करीन इ० रूप केला असतो जो नियम ती.
बोलीगड (वि०) (ग्रं०) बोलका.
बोलीचाली (स्त्री. ना.) कोणिक व्यवहारसंबंधीं वर्तनाचे जे अवांतर भेद ते सर्व उजरून जी बोली ती.
बोलू (पु. ना.) (ग्रं०) बोल.
बोलूनचालून (अव्य०) आंत कांहीं गुप्तांश न ठेवितां शब्दादि व्यापारानें उघडपणें गुणाचें किं० क्रियेचें वि०. २ बोलणें आणि चालणें या व्यापारानें चांगला, भला इ० गुणाचें वि०.
बोहणी (स्त्री. ना.) उजाडल्यावर दुकानदाराचे दुकानांतून प्रथमतः होत्ये जी विक्री ती; जिला दिवसभर होणारा जो उदीम त्याचे आदीचें मंगल असें मानितात. २ (ग्रं०) आरंभ.
बोहरी (पु. ना.) छिटें, सखलाद इ० विलायती कापड, चाकू, कात्र्या

विकणारी मुसलमानांत एक जाति आहे. २ (ग्रं०) राखरारवुंडी, रांगोळी, माती, भस्म इ० अर्थ होतात.

**बोहिणें** (धा. ना.) (ग्रं०) वाहणें.

**बोहे** (वि०) (ग्रं०) बहुत.

**बोळ** (पु. ना.) केवळ अरुंद जी गल्ली ती. २ झाडाचे औषधोपयोगी चीक आहेत ते प्रत्येकीं.

**बोळकें** (न. ना.) माती, तांबें इ० धातु यांचें मुलींचें खेळण्याचें लहान एक पात्र तें. २ दंतहीन जें मुख त्यास ह्मणतात.

**बोळवण** (स्त्री. ना.) लग्न झाल्यावर नव्या नवरीचा भर्त्यासहवर्तमान भर्त्याचे घरीं सुमुहूर्तानें प्रवेश करण्याकरितां जो गमनसमारंभ करितात तो. २ लग्न झाल्यावर वरपक्षीय व-ऱ्हाड्यांची जी सत्कारपूर्वक पाठवणी करितात ती.

**बोळवणें, बोळविणें** (धा. ना.) आपल्या जवळून स्थलांतरीं जाणारा जो कोणी आप्तादिक त्यास सत्कारार्थ कित्येक मार्गप्रदेशपर्यंत आपण समागमें जाऊन पोहोंचविणें. २ भूषणादिकांचा फांसा इ०कांचीं तोंडें न निघत, हातास, वस्त्रास न लागत अशीं साफ, घट्ट बसविणें. ३ (ग्रं०) घालविणें, दवडणें. ४ बजाविणें, बंद करणें.

**बोळा** (पु. ना.) शाई घोटणें किं० छिद्र बुजविणें किं० भिंत इ०कांस रंगादिक सारविणें इ०कांसाठीं गुंडाळी करून घेतात जें चिरगूट इ० तो. २ कागद इ० कांवर शाई इ० कांचा पडतो जो ठिपका तो. ३ वस्त्राचें अस्ताव्यस्त झालें जें गुंडाळें त्यास म्हणतात. [जाणें.

**बौढणें** (धा. ना.) (ग्रं०) लयास

**बौद्ध** (सं. पु. ना.) विष्णूचा नववा अवतार तो. २ एक नास्तिकांत भेद आहे. ३ (वि०) बुद्धीनें कल्पिलेला किं० धरलेला जो पदार्थ तो.

**बौहे** (वि०) (ग्रं०) बहुत.

**ब्र** (पु. ना.) चकार शब्द.

**ब्रम्ह** (सं. न. ना.) जेथें सत्व, रज, तम हे गुण नाहींत, जेथें माया, अविद्या हे उपाधि नाहींत, ज्याला उत्पत्ति विनाश इ० विकार नाहींत, जेथें सजातीय, विजातीय, स्वगत हे तीन भेद नाहींत व देश, काल, वस्तु हे तीन परिच्छेदक नाहींत अतएव वाणी, मनास जें विषय होत नाहीं, परंतु सच्चिदानंद असें जें आहे खरें अशा प्रकारचें काहीं पदार्थमात्राच्या निषेधास अवधिभूत वस्तु आहे तें. २ वेद. ३ ब्राह्मण. ४ हें काहीं अद्भुत आहे असें कधीं झालें नाहीं आणि होणार नाहीं असा जो कोणिक पदार्थ, गोष्ट इ०कांत महत्वाश वाटतो तें. ५ सोवळें ओवळें इ० विषयांचा झाला असतो जो घोळकार तें.

**ब्रह्मकटाह** (सं. पु. ना.) ब्रह्मांड.

**ब्रह्मकर्म** (सं. न. ना.) ब्राह्मणाचें स्नानसंध्यादि कर्म तें. [राक्षस.

**ब्रह्मग्रह, ग्रहो** (सं. पु. ना.) ब्रह्म-

**ब्रह्मगोळ** (पु. ना.) (ग्रं०) ब्रह्मांड.

ब्रह्मचर्य (सं. न. ना.) ज्यामध्यें मैथुन न करणें हा नियम मुख्य असें एक व्रत आहे; हें व्रत कोणी मुख्यत्वेंकरून, कोणी व्रतांगत्वेंकरून आचरितात. २ मुंज झाल्यापासून मुंज सुटेपर्यंत जो आश्रम तें.

ब्रह्मचारी (सं. पु. ना.) ब्रम्हचर्य ज्यास आहे तो. २ (ग्रं०) परब्रह्मीं ज्याची गति चालली तो.

ब्रह्मदंड (सं. पु. ना.) प्रायश्चित्त, श्राद्ध, तीर्थविधि इ०कांचे अधिकारार्थ सभ्य ब्राह्मणांस द्रव्यात्मक जो दंड द्यावा लागतो तो.

ब्रह्मनिष्ठ (सं. वि०) निर्गुण ब्रम्हस्वरूपीं ज्याची निष्ठा तो.

ब्रह्मप्रलय (सं. पु. ना.) ब्रम्हदेवाचीं शत वर्षे झालीं म्हणजे ब्रम्हदेवासुद्धां सर्व विश्व नाहींसें होतें असा प्रलय तो.

ब्रह्मप्राप्ति (सं. स्त्री. ना.) ज्ञानानें अविद्योपाधीचा निरास झाल्यामुळें जीवास होतो जो स्वस्वरूपसाक्षात्काररूप लाभ तो.

ब्रम्हरंध्र (सं. न. ना.) मस्तकावरचें जें तालुस्थानाचें छिद्र तें.

ब्रम्हराक्षस (सं. पु. ना.) विद्वान् असून अभिमानी अतएव मेल्यावर क्रूर पिशाच झाला तो. २ क्वचित् साधारण ब्राम्हण मरून पिशाच झाला जो तो.

ब्रम्हरेषा (सं. स्त्री. ना.) जन्म होल्येसमयीं प्राण्याचे कपाळीं भोक्तव्य सुखदुःखाचा लेख केला असतो; जो कदापि खोटा होत नाहीं तो. २ कदापि खोटें व्हायाचें नाहीं असें जें भाषणादिक त्यास म्हणतात.

ब्रम्हलिखित (न. ना.) ब्रह्मरेषा.

ब्रम्हलोक (सं. पु. ना.) सत्यलोक.

ब्रम्हविद (सं. वि०) ब्रम्हवेत्ता.

ब्रम्हवृत्ति (सं. स्त्री. ना.) ब्रम्हाकार वृत्ति. २ ब्राम्हणाची उपजीविनवृत्ति.

ब्रम्हवेत्ता (सं वि०) ब्रम्हज्ञानी.

ब्रम्हसंविति (सं. स्त्री. ना.) ब्रम्हज्ञान.

ब्रम्हसाक्षात्कार (सं. पु ना.) ब्रम्हप्राप्ति.

ब्रम्हसूत्र (सं. न. ना.) ईश्वरसूत्र. २ यज्ञोपवीत.

ब्रम्हस्व (सं. न. ना.) कर्ज. २ ब्राम्हणस्वत्व ज्यावर आहे असा द्रव्यादि पदार्थ तें. ३ कर्जकऱ्यावर भाररूप झालेलें जें ब्राम्हणाचें ऋण त्यास म्हणतात.

ब्रम्हज्ञान (सं. न. ना.) ब्रम्हविषयक जें ज्ञान तें. २ ईश्वरसत्ता, दैव यांस पुढें करून प्रयत्न, लोकव्यवहार यांची निंदा करावी अशा तात्पर्याच्या ज्या कोणी गोष्टी सांगतो त्यास म्हणतात.

ब्रह्मा (सं. पु. ना.) ब्रह्मदेव. २ सुताराचा सामता. ३ होमादिकांमध्यें एक ऋत्विज वरिलेला असतो तो.

ब्रह्मांड (सं. न. ना.) चतुर्दश भुवनात्मक अंडाकार जें ईश्वरानें रचनाविशेष केलें आहेत ते प्रत्येकीं २ मुखापासून मस्तकाचे कंवचीनें आवृत जो देहाचा भाग तें.

ब्रह्मानंद (सं. पु. ना.) ब्रह्मप्राप्तीनें

होतो जो आनंद तो. २ अतिशयित जो मित्रसमागमादिजन्य आनंद त्यास ह्मणतात. [जाति आहे.

ब्राह्मण (सं. पु. ना.) हिंदूमध्यें श्रेष्ठ

ब्राम्हणजन (पु. ना.) दुसऱ्याचे घरीं पाणी भरावें, वस्त्र धुवावीं इ०कामावर उपजीविका करणारा जो ब्राम्हण तो.

ब्राम्हणजाई (वि०) ब्राम्हणापासून शूद्रीच्याठायीं झाला तो.

ब्राम्हण्य (सं. न. ना.) ब्राम्हणपणा

ब्राम्हमुहूर्त (सं. पु. ना.) पहाटेचे चार घटका रात्रीपासून दोन घटका रात्रपर्यंत जो काळ तो.

ब्रीद (न. ना.) बिरुद.

—भ—

भ– हा वर्ण चोविसावें व्यंजन आहे. (सं. न. ना.) नक्षत्र. २ मेषादिक जे राशि ते प्र०.

भकणें (धा. ना.) बहकणें.

भकाटी (स्त्री. ना.) पोटांत कांहींच अन्न नाहींसें झाल्यामुळें जी पोटास खळी पडत्ये ती.

भकांद (स्त्री. ना.) (ग्रं०) बहकावण.

भकाध (स्त्री. ना.) भकांद.

भक्कम (वि०) सामान्य रीतिपेक्षां द्विटी दुपटीनें मोठा, आणि बळकट, बूढ असा जो पदार्थ तो. २ रगड होई असा पुष्कळ.

भक्त (सं. वि०) जो ज्या देवाची प्रीतिपूर्वक सेवा करितो तो त्याचा. २ (पु.) भात.

भक्तवत्सल (सं. वि०) आपल्या भक्तांवर दया करावी असा स्वभाव ज्याचा असतो असा जो ईश्वर इ० तो.

भक्ति (सं. स्त्री. ना.) आवड. २ आदरानें ईश्वर, गुरु इ० ह्मांस भजण्याचा जो प्रकार तो. ३ ईश्वरप्राप्तीचे जे धर्म सांगितले आहेत त्याच्याठायीं जी अंतःकरणाची निष्ठा ती.

भग (सं. न. ना.) उपदंशादि कारणानें शरीरास पडतें जें छिद्र तें. २ ऐश्वर्य. ३ स्त्रीचें उपस्थ तें.

भंग (सं. पु. ना.) कांहींएक पदार्थ, गोष्ट इ०कांचा नाश तो. २ भृकुटी, अंगुली, काठ इ०कांचा जो मोडलेपणा तो. ३ (ग्रं०) भांग. ४ तरंग.

भगण (सं. पु. ना.) मेषादि बारा राशींचा जो समुदाय तो. २ नक्षत्रसमुदाय.

भगदड, दाड (न. ना.) भगाड.

भगंदर (सं. पु. ना.) जेणेकरून गुद आणि वृषण यांचे मध्यें शिरेवर भोंक पडतें असा एक रोग आहे तो.

भगभग (स्त्री. ना.) मिरची इ० तिखट पदार्थांचा संयोग इ०कारणामुळें हस्तादि अवयवास सुटत्ये आग ती.

भगरा (पु. ना.) आंत स्निग्धांश नाहींसा झाल्यामुळें पिठ करूं लागलें असतां होऊं नये इ० प्रकारचा लाडू, चुरमा, भाकरी इ०कांचा कोरडा होतो जो चूर तो.

भगलभावार्थी (वि०) पोटांत लबाडी

असून बाहेर भावार्थ दाखवितो तो.

**भगली, भगल्या** (वि०) ढोंगी. २ लबाड.

**भगवंत** (सं. पु. ना.) ईश्वर. २ ईश्वरप्रसादानें अलौकिक सामर्थ्य ज्यास असतें असे जे साधु, ऋषि इ० त्यांस म्हणतात.

**भगवती** (सं. स्त्री. ना.) देवी. २ आंत मीठ इ० पदार्थ न घालितां व दुसरा कांहीं उपचार न करितां केवळ वाळलेल्या तांबड्या मिरच्यांची पूड करितात ती.

**भगवा** (वि०) कावेचे रंगासारिखा जो रंग तो. २ तेणेंकरून रंगविलेलें वस्त्र इ० तो.

**भगवान्** (सं. पु. ना.) ईश्वर.

**भगाड** (न. ना.) भिंत, कुंपण, शेत इ०कांचा बांध इ०कास आरपार दिसायाजोगें पडतें जें मोठें भोंक किं० खिंडार तें. २ गोळी गोळा लागल्यामुळें किं० रोगादिकानें शरीरास मोठें पडतें जें भोंक तें.

**भगास** (न. ना.) तोफ इ०कांच्या गोळ्यानें पडलें जें मोठें भोंक तें. २ (वि०) उद्वस जें गृह इ० तें.

**भगीरथप्रयत्न** (सं. पु. ना.) भगीरथ नावाचा जो राजा त्याचा भागीरथी आणायाचा जो प्रयत्न तो. २ पराकाष्ठेचा प्रयत्न तो.

**भगेंद्र** (सं. भगंदर) (न. ना.) भगंदर रोगामुळें शरीरास पडतें जें मोठें भोंक तें.

**भग्न** (सं. वि०) ज्याचा भंग झाला तो. २ युद्धादिकांत पराजय पावला तो.

**भजणें** (धा. ना.) ईश्वर, गुरु इ०कांस प्रीतिपूर्वक श्रद्धेनें नामग्रहण, स्तवन, सेवा इ० द्वारा सेवणें.

**भजतिणें** (धा. ना.) (ग्रं०) मागें फिरणें.

**भजन** (सं. न. ना.) भजण्याचा व्यापार तें. २ कोणेक इष्ट देवतेच्या नामाचा घोष तें. ३ ईश्वराचे नावानें घटित जीं वाक्यें कोणी साधूनीं रचिलीं असतात तीं प्र० त्यांचा वारंवार उच्चार तें.

**भंजन** (सं. न. ना.) भग्न करण्याचा व्यापार तें. २ ज्या पदार्थाचे संयोगानें ज्या पदार्थांतील दुर्गुण जाऊन विशेष गुण प्राप्त होतो तो त्याचें.

**भट** (पु. ना.) ब्राह्मण परंतु प्राय: भिक्षुकी करून उदरनिर्वाह करितो तो. २ भिक्षुक ब्राह्मणाचे नावापुढें हा प्रतिष्ठाशब्द लागतो. उ० रामभट इ०. ३ (सं. पु. ना.) योद्धा.

**भटकणें** (धा. ना.) कांहींएक कारणामुळें स्वग्राम इ० स्थळापासून भ्रष्ट होऊन कोणतेच एकेस्थळीं स्थिरता न होई अशा दशेतें पावणें, जेणेंकरून गांवोगांव देशोदेश फिरतो.

**भटजी** (पु. ना.) भटास गौरवानें म्हणतात.

**भट्ट** (सं. पु. ना.) विद्वान् भिक्षुक याचे नावापुढें प्रतिष्ठाशब्द लागतो. क्वचित केवल याचाच प्रयोग होतो.

**भट्टी** (स्त्री. ना.) त्या त्या पदार्थांस अग्निसंस्कार होऊन रसायनादि

सिद्ध व्हावें ह्मणून त्या त्या पदार्थांचा काष्ठादिकांसहित करितात जो रचनाविशेष तो. २ विड्याचीं पानें, केळीं इ० पिकावीं ह्मणून जो त्याचा तृणादि वेष्टनानें रचनाविशेष करितात तो. ३ भडभुंजा, लोहार, कासार इ० कांचे ते ते पदार्थ अग्निसंस्कारानें सिद्ध करण्यासाठीं अग्नीस केलें असतें जें स्थान तो.

भंड (न. ना.) कांहीं दुष्टकर्म बाहेर पडणें इ० कारणामुळें लोकांत होतें जें हंसें तें. २ फजीती.

भंडउभंड (न. ना.) (ग्रं०) निरर्थक वाचाळपण तें.

भडकणें (धा. ना.) अग्नीनें किं० अग्निविशिष्ट काष्ठादिकानें मोठ्यानें सवेग पेटणें. २ भटकणें. ३ घोडा, फौज इ०कानें उधळणें.

भडका (पु. ना.) गृहादिकांस अग्नि लागला असतां मोठी होथे जी आग तो. २ तिखट, खाजरी, कुयली इ० अंगास लागल्यामुळें किं० पित्त, क्रोध इ०कांचे अतिशयामुळें अंगाची होथे जी अतिशयित आग तो.

भडकावणें (धा. ना.) तोंडांत मारणें.

भडंगभिकार, भीकारी (न.. पु. ना.) फकीर, गोसावी इ० जे भिकारी तें तो.

भडभड्या (वि०) भडभड बोलण्याचा स्वभाव ज्याचा असून अंतःकरणाचा निष्कपट तो.

भडभुंजा (पु. ना.) फुटाणे, पोहे, लाह्या इ० करून विकाव्या हा उदीम करून उपजीवन करितो तो.

भडमार (पु. ना.) कोणेकावर पराभवार्थ तोफा, घोंडे इ० कांचा किं० शब्दांचा अतिशयित जो मार तो.

भडवा (पु. ना.) वेश्या, कसबीण यांच्या साजिंदेपणावर उपजीविका करितो जो पुरुष तो.

भडस (स्त्री. ना.) भडभुंजा पोहे इ० करायाचेसमयीं चुलाण्याखालीं घालितो जे जळण तो. २ शेताची जमीन भाजायासाठीं वर पसरितात जें काटक्या, पानें, तृण इ० जळण तो. ३ (ग्रं०) (पु. ना.) पूर, लोट इ० तो.

भडसें (न. ना.) (ग्रं०) आधिक्य. २ थोरपण, महत्व.

भंडार (सं. भांडागार)(न. ना.) जामदारखाना. २(पु.ना.)हळदीची पूड.

भंडारा (पु. ना.) गोसावीं किं० वैरागी आसपासचे सर्व सजातीय मिळून करितात जो भोजनसमारंभ तो. २ भंडारखाना.

भंडारी (पु. ना.) ताडमाड इ० कांचें मद्य काढून उपजीविका करणारी एक जाति आहे. २ (स्त्री.) लहान फडताळ. ३ वाघ्याची भंडार ठेवण्याची कातड्याची पिशवी आहे.

भंडावणें (धा. ना.) एकाद्यास अनेक उपद्रव देऊन त्रासवणें.

भंडिमा (स्त्री. ना.) (ग्रं०) दंभ.

भडीमार (पु. ना.) भडमार.

भडेराक्षस (पु. ना.) कोणेकाचें राक्षसापेक्षांहि उग्रत्व वर्णन करायाचें असतां त्यास म्हणतात.

भडोड, भडोडू (पु. ना.) (ग्रं०) भज.

भणंग (पु. ना.) भिकारी.

भणभण (स्त्री. ना.) भणभणाटप्र-थमार्थी. २ (अव्य०) स्थलाचें अनावृतपणामुळें रूक्षपणें मोठ्यानें शब्द होई असें वाऱ्याचें वाहण्याचें वि० भणभण करणें म्ह० घर इ०कानें भणभणीत दिसणें, माशा इ०कानीं घोंघों करणें. ३ (ग्रं०) ओसाडी. ४ (वि०) ओसाड.

भणभणणें (धा. ना.) मक्षिकासमुदायानें भणभण अशा शब्दानें युक्त होणें. २ तिखट खाणें, तोंडांत मारणें इ०कारणानें कानशिलानीं भणभण शब्द होतो असें वाटायाजोग्या व्यथेनें युक्त होणें. ३ सूर्योदयामुळें दिशांस प्रकाशविशिष्टता येणें.

भणभणीत (वि०) शोभेस कारण जी मनुष्यादिकांची वसती तिचें अत्यल्प किं० केवळ अभाव झाल्यामुळें ओकें दिसतें जें गृह, बंगला इ स्थळ तें. २ भणभणल्या ज्या दिशा त्यांचे किं० स्वच्छ उजेडण्याचें वि०. ३ (न.) दिशांस येते जी भणभणीतपणारूप अवस्था ते.

भंदें (न. ना.) गोंधळी इ० आंत अग्नि पेटवून तळहातावर किं० डोक्यावर घेतात जें खापर तें. २ झिजल्यामुळें, आपटल्यामुळें ज्याचे कांठ मोडले, पोंचे पडले असें जें मडकें, तांब्या इ० भांडें, चूल इ० तें. ३ फुटणें, शिथिल होणें इ० कारणामुळें स्वर विचित्र येऊं लागावा अशा दशेनें विशिष्ट झालें जें कंठ, मृदंग इ०कांचें स्वरूप तें. ४ कोणेक मनुष्यादिकाची उत्कर्षदशा जाऊन केवळ दुर्दशेनें विशिष्ट झालें जें त्याचें स्वरूप तें.

भदेवी (स्त्री. ना.) (ग्रं०) कृपा.

भद्र (सं. न. ना.) शुभ.

भद्रजाति (पु. ना.) (ग्रं०) हत्ती.

भद्रासन (सं. न. ना.) सिंहासन.

भद्रा (वि०) कपाळकरंटा.

भबका (पु. ना.) अकस्मात् अग्नि मोठ्यानें पेटल्यामुळें किं० तत्तत्पदार्थावर उदकादि पडणें इ० कारणामुळें अग्नीच्या ज्वालांचा किं० वाफांचा एकदाच वेगानें उठतो पुंज तो. २कोरड्या मिरच्या इ०कांचें कोरडें चूर्णावर आघातादि झाल्यामुळें तसाच त्याचे सूक्ष्मांशाचा वेगानें उडतो जो पुंज तो. ३ अग्निसंयोगानें गुलाबपाणी इ०काढायाचें यंत्रास नळींतून आंत वाफ उतरायाचें संबद्ध असतें जे पात्र तें.

भबकार, कारा (पु. ना.) भबकाप्रथमद्वितीयार्थी.

भबकी (स्त्री. ना.) भबकार. २ थापवाजीचें बोलणें तें.

भंबेरी (स्त्री. ना.) बचेरी.

भय (सं. न. ना.) कोणेकापासून आपणास कांहीं मरणादि अनिष्ट प्राप्त होईल अशी संभावना झाल्यानें अंतःकरणांत दुःखरूप भाव उत्पन्न होतो तें. २ ज्यापासून अनिष्ट होईल अशी संभावना असल्ये त्याचें अस्तित्वरूप जें भ्यावयास निमित्त तें इ०. भय दाखविणें. म्ह० भयानिमित्ताचे प्रदर्शनानें तो भिई असें करणें.

भयंकर (सं. वि०) ज्याचे दर्शनादिकेंकरून भय उत्पन्न होतें असा जो उग्ररूपी व्याघ्र, राक्षस, क्रूरशब्द, रूप, स्मशान इ० घोर स्थळ तो.

भयप्रदर्शन (सं. न. ना.) भिऊन प्रवृत्त किं० निवृत्त व्हावें इतक्याच उद्देशानें भय दाखविण्याचा व्यापार तें. २ कोणेकानें भ्यावें म्हणून करून ठेवितात बुजगावणें तें.

भयभीत (सं. वि०) भय निमित्तानें जो भ्याला तो.

भयभीर (वि०) (ग्रं०) भ्यालेला.

भयान (न. ना.) उजाडीमुळें भय वाटायजोगा गृहादि स्थलांवर जो विशोभितपणा उत्पन्न होतो तें. २ (वि०) तद्विशिष्ट जे उजाड गृह इ० स्थल तें.

भयानक (सं. वि०) भयंकर. २ (पु.ना.) नवरसांतील एक रस आहे.

भयांभयां (अव्य०) करणें, करीत जाणें, फिरणें इ० यांच्या योगीं प्रयोग. अन्नाची, जागयाची इ० सोई नाहीं म्हणून दैन्य पावून दीन शब्द करीत दशदिशा फिरणें.

भर (सं. पु. ना.) बहरप्रथमार्थी. २ सर्व विषयांपेक्षां हेंच गोड अतएव सर्वदा हेंच करावें, हेंच भोगावें इ०-रूप कोणेक विषयाविषयीं अंतःकरणांत भाव असतो तो. कोणेकानें कोणेकाचे भरीं भरणें म्ह० मी कोण, करतों काय इ० विचार न ठेवतां त्याचे छंदीं लागणें. कोणेकानें कोणेक गोष्टीचे किं० मनुष्याचे भरीं पडणें म्ह० दुसऱ्याचा सांगी किं० दैवयोग इ० कारणानें विचार सुटून त्या त्या विषयीं प्रवृत्त होणें. भरीं घालणें, देणें म्ह० भरीं पडे असा करणें. ३ फल, पुष्प इ० कांचा बार तो ४ गाय, म्हैस इ० पशूंस प्राप्त होत्ये जी कामावस्था तो. ५ (स्त्री. ना.) न्यूनतांशाची पूरणानें पूर्णता ती. ६ त्या न्यूनतेच्या पूरणार्थ आंत घालितात द्रव्यांश ती इ०.

भरकचेरी (स्त्री. ना.) मनुष्यांनीं भरलेली कचेरी ती.

भरकटणें, कडणें (धा. ना.) त्वरेनें सरासरी लिहिणें, नांगरणें, रेखाटणें इ० क्रिया करणें.

भरगच्ची (वि०) अर्धा कलाबतू आणि अर्धे इतर सूत मिळून केलेला जो किनखाप, शेला, पागोटें इ० वस्त्र तो.

भरचक्का (वि०) पक्वान्नयुक्त जें भोजन तो.

भरजरी (वि०) भरगच्ची. २ केवळ जरीनेंच काढिलेला जो कशिदा, वेल, बूट इ० तो किं० तसें वस्त्रादि तो.

भरजवानी, जानी, ज्वानी (फा०) (स्त्री. ना.) तारुण्याचा जो भर ती.

भरण (न. ना.) भरवण २ (सं. न.) अन्नादिकेंकरून पोषण तें. ३ (ग्रं०) भराभर किं० भरती. ४ आयुष्य.

भरणा (पु. ना.) कोणेक संख्येचें किं० परिमाणाचें रुपये इ० द्रव्यानें पूरण तो. २ कोणेक सजातीय अनेक पदार्थांचा जो समुदाय तो. ३ कोणेकाजवळ एकजातीय पदार्थांचा असतो जो संग्रह तो.

भरणें (धा. ना.) पात्रभूत जो कांहीं

पदार्थ त्यांत कांहींएक पदार्थ समाविष्ट करणें. २ पदार्थांचा समावेश होण्यास जें पात्रादि स्थळ तें त्या त्या पदार्थांच्या समावेशानें निरवकाश करणें. ३ चित्र, कोष्टक इ० कांत कलम इ० कानें रंग संबद्ध करणें इ०.

भरताड (स्त्री. ना.) माल भरून आलेली जी बैल, गलबतें इ० कांची खेप ती.

भरती (स्त्री. ना.) चंद्राचे उदयास्तसमयीं समुद्राचे उदकास जी वृद्धिंगतता होत्ये ती. २ दौलत इ०कांची उत्तरोत्तर वृद्धि होत असावी अशी जी दशा ती. ३ भरगतप्रथमद्वितीयार्थी.

भरतें (न. ना.) चिरकाल थोडें बहुत अपथ्य सेवन, पापाचरण, इ० होत गेलें असतां रोग, भय, इ० उत्पन्न होण्यास कारणीभूत होत्ये पूर्णता तें. २ समुद्राची भरती.

भरधांव, धूम (अव्य०) पराकाष्ठा त्वरेचे वेगानें धावणें, पळणें इ० धातूंचें वि०.

भरपाई (स्त्री. ना.) हुंडी इ० कांचा पैसा पदरांत घेऊन त्याच हुंडी इ०कांवर भरून पावलों इ० रूप जो लेख लिहून देतात ती. २ कोणेक गोष्टीविषयीं तो लाभही नको आणि ती कटकट नको असा त्रास आला असतां, आतां याची भरपाई झाली भरपाई लिहून देतों इ० प्रयोग करितात.

भरपूर (वि०) जितका पाहिजे तितका व्हावयाजोगा पुष्कळ जो पदार्थ तो. २ आंत कांहीं हलकेपणा, पोकळपणा आहे असें न दिसतां भरलेला, पूर्ण, पुष्ट, असा दिसायाजोगा जो सेना, सभा, ध्वनि इ० पदार्थ तो.

भरभर (स्त्री. ना.) संपत्तीचा व्यवहार मोठे भरानें चालत असावा असा जो कोणेकाचे अर्जित दशेचा कांहीं काल भर असतो तो. २ (अव्य०) झरझर.

भरभराट (पु. ना.) अतिशयित जी भरभर तो.

भरभरीत (वि०) भरड जें वस्त्र पीठ इ० तो. २ ज्यांत चिकणाई नाहीं असें रुक्ष जें पीठ इ० चूर्ण तो किं० ज्यांत स्निग्धता नाहीं असा पदार्थ तो.

भरमजल (स्त्री. ना.) चालणारानें दिवसास दाहा, बारा कोसांची मजल करावी इ० रूप संप्रदाय त्याप्रमाणें पूर्ण जी मजल ती. [भरकचेरी.

भरमजलस, मजालस (स्त्री. ना.)

भरवण (न. ना.) एकवार जळायासाठीं किं० तळायासाठीं घातलें जें दिवा, कढई इ०कांत तेल इ० तें.

भरवणें (धा. ना.) मूल, दुखणेकरी इ०कांचे मुखांत अन्नादिकांचे ग्रास घालून त्यास जेवविणें किं०खावविणें.

भरवसा, भरवंसा (पु. ना.) कोणेकापासून आपलें कांहीं कार्य खामाखाय होईल असा जो त्याविषयीं अंतःकरणांत दृढभाव धरिला असतो तो. २ आपले अंतःकरणांत वाटतें तसेंच यापासून होईल, तसेच गुण यामध्यें असतील असा जो कोणेकाविषयीं अंतःकरणानें निश्चय धरिला असतो तो इ०.

भराडा (पु. ना.) (ग्रं०) कीर्तन करणारा गोसावी. २ पुजारी.

भराभर (अव्यय) झरझर. २ (स्त्री.) अनेक पदार्थ अनेक पात्रांत भरण्याचा व्यापार तो. ३ गृहांत नित्याचे खर्चाचें पाणी भरून ठेवण्याचा जो व्यापार तो.

भरारी (स्त्री.ना.)भर्र शब्द होई असा पक्ष्यांचे उडण्याचा व्यापार तो.

भरीवा (वि०) कोणेक परिमाण, पात्र इ० भरलें जाई इतका. २ निमेशिमे भरलेलें जें पात्रादिक तें पूर्ण व्हावयासाठीं अपेक्षित जो अन्यांश तो.

भरीत (न. ना.) भरगतप्रथमार्थी. २ वांगें, घोसाळें इ० भाजून किं० शिजवून आंत तिखट, मीठ, दहीं इ० घालून तोंडीं लावायास पदार्थ करितात तें

भरींव (वि०)ज्याचे पोटीं पोकळी नाहीं असा जो काष्ठ, अलंकार इ० तो.

भरें (न. ना.) (ग्रं०) माप.

भरोवरी (स्त्री. ना.) (ग्रं०) सामग्री अ० साधन. २ श्रम.

भर्ता (सं. पु. ना.) पति.

भर्तार (पु. ना.) दादला.

भर्त्सन, भर्त्सना (स्त्री. न. सं. ना.) तूं ह्मणजे पदार्थ काय, तुझ्यानें काय होणार, हो एकीकडे, तोंड दाखवूं नको इ० हलक्या वाक्यांनीं कोणेक मनुष्य इ०कांचा करितात जो तिरस्कार तो. तें.

भलतसा (वि०) भलते प्रकारचा. २ (अव्य०) भलत्या प्रकारें.

भलता (वि०) अमुक अशा रूपकरून विवक्षित नव्हे तो अर्थ. २ ज्या गोष्टीचा प्रसंग चालला असतां तिशीं कांहीं संबंध नाहीं असा निराळाच जो कांहीं अर्थ तो किं० ज्या अर्थास उचितपण असतें त्याहून केवळ विलक्षण जो अर्थ तो.

भलभलता (वि०) अनेक प्रकारेंकरून जो भलताच तो.

भला (सं. भद्र) (वि०) ज्याचे अंगीं लबाडी नाहीं आणि आपणापासून एकाएकीं दुसऱ्यास अपकार होऊं देऊं नये अतएव दुसऱ्यानें आपलें वाईट केलें तरी सोसून राहावें अशा स्वभावाचा तो. २ जसा असावा तसा जेवढा असावा तेवढा अतएव वाहवा व्हावयाजोगा जो कांहीं अर्थ तो. प्रायः अभिनंदन कर्त्तव्य असतां प्रयोग. उ० तुला त्यावेळेस भलें उत्तर सुचलें. ३ (ग्रं०) बरा.

भलावण (स्त्री.ना.) कोणी कांहीं कार्यार्थ देशांतरीं किं० ग्रामांतरीं जाऊं लागला असतां त्यास कोणी तेथें ज्याजवळ आपली पत असते त्याजवर त्यास गरज लागली असतां अमुकपर्यंत किं० मागेल तितका ऐवज देऊन आमचे नांवें ल्याहावा असें जें पत्र लिहून देतात तीं इ०.

भले (अव्य०) कोणेकाचें गाणें इ० कर्म पाहून चित्तास आनंद वाटला असतां त्याचे प्रशंसेसाठीं हा उद्गार निघतो.

भव (सं. पु. ना.) जन्ममरणरूप जो संसार तो. २ उत्पत्ति. ३ महादेव.

**भंवई** ( सं. भ्रू ) ( स्त्री. ना. ) मनुष्याचे डोळ्याचे ऊर्ध्वभागीं धनुष्याकार असल्ये जी केशपंक्ति ती.

**भवणें** ( धा. ना. ) ( ग्रं० ) उभवणें.

**भंवणें** ( धा. ना. ) भोंवणें.

**भवतिनभवति** ( सं. स्त्री. ना. ) कोणेक शास्त्रार्थादिकांचा निर्णय करण्याविषयीं जो परस्पर वाद प्रतिवाद होतो ती.

**भवन** ( सं. न. ना.) गृह. २ होण्याचा किं० असण्याचा जो व्यापार तें.

**भवरा** ( पु. ना. ) ( ग्रं० ) भ्रमर.

**भंवरी** ( स्त्री. ना. ) ( ग्रं० ) भ्रमण.

**भवानी** ( सं. स्त्री. ना. ) पार्वती म्हणून जी देवी ती. २ बोहणी.

**भवितव्य** ( सं. न. ना. ) होणार जें काहीं एक तें.

**भविष्य** ( सं. न. ना. ) वर्तमानकालाहून उत्तर कालीं होणार जें काहीं एक तें. २ त्याविषयीं आपले बुद्धीनें किं० ज्योतिःशास्त्रादि प्रमाणानें असें असें होईल असा करतो जो कोणी सिद्धांत तें. ३ भावी.

**भव्य** ( सं. वि० ) पोरकेपणा, हलकेपणा, किरकोळपणा न दिसतां सुशोभितपणा दिसायाजोगें मोठें आकारपरिमाण ज्याचें असा पदार्थादि तो. २ ( ग्रं० ) ठळक.

**भसकापुरी** ( स्त्री. ना ) वाईट भसभसीत तपकीर ती. २ भगवतीद्वितीयार्थी.

**भसभशीत** ( वि० ) ज्याचे अंगीं दमदारपणा नाहीं अतएव भसभस उडायाजोगा तपकीर इ० पदार्थ तो.

**भसाडा** ( वि० ) भारी मोठें वस्त्र, सूत, अक्षर इ० पदार्थ तो.

**भस्म** ( सं. न. ना. ) गोमय, काष्ठ इ० पदार्थ अग्नीनें सर्व निःशेष जळाला असतां जो परिणाम तें.

**भस्मसात्** ( अव्य० ) करणें, होणें याच्या योगीं प्रयोग, जळून भस्मरूप करणें किं० जळून भस्मरूप होणें.

**भस्मी** (वि०) सोनेरी रंगाचे बूट ज्यावर असतात असें वस्त्र तो. २ एक भस्मासारखा रंग आहे. ३ त्या रंगाचें वस्त्रादि तो.

**भळू** (वि०) साधारण युक्तीनें ठकला जावयाजोगा भोळसर तो.

**भक्ष** ( पु. ना. ) जो पदार्थ ज्यास खावयास योग्य तो त्याचा.

**भक्षण** (सं. न. ना.) भक्षण्याचा जो व्यापार तें. २ भक्षितात जें अन्नादिक तें.

**भक्षणें** ( धा. ना. ) खाणें.

**भक्ष्य** ( सं. वि० ) भक्षायास योग्य जो पदार्थ तो. २ ( न. ना. ) भक्ष.

**भाईचारा** ( पु. ना. ) एकमेकांनीं एकमेकाचें हित करीत असावें इ०रूप परस्पराचा सख्यभाव चालतो तो.

**भाईबंदकी, बंदी** ( स्त्री. ना. ) भाऊबंदकी.

**भाऊपणा** ( पु. ना. ) बंधुत्व.

**भाऊबंद** ( पु. ना. ) बंधु आदिकरून दायाद तो.

**भाऊबंदकी** ( स्त्री. ना. ) भाऊबंदपणा.

भाक ( सं. भाषा ) ( स्त्री. ना. ) कांहींएक कार्याविषयीं कोणेकास हें कार्य मी खचीत करीन इ० रूप देतात जें वचन तें.

भाकड ( वि० ) विऊन बहुत दिवस झाल्यामुळें दूध देईनाशी झालेली गाय, किं० म्हैस इ० तें. २ वृद्ध झाली किं० तुटार झाली अशी जी गाय, म्हैस इ० तें. ३ ( ग्रं० ) निरर्थक.

भाकडकथा ( स्त्री. ना. ) अडकथा.

भाखा ( स्त्री. ना. ) ( ग्रं० ) भाषण, भाषा.

भाग (सं. पु. ना.) एका अर्थाचे अनेक जे अंश ते प्रत्येकीं. २ भागाकारानें येतें जें फळ तें. ३ भागण्याचा जो संस्कार तो. कोणेक गोष्ट भागास येणें इ० करण्याविषयीं भोळीस येणें. ही गोष्ट करणें भाग आहे म्ह० उचित आहे. ४ वांटा.

भांग (सं. भंग) (पु. ना.) स्त्रिया इ०कांचे मस्तकावरचे केश दोहींकडे सारखे करून मध्यें जी सारखी रेघा करितात ती. २ गांज्याचा घाटा तो.

भागणें (धा. ना.) कोणेक संख्याकानें कांहींएक संख्या सपरिमित भाग पडत अशी विभक्त करणें. २ कांहींएक श्रम केल्यामुळें दमणें. ३ कांहीं नियमित द्रव्यानें नियमित खर्च निर्वहित होणें.

भागफिटणें (धा. ना.) (ग्रं०) द्वैतभाव नाहींसा होणें किं० ऐक्य होणें.

भांगभुरका (पु. ना.) भांग, तंबाखू, मेवा, मिठाई इ० संबंधें अव्यवस्थित खर्च तो.

भागवटा (पु. ना.) फार श्रम केल्यामुळें शरीरास फारच येतो जो भागलेपणा तो.

भांगार, भांगारें (न. ना.) (ग्रं०) सोनें. २ द्रव्य, पैका.

भागी (स्त्री. ना.) अनेकांनीं मिळून कांहींएक केला जो व्यापार, त्यामध्यें अनेकांचा अंशतः अंशतः असतो जो संबंध तो. २ (पु. ना.) भागीदार.

भागीं (अव्य० ) (ग्रं०) अंगें, स्वतः.

भागीदार ( पु. ना.) ज्या व्यवहारांत ज्याची भागी आहे तो त्या व्यवहाराचा किं० ते अनेक व्यवहारकर्ते एकमेकांचे.

भागीन (पु. ना.) (ग्रं०) वांटेकरी.

भागूबाई (स्त्री. ना.) केवळ अपराक्रमी जो पुरुष त्यास ह्मणतात.

भाग्य (सं. न. ना ) दैव. २ ऐश्वर्य.

भाग्यपुरुष (सं. पु. ना.) घरचा खुशाल, कठोर भाषणादिकानें कोणास दुखवायाचा नाहीं, पद्महस्ती, लाहान मोठीं धर्मकृत्यें ज्याचे हातून बहुत घडतात असा जो पुण्यात्मा पुरुष त्यास ह्मणतात.

भाग्यवंत (सं. वि०) भाग्य आहे ज्यास तो.

भाज, भाजा (स्त्री. ना.) भार्या.

भाजणी (स्त्री. ना.) कोणेक अंकराशींतून कोणेक अंकराशि जेथच्या तेथेंच उणा करण्याचा व्यापार तो. २ समुदायरूपानें स्थित जें कार्य,

द्रव्य इ० त्याचे व्यक्तीची अनेक स्थळीं विल्हेवाट ती.

भाजणें (धा. ना.) (ग्रं०) विषारादि उतरणें, शमणें.

भाजणें (धा. ना.) अग्नींत घालून किं० अग्नीवर तवा, खापर इ० पात्र ठेवून त्यांत घालून भाकर, दाणा, फळ इ० पदार्थ पक्व करणें. २ पोळणें. ३ जाळणें. ४ कोणेकास अनेक प्रकारें गांजणें. ५ (न. ना.) धान्य इ० भाजायाचें खापर त्यास म्हणतात.

भाजन (सं. न. ना.) पात्र.

भाजा (स्त्री. ना.) (ग्रं०) भार्या.

भाजी (सं. स्त्री. ना.) भात, भाकरी इ० जें मुख्य अन्न त्याबरोबर रुचीकरितां भक्षायासाठीं फळ, मूळ इ० शिजवून त्यांत तिखट, मीठ घालून तोंडीं लावणें करितात ती. २ तदुपयोगी फळ, मूळ, पत्र, कंद इ० ती.

भाजीपाला (पु. ना.) फळभाजी, पालेभाजी इ० क. २ त्याचें बोलणें इ० भाजीपाला म्ह० त्यांत कांहीं ऐवज नाहीं.

भाट (पु. ना.) राजादिकांची स्तुति करून उदरनिर्वाह करणारी एक जाति आहे. २ (ग्रं०) उखर भूमि ती. ३ मद, मत्सर इ०कांस म्ह०.

भाटीय, व (न. ना.) (ग्रं०) ऐश्वर्य.

भाड (स्त्री. ना.) कोणी आपली बहीण, बायको इ० किं० विकत घेतलेली, बाळगलेली जी स्त्री ती दुसऱ्यास मैथुनार्थ देऊन त्यापासून घेतात जें द्रव्य तीं.

भांडमा (वि०) भांडखोर.

भांडण (न. ना.) कलह.

भाडभीड (स्त्री. ना.) भीडभाड.

भांडवल (न. ना.) सावकारी इ० व्यवहारास साधनत्वेंकरून त्या त्या व्यवहारकर्त्यांनीं योजिलें असतें जें द्रव्यादिक तें. २ वाद युद्धादि प्रसंगीं त्या त्या व्यवहाराचे निर्वाहास साधनभूत आपले संग्रहास असतें जें लेखपत्र, श्लोकवाक्य, बुद्धीची कल्पना, दारूगोळा इ० तें

भांडार (सं. भांडागार) (न. ना.) श्रीमंत लोकांचें द्रव्यादि संग्रहाचें गृह तें.

भांडारगृह (सं. न. ना.) भांडार.

भांडें (न. ना.) धातु, मृत्तिका, काष्ठ, पाषाण इ०कांचें जें पंचपात्र, मडकें, घडगा, द्रोण इ० पात्र तें. २ तोफ.

भाडें (सं. भाटक) (न. ना.) दुसऱ्याचें घर, भूमि इ०कांचा उपभोग करीत असतां त्या निमित्तें जें त्या धन्यास द्रव्य द्यावें लागतें तें २ कांहीं माल मनुष्य इ० घोडें, मनुष्य, बैल इ०कांनीं वाहून ग्रामांतरादि स्थळीं पोहोंचवून जें द्रव्य घेतात तें. ३ तसें भाडें कबूल करून माल, मनुष्य इ० स्थलांतरीं पोहोंचविण्याचें पतकरून घेतात काम तें.

भाणवसा (पु. स्त्री. ना.) (ग्रं०) मडकीं, भांडीं इ०कांनी उतरंड लावण्याचें स्थळ. २ भानवसा.

भाणा, भाण (स्त्री. ना.) (ग्रं०) ब-हीण.

भाणें (न.ना.)(ग्रं०) ताट इ० पात्र तें.

भातकुली (स्त्री. ना.) लाहान मुली खेळांत स्वयंपाकाचा खेळ खेळतात तो

भातडी (स्त्री. ना.) (ग्रं०) भाता.

भाता (पु. ना.) तांबट, लोहार इ०-कांचें अग्नीस वारा घालायाचें एक कातड्याचें यंत्र आहे. २ तीर बाळ-गायाचें शिपाई लोकांचें चर्मपात्र आहे तो. ३ शिपाई लोक इ० भांडें कुंडें बाळगायाकरितां जी कातड्याची पिशवी बाळगितात तो. [भर्ता

भातार, भातारू (पु. ना.) (ग्रं०)

भातुक (न. ना.) (ग्रं०) खाजें, भक्ष्य. २ भातकूल.

भातुकें (न. ना.) (ग्रं०) भोजनाहून इतर पीठ, पोहे, लाडू, मेवा, मिठा ई इ० भक्ष्य मुलें भक्षितात तें.

भातें (न. ना.) दरमाहा करून ठे-विलेला जो चाकर इ० त्यास दूरदे-शीं जाणें इ० काहीं जड काम क-रायाचें असतां पोटासाठीं रोजमु-ऱ्याहून अधिक जें द्रव्य देतात तें. २ सावकार, सरकार इ० संबंधी मनुष्य आपणाकडे कांहीं कामाकरि-तां आला असतां त्याचा आपल्याकडु-न खोळंबा झाला इ० कारणामुळें जें त्यास पोटास देतात तें. ३ उरीं फुटलेल्या माणसास किं० गुरास पा-जायासाठीं एक औषध करितात तें. ४ (ग्रं०) समुद्रादिकास येते भरती तें. ५ मजुरी.

भादरणें (सं. भद्राकरण) (धा. ना.) चर्मावरील किं० हैस इ० कांचे अंगावरील केश वस्त्रा इ० कानें अं-गावरोबर कापणें. २ हजामत करणें.

भान (सं. न. ना.) अंतःकरणाची जागृतपणें जी स्थिति; जेणेंकरून दे-हास विषय संबंधादि झालेलें समजतें तें. २ जिच्या योगानें त्या त्या समयीं जें जें करावयाचें, जें जें न करावयाचें तें त्या त्या रूपेंकरून स्फुरतें अशी जी ज्ञानवृत्ति ते. ३ कोणेक विषयाकडे चित्ताचें जें अनुसंधान असतें तें. ४ शब्द, अनुमानादि साधनानें वि-षयाचें तत्तदाकार विशेषपणेंकरून होतें जें ज्ञान तें. ५ (ग्रं०)(पु.)सूर्य.

भानगड (स्त्री. ना.) कोणेक अर्थ ज्या थळींचा त्या थळीं असला म्ह-णजे सोईनें उमज पडत असतो तो सोय न लागायाजोगा इकडचें तिक-डे, तिकडचें इकडे झाल्यामुळें कोणेक व्यवहारादिकांत होतो जो गोंधळ तो.

भानु (सं. पु. ना.) सूर्य.

भांब (स्त्री. ना.) (ग्रं०) शोभा, सौंदर्य. २ आभास.

भांबवणें, भांबावणें (धा. ना.) भय, हर्ष इ० कारणामुळें घाबरून करावें कोणतें, न करावें कोणतें हा विचार सुटे असें भ्रमविशिष्ट होणें.

भांबा (स्त्री. ना.) (ग्रं०) भांब. २ विकार.

भाम (सं. पु. ना.) (ग्रं०) मेव्हणा.

भामटया (पु. ना.) दृष्टि चुकावून दुसऱ्याची वस्तु चोरणारा तो.

भार (सं. पु. ना.) पदार्थांचे ठायीं जडतारूप असतो जो धर्मविशेष तो, ज्याचे योगानें तो पदार्थ निराधार झाला असतां अधोदिशाकडे येतो. २ तो भार ज्याचे अंगीं आहे असा जो पाषाणादि पदार्थ त्यास म्हणतात. ३ आपण वर निर्वाह्यत्वेंकरून स्थित जो राज्य, संसार इ० व्यवहार किं० प्रतीकार न होतां राहिलेला जो उपकार इ० काहीं त्यास भारविशिष्ट पाषाणादि पदार्थासारिखें मानून तत्संबंधी भार असें म्हणतात आणि त्या व्यवहारादिकांसही भारत्वेंकरून व्यवहार करितात. ४ रुपयाचे वजनाइतकें जें वजन तो. ५ आठ हजार तोळे वजन तो. इ०.

भारकस (पु. ना.) हत्ती, उंट इ० कांवर ओझें कसणें एतदर्थ केला असतो जो मोठा सोल तो.

भारजा (स्त्री. ना.) भार्या.

भारणी (स्त्री. ना.) भारण्याचा जो व्यापार तो. २ (ग्रं०) अधिकरण. ३ नेत्रानीं काहीं पदार्थ पाहून सुखावण्याचा व्यापार तो.

भारणें (धा. ना.) शाबरादि मंत्रानें अक्षता, पाणी, शस्त्र इ० काहीं एक अभिमंत्रित करणें. २ मंत्राचें फळ जो मोह इ० तेणेंकरून कोणेकास मोहित इ० करणें. ३ आपल्या तंत्राबाहेर न वर्ते असें कोणेकानें गुप्तरूपें भयलाभादिविषयक काहीं कानमंत्र करून स्ववश करून ठेवणें.

भारती (सं. स्त्री. ना.) वाणी. २ वाणीची अभिमानिनी देवता जी सरस्वती ती.

भारदस्त (वि०) वजनदार जो मनुष्य तो किं० त्याचें भाषण इ० तो.

भारदोरी (स्त्री. ना.) (ग्रं०) भारलेली दोरी स्त्रियांचे गळ्यांत प्राय: असते ती.

भारंभार (वि०) विवक्षित वजनाशीं तुल्य तो.

भारवाहक (सं. पु. ना.) ओझें वाहणारा जो गाढव, घोडें, उंट इ० तो. २ ज्या विद्यादि व्यवहाराचें विनय, धनलाभ इ० रूप जें फळ त्याचा लाभ नसतां उगीच भारप्राय; ती विद्या किं० व्यवहार बाळगणारा जो त्यास म्हणतात.

भारा (पु. ना.) डोकीवर वाहून न्यावयाजोगें जें तृण, काष्ठ, पानें इ० कांचें रचून बांधून केलेलें ओझें तो. २ ओलें तृण इ० कांची बांधलेली जी पेंढी ती.

भारावणें (धा. ना.) शरीर किं० शरीरावयव, शैत्यादि आंत शिरल्यामुळें आपले आपणासच जड वाटायाजोगे भारानें विशिष्ट होणें. २ कंठाळ इ० जें ओझें तें भिजणें, आंत काहीं ओझें अधिक पडणें इ० कारणामुळें पूर्वापेक्षा अधिक जड होणें.

भारी (स्त्री. ना.) लाकडांची जी मोळी ती. २ विद्या, शौर्य, बळ, भार, किंमत इ० गुणानीं विवक्षितापेक्षां अधिक तो. ३ ज्याला ज्याची गांठ पडली असतां निर्वाह करणें जड पडतें तो त्यास. ४ (वि०) फार.

भारूड (न. ना.) सांगूं लागलें अ-

सतां एकाएकीं संगायाचें नाहीं आणि समजून घेणारासही एकाएकीं पूर्वापर संबंध जुळून आकलन होऊ नये असें जें लांबचलांब साम्प्रत झालेलें वर्तमान किं० पुरातन कवींनीं बांधलेली कथा, शास्त्र, गोष्ट इ० तें.

भारेणें (धा. ना.) (ग्रं०) जडत्वास येणें. [कुंभार.

भार्गव (पु. ना.) परशुराम. २(ग्रं०)

भार्गवी (पु. स्त्री. ना.) शुक्राचार्य. २ सरस्वती.

भार्या (स. स्त्री. ना.) बाईल.

भाल (स्त्री. ना.) भाला, बरची, सांग इ० कांचे अग्रभागीं जें लोखंडाचें फळ लावितात तें. २ (स. न.) भाळ.

भालदार (पु. ना.) राजादिक जे मुद्राधारी त्यांपाशीं एक सेवक असतो, ज्याणें हातीं छडी धारण करून सरदार, प्रधान इ० कांस बलावणें, ताकीद इ० काम करतो तो.

भाला (सं. भल्ल) (पु. ना.) चिवा इ० कांच्या लांब कांठीस अग्रभागीं लोखंडाचें फळ लावून जें शस्त्र करितात तो. २ गाईचें दूध काढतेवेळेस तिचे मागले पाय बांधायास जी दोरी घेतात ती.

भालू (स्त्री. ना) वन्यपशुविशेष आहे.

भालेराइ (स्त्री. ना.) भालेराव म्हणून पूर्वीं कोणी पुंड होता त्याणें केली होती जी पुंडाई ती. २ कांहीं कारणानें ज्यास जसें मनास वाटेल तसें वर्तावें अशी होते जी पुंडाई ती.

भाव (सं. पु. ना.) अंतःकरणाचे जे अनेक वृत्तिभेद तेहिंकरून होनात जे अंतःकरणाचे अनेक स्थितिभेद ते प्रत्येकीं. २ देव, गुरु, औषध, मंत्र इ० कांच्या ठायीं हा ईश्वरच, यापासून माझें बरें होईलच अतएव सर्वथा यालाच सेवावें इ० रूप किं० यांत काय आहे, याचे सेवनानें कांहीं व्हावयाचें नाहींच नाहीं किं० वाईटच होईल इ० रूप कोणेकाच्या अंतःकरणाचा होतो जो निश्चय तो. ३ ग्रंथ, भाषण इ० कांतील आशय तो. ४ श्लोक, वाक्य इ० कांचा सारांशभूत जो अर्थ तो किं० सामान्यतः जो अर्थ तो. ५ स्वेद, रोमांचादि शृंगारादि रसांचीं लक्षणें तीं प्रत्येकीं. ६ वेश्यादिक जो त्या त्या रसाचा अभिनय करितात तो. ७ कोणेक अर्थाचें जें अस्तित्व तो. ८ जिनसजानसाचा जो दर तो. इ०.

भावगर्भ (सं. पु. ना.) (ग्रं०) ग्रंथादिकांतील सारांश.

भावणें (धा. ना.) हा बरा, हा वाईट इ० कोणेक अर्थ मानणें. २ कोणेक पदार्थ किं० कांहीं गोष्ट शरीरास किं० अंतःकरणास मानणें. ३ (ग्रं०) कल्पना करणें, कल्पिणें.

भावना (सं. स्त्री. ना.) कोणेक पदार्थास अस्तित्वेंकरून किं० कांहीं गुणविशेषत्वेंकरून मानण्याचा अंतःकरणाचा व्यापार तो. २ वातपित्तादि न्यूनाधिक्यामुळें शरीरप्रकृतीचे जे अवस्थाभेद होतात ते प्रत्येकीं. ३ भावद्वितीयार्थीं.

भावसदा ( पु. ना. ) (ग्रं०) आश्रय.

भावसा ( पु. ना.) (ग्रं० )वडील दीर.

भावार्थ ( सं. पु. ना. ) श्लोकादिकां-
तील सारांशभूत अर्थ तो. २ भाव-
द्वितीयार्थी. ३ अंतःकरणाचा नि-
ष्कपट भाव तो. अ० खरेंच सांगणें,
बोलणें इ० कांचें वि०.

भावीक ( वि० ) देव, गुरु, औषध
इ० कांपासून बरें होतें इ० जें त्या-
चें माहात्म्य,जें लोक शास्त्रांत सांगतात
त्याजवर ज्याचा मनःपूर्वक विश्वास
असतो तो.

भावीण ( स्त्री. ना. ) आपला दादला
सोडून कोठें देवस्थानीं जाऊन देवा-
चे नंदादीपांतील तेल आपले डोईवर
घेऊन देवाची दासी म्हणून राहात्ये
जी स्त्री ती.

भावुक ( सं वि० ) भावीक. [भाषण.

भाष ( स्त्री. ना. ) भाक. २ ( ग्रं० )

भाषण ( सं. न. ना.) बोलण्याचा
व्यापार तें. २ तेणेंकरून वाणीपासू
न निघतो जो शब्दसमुदाय तें.

भाषा (सं. स्त्री. ना.) बोली प्रथमार्थी.

भाषांतर ( सं. न. ना. ) एका भा-
षेनें लिहिलेला जो ग्रंथ इ० त्याचा
दुसऱ्या भाषेत जो अर्थ करितात तें.

भाष्य ( सं. न. ना. ) कोणेक मूल
ग्रंथ धरून त्याची व्याख्या करीत
असतां व्याख्येंत जें शब्दवाक्यादि
कठिण पडतें त्याची तेथें तेथें आपण-
च व्याख्या करावी अशा प्रकारचा
जो व्याख्याग्रंथ तें.

भाष्यकार ( सं. पु. ना. ) कोणेक
ग्रंथाचें भाष्य करणारा तो. २(ग्रं०)
शंकराचार्यविषयीं मुख्यत्वेंकरून
प्रसिद्धि.

भास ( सं. पु. ना. ) कोणेक अधि-
ष्ठानीं हा अमुकच अशी निश्चयात्म-
कता पावलेलें नव्हे, मात्र हा अमुक
असेल काय ? इतकें काहीं एक अर्था-
विषयीं होतें जें ज्ञान तो.

भास्कर (सं. पु. ना.) सूर्य.

भास्वत (सं. पु. ना.) सर्य. २ अग्नि.

भास्वर (वि०) ज्याचा प्रकाश पडतें
असें जें रूप किं० तद्विशिष्ट अग्नि,
सूर्य हिरा इ० तो.

भाळ (सं. भाल) कपाळप्रथमार्थी.

भाळणें (धा. ना.) कोणेकानें कोणे-
क विषयाच्या मोहानें किं० दुसऱ्या-
नें केलेला जो प्रार्थनादि उपाय तेणें-
करून तें बरेंसें वाटून अंतःकरण-
वृत्तीनें तिकडे वळणें.

भिकणी (स्त्री. ना.) अंथरुणावर
आलेले ढेकूण दुसरे दिवशीं बाहेर
टाकायास सांपडावे म्हणून आंत
ढेकूण राहण्याजोगा छिद्रें पाडलेला
जो लांकडाचा तुकडा अंथरुणाजव-
ळ बाळगितात तो.

भिकार (न. ना.) भिकाऱ्यांचा जो
समुदाय तें. २ (वि०) संपत्तिमान्
लोक जेथें नाहींत किं० पाहिजे ती
वस्तु पाहिजे तेव्हां मिळत नाहीं किं०
उत्पन्न होत नाहीं असा जो देश,
गांव इ० त्यास म्हणतात.

भिकारचोट (पु. ना.) दरिद्री किं०
कृपण यास निंदेनें म्हणतात. २ किं-

मत, बळकटी, पुष्टता इ० गुणानीं हीन जो पदार्थ त्यास किं० पाहिजे त्या कार्यास पुरायाजोगा नव्हे अ सा जो उणा पदार्थ त्यास निंदेनें म्हणतात.

**भिकारी** (पु. ना.) भीक मागून पोट भरतो तो. २ भिकारचोट ३ दुसऱ्यानें हिताची गोष्ट सांगितली असतां ऐकूं नये, लाभाविषयीं पराङ्मुख असावें, ज्या कामांत तोटा, नाश त्याविषयीं सादर असावें अशा स्वभावाचा जो मनुष्यादि त्यास म्हणतात.

**भिकूण** (पु. ना.) ढेंकूण.

**भिंग** (न. ना.) आरसा, उपनेत्र इ० करायाचे उपयोगीं पत्र्यासारिखा सपाट जो कांचेचा पदार्थ करितात तें. २ (ग्रं०) अभ्रक. २ भोंवरी म्हणून वेल आहे ती. ३ तिचें फळ तें.

**भिंगुरटी** (स्त्री. ना.) (ग्रं०) भ्रमरी

**भिंगुळवाणें** (वि०) (ग्रं०) भयानक.

**भिंगोरी** (स्त्री. ना.) भिंगरी. २ (ग्रं०) भ्रमरी.

**भिजणें** (धा. ना.) शुष्क जो काष्ठ, भूमि इ० पदार्थ तो उदक, दूध इ० सद्रव पदार्थानें ओला होणें.

**भिडणें** (धा. ना.) कालरूप किं० देशरूप अंतर मध्यें अगदीं न राही असें कोणेकानें कोणेकाचे जवळ येऊन संबद्ध होणें.

**भिडसरू, सारू** (वि०) भिडस्त.

**भिडस्त** (वि०) कांहींएक कर्म करण्यास किं० बोलण्यास ज्याला दुसऱ्याची भारी भीड वाटत्ये तो किं० दुसऱ्याचा ज्याला मुखसंकोच भारी तो.

**भिणें** (धा. ना.) भीतीनें युक्त होणें.

**भिंत** (सं. भित्ति) (स्त्री. ना.) घर इ० स्थळास आवरण व्हावें इ०दिकांसाठीं दगड, विटा, चुना, माती इ०कांचा जो रचनाविशेष करितात ती. २ नेत्रास कांहीं कारणामुळें जें अंधत्व येतें त्यास म्हणतात.

**भितरसवाई** (स्त्री. ना.) कोणेक व्यवहाराच्या ठायीं नफा होण्याचा जो संभव असतो तो न होतां उलटी जी नुकसानी होत्ये ती.

**भितरा** (वि०) भयाचें निमित्त थोडें असतांही ज्याणें फार भ्यावें अशा स्वभावाचा जो तो.

**भिता** (पु. ना.) (ग्रं०) लांकूड.

**भिंताड** (न. ना.) जीवर आच्छादन नाहीं अशी भिंत तें.

**भित्रा** (वि०) भितरा.

**भिनणें** (धा. ना.) शरीर, वस्त्र इ०कांचे ठायीं तेल, दूध इ० पदार्थानीं स्वरूपतः किं० विष, औषध इ० कांनीं स्वशक्तिद्वारा सकल अवयवावच्छेदेंकरून व्याप्त होणें. २ दुसऱ्यानें सांगितलेलें जें बरें किं० वाईट तें पुरतेपणीं मनांत ठसणें.

**भिन्न** (सं. वि०) भेदाच्या प्रथमार्थानें विशिष्ट तो. २ निराळा. ३ फुटका जो पात्रादि पदार्थ तो.

**भिरकांडी** (स्त्री. ना.) झुकांडी. २ लाभावांचून निरर्थक परिभ्रमण ती.

भिरकावणें (धा. ना.) झुगारणें.

भिरभिरणें (धा. ना.) झणझणणें. २ शैत्यादि विकारामुळें शरीर किं० शरीरावयव मुंग्या आल्या असें वाटायाजोग्या विकृतीनें विशिष्ट होणें.

भिरभिरी (स्त्री. ना.) अंगास मुंग्या आल्या असें वाटायाजोगी होत्ये विकृति ती.

भिरूड (स्त्री. ना.)(ग्रं०) झाड इ० कांस लागये कीड ती.

भिसळ (स्त्री. ना.) कोणेक पदार्थांत कोणेक पदार्थाचा मिश्रभाव तो.

भिस्त (स्त्री. ना.) भरवंसा प्रथमार्थी. २ कांहीएक जीवितनिर्वाहादि कार्याविषयीं काय एक आश्रय तो हाच पाहून इतर कोणी नाहीं असा जो भाव धरिला असतो तो.

भिस्ती (फा० पु. ना.) पखाल किं० मसक याणें पाणी वाहून उपजीविका करितो तो.

भिक्षा (सं. स्त्री. ना.) कोणेकाचें देणें आपण लागत नसतां त्याणें मागितल्यामुळें धर्मार्थ जें त्यास धान्य, द्रव्य इ० देतात तें. २ धर्मार्थ संन्यासी, योगी इ० कांस देतात जें भोजन तें. ३ अपराधाची क्षमा, दुर्व्यसनापासून परावृत्ति, कांहीएक कार्याचे ठायीं प्रवृत्ति इ०रूप कांहीएक दुसऱ्यापाशीं विनयपूर्वक करुणाशब्दानें मागतात त्यास म्हणतात.

भिक्षुक (सं. पु. ना.) याजन, प्रतिग्रह, किं० अध्यापन या वृत्तींनीं संसारनिर्वाह करीत असतो जो ब्राह्मण तो.

भी (सं. स्त्री. ना.) भय.

भीक (स्त्री. ना.) भिक्षा, परंतु हा शब्द हलका म्हणून निंदादि अवसरीं याचा प्रयोग. कोणेकास भीक लागणें म्ह० दरिद्र प्राप्त होणें. कोणेकास कोणेकानें भीक न घालणें म्ह० त्या त्या व्यवहारीं त्यास कांहीं न गणणें इ०.

भीड (स्त्री. ना.) कोणेक कर्म करण्याविषयीं दुऱ्याचे मनांत जसें आहे त्याहून अन्यथा वर्तलें असतां दुसऱ्याचा मनोभंग होईल असा जो भयासारखा मनांत भाव वागतो तो. २ दुऱ्याचे देखत बोलणें, खेळणें इ० विषयीं हा मला उद्धत, अमर्याद इ० आहे असें मानील म्हणून अंतःकरणास वाटत्ये जी शंका ती. ३ दाटी.

भीडस्त (वि०) भिडस्त.

भीतर, भीतरी (अव्य०)(ग्रं०) आंत.

भीति (सं. स्त्री. ना.) भय.

भीम (सं. वि०) भयंकर.

भुइकोट, भुईकोट (पु. ना.) पर्वताचा आश्रय नसतां भुईवरच तट बांधून करितात जो किल्ला तो.

भुकार (न. ना.) कुंभाराचें फिरतें चाक तें.

भुकाळू (वि०) ज्याला क्षुधा वरचेवर लागत्ये आणि लागली असतां कंठवत नाहीं अशा स्वभावाचा तो.

भुकिस्त (वि०) भुकेबंगाल.

भुकेबंगाल (वि०) ज्यास खावयास

ही मिळणें कठीण असा जो पराकाष्ठेचा दरिद्री तो.

भुकेला ( वि० ) क्षुधित. २ ज्या विषयावर ज्याची सर्व भावें प्रीति तो त्याविषयीं.

भुगा ( पु. ना. ) बुकणी.

भुंगा ( पु. ना. ) भ्रमर.

भुज ( सं. पु. ना. ) बाऽहळ्यापासून अंगुलीचे अग्रापर्यंत जो हात तो.

भुजग ( सं. पु. ना. ) भुजंग.

भुजंग ( सं. पु. ना. ) ज्याचे शिरीं दशांक चिन्ह असतें असा जो सर्प तो. प्राय: मोठा असतो म्हणतात.

भुजणें ( धा. ना. ) भाजणें.

भुंजणें ( धा. ना. ) (ग्रं० ) भोगणें. २ भाजणें.

भुंजाड ( वि० )(ग्रं०) भाजलेला तो.

भुंजिजणें ( धा. ना. ) ( ग्रं० ) भोगणें. २ उत्पन्न करणें.

भुटाटकी ( स्त्री. ना. ) (ग्रं०) भूल.

भुटेचोर, भुट्टेचोर ( पु. ना. ) जो प्रसिद्धपणें दरवडा घालीत नाहीं. घरच्या मनुष्याची असावधता पाहून हळूच युक्तीनें लाहानसान वस्तु चोरून नेतो असा जो चोर तो. २यजमानाचे संसाराची पोटाग ज्यास नाहीं, तोंडावर गोड बोलून आपलें कार्य साधावें असे मिळाले असतात जे भोजनभाऊ त्यास म्हणतात.

भुडकी (स्त्री. ना.) बुडकी प्रथमार्थी.

भुता ( पु. ना. ) भुत्या.

भुताटकी ( स्त्री. ना. ) कोणाचें वाईट किं० बरें करण्याविषयीं भुतास काहीं देऊं करून त्याजवर उठवावें किं० बसवावें इ० रूप जो भूतसंबंधी व्यवहार तो.

भुताटणें ( धा. ना. ) मनुष्यादिकानें क्रोधादिकांमुळें भूत अंगीं आल्याप्रमाणे अनावरपणें चाळे करूं लागणें.

भुतावळ (स्त्री. ना.) पिशाचांचा जो समुदाय तो. [देतात जो बलि तो.

भुतोंडी ( स्त्री. ना. ) ( ग्रं० ) भुतास

भुत्या ( पु. ना. ) अंगावर कवड्यांचीं भूषणें, तेलकट वस्त्रें, हातांत पोत धारण करून भीक मागणारा भवानीचा भक्त तो.. [स येणें.

भुभुसणें ( धा. ना. ) (ग्रं०) उदया-

भुमका ( स्त्री. ना. )ग्रामाभिमानिनी भूरूप देवता ती. २ अवाई.

भुयार ( न. ना. ) पर्वतादिकांत भुयीचे पोटीं असत्ये जी गुहेसारखी पोकळ जागा तें किं० गृहादिकांत भुमीचे पोटीं काहीं वस्तु ठेवायाकरितां हौदासारखी बांधून जी जागा केली असत्ये तें.

भुयाळ ( पु. ना.)(ग्रं०) वाटाड्या.

भुरका ( पु. ना. ) कढी, खीर इ० पातळ पदार्थाचें हस्त, चमचा इ० कांपासून शब्द होई असें मुखानें आकर्षण तो. २ भगवतीद्वितियार्थी. ३ संकेतानें एका रुपयास म्हणतात. ४ (वि०) एक वर्ण आहे. ५ तशा वर्णाचा जल, केश इ० पदार्थ तो.

भुरकी ( स्त्री. ना. ) घोड्याचें नेत्रादि सर्वांग झांकायाजोगें जें शिवून आच्छादन वस्त्र केलें असतें तीं.

भुरदंड (पु. ना.) दुसऱ्याचा कांहीं जिनस आपणापासून हरवला किं० जामीनगत इ० व्यवहार अंगास आला इ० कारणामुळें नाहक जें द्रव्य भरावें लागतें तें.

भुरभुर (अव्य०) अनुकरण. हलका तत्वांशरहित जो तृण, काष्ठ इ० पदार्थ त्याचें जें झराझर जळणें त्याचें वि०. २ एकत्र जमलेल्या मनुष्यांनीं अकस्मात् तळ मोकळा पडायाजोगें एकाचे मागून दुसरा निघाला, दुसऱ्याचे मागून तिसरा निघाला, अशा प्रकारचें अन्यत्र जाण्याचें वि०. किं० कोणेक तळ भरायाजोगें तशा प्रकारें येण्याचें वि०.

भुररें (न. ना.) (ग्रं०) कंवटाळ, चेटूक, चेडें. २ भुरळ.

भुरळ, भुरळें (न. ना.) कोणी आपणावर मंत्रप्रयोग किं० गोडगोड भाषण, आर्जव इ० केल्यामुळें केवळ त्यास वश व्हावें असा पडतो जो मोह तें.

भुरी (स्त्री. ना.) लांकूड, गोंवरी इ० कांची सफेत राख ती. २ (ग्रं०) अंगास चंदनादिकांची लावितात उटी ती.

भुलणें (धा. ना.) कैफ, संपत्ति इ० कांच्या योगानें बेशुद्ध होणें. २ कांहीं पदार्थ चांगला असा वाटल्यामुळें कर्तव्याकर्तव्यादि विचार सुटून त्याजवर केवळ लुब्ध होणें.

भुलथाप, थाप (स्त्री. ना.) दुसऱ्यास आपलें कार्य निश्चय होईल इ० रूप भरंवसा यावयाजोगा कोणी करतो जो खोटें भाषण, खोटा लेख इ० कपट ती.

भुलावणें (धा. ना.)(ग्रं०)दूर करणें.

भुवन (सं. न. ना.) भूलोकादि चौदा किं० वैकुंठ, कैलास इ० जे देवतांचे पृथक् पृथक् अनेक लोक आहेत ते प्रत्येकीं.

भुसकट, भुँसकट (न. ना.) धान्यराशींत त्याचे सगंशाचें असतें जें बारिक चूर्ण तें तेथून पृथक् केलें असतां प्र०. २ तत्सदृश काष्ठ, तृण इ० कांचें परस्पर घर्षण, किडा, भुंगा इ०कांनीं कोरणें, इ० कारणामुळें पडतें जें चूर्ण तें.

भुसडा (पु. ना.) बहुत घुसडल्यामुळें किं० बहुत श्रम घडल्यामुळें शरीर, वस्त्र इ०कांचा चुरा झालासा वाटायाजोगा होतो जो जर्जरपणा तो.

भुसभुशीत (वि०) ज्यामध्यें चिकणपणा, कठिणपणा नाहीं असा जो जमीन, माती, दगड, इ० पदार्थ तो.

भुसार, भुँसार (न. ना.) क्रयविक्रय व्यवहारीं धान्य आणि तृण एतद्रूप जो माल तें. २ भुसारी लोकांचा जो समुदाय तें.

भुसारी (पु. ना.) धान्याचें दुकान घालून किरकोळ धान्य विकणारा जो उदमी तो. २ भोंवरगांवीं धान्य खरेदी करून पेठेंत नेऊन विकितो तो किं० भात, तुरी इ० धान्य घेऊन त्याचे तांदूळ, डाळ इ० करून विकीत असतो असा जो उदमी तो इ०.

भू (सं. स्त्री. ना.) पृथ्वी, २ ज्यापासून जो उत्पन्न झाला तो तद्भू. उ०

अग्निभू म्ह० सुवर्ण. पद्मभू म्ह० ब्रम्हा इ०.

भूक (स्त्री. ना.) जठराग्नि भान पचन करायास कांहीं अन्नादि नाहीं-सें झाल्यामुळें अन्नादि भक्षावेंसें वाटायाजोगा जो दुःखरूप कलनाविशेष उत्पन्न होतो ती. २ कोणेक पदार्थ घेणें, मिळवणें इ० विषयीं इतका किं० येवढा मला मिळाला म्हणजे पुरे अशी कोणेक अवधीपर्यंत असले जी इच्छेची धाव ती.

भूगर्भवास (सं. पु. ना.) (ग्रं०) गुहा इ०कांत जो निवास तो.

भूगोल, भगोळ (सं. पु. ना.) पृथ्वीरूप जो हा गोळा तो.

भूज (स्त्री. ना.) भुजा.

भूत (सं. पु. ना.) देवयोनीमध्यें एक जातिविशेष आहे. २ (न.) पिशाचद्वितीयतृतीयार्थी. ३ पृथ्वी, उदक, तेज, वायु, आकाश हीं प्रत्येकीं. ४ विश्वांतील सर्व चेतनाचेतन पदार्थ ते प्रत्यकीं. ५ (पु.) पूर्वी होऊन गेलेला काळ तो किं० त्या काळचा व्यवहार, गोष्ट इ० तो.

भूतचेष्टा (सं. स्त्री. ना.) मनुष्यादिकांस शारिरबाधा व्हावी, अंतःकरणास भ्रम व्हावा, ठेवल्या जाग्यावरून पदार्थ अकस्मात् नाहींसा व्हावा, नासावा इ० होण्याविषयीं कारणीभूत जी त्या त्या कार्यावरून अनुमेय पिशाचाची कृति ती.

भूतणें (धा. ना.) (ग्रं०) भुलणें.

भूतदया (सं. स्त्री. ना.) प्राणिमात्रावर जी दया ती.

भूतबाधा (सं. स्त्री. ना.) मनुष्यादिकांस भूतकृत जी बाधा ती.

भूतल, ळ (न. ना.) पृथ्वीची पाठ.

भूतलें (वि०) (ग्रं०) मागील, मागलें.

भूतसृष्टि (सं. स्त्री. ना.) वस्तुतः ते ते पदार्थ नसतां कोणेक पिशाच आपले सामर्थ्यानें ग्राम, हत्ती, घोडे, बाजार इ० कितीएक पदार्थ जे क्षणमात्र दाखवितो ती. २ या सृष्टींतील पिशाचें ह्मणून प्रकरण ती. ३ पंचमहाभूतांची किं० त्यांपासून मनुष्यादि देहाची जी ईश्वरानें केली उत्पत्ति ती.

भूताहितो (पु. ना.) (ग्रं०) देव, पितर, आत्मऋण न देणारा तो.

भूदेव (सं. पु. ना.) ब्राह्मण.

भूधर (सं. पु. ना.) पर्वत. २ शेष म्हणून जो सर्प तो.

भूप (सं. पु. ना.) राजा.

भूपाल, ळ (सं. पु. ना.) राजा.

भूमंडल, ळ (सं. न. ना.) पृथ्वीचें हें शरीर तें.

भूमि (सं. स्त्री. ना.) पृथ्वी. २ भुई.

भूरुह (सं. पु. ना.) वृक्ष.

भूल (स्त्री. ना.) मादक पदार्थाचा मद चढल्यामुळें अंतःकरणास येतो जो बेशुद्धपणा तो. २ कोणेक प्रसंगीं बरें कोणतें, वाईट कोणतें, करावें कोणतें, न करावें कोणतें इ० विचार न स्फुरतां अन्यथा प्रवृत्ति निवृत्ति व्हावयाजोगें बुद्धीवर पडतें जें अज्ञानाचें आच्छादन तें.

भूलोक (सं. पु. ना.) भूमिरूप जो हा लोक तो.

भूषण (सं. न. ना.) शोभार्थ शरीरादिकाच्या ठायीं धारण करितात जो सुवर्णरत्नादिनिर्मित अलंकार तें. २ जें लोकांमध्यें स्वतः शोभतें, आणि तत्संबंधी जो त्यासही शोभवितें, प्रतिष्ठेस चढवितें, अतएव भूषणसदृश मानलें जें विद्या, कला, विनय, पराक्रम इ० गुण त्यास म्हणतात. ३ त्या विद्यादिकांच्या योगानें येतें जें भूषितत्व तें.

भूषावें (न. ना.) (ग्रं०) भूषण.

भूस, भूंस (न. ना.) भुसकट. २ भुसडा. ३ भुसाप्रथमार्थी.

भूसुर (सं. पु. ना.) भूदेव.

भृकुटी (स्त्री. ना.) भ्रूमध्यांत क्रोधादि कारणानें पडल्ये जी आढी ती. २ भिवईस कोणी म्हणतात.

भृंग (सं. पु. ना.) भ्रमर.

भृगु (सं. पु. ना.) शुक्रप्रथमार्थी.

भृति (सं. स्त्री. ना.) वेतन.

भृत्य (सं. पु. ना.) चाकर.

भें (न. ना.) (ग्रं०) भय.

भेऊर (न. ना.) (ग्रं०) भय.

भेक (सं. पु. ना.) बेडूक.

भेंकड (वि०) भितरा.

भेग (स्त्री. ना.) भूमि, काष्ठ, पाषाण, हात, पाय इ० कांस पडल्ये जी चीर ती.

भेट (स्त्री. ना.) गमनानें कोणेकाचा कोणेकाशीं परस्पर बोलणें, चालणें इ० व्हावयाजोगा होतो जो सामीप्य संबंध तो. २ मित्रामित्रादिकांची चिरकालेंकरून गांठ पडली असतां परस्पर देतात जें आलिंगन तें. ३ प्रभु इ० कांस भेटायास गेलें असतां भेटल्ये समयीं जें फळ, द्रव्य, वस्त्र, पान इ० कांहीं अर्पितात तें किं० स्नेहवृद्धीसाठीं फलादि कांहीं अपूर्वाईचा पदार्थ पाठवितात तो.

भेटणें (धा. ना.) कोणेकानें कोणेकाशीं भेट ह्मणून जो संबंध तद्विशिष्ट होणें. २ एकमेकाचे आलिंगनानें परस्पर विशिष्ट होणें. इ०.

भेटाभेट (स्त्री. ना.) अनेकांचा परस्पर भेटण्याचा जो व्यापार तो किं० एकाचाच कोणेकाशीं आलिंगन, कुशलप्रश्न इतका जो व्यापार तो.

भेडसावणें (धा. ना.) भिवविणें.

भेंडा (पु. ना.) भिंत इ० कांचे उपयोगीं चिखलाचा वरंबा रचून त्याचे जे अनेक तुकडे पाडितात ते प्रत्येकीं.

भेडावणें (धा. ना.) भेडसावणें.

भेडुका (वि०) (ग्रं०) भेकड. २ भयभीत.

भेंडोळें (न. ना.) सूत, दोरी, कागद इ० गुंडाळून केलें जें मोठें गुंडाळें तें.

भेण (न. ना.) (ग्रं०) भय.

भेद (सं. पु. ना.) परमाणु इ० रूप जे अनेक अवयव ते परस्पर संबद्ध होऊन झालेला जो अवयवी त्याच्या आंत शस्त्रादिकांचें शिरणें

इ० कारणानें होतो जो त्या अवयवां-च्याठायीं परस्परें वियोग तो. २ अर्थमात्रावर परस्परें भिन्नभिन्नत्वें-करून भान होण्यास कारणभूत जें विधर्मत्व तो. ३ निराळेपणा. ४ कोणेक कार्याकडे प्रवृत्त असल्ये जी अंतः-करणवृत्ति तिचा भयलोभादिप्रदर्शनानें होतो जो अन्यथा भाव तो. ५ कोणेक व्यवहारांतील गुप्त बारीक जें वर्तमान तो.

भेदक (सं. वि०) भेद करणारें जें शस्त्र इ० तो किं० अंतःकरणाचा भेद करणारा मनुष्य इ० तो.

भेदणें (धा. ना.) काष्ठ, पाषाण इ० पदार्थ शस्त्रादिकानें भेदविशिष्ट करणें. २ मनुष्य इ० कांस बुद्धिभेदाविशिष्ट करणें. ३ औषधादिक शरीरांत भिनणें.

भेदरणें (धा. ना.) चिरकाल अंतःकरणांत संस्कार राहायाजोगें भयानें विशिष्ट होणें.

भेदाभेद (पु. ना.) अनेक पदार्थ भिन्न भिन्न रूपानें मानण्याविषयीं प्रयोजक जी जाति इ० धर्मांची विषमानता तो.

भेदी (पु. ना.) कांहीं एकव्यवहारांतील गुप्त मर्मादिभेद ज्याला ठाऊक आहे तो त्या व्यवहारांतील.

भेद्या (पु. ना.) भेदी.

भेरी (सं. स्त्री. ना.) मोठा नगारा.

भेल, भेळ (स्त्री. ना.) भिसळ.

भेलगा (पु. ना.) वातादि विकृतीनें वृषण मोठा होऊन खालीं लोंबूं लागे असा वृषणाचा आधारबंध शिथिल होणें तो.

भेला (पु. ना.) मोठी भेली तो.

भेली (स्त्री. ना.) गुळाची ढेप.

भेश (पु. ना.) वेष.

भेषज (सं. न. ना.) औषध.

भेसूर (वि०) भयंकर.

भोई (पु. ना.) डोली, पालखी इ० यान वाहून उपजीविका करणारा जो पुरुष तो. २ एक हेंच कर्म व मासे मारणें इ० धंदा करणारी जाति आहे तो. ३ घोडेपाळणा टांगावयाकरितां उभीं करितात जीं चार काष्ठें तीं प्रत्येकीं.

भोंक (न. ना.) छिद्रप्रथमार्थी. २ सावकारी इ० व्यवहारांत लोकांचे लक्ष्यांत न यावयाजोगी असल्ये जी उणीव तें. ३ राज्यादि व्यवहारांत प्रवेशास केलें जें द्वार तें. इ०.

भोंकसा (पु. ना.) भिंत, वस्त्र, शरीर इ० कांस पडतें जें मोठें भोंक तो.

भोंकाड (न. ना.) रडणें इ० प्रसंगीं तोंडाचा मोठा पसरतो जो आ त्यास निंदेनें म्हणतात.

भोक्ता (वि०) कोणेक विषयाचा भोग घेणारा जो तो. २ भक्ष्य भोज्य पदार्थ ज्याला आवडतात आणि भक्षावयाविषयीं ज्याला शरीर शक्ति अनुकूळ असल्ये असा जो पुरुषादिक तो. ३ विद्या, कला, इ० कांचा जो ग्राहक तो.

भोक्तृत्व (सं. न. ना.) प्रारब्धयो-

गानें सुख किं० दुःख अवश्य भोग-
लेंच पाहिजे असा जो भोगणारावर
योग्यताविशेष असतो तें.

भोग ( सं. पु. ना. ) सुखविषयक
किं० दुःखविषयक आत्म्याच्याठा-
यीं जो अनुभव तो. २ खाणें, पिणें,
नेसणें इ० जो यथायोग्य व्यापार
तो किं० त्यापासून उत्पन्न झालेलें
आत्म्याच्याठायीं अनुभूयमान होणारें
सुखात्मक किं० दुःखात्मक फळ तो.
३ प्रारब्धकर्माचें अवश्य भोक्तव्य-
तेंकरून प्राप्त फळ तो. भोग देणें
म्ह० पुरुषानें स्त्रीस किं० स्त्रीनें पु-
रुषास मैथुनसुख देणें. [र्कांट आहे.

भोग ( पु. ना. ) ( ग्रं० ) एक क्षुद्र

भोगणें ( धा. ना. ) कोणेक अर्थ
भोगविषय करणें.

भोगवटा ( पु. ना. ) क्षेत्र, ग्राम इ०
कोणेक विषयाचे भोगानें कांहीं
काळ कोणाकडे चालली असत्ये जी
वहिवाट तो.

भोगळ ( वि० ) ज्यामध्यें असावा त-
सा घट्टपणा नाहीं असें जें नेसणें इ०
तो किं० नेसणें इ० सैल ज्याचें
असा जो मनुष्य तो किं० तसा त्या-
चा सैल जो कारभार तो.
२ ( न. ना. ) ( ग्रं० ) एक क-
र्णासारिखें मुखवाद्य आहे तें.

भोगा ( पु. ना. ) ( ग्रं० ) नाक.

भोगी ( वि० ) निरंतर पुष्प, चंदन,
स्त्रिया इ० विषयांचा उपभोग करीत
असावा असा जो पुरुषादिक तो.
२ ( पु. ना. ) सर्प. ३ मकरसंक्रांत
आणि कर्कसंक्रांत यांचे अदले दि-
वस ते प्रत्येकीं.

भोज ( स्त्री. ना. ) ( ग्रं० ) आवड,
इच्छा. २ संतोष. ३ राज्य. ४ मो-
ठेपण. ५ योग्यता.

भोजन ( सं. न. ना. ) जेवण.

भोजनभाऊ ( पु. ना. ) संसारसंबं-
धी कामकाज न करितां, काळजी
न वाहतां केवळ भोजनार्थच जो
मिळाला असतो त्यास म्हणतात.

भोत ( पु. ना. ) धान्यादिक आंत
भरून ठेवायाकरितां गोणपाट इ०-
कांचा जो मोठा थैला करितात तो.
२ भाजल्या पोळल्यामुळें शरीराव-
रील त्वचा जाऊन किं० शासनादि-
कार्थ शरीरावरील त्वचा शस्त्रादि-
कानें काढून करितात जो केवळ
उघडा मांसगोल तो.

भोंदणें ( धा. ना. ) कपटानें भाळवू-
न किं० लोभवून किं० आपणांत
मंत्रविद्या, किमया इ० अद्भुत सा-
मर्थ्य आहे असें दाखवून कोणेकास
आपण म्हटल्याप्रमाणें वर्तायाजोगा
स्ववश करणें. [चा स्वभाव ज्याचा तो.

भोंदू ( पु. ना. ) दुसऱ्यास भोंदण्या-

भोपळसुती ( वि० ) ज्यांत बंदोबस्त
तादृश नाहीं आणि बारकावा नाहीं
असा जो कोणेकाचा राज्य, साव-
कारी, व्यवहार, कारभार इ० तो.

भोरपी ( पु. ना. ) कोल्हाटी. २ क-
ळासूत्री, खांबसूत्री, दशावतार इ०
भोरप करून उपजीविका करणारा
तो.

भोरा ( वि० ) गोर आणि रक्त हे

वर्ण एकत्र झाले असतां जो एक निराळाच वर्ण होतो तो किं० तद्विशिष्ट जे केंस, गदूळपाणी, म्हैस इ० पशु तो.

**भोरीप** ( सं. बहुरूप ) ( न. ना. ) कळासूत्र, खांबसूत्र, दशावतार इ० कांचा जो खेळ तें.

**भोंवंड** (स्त्री. ना.) भोंवळ.

**भोंवडणें** (धा. ना.) कांहींएक पदार्थ मंडलाकार फिरविणें. २ कोणेक मनुष्यास अनेक मार्गांनीं इकडून तिकडे तिकडून इकडे अशा प्रकारें हिंडायास लावणें.

**भोंवणें** (धा. ना.) कोणेक पदार्थानें मंडलाकार फिरणें. २ पित्तादिकांमुळें डोळे, कपाळ इ० भोंवतें असें वाटायाजोगे विकृतीनें विशिष्ट होणें. इ०.

**भोंवता** (अव्य०) आसमंतात्.

**भोंवर** (पु. ना.) (ग्रं०) भुंगा.

**भोंवरगांव** (पु. ना.) इष्ट जो ग्राम, पत्तन याचे भोंवतालचे जे गांव ते प्रत्येकीं.

**भोंवरा** (पु. ना.) काष्ठादिकांचा वर्तुल फिरविला असतां भोंवत राहायाजोगा एक खेळण्यासाठीं पदार्थ केला असतो तो. २ नदी इ० कांच्याठायीं उदकाचें जेथें मंडलाकार भ्रमण होतें तेथें जो आकारविशेष होतो तो. ३ शरीरावरील केंसांचा जो मंडलाकार तो. ४ भुळींत वाटोळी खळी करून त्यांत राहातो असा एक क्षुद्र प्राणी आहे तो. ५ शेंडीभोंवता राखतात जो केंसांचा घेरा तो. ६ (ग्रं०) भ्रमरास म्हणतात. ७ गाय, म्हैस इ० कांचे त्वचेस तृणादिस्पर्श झाला असतां त्या स्थळीं होतें जें स्फुरण तो.

**भोंवळ** ( स्त्री. ना. ) पित्त इ० विकृतीनें येत्ये जी घेरी ती. कोणेकाची भोंवळ जिरणें म्ह० कांहीं शिक्षा इ० प्राप्त झाल्यामुळें बल इ० कृतदर्पाचा परिहार होणें.

**भोंवार** ( स्त्री. ना. ) तेल्याचा घाणा, बैलराहाट इ० कांस जुंपलेला ढोणगा इ० कांची फिरायाची जी मंडलाकार वाट पडली असत्ये ती.

**भोंसकणें** ( धा. ना. ) तरवार, भाला इ० कांहीं एक पदार्थांत खुपसणें.

**भोंसडपट्टी** ( स्त्री. ना. ) खरडपट्टी.

**भोळा** ( वि० ) ज्याचे मनांत कपट नाहीं आणि कोणेक गोष्ट, पदार्थ बाह्याकारें ज्यारूपेंकरून दिसतो तेंच त्याचें खरें रूप; आंत कांहीं अन्यथाभाव असावा असें वाटत नाहीं अशा अंतःकरणाचा जो मनुष्यादिक तो.

**भोळाभाव** (पु. ना. ) सर्वांवर विश्वास ठेवून निष्कपटपणें वर्तण्याचा जो कोणेकाचा स्वभाव तो.

**भोळें** (न. ना.) क्रय विक्रयादि व्यवहारीं गणती, हिशेब इ० कांत दृष्टि चुकल्यामुळें एकमेकाचें एकमेकाकडे अन्याय्य अधिक येतें जें द्रव्यादिक तें. २ भुरळें.

**भौतिक** (सं. वि०) भूतसंबंधी श-

रीर विषयादिक पदार्थ तो. २ पि-शाचसंबंधी तो.

भ्याड (वि०) भित्रा.

भ्यासूर (वि०) भयंकर.

भ्रतार (सं. पु. ना.) दादला.

भ्रम (सं० पु. ना.) पदार्थाचें वास्तविक जें स्वरूप असतें तें न स्फुरतां त्या पदार्थाचें अन्य पदार्थत्वानें जें ज्ञान होतें तो. २ असावें एक आणि भासावें एक किं० कांहींच स्फुरूं नये अशी जी पित्त, कैफ इ० कारणामुळें अंतःकरणाची होणे अवस्था तो. ३ कोणेकाच्याठायीं विद्या, कला इ० जो गुण किं० कोणेकापासून झालेलें किं० होणारें जें दान, पराक्रम, चोरी इ० बरें वाईट कर्म इ०रूप अप्रत्यक्ष जो अर्थ त्याविषयीं कांहीं लक्षणादिदर्शनामुळें केवळ निश्चयात्मक नव्हे असें जें ज्ञान तो. ४ संशय. ५ मंडलाकार गतीनें फेरा किं० तसा फेरा होण्यास कारणभूत मंडलाकार फिरविण्याचा संस्कार तो. [चलन. २ परिभ्रमण.

भ्रमण (सं. न. ना.) मंडलाकार

भ्रमणें (धा. ना.) मंडलाकार फिरणें. २ परिभ्रमण करीत असणें. ३ एक असतां भलतेंच वाटावें अशा दशेतें अंतःकरणानें पावणें.

भ्रमर (सं. पु. ना.) पुष्पादिकांचे सुवासास अतिलंपट असा एक सपक्ष साहा पायांचा क्षुद्रजंतु आहे.

भ्रमाचाभोपळा (पु. ना.) आंत कांहीं ऐवजप्राप्ति इ० नसून बाहेर लोकांस उगीच भावमात्र दिसावा असा जो कोणी पुरुष किं० व्यवहार, कांहीं गोष्ट इ० तो.

भ्रमिष्ट (सं. वि०) कैफ, शोक, ज्वर, पित्तक्षोभ इ० कारणानें किं० स्वभावतः ज्याचे अंतःकरणास भ्रम पडला आहे असा पुरुष इ० तो.

भ्रंश (सं. पु. ना.) अधिकारादिकांपासून जो कोणेकाचा वियोग तो. २ शोकादिकारणानें बुद्धीस होतो चळ तो.

भ्रष्ट (सं. वि०) राज्यपदापासून भ्रंश पावला तो. २ आचारविचाररहित अतएव अपवित्र जो मनुष्य किं० स्थळ इ० तो.

भ्रष्टाकार (सं. पु. ना.) सोंवळें, ओंवळें, व्यभिचारादि दोष यांची व्यवस्था नाहींशी झाल्यामुळें सर्व एकवट झाल्यानें गृह, ग्राम इ० कांचेठायीं होणे जी भ्रष्टता तो.

भ्राता (सं. पु. ना.) भाऊ.

भ्रांति (सं. स्त्री. ना.) भ्रम.

भ्रांतिष्ट (सं. वि०) आपणच कांहीं केलें तें न केलेंसें वाटावें, न केलें तें केलेंसें वाटावें, पूर्वापर अनुसंधान राहूं नये इ० वारंवार भ्रांति ज्याला होत असावी अशा स्वभावाचा जो मनुष्य तो.

भ्रामक (सं. वि०) स्वविषयीं हें अमुकच असेंच असा एकरूप निश्चयन होऊं देतां अंतःकरणास अनेक प्रकारें भ्रम उत्पन्न करणारें जें संदिग्ध भाषण, अक्षर, वाक्य, इ० तो. २ (पु. ना.) (ग्रं०) लोहचुंबकास म्हणतात.

भ्रू (सं. स्त्री. ना.) भिवई.
भ्रूणहत्या ( सं. स्त्री. ना. ) गर्भस्थ प्राण्याची जी हिंसा ती.

---

## —म—

म— हा वर्ण पंचविसावें व्यंजन आहे
मऊ (सं. मृदु) (वि॰) शिथिलावयव जो पदार्थ तो. २ खरखरीत नव्हे तो. ३ ज्याचें भाषणादि कठोर नव्हे तो व त्याचें भाषणादि तो.
मकरंद (सं. पु. ना.) पुष्पांत जो रस असतो तो. [मदेव.
मकरध्वज (सं. पु. ना.) (ग्रं॰) का-
मकार (सं. पु. ना.) (ग्रं॰) प्रणवाची तिसरी मात्रा. [तुर्यावस्था.
मकारांत (पु.ना.)(ग्रं॰) समाधिरूप
मक्ता (अर॰ पु. ना.) कांहींएक कार्याची केली जी उक्ती बोली ती.
मख (सं. पु. ना.) (ग्रं॰) यज्ञ.
मखमल, माल (अर॰ स्त्री. ना.) एक फुलझाड आहे. २ (न.ना.) तिचें फूल तें. ३ अतिमृदु एक वस्त्र आहे.
मखर (न. ना.) देवादिकांच्या समारंभार्थ जाळ्या, वस्त्रें इ॰ ज्याच्या सभोंवतें लावून जें सुशोभित स्थळ करितात तें. २ जाळ्यांसहित जी ताटी तें.
मखलाशी, सी ( फा॰ स्त्री. ना. ) सरकारी कांहीं एक गोष्टीचे ठरावाचा जो कौल इ॰ कागद त्याजवर जें त्या ठरावातें जाणविणारें चिन्ह असतें तें. २ विवादविषय गोष्टीचा सिद्धांत होऊन जी समाप्ति दशा ती. ३ बहुत देणें, घेणें असतां सरकार इ॰ कांपासून थोड्या द्रव्यानें करून घेतली जी तोड ती.
मखी (सं. मक्षिका) (स्त्री. ना.) श्लोक, भाषण, पदार्थ इ॰ कांमध्यें जें गुप्त मर्म असतें तें. २ कांहींएक पदार्थ सिद्ध करण्याविषयीं जी युक्ति किं॰ पद्धति ती. ३ निशाण लक्षण्याचें बंदुकीवरील दृष्टी ठेवण्याचें स्थळ ती.
मगज (फा॰ पु. ना.) फलादिकांतील जो गीर तो. २ अस्थींतील मृदु अंश तो. ३ बीज.
मगजी ( फा॰ स्त्री. ना. ) अंगरखा इ॰ कांस शोभेसाठीं कडेस किं॰ इच्छित प्रदेशीं तापता इ॰ कांची पट्टी लावितात ती. [शक्ति.
मगदूर ( अर॰ पु. ना. ) सामर्थ्य,
मगर (पु. ना.) एक जलजंतु आहे.
मगरूर (अर॰ वि॰) गर्विष्ठ.
मंगल (सं. न. ना.) कल्याण. २ शुभकार्य, ग्रंथारंभ इ॰ स्थळीं जो ईश्वरादिकांचे स्तुतीचा श्लोकादिक असतो तें. ३ कांहींएक कार्याचे आरंभीं जें ईश्वराचें भजन स्मरणादि करितात तें. ४ (पु. ना.) एक ग्रह आहे. [इ॰ कार्य तें.
मंगलकार्य (सं. न. ना.) लग्न, मुंज
मंगलवाद्य (सं. न. ना.) मृदंग इ॰ वाद्य तें.
मंगलाचरण ( सं. न. ना. ) मंगल-

द्वितीयार्थी. २ पुराण, कथा इ० कथनाचे आरंभीं जे देवस्तुतीचे श्लोकादिक म्हणतात तें. ३ कांहींएक गोष्टीचा जो आरंभ तें.

मंगलाष्टक (सं. न. ना.) लग्न, मुंज इ० लावल्येसमयीं अंतःपट धरून आशीर्वादार्थ आ० मंगलार्थ जे श्लोकादिक म्हणतात तें. [खप्रकाश.

मंगळउखा (स्त्री. ना.) (ग्रं०) सु-

मंगळकूळ (पु. ना.) (ग्रं०) कल्याण करणारा. [णाचा ठेवा.

मंगळनिधि (पु. ना.) (ग्रं०) कल्या-

मंगळसूत्र (न. ना.) विवाहामध्यें नवरीच्या गळ्यांत सौभाग्यचिन्हार्थ जें सूत्र बांधितात तें.

मग्न (सं. वि०) पाणी इ० कांत बुडाला तो. २ व्यसन, ईश्वरभजन, गाणें इ० व्यापारामध्यें जो चूर तो.

मघमर्षीत (वि०) (ग्रं०) खमंग.

मघवा (सं. पु. ना.) इंद्र.

मघां (अव्य०) वर्तमान दिवसांत कांहींएक विद्यमान कालाच्या पूर्वकाळीं.

मघाशीं,सीं (अव्य०) मघां.

मंच (सं. पु. ना.) पलंग.

मंचक (सं. पु. ना.) मंच.

मचवा (पु. ना.) लहान गलबतांत एक भेद आहे.

मचूळ (वि०) खारें नव्हे, गोड नव्हे असें जें पाणी तें.

मच्छ (पु. ना.) मत्स्य, मासा.

मच्छर (सं. मशक) (पु. ना.) एक क्षुद्र प्राणी आहे.

मच्छरदानी (स्त्री. ना.) मच्छरानें उपद्रव न करावा ह्मणून छपरपलंगास भोंवतें जें बारिक वस्त्र लावितात तो.

मजकूर (अर० पु. ना.) कांहींएक प्रकरणाचे कागदांत लिहिलेलें किं० ज्ञातजें वर्तमान तो. २ ज्याचें विशेष रूपेंकरून वर नांव लिहिलें असतें असे जे किल्ला, मनुष्य, मौजे इ० पदार्थ त्याचाच पुनः उल्लेख करायाचा असतां सामान्य नांवापुढें याचा प्रयोग होतो. उ० किल्ले मजकुरीं मौजेमजकूरचा पाटील गेला. साल मजकूर ह्म० विद्यमान वर्ष.

मजबुत,बूद (अर० वि०) खंबीर प्रथमार्थी. २ (अव्य०) दृढ होई असें बांध इ० कांचें वि०. ३ (वि०) नहालायाजोगें जें भाषण इ० तो.

मंजरी (सं. स्त्री. ना.) तुळस इ०कांचें जें केसर तो. २ वाजवायाचा लहान टाळ तो.

मजल (अर० स्त्री. ना.) चालण्यानें आक्रमिला जो मार्गावधि तो. २ एक दिवसांत साधारण रीतीनें चालले असतां आक्रमित होतो जो मार्ग तो. ३ कांहींएक कार्याची जी केवळ परिणामावस्था तो. किं० विवक्षित दशा तो. [भा तो.

मजलस (अर० स्त्री. ना.) राजस-

मजला (पु. ना.) भुईघरावर फळीं सारखीं घालून वर मातीची जमीन करून राहायाजोगी खालच्या घरासारिखी जागा करितात तो. २ वखास कांहीं मध्यें मध्यें रेशमाच्या

खुणा करून बाकी सारें जरीचें काम करितात ते प्रत्येकीं.

**मजा** (फा० स्त्री. ना.) मौज.

**मजाल** (अर० स्त्री. ना.) सामर्थ्य, बळ.

**मजालस** (अर० स्त्री. ना.) मजलस.

**मजीत** (वि०) ज्या रंगास चांगली तकाकी नाहीं असा रंग किं० तद्विशिष्ट वस्त्रादि तो. २ मळल्यामुळें, चोळवटल्यामुळें ज्याची नवेपणाची टवटवी गेली असा जो वस्त्र, कागद इ० तो. ३ चांगली उपस्थिति नाहींशी झालेली जी विद्या, कला ती.

**मजूर** (फा० वि०) एक दिवसास अमुक देईन, तूं अमुक काम कर अशा रीतीची बोली करून ठेविला जो मनुष्य इ० तो.

**मंजूर** (अर० वि०) कबूल.

**मजूरा** (अर० अव्य०) देण्याघेण्याच्या व्यवहारांत दिलेलें द्रव्यादिक मुख्य रकमेंत वजा होई असें दे, पड इ० कांचें वि०.

**मजूरी** (फा० स्त्री. ना.) मजूर मनुष्यास देण्याचें जें द्रव्य तें. २ मजुराचें कर्म तें.

**मंजूळ** (सं. मंजुल) (वि०) कानास गोड वाटे असा जो ध्वनि तो.

**मज्जन** (सं. न. ना.) पाणी इ० कांत बुडण्याचा व्यापार तें.

**मटका** (पु. ना.) कंबर, बस, जीर इ० धातूंच्या योगीं प्रयोग. उ० त्या कामांत त्याचा मटकाच बसला, मटका जिरला.

**मट्ट** (अव्य०) कांहीं न बोलतां राहा, हो, बस इ० कांचें वि०.

**मट्टयासयेणें** (धा. ना.) बहुत चालण्यानें किं० कांहीं श्रम केल्यामुळें थकणें.

**मठ** (पु. ना.) एक धान्य आहे. २ (सं.) गोसांवी बैरागी, संन्यासी इ० कांचें राहायाचें स्थान तो.

**मठारणें** (धा. ना.) जखम इ० भरत भरत येणें. २ नव्या भांड्याचे ठोके इत्यादिनें ठोकून साफ होत असें करणें. ३ कांहीं कार्यास जो प्रवृत्त नाहीं त्यास त्या कार्याविषयीं अनेक युक्तींनीं अनुकूळ होई असें करणें.

**मठिका** (स्त्री. ना.) (ग्रं०) लाहान मठ ती.

**मठी** (स्त्री. ना.) घरास लाहानपणानें नांव ध्यावयाचें असतां म्हणतात. २ लाहान जो मठ ती.

**मठ्ठ** (वि०) मंद जो टोणगा, बैल इ० तो. २ बुद्धिमंद.

**मठ्ठा** (पु. ना.) पाणी न घालतां दहीं घुसळून लोणी न काढतां जें घट्ट कालवण इ० कांसाठीं करितात तो.

**मंडई** (स्त्री. ना.) शहर इ० कांचे ठायीं समुदायेंकरून भाजी, मेवा इ० विकला जातो ती जागा.

**मंडन** (सं. न. ना.) भूषण. २ खंडित पूर्व पक्षादिकांचें स्थापन.

**मंडप** (सं. पु. ना.) लग्नादि उत्साह करायाचे असतां द्वारादिकांपुढें छायार्थ स्तंभादिक पुरून सावल्या इ० कांनीं आच्छादित किं० प्रडवळी,

द्राक्ष इ०कांचे वेल चढायाकरितां किं० देवालयापुढें सभामंडपादिक करितात तो. २ सूर्यादिक न दिसायाजोगी जी मेघाची निबिड छाया तो.

मंडल, ळ (सं. न. ना.) वृत्ताकार जो घेरा तें. २ मनुष्यादिकांचा समुदाय तें. ३ राजसत्ताक्रांत भूमंडल तें. घोडा मंडळावर धरणें म्ह० मंडळाकार धरविणें.

मंडली, ळी (सं. स्त्री. ना.) मंडलद्वितीयार्थी.

मंडूक (सं. पु. ना.) बेडूक.

मडें (न. ना.) प्रेत.

मढ (ग्रं०) कळी. २ अंकुर.

मढगा (पु. ना.) (ग्रं०) मठिका, घर.

मढणें (धा. ना.) कातडें, वस्त्र इ०कानें कांहीं पदार्थ संबद्ध होई असा चिकटविणें.

मढें (न. ना.) मडें.

मणका (पु. ना.) ज्यांत मणभर धान्यादि राहतें तें माप, किं० मण वजनाचा दगड असतो तो. २ मोठा जो मणि तो. ३ पाठीच्या कण्याच्या हाडांच्या ज्या गांठी त्या प्र०.

मणि (सं. पु. ना.) हिरा इ०क रत्नें तो. २ त्यासारखे पाषाणादिकांचे करितात तो. ३ रुद्राक्षादिक ज्याच्या माळा करितात तो.

मत (सं. न. ना.) मनांतील जो कांहीं गोष्टीचा निश्चय तें. २ वादादिकांतील अनेक पक्ष ते प्रत्येकीं. ३ अनुमत.

मंतरणें (धा. ना.) अक्षता इ० मंत्रानें युक्त करणें. २ कोणेकास कांहीं कानांत सांगून अनुकूल बुद्धिविशिष्ट करणें.

मतलब (अर० पु. ना.) कांहीं गोष्ट सिद्ध करण्याविषयीं मनांतील आशय तो. २ त्यासाठीं कपटानें बांधिली जी मसलत तो.

मति (सं. स्त्री. ना.) बुद्धि.

मत्त (सं. वि०) उन्मत्त.

मत्ता (अर० स्त्री.) आपली जी द्रव्यादि संपत्ति ती.

मंत्र (सं. पु. ना.) ज्याची कांहीं विलक्षण शक्ति असल्ये असें जें ऋषि इ० कृत वाक्य तो. २ विचार, खलबत. ३ (ग्रं०) कर्मकांडास म्ह०.

मंत्री (सं. पु. ना.) प्रधान. २ सर्पादिकांचें विष उतरायाचे मंत्र जाणतो तो. ३ अष्टप्रधानांतील एक प्रधान आहे. ४ कोणी कोणास जो बुद्धिवाद सांगतो तो त्याचा.

मत्सर (सं. पु. ना.) कोणेकाचें बरें झालें असतां देखूं शकूं नये असा जो अंतःकरणांत धर्म उत्पन्न होतो तो. २ (न. ना.) मच्छर.

मत्स्य (सं. पु. ना.) मासा ह्मणून जलचर जो तो.

मथणें (धा. ना.) कांहीं कार्य करण्याविषयीं कोणेकानें बोध केला असतां अनुकूल होणें. २ दहीं इ० घुसळणें. ३ (ग्रं०) एकाद्यास ठार मारणें. ४ ग्रंथादिकांतील आशय मनांत आणायाकरितां त्याचें विवेचन करणें.

मंथा (न. ना.) दहीं इ० क घुसळ-ण्याचा आधार तें.

मथन (सं. न. ना.) मंथन.

मथितार्थ (सं. पु. ना.) विचारानें सिद्ध झाला जो अर्थ तो.

मंद (सं. वि०) जडबुद्धि तो, २ ज्या-चे अंगीं चंचलता नाहीं असा मनु-ष्य, घोडा, बैल इ० तो. ३ किंचित् अंध जी दृष्टि, ज्योति इ० तो.

मद (सं. पु. ना.) उन्मत्तता. २ हत्ती-च्या गंडस्थळांतून उन्मत्तता दर्शे-त जो द्रव निघतो तो. ३ पुष्प, फल इ० कांत जो उदकासारिखा पदार्थ असतो तो.

मदगज (पु. ना.)(ग्रं०)उन्मत्त हत्ती.

मदत (अर० स्त्री.)सहायता.२ (वि०) सहाय.

मदत्रय (सं. पु. ना.) विद्या, धन, कुल या तिहींचा जो मद तो.

मदन (सं. पु. ना.) कामदेव. २ श-रीरांत स्त्रीसंभोगाचा जो विकार उत्पन्न होतो तो.

मदनाचापुतळा (पु. ना.) अत्यंत सुंदर जो त्यास ह्मणतात.

मंदरूप (वि०) (ग्रं०) सूक्ष्मरूप.

मदविव्हल, ळ (सं. वि०) कामाच्या मदानें जो परवश झाला तो. [यार्थी.

मंदसत्व (न. ना.) (ग्रं०) मदहिती-

मदांध (सं. वि०) द्रव्यादि मदानें ज्याचा विचार नष्ट झाला तो.

मदार (अर० स्त्री. ना.) भिस्त. २ उंटाचे पाठीवर जो उंच अवयव असतो तो.

मंदिर (सं. न. ना.) गृह.

मदिरा (सं. स्त्री. ना.) मद्य.

मंदील (न. ना.) जरीचे काडीचें जें लाहान पागोटें असतें तें. [तो.

मदोन्मत्त (सं. वि०) मदानें उन्मत्त

मद्य (सं. न. ना.) प्यावयाची दारू तें.

मंद्र (सं. पु. ना.) (ग्रं०) नाभिस्थान-चा गंभीर नाद तो.

मध (सं. मधु) (पु. स्त्री. ना.) मध-माशा आपले पोळ्यांत पुष्परसाचा संग्रह करितात तो ती. २ कितीएक पुष्पांत मधुर द्रव असतो तो ती इ०.

मधु (सं. न. ना.) मद्य. २ मध.

मधुकर (सं. पु. ना.) भ्रमर.

मधुकरी (सं. स्त्री. ना.) शिजलेल्या अन्नाची ब्राह्मण मागतो भिक्षा ती. २ (वि०) ती मागणार तो.

मधुर (सं. वि०)गोड मिष्ट जो पदार्थ, भाषण इ० तो. २ साहा रसांतील एक रस आहे.

मधुरा (पु. ना.) ज्वर येऊन पुढें एक वायुप्रधान रोग होत असतो तो.

मध्य (सं. पु. ना.) ज्या भागापासून पदार्थाचे इतर भाग सारखे राहातात असा जो त्या पदार्थाचा विभाग तो. २ कटिप्रदेश.

मध्यम (सं. वि०) काहींएक गुणानें उत्कृष्ट नव्हे निकृष्ट नव्हे असा पदा-र्थादि तो.

मध्यवर्ती (सं. वि०) दोघांचा जो कांहींएक व्यापार त्याचें ठरावादिक कांहीं कर्म ज्याचे विद्यमानें होतें तो. २ मध्यभागीं राहातो तो.

मध्यवर्ती, मध्यावर्ती, मध्यावर्ती (स्त्री. ना.) परस्पराचे कार्याचा मध्यवर्तीपणा करण्याचा जो व्यापार ती. २ मध्यवर्तीप्रथमार्थी.

मध्यस्थ (सं. वि०) मध्यवर्ती. २ उभयपक्षसाधारण जो मनुष्य तो.

मध्यान्ह (सं. पु. ना.) दिवसाचा मध्य तो. मध्यान्हकाळचें कठीण म्ह० पोटास मिळायाचें कठीण.

मन (सं. न. ना.) सुख दुःख समजतें जेणेंकरून असें जें अकरावें इंद्रिय तें. २ संकल्पविकल्परूप जी वृत्ति तें. ३ संशयात्मक वृत्ति तें. ४ (ग्रं०) माया.

मनःकल्पित (सं. वि०) वास्तविक नसतां तर्कानें कल्पिला तो.

मनकवडा (वि०) दुसऱ्याच्या मनातलें सांगणारा तो.

मनदेवता (सं. स्त्री. ना.) परोक्ष अर्थाच्या तर्काविषयीं मनाचा झोंक तो.

मनधरणी (स्त्री. ना.) दुसऱ्याचें मन अनुकूल करून घ्यावयासाठीं जें आर्जव ती.

मनन (सं. न. ना.) जाणलें जें त्याचा पुनःपुनः अंतःकरणाच्याठायीं विचार करण्याचा व्यापार तें.

मननशील, शीळ (सं. वि०) मनन करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

मनःपूर्वक (सं. अव्य०) मनापासून.

मनमिळाऊ (वि०) सर्वांशीं मिळून वागण्याचा स्वभाव ज्याचा तो.

मनमुराद (सं. मन, अर० मुराद) (वि०) मनास आवडायाजोगा किं० मनाची हौस फेडायाजोगा जो विपुल पदार्थ तो.

मनसुबा (अर० पु. ना.) कांहींएक कर्तव्य गोष्टीविषयीं असें करावें असा विचार तो. २ मनोगत.

मनसोबा (पु. ना.) मनसुबा.

मनस्वी (सं. वि०) मन ज्याच्या स्वाधीन तो. २ ज्याचें अमर्याद कर्म तो किं० तद्विशिष्ट तो. ३ अतिशयित.

मना (अर० अव्य०) कांहींएक प्रवृत्त जें कार्यादिक तें निवृत्त होई असें कर हो या धातूचें वि०.

मनाई (मना) (स्त्री. ना.) मना करण्याचा व्यापार व प्रकार ती. २ तगादा मना व्हावा म्हणून त्याच्या धन्याची आणितात खूणमुद्रा ती.

मनाक (अव्य०) (ग्रं०) क्षणभर.

मनिह, हो (पु. ना.) (ग्रं) मनोविषय.

मनीषा (सं. स्त्री. ना.) इच्छा.

मनु (सं. पु. ना.) ब्रह्मदेवाचे दिवसांत कालाधिकारी जे चवदा होतात ते प्रत्येकीं. २ बरें किं० वाईट करण्याविषयीं कारण जो काल तो.

मनुज (सं. पु. ना.) मनुष्यप्रथमार्थी.

मनुष्य (सं. पु. न. ना.) अर्थानुसंधानपूर्वक व्यक्त भाषण करण्याची योग्यता ज्या द्विपद प्राण्यांत ईश्वरें ठेविली आहे तो तें.

मनोगत (सं. पु. ना.) मनामध्यें राहातो जो अर्थ तो. २ (न. ना.) मनांतील जो अभिप्रेत अर्थ तें.

मनोज (सं. पु. ना.) मदन.

**मनोती** (स्त्री. ना.) सावकारापासू व्याजानें पैसा घेतला असतांही त्या-च्या संतोषार्थ अणखी कांहीं द्रव्य कबूल करितात किं० लागलीच रो-ख देतात ती.

**मनोमय** (सं. वि०) मनःकल्पित.

**मनोरंजन** (सं. न. ना. ) चमत्कार-दर्शनादिकेंकरून मनास जो आनं-द तें. २ दुसऱ्याच्या मनास आनं-द व्हावयाजोगा जो क्रीडादि व्या-पार तें. [च्छा.

**मनोरथ** (सं. पु. ना.) मनांतील इ-

**मनोरम** (सं. वि०) मनास आनंद-कारक.

**मनोरा** (अर० पु. ना.) दगड, चु-ना इ०कांचा जो पोकळ स्तंभ मो-ठा उंच बांधितात तो.

**मनोहार** (सं. वि०) आपल्या सौंद-र्यानें मन हरण करून घेतो तो. २ (पु. ना.) त्र्यंकोबाचे भक्त त्र्यं-कोबाचा प्रसाद वांटितात तो.

**मनौरें** (न. ना.)(ग्रं०)मनाची इच्छा.

**मन्मथ** (सं. पु. ना.)(ग्रं०) मदन.

**ममता** (सं. स्त्री. ना.) हें माझें अ-शी जी बुद्धि ती. २ कांहींएक पदार्थावर प्रीति किं० दया उत्पन्न होत्ये ती. ३ मत्ता.

**मयंक** (पु. ना.) (ग्रं०) चंद्र.

**मयत** (अर० वि०) मेला तो. [आहे.

**मयूर** (सं. पु. ना.) एक सुंदर पक्षी

**मरगण, गळ** ( स्त्री. ना.) हात पाय अस्ताव्यस्त टाकून पडण्याचा जो प्रकार ती.

**मरण** (सं. न. ना.) देहामधील प्रा-णाचें जें गमन तें. २ कांहींएक गोष्टीविषयीं न्यूनता किं० नाश नाहीं असें निःसंशयपणानें वर्णायाचें अ-सतां मरण नाहीं असा प्रयोग. ३ कांहींएक संकट. [टेंकला तो.

**मरणोन्मुख** (सं. वि०) मरणदशेस

**मरतमडें** (न. ना.) केवळ जो अश-क्त तो.

**मरतवांझ** (स्त्री. ना.)जिला मुलें हो-ऊन वांचत नाहींत ती.

**मरतुकडा** (वि०) मरतमडें.

**मराठ** (वि०)(ग्रं०) स्पष्ट. २ सोपें.

**मराठमोळा** ( पु. ना. ) जे आपणास मराठे म्हणवितात त्यांचे बायकांनीं बुरखा घ्यावा अशा तऱ्हेच्या साधा-रण रीति असतात तो.

**मराठी** (वि०) महाराष्ट्र देशसंबंधी भाषा रीति इ० ती.

**मरातब** (अर० पु. स्त्री. ना.) कांहीं-एक मोठी विद्या किं० पराक्रम सं-पादिले असतां जें मोठें नांव देतात किं० सन्मान करितात तो ती.

**मरामत** (अर० स्त्री. ना.) निगा.

**मराल, ळ** ( सं. पु. ना. ) ( ग्रं०) हंसपक्षी. [आकार.

**मरिगळा** (स्त्री. ना.) (ग्रं०)आकृति,

**मरुत्** (सं. पु. ना.) (ग्रं०) वायु.

**मर्कट** (सं. पु. न. ना.) तांबडे तोंडा-ची वानरांत एक जाति आहे.

**मर्जी** (अर० स्त्री. ना.) सुप्रसन्नता. २ अंतःकरणवृत्ति. ३ अंतःकरण-

वृत्तीचा काहींएक करणें न करणें याविषयींचा आकार तो.

**मर्द** (फा० पु. ना.) मनुष्य. २ धैर्यवान् पराक्रमी असा जो तो.

**मर्दानी** ( फा० वि० ) पुरुषसंबंधी वस्त्र, आवाज इ० तो.

**मर्दुमी** (फा० स्त्री. ना.) मर्दाई.

**मर्म** (सं. न. ना. ) सन्निधानादिकेंकरून काहींएक कार्याविषयीं साधक जो त्या त्या पदार्थसंबंधी योग्यताविशेष तें, प्रायः त्याचें अनुमान कार्यावरून होतें. २ शरीरादिकाच्या अवयवावर आघातादि संस्कार झाला असतां सर्व अवयवांस व्यापितो असा जो त्या अवयवावर काहीं धर्मविशेष असतो तें. ३ श्लोकादिकाचें जें तात्पर्य तें. ४ गुप्त जें कोणेकाचें दुष्कर्म इ० तें. ५ त्या त्या कार्याचा निर्वाहक जो युक्तिविशेष तें.

**मर्यादा** (सं. स्त्री. ना.) देश, काल, क्रिया इ० कांस काहीं एक प्रमाणानें कल्पित जो अवधि ती. २ लोकव्यवहारानुरूप जी विनीतता असावी ती. ३ मनुष्यानें अमुक रीतीनें वागावें असा जो लोकसंप्रदायसिद्ध किं० शास्त्रसिद्ध नियम ती.

**मऱ्हाटें** ( वि० ) ( ग्रं० ) प्राकृत. २ सोपें. ३ स्पष्ट.

**मल** (सं. पु. ना.) मृत्तिका, केर इ०-कांच्या योगानें पदार्थावर जो उत्पन्न होतो तो. २ अंतःकरणामध्यें दुष्ट वासना इ० तो. ३ विष्टा.

**मलखांब** (पु. ना.) तालीमखान्यामध्यें जो गोलखांब कसरतीसाठीं असतो तो.

**मलपणें** (धा. ना.) (ग्रं०) हालणें.

**मलम** (फा० पु. न. ना.) जखम भरून यावी किं० वाहून निःशेष व्हावी म्हणून जें औषध घृतादिमिश्रित लावितात तो तें.

**मलमल** (स्त्री. ना.) फार बारीक कापड आहे.

**मलमा** (पु. ना.) घर, भिंत इ० पडल्यावर त्याचा अनुपयोगी होऊन पडतो जो सरंजाम तो. प्राय: दगड, मातीवर व्यवहार.

**मलशुद्धि** (सं. स्त्री. ना.) पोटांतील मळाचा झाडा ती.

**मलिन** (सं. वि०) मलविशिष्ट जें वस्त्रादि किं० अंतःकरण तो. २ आचारहीन जो मनुष्य तो. ३ उपस्थिति नसलेले जे विद्यादिक ते.

**मलूर, मलूल** (अर० वि०) रोग, श्रम इ०कानें जो यत्किंचित् म्लान तो. २ आधि इ०कामुळें मंदोत्साह जें अंतःकरण तो.

**मल्ल** (सं. पु. ना.) जेठी.

**मल्लयुद्ध** (सं. न. ना.) बाहुयुद्ध.

**मवणी** (स्त्री. ना.) (ग्रं०) गणना.

**मवागी, री** (स्त्री. ना.) शरीर मृद व्हावें म्हणून लावायाचें जें तेल तूप इ० ती.

**मवाळी** (स्त्री. ना.) मवागी.

**मशारनिल्ले, निल्हे** (अर० अव्य०) लेखांत ज्या थोर मनुष्याचें पूर्वी एकवार नांव आलें त्याचेंच पुनः

नांव त्याशिवयाचें असतां त्याच्या सामान्य नावामागें हें अव्यय लागतें किं० याणेंच बोध होतो.

मशाल (अर० स्त्री. ना.) दांड्यावाचून जी दिवटी ती.

मशीद (अर० स्त्री. ना.) ईश्वरभजन करायासाठीं मुसलमान लोक देवालयासारिखें बांधितात तीं. २ मोठें जें मनुष्यरहित घर, वाडा इ० त्यास म्हणतात.

मश्क (अर० स्त्री. ना.) गजनी.

मस (सं. मषी) (स्त्री. ना.) काजळ. २ (पु. ना.) शरीरावर तिळापेक्षां मोठा काळा जो डाग किं० गोलाकार असतो तो.

मसक (सं. मशक. फा०) (स्त्री. ना.) मनुष्यांनीं पाणी वाहायाचें उपयोगीं जें चर्माचें पात्र करितात तीं. २ (ग्रं०) चिलीट.

मसण (सं. श्मशान.) (न. ना.) मेलेलीं माणसें जाळायाची किं० पुरायाची जागा तें.

मसणवटी (स्त्री. ना.) मसण.

मसणा (वि०) अमुकच असा नामनिर्देश करायाचा नाहीं तेथें याचा प्रयोग कंटाळ्यानें बोलायाचें असतां करितात.

मसलत (अर० स्त्री. ना.) अमुक काम अमुक रीतीनें करावें असा जो विचार तो व तिचें फळ.

मसाला (अर० पु. ना.) शाक, भाजी, इ०कांस रुचि यावी म्हणून हिंग, जिरीं, मिरें इ० घालितात तो. २ घोडें इ० पुष्ट व्हावें म्हणून गूळ, मैदा, भांग इ० मिळून जो देत असतात तो. ३ लवंग, इलाची, खडीसाखर इ० खीर, लाडू इ०कांत घालितात तो इ०.

मसी (सं. मषी.) (स्त्री. ना.) (ग्रं०) शाई.

मसुदा (अर० पु. ना.) सिद्धांतपत्र करायाचे पूर्वी तो मजकूर सुधारायासाठीं भलते एकादे पत्रावर तो मजकूर लिहून जें पत्र सिद्ध करितात तो.

मसेरें (न. ना.) (ग्रं०) अंधारें.

मस्करी (अर० स्त्री. ना.) थट्टा, चेष्टा. २ (स. पु. ना.) संन्यासी.

मस्त (फा० वि०) मत्त. २ शरीरानें जो धष्टपुष्ट तो. ३ पुष्कळ.

मस्तक (सं. पु. न. ना.) डोकें.

मस्तवाल (फा० वि०) स्वभावेंकरून उन्मत्त तो.

मस्ती (फा० स्त्री. ना.) मस्तवालाचें कर्म. २ मस्तपणा. ३ हत्तीपासून जो मद गळतो त्यासही म्हणतात.

महकूब (अर० वि०) तहकूब अव्ययार्थी.

महजर (अर० पु. ना.) कोणीएकास वतनाचे साधनाचा जो काजी इ० कागद करून देतात तो.

महंत (सं. पु. ना.) गोसावी, बैरागी इ०कांच्या मंडळीमध्यें जो मुख्य असतो तो. २ विद्वान्, तपस्वी, साधु इ०कांमध्यें जो श्रेष्ठ तो. ३ (वि०) (ग्रं०) थोर.

महत्तत्व (सं. न. ना.) (ग्रं०) प्रकृतिपुरुषसंयोगापासून अहंकारादि सृष्टीस कारणभूत जो विकार उत्पन्न झाला; ह्यास गुणसाम्य किं० शुद्धसत्व ह्मणतात तें.

महत्व (सं. न. ना.) मोठेपणा.

महला, हल्ला (अर० पु. ना.) नगरादिकांमध्यें प्रायः एकजातीयच लोक राहातात असा जो प्रदेश तो.

महशूर (अर० वि०) प्रसिद्ध.

महसूल (अर० पु. ना.) सरकारी जो देश, ग्राम इ० त्याकडून वसूल येतो तो.

महाग (वि०) सामान्य रीतीहून ज्यास मोल अधिक तो पदार्थ इ०.

महाजन (सं. पु. ना.) विद्वान्, ज्ञानी, सदाचारसंपन्न असा जो मनुष्य तो. २ (प्रा० पु.) शहर, गांव, येथील एक अधिकारी आहे तो.

महात (पु. ना.) हत्तीचा नियंता.

महातेज (सं. न. ना.) (ग्रं.) ब्रह्म. २ सूर्य.

महात्मा (सं. वि०) औदार्य, धैर्य इ० केंकरून संपन्न जो पुरुष तो.

महानदी (सं. स्त्री. ना.) उत्पत्तिस्थानापासून शंभर योजनापर्यंत जी लांब गेली नदी ती.

महानस (सं. न. ना.) (ग्रं०) स्वयंपाकघर.

महानुभाव (सं. पु. ना.) ब्रह्मानुभवी तो.

महानैवेद्य (सं. पु. ना.) देवास जो अन्नमय नैवेद्य समर्पण करितात तो.

महापद (सं. न. ना. (ग्रं०) ब्रह्म.

महापातक (सं. न. ना.) ब्रह्महत्या, सुरापान इ० पातक तें.

महापुरुष (सं. पु. ना.) ईश्वर. २ साधु जो कोणी झाला तो.

महाप्रलय (सं. पु. ना.) ब्रह्मदेवाचीं शंभर वर्षे पूर्ण झाल्यावर जो प्रलय होतो तो.

महाप्रसाद (सं. पु. ना.) देवाच्या उत्साहांत लळीत झाल्यानंतर जो कांहीं प्रसाद वांटितात तो. २ (अव्य०) (ग्रं०) देव, गुरु इ०कांजवळ विनयपूर्वक होय म्हणणें या अर्थी याचा प्रयोग.

महाप्रस्थान (सं. न. ना.) (ग्रं०) यथार्थ ब्रह्मज्ञान होऊन जें मरण येतें तें. २ साधारण मरणासही क्वचित् म्हणतात.

महाफल, फळ (सं. न. ना.) नारळ, महाळुंग इ० फळ तें.

महामाया (सं. स्त्री. ना.) आदिमाया. २ निंदा कर्त्तव्य असतां बायकांस म्हणतात.

महामूर (अर० वि०) विपुल. २ (स्त्री. ना.) धान्यादिकाची विपुलता. ३ किल्ला इ०कांचीं लावलेलीं जीं कवाडें इ० तो.

महायंत्र (सं. न. ना.) तोफ.

महायात्रा (सं. स्त्री. ना.) काशीयात्रा.

महारवडा, वाडा (पु. ना.) महारांचें वसतिस्थान तो. २ सोंवळें, ओंवळें इ०कांच्या अव्यवस्थेचा जो प्रकार तो.

**महारस** (सं. न. ना.) (ग्रं०) ब्रम्ह. २ पक्कान्न.

**महाराज** ( सं. पु. ना. ) राजा. २ (वि०) थोर मनुष्यास सत्कारानें म्हणतात. ३ गुरूस म्हणतात.

**महाल** (अर० पु. ना.) तालुक्याच्या पोटीं अनेक ग्रामसमुदायात्मक जे देश, विभाग असतात ते प्रत्येकीं. २ क्रीडागृह.

**महावस्त्र** ( सं. न. ना. ) शालजोडी इ० प्रतिष्ठित वस्त्र तें.

**महावाक्य** (सं. न. ना.) (ग्रं०) गायत्रीमंत्र. २ तूं ब्रह्म आहेस अशा अर्थाचीं श्रुतिसिद्ध गुरूनें शिष्यास उपदेशायाचीं इ० वाक्यें आहेत तीं प्रत्येकीं. [जो रोग तो.

**महाव्याधि** ( सं. पु. ना. ) रक्तकुष्ट

**महाशून्य** (सं. न. ना.) (ग्रं०) शून्यास अधिष्ठानभूत ज्ञानघन ब्रह्म ते.

**महासुख** (सं. न. ना.) (ग्रं०) ब्रह्मसुख.

**महास्मशान** (महा, स्मशान) (न. ना.) (ग्रं०) काशीक्षेत्र. [टोणगा इ०.

**महिख** ( पु. स्त्री. ना.) (ग्रं०) म्हैस,

**महिखळ** (न. ना.) (ग्रं०) इंद्रिय.

**महिना** (फा० पु. ना.) शुक्ल, कृष्ण जे दोन पक्ष तदात्मक जो काळ किं० साधारण तीस दिवसांचा जो काळ तो.

**महिनेमाल** ( पु. ना. ) महिन्यास अमुक द्यावें अशा बोलीनें ठेविला चाकर इ० तो. [मोठेपणा.

**महिमा** ( सं. पु. स्त्री. ना. ) प्रभाव,

**महिला** (सं. स्त्री. ना.) लग्नाची वायको. २ नदी. [२ म्हैस.

**महिषी** ( सं. स्त्री. ना. ) पट्टराणी.

**मही** (सं. स्त्री. ना.) पृथ्वी.

**महीसुत** (सं. पु. ना.) मंगळ नांवाचा ग्रह. २ (ग्रं०) रक्त, रेत ह्या उभयरूपेंकरून रेत. ३ राजस, तामस या उभयरूपेंकरून अहंकार.

**महूर** (वि०) (ग्रं०) मधुर. [तो.

**मळकट** (वि०) मळलेलें वस्त्रादिक

**मळका** (वि०) मळकट.

**मळणी** ( स्त्री. ना.) धान्य त्या त्या तृणापासून सुटे असें करण्याचा जो व्यापार तो.

**मळणें** (धा. ना.) वस्त्र, शरीर इ० मळानें युक्त होणें. २ धान्य मळणीनें युक्त करणें. ३ पीठ, वस्त्र इ० हस्तपाद इ० कानें मृदु होई किं० कांहीं कार्याच्या उपयोगीं होई असें करणें. ४ घोडा इ० कांस इत्यादि व्यापारानें रगडणें.

**मळभ** (न. ना.) अभ्र.

**मळमळ** (स्त्री. ना.) पित्तामुळें किं० कलंकादि भक्षणामुळें जी ओकायाजोगी विकृति होत्ये ती. २ कांहींएक संदिग्ध गोष्ट मनांत आल्यामुळें चित्तास जी संशयात्मकता ती.

**मळमळीत** (वि०) खरमरीत नव्हे तो. किं० तिखट, मीठ, इ० लागून स्वादिष्ट झाला नाहीं पदार्थ तो. २ नीटनेटकेपणा ज्या व्यवहारामध्यें जसा असावा तसा ज्यांत नाहीं तो व्यवहार.

मळसूत्र (न. ना.) एक पदार्थ दुसरे पदार्थास पाहिजे तेव्हां जडावा, पाहिजे तेव्हां मोकळा करावा अशा-स्तव फिरकीचे खिळ्यासारखें करितात तें.

मळा (पु. ना.) शाख, भाजी, मिरची, कोथिंबिर इ० कांचें जें शेत तो. २ अव्वल जी दुपिकी जमीन तो.

मा (सं. स्त्री. ना.) लक्ष्मी. २ आई. ३ (ग्रं० अव्य०) नरमग किं० मगतर.

माउली (स्त्री. ना.) (ग्रं०) आई, व आईसारखी अतिशयित जी भली स्त्री तीस स्तुत्यर्थ ह्मणतात. २ जलदेवता.

माऊ (न. ना.) पोराच्या भाषेनें मांजरास ह्मणतात. २ त्याच भाषेनें आईच्या स्तनास म्हणतात.

माकण (स्त्री. ना.) घोडा, बैल इ०-कांचे पाठीवर घागरीनें पाणी आणायाचें एक यंत्र करितात तें.

माकोडा (पु. ना.) (ग्रं०) मुंगळा.

माखण (न. ना.) शरीर, भाकरी इ०-कांस चोपडायाचें जें कांहीं तेल, तूप, लोणी इ० तें. २ तेल इ० शरीरास चोपडण्याचा व्यापार तें.

माग (पु. ना.) वस्त्र विणायाचें यंत्र आहे. २ कांहींएक हरवल्यावस्तूचा किं० दरवड्याचा जो शोध तो. ३ अमुक वस्तु किं० श्वापदादिक ह्या मार्गानें गेलें तत्प्रबोधक जें त्याचें त्याचें चिन्ह तो. ४ कांहींएक गोष्टीचा भाषणादिकानें लागतो जो थांग तो इ०.

मागणी (स्त्री. ना.) लग्नासाठीं कन्या मागण्याचा व्यापार ती. २ समारंभपूर्वक कन्या मागून अमक्यास द्यावी असा जो निश्चय ती. ३ गंजिफाचे डावांत पान मागण्याचा अधिकार ती.

मागणें (भा. ना.) कांहींएक पदार्थ मला दे इत्याद्यर्थक बोलणें. २ (न.) कांहींएक वस्तु मागायासाठीं आला किं० गेला जो मनुष्य तें.

मागमूस (पु. ना.) कांहींएक गोष्टीचा जो थांगदोरा तो.

मागां (अव्य०) (ग्रं०) पूर्वी, मागें.

मागावें (न. ना.) (ग्रं०) मार्ग.

मागाहून (अव्य०) पाठीमागून.

मागिलीकडे (अव्य०)(ग्रं०) आल्याकडे.

मागुता, ती, तें (अव्य०)(ग्रं०) पुनः.

मागें (अव्य०) विवक्षित कालापूर्वी. २ कांहींएक पदार्थाच्या पाठीकडील भागास अनुलक्षून. ३ कोणिकाच्या परोक्ष.

मागेंपुढें (अव्य०) कांहींएक कर्तव्य कार्याचा पुरता विचार करण्यास योग्य जो अंश त्यांस अनुलक्षून. २ प्रसंगवशात् प्राप्त होणारा जो पुढील काळ त्याकाळीं. ३ (न. ना.) कोणिक व्यवहाराचेठायीं मागचें पुढें, पुढचें मागें असा जो विपर्यास तें. ४ (वि०) तसा ग्रंथादिक तो. त्यास मागें पुढें कोणी नाहीं म्ह० मातापितरें किं० स्त्री पुत्रादिक कोणी नाहीं. मागें पुढें करणें म्ह० माघार घेऊं लागणें.

मागोती (अव्य०) (ग्रं०) पुनः.

माघार (स्त्री. ना.) प्रतिज्ञात इ० कार्यापासून मागें सरण्याचा प्रकार ती.

२ दैवाची प्रतिकूळदशा ती.

माघारा, घारा ( अव्य० ) काहींएक कार्याविषयीं ज्या वेगानें प्रवृत्त झाला तो वेग उलटल्यामुळें तद्विरुद्ध वेगानें मागें येई असें ये, जा इ० धातूंचें वि०.

माघारीण (स्त्री. ना.) माहेराहून सासऱ्यास किं० सासऱ्याहून माहेरास चाललेली जी स्त्री ती.

माघू ( पु. ना.)(ग्रं०) माग. २ मार्ग.

माघोवा ( पु. ना.) (ग्रं०) माग.

माच (पु. ना.)(ग्रं०) ठिकाण. २ आश्रय. ३ पेंढा, गवत इ० ठेवण्यास मंडपाकार करितात तो.

माचवा ( पु. ना.) माचा. २ माऱ्याचा खूर.

माचा ( पु. ना.) मंचक.

माची (स्त्री. ना.) डोंगराचा शिरोभाग टाकून त्याचे खालीं सपाट भूमि असते ती.

माचीगाण (पु. ना.) (ग्रं०) दंडीगाण सारिखी एक जाति आहे.

माज (सं. मध्य) (पु. ना.) कंबर. २ (सं. मद) मस्ती. ३ गोमहिष्यादिकांस मैथुनेच्छेस कारण जो ऋतु प्राप्त होतो तो.

माजणें (धा. ना.) उन्मत्त होणें. २ विवक्षित मर्यादेपेक्षां अतिशयित पुष्टि इ० पावणें.

माजपण (न. ना.) (ग्रं०) उन्मत्तपण. २ मद्यादिक उन्मत्त द्रव्य तें. ३ अधिकपण.

माजिटा (पु. ना.) (ग्रं०) उत्कर्ष.

माजिरा (वि०) (ग्रं०) उन्मत्त.

माजिवटा (पु. ना.) (ग्रं०) उन्माद. मरण. [ आंत.

माजिवटें, वडें (अव्य०) (ग्रं०) मध्यें,

माजी (अर० वि०) कोणेक व्यवहाराविषयीं जो जो पदार्थ ज्या ज्या रूपानें व्यवहार्य असतो तो व्यवहार्यता सुटून अगण्यता कोटींत पडणें इ० धातूंचें वि०. माजी मामलेदार, माजी कारकून इ० सांप्रतचे पूर्वीचा. २ (ग्रं०) (अव्य०) आंत.

माजोरी (वि०) मातवाल.

माझारीं (अव्य०) (ग्रं०) मध्यें, आंत.

माझेपण (न. ना.) (ग्रं०) भजन.

माटमूट (स्त्री. ना.) काहींएक भयादिकामुळें घाबरून आतां काय करूं कसें करूं इ० रूप जी दशा प्राप्त होते ती.

माटुळणें (धा. ना.) (ग्रं०) खुंटणें.

माठ्या (वि०) ज्यामध्यें कळा किं० विद्या नाहीं असा मनुष्य तो.

माड ( पु. ना.) नारळाचें झाड.

मांड (पु. ना.) काहींएक व्यापार, कार्य यांच्या सामग्रीची कोणेक स्थळीं सिद्धता करण्याचा जो व्यापार तो. २ (ग्रं०) पसारा. ३ (स्त्री. ना.) मांडीस एक रोग होत असतो तो. ४ घोडेस्वाराचा समुदाय तो. ५ मांडजमणें, बसणें इ० घोडा इ० कांवर बसण्याचा पुरा अभ्यास होणें.

मांडणी (स्त्री. ना.) गृहादिकांची इच्छित उंचीपर्यंत जी स्तंभादि रचना ती. २ कितीएक इष्ट कार्या-

पयोगी पदार्थांचें इष्ट स्थळीं जें स्थापन तें.

मांडणें (धा. ना.) कांहींएक कार्यास साधन जे अनेक पदार्थ ते त्या त्या स्थळीं यथायोग्य स्थापणें. २ कांहींएक व्यापार कार्य इ० क आरंभयुक्त करणें. ३ जमाखर्च इ० प्रकरणीं कांहींएक कलमें लिहून ठेवणें. इ०.

मांडलीक (सं. पु. ना.) चत्वार देशरूप जो भूप्रदेश ज्यास ज्योति.शास्त्रप्रमाणें मंडल म्हणतात त्याचा राजा तो, हा सार्वभौमाचे खालीं होय.

मांडव (पु. ना.) मंडप.

मांडवी (स्त्री. ना.) मंडप. २ बंदरावर सरकारचे जिन्नस इ० उतरायासाठीं जें मोठें घरासारिखें बांधितात तें.

मांडळी (स्त्री. ना.) (ग्रं०) मंडळी.

मांडी (स्त्री. ना.) माडाच्या पोईचा मद्यासारिखा जो द्रव काढितात तें. २ घर इ०काच्या ठायीं जी उर्परिभूमि करितात ती.

मांडेबांध (पु. ना.) (ग्रं०) प्रभाव तेज. [२ विस्तार.

मांडोवा (पु. ना.) (ग्रं०) मांडणी.

माणा (पु. ना.) एक वृक्ष आहे २ (ग्रं०) उंसाचा रस जींत गळतो ती नांद तो.

माणीक (न. ना.) रक्तवर्ण एक रत्न आहे. २ (ग्रं०) (सं. माणवक लेंकरूं, मूल.

माणुसकी (स्त्री. ना.) थोरपणा इ० विशिष्ट जो मनुष्यपणा तो.

माणूस (पु. न. ना.) मनुष्य.

माणें (धा. ना.) मावणें.

मात (फा० स्त्री. ना.) बुदबळाच्या खेळांत शत्रूच्या राजाचा हत्ती, घोडा इ०कांनीं प्रतिबंध केला असतां होतो जो डाव तो. २ आश्चर्य वाटायाजोगा झाला जो कांहीं चमत्कार तो. ३ (ग्रं०) कोणेकाची चमत्कारिक जी वृत्त, गोष्ट ती.

मातक्यान (अव्य०) पुनः.

मातंग (सं. पु. ना.) हत्ती.

मातणें (धा. ना.) उन्मत्त होणें.

मॉतबर, मातब्बर (अर० वि०) द्रव्यसंपत्तीनें जो संपन्न तो. २ लांबी, रुंदी, उंची, पुष्टपणा, इ०कांनीं जो मोठा तो.

माता (सं. स्त्री. ना.) आई.

मातापितरें (न. ना.) आईबापें तीं.

माती (सं. मृत्तिका) (स्त्री. ना.) दगडावांचून पृथ्वीचा अंश तें. २ कांहींएक पदार्थामध्यें कांहीं तत्वांश नाहीं अशी झाली जी दुर्दशा ती. माती देणें झ० प्रेत पुरून टाकणें. तोंडांत माती पडणें झ० प्राणांश बुडणें. अन्नांत माती कालवणें झ० उपजीविकेचा नाश करणें. मातीच्या मोलानें झ० हलक्या मोलानें. इ०.

मातुश्री (सं. स्त्री. ना.) आई.

मातृका (सं. स्त्री. ना.) अ पासून

४ पर्यंत जीं अक्षरें तीं प्रत्येकीं. २ विवाह इ०कांत पुजावयाच्या देवता आहेत.

मातेरा (पु. ना.) मातट. २ धान्यादिकांत मिळालेला जो माती इ० कचरा तो. ३ कांहींएक पदार्थांची झाली जी दुर्दशा ती.

मातेरें (न. ना.) मातेरा.

मात्र (अव्य०) कांहींएक प्रमाणानें जो परिमित तो. २ साकल्येंकरून कांहीं सांगणें असतां त्यापुढें याचा प्रयोग होतो. उ० मनुष्यमात्र. ३ इतरांची व्यावृत्ति करण्यासाठीं पदार्थांपुढें याचा प्रयोग होतो. उ० तूं मात्र जा इ०.

मात्रा (सं. स्त्री. ना.) हेमगर्भादि रसायनें तीं प्रत्येकीं. २ ह्रस्व वर्ण उच्चारण्यास जो काळ लागतो तो. ३ अक्षराचे डोक्यावर तिर्कस एकाचे अंकासारिखी रेघ देतात ती. ४ मतेरानुगामी.

माथा (पु. ना.) मस्तक. २ ताक करायाचे काठीस सभोंवत्या खांचण्या पाडून काष्ठगोल लावितात तो. उजळता माथा होणें म्ह० कांहीं आलेला अपवादादि दूर होणें.

माद (पु. ना.) मत्तता. [पणा.

मांदगी (फा० स्त्री. ना.) दुखणाईत-

मादवान (फा० स्त्री. ना.) मोठी व चांगली घाडी ती.

मादवी (स्त्री. ना.) (ग्रं०) वस्त्र.

मांदळ (पु. ना.) (ग्रं०) मादळा.

मादळा (पु. ना.) मोठा जो मृदंग तो. २ गाडी इ०कांचे चाकास मध्यें रेव वसवायाचें कोरीव लाकूड असतें तो. [मंडळी.

मांदळी (स्त्री. ना.) (ग्रं०) समुदाय,

मांदा (फा० वि०) दुखणाईत.

मादाळ (पु. ना.) (ग्रं०) मादळा.

मांदियाळी (स्त्री. ना.) (ग्रं०) मांदळी. [याळी.

मांदियाळें (न. ना.) (ग्रं०) मांदि-

मादी (फा० स्त्री. ना.) नराची प्रतिपक्षी ती.

मांदी (स्त्री. ना.) (ग्रं०) समूह.

मादुरी (पु. ना.) (ग्रं०) चाबुकस्वार.

मांदूस (स्त्री. ना) (ग्रं०) मोठी पेटी.

मांदोडा (पु ना.) (ग्रं०) झाडव. २ वृक्षादिकांचें जुगाड. ३ समुदाय.

माधवी (पु. ना.) दशावतार इ० खेळांत एक सोंग येत असतें, जो प्रायः हास्यरस वर्णीत असतो तो. २ (ग्रं०) वसंतकाळ,

माधुकरी (स्त्री. ना.) मधुकरी मागणारासाठीं वाढायाचें जें अन्न तें.

माधुरी (स्त्री. ना.) (ग्रं०) वाचा. २ माधुर्य.

माधुर्य (सं. न. ना.) मधुरपणा.

माध्यान्हीं येणें (धा. ना.) (ग्रं०) निश्चयास येणें.

मान (सं. मन्या.) गळ्याचा मागील भाग ती. २ (पु. ना.) मी थोर, शाहाणा इ० रूप जी अहंता तो. ३ कांहींएक व्यवहारांत कांहीं ए-

काकडेस जो अधिकार तो. ४ सत्कार. ५ लोकांनीं मानावें अशी जी योग्यता ती. ६ (न. ना.) काळ, देश इ०कांची अत्यंत महत्वादि इयत्ता तें. कोणेकाचें मान चढणे म्ह० डौल वाढणें. धान्यादिकांचें मान चढणें म्ह० दर वाढणें. मान कापणें म्ह० कोणेकाचा वृत्त्यादि नाश होई असा मोठा घात करणें इ०.

मानकरी (वि०) कांहींएक व्यवहारामध्यें ज्याचा सन्मान करावा लागतो असे जे दरबारामध्यें सरदारादिक किं० विवाहादिकांत व्याही इ० किं० ग्रामादिकांमध्यें खोत, महाजन इ० अधिकारी असतात तो.

मानणें (धा. ना.) शास्त्र, देवता, माता, पिता इ० पूज्य अनुल्लंघनीय अशा बुद्धीनें गणणें. २ तो तो पदार्थ त्या त्या रूपानें आहे अशा बुद्धीनें गणणें. ३ भक्ष्य, भोज्य, हवा, पाणी इ० कांनीं शरीरास सुखावह होणें.

मानता (स्त्री. ना.) नवस.

मानपान (पु. ना.) आदर सत्कार इ० तदुपयोगी वस्त्रादि पदार्थ तो.

मानभाव (पु. ना.) वेदशास्त्रप्रतिकूल मतानें वर्तणारी एक जाति आहे. २ मनांत कपट असून बाहेर गोड गोड बोलणारा जो त्यास म्हणतात.

मानमान्यता (सं. स्त्री. ना.) कोणी प्रतिष्ठित सभादिकांच्याठायीं आला असतां त्याचा आदर करितात तो. २ तसा आदर सत्कार व्हावयाजोगी जी योग्यता ती.

मानव (सं. पु. ना.) मनुष्य, मनुष्यमात्र.

मानवणें (धा. ना.) कोणेक गोष्ट, कांहीं पदार्थादिक कोणेकास मान्य होणें.

मानस (सं. न. पु. ना.) मनोरथ. २ मन. ३ (वि०) मनःसंबंधी.

मानसिक (सं. वि०) मनःसंबंधी. २ (न. ना.) नवस. ३ कांहींएक पदार्थाचें केवळ अत्यल्प तें. ४ कांहींएक गोष्ट घडण्याविषयीं जो संदेह तो.

माना (अर० पु. ना.) कोणेकानें कोणेकास पत्र ल्याहावयाचें असतां त्याचे त्याचे योग्यतेनुरूप वेदशास्त्रसंपन्न इ० संप्रदायसिद्ध जे पत्राच्या आरंभीं लेख लिहीत असतात तो. २ पत्रादिकांतील लिहिलेला मजकूर तो.

मानिणें (धा. ना.) (ग्रं०) भाववर्णणें.

मानें (अव्य०) सन्मानत्वें करून.

मान्यता (सं. स्त्री. ना.) कांहींएक गोष्टीविषयीं मी मान्य आहे असा जो लेख किं० भाषण करून घेतात ती. २ मानण्याविषयींची योग्यता ती.

माप (सं. मापन) (न. ना.) कांहींएक पदार्थांचा मेजणें, तोलणें इ० रूप जो व्यापार तें व ज्याणें ज्ञान झाली जी पदार्थांची इयत्ता तें. २ धान्यादि मापायाचें जें शेर, अधोली इ० पात्र असतें तें. ३ (ग्रं०) गणती. ४ (सं. पु. ना.) विष्णु.

मायनू (वि०) (ग्रं०) शुभ.
माफ (अर० वि०) (अव्य०) न्यायतः कोणेकापासून घ्यावयाचें जें द्रव्य तें न घेतां किं० शिक्षा करावयाजोगा जो अपराध त्याची शिक्षा न देतां क्षमाविषय होई असें कर, हो, अस इ० धा० प्रयोग. [तका.
माफक (अर० वि०) जितक्यास नि-
माफी (अर० स्त्री० ना.) सरकार इ० कांनीं न्यायतः घेण्यास योग्य जो शेत इ०कांचा धारा इ० त्याचा माफ करण्याचा प्रकार तो. २ राजकून प्रतिबंधाची मोकळीक ती.
मामलत (अर० स्त्री. ना.) प्रजांचें संरक्षण आणि राजकीय कराची उगवणी इ० करण्याचा राज्यांगभूत जो अधिकार तो.
मामला (अर० पु. ना.) मामलत.
मामूल (वि०) पूर्वीपासून चालत आलेला दंडक इ० तो.
माय (सं. मा.)(स्त्री. ना.) आई.
मायदळ (पु. ना.)(ग्रं०) मारळ.
मायना (अर० पु. ना.) वाक्यादिकांतील भावार्थ.
मायपोट (न. ना.) अनेक वरे वाईट जेथें साठवले जातात, अनेकांचे नाना प्रकारचे अपराध जेथें साहिले जातात, बहुत प्रकारचे संकटाचा जेथें परिहार होतो असा जो ईश्वर, राजा, राज्य, ज्ञाति इ० तें.
माया (सं. स्त्री. ना.) ईश्वरशक्ति. २ अवस्तूचेठायीं जी वस्तुत्व बुद्धि होत्ये तिचें कारण ती. ३ सकल हें भासमान जें जगदादिक तो. ४ इंद्रजाल इ० जें कपट तें. ५ ममता. ६ वस्त्रादिक शिवल्येसमयीं दोरा न निसटावा म्हणून शिवणीच्या बाहेर जो वस्त्रादिकांचा यत्किंचित् अंश राखितात तो. ७ दया. ८ (ग्रं०) द्रव्य, पैसा. ९ प्रेम.
मायाजाळ (न. ना.) मायेचा मिथ्या पसारा. २ मोह.
मायामय (सं. वि०) ईश्वरमायेनें किं० इंद्रजालानें कल्पित जो पदार्थ तो.
मायावी (सं. वि०) मायेचा नियंता जो ईश्वर, राक्षस, गारुडी इ० तो. २ कपटयुक्त जें भाषणादि तें. ३ तद्विशिष्ट मनुष्य तो.
मायाळू (वि०) पुत्रादिकांची विशेष माया ज्यास तो.
मायिक (सं. वि०) मायेनें रचित जो प्रपंचादि पदार्थ तो.
मायिकरस (सं. पु. ना.) शृंगारादि रस ते.
मार (पु. ना.) काठी इ०कांनीं जें ताडणें तो. २ पराजयादिकांसाठीं पाषाण, तोफांचे गोळे इ०कांचा प्रक्षेप तो. ३ मारासारिखें दुःसह जें भाषण त्यासही प्रसंगविशेषीं म्हणतात. ४ (सं. पु. ना.) मदन. ५ (ग्रं०) नाश. ६ घोडेस्वार.
मारक (सं. वि०) शक्ति इ०कानें हीन करून जो ज्यास मृतप्राय करितो तो त्याचा.
मारका (वि०) शिंग इ०कानें दुस-

त्यास ताडण करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

मारग (पु. ना.) (ग्रं०) मार्ग.

मारणें (भा. ना.) कोणेक मरे असें ताडनादिककरून करणें. २ चाबूक, काठी इ०कांनीं मनुष्य, अश्व इ० कांस ताडणें. ३ कोणेक पदार्थावर काठी, दगड इ० पदार्थ आहत करणें. उडी, लढाई, बोंब, धोंव, टोला, तडाका, झांप इ० मारणें म्ह० तदनुकूल व्यापारानें तो तो अर्थ घडे असें करणें. बंदूक इ० मारणें म्ह० त्याचा अवाज काढणें इ०.

मारफत (अर०)(स्त्री. ना.) निसबत.

मारा (पु. ना.) तोफ, बंदूक, दगड इ०कांचा मार तो किं० कोणेक स्थळीं गोळा इ० लागू व्हावयाजोगें जें संस्थान असतें तें.

मारामार (स्त्री. ना.) परस्परांस परस्परांनीं मारणें इ० रूप जो व्यापार तो. २ कांहींएक गोष्ट सिद्ध करण्याविषयीं प्रयत्नाचा जो अतिशय तो.

मारामारी (स्त्री. ना.) मारामार.

मारुत (सं. पु. ना.) वायु.

मारूनकुटून (अव्य०) मारूनमुटकून.

मारूनमुटकून (अव्य०) कांहींएक गोष्ट सिद्ध करायासाठीं अनेक प्रकारें प्रयत्नाचा अतिशय करून.

मारे (अव्य०) वाक्यालंकारार्थी. जसें मारे आज पगडी फेकून कोणीकडे चालला.

मारेकरी (पु. ना.) कोणाएकास एकीकडे सांपडवून ठार मारावें म्हणून राजादिकांनीं नियुक्त जो अंत्यजादिक तो.

मार्ग (सं. पु. ना.) एका स्थळापासून दुसऱ्यास्थळीं मनुष्यादिक गेल्या आल्यामुळें मळला किं० एकास्थळाहून दुसऱ्या स्थळीं जावयास बांधून केला जो स्थळप्रदेश तो. २ स्थलांतरीं जायाच्या उद्देशानें आक्रमित जो आकाश, जल, पृथ्वी यांचा प्रदेश तो. ३ मनुष्यादिकांचा व्यवहार यथास्थितपणें चालावा किं० विद्या, कला इ० याव्या इ०कासाठीं ज्या लोकशास्त्रप्रसिद्ध रीति आहेत त्या प्रत्येकी.

मार्गण (सं. पु. ना.) बाण.

मार्गप्रतीक्षा (सं. स्त्री. ना.) कोणेकाची वाट पाहात बसण्याचा व्यापार तो.

मार्गस्थ (सं. वि०) स्थलांतरास जावयाच्या उद्देशानें ज्याणें मार्ग धरिला आहे तो.

मार्जन (सं. न. ना.) पदार्थशुद्ध्यर्थ पदार्थावर जलादिकानें सिंचन तें.

मार्दव (सं. न. ना.) मृदुत्व.

मार्मिक (सं. वि०) मर्मज्ञ जो मनुष्य तो किं० आंतील मर्म धरणारें जें भाषणादिक तें.

माल (अर० पु. ना.) किंमत व्हावयाचे योग्यतेचा जो गुळ, तेल इ० पदार्थ तो, किं० ज्या किंमतीस जो योग्य पदार्थ तो.

मालक (अर० पु. ना.) ज्या मालाचा जो मुख्यत्वेंकरून धनी तो.

मालखरा ( वि० ) ज्याची मूळधातु खरी असा रुपया, मोहोर इ०नाणें तें.

मालचाटी, चाटया ( पु. ना. ) पंतोजीच्या शाळेंतील उपगुरु तो.

मालमत्ता ( अर० स्त्री. ना. ) रोख नाणें व दाणा, गोटा इ० रूप सर्व धन तें.

मालमस्त ( फा० वि० ) द्रव्यमदानें युक्त जो मनुष्यादिक तो.

मालवणें (धा. ना.) प्रदीप्त जो दीप, काकडा इ० तो जाई असा करणें. २ कोणेकाची संपत्यादि शोभा विनाशास पावणें. [ कारणें.

मालातिजें (धा. ना.) (ग्रं०) अंगी-

मालाथणें (धा. ना.) (ग्रं०) निस्तेज होणें, करणें.

मालीम (अर० पु. ना.) गलबतावरील मुख्य तांडेल तो.

मालें (न. ना.) वतन गेल्यामुळें किं० भाऊबंद बंदींत पडल्यामुळें गळ्यांत नांगर बांधून जी भिक्षा मागतात तें.

मालोवाली (स्त्री. ना.) (ग्रं०) ज्ञानरूप तर. २ (अव्य०) चोहींकडून.

माल्हात (पु. ना.) (ग्रं०) अंगीकार.

माव (सं. माया.) (स्त्री. ना.) इंद्रजालादिरूप किं० अनृत भाषणादिकरून जें कपट तें.

मावणें (धा. ना.) काहींएक अवकाशामध्यें काहींएक पदार्थ समाविष्ट होणें.

मावदें ( न. ना. ) यात्रा करून घरीं आल्यावर जो देवब्राह्मण करितात तें.

मावळणें ( धा. ना. ) सूर्यादि ग्रह किं० नक्षत्रें अस्ताचलाचे आड झाल्यामुळें किं० सूर्योदय झाल्यामुळें नक्षत्रें अदृश्य होणें. २ देवी, खरूज इ०कांनीं अदृश्यता पावणें. ३ राज्यादि शोभा मालवणें.

माशी ( सं. मक्षिका ) (स्त्री. ना.) सपक्ष एक क्षुद्र जंतु आहे. २ निशाणाचें संधान धरायाचे उपयोगीं बंदुकीचे तोंडास जें चिन्ह असतें तें. अलंकार इ०कांस माशी लागणें म्ह० सोनें इ० झिजून आंतील लाख दिसूं लागणें. कोणेकास माशी लागणें म्ह० त्यास मळमळूं लागून वांति होणें. [ २ (न. ना.) मांस.

मास ( सं. पु. ना. ) महिना.

मांस (सं. न. ना.) शरीरांत चर्माचे आंत आणि हाडाचे वर जो धातुविशेष असतो तें.

मांसल (सं. वि०) मांसानें परिपूर्ण जें शरीर किं० त्याचा अवयव तो. २ तद्विशिष्ट मनुष्य तो.

मासला (अर० पु. ना.) काहींएक विशिष्ट पदार्थाच्याठायीं सर्व अवयवांस व्यापून जो साधारण धर्म राहत असतो; ज्याची एकदेशीं परीक्षा केली असतां सर्व विशिष्टाची परीक्षा अर्थात् होये तो धर्म. २ विशिष्ट पदार्थांतील गुणदोषाची परीक्षा समजायाकरितां त्या त्या पदार्थाचा पृथक् काढिला काहीं जो अंश तो किं० काहींएक गुणादिकाचे अंशाचा किंचिन्मात्र जो श्रवणादिद्वारा अनुभव तो.

मासलेदार, वाईक (वि०) चांगले मासल्याचा जो पदार्थ तो.

मासा (सं. मत्स्य) (पु. ना.) जलजंतु आहे. २ आठ गुंजांचें जें उन्मान तो.

मासुख (न. ना.) (ग्रं०) बलात्कार.

माहात्म्य (सं. न. ना.) महिमा.

माहितगार (वि०) माहितनुतीगार्थी.

माहिती (फा० स्त्री. ना.) माहितगारी.

माही (स्त्री. ना.) (ग्रं०) मोठी उंच जी छत्री करितात ती. २ (पु.) माघमास.

माहीत (स्त्री. ना.) काहींएक व्यवहाराचें किं० देशादिकाचें पुरतेपणीं जें परिज्ञान ती. २ (वि०) परिचयादिकांमुळें सर्व अंशांनीं परिज्ञात झालेला जो पदार्थ, गोष्ट इ० तो. ३ पदार्थादिकाचा पुरतेपणीं जो परिज्ञातपणा ज्यास झालेला तो त्याविषयीं.

माहुटी (स्त्री. ना.) घर इ०काचे वांशाचे शेवटास जी आडवी फळी मारिली असते ती.

माहुरी (पु. ना.) (ग्रं०) माहुरी.

माहे (फा० पु. ना.) महिना.

माहेर (सं. मातृगृह) (न. ना.) स्त्रीच्या मातापितरांच गृह तें. २ दुःखितांचें विश्रांति स्थान त्यास म्हणतात.

माहेरवाशीण (स्त्री. ना.) आईबापाचे घरीं किं० तत्पक्षी यांचे घरीं राहिली जी स्त्री ती. [स्त्री ती.

माहेवणी (स्त्री. ना.) रजस्वला जी

माहेवारी, माहवार (स्त्री. ना.) सरकार, सावकार इ० कानीं सरदार इ०कास महिन्यास अमुक खर्चायास द्यावें असा बांधून दिला असतो जो नियम तो.

माळ (पु. ना.) ज्या ठिकाणीं विशेष शेत होत नाहीं अशी सपाट विस्तीर्ण जी भूमि तो. २ (स्त्री. ना.) रुद्राक्षादि मणि, फुलें इ० एकत्र ओंवून गळा इ०कांत घालण्याकरितां करितात ती. ३ अनेक पदार्थ एकापुढें एक, एकापुढें एक असे राहिले असता जो क्रमविशिष्ट संनिवेश होतो तो. ४ कथा इ० आव पाणें, उद्यां ध्यागें करावी असा किती एक दिवस क्रम चालतो ती. ५ रहाटगाडग्याच्या लोटे बांधलेल्या दोहींकडील दोन दोऱ्या मिळून ती.

माळका (स्त्री. ना.) एकापुढें एक अशा क्रमानें जी मनुष्यादिकांची माळ ती. [जमीन ती.

माळजमीन (स्त्री. ना.) माळरूप जी

माळया, माळई (स्त्री. ना.) (ग्रं०) राव, कावकी इ० ती.

माळरान (न. ना.) माळजमीन.

माळवद (न. ना.) धावें.

माळवें (न. ना.) भाजी, पाला, कांदा, लसूण इ० जें मळ्यांत उत्पन्न होतें तें.

माळा (पु. ना.) घराच्या तुळ्यांवर आडव्या काड्या, साट इ० घालून जी वर जागा करितात तो. २ शेव

राखायासाठीं जी उंच जागा करि-
तात ती.

माळू (पु. ना.) मृदंगाचे पुडास जें कातड्याचें कडें करून घातलें असतें तो किं० त्यासाठीं जी वादी घेतात ती.

मिचकावणें (धा. ना.) कोणेकास संकेतानें खूण करावी इ०कांसाठीं डोळे झाकून झाकून उघडणें.

मिजाज, मिज़ाद (फा० स्त्री. ना.) प्रकृतीस जे जे उपचार मानतात ते ते प्रयत्नानें करीत असावे आणि जे मानत नाहींत ते वर्जावे असा निरंतर स्वशरीरादि प्रकृति राखण्याचा जो प्रकार तो.

मिटणें (धा. ना.) मुख, नेत्र, छत्र, पुष्प, पत्र, कवाड इ०कांचा बाजूचे अवयवांनीं आंतील अंश न दिसायाजोगें परस्पर मिलित करणें. २ चाललेलें जें युद्ध, कलह इ० तें परस्पराचे समजुतीनें किं० एकाच्या पराजयानें नाहींसें करणें.

मिठा (वि०) मिष्ट जो पदार्थ तो.

मिठाई (स्त्री. ना.) पेढे, बरफी इ० जे पदार्थ ती.

मिठागर (पु. ना.) खाडीचे कांठीं जो मीठ पिकावयाची जागा केली असल्ये तो. [उपणा.

मिठांश, शू (पु. ना.) (ग्रं०) गोमिठास (स्त्री. ना.) मिष्टता.

मिठी (स्त्री. ना.) अत्यंत मिष्ट पदार्थ भक्षण करीत असतां त्याचा जो तत्काळीं वीट येतो ती. २ प्रेमानें कोणेकास धरून जें दृढालिंगन किं० तसेंच धरण्याचा जो प्रकार तो. दुर्मिळपणा इ० कारणामुळें कांहींएक पदार्थ घेण्याविषयीं त्यावर अनेकांनीं झटण्याचा जो व्यापार तो. ४ (ग्रं० ) ऐक्य.

मिडकणें (धा. ना.) (ग्रं०) खाण्यासाठीं धावणें, आशाळवाणें होणें.

मिडगणें (न. ना.) (ग्रं०) उपाहार.

मिडोगणी (स्त्री. ना.) (ग्रं०) स्तुति.

मिणधा (वि०) (ग्रं०) ओशाळा.

मिणमिणणें (धा. ना.) दिव्यानें मंद मंद जळणें. २ रडकेंरडकें स्मितपणानें मंदमंद बोलणें.

मित (सं. वि०) जितक्यास तितका.

मितलें (वि०) (ग्रं०) मित. २ (न. ना.) समाधान.

मिति (सं. स्त्री. ना.) गणनाप्रथमार्थी.

मिती (सं. स्त्री. ना.) तिथिरूप जो काल तो. २ व्याज. ३ मिति. ४ (अव्य०) (ग्रं०) हळूपणानें.

मित्र (सं. वि०) स्नेही. २ (पु. ना.) सूर्य.

मिथ्या (सं. वि०) असत्य.

मिंधा (वि०) ओशाळा.

मिनत-मिनतमाना (अर० स्त्री. पु. ना.) आर्जव.

मिनधा (वि०) (ग्रं०) मिंधा.

मिना (फा० पु. ना.) तांबडा, हिरवा इ० एक तऱ्हेचा रंग आहे; ज्यास चकाकी बहुत असल्ये तो. २ (अव्य०) वजा. [व्यापार तो.

मिरवण (स्त्री. ना.) मिरवण्याचा

मिरवणूक (स्त्री. ना.) मिरवण.

मिरवणें (धा. ना.) वाद्यादिसमारंभपूर्वक नगरादिकांत सावकाशपणीं फिरणें. २ छानछोकीनें जें साधारण फिरणें त्यास निंदेनें म्हणतात. ३ (ग्रं०) शोभणें. ४ बोलणें. ५ लोकांस डौल दाखविणें.

मिरास (स्त्री. ना.) मिराइयाचें वतन, हक्क इ० तीं.

मिलाफ (सं. मेलन) (पु. ना.) अनेक पदार्थांचा जो परस्पर विवक्षानुरूप संबंध तो. २ परस्पराचा आनुकूल्य भाव तो.

मिलिंद (सं. पु. ना.)(ग्रं०) भ्रमर.

मिश्र (सं. वि०) ज्या पदार्थात दुसरे पदार्थांनीं भेळ झाली तो.

मिश्री (स्त्री. ना.) खडीसाखर.

मिष (सं. न. ना.) निमित्त, सोंग.

मिष्ट (सं. वि०) गोड.

मिसकिनमात्रागमनी (वि०) बाहेर गरीब, शांत दिसतो आणि आंत ह रामी असा जो त्यास म्हणतात.

मिसल (अर० स्त्री. ना.) लष्करामध्यें तंबू इ० ठोकायाची ज्याची ज्याची जी जागा ती.

मिसळ (स्त्री. ना.) भेळ.

मिळकत (स्त्री. ना.) मिळण्याच्या व्यापारानें प्राप्त होतें जें द्रव्यादि ती.

मिळणीजमिळणें (धा. ना.) कोणकाचे तंत्रानें कोणेकानें चालणें.

मिळणें (धा. ना.) द्रव्यादि प्राप्त होणें. २ कांहींएक पदार्थांचा कांहींएक पदार्थांशीं इच्छितानुरूप संयोग होणें. ३ अनेकांनीं कांहींएक कार्यार्थ एकचित्त होणें. किं० संमत होणें. ४ प्रमाणानुरूप प्रमेयाचा अनुभव येणें. इ०.

मिळमिळीत (वि०) तैलादिक जे स्निग्ध पदार्थ तो. २ मिणमिण करीत जें भाषणादिक त्यास म्हणतात.

मीनकेतन (सं. पु. ना.)(ग्रं०) मदन.

मीनणें (धा. ना.) (ग्रं०) मिळणें.

मीस (न. ना.) मिष.

मुकणा (वि०) दंतहीन जो हत्ती तो.

मुकणें (धा. ना.) प्राप्त होणार किं० प्राप्त झालेले जे उपभोगसाधन पदार्थ त्या त्या पदार्थांनें रहित मनुष्यादि जिवानें होणें. २ अंतरणें.

मुकदमा, द्दमा (अर० पु. ना.) अपराधी इ०कांवर वरिष्ठ अधिकाऱ्याकडे पाठविण्याच्या योग्यतेचा खालचे अधिकाऱ्यांनीं केला जो खटला तयार तो.

मुकरर (अव्य०) (फा०) जरूरीनें.

मुकळित (वि०) (ग्रं०) स्पष्ट. २ संक्षिप्त.

मुकळणें (धा. ना.) (ग्रं०) ठेवणें.

मुका (वि०) ज्याचे मुखांतून वर्णात्मक शब्द येत नाहीं तो. २ ज्यानें मौन्य धरलें तो. ३ (पु. ना.) चुंबन. ४ ज्यास ताउ नाहीं असा जो मार इ० तो इ०.

मुकाट्या (अव्य०) न बोलतां न चालतां कर, बस, चाल इ०धातूंचें वि०.

मुकाटयानी (अव्य०)-मुकाट्या.

मुकाबला (अर० पु. ना.) पडताळा २ मासला.

मुकाम, काम (अर० पु. ना.) केवळ एकाच ठिकाणीं बहुत दिवस राहावयाचा नियम ज्यांचा नाहीं अशी जी फौज, मनुष्य इ० यांचा कांहींएक दिवस राहावयाचा ठिकाणा तो. २ त्याठिकाणीं राहण्याचा जो व्यापार तो. ३ चाललेल्या व्यापाराची कोंहींकाळ जी कुंठितावस्था ती.

मुकुळ (न. ना.) (ग्रं०) कमळ. २ पुष्प.

मुकुळणें (धा. ना.) मुकळणें.

मुक्त (सं. वि०) प्रपंचादि बंधनापासून सुटला तो. २ (ग्रं०) मोकळा. ३ (न.) मोती.

मुक्तक्रिया (सं. स्त्री. ना.) वेदाधाररहित क्रिया ती.

मुक्तद्वार (सं. न. ना.) जाणें, येणें इ०कार्यास जेथें प्रतिबंध नाहीं असें जें द्वार तें.

मुक्तमार्ग (सं. पु. ना.) ज्या मार्गानें चालण्यास वेदाधार नाहीं तो.

मुक्ताफळ (सं न. ना.) मोती.

मुक्ति (सं. स्त्री. ना.) संसारादि बंधनापासून जी मुक्तता ती. २ सलोकता, समीपता, सरूपता, सायुज्यता या प्रत्येकीं.

मुख (सं. न. ना.) तोंड.

मुखचर्या (सं. स्त्री. ना.) मुखावरील तेजस्वी ती.

मुखजबानी (स्त्री. ना.) तोंडजबानी.

मुखत्यार (अर० वि०) कांहींएक कार्याविषयीं ज्यास अखत्यार मिळाला तो.

मुखदुर्बल (सं. वि०) ज्यास समयीं विशेष बोलायास येत नाहीं तो किं० विशेष बोलायास ज्यास नको त्यास निंदेनें ह्मणतात.

मुखदुर्बळ (वि०) मुखदुर्बल.

मुखपाठ (वि०) तोंडपाठ.

मुखरग (वि०) मुख्य.

मुखरस (सं. पु. ना.) स्वपरकार्यविघातक जें भाषण त्यास प्रसंगविशेषीं म्हणतात.

मुखवटा (पु. ना.) तोंडवळा. २ देवादिकांचा जो धातु इ०कांचा करितात तो.

मुखश्री (सं. स्त्री. ना.) मुखचर्या.

मुखोद्गत (सं. वि०) तोंडपाठ.

मुख्य (सं. वि०) ज्या ज्या मनुष्यादि पदार्थांमध्यें किं० ज्या ज्या व्यवहारामध्यें ज्याचें प्राधान्येंकरून परिगणन तो.

मुख्यउपासना (सं. स्त्री. ना.) (ग्रं०) [ब्रम्होपासना.

मुख्यदेव (सं. पु. ना.) (ग्रं०)परब्रह्म.

मुख्यब्रह्म (सं. न. ना.) (ग्रं०) अनिर्वाच्य जें ब्रम्ह तें.

मुख्यभक्त (सं. पु. ना.) (ग्रं०) ज्ञानी भक्त तो.

मुख्यभक्ति (सं. स्त्री. ना.) (ग्रं०) अभेद जी ध्येयध्यात्याची एकता तद्रूप भक्ति ती.

मुग (न. ना.) (ग्रं०) मौन.
मुंगा (पु. ना.) कांहींएक कार्याविषयीं जो कोणाएकास चेव येतो तो. २ एक घोड्यास रोग होत असतो तो.
मुगुतें (न. ना.) (ग्रं०) मुक्ति.
मुग्ध (वि०) हें अमुकच अशी फोड किं० निर्णय झाल्यावांचून राहिला जो व्यवहार, भाषण इ० तो.
मुग्धा (सं. स्त्री. ना.) तारुण्यावस्थेस प्राप्त झाली अशी जी स्त्री ती. २ मुग्ध.
मुचलका (पु. ना.) करार.
मुंज (स. स्त्री. ना.) द्विजत्वसंपादक एक संस्कार आहे. २ मोळ इ०कांचें कटिसूत्र जें मुलाचे कंबरेस बांधायाकरितां वळून करतात तें.
मुजरत, द (फा० अव्य०) तातपुरचा.
मुजरा (अर० पु. ना.) शूद्रादिक, धनी इ०कांस रामराम करायाच्या ठिकाणीं करितात तो. इ०
मुंजा (पु. ना.) मुंजीचे योग्य झाला जो मुलगा तो व ज्याचे कंबरेस मुंज बांधली आहे तो. २ कंबरेस मुंज असतां जो बुडून भूत झाला तो.
मुंड (सं. न. ना.) डोकें.
मुडकें (न. ना.) मुंड.
मुंडणें (धा. ना.) वस्त्रा इ०कानें डोकीवरले केश काढणें. २ गुरु इ०कांनीं मंत्रोपदेशद्वारा कोणेकास शिष्य करणें. ३ कोणेकास दंभादि दाखवून ठकवून त्यापासून द्रव्य काढणें.
मुडदा (फा० पु. ना.) प्रेत.
मुडदार (फा० वि०) दीपोच्छिष्ट जें तेल तें. २ मृतप्राय अप्रयोजक जो मनुष्यादि तो.
मुंडन (सं. न. ना.) चौल म्हणून जो संस्कार तें. २ मुंडण्याचा व्यापार तें. ३ शिष्या इ० देऊन दुसऱ्यास घाणडतारा करण्याचा व्यापार तें.
मुंडपघसणी (स्त्री. ना.) (ग्रं०) मुंडक्यांशीं मुंडकीं घांसत अशी जी देवादिकांचे दर्शनार्थ होत्ये दाटी ती.
मुंडासें, मुंढासें (न. ना.) पागोटें.
मुंडी, मुंढी (स्त्री. ना.) मुंडकें. २ (वि०) संन्यासी, गोसावी इ० तो.
मुंढरी, ढेरी (स्त्री. ना.) पावसाचें पाणी कुसूं इ०कांचे भिंतींत न मुरावें म्हणून पाणदाळ यावयाकरितां निजवर निमोळता भाग करितात ती.
मुतसद्दी (अर० पु. ना.) राजाचा राज्यसंबंधी कारभार करणारे जे कारभारी ते प्रत्येकीं.
मुदगल (सं. मुद्गर) (पु. ना.) पहिलवान इ० आपलें शरीर दृढ व्हावें म्हणून काष्ठादिकाचा पेलायाकरितां करीत असतात तो. [नाचा व्यय तें.
मुदगलसिंचन (न. ना.) (ग्रं०) रे-
मुदलामुदल, मुदलीं (अव्य०) व्याज, नफा इ० न घेतां दे, घे इ०कांचें वि०. [इ०कांचे आरंभीं.
मुदलीं (अव्य०) कांहींएक देण, घेणें
मुदाळें (न. ना.) ओगराळें. [गठी.
मुदी (सं. मुद्रिका) (स्त्री. ना.) अं-
मुद्दत, मुदत (अर० स्त्री. ना.) का-

ही एक व्यापाराविषयीं केला जो का
लावधि तो.

मुद्दल, मुदल (सं. मूल)(न. ना.) देण्याघेण्याचे प्रसंगीं मूळभूत जें द्रव्य तें.

मुद्दलतूट (स्त्री. ना.)(ग्रं०) पुण्यक्षय

मुद्दा (अर० पु. ना.) चोरी, चाहाडी, शिनळकी, खून इ० कर्मे ज्यानें केलीं तो त्याचे अंगीं लागू व्हावयाजोगें जें साक्षी कि० चोरलेला पदार्थ इ० तो. २ कोणिकाचे कोणिकास ठिकाण लागावें म्हणून जो कागदावर खूण लिहून देतात त्यासही कचित् म्हणतात.

मुद्दाम (अर० अव्य०) तानपुरचा. ये, जा इ० क्रियेचें वि०.

मुद्रा (सं. स्त्री. ना.) रुपया, मोहोर, पुतळी इ०कांवर जें चिन्ह असतें तें. २ तशा चिन्हानें युक्त शिक्का, मोहोर, रुपया इ० तो. ३ रामनामांकित वैष्णव टिकाळी गोपीचंदन लावायाची असल्ये तो. ४ तोडावा. ५ कांहीं एक पदार्थावर खुणेकरितां जें चिन्ह करितात तें. ६ चेहरा, मनरी इ० धारण ते. ७ (ग्रं०) गाठोडी.

मुद्रालावणें (स. ना.)(ग्रं०) सिद्धांत करणें. २ समाप्त लावणें.

मुद्रिका (सं. स्त्री. ना.) मुदी.

मुनशी (फा० पु. ना.) फारशी लिपीचें आणि भाषेचें ज्ञान असून त्या लिपीनें जो लिहणविशीचें काम करितो तो. २ अरबी, फारशी भाषा शिकविणार तो.

मुनसफ (फा० पु. ना.) देण्याघेण्याचा न्याय करणारा एक अधिकारी तो.

मुनि (सं. पु. ना.) ऋषि.

मुनीम (अर० पु. ना.) कांहीं एक कारभाराविषयीं मुख्यांनीं जो योजिला तो.

मुफत (फा० अव्य०) फुकट.

मुबलक (अर० वि०) पुष्कळ.

मुबा, भा (अर० स्त्री. ना.) मोकळीक.

मुमीर, मर (पु. ना.) फुफाटा.

मुमुक्षु (सं. वि०) विषयत्याग करून मोक्षमार्गीं लागला तो.

मुरकणें (क्रि. ना.) कांहीं एक गोष्ट मनातून करायाची असतां ऊ मी नाहीं असें बोलून कांहींसें तोंड वक्र करणें.

मुरका (पु. ना.) मुरकण्याचा जो व्यापार तो.

मुरकुंड, डी (स्त्री. ना.) वृक्ष इ०कांवरून पडणें कि० डर इ०कांमुळें अ० मोठ्या दिकानें खालीं येणें, तळणें इ०कांच्या योगें आकुंचितावयव शरीर जें त्यास म्हणतात. २ तमाशा इ०कांवर मुरकुंड्या पडणें म्ह० उड्या पडणें.

मुरगळणें (क्रि. ना.) शरीर, वृक्ष इ०कांचा अवयव पिळवटा वाकडा करणें. २ मन इ० मुरगाळणें म्ह० द्रव्यादि हरण द्वारा कोणिकाचा नाश करणें.

मुरड (स्त्री. ना.) करंजी, चानवला इ०कांचे कांठ वळवून जी करितात ती. २ वळतांना ती पावसें गुंडाळून तो शिवण घालीत असतात ती.

**मुरडणें** (भा. ना.) वस्त्र, कागद इ०-कांचा अंश किंचित् वक्र होई असा करणें. २ कोणएक पुढे गेला जो त्याणें मागें फिरणें. ३ मागला पदा-र्थ पाहायासाठीं मान वांकडी करणें. नाक तोंड मुरडणें इ० कांहींएक पदार्थ तुच्छ करणें.

**मुरडा** (पु. ना.) आमांशादि विकृतीनें पोटांत एक विलक्षण व्यथा होत असते ती.

**मुरणें** (भा. ना.) जल इ० सद्रव पदार्थ भूमि इ०कांत जिरणें. २ आंबा, फणस इ०कांनीं अंगचा रस कि० त्यास कांहीं विशेष गुण उत्पन्न व्हावा म्हणून घातला जो क्षारादि रस त्या त्या रसानें त्या त्या पदार्थानीं सर्वावयवत्वकरून व्याप्त विशिष्ट होणें. ३ कोणएक कार्य असुक संख्याक मनुष्यांनीं कि० पदार्थांनी होईल असा अजमास असता त्या कार्याकडे अधिक मनुष्य, जिनस इ० खर्ची जाणें. मन मुरणें इ० कांहींएक विषयानें तृप्त होणें इ०.

**मुरदा** (पु. ना.) मुडदा.

**मुरब्बी** (अर० पु. ना.) अनेकांचे कार्य करणारा जो राज्यादि व्यवहारी मुखत्यार असतो तो. २ कांहींएक काम डोकीवर घेऊन तडीस नेणारा शाहाणा मनुष्य तो.

**मुरवत** (अर० स्त्री. ना.) कोणेकास कोणेकाचा पडतो जो संकोच तो.

**मुराद** (अर० वि०) पुष्कळ.

**मुरारत्व** (न. ना.)(प्र०) बाळदशा.

**मुकुम** (पु. ना.) पद विशीभूत झाला असा मृत्तिकाविशेष आहे तो. २ तारूंस तोंडावर ज्या दुच्या येतात तो.

**मुन्हाळी** (वि०) मध्यारी. २ विवाहामध्यें नवरे मुलीचा जो बंधु तो.

**मुलाईम** (अर० वि०) मृदु, नाजुक, सुखें असा जो पदार्थ तो.

**मुलाखत** (अर० स्त्री. ना.) भेट.

**मुलाजा** (अर० पु. ना.) अपराधादिकांविषयीं क्षमा तो.

**मुलामा** (अर० पु. ना.) सोनें, रुपें, इ०कांचा इतर धातुमय पात्रास जो रंग कि० मुलामा देतात तो.

**मुलूक, ख** (अर० पु. ना.) देश.

**मुशकील, सकील** (अर० पु. ना.) दुर्घट. २ (स्त्री. ना.) कांहीं कार्य करण्याविषयीं कि० होण्याविषयीं जी संकटावस्था ती.

**मुशाफर** (अर० पु. ना.) प्रवासी.

**मुशारा** (अर० पु. ना.) कांहीं कामासाठीं ठेविला जो चाकर त्यास जें त्यासंबंधी वेतन देतात तो.

**मुशाहिरा** (अर० पु. ना.) मुशारा.

**मुष्टि** (सं. पु. स्त्री. ना.) हाताच्या अंगुली एकत्र आकुंचित केल्या असतां जो आकार होतो तो. २ तत्परिमित धान्यादिक तें तो.

**मुष्टिमोदक** (पु. ना.) कोणेकास प्रहार करायाकरितां केला जो मुष्टि त्यास म्हणतात.

**मुसकट, कड** (सं. मुख) (न. ना.) मुखप्रदेशास निंदेनें म्हणतात.

**मुसकी** (स्त्री. ना.) कोणेकाचे मुख

मागें भावळून बोलण्याचा जो प्रकार तो. अनेक वचनांत प्रयोग.

मुसकें (न. ना.) बैल इ०कांनीं धान्यादि न खावे म्हणून मुखास प्रतिबंधक जें जाळ्यासारखें करतात तें.

मुसंड, संडी, सांडी (स्त्री. ना.) दारीं इ०नीं प्रवेश करायासाठीं किं० नदीतून पार पडायासाठीं तोंड पुढें करून किंचित् वाकून केला जो शरीराचा आकार तो.

मुसमुसणें (धा. ना.) शरीरादिकांत तारुण्यादिकांचा भर होणें किं० त्या तारुण्यादि भरानें मनुष्यादिकांनीं युक्त होणें. २ क्रोधानें संतप्त होणें.

मुसांडा (पु. ना.) पर्वतादिकांवरून पडल्यें जी मोठी पाण्याची धार किं० नळ इ०कांतून उडत्ये पाण्याची धार तो. २ कांहींएक प्रतिबंधकांतून पार व्हायासाठीं जमून धांवत चालला जो मनुष्यादि समुदाय तो.

मुसावणें (धा. ना.) (प्रां०) एकत्र होऊन जमणें.

मुस्तकीम (अर० वि०) कायम.

मुहूर्त (सं. पु. ना.) दोनघटिकारूप काल तो. २ लग्नादि कार्यविषयीं योजिला जो उत्तम समय तो. ३ कांहींएक कार्यास जो आरंभ तो.

मुहूर्तकरणें (धा. ना.) (प्रां०) चेतविणें. [पण इ० तो.

मुळमुळीत (वि०) पळपळीत जें भा-

मुळमूळ (स्त्री. ना.) दुसऱ्यास लौकर न समजायाजोगें हळू हळू चें-गट भाषण तो. २ पावसाची जी रिपरिप तो. ३ (अव्य०) हळू हळू बहुतवेळ रडण्याचें अनुकरण वाचि०.

मुळीक (वि०)(प्रां०) पहिलें. २(स्त्री०) आरंभदशा. [प्रदेशभाग तो.

मुळी (स्त्री. ना.) वृक्षादिकांचा मूळ-

मूग (पु. ना.) एक द्विदल धान्य आहे. मूग खाणें, गिळणें, आरोगणें इ० कोणी कांहीं आपला अपराध केला असताही न बोलतां उगीच राहाणें.

मूठ (स्त्री. ना.) मुष्टि. २ कोणेकास मारायाकरितां जो मंत्रप्रयोग करितात तो. ३ बैल इ०कांचे पाठीवर जी खोगिरासारिखी घालितात तो. मूठ दाबणें, चेपणें इ० कांहींएक कार्यार्थ कोणेकास गुप्त द्रव्यादि देऊन स्ववश करणें.

मूठमाती (स्त्री. ना.) मेलेल्या मनुष्याची जी जमिनींत पुरणें इ०रूप क्रिया तो.

मूढ (सं. वि०) अज्ञ.

मूत्र (सं. न. ना.) उपस्थद्वारा जें शरीरांतील उदकासारिखें पडतें तें.

मूत्रकोंडा (पु. ना.)(प्रां०) मुतखडा.

मूद (स्त्री. ना.) ओगराळ्यांत भात इ० घालून चेपून ठोकून पाडिल्यानें जो आकारविशेष होतो तो. २ स्त्रियांचें एक शिरोभूषण आहे.

मूर्ख (सं. वि०) मूढ.

मूर्च्छना (सं. स्त्री. ना.) पित्त, वात इ० अनेक विकारांमुळें शुद्धिबुद्धि न व्हावयाजोगी जी अवस्था तो. २ गायनांतील सप्तस्वरांत प्रथम

(व)रापासून द्वितीय मरास आरंभ होईपर्यंत जे मध्ये तीन सूक्ष्म स्वरांश होतात ते प्रत्येकीं. [मार्थी
मूर्च्छा (सं. स्त्री. ना.) मूर्छनाप्रथ-
मूर्त्त (सं. वि०) मूर्तिमंत जो पदार्थ तो.
मूर्त्ति (सं स्त्री. ना.) देवादिकांची जी प्रतिमा करितात ती. २ प्रसंगविशेषीं मनुष्यावरही व्यवहार होतो.
मूल (वि०) मुलगा, मुलगी, मुलगें तें. २ वृक्षादिकांचें जें पाळ तें. ३ कांहींएक व्यवहाराचा किं० पदार्थाचा आदिभूत किं० कारणभूत जो अवयवादिक तें. ४ ज्यापासून त्या त्या व्यवहाराची व पदार्थाची वृद्धि होते ते.
मूषक (सं. पु. ना.) उंदीर.
मूस (स्त्री. ना.) सोनें, रुपें इ०कांचा रस करायाचें एक पात्र आहे तें. २ अंतींव मूर्ति इ० करायासाठीं जे इष्ट आकारविशिष्ट माती, मेण इ०कांचें करितात तें.
मूसमारग (पु. ना.) मागमूस.
मूळ (न. ना.) मूल प्रथमार्थावांचून. २ सासरें, माहेर इ०कांकडील को णेकास येत बोलावणें ते. ३ (ग्रं०) आरंभ.
मूळपिठिका (स्त्री. ना.) कांहींएक व्यवहाराचें मूळभूत जें वर्तमान तें. २ कांहींएक व्यवहाराची जी परिभाषा इ० ती.
मूळपुरुष (पु. ना.) वंशविस्तारास कारणभूत जो प्रथम पुरुष तो २ (ग्रं०) ईश्वर. [माया.
मूळप्रकृति (स्त्री. ना.) (ग्रं०) मूळ-
मूळमाया (स्त्री. ना.) (ग्रं०) आदिमाया.
मृग (सं. पु ना.) हरिण. २ साधारण सर्व पशूंसही म्हणतात.
मृगजल (सं. न. ना.) सूर्यकिरणांच्या ठायीं जलाचा भ्रांति होते तें.
मृगतृष्णा (सं. स्त्री. ना.) मृगजल.
मृगया (सं. स्त्री. ना.) पारध.
मृगशितळाई (स्त्री. ना.) मृगाचा पाऊस पडल्यावर जो थंडावा होतो ती.
मृगेंद्र (सं. पु. ना.) सिंह.
मृणाल (सं. न. ना.) कमळाचा जो देट ते.
मृत (सं. वि०) मरण पावला तो.
मृतप्राय (सं. वि०) मेल्यासारखा तो.
मृति (सं. स्त्री. ना.) मरण्याचा व्यापार ती.
मृत्तें (न. ना.) (ग्रं०) माती.
मृत्तिका (सं. स्त्री. ना.) माती.
मृत्यु (सं. पु. ना.) मरण. २ यम.
मृत्युपत्र (सं. न. ना.) मरणसमयीं जिंदगी इ०कांचे व्यवस्थेचें केलें पत्र ते.
मृत्युलोक (सं. पु. ना.) हा भूलोक.
मृदंग (सं. पु. ना.) पखवाज.
मृदु (सं. वि०) मऊ.
मृदोली (स्त्री. ना.) (ग्रं०) गिरदी.
मृषा (सं. वि०) मिथ्या.
मेख (फा० स्त्री. ना.) घोडा, रावटी, डेरा इ०कांच्या बंधनादिकासाठीं हात दीड हात लांकडाचा तुकडा तासून करितात ती.

मेखला, ळा (सं. स्त्री. ना.) कटि-सूत्र. २ कंबरपट्टा. ३ रामदासी कफनी.

मेखळा, ळें (स्त्री. न. ना.) (ग्रं०) कफनीसारिखें वस्त्र असतें तें. तें. २ (वि.) संपूर्ण.

मेंग (स्त्री. ना.) सर्पादिकांची कांति ती.

मेंगा, मेंग्या (वि०) अपराक्रमी तो.

मेघ (सं. पु. ना.) उदकवृष्टि करणारा जलद तो. [२ घुमट.

मेघडंबरी (स्त्री. ना.) उंच छत्री.

मेचणें (धा. ना.) काहीएक व्यापारी प्रवृत्त जो मनुष्य त्याणें भयादि कारणानें कुंठितगति होऊन माघारें येणें किंवा स्तब्ध राहाणें. २ (ग्रं०) आटपणें. ३ इच्छिणें.

मेचु, मेचू (स्त्री. ना.) (ग्रं०) प्रीति, आवड, इच्छा.

मेज (न. ना.) रजनी, केली इ० मोजायास साधनभूत जी अधोली, मणका, गज इ० प्रमाणें असतात तीं प्रत्येकीं. २ धान्यादि मोजण्याचा व्यापार तो व त्या व्यापारानें झालेलें इयत्तारूप फळ तें. ३ खुरचीवर बसून पुढें लिहणें इ० कासाठीं घडवंचीसारखें लाकडाचें करितात तें.

मेजणें (धा. ना.) अंकसंख्येनें किंवा अधोली इ० प्रमाणादि संख्येनें धान्य, मनुष्य इ० पदार्थ संख्यान करणें. २ गणणें.

मेजवानी, मानी, वानी (फा० स्त्री. ना.) सोयरे, धायरे किंवा संपत्तिमान् जे लोक त्यांस आदरपूर्वक जो मिष्टान्न-भोजन घालण्याचा व्यापार ती.

मेट (न. ना.) किल्ल्याचे बाहेर जागोजाग नाक्यानाक्यास जी चौकी असते तें. मेट बसणें म्ह० कोणेकाचें भय इ० कांमुळें अवसान बसणें, जाणें. २ (अप्र०) अतिशयित काळोख, अंधार याचें वि०.

मेटखुंटी (स्त्री. ना.) ढोपर टेंकून बसण्याचा व्यापार ती.

मेण (न. ना.) मधाच्या पोळ्यांत जो चिकट अंश असतो तें. २ तरवार इ० शस्त्रांचें, आंतून लाकूड आणि बाहेरून कातडें लावून जें आच्छादन करितात तें.

मेणबत्ती (स्त्री. ना.) ज्या वातीच्या सभोंवार मेण बसवून दीप लावायाकरितां करितात ती वात ती.

मेणबाजार (पु. ना.) शहरचे रस्त्यांत पालें देऊन जो कापडाचा बाजार भरत असतो तो.

मेणा (फा० पु. ना.) डोलीसारिखें एक वाहन आहे तो.

मेदिनी (सं. स्त्री. ना.) भूमि. [समुद्र.

मेदिनीवसन (सं. पु. ना.) (ग्रं०)

मेंदू (सं. मेद)(पु. ना.) अंग ठेचलें असतां त्यांतून मांसासारिखा जो अंश निघतो तो.

मेधा (सं. स्त्री. ना.) धारणाशक्ति जीमध्यें आहे ती बुद्धि. २ अभिरुचि.

मेध्य (सं. वि०) पवित्र.

मेर (स्त्री. ना.) शेत इ० कांची कड ती. २ (ग्रं०) समय.

मेरू (सं. पु. ना.) पुराणप्रसिद्ध पृ-

र्वांच्या मध्यभागीं असा एक पर्वत आहे. २ ह्यारार चित्रीस ठेवितात असा गुरगुडीचा दोडा तो. ३ मंथनांचे दोन्हीं शेवटें ह्या मण्यांत ओवितात तो मणि.

मेल्हारें (न. ना.) संयोग.

मेवा (फा० पु. ना.) द्राक्ष, अंजीर इ०फळफळावळरूप मिष्ट पदार्थ तो.

मेशपात्र, षपात्र (न. ना.) अपराकर्म जो त्यास ह्मणतात.

मेसको (स्त्री. ना.) (ग्रं०) एक जलदेवता आहे.

मेस्तक (न. ना.) मुकें इ०कास हिशेब शिकायासाठीं तत्संबंधी हिशेब ह्या वर्हीत लिहिले असतात तें.

मेस्तरी (पु. ना.) सुतार, गवंडी इ० जे शिल्पशास्त्रप्रवीण त्यांस ह्मणतात.

मेहनत (अ० स्त्री. ना.) कांहीं कार्य करण्याविषयीं श्रम होण्याजोगा व्यापार तो.

मेहरप, ब, राब (अ० स्त्री. ना.) कोनाडा, भिंत, मखर इ०कांस गोमेटेपणा जी कमान करितात ती.

मेहरबान (फा० वि०) सुप्रसन्न.

मेहुडा (पु. ना.) (ग्रं०) मेघ.

मेहूण (न. ना.) दादला आणि बायको उभयतां मिळून तें.

मेळ, मेळू (पु. ना.) वाजंत्र्यांचा जो ताफा तो. २ मैथुनात्मक जें स्त्रीमिथुन तें. ३ विशेष गुण उत्पन्न व्हावयाजोगा जो प्रकार अनेक पदार्थांचा मिश्रण तो. ४ हिशेबादिकांचा जो तट्टा तो. ५ संयोग.

मेळा (पु. ना.) मनुष्यादिकांचा जो समुदाय तो. २ समुदाय.

मेळावा (पु. ना.)(ग्रं०) समारंभ.

मेळिकार (पु. ना.) (ग्रं०) भेट.

मेळ, ळू (पु. ना.) (ग्रं०) मेळ.

मेळें (अव्य०) (ग्रं०) योग.

मैत्री (स्त्री. ना.) मित्रपणा.

मैथुन (सं. न. ना.) रत्यर्थ स्त्रीपुरुषांचा मिथुनीभाव तो.

मैंद (पु. ना.) आळशी किंवा बुद्धिमंद जो तो. २ मनुष्यास मोहपाश घालून लुटून नेणारी एक मनुष्याची जाति आहे. ३ नांगरलेल्या जमिनींत धान्य पेरून मग ती जमीन सारखी व्हावी आणि दाणा लपला जावा म्हणून जो ओंडा फिरवितात तो.

मैटा (पु. ना.)ओजरलेली कणीक तो.

मैदान (फा० न. ना.) डोंगर, झाडी इ०कांची अडचण ज्या ठिकाणीं नाहीं असी जी सपाट सारखी जागा तें.

मैंदावें (न. ना.) (ग्रं०) मैंदपणा.

मैळ (पु. ना.) (ग्रं०) मळ.

मोकलणें (धा. ना.) बंधनानें बांधलेला जो पदार्थ त्याणें इच्छेनें वागावें ह्मणून त्या त्या बंधनापासून त्यास मुक्त करणें.—हेल मोकलणें, धाव मोकलणें इ० कंठसंकोच न करितां मोठ्यानें रडणें. २ (ग्रं०) त्याग करणें, अंकितपणापासून मोकळा सोडणें.

मोकळ (स्त्री. ना.) अनेक अवयव

एकत्र करून बांधला जो लाडू इ० पदार्थ त्याचें अवयवविशकल्य तें. २ प्रतिबद्ध न केलेलें किं० न होतां फार सोड इ० धातूनें वि०.

**मोकळवाडी, वादी** (स्त्री० ना०)(ग्रं०) मोकळीक. २ स्थलत्याग.

**मोकळा** (वि०) कोणत्याहि प्रतिबंधानें जो गुंतला नाहीं तो. २ परस्पर संयुक्त नसून जीं भाताचीं शितें, अक्षर इ० तो. [करार.

**मोकळी** (स्त्री. ना.) (ग्रं०) बोली,

**मोकळीक** (स्त्री. ना.) काहिंएक प्रतिबंधापासून जी मुक्तता ती.

**मोकट** (अव्य०) मोकळ द्वितीयार्थी.

**मोकाटु-टू** (वि०)(अव्य०) मोकाट.

**मोकार** (वि०) मोकाट.

**मोकाशी** (वि०) गांव इ० ज्यास इनाम आहेत किं० चाकरीबद्दल दिलीं आहेत तो मनुष्य. २ गांवची खोती ज्याणें केली आहे तो त्या गांवाचा.

**मोकासा** (अर० पु. ना.) इनाम जो गांव, भूमि इ० तो. २ कोणेकास सरकार चाकरीबद्दल देतात जो ग्रामादिक तो. ३ एक दोन गांवांची खोती पतकरितात त्यासही म्हणतात.

**मोगर** (पु. ना.) मेख इ० जमिनीत बळकट बसावी म्हणून त्याजवर मारायासाठीं काष्ठादिकांचा करितात तो २ (ग्रं०) पायदळ.

**मोघम** (अर० वि०) ज्याची फोड झाली नाहीं किं० केली नाहीं असें जें भाषण, व्यवहार, लेख, जमाख इ० तो.

**मोघरीमार, मोगरीमार** (पु. ना.) अपानद्वारादिकांच्या ठायीं मेख ठोकून मारण्याचा व्यापार तो.

**मोघा** (पु. ना.) राहटमाळेस बांधणें इ० कांच्या उपयोगीं आकारविशेषाचें जें मृत्तिकेचें पात्र करितात तो.

**मोचणें** (धा. ना.)(ग्रं०)मोकळें करणें.

**मोचन** (सं. न. ना.) कोणेक पदार्थास काहीं प्रतिबंधापासून मुक्त करण्याचा व्यापार तें.

**मोजदात, दाद** (अर० फा० स्त्री. ना.) एक, दोन, तीन इ० रीतीनें मोजण्याचा जो व्यापार ती किं० त्या व्यापारानें सिद्ध झालें फळ ती.

**मोजबा** (पु. ना.) मोसबा.

**मोजा** (फा० पु. ना.) पायांचें पाऊल व हाताचा पंजा झांकायासाठीं तदाकार वस्त्रादिकांचा शिवून करितात तो.

**मोट** (स्त्री. ना.) विहीर, नदी इ० कांतील पाणी काढायासाठीं जें कातड्याचें मोठें पात्र करितात, जीस बैल इ० लावून ओढीत असतात ती. २ धान्य, वस्त्र इ० कांचें बांधलें जें मोठें ओझें ती. ३ (ग्रं०) वाट.

**मोटकुळें** (न. ना.) गाठोडें.

**मोटकें** (वि०) (ग्रं०) थोडकें, अटपसर, लहान. २ सूक्ष्म. ३ नीटनेटकें. ४ (अव्य०) अंमळसें.

**मोटली, ळी** (स्त्री. ना.) लहान गाठोडी ती.

**मोटा, मोठा** (वि०)विवक्षित मनुष्यादिकांहून अवयवाच्या स्थूलपणानें किं० अधिक वयानें जो युक्त तो. २ द्रव्य,

विद्या इ०कांनीं जो कोणी कोणापेक्षां अधिक तो.

मोड (पु. ना.) पराजय. २ बीजादिकांपासून सूक्ष्म अंश किं० अंकुर उत्पन्न होतो तो. ३ (स्त्री.) कागद इ० मोडल्यानें जें रेषारूप चिन्ह होतें तें. ४ फुटकीं, मोडकीं जीं कांसेभांडीं, अलंकार इ० तीं. ५ शिराचें लाग. ६ हिशेब, पोहणें इ०कांची जी रीत तो. ७ पर्जन्योदकाचा जो मोठा पूर तो. ८ (पं०) विकार.

मोडकळीस (अव्य०) कांहींएक गृहादि पदार्थ किं० देणें, घेणें इ० व्यापार अ० तसा व्यापारकर्ता मनुष्य इ०कांनीं क्षीण दशेस येणें इ० अर्थीं वि०.

मोडणें (भा. ना.) कांहींएक पदार्थ फुटणें, तुटणें, चिरणें यांवांचून इतर व्यापारानें भग्न करणें. २ कांहींएक गोष्ट करूं नये किं० कांहींएक गोष्ट करावी इ०कांविषयीं लोक, शास्त्र, राजा इ०कांनीं केली जी मर्यादा तिचा उल्लंघ करणें. ३ युद्धादिकांत यें पराजित करणें. ४ कलह, दंगा, बंड, अहंकार, गर्व, निद्रा इ० नाहीं असें करणें. ५ खुर्दा इ० हलकें नाणें घ्यावयासाठीं रुपया, पुतळी, मोहोर इ० नाणें देणें किं० खर्च करणें. ६ तालुका, महाल, किल्ला इ० जे प्रसिद्ध त्यांच्या नांवाखालीं त्यांच्या हद्दीच्या आंत असणारे जे इतर ग्रामादिक त्यांणीं मोडलें जाणें. ७ शहर, संपत्तिमान् लोक यांणीं उजाड पाडणें इ०.

मोडती (स्त्री. ना.) कांहींएक कार्य होऊं न देण्याविषयीं केला जो भाषणादि व्यापार तो.

मोडतोड (स्त्री. ना.) मोडलेले तुटलेले दागिने इ०कांचा समुदाय तो.

मोडशी (स्त्री. ना.) मनुष्यादिकांस हाग ओक ह्याव्या जोगा प्रायः अजीर्णामुळें एक रोग होत असतो तो. मोडशी जिरणें, जिरविणें इ०. कोणेकाची खोड मोडणें.

मोडा (पु. ना.) कांहींएक कार्य होऊं न देण्याविषयीं केला जो प्रतिबंधक व्यापार तो. २ त्या व्यापारानें झाली जी त्या त्या कार्याची कुंठितावस्था तो.

मोडी (स्त्री. ना.) (पं०) आकार.

मोडोनयणें (भा. ना.) (प०) वृक्षांनीं फलसमृद्धीनें दाट भरणें.

मोताद (अर० स्त्री. ना.) इयत्ता.

मोती (सं. मौक्तिक) (न. ना.) समुद्रामध्यें शिंपीच्या पोटीं उत्पन्न होतें जें रत्न तें. २ तदाकार मनुष्यानें केलेलें पारा इ०कांचें तें. ३ सोनें मोतीं एकत्र जडून स्त्रियांनीं नाकांत घालायासाठीं जो अलंकार करितात तें.

मोद (सं. पु. ना.) आनंद.

मोदळा (पु. ना.) (पं०) मुद्गल. २ वासरास दूध न पिऊं देणारी तोंडास बांधितात कांटक्यांची विशवी ते. ३ कांहींएक ओझें तें.

मोदी (पु. ना.) सरकारी खाणें, पिणें

इ०कांचा सर्व सरंजाम ज्याच्या स्वाधीन असतो तो. २ सर्व जिन्नस संग्रहीं बाळगतो असा जो प्राणी इ० त्यासहि म्हणतात.

**मोधळा** (पु. ना.) शरीरानें अति पुष्ट असून जो आळशी त्यास निंदेनें म्हणतात. २ घरादिकांचीं कवलें न पडावीं म्हणून आश्रयभूत मोहोटीच्या ठिकाणीं लांब लांब झिप्र्याच्या जुड्या बांधून बांधीत असतात तो. ३ धान्य झोडून घेऊन निरनिराळ्या पेंढ्या न बांधितां त्या तृणाचें बांधलें ओझें तो.

**मोना** (पु. ना.) केळीचा नूतन केळवा तो. २ मुका मनुष्य तो.

**मोनें** (वि०) (ग्रं०) थोर.

**मोप** (वि०) पुष्कळ. २ (न.) कच्ची जी वीट ती.

**मोबदला, बादला** अर० पु. ना.) एक वस्तु देऊन त्याबद्दल दुसरी वस्तु घ्यावी असा रीतीचा जो व्यापार तो. [रचेल.

**मोरकुंत्रा, चा** (पु. ना.) (ग्रं०) मो-

**मोरचा** (फा० पु. ना.) लढाई करायाकरितां आश्रयभूत लाकडकोट इ० करितात तो. २ तरवार इ०कास जो जंग लागतो तो.

**मोरचेल** (न. ना.) देव, राजा इ०कांचे डोक्यावर वारायासाठीं जो मोराचे पिसांचा कुंचा करितात ते.

**मोरणी** (स्त्री. ना.) स्त्रियांचे नाकांतील मोर्नी म्हणून जो अलंकार त्यांत भेद आहे.

**मोरगें** (धा. ना.) (ग्रं०) ऐकणें.

**मोरवीस** (न. ना.) (ग्रं०) मोराचें पीस.

**मोरी** (स्त्री. ना.) घर इ०कांतील पाणी बाहेर जावें इ०कासाठीं जी नाहाणी करितात ती. २ ते पाणी जाण्याचा मार्ग ती.

**मोर्तब** (अर० न. ना.) सरकारसंबंधी कागद इ०कांवर चिन्ह करायाचा एक ठसा आहे तें व त्याणें उठलेलें कागदावर चिन्ह तें.

**मोल** (सं. मूल्य) (न. ना.) किमत.

**मोलमजूरी** (स्त्री. ना.) मोलकरी, मजूरकरी यांचा जो व्यापार ती किंवा त्या व्यापारानें प्राप्त झालें जें द्रव्य ती.

**मोवा** (पु. ना.) एक रोग आहे, जो प्राय: धान्यादिकांवर पडत असतो.

**मोवाज्वर** (पु. ना.) (ग्रं०) तापांत एक जाति आहे ज्यास प्राय: जीर्णज्वर असें म्हणतात.

**मोसबा** (अर० पु. ना.) कोणेकास कांहीं व्यवहारसंबंधी द्यावयाचा जो हिशेब तो. [ऋतु इ० तो.

**मोसम** (अर० न. ना.) योग्यकाल,

**मोह** (सं. पु. ना.) पुत्रादिकांची जी ममता तो. २ कांहींएक कार्यामध्यें चित्तास भ्रम व्हायाजोगा जो धर्मविशेष उत्पन्न होतो तो.

**मोहटी** (स्त्री. ना.) माहुटी. २ मोहाचे झाडाचें फळ ती.

**मोहतर, तूर** (पु. ना.) शूद्रजातीची जी स्त्री तिचा जो पाट लावितात ता.

**मोहतरफा** (पु. ना.) गवंडी, सुतार

इ०कास जें त्या त्या कसबासंबंधीं सरकारास देय द्यावें लागतें तो.

मोहन (सं. वि०) मोहक २ (न.ना.) मोहिनीगार्थी. ३ कणिक इ०कांत मृदुतासाठीं तेल, तूप घालितात तें.

मोहनी (सं. मोहिनी) (स्त्री. ना.) भूल. २ भ्रम उत्पन्न व्हावयाजोगा जो मंत्रादिकरून व्यापार तो किं० तो मंत्रादि तो. ३ एक स्त्रीरूप देवता आहे.

मोहबत,द (अर० स्त्री. ना.)मुरवत.

मोहर (फा० पु. ना.) आंबा इ० किती एक वृक्षांस जो पुष्पगुच्छ येतो तो. २ (स्त्री.) एक सोन्याचें नाणें आहे ३ कागदी इ० कांचा मोर्तबासारिखा कागदावर ठसा करायाचा असतो तो. ४ रुपया, पैसा इ०कांवर जें चिन्ह असते तो ५ कांहीं पदार्थावर खूणे-करितां केलें जें कांहींएक चिन्ह तो. ६ (ग्रं०) मार्ग. ७ लक्ष्य.

मोहरकी (स्त्री. ना.) बैल, घोडा इ० कांचे मुखास आकारविशेषाची जो दोरी बांधितात ती.

मोहरक्या (वि०) कोणिक समाजामध्यें जो अग्रसर तो.

मोहरणें (अ. ना.) (ग्रं०) वृक्षादिकांस मोहर येणें. २ प्राप्त होणें. ३ पुढें होऊन शिरणें. ४ क्वचित् माघारे फिरणें.

मोहरा (पु. ना.) सर्पाचा मस्तकसंबंधी मणि तो. २ साधारण औषधि मणि तो. ३ सरंगाचे बाजविण्यांत प्रकार आहे. ४ मनुष्यादिकांचा जो चेहरा तो. ५ चेहरेदार किं० संपत्तीनें अ० गुणानें इ० जो श्रेष्ठ तो. ६ बुदबळांत राजा अ० प्यादा यांवांचून जें सर्व बुदबळें तीं प्रत्येकीं. ७ वस्त्र, कागद इ०कांवर घोटणीनें जी तेजगी येते ती.

मोहाळी (स्त्री. ना.)(ग्रं०) मोहरकी.

मोहिरें (न. ना.)(ग्रं०) साहित्य किं० सामग्री.

मोहीम (अर० स्त्री. ना.) कोणेक देश इ० जिंकण्यास राजा इ०कांची जी स्वारी ती.

मोहोळ, ळें (न.ना.) मधमाशा मध सांठविण्यासाठीं जें पोळें करीत असतात तें.

मोळ (पु.ना.)गवतांत एक भेद आहे. २ गृह इ०कांचा जो पावीं तो प्रत्येकी.

मोळा (पु. ना.) ओळा किं० रीत. २ (ग्रं०) ओझें. ३ विळखा.

मोळी (स्त्री. ना.) लाकडें, ऊंस इ० कांचा जो मोठा भारा तो.

मोळें (न. ना.) वासरानें आपले आईस न प्यावें ह्मणून त्याचे तोंडास काष्ठ, चर्म इ०कांचे जें प्रतिबंधक बांधितात तें.

मोक्ष (सं. पु. ना.) सलोकतादि चार मुक्तींहून भिन्न जी शुद्ध मुक्ति ती किं० ब्रह्मस्वरूपता ती. [क्षलक्ष्मी.

मोक्षश्री (सं. स्त्री. ना.) (ग्रं०) मो-

मौक्तिक (सं. न. ना.) मोती.

मौज (अर० स्त्री. ना.) संतोष उत्पन्न करणारा व्यापार तो किं० त्याणें वाटला जो आनंद अ० चमत्कार तो.

मौंजी (सं. स्त्री. ना.) मुंज.

मौन (सं. न. ना.) काहींएक कालपर्यंत भाषण न करितां राहाण्याचा जो व्यापार तें. २ (वि०) भाषणव्यापार-शून्य जो मुका तो. [केलें तो.
मौनी (सं. वि०) मौन ज्याणें धारण
मौल (स्त्री. ना.) मौलि.
मौलवी (अर० पु. ना.) यवनी धर्म-शास्त्र जाणणारा यवनजातीय पं-डित तो.
मौलि, मौली (सं. स्त्री. ना.) मस्तक.
मौळ (पु. ना.) (ग्रं०) फणस इ० फळावरील कांटे ते प्रत्येकीं.
म्लान (सं. वि०) कोमेजलेला.
म्लेच्छ, म्लेंछ (सं. पु. ना.) यवन.
म्हण (स्त्री. ना.) परंपरेनें लोक बो-लत आले असें जें नीतिबोधक अ० दृष्टांतादि उपयोगी प्राकृत वाक्य अ-सतें तें.
म्हणजे (अव्य०) काहींएक शब्द वा-क्य इ० काचा अर्थ कर्तव्य असतां त्याच्या पुढें प्रश्नद्योतक याचा प्रयोग होतो. उ० अश्व म्हणजे घोडा. २ पूर्वोत्तर क्रियांचा कार्यकारणभाव असतां कारणक्रियावाचकापुढें या-चा योग होतो. उ० पाऊस पडला म्ह० पीक होईल.
म्हणणें (न. ना.) पढणें. २ (धा. ना.) शब्दादिकांचा उच्चार करणें.
म्हणिजे (अव्य०) (ग्रं०) म्हणजे. २ (धा.) बोलिजे.
म्हणिपे, ये (अव्य०) (ग्रं०) म्हणजे.
म्हणियारा (पु. ना.) (ग्रं०) कोणी-कोणाचा जो सेवक, तूं म्हणविणारा तो. [कोर्ने कर्तव्य तें.
म्हणियें (न. ना.) (ग्रं०) सेवकादि-
म्हणून, म्हणोन (अव्य०) पूर्वोत्तर क्रियांचा कार्यकारणभाव असतां कारणक्रियावाचकापुढें याचा प्रयोग होतो. उ० नदीस पूर आला म्हणून मी अलीकडे अडकलों.
म्हातारचळ (पु. ना.) म्हातारपणीं जो बुद्धिभ्रंश तो. [म्हणतात.
म्हातारडा (वि०) म्हाताऱ्यास निंदेनें
म्हातारा (सं. महत्तर) (वि०) वयानें वृद्ध तो.

---

—य—

य– हा वर्ण सविसावें व्यंजन आहे.
यःकश्चित (सं. वि०) मुख्य कोटी-मध्यें गणनीय नव्हे असा जो साधा-रण मनुष्यादि तो.
यच्चयावत् (सं. अव्य०) झाडून.
यजन (सं. न. ना.) देवतेच्या उद्दे-शानें अग्नींत होम करण्याचा व्या-पार तें.
यजमान (सं. पु. ना.) स्वर्गादि फल आपणास प्राप्त व्हावें म्हणून तें तें यज्ञादि कर्म आपलें म्हणून करणारा जो मुख्य कर्ता असतो तो त्या त्या कर्मांत. २ ज्याकडील उपाध्येपण इ० अधिकार ज्याकडे चालतात तो त्याचा. ३ संसारादि व्यवहारा-चा मुख्य धनी तो. ४ चाकरी इ० संबंधानें ज्याचे पदरीं जो राहा-

ता ता त्याचा. ५ ज्या स्त्रीचा जो पति तो तिचा.

यति (सं. पु. ना.) यती. २ (स्त्री०) पद्याचे चरणामध्ये यत्किंचित् अवसान घ्यावयाच्या जागा असतात त्या प्रत्येकीं.

[त करणारा.

यती (सं. पु. ना.) संन्यासी. २ य-

यत्किंचित् (सं. वि०) किंचित्. २ सर्व.

यत्न (सं. पु. ना.) प्रयत्न.

यंत्र (सं. न. ना.) कालपरिगणन, चित्रनिर्माण इ० कार्य, सुलभ रीतीनें व्हावें म्हणून युक्तीनें करून ठेविलेलें यंत्राळ इ० जें साधन तें. २ (ग्रं०) कुलशी. ३ बंदूक. ४ तोफ. ५ प्राणायामास म्हणतात.

यथा (सं. अव्य०) जसा. याचा संस्कृत शब्दाशीं समास होतो तेथें याचा अर्थ त्या त्या प्रमाणें त्याचें उल्लंघन न करितां असा प्रायः होतो आणि विशिष्ट शब्द क्रियाविशेषण होतें. उ० यथाशास्त्र, यथामार्ग इ०

यथाअनुक्रमें (सं. अव्य०) जो अनुक्रम आहे त्याप्रमाणें किं० जो अनुक्रम धरिला आहे तो न सोडितां वाटणें, देणें, घेणें इ०कांचें वि०.

यथातथ्य (अव्य० वि०) वस्तुतः जसें आहे तसें कोणेक गोष्ट सांगणें इ०कांचें वि०.

यथानशक्ति (अव्य०) यथानुशक्ति.

यथानुशक्ति, शक्त्या (सं. अव्य०) यथाशक्त्या.

[नुरूप.

यथान्याय (सं. अव्य०) नीतीस अ-

यथापूर्व (सं. अव्य०) पूर्ववत्प्रमाणें.

यथाप्रत, प्रति (अव्य०) लिहावयास किं० वाचावयास घेतल्या प्रतीप्रमाणें.

यथामति (सं. अव्य०) आपल्या बुद्धीच्या सामर्थ्याप्रमाणें करणें, बोलणें, सांगणें इ०कांचें वि०. [तसें.

यथायुक्त (सं. अव्य०) जसें असावें

यथायोग्य (सं. अव्य०) यथायुक्त.

यथार्थ (सं. वि०) तथ्य. २ अन्वर्थ.

यथाविधि (सं. अव्य०) कोणेक कर्मविषयीं शास्त्रानें सांगितला जो अनुष्ठानप्रकार त्याप्रमाणें तें कर्म करणें, होणें, घडणें इ०कांचें वि०.

यथाशक्ति (सं. अव्य०) आपल्या शक्तीप्रमाणें.

यथाशास्त्र (सं. अव्य०) शास्त्रमर्यादेतें न उल्लंघितां.

[यानुरूप.

यथासंप्रदाय (सं. अव्य०) संप्रदा-

यथासांग (सं. अव्य०) ज्या ज्या क्रियेला जीं जीं अंगें सांगितलीं आहेत त्या त्या अंगामध्यें यत्किंचित् न्यूनता न पडतां.

यथास्थित (सं. अव्य०) जसें पाहिजे होतें तसें. २ पूर्वकुशलावस्था न पालटतां. ३ यथायोग्य.

यथेच्छ (सं. अव्य०) इच्छेस येईल तितकें, प्रायः लोकांत विपुलतेची विवक्षा असतां प्रयोग होतो. २ इच्छेस येईल तसें.

यथेष्ट (सं. अव्य०) यथेच्छ.

यंदां (अ०) वर्तमानवर्षी.

यदाकदाचित् (सं. अव्य०) कदाचित्.

यद्यपि (सं. अव्य०) जरी.

यद्वा (सं. अव्य०) अथवा, किंवा.

यम ( सं. पु. ना. ) मनुष्यादिकांस पापानुसार मरणोत्तरकाळीं शिक्षा करणारा देव आहे. २ ज्यास करूणा नाहीं अ० भयंकर दिसतो त्यास आरोपानें म्हणतात. ३ इंद्रियनिग्रह.

यमक (सं. पु. न. ना.) श्लोकाचे प्रथम चरणाचे अंतीं किं० पूर्वार्द्धाचे अंतीं जीं अक्षरें आलीं असतात तींच एक दोन तीन चार इ० पाहिजे तितकीं अक्षरें दुसरे चरणाचे किं० अर्द्धाचे अंतीं असतात असा जो शब्दालंकार तो, तें, प्रायः त्या अक्षरांचे अर्थ दोन होत असतात.

यमल (सं. वि०) जावळा.

यमी (सं. पु. ना.) योगी.

यव (सं. पु. ना.) एक धान्य आहे ज्यास सातू म्हणतात तो. २ तदाकार मनुष्याचे हाताचे बोटावर रेषांकित चिन्ह असतें तो.

यवन (सं. पु. ना.) म्लेच्छ, म्लेंछ.

यश (सं. न. ना.) कीर्ति. २ हातीं धरलेलें काम यथास्थितपणें तडीस जात असावें अशी जी कोणेकास दैवानुकूलता असते तें. ३ ज्याची आपण सेवा केली किं० ज्यासहवर्तमान सावकारी इ० कांहीं व्यवहार केला असतो त्याणें त्याचे योगानें आपलें कांहीं हित झालें असें मानून सन्मानाचा शब्द बोलल्यानें आपणास आनंदजनक जो उत्कर्षविशेष मिळतो तें. ४ कांहींएक दुर्घट कर्म आपले हातून सिद्धीस गेलें असतां जो उत्कर्ष प्राप्त होतो तें.

यशस्वी (सं. वि०) युद्धादिकाच्या ठायीं जय होऊन ज्यास यश आलें आहे तो किं० दुष्कर कर्म ज्याचे हातून तडीस जाऊन ज्यास यश मिळत असतें असा जो पुण्यवान् असतो तो. २ ज्याचे संबंधानें संबंधकर्त्याचें उत्तरोत्तर कल्याण होत असतें असा जो दास, दासी अश्व, धनी, गुरु इ० तो.

यष्टि (सं. स्त्री. ना.) काठी.

यळिल (वि०) (ग्रं०) निर्फळ.

यळीलवाणें (वि०) (ग्रं०) यळिल.

यज्ञ (सं. पु. ना.) अग्निहोत्र्यानें करायाचें असें एक मोठें वेदोक्त कर्म आहे. २ ईश्वरपरायण जें कर्म त्यासही म्हणतात.

यज्ञोपवीत (सं. न. ना.) ब्राम्हणादिक मुंज झाल्यापासून निरंतर जें सूत्र कंठांत धारण करीत असतात तें.

याग (सं. पु. ना.) यज्ञ.

याचक (सं. पु. ना.) धान्य, द्रव्य इ०कांची भिक्षा मागायास आलेला जो कोणी तो.

याचना (सं. स्त्री. ना.) प्रार्थनापूर्वक विनयानें मागण्याचा व्यापार ती.

यांचा (सं. स्त्री. ना.) याचना.

यात (सं. जाति) (स्त्री. ना.) ब्राम्हण, क्षत्रिय इ० जी जात ती. २ (सं. वि०) गत जो काळ इ० तो.

यातना (सं. स्त्री. ना.) दारिद्र्य, नरक, गर्भवास इ० संबंधी भोगावें लागतें जें तीव्र दुःख ती.

यातायात (सं. स्त्री. ना.) जाणें, येणें इ० रूप क्लेशप्रद जी अनेक प्रकारची खटपट ती.

याती (सं. स्त्री. ना.) यानप्रथमार्थी.

यातु (सं. न. ना.) राक्षस.

यातुधान (सं. पु. ना.) यातु.

यात्रा (सं. स्त्री. ना.) देवतादर्शन, तीर्थस्नान इ० पुण्यकर्माच्या उद्देशानें निघून त्या त्या स्थळीं जाऊन तेथें करावयाचा क्षौर, स्नान, देवतदर्शन, ब्राम्हणभोजन इ० विधि तो सर्व करावा इतकें जें कर्म तें. २ यात्रेकरू जनांचा जो समुदाय ती. ३ जत्रा. ४ देशांतरास किं० ग्रामांतरास जें गमन तें. ५ (ग्रं०) संचार.

यात्रेकरी, करू (पु. ना.) तीर्थादि यात्रेच्या उद्देशानें जो बाहेर निघाला तो घरीं येई तोंपर्यंत.

याद (फा० स्त्री. ना.) स्मरण. २ याद अशीं वर अक्षरें लिहून अनेक मनुष्यादि पदार्थांचा क्रमानें स्मरणार्थ लिहितात जो लेख तो किं० तसें ज्यावर लिहितात तो कागद इ० तें. ३ (सं. न.) जलचर.

यान (सं. न. ना.) ज्याजवर किं० ज्यांत बसून जातात असें जें घोडा, पालखी, गाडी, गलबत इ० तें. २ गमन.

याम (सं. पु. ना.) प्रहर. २ प्राणायामरूप जो वायुजय त्यांत एक भेद आहे.

यामिनी (सं. स्त्री. ना.) रात्र.

यार (फा० पु. ना.) मित्र. २ धगड मुख्यार्थी । किं० प्रथमार्थी.

याव (न. ना.) (ग्रं०) बळ.

यावत् (सं. अव्य०) पच्चयावत्. २ जोंपर्यंत. ३ जितका.

यावा (पु. ना.) (ग्रं०) उदय. २ प्रकाश. ३ धैर्य. ४ बळ.

याज्ञिक (सं. पु. ना.) विवाह, मुंज, व्रतोद्यापन, देवप्रतिष्ठा इ० कर्माचें अनुष्ठान चालवायास जाणतो जो ब्राह्मण तो.

युक्त (सं. वि०) ज्याचा ज्याशीं योग झाला आहे तो त्याशीं. उ० शर्करायुक्त. २ लोकव्यवहार आणि शास्त्रव्यवहार यांस अनुरूप अतएव त्या त्या स्थळीं चांगला दिसायाजोगा जो काहीएक अर्थ तो. ३ (स्त्री. ना.) युक्ति.

युक्ताथिला (वि०) (ग्रं०) आस्तिक्य भावनेनें युक्त तो.

युक्तायुक्त (सं. न. ना.) ग्रंथादिकांतील विचारणीय बरा वाईट अंश तें.

युक्ति (सं. स्त्री. ना.) कोणेएक कार्य ज्या प्रकारें केलें असतां सिद्ध होतें आणि चांगलें लौकर इ० इच्छानुरूप होतें तो प्रकार समजायाजोगी कोणेकाच्या अंगीं बुद्धि असल्ये ती. २ कोणेक कामास बुद्धीचा प्रयोग तो. ३ कौशल्य.

युक्तिप्रयुक्ति (सं. स्त्री. ना.) युक्ति इ० तें.

युग (सं. न. ना.) कृत, त्रेत, द्वापर, आणि कलि हे जे चार कालविभाग ते प्रत्येकीं. २ द्वय. ३ जोखड.

युगल (सं. न. ना.) द्वय.

युग्म (सं. न. ना.) द्वय, जोडी. २ स्त्रीपुरुषरूप जें मिथुन तें.

युत (सं. वि०) युक्त.

युद्ध (सं. न. ना.) झुंज.

युवति, युवती (सं. स्त्री. ना.) तरुणी.

युवराज (सं. पु. ना.) राजा राज्यपदीं असतांच आपल्या हाताखालीं सर्व राज्याचा कारभार करावा आणि आपले पाठीमागें मुख्य राज्यपदीं बसावें म्हणून जो पुत्रादिक अधिकारी केला असतो तो.

युवा (सं. पु. ना.) तरुण.

युक्षदंड (पु. ना.) (ग्रं०) भुदंड.

यूथ (सं. पु. ना.) समुदाय. [३ इतकें.

येउते (वि०) (ग्रं०) असें. २ एवढें.

येऊनजाऊन (अव्य०) वरकड कांहीं नाहीं, कायतें एवढेंच असा अर्थ इष्ट असतां याचा प्रयोग करितात. २ कोणेक स्थळीं नेहमी न असतां कधींकधीं यावें जावें अशा प्रकारें असण्याचें वि०.

येजा (स्त्री. ना.) कोणेक स्थळास जावें, पुनः माघारें यावें अशी जी खटपट ती.

येणें (धा. ना.) कोणेक इष्ट अवधीपासून आपणाकडील असा मानलेला जो प्रदेश त्यापर्यंत कोणेकानें गतिद्वारा प्राप्त होणें. २ कोणेक विद्या, कला इ० बुद्धीनें धरलें जाणें. ३ राग, लोभ, दया, ज्वर इ०कांनीं अंतःकरण, शरीर इ० जीं आपआपलीं उत्पत्तिस्थानें त्याच्याठायीं उत्पन्न होणें. ४ कांहींएक प्रमेय वस्तु कोणेक परिमाणाशीं तुल्य असणें. इ०.

येणेंजाणें (न. ना.) कोणेकस्थळीं कोणेकाचा यावें जावें असा असतो जो रावता तें.

येतांजातां (न. ना.) सर्वदा, अनेकवार.

येतापाया (पु. ना.) द्रव्यादि चोहोंकडून येऊन एकत्र जमून समृद्धि होत असावी अशाविषयीं अनुकूळ असतो जो काळ तो.

येर (वि०) (ग्रं०) अन्य, इतर.

येरघर (न. ना.) (ग्रं०) ब्रह्म वस्तु.

येरझार, झारा (स्त्री. ना.) कोणेकस्थळीं कांहीं कार्याच्या उद्देशानें खेप ती.

येरयेर (वि०) (ग्रं०) परस्पर, एकमेक.

येरवां (अव्य०) परवां अ० तेरवां या अर्थी.

येरवाळीं (अव्य०) वेळेवारीं.

येरिका (स्त्री. ना.) (ग्रं०) लव्हाळ्याची एक जात ती.

येरीमोहार (वि०) (ग्रं०) उलट.

येरु, येरू (वि०) (ग्रं०) पूर्ववाक्यांत ज्याचा नामनिर्देश केला असतो त्याचें पुनः नांव सांगणें असतां या सर्वनामाचा प्रयोग करितात. [असें.

येसणें (वि०) (ग्रं०) येवढें, इतकें,

योग (सं. पु. ना.) कोणेक पदार्थ दुसरे पदार्थाशीं लागला असतां त्याचा परस्पर होतो जो संबंध तो. २ कोणेकाचा कोणेकाशीं समवेतादि संबंधरूप संबंध तो. ३ कार्यमात्र

होण्यास निमित्तभूत जो ईश्वरसंकल्प जो जीवास कार्यावरून अनुमित होतो तो. ४ कोणेक कार्य सिद्धीसाठीं कोणेक वस्तू जी त्या कार्यांत योजना तो. ५ प्राणवायूचा निरोध करून अंतःकरणाची एकाग्रता करावी असा एक शास्त्रोक्त ईश्वरप्राप्तीचा उपाय आहे तो. ६ ईश्वरप्राप्तीस उपायभूत भक्ति इ०क त्यास म्हणतात. ७ (ग्रं०) माया.

योगनिद्रा (सं० स्त्री० ना०) ईश्वराची निद्रारूप अवस्था ती. २ (ग्रं०) समाधि.

योगपट्ट (पु० ना०)(ग्रं०) श्रेष्ठ भोग. संन्यासदीक्षेचा एक प्रकार आहे.

योगमाया (सं. स्त्री. ना.) ईश्वराची जी मायारूप शक्ति ती.

योगशास्त्र (सं. न. ना.) ज्यामध्यें प्राणायामादिद्वारा अंतःकरणाचे एकाग्रतेचा उपाय सांगितला आहे असें शास्त्र.

योगसार (पु. ना.) (ग्रं०) विचार.

योगक्षेम (सं. पु. न. ना.) अन्न आच्छादनादिद्वारा आपले प्रपंच्याचा जो निर्वाह तो. तें. २ अप्राप्ताची प्राप्ति व प्राप्ताचें संरक्षण तो.

योगी (सं. पु. ना.) प्राणनिरोधादिद्वारा याग ज्यास सिद्ध झाला आहे तो.

योग्य (सं. वि०) उचित. २ प्रतिष्ठित सभ्य असा जो मनुष्य तो. इ०.

योजणें (धा. ना.) कोणेक अर्थास कोणेक अधिकार, पद, किं० शत्रुपराजयादिरूप काम इ० कावर नेमणें. २ कोणेक पदार्थ कोणेक पदार्थाशीं संबद्ध करणे परंतु जे पदार्थ परस्पर संबद्ध होऊनच इच्छितकार्यकर्ते होतात त्याचा तो संबंधवाचय असतां प्रयोग. उ० रथाशीं घोडे योजले, धनुष्याशीं बाण योजला. ३ कोणेक गोष्ट अशी अशी याप्रकारें करावी इ० रूपें संकल्पणें. इ०.

योजन (सं. न. ना.) चार कोशरूप जें मार्गप्रमाण तें. २ योजना.

योजना (सं. स्त्री. ना.) योजण्याचा जो व्यापार तो. [यीं जो समर्थ तो.

योद्धा (सं. पु. ना.) युद्ध करण्याविषयोनि (सं. स्त्री. ना.) स्त्रीव्यक्तीचें उपस्थ तें. २ त्या त्या जातिमध्यें उत्पन्न होणें, यास कारण इ० कांविषयीं विवक्षित जी ती ती जाति ती. ३ त्या त्या पदार्थाचें जें उत्पत्तिकारण तें. ४ जगात निमित्तकारण जें ईश्वर, काल, स्वभाव इ० त्यांस म्हणतात.

योनिसंबंध (सं. पु. ना.) विवाहद्वारा जो परस्पर संबंध तो.

यौवन (सं. न. ना.) तारुण्य.

यौवराज्य (सं. न. ना.) युवराजाचा जो अधिकार किं० कर्म तें.

— र —

र— हा वर्ण सत्ताविसावें व्यंजन आहे. (अव्य०) रडणें या अर्थी संकेतानें म्हणतात. करणें याच्या योगीं प्रयोग:

रंक (सं. पु. ना.) लोकांनीं मानायास कारणभूत जें धन, विद्या, पराक्रम इ० कृत महत्व तें ज्यापाशीं नाहीं

असणें केवळ तुच्छ हलका जो पुरु-षादिक तो. [बळ तें.

**रकटें** (न. ना.) जुनें फाटकें जें कां-

**रकम** (अर० स्त्री. ना.) जितक्या सं-ख्यारूप द्रव्यावर एकदा देणें, घेणें, ठेवणें, इ० व्यापार विवक्षित असतो तितकें संख्यारूप जें तें रुपये इ० द्रव्य तो एक. २ हिशेब इ० करा-यासाठीं लिहितात जो अंकराशि तो.

**रक्त** (सं. न. ना.) शरीरांत एक द्र-वरूप धातु आहे, जिचा रंग तांबडा असतो तें. २ (वि०) तांबड्या रंगानें रंगला जो पदार्थ तो. ३ अनुरक्त. ४ तांबडा.

**रक्तपरमें** (न. ना.) रक्तप्रमेह. [आहे.

**रक्तपिती** (स्त्री. ना.) एक कुष्टरोग.

**रक्तप्रमेह** (सं. पु. ना.) शिश्नद्वारानें रक्त स्रवतें असा एक प्रमेहाचा भेद आहे.

**रक्तवान** (पु. ना.) शाई विकून उ-पजीविका करितो तो. २ श्रीमंत लो-कांचे घरीं पानें, द्रोण, आणि शाई यांच कामावर ठेविला असतो तो.

**रखडणें** (धा. ना.) कोणेक कार्य भड न होई व आपलेंही सुटका न होई अशी कोणेकानें कंटाळा येईशी वि-पत्ति भोगीत असणें. २ कोणेकानें दुखण्यांत खितपत पडणें. [वानपणा.

**रखतवाणी** (स्त्री. ना.) (ग्रं०) रक्त-

**रखरख** (स्त्री. ना.) कांहींएक रोगा-दि विकृतीनें जी कोणाएकास खाखा सुटायाजोगी पोटांत आग होते ती.

**रखरखीत** (वि०) वृक्षांची छाया, ओलें तृणादिक, पाणी इ० करून तो थंडावा आणि स्निग्धपणा तो जेथें नाहीं असें जें देशग्रामादि स्थळ तो किं० आर्द्रांश स्निग्धांश ज्यामध्यें नाहीं असें तें रूक्ष अन्नादि भक्ष्य तो.

**रखवाली** (स्त्री. ना.) कोणेक अर्थ कोणी नेईल, खाईल किं० जाईल इ० न व्हावें म्हणून त्याचें रक्षण क-रण्याचें काम तो.

**रग** (फा० स्त्री. ना.) मनुष्यादिकांचा बलादिकून जो नाडा तो. २ रोग, विकृति इ०कांचा उत्तरोत्तर चढ व्हा-वा अशी जी बलावस्था ती. ३ हात, पाय इ० अवयवांस लागते कळ तो.

**रंग** (सं. पु. ना.) चक्षुरिंद्रियानें मात्र जाणले जातात असे जे नीलत्व, पी-तत्व, शुक्लत्व इ० पदार्थनिष्ठ गुण ते प्रत्येकीं. २ वस्त्र, चित्र इ० पदार्थ रंगवायासाठीं इष्ट जो हिंगूळ, पिवडी, नीळ, सफेता इ० पदार्थ तो किं० तांगींकरून सिद्ध केलें जें द्रव्य तो. ३ गाणें, कीर्तन, तमाशा, भाषण इ०कांचा लोकांचीं अंतःकरणें रमा-याजोगा पडतो जो शोभाविशेष तो. ४ मनुष्य, वृक्ष, बाग, शेत इ० प-दार्थ किं० संसार, व्यवहार इ० गोष्ट इ०कांमध्यें जी परिपूर्ण शोभा येते अशी दशा तो. ५ कोणेक गोष्ट के-ली असतां शोभायाजोगा जो प्रसं-गानुरूप त्या गोष्टीचा येतो समय तो. ६ कोणेक परोक्ष गोष्ट इ०कांचा कां-हींएक चिन्हावरून मनांत येते जी संभाव्यता तो. ७ सभामंडप.

**रगड** (स्त्री. ना.) धंगळ.

रगडणें (धा. ना.) कोणेक पदार्थ दों-हों पदार्थांचे दाटींत सांपडवून किं० वर भार घालून निष्पीडित करणें. २ दपटणें.

रगडपट्टी (स्त्री. ना.) चंगळपट्टी. २ रगडमल्लाचें जें कर्म तें.

रगडमल्ल (पु. ना.) ज्याचे अंगीं काम करण्याची युक्ति नाहीं आणि काम कोणत्या रीतीनें केलें असतां नीटनेटकें होईल इ० विचार न करितां केवळ अंगबळानें काम करण्याचा स्वभाव ज्याचा त्यास म्हणतात. २ ज्याचे अंगीं सुरेखपणा नाजुकपणा नाहीं, आणि सामान्य रीतीपेक्षां आकारानें मोठा असा जो दागिना, वस्त्र, पात्र इ० पदार्थ त्यास म्हणतात.

रगडा (पु. ना.) संकुचितस्थलामध्यें अनेक मनुष्यादि जमले असतां होणें जी अतिशयित दाटी तो. २ करणाराचे किं० करायास पाहिजे जो अवकाश त्याचे अल्पत्वामुळें संसारादिसंबंधी कामाची होणें दाटी, जिचे खालीं करणारा थकून जातो तो. [ढून.

रगडून (अव्य०) कडकावून. २ तग-

रंगड्या (स्त्री. ना.) नानाप्रकारचे ढंग त्या.

रंगण (सं. न. ना.) भोंवरा खेळायाकरितां मंडलाकार रेघेनें आवृत जो प्रदेश करितात तें. २ नृत्य, नाटक, मल्लयुद्ध इ० पाहायासाठीं करितात जी सभा तें. रंगणात येणें म्ह० कोणेकाचे समक्ष येणें.

रंगणें (धा. ना.) वस्त्रादिक पाहिजे तशा रंगानें विशिष्ट होणें. २ गायन, ईश्वरभक्ति इ०कांची गोडी लागून त्याहून अन्य कोणताच विषय रुचूं नये असा जो सुखसंस्कार अंतःकरणावर होतो तद्विशिष्ट अंतःकरणानें किं० त्या मनुष्यादिकानें होणें.

रंगदेवता (सं. स्त्री. ना.) गाणें, कीर्तन, पुराण, भाषण इ०कांस जिच्या प्रसादानें रंग येतो अशी एक रंगाभिमानिनी देवता मानितात ती.

रंगभूमि (सं. स्त्री. ना.) सभामंडप.

रंगमहाल (पु. ना.) नानाप्रकारचे विलास करायाकरितां आरसे, चित्रें इ०कांनीं सुशोभित जी श्रीमंत लोक जागा करितात तो.

रंगमाळा (स्त्री. ना.) रांगोळीची केलेली शोभा.

रंगविणें (धा. ना.) रंगानें वस्त्रादिक विशिष्ट करणें. २ कोणेकाच्या तोंडावर चाखविणें. [डायाचा चरक.

रगाडा (पु. ना.) रगडा. २ रस का-

रंगेल, ला (वि०) गाणें, तमाशा, पुष्प, चंदनादि विषयांचा उपभोग, थट्टा मस्करी या विषयांवर ज्याची फार रुचि असा जो आनंदी रसिक मनुष्य तो.

रंगेल (वि०) ज्याचे अंगीं रग बहुत, असा जो मनुष्य, अश्व इ० तो.

रचणें (धा. ना.) दगड, विटा किं० वाक्यें, पदें इ० जे अवयवभूत पदार्थ ते एकावर एक, एकापुढें एक इ० प्रकारें परस्पर संबद्ध करून

भिंत, गंज, श्लोक, मसलत इ० अवयवीभूत पदार्थ निर्माण. २ इच्छेप्रमाणें आकार होई असे दगड, भांडीं इ० पदार्थ एकावर एक असे मांडणें. २ (ग्रं०) तन्मय होणें.

**रचना** (सं. स्त्री. ना.) भिंत, श्लोक इ० किं० तदवयव जे दगड, पदें इ० त्यांचा रचण्याचा जो व्यापार तो किं० प्रकार ती. २ अवयव रचून सिद्ध होतो जो अवयवी तो.

**रज** (सं. न. ना.) धूळ. २ पुष्पाचा जो पराग तें. ३ स्त्रियांचें ऋतसंबंधी जें रुधिर तें. ४ रजोगुण. ५ (पु.) सुवर्णादि धातूंचा केवळ बारीक कण तो.

**रंजक** (स्त्री. ना.) बंदूक, तोफ इ० पेटवायाकरितां त्याच्या कान्यावर घालितात जी दारू ती. २ फटाका, तोटा, बाण इ० कामध्यें जी दारूची बान करून भरीत असतात ती. रंजक पिणें म्ह० तोफ इ०कांच्या कान्यावरची मात्र दारू जळून बार न होता राहाणें. रंजक उडणें, झडणें म्ह० चकमक झडणें.

**रंजणें** (भा. ना.) कोणेक विषय गोड लागल्यामुळें अंतःकरण सुखरूप होत्सातें उद्वेगादि दुःख विसरून त्या विषयावर लागून राहाणें.

**रजत** (सं. न. ना.) रुपें प्रथमार्थी.

**रंजन** (सं. न. ना.) गाणें, सुभाषित इ० विषय सेवीत असतां उद्वेगादि दुःखाचा विसर पडून अंतःकरणास होत्ये जी सुखरूपता तें.

**रजनी** (सं. स्त्री. ना.) रात्र.

**रजनीचर** (सं. पु. ना.)(ग्रं०)राक्षस.

**रजस्वला** (सं. स्त्री. ना.) ऋतुमती स्त्री ती.

**रजा** (अर० स्त्री. ना.) कांहींएक कार्याविषयीं जें कोणेकाचें अनुमत तें. २ चाकरास चाकरीवरून कांहीं काल किं० अगदीं देतात जो निरोप तो. ३ कोणी कोणास आपणाजवळून इतर ठिकाणीं जाण्यास देतात जो निरोप तो.

**रजावंदीनें, दीनें** (अव्य०) कोणेकाच्या अंतःकरणाच्या संतोषानें.

**रंजीस** (फा० वि०) उत्साह मनोरथ यांचा भंग झाल्यामुळें खिन्न झाला जो मनुष्यादि तो. रंजीस येणें म्ह० मद्ग्लान येणें.

**रज्जु** (सं. स्त्री. ना.) दोरी.

**रट्ट** (पु. ना.) मनुष्यादिकांचा दाट जमलेला जो समुदाय तो.

**रट्टा** (पु. ना.) मुष्टि इ०कांचा जो दृढ टोला तो. २ कामाचा रगडा तो. ३ मनुष्यादिकांचा जो मुसाडा तो.

**रड** (स्त्री. ना.) कांहीं काळ मतत रडत असावें अशी जी पोर इ०कांस अवस्था होत्ये ती. २ शोक, दुःखसंबंधी ज्या गोष्टी ती. ३ कोणेक गोष्टीचें घडगतीचा प्रतिपक्षभाव ती. रडगाणें म्ह० रड सांगणें इ०.

**रडका** (वि०) निरंतर रडण्याचा स्वभाव ज्याचा तो. किं० कोणेक कार्याविषयीं ज्याला उत्साह नाहीं, निरंतर रड गात असावें अशा स्वभावाचा जो मनुष्य किं० तसा त्याचा

कारभार, बोलणें, इ० तो. ३ रडण्ये-समयीं जें मारखें जें मुख, ती मुद्रा, तो शब्द, भाषण इ० तो.

रंडका (पु. ना.) विधुर.

रंडकी (स्त्री. ना.) विधवा स्त्रीस नि-दैने किं० दुर्बलत्व वर्णनप्रसंगीं ह्मणतात.

रंडकीमुंडकी (स्त्री. ना.) केवळ नि-राश्रित अतएव दुर्बळ जी विधवा ती.

रडकुंडा (वि०) रडण्याचे पूर्वदशेस आल्यामुळें आता रडेल अशी ज्या-ची मुद्रा दिसों लागली तो किं० त्यानें तें तसें नाड तो.

रडकुंडीस (अव्य०) येणें किं० परतणें यांच्या योगें प्रयोग, कांहीं कारणानें अति त्रासल्यामुळें किं० कांहीं दुःख सोसवेनासें झाल्यामुळें आतां रडूं लागावें अशा दशेनें पावणें.

रडणें (धा. ना.)(सं. रुदन) शरीर-संबंधी व्यथा, शोक, हर्ष, प्रेम इ० काच्या योगें अंतःकरण शिथिल झा-ल्यामुळें डोळ्यांत अश्रु येऊन तोंड पसरलें जावें, कंठांतून ध्वनि निघावा अशी जी क्रिया होती ती द्वारा को-णेकानें होणें. २ कोणेक गोष्टीविषयीं रड गाणें. ३ कोणेकास उद्देशून शोक करणें. रडतराऊत घोड्यावर बसविणें इ० ज्यास ज्या कामाविषयीं उत्साह नाहीं आणि नाहीं नाहीं ह्म-णतो त्यास त्या कामाविषयीं प्रार्थना-दिकेंकरून दुसऱ्यानें प्रवृत्त करणें.

रडतखडत (अव्य०) करणारास जें उत्साहादि असावें त्यावांचून मंदपणें बरोबरी कांहींएक काम होणें, क-रणें, चालणें इ० कांचें वि०.

रडारड (स्त्री. ना.) कोणी मेला, गे-ला इ० कारणानें मोठें दुःख झालें असतां अनेकांनीं रडूं लागावें असा जो व्यापार चालतो तो.

रडविणें (धा. ना.) कोणी कोणास दुःख देऊन रडेस आणणें.

रंडी (सं. रंडा) (स्त्री. ना.) वेश्या, कसबीण, दासी इ० रूप जी सामा-न्य स्त्री ती. २ रडी. ३ गंजिफांतील नादर ती. [व्यसन ज्यास आहे तो.

रंडीबाज (वि०) वेश्या इ० रंडीचें

रडूं (न. ना.) रडें.

रडूंरडूं (अव्य०) करणें याच्या यो-गें प्रयोग. कोणेका कामाविषयीं को-णेकास प्रवर्तवीत असतां त्याणें अनु-त्साहामुळें अनेक प्रकारची रड गाणें.

रडें (न. ना.) शोक, भय, दुःख, प्रेम, हर्ष इ० कारणानें अंतःकरण शिथिल होऊन डोळ्यांत अश्रु, तों-डाचें पसरणें, कंठध्वनि इ० व्हाव-याजोगा जो विकारविशेष उत्पन्न होतो तें.

रड्या (वि०) सर्वकाळ रडण्याचा स्व-भाव ज्याचा तो. २ केवळ मंद चालणारा जो बैल इ० त्यास ह्मणतात.

रण (सं. पु. न. ना.) युद्ध.

रणचत्वर (सं. न. ना.)(ग्रं०)रणांगण.

रणमोहरी (स्त्री. ना.) (ग्रं०)रणवाद्य.

रणरण (स्त्री. ना.) मध्यान्हादि सम-यीं सूर्याचे उन्हाचे संतप्ततेचा जो अतिशय, जेणेंकरून बाहेर पाहावयास-

हीं कठीण पडतें तीं. रणरण करणें म्ह० मध्यान्ह समय, ऊन, निखारे, ज्वरयुक्त शरीर इ० कांहीं स्पर्शन-दर्शनादि करण्यास अशक्य पडाया-जोगी अति संतप्तता यावणें.

रत (सं. वि०) ज्या विषयावर ज्याची प्रीति तो त्याविषयीं. २(न.ना.)मैथुन.

रतणें (धा. ना.) रमणें तृतीयार्थी.

रति (सं. स्त्री. ना.) आसक्ति. २ मैथुन. ३ कामदेवाची जी स्त्री ती.

रती (स्त्री. पु. ना.) मोत्यें, हिरे इ० वजन करण्याचें एक वजन आहे,ज्या चार गुंजा भार तीन भरतात. २ देवदशा. [तीयार्थी. २ खुराख.

रतीब (अर० पु. ना.) उकाडा तृ-

रत्तल (अर० पु. ना.) सुमीं छत्तीस किं०चाळीस रुपये भार जें वजन तें.

रत्न (सं. न. ना.) हिरा, माणिक मोतीं इ०तें. २ समुद्रमथनापासून उत्पन्न झालें तें चंद्र, अमृत, लक्ष्मी इ० चौदा पदार्थ ते प्रत्येकीं. ३ सामान्य रीतिपेक्षां विशेष गुणेंकरून विशिष्ट जो त्यास इतरापेक्षां उत्कृष्टता वर्णनीय असतां आरोपानें म्हणतात. इ०.

रत्नाकर (सं. पु. ना.) समुद्र.

रथ (सं. पु. ना.) घोड्यानीं ओढीत न्यावयाचें चक्रानीं विशिष्ट असें जें राजादिकाचें वाहन तें.

रथ्योदक (न.ना.)(ग्रं०) चिखलोदक.

रद (वि०) रद्द. २ (सं.पु.ना.) दांत.

रदन (सं. पु. ना.) (ग्रं०) दांत

रदबदल,रदबदली (अर० स्त्री.ना.) कोणिकानें आपलें इच्छित कार्याविषयीं प्रवृत्त व्हावें किं० आपले अनिष्टापासून निवृत्त व्हावें यासाठीं त्यास भीड घालण्याचा व्यापार तो.

रदी (पु. ना.) (ग्रं०) हत्ती.

रद्द (अर० वि०) निरुपयोगी झाला जो तो. [चा गारा तो.

रद्दा (पु. ना.) मातीं, शेण इ०कां-

रद्दी (रद्द)(स्त्री. ना.) रद्द झालेले जे कागद त्यांचा समुदाय तो. २ (वि०) रद्द.

रंध्र (सं. न. ना.) छिद्र.

रंध्रशलाका (सं. स्त्री. ना.) (ग्रं०) छिद्र पाडण्याचें हत्यार तें.

रपाटून (अव्य०) रगडून.

रफू (फा० पु. स्त्री. ना.) वस्त्राचें छिद्रादि बुजवायाकरितां युक्तीनें सुतें भरण्याचा एक प्रकार आहे. २ तेणेंकरून उत्पन्न होतो जो वस्त्रभाग तो. तो.

रफ़्त (अर० पु. ना.) कोणेक कर्माचा नेहमीं जो व्यासंग तो. २ कोणेक स्थळीं कोणिकाचा जावें यावें असा असतो जो परिपाठ तो.

रबी (अर० स्त्री. ना.) गहूं, शाळू इ० पश्चिम धान्य तें.

रंभा (सं. स्त्री. ना.) स्वर्गीं एक अप्सरा आहे. २ केळीचें झाड. ३ गवत काढण्याचें एक आऊत आहे.

रंभागर्भ (सं. पु. ना.) (ग्रं०) केळीचा गाभा.

रंभापुत्र (सं. पु. ना.)(ग्रं०) कापूर.

रमण (सं. न. ना.) कांहींएक विष-

याच्या ठायीं चित्ताचा रमण्याचा जो व्यापार तें. २ (पु. ना.) ज्या स्त्रीचा जो उपभोक्ता पुरुष तो तिचा.

रमणा (पु. ना.) भोवता भिंत इ०-रूप आवार करून अनेकांस दक्षिणादि द्यावयाकरितां किं० क्रीडा करायाकरितां जें रमणीय स्थळ करितात तो.

रमणी (सं. स्त्री. ना.) कांता, स्त्री.

रमणीय (सं. वि०) दर्शनादिद्वारा ज्याचे साक्षात्कारानें तेथें चित्त समाधान पावून ज्याजवर वसतें असा शोभिवंत जो जागा, मूर्ति इ० तो.

रमणें (धा. ना.) कांहीएक विषयाची गोडी लागल्यामुळें तेथें चित्तवृत्तीनें आसक्त होऊन राहणें. २ बागबगीचा, चांदणें इ० उपभोग्य जे विषय त्यांच्या भोगानें कोणेकानें चित्तवृत्तीस विनोद करीत काळ घालविणें. ३ कोणी कोणाशीं मैथुनार्थ संगत होणें.

रमतरमत (अव्य०) बागबगीचा, चांदणें, वायु इ०कांचे उपभोगद्वारा करमणूक करीत करीत जाणें, येणें, चालणें इ०कांचे वि०.

रमतेरमते (अव्य०) रमतरमत.

रमारम, रमी (स्त्री. ना.) परस्पर एकमेकांत वजा करायाचीं जमा आणि खर्च एतद्रूप कोणेक व्यवहारसंबंधीं जीं दोन प्रकरणें त्यांची बरोबरी ती.

रम्य (सं. वि०) रमणीय, सुंदर.

रय (सं. पु. ना.) वेग.

रयत (अर० स्त्री. ना.) राजा, पाटील, कमाविसदार इ० जे भूमीचे धनी त्यांचे भूमीची वसती, कृषि इ० द्वारा वहिवाट करून त्यांच्या सत्तेंत राहणारा जो लोक तो त्या राजादिकांची.

रयनी (स्त्री. ना.) (ग्रं०) रात्र.

रव (सं. पु. ना.) साधारण जो व्यक्ताव्यक्त शब्द तो. २ (स्त्री. ना.) एका पाठीमागून दुसरा, त्याचे मागून तिसरा अशे क्रमानें गमन करणारे मनुष्यादिकांची किं० उत्पन्न होणारांची सतत लागली जी ओळ ती.

रंवथ (पु. न. ना.) गाय, म्हैस इ० द्विशफ पशु एकदां सरासरी चाऊन गिळलेला चारा पुनः बारीक करायासाठीं मुखांत बाहेर आणून चवळण्याचा करितात जो व्यापार तें. तो.

रंवदळणें, दाळणें (धा. ना.) हवळणें इ० द्वारा पाणी इ०कांचे तळचा मळ वर येऊन गढूळ होई असें करणें.

रंवदळी (स्त्री. ना.) (ग्रं०) नाश, चुराडा. २ दाणादाण. ३ भांडण.

रवरव (स्त्री. ना.) शैत्यादिकानें शरीरास, किंवा अक्कलकरा, पिंपळी इ० भक्षिल्यामुळें जिव्हेस जो वेदनाविशेष उत्पन्न होतो ती. २ (पु. ना.) (ग्रं०) रौरव नरक.

रवा (पु. ना.) कणीक, तांदळाचें पीठ, इ०कांतील केवळ बारीक अंश निराळा काढिला असतां जो जाडा कणांश राहातो तो. २ गूळ, साखर इ० संबंधी कणांश तो. ३ गुळाची

टेंप किं० गूळ, साखर इ०कांचा खडा तो. ४ सोनें, रुपें इ० कांचा जो रज तो किं० अलंकारादिकांस जोडणें इ० विषयीं उद्दिष्ट जो त्याचा तुकडा तो. ५ कुंकू इ०कांसाठीं रंगविनात जें हळकुंड तो इ०.

रवानगी (फा० स्त्री. ना.) पाठवणी. २ कांहीं एक कार्याच्या उद्देशेंकरून देशांतरीं फौज किं० दारू गोळा द्रव्य, गल्ला इ० पदार्थांचें प्रेषण तें.

रवाना (फा० वि०) करणें किं० होणें याच्या योगीं प्रयोग. (अव्य०) कागद इ० पदार्थ किं० मनुष्यादि त्यांस स्थलांतरीं जावयाकरितां मार्गस्थ करणें किं० त्याणीं होणें.

रवाळ (वि०) दाणेदार जो साखर, गूळ इ० पदार्थ तो.

रवि (सं. पु. ना.) सूर्य. २ रुई ह्मणून झाड तें. ३ पहिला प्रहर तो.

रवी (स्त्री. ना.) दहीं घुसळण्याकरितां जें काष्ठाचें यंत्र करितात तें.

रशना (सं. स्त्री. ना.) कटिबंद, कंबरपट्टा.

रश्मि (सं. पु. ना.) किरण.

रस (सं. पु. ना.) जिव्हेनें ज्याचें प्रत्यक्ष होतें असा जो भक्ष्यादि पदार्थनिष्ठ खारटपणा, मधुरपणा इ० गुण तो. २ ज्याचा अंतःकरणांत संचार होऊं लागला असतां रति, उत्साह, कारुण्य, विस्मय, हास्य, भय, कंटाळा, क्रोध, हे भाव उत्पन्न होतात असे जे नायक, नायिका, वीरपुरुष इ०कांच्या हृदयांत अंतःकरणवृत्तीचे भेदक शृंगारादि भाव होतात ते प्रत्येकीं. ३ भाषणादि व्यवहारांत जी गोडी असते ती. ४ पदार्थाच्या ठायीं जो द्रवांश असतो तो. ५ सुवर्णादि धातूंना अग्निसंयोगानें द्रव होतो तो. ६ तेल, तूप, गूळ मीठ इ० जे शास्त्रकारिगणित आहेत ते प्रत्येकीं. ७ पारा. ८ गंधक. ९ पाणी. १० (वै०) औषध.

रसद (फा० स्त्री. ना.) गांवचा कमावीसदार, महालकरी इ० अधिकारी प्रजांपासून घेऊन सरकारांत भरितो जें द्रव्य तें किं० गांव इ० संबंधी मामलत इ० अधिकार पतकरून तत्संबंधी पूर्वीच जें द्रव्य सरकारांत भरितात तें. २ (सं. पु.) मेघ.

रसना (सं. स्त्री. ना.) जिव्हा.

रसभरित (सं. वि०) रसानें भरलेला जो फळ, भाषण इ० तो.

रसरसणें (धा. ना.) निखारे, अग्नि इ०कांनीं प्रखरपणें संतप्त असणें किं० ज्वर, अग्नि, सूर्याचें ऊन यांच्या योगानें शरीर, चूल, पाणी इ० अग्निवत् तापणें. २ शरीरांत तारुण्यानें भरावयास येणें.

रसरशीत (वि०) रसरसलेला जो शरीर, चूल, निखारे इ० पदार्थ तो.

रसवंती (स्त्री. ना.) एक ओषधि आहे. २ भाषणाच्याठायीं जी गोडी तीनें लक्षून कुतेनें वाग्देवीयास ह्मणतात.

रसविक्रय (सं. पु. ना.) तेल, तूप इ० रसांचा जो विक्रय तो.

**रसवृत्ति** (सं. स्त्री. ना.) (ग्रं०) रसिक भाषण.

**रससोय** (स्त्री. ना. ) (ग्रं०) पाक. २ पाकक्रिया. ३ नैवेद्य.

**रसज्ञ** (सं. वि०) पदार्थमात्राच्या ठायीं जो रस त्याचें मर्म जाणणारा तो.

**रसा** ( सं. स्त्री. ना. )(ग्रं० ) पृथ्वी. २ (प्रा. पु.) भुरका मारून खावयाजोगा सारासारिखा पदार्थ करितात तो.

**रसातल, तळ** (सं. न. ना.) सप्तपाताळांतील एक आहे. कोणेक व्यवहारादि रसातळास नेणें, जाणें म्ह० निःशेष होईं असा बुडाला जाणें. पोट रसातळास जाणें म्ह० क्षुधेनें पाठीशीं लागणें. [सवृत्ति.

**रसातिशय** (सं. पु. ना.) (ग्रं०) र-

**रसाधिपति** (सं. पु. ना.) वरूण.

**रसायन** (सं. न. ना.) पारा, गंधक इ०कांचा रांधा करून जें मात्रादि निर्मितात तें.

**रसाळ** (वि०) ज्यामध्यें रस पुष्कळ आहे असा जो फल इ० पदार्थ तो. २ वरका जो फणस तो.

**रसिक** (सं. वि०) गायन, काव्य इ० रसावर प्रीति विशेष असून त्यांतील मर्म जाणतो तो. २ थट्टा, मस्करी, गोड भाषण इ० द्वारा दुसऱ्याचें आणि आपले अंतःकरणवृत्तीस ज्या प्रकारें विनोद होईं त्या प्रकारें वर्तण्याचा ज्याचा स्वभाव तो.

**रस्ता** (फा० पु. ना ) मार्ग.

**रहणी** (स्त्री. ना.) (ग्रं०) रीत.

**रहदारी** (फा० स्त्री. ना.) कोणेकाच्या घरीं किं० मार्गादिकांच्या ठायीं येण्याजाण्याची जी वहिवाट चालली असते ती. [श्रेष्ठ जो रथ तो.

**रहंवर** (सं. रथवर)( पु. ना.) (ग्रं०)

**रहस्य** (सं. न. ना.) इष्टाहून इतरांस समजूं द्यावयाची नव्हे अशी जी गुप्त गोष्ट तें. २ परस्पराचा जो परम सख्यभाव तें. ३ थट्टा, मस्करी इ० रूप आनंदानें जी क्रीडा ते किं० वाक्यादिकांतील जो तात्पर्यांश तें.

**रहा** (फा० स्त्री. ना.) रीत.

**रहाट** ( पु. ना.) ज्याचे परिभ्रमणानें कूपादिकांतून जल इ० निघतें, सुतास पीळ पडतो, दोऱ्या वळल्या जातात इ० अनेक कार्यें होतात अशीं जीं चक्राकार त्या त्या सोईचीं काष्ठादिकांचीं यंत्रें केलीं असतात तीं प्रत्येकीं.

**रहाटगाडगें** (न. ना.) ज्याला लोटे बांधलेली माळ लावलेली असत्ये असा जो पाणी काढायाचा रहाट तें. ३ ज्यामध्यें एक वेळ बरें व्हावें, एक वेळ वाईट व्हावें अशी परंपरा चालली असत्ये असा जो हा जन्ममरणरूप प्रपंच, सावकारी इ० व्यवहार त्यास म्हणतात.

**रहाटणें** (धा. ना.) कोणेक कामांत कोणेक बहुत दिवस पडल्यामुळें अभ्यस्त होणें. २ (ग्रं०) वागणें, फिरणें.

**रहाटी** (स्त्री. ना.) आंबे इ०कांची निबिड राई असत्ये ती. २ पायरहाट. ३ पूर्वीपासून चालत आला

जो कोणेक गोष्टीविषयीं प्रधान तें.

**रहाण** ( न. ना. ) एकाद्याचे अंगीं पिशाच खेळवायासाठीं अनेक देवांचे भक्त्यें मिळून जो वाद्यादि समारंभ करीत असतात तें; घालणें, माजविणें इ०कांच्या योगीं प्रयोग. २ कोणी मरून लागला किं० कोणी मेला इ० निमित्तानें अनेक मनुष्य मिळून रडूं ओरडूं लागल्यामुळें जो एकच घोळ होतो तें.

**रहिवास** ( पु. ना.) वसतीं.

**रळी** ( स्त्री. ना.) ज्यापाशीं आपला लडिवाळपणा चालतो त्यापाशीं हें अमुक मला पाहिजेच, अमुक मला करून द्या इ० कोणेक गोष्टीविषयीं लडिवाळपणानें धरितात जो आग्रह तो. २ (ग्रं०) वक्रउक्ति इ०कें करून जी थट्टा किं० विनोद तो.

**रक्षण** (सं. न. ना.) कोणेक अर्थाचा नाश, अपहार इ० दुष्ट परिणाम न होऊं देतां यथास्थितपणें राही असें करण्याचा जो व्यापार तें, किं० तेणेंकरून त्या अर्थाचा नाशादि दुष्ट परिणाम न होतां यथास्थितपणें होत्ये जी स्थिति तें. २ रक्ष्य पदार्थास रक्षण कर्ता जो मनुष्यादि तें.

**रक्षा** (सं. स्त्री. ना.) रक्षणप्रथमार्थी. २ हातांत बांधितात जी राखी ती. ३ राख.

**राई** (सं. राजिका) (स्त्री. ना.) मोहरी म्हणून जें बीज ती. २ (सं.राजि) आंबे इ० झाडांचा जो निबिड समुदाय ती. [इ० स्वामी तो.

**राउळ** ( पु. ना.) (ग्रं०) देव, गुरु

**राऊत** (पु. ना.) स्वार. २ (ग्रं०) अपानवायूस विनोदानें म्हणतात.

**राऊळ** (न. ना.) राजाचें किं० देवाचें जें गृह तें.

**रांकट** (वि०) शरीरानें बळकट असून नाजूकपणा किं० काहींएक कार्याविषयीं बारीक युक्ति इ० गुण ज्याचे अंगीं नाहींत असा जो तो. २ घात पात होईल इ० विचार न करितां अंगधटाईनें कोणेक कामांत प्रवर्तण्याचा स्वभाव ज्याचा असा जो मनुष्यादि तो किं० त्याचें शरीर तें.

**राख** (सं रक्षा) ( स्त्री. ना. ) रक्षा. २ वस्तुतः सामान्या असतां आपण एकल्यानेंच उपभोगावी म्हणून कोणेकानें बाळगिली असत्ये जी वेश्यादिरूप स्त्री ती.

**राखण** (स्त्री. न. ना.) रखवाली. २ रक्षण द्वितीयार्थी. ३ मनुष्यादिकांस जो पिशाचादि उपद्रव किं० शेत इ०कांस मूषकादि उपद्रव त्याचा मंत्र, तंत्र, मानता इ० उपायानें करितात जो बंदोबस्त ती; लावणें, लागणें या धातूंच्या योगीं प्रयोग. कोणेक गोष्टीची राखण लावणें म्हणजे त्या गोष्टीपासून आपणास उपद्रव न बाधे असा बंदोबस्त होणें. ४ गुरें, वृक्ष इ०कांचे रक्षणार्थ ठेविला जो गुराखी इ० त्यास रक्षणनिमित्त जें द्रव्य द्यावें लागतें ती.

**राखणें** (धा. ना.) रक्षणें. २ क्रमादि अनुरोधानें ज्या अर्थावर काहीं क्रियादि होण्याचा प्रसंग प्राप्त झाला असतो तो अर्थ त्या क्रियादि न हो-

ऊं देतो तसाच्या तसाच ठेवणें. ३स्त्री- नें पुरुषास किं० पुरुषानें स्त्रीस उपभोगार्थ स्वीयत्वेंकरून ठेवणें. हुंडीपत्रामध्यें अमुकापासून रुपये घेतले याअर्थीं राखलें एतच्छब्दपूर्वक त्याचें नांव लिहावें अशी चाल आहे.

राखरांगोळी (स्त्री. ना.) देश, गांव, घर, मनुष्य, शरीर इ०कांची जळून खाक होई अशी जी अवस्था होते ती.

राखुंडा (पु. ना.) राखेचा जो ढीग तो. २ (वि०) जन्मत: ज्याचा ओंठ विदीर्ण झालेला असतो असा जो मनुष्यादि तो.

राखुंडी (स्त्री. ना.) गोवरीचा निखारा विझविला असतां जो काळा अंगारा होतो तो. २ गोंवरी निःशेष जळून होतो जो राखेचा ढेपसा त्यास दांत घासण्याची विवक्षा असतां क्वचित् म्हणतात. ३ भात भाजी इ० करपून काळीं झालीं असतां त्यांस म्हणतात.

राग (सं. पु. ना.) अनेक वर्ण पूर्वापरक्रमानें एकत्र जुळले असतां जसे अनेक प्रकारचे अनेक शब्द होतात त्याप्रमाणें षड्ज आदिकरून स्वरांची जुळणी केल्यानें जे गावयास योग्य अनेक रचनाविशेष होतात ते प्रत्येकीं. २ अनुराग किं० प्रीति. ३ (ग्रा०) क्रोध.

रांग (स्त्री. ना.) अनेक पदार्थ एकापुढें एक, एकापुढें एक असे लागत गेले असतां होत्ये जी ओळ ती.

रागदारी (स्त्री. ना.) (ग्रं०) घोड्यास चाल शिकविण्याचा प्रकार तो.

रागमाला, ळा, मालिका, ळिका (सं. स्त्री.) अनुक्रमानें थोडे थोडे रागाचे अंश घेऊन बांधिला असतो जो गीतविशेष तो. २ किल्ली दिली म्ह० अनेक रागांचे स्वर निघतात असें एक यंत्र असतें तें.

रागरंग (पु. ना.) पुढें होणार किं० मागें झालेली किं० देशांतरस्थ इ०रूप अप्रत्यक्ष जी कोणेक गोष्ट तिचें त्या त्या लक्षणावरून ही गोष्ट या या प्रकारें होईल किं० असें केलें असतां असें होईल इ०रूप अनुमित होतें जें बरें वाईट स्वरूप तें. २(ग्रं०)गायनादिरूप जो आनंद तो.

रागावणें (धा. ना. क्रोधावणें.

रागी (सं. वि०) आसक्त. २ (पु.ना.) (ग्रं०) क्रोध.

रागीट (वि०) कोपिष्ट. [विषयत्याग.

रागसांड, सांडी (स्त्री. ना.) (ग्रं०)

रागेचें (वि०) (ग्रं०) आवडीचें.

रांगोळी (रंग, ओळ) (स्त्री. ना.) शिरगोळा इ० कुटून चित्रादि काढायाकरितां जी पूड करितात ती किं० त्यासाठीं करितात तुसाची राख ती. २ त्यानें काढिलें चित्र, वेल इ० तें.

रांगोळें (न. ना.)भात रांगोळी भरून भर्मावरून ओढिलें असतां अनेक चित्र विचित्र आकार उमटतात असें तांबें इ० धातूंचें नलिकारूप यंत्र करितात तें.

राघ (सं. न. ना.) मोठें पाप.

**राखावळी** (स्त्री. ना.) घोड्याचे पाठीवरील जाळीदार झालर.

**राजअंबीर** (पु. ना.) गंभीर स्वभावाचा सभ्य जो नायक त्यास शृंगारांत म्हणतात.

**राजकारण** (न. ना.) दरबारीं प्रवेश व्हावा, परराज्यादि आपलेंसें करावें इ० कार्यसिद्धीसाठीं गुप्तपणें अनेक युक्तींनीं बांधितात जी मोठी मसलत तें. २ कोणेक गोष्टीचें प्रयोजक गुप्त असतें जें निमित्त त्यास म्हणतात.

**राजकीय** (स. वि०) राजसंबंधी जो व्यवहार, कारभार, मनुष्य इ० तो.

**राजक्रांति** ( सं. स्त्री. ना. ) परस्पर राजादिकांचा कलह लागल्यामुळें प्रजांस उपद्रव व्हायाजोगा होतो जो राज्यांत दगा ती.

**राजधानी** (सं. स्त्री. ना.) राजा जेथें नांदत असतो असें नगर ती.

**राजनीति** (सं. स्त्री. ना.) राजादिकांनीं राज्यादि व्यवहारीं या या प्रकारें वर्तावें असा जो शास्त्रकर्त्यांनीं लोकव्यवहारमार्ग सांगितला आहे ती.

**राजबिंडा** ( पु. ना.) शरीरान अति शयित सुंदर असून नाजुक जो पुरुष त्यास स्तुतीनें म्हणतात.

**राजमार्ग** (सं. पु. ना ) अनेक लोक, घोडे, गाड्या इ० ज्या मार्गानें जात असतात असा जो मोठा मार्ग तो. २ सर्व लोक प्रशस्तपणें ज्या रीतीनें चालत असतात अशी जी रीत ती.

**राजमुद्रा** ( सं. स्त्री. ना. ) शिक्का, मोर्तब इ० जें राजचिन्ह तें.

**राजयोग** (सं. पु. ना.) हटानें प्राणनिरोधादि न करितां भगवत्स्वरूपीं अंतःकरण एकाग्र करून लावण्याचा एक उपाय आहे तो. २ उपजल्या प्राण्यानें राजा व्हावें असा जन्मकाळीं ग्रहयोग पडला असतो तो.

**राजरोस** (अव्य० ) लपून छपून चोरून नव्हे असें उघडपणीं.

**राजवैद्य** (सं. पु. ना. ) वैद्यशास्त्रज्ञ, यथायोग्य उपचार प्रत्युपचार जाणणारा जो उत्तम वैद्य तो.

**राजस** (वि०) (ग्रं०) सुकुमार असून जो सुंदर पुरुषादिक तो. २ शृंगारिक नायक.

**राजहंस** (सं. पु. ना.) चोंच आणि पाय हे ज्याचे तांबडे आणि वर्ण पांढरा असा पक्षी, जो दूध आणि पाणी एकत्र असलेलें त्यांतून दूधच निवडून पितो तो. २ लावण्यामध्यें नायकास म्हणतात.

**राजा** (सं. पु. ना.) प्रजांपासून करभार घेऊन त्यांचें पालन करितो असा जो पृथ्वीपति तो. २ ज्या समुदायाचा आज्ञा करणारा जो नायक तो त्या समुदायाचा. ३ सजातीय पदार्थसमुदायांत श्रेष्ठत्वेंकरून जो विवक्षित तो. ४ अन्न, वस्त्र, स्थल इ० पदार्थांविषयीं यथास्थित सोय आहे त्यासाठीं कष्ट, काळजी ज्याला करावी लागत नाहीं असा जो कोणी त्यास म्हणतात. ५ अमुक केलें असतां आपला कांहीं तोटा होईल, घात होईल, इ० विचार ज्याला स-

मजत नाहीं त्यास म्हणतात. [बाग.

**राजागर** (न. ना.) (ग्रं०) राजाचा

**राजाधिराज** ( सं. पु. ना. ) अनेक मांडलिक राजांवर जो एक मुख्य राजा असतो तो.

**राजी** (अर० वि०) कांहींएक करणें, देणें, घेणें इ० विषयीं अंतःकरणापासून कबूल झाला जो तो.

**राजीनामा** (फा० पु. ना.) तुझी सांगाल तसें वर्तायास किं० कोणेक गोष्ट करायास मी राजी आहें असा जो लेख कोणी कोणास करून देतात तो. २ सरकार इ०कांचे चाकरींत असलेला मनुष्य मी चाकरी आपल्या संतोषानें सोडतों अशा प्रकरणीं लेख देतो तो. [रजावंतीनें.

**राजीरजावंतीनें, वंदीनें** ( अव्य० )

**राजीव** (सं. न. ना.) कमळ.

**राज्य** (सं. न. ना.) प्रजांपासून कर घेऊन त्यांचें पालन करावें असा जो राजाचा अधिकार किं० कर्म तें किं० तें करण्याचा जो प्रकार तें. २ एकेका राज्याचे सत्तेखालचे जे जे देश ते प्रत्येकीं. इ०.

**राज्याभिषेक** (सं. पु. ना.) राजास राज्यपदीं बसवितेवेळेस महानद्या, समुद्र इ०कांचे पाण्यानें अमात्य पुरोहितादि मिळून विधिपूर्वक त्याजवर करितात जो अभिषेक तो.

**राँठ** (वि०) ज्याचे अंगीं नाजूकपणा किं० मंजूळपणा नाहीं असा जो मनुष्य, शब्द इ० तो.

**राड** (स्त्री. ना.) आंत पाणी घालून चिखल करून खेळायाकरितां शिमग्यांत मोठी खळी खणतात ती. २ मार्ग, किं० गृहादिकांची भूमि यांवर पाणी इ० पडल्यामुळें तेथें चिखल व्हावा अशी होये जी दुर्दशा ती. ३ (ग्रं०) धगधगीत निखाऱ्यांनीं युक्त जी भूमि, खळी इ० ती.

**रांड** (स्त्री. ना.) रंडा. २ दासी. ३ मैथुनवृत्तीनें उपजीविका करणारी स्त्री ती. ४ निंदा किं० दुर्बळता वर्णनप्रसंगीं स्त्रीमात्रास ह्मणतात. ५ ईर्ष्याशून्य नामर्द जो मनुष्य त्यास आरोपानें ह्मणतात. इ०.

**रांडपोर** (न. ना.) ग्रामादिकांतील स्त्रिया, पोरें, इ० यच्चयावत् मनुष्यसमुदाय तें. २ कोणेकाचे पदरीं बायको मुलें इ० जें खटलें असतें तें.

**रांडमाणूस** (वि०) दुर्बलत्व वर्णनप्रसंगीं स्त्रीमात्रास ह्मणतात.

**रांडमुंड** (स्त्री. ना.) रंडकी मुंडकी.

**रांडवडा** ( पु. ना.) गृहादिकांत सत्ताधारी पुरुष नाहींसा झाल्यामुळें होतें जें स्त्रियांचें प्राधान्य तो. २ (ग्रं०) तोडातोडी.

**राडा** ( पु. ना.) संसारादिकांसंबंधी निर्वाह्य जीं अनेक कामें त्यांचा पडला असता जो पसारा तो.

**रांडपोरें** (न. ना.) घर, गांव, देश यांतील मुख्य व्यवहारकर्ते जे पुरुष त्याहून इतर जीं बायका, मुलें इ० सर्व माणसें तीं. [२ मारामारी.

**रांडोळी** (स्त्री. ना.) ( ग्रं० ) थट्टा.

**रांड्या** (वि०) रांडबाज. २ बाइलवुल्या.

३ जनानी जो मनुष्य तो. ४रांड्या-राघोबा.

रांड्याराघोबा (पु. ना.) सर्वकाळ स्त्रियांशीं गोष्टी सांगाव्या, त्यांचीं कामें ऐकावीं, त्यांचे मागून फिरावें असा स्वभावाचा जो मनुष्य त्यास म्हणतात. [नमाला.

राणवटीमाळ (स्त्री. ना.) (ग्रं०) व-

राणसोर, सोरू (पु. ना.) (ग्रं०) रानडुकर.

राणा (पु. ना.) (ग्रं०) राजा.

राणी (स्त्री. ना.) राजाची स्त्री ती.

राणिव (स्त्री. ना.) (ग्रं०) राज्य. २ राज्यसुख.

राणिवसा (पु. ना.)(ग्रं०) अंतःपुर.

रात (स्त्री. ना.) रात्र.

रातणें (धा. ना.) (ग्रं०) रतणें.

रातबिरात (स्त्री. ना.) गमन इ० कोणेक कर्माविषयीं कदाचित् प्राप्त होईल असा जो संभावित रात्र इ० लाहान मोठा विषम समय तो. २ (अव्य०) त्या विषम समयाच्या ठायीं.

रातांधळें (न. ना.) रात्रीं दिसूं नये असा जो मनुष्यादिकांस नेत्ररोग होतो तें.

रातावणें (धा. ना.) रात्र होणें.

राती (स्त्री. ना.) (ग्रं०) रात्र.

रातोरात (अव्य०) दिवसाची अपेक्षा न धरितां घाईनें रात्रीच्या ठायींच; जाणें, येणें, कांहीं काम करणें इ०-कांचें वि०.

रात्र (स्त्री. ना.) रात्रि. रात्र ओरडणें म्ह० राळ म्हणून क्षुद्रजंतु आहे तो रात्रीं एकसारखा वाजंत्र्याच्या सुरासारखा शब्द करित असतो त्या शब्दानें युक्त रात्रीनें होणें.

रात्रंदिवस, दीस (अव्य०) रात्र आणि दिवस यांत खंड न होतां, सर्वदा.

रात्रि (सं. स्त्री. ना.) सूर्यास्तापासून सूर्योदयपर्यंत जो काळ तो.

रात्रिचर, रात्रिंचर (सं पु. ना.) राक्षस.

रात्रौ (अव्य०) रात्रीच्या ठायीं.

रांधणें (धा. ना.) तांदुळ, भाजी इ० पदार्थ शिजवणें. २ (न. ना.)(ग्रं०) पोह्यांचें भात, लाह्यांचे जोंधळे इ० भाजायाचें खापर इ० तें किं० भात, भाजी इ० शिजविण्याचें पात्र तें.

रांधा (पु. ना.) औषध, रंग इ० कांसाठीं जो गंधक इ० कांचा पाक करितात तो किं० ती क्रिया तो.

रांधियेउणें (वि०)(ग्रं०) पुरतें शिजलें किं० शिजविलें नव्हे तें.

रान (न. ना.) अरण्य. २ भाजी, पाला, इ० जे मनुष्यास उपभोग्य पदार्थ त्याहून इतर जे तृणादिक ते प्रत्येकीं किं० त्यांचा समुदाय तें. ३ कोणेकस्थळीं एकजातीय वृक्षादिकांचा निबिडपणें स्थित जो समुदाय तें. ४ फार मोठी वाढली जी हजामत तीस म्हणतात. रान खवळणें म्ह० कोणेकानें क्रोधाद्यावेशानें कावरेबावरें होणें. रानात शिरणें, रानघेणें, म्ह० कोणेकानें नटि बो-

लण्याचा मार्ग सोडून भडरानांत शिरणें. इ०. [दि तो.

रानटी (वि०) रानसंबंधी जो पदार्थ-

रानभरी (अव्य०) होणें याच्या योगीं प्रयोग. गाय, बैल इ०कांनीं मागील वत्सादिकांचा ओढा न बाळगतां रानोरान फिरूं लागणें किं० मनुष्यानें बापकों, घरें इ० सोडून कोणेक छंदानें भडकत फिरणें. २ कोणेकानें भयादि कारणामुळें कांहीं सुचेनासें होई असें घाबरें होणें. [विशेष.

रानशकट (पु० ना.)(ग्रं०) वनपशु-

रानिवसें (वि०)(ग्रं०) थोडकें.

रानोमाळ (अव्य०) गृहादिक जें राहायाचें स्थळ तें सोडून चोहोंकडे.

रांपणें (धा. ना.) फळादि चिरून, फोडून कांहीं काळ ठेविलें असतां लोहादि संबंध झाल्यामुळें त्याणें रापानें विशिष्ट होणें. २ रायतें, लोणचें इ० पदार्थांत घातलेलें जें मीठ, मोहरी, मसाला इ० तो आंत पुरता भिने अशा दशेनें विशिष्ट होणें.

राब (स्त्री. ना.) काकवीपेक्षां कांहीं दाट उंसाचे रसाचा जो रांधा करितात तो. २ (पु. ना.) कोणेक कर्मानें किं० गृहादि स्थळीं मनुष्यादिकांचें जाणें, येणें इ० क्रियाद्वारा जो चालला असतो वर्तनव्यापार तो. ३ शेताची रावणूक तो.

राबडी (स्त्री. ना.) आटींव दुधांत साकर इ० घालून एक भक्ष्य पदार्थ करितात तो.

राबणें (धा. ना.) कोणेक मार्गानें किं० कोणेकस्थळीं जाणें, येणें इ० क्रियाद्वारा मनुष्यादिकांनीं वर्तणें. २ शेत इ० कामावर शारीर कष्टद्वारा खपणें. इ०.

राबता (पु. ना.) मार्ग, गृह इ०कांचे ठायीं मनुष्यादिकांचें जाणें, येणें, बसणें, उठणें, इ० जो वहिवाट चालत असल्ये तो. [२ अविचार.

राभस्य (न. ना.) (ग्रं०) विषयसुख.

रामपहारा (पु. ना.) दिवसाचा जो प्रथम प्रहर त्यास शपथ घेणें इ० विषयीं म्हणतात.

रामबाण (पु. ना.) प्रतिज्ञावचन इ० कधीं टळायाचें नाहीं असें वर्णन कर्तव्य असतां आरोपानें म्हणतात.

रामरट्टा (पु. ना.) बुक्की, सोटा इ० कांचा जो मोठा तडाखा तो. २ प्रयोजनादिकांचा जो मोठा रगडा तो.

रामरक्षा (सं. स्त्री. ना.) रामाचें एक स्तोत्र आहे. २ तिणेंकरून अभिमंत्रित केलेलें भस्म त्यास म्हणतात. ३ लाह्यांचे पिठास निंदेनें म्हणतात.

रामराज्य (सं. न. ना.) ज्या राज्यांत राजादिकृत उपद्रव नाहींत आणि सुखानें प्रजा नांदतात असें जें राज्य त. कोणेकानें रामराज्य करणें म्ह० भयकारण नाहींसें झाल्यामुळें निर्भयपणें वर्तणें.

रामराम (पु. ना.) शूद्रादिक दुसऱ्यास सत्कारार्थ एके हातानें हा शब्द उच्चारून जें वंदन करितात तो.

रामरामी (स्त्री. ना.) परस्परांचा रा-

मराम करण्याचा जो व्यापार तो. २ परस्परें भेटले असतां एकमेकांस रामराम करावा इतकी असल्ये जी ओळख ती.

रामा (सं. स्त्री. ना.) सुंदर स्त्री ती.

रायवणी (न. ना.) (ग्रं०) मोहोर्‍याचें पाणी.

रायवळ (वि०) साया, शिसव, खैर, फणस या वृक्षांवांचून घर इ०कांचे उपयोगीं इतर वृक्षांचीं जीं लांकडें तीं.

रायविनोद (पु. ना.) (ग्रं०) बहुरूपी.

राव (पु. ना.) (ग्रं०) राजा. २ कारकुनी किं० शिपाईगिरी या गुणानें प्रसिद्ध जे पुरूष त्यांचे नामा पुढें हें प्राय: प्रतिष्ठानाम लागत असतें.

रावटी (स्त्री. ना.) लाहान तंबू.

राविणें (धा. ना.) (ग्रं०) रंगाविणें.

राशि (सं. पु. ना.) नक्षत्रचक्राचे मेषादिक जे बारा भाग ते प्रत्येकीं. २ धान्यादिकांचा ढीग तो. ३ गुणाकार इ० करण्याविषयीं इष्ट संख्याबोधक मांडिला जो अंक तो. राशीस लागणें, बसणें म्ह० कोणेकाच्या पाठीस हात धुऊन लागणें.

राष्ट्र (सं. न. ना.) राज्यभेदानें किं० कोंकण, मध्यदेश इ० संज्ञाभेदानें भिन्न भिन्न जे देश ते प्रत्येकीं किं० विवक्षित सीमेनें परिछिन्न जो भूविभाग तें. २ कोणेक स्थळीं जमलेला जो सैन्यादि संघात तें.

रास (स्त्री. ना.) राशि प्र० द्वि०. २ चांगला आणि वाईट अशा विभागाची निवड न करितां सरसकट जो कोणेक पदार्थांचा ढीग तो. ३ (सं. पु. ना.) एका पुरुषानें अनेक स्त्रियांसहवर्त्तमान करायाची एक शृंगारक्रीडा आहे.

रासभ (स. पु. ना.) गाढव.

रासभी (सं. स्त्री. ना.) गाढव जातीची स्त्री ती.

रासमाथा (अव्य०) शेताची मळणी काढून रास सिद्ध झाल्यानंतर सावकार इ०कांचे रुपये देणें, वारणें, घेणें, इ०कांचें वि०.

रासवट (वि०) केवळ निवडक चांगला असा नव्हे आणि केवळ निकृष्ट नव्हे असा मध्यम प्रतीचा पदार्थ तो.

रास्त (फा० वि०) न्यायास अनुसरून जें भाषण, कृति, व्यवहार इ० तो किं० प्रामाणिक जें वजन, माप इ० परिमाण तो.

राहणें (धा. ना.) मनुष्यादि अर्थानें कोणेक अधिकरण आपल्या स्थितीनें आक्रमून त्याच्या ठायीं स्थिर होणें. २ पात्रादिकांत कोणेक पदार्थानें समाविष्ट होणें. ३ सतत चाललेलें जें कांहीं एक त्याणें बंद होणें. कपाळ राहणें, पोट राहणें म्ह० त्यांतील वेदना राहिली. ४ उरणें. हात, पाय रहाणें इ० स्थळीं तें तें इंद्रियादि स्वव्यापारीं असमर्थ होणें. शक्ति राहणें म्ह० क्षीण होणें. अन्न राहणें म्ह० जाईनासें होणें इ०.

राहाटणें (धा. ना.) (ग्रं०) आचरणें, वर्तणें.

राहूनराहून ( अव्य० ) एकसारखा सतत नव्हे, मध्यें कुंठित होत होत, कोणेक क्रियेचें करणें, होणें इ० काचें वि०.

राळ (सं. राल) (स्त्री. ना.) डिंकासारखा एक औषधि पदार्थ आहे, जो अग्निसंयोगानें फारच त्वरित पेटतो तो. २ एक क्षुद्र प्राणी आहे, जो रात्रीस फिरे असा सतत ओरडत असतो तो. ३ फटफजीती.

राक्षस (सं. पु. ना.) देव, मनुष्य यांची स्पर्धा करणारा, तामस उग्र स्वभावाचा एक देवयोनीत भेद आहे तो. २ क्रूर, भयंकर, साहसिक, फार खाणारा असा जो मनुष्यादि त्यास आरोपानें म्हणतात.

राक्षसवेळ, ळा (स्त्री. ना.) केवळ तीनसांजाची जी वेळ तीस म्हणतात.

रेकामचोट (पु. ना.) निरुद्योगी मनुष्यादिकास निंदेनें म्हणतात.

रेकामपण (न. ना.) एका कार्याखालीं न गुंतल्यामुळें दुसऱ्या कार्यास लागण्यास जो अवकाश असतो तें.

रेकामा (सं. रिक्त) (वि०) कोणेक कार्यावर गुंतलेला नव्हे अतएव अन्य कार्यास लागण्याविषयीं मोकळा तो. २ कोणेक पदार्थाच्या योगानें भरलेलें नव्हे ह्मणून दुसरा पदार्थ आंत भरण्यास उचित असें जें पात्र, स्थळ, वाहन, काळ इ० तो. ३ ज्या कार्यास प्रवृत्त व्हावयाचें त्यास साधनभूत जो द्रव्यादि पदार्थ तद्रहित जो मनुष्य तो. ४ ज्याचें कारण नाहीं किं० ज्यांत फळ नाहीं असा जो भाषणादि व्यापार, खर्च वेच इ० तो. इ०.

रिकीबी (अर० स्त्री. ना.) घोडा इ०कांवर बसलें असतां पाय अडकावयासाठीं लोखंड इ०कांचीं आकारविशेषाचीं दोन वलयें दोहींकडे बांधित असतात तीं प्रत्येकीं.

रिक्त (सं. वि०) रिता. [निघणें.

रिगनीग (स्त्री. ना.) (ग्रं०) रिघणें,

रिगु, गू (पु. ना.) (ग्रं०) रिघाव.

रिघणें (धा. ना.) (ग्रं०) मनुष्यादिकांचीं दाटी इ० कारणामुळें अडचणीची जी जागा तिमध्यें कोणेक पदार्थानें बळानें अवकाश करून प्रविष्ट होणें. २ सुरण, कांदे, रताळें इ०कांनीं भूमीमध्यें विस्तरून वृद्धिगत होणें. [किं० येजा.

रिघनीघ (स्त्री. ना.) (ग्रं०) जाये

रिघाव (पु. ना.) प्रवेश.

रिचवणें (धा. ना.) धान्य, पाणी इ० कांनीं भरलेलें जें पात्र तें तें धान्यादिक दुसरे पात्रांत ओतून रिकामें करणें.

रिझणें (धा. ना.) कोणेक विषय मनास आल्यामुळें त्याविषयीं हा घ्यावा, भोगावा इ० रूप जो अंतःकरणांत भाव होतो तद्विशिष्ट कोणेकानें होणें.

रिता (वि०) रिकामादि०. २ (ग्रं०) ज्या अर्थानें रहित जो आधिकरणरूप पदार्थ तो त्या अर्थानें. [२ रिक्त.

रितेंसोप (वि०) (ग्रं०) निरर्थक.

रिपरिप (स्त्री. ना.) पिरपिर.

रिपु (सं. पु. ना.) शत्रु.

**रिसाला** (अर० पु. ना.) घोडेस्वाराचा समुदाय तो.

**रिसीव** (वि०) (ग्रं०) श्रेष्ठ.

**रीग, रीघ** (स्त्री. पु.ना.) रिघाव. २ रिघाव होण्याजोगा जें अवकाश तो-ती.

**रीझ** (स्त्री. ना.) कोणेक विषयावर जी अंतःकरणाची सादरता ती. २ आनंद.

**रीत** (स्त्री. ना.) रीति.

**रीतभात** (स्त्री. ना.) रीत इ० ती.

**रीति** (सं. स्त्री. ना.) बोलणें, चालणें इ० व्यापार करायाचे जे देशभेद, कर्तृभेदादि निरनिराळे अनेक प्रकार ते प्रत्येकीं २ प्रकारभेदेंकरून भिन्न भिन्न जे वर्तनप्रकार ते प्रत्येकीं.

**रीस** (न. ना.) आंवल.

**रुकार** (पु. ना.) काहींएक करण्याविषयीं कोणेकाचे अनुमनाचा बोधक जो त्याचे मुखानें हूं, कर, होय, बरें आदि इ०रूप जो शब्द निघतो तो; याचें मुख्यत्वेंकरून तात्पर्य अनुमनावर आहे, ह्मणून मानेनें, हातानें जरी अनुमताविषयीं संज्ञा केली तरीही त्यास म्हणतात. २जमाखर्चाचीं अनेक कलमें किं० मनुष्यादिकाचीं नांवें इ० जीं क्रमानें लिहिलीं असतात त्यास रुजुवात इ० घालणें असतां ज्या ज्या स्थानीं रुजुवात झाली त्या त्या स्थानीं तद्बोधक जें रु असें अक्षररूप चिन्ह करितात तो.

**रुख** (पु. ना.) (ग्रं०) वृक्ष.

**रुखसत** (अर० स्त्री. ना.) रजा.

**रुंगें** (न. ना.) (ग्रं०) रुपें.

**रुग्ण** (सं. वि०) रोगी.

**रुचणें** (धा.ना.) काहींएक पदार्थ किं० गोष्ट आवडणें. २ कोणेक गोष्ट यथायोग्य झाल्यामुळें शोभणें. ३ रुतणें.

**रुचि** (सं. स्त्री. ना.) पदार्थनिष्ठ जी गोडी ती. २ रसनेंद्रियास असत्ये जी चव ती. ३ कोणेक पदार्थ, कर्म इ०कांवर जी आवड ती. ४ कांति.

**रुचिक** (पु.ना.) रुईचा जो चीक तो.

**रुचिकर** (सं. वि०) ज्याचे भक्षणानें रसनेस आलेली अरुचि जाये असा जो आंवळा, महाळुंग, सैंधव इ० पदार्थ तो किं० भक्षिला असतां चांगला लागतो असा जो मधुराम्ल इ० पदार्थ तो.

**रुचिर** (सं. वि०) सुंदर.

**रुची** (स्त्री. ना.) रुचि.

**रुजणें** (धा. ना.) धान्य, कंद इ० रूप जें बीज त्याणें अंकुरविशिष्ट होणें.

**रुजामा** (पु. ना.) बैठकीच्या उपयोगीं पोटीं रू घालून शिऊन मोठें वस्त्र जें करितात तो.

**रुंजी** (स्त्री. ना.) (ग्रं०) गुंजारव.

**रुजुमुकाबला** (अर० पु. ना.) उभयतांचे भाषणाचा खरेखोटेपणा किं० उभय पदार्थांचा चांगलेपणा, वाईटपणा इ० समजावें म्हणून ताडून पाहायाकरितां त्याचें करितात जें सन्मुखपणें संनिधान तो.

**रुजुवात** (अर० स्त्री. ना.) विवादविषय किं० संशयविषय जो परस्परांचें देणें, घेणें इ०रूप काहीं अर्थ, त्याच्या निर्णयासाठीं त्या परस्परांचें

तद्विषयीं साक्षात् संभाषण व्हावया-जोगी जी त्यांची समक्षता ती. २ कोणिक कागदपत्राच्या लेखाचा खरेखोटेपणा इ० पाहावयासाठीं लेखातराशीं ताडून पाहावें म्हणून त्या त्या लेखाची करितात जी समक्षता ती.

रुजू (अर० वि०) कोणिक काम करण्याविषयीं ज्याकडून अनमान नाहीं असा जो तो. २ चाकरी इ० कामावर जो हजीर तो. इ०.

रुझणें (धा. ना.) रुजणें.

रुटुखुटु (अव्य०) केवळ झपाट्यानें नव्हे, केवळ अगदीं स्तब्ध होऊन राहिलें नव्हे अशा प्रकारें सरासरी मंदपणें कोणिक गोष्ट मनुष्य इ०कांचें चालणें इ०कांचें वि०.

रुढणें (धा. ना.) कोणिक गोष्ट कोणेकरूपें लोकप्रसिद्धीस येणें.

रुणझुण (अव्य०) अनुकरण; तोरड्या, पैंजण इ०कांचें वाजण्याचें वि०.

रुतणें (धा. ना.) कठीण जो पाषाणादि पदार्थ तो शरीरादि मृदु पदार्थाशीं घट्ट संबंध झाल्यामुळें त्यानें फोडून किं० चेपून आत शिरणें.

रुदन (सं. न. ना.) रडण्याचा जो व्यापार तें.

रुंदी (स्त्री. ना.) क्षेत्र, वस्त्रादि जो साकार पदार्थ त्याचें लांबीचें जें सूत्र त्याजवर आडवें सूत्र या पर्यंतापासून त्या पर्यंतापर्यंत मारिलें असतां त्या सूत्रानें जो परिछिन्न होतो त्या क्षेत्रादिकाचा परिणामविशेष ती. [रुंदणें.

रुधणें (धा.ना.)(ग्रं०) रोध होणें, करणें.

रुधिर (सं. न. ना.) शरीरांतील जें रक्त तें.

रुद्ध (सं. वि०) रोध पावलेला तो.

रुपडें (न. ना.) (ग्रं०) पुरुषादिकांचें फार सुंदर जें रूप तें.

रुपणें (धा. ना.) रुतणें.

रुपाया (पु. ना.) अकरा किं० काहीं अधिक मासे वजनाचें रुप्याचें नाणें आहे तो.

रुपें (न. ना.) (सं. रौप्य) एक धातु आहे.

रुपेरी (वि०) रुप्याचा वर्ख किं० त्या वर्खाची शाई किं० मुलामा तो आ० तद्विशिष्ट जो पदार्थ तो.

रुमणी (स्त्री. ना.) नागराचा हाकिंसमयीं हातीं धरितात अवयव तो.

रुमाल (फा० पु. ना.) डोकीस बांधणें, कागदाभोंवता गुंडाळणें, लंगोटीसारिखा नेसणें इ०कांसाठीं विणून किं० फाडून किं० जोडून करितात जें प्रायः समचतुरस्र वस्त्र तो. २ त्या वस्त्रांत बांधिलें जें जमाखर्ची इ० कागदांचें गाठोडें तो. ३ राजादिकांवर वारायाचें शेल्यासारखें वस्त्र असतें तो.

रुष्ट (सं. वि०) कोणिकावर रागें भरला किं० रुसला जो कोणी तो.

रुसणें (धा. ना.) मित्र इ० जो कोणी आपला आप त्याणें कांहीं आपल्या मनास न ये असें केल्यामुळें त्याणें ती चूक मागून घेऊन आपली समजी पाडावी, आर्जव करावें, इ० भावनापूर्वक जो कोप येत असतो

तद्विशिष्ट कोणेकानें होणें. २ (ग्रं०) झाकणें. ३ दवडणें.

रुसवा (पु. ना.) रुसलेपणा.

रुस्कत (स्त्री. ना.) रुख्सत.

रुह (सं. वि०) ज्या स्थळीं जो रुजलेला तो तद्रुह. २ (ग्रं०) थोर.

रुळणें (धा. ना.) (ग्रं०) शरीराच्या अवयवावर माळ पैंजण इ० भूषण किं० केश इ०कांनीं शोभायजोगें हालत असणें. २ दृष्टीस न दिसणें.

रुक्ष (सं. वि०) स्निग्धत्व ज्याचे अंगीं नाहीं असा जो पदार्थ तो. २ जागोजाग पाणी, ओले वृक्ष, तृणें इ०कें करून जी शोभा असते तिणेंकरून रहित जो देश, ग्राम इ० तो. ३ जेणेंकरून अंतःकरण रंजत नाहीं असा प्रकारचें भाषण, गाणें, कंठध्वान इ० तो.

रूख (पु. ना.) (ग्रं०) वृक्ष. [थोर.

रूढ (स्त्री. ना.) रूढि. २ (ग्रं०)

रूढणें (धा. ना.) (ग्रं०) बोलणें.

रूढवणें (धा. ना.) (ग्रं०) वाढवणें.

रूढि (सं. स्त्री. ना.) कोणेएक व्यवहाराचा किं० त्याचे कर्तव्यादिकांचा लोकांमध्यें चिरकाळ चालत आला असतो जो प्रचार तो.

रूप (सं. न. ना.) चक्षुरिंद्रियानें ज्याचा अनुभव होतो असा जो पदार्थनिष्ठ आकार आणि रंग मिळून विशिष्ट जो एक गुण तें. २ नाक, डोळे इ० अवयवांचे ठेवणीचे भेदामुळें किं० वस्त्र अलंकार इ०कांचे धारणभेदामुळें जे शरीरादिनिष्ठ दृश्यताधर्मांचे अनेक प्रकार पडतात ते प्रत्येकीं. ३ पदार्थादिकांतील जे सद्गुणादिक ज्यांच्या योगानें त्यास शोभा येते तें इ०. [कार आहे.

रूपक (सं. न. ना.) एक अर्थालंरूपडें (न. ना.) रूप. [चें रूप तो.

रूपवती (सं. स्त्री. ना.) सुंदर स्त्री.

रूपवान् (सं. वि०) सुंदर ज्याचें रूप तो. २ ज्यास रूप आहे असा जो पदार्थ तो.

रूबरू (अव्य०) उरूबुरू.

रूळणें (धा. ना.) (ग्रं०) विराजणें.

रेंकणें (धा. ना.) म्हैस, रेडी, टोणगा यांनीं स्वजातीय शब्दानें ओरडणें. २ मनुष्यानें घोगरे गळ्यानें गाणें किं० ओरडणें या अर्थीं आरोपानें म्हणतात. इ०. [आहे.

रेंकला (पु. ना.) गाडीचा एक भेद

रेखणें (धा. ना.) स्थल, भिंत, कागद, लाकूड इ०कांवर कोष्टक, चित्र इ० विवक्षिताकार रंगादिकांचे रेषांनीं उत्पन्न करणें किं० तें स्थलादिक त्या क्रियेनें विशिष्ट करणें. २ कपाळादिकांवर लावलेलें कुंकूं, गंध इ० तें वेडेंवांकडें असलेलें नीट करून सुरेख दिसे असें करणें. ३ (ग्रं०) रेखाटणें.

रेखा (स्त्री. ना.) (ग्रं०) रेषा किं० मर्यादा. २ कवित्वरचना. ३ यथोक्त कर्म.

रेखाटणी (स्त्री. ना.) आंखणी म्हणून जें रेखायाचें साधन ती.

रेंगणें (धा. ना.) आळस, अनुत्साह, इ० कारणामुळें हळूहळू, मंदमंद, चु-

करवीत चुकवीत असा जो कांहीं काम करण्याचा प्रकार तद्विशिष्ट तें काम करीत असतां कोणेकानें होणें.

रेंगळणें (धा. ना.) विरंगुळणें. २ कांहीं मोठा परिश्रम पडल्यामुळें थकणें.

रेघ (स्त्री. ना.) कागद, भिंत इ० कांवर रंगाची लेखणी, खिळा इ० ओढलें असतां तो रंग लागून किं० त्या ओढण्यानें खरवडल्यामुळें जें चिन्ह त्या कागद इ० कांवर उमटतें तें किं० हस्तादिकांवर त्यासारखें स्वतःसिद्ध चिन्ह असतें तें.

रेच (सं. पु. ना.) मलद्वारानें जो ढाळ होतो तो. २ तसा ढाळ व्हाव्याकरितां घेतलें जें औषध तें.

रेचक (सं. पु. ना.) (ग्रं०) प्राणायाम करितांना ओढलेला वायु पुनः सोडण्याचा व्यापार तो. २ (न०) ढाळक.

रेजा (फा० पु. ना.) कापडाचा लहान तुकडा. २ फाशावरील पगडा तो.

रेंटणें (धा. ना.) कोणेक पदार्थ असतो तेथून पलीकडे सारावा किं० अलीकडे येत असतां येऊं देऊं नये म्हणून त्यास हात इ० लावून स्वनिष्ठ बळानें नेटानें विशिष्ट करणें. २ ह्याच्या योगानें आपणपडून दुर्दशा पावावी असें जें आपल्यावर आलेलें संकट त्यास जिंत न जातां आपले सामर्थ्यानें कांहीं काल तसेंचेतसेंच संभाळून धरणें. ३ संसार, सावकारी, इ० कांहीं व्यवहार न पडूं देतां स्वसामर्थ्यानें कसें तरी चालविणें.

रेंटमकाहाणी (स्त्री. ना.) (ग्रं०) भाकडकथा.

रेंटा (पु. ना.) कोणेकानें पुढें सरावें म्हणून मागून देतात जो नेट तो.

रेण (पु. ना.) (ग्रं०) रेणु.

रेणु (सं. पु. ना.) रज.

रेत (सं. न. ना.) गर्भउत्पत्तीस कारण जी पुरुषशरीरांतील मुख्य धातु तें.

रेती (सं. रेतजा) (स्त्री. ना.) बारिक, खरखरीत, स्निग्धांशरहित असा कणप्राय मृत्तिकाविशेष आहे ती.

रेंदा (पु. ना.) पाणी, तेल, तूप इ० कांत जमलेलें जें मलांश, मृत्तिकांश इ० कांहीं असतें तो किं० त्याचे मिश्रपणामुळें दाट गढूळ झालेलें पाणी इ० तो. २ रेंद. ३ गळू इ० कांतून निघतो जो रक्तमिश्रित पू तो. ४ (ग्रं०) चिखल.

रेफ (सं. पु. ना.) अर्धमात्राप्रमाण "र्" म्हणून जो वर्ण तो, व्यंजनाचे पूर्वीं त्याचा योग असतां त्या व्यंजनावर तद्बोधक चिन्ह जें अंकुलें दिलें असतें तो.

रेबड (स्त्री. ना.) चांगले जागावर चिखल, शेण इ० पडल्यामुळें जी घाण येत्ये ती.

रेमेडोक्या (वि०) कांहीं काम करण्याविषयीं उत्साह नाहीं, त्वरा नाहीं असा केवळ मंद जो मनुष्यादि त्यास म्हणतात.

रेल (स्त्री. ना.) चंगळ. [चंगळ ती.

रेलचेल (स्त्री. ना.) अतिशयित जी

रेंव (स्त्री. ना.) धान्यादिकांत जो बारिक खड्यांचा समुदाय असतो ती किं० जी रेती असत्ये ती. २ बा-

रीके खड्यांचा समुदाय तो.

रेवड ( स्त्री. ना. ) कांवळें इ०कांचे दशांचे मूलप्रदेशीं दशा वळून गुफून किं० दुसरें रेशीम, सूत इ० भरून जो गोफासारिखा आकार करितात तो.

रेवडी (स्त्री. ना.) साकर इ०कांचा पाक करून तीळ घालून जी वडी करितात ती. २ बचेरी.

रेवण्णा (पु. ना.) जंगमानीं मानिलेली एक देवता आहे ती.

रेवणें (धा. ना.) चिखल, चुना इ० रवून केलेला जो पदार्थ त्याणें त्याच्या अंगच्या आर्द्रतेच्या आधिक्यामुळें किं० विसविशीतपणामुळें खालीं दबून प्रसन्न होणें. २ मनुष्यादि जीवानें आपले अवयव सईल सोडून आपले शरीराचा भार अन्य पदार्थावर पडे असें तिकडे तोलणें. ३ चिखलांत रुतणें.

रेशीम (फा० न. ना.) एक जातीचे किडे आहेत त्यांपासून वस्त्रादि उपयोगीं जो तंतुसंघात निपन्न असतो तें.

रेषा ( सं. स्त्री. ना. ) रेघ. कपाळ इ०कांतील रेषा उपटणें म्ह० अकस्मात् दैव उदयास येणें. २ आंबा इ० फळांत जो केसर असतो तो.

रोकड (सं. रोक) (स्त्री. ना.) रुपये, होन, मोहरा इ० जें नाणें तद्रूप द्रव्य तें. २ सावकारी, व्यवहार इ०कांत असतें जें सोनें, रुपें, जवाहीर, इ० रूप ऐवज त्यास म्हणतात.

रोकडा (वि०) रोकड जो ऐवज तो. २ भीडभाड न धरितां निखालसपणें जेव्हांचें तेव्हां जें उत्तर, प्रत्युत्तर इ० भाषण तें. ३ (प्र० ) प्रत्यक्ष. ४ (अव्य०) लागलाच. ५ तूर्त.

रोख (वि०) रुपये, होन इ० जो ऐवज तो. २ क्रयविक्रयव्यवहारीं उधार न राखितां तत्कालींच देतात जो नाणेंरूप ऐवज तो. ३ रोकडा द्विती०.

रोख (फा० पु. ना.) कोणेक लक्ष्यास लक्षून त्याजकडे जें नेत्र, बंदूक, तोफ इ०कांचें आभिमुख्य असतें तो. २ वक्त्याच्या किं० कर्त्याच्या अंतःकरणाचा कोणेक प्रतिपाद्य अर्थाकडे किं०साध्यकार्याकडे जो कटाक्ष असतो तो. ३ (प्र०) क्रोध, कटाक्ष.

रोखणें (धा. ना.) बंदूक, तोफ, नेत्र इ० कोणेक इष्ट लक्ष्याकडे रोख होई अशा स्थितीनें विशिष्ट करणें. २ रोखणीनें काष्ठादि साफ करणें.

रोग (सं. पु. ना.) मनुष्य, पशु इ० स्थावरजंगमात्मक पदार्थांचे शरीराची जी प्रकृति अवस्था असते ती बिघडून प्रतिकूल कांहीं विकृति होण्यास कारणीभूत जो प्रतिकूलखानादि संबंधानें शरीरीं कांहीं दोषरूप धर्मविशेष उत्पन्न होतो तो. २ त्या रोगानें उत्पन्न होऊन ज्वरादि रूपेंकरून परिणाम पावते जी विकृति तिलाही म्हणतात. ३ कांहीं रोगविकृतीनें विकृत झाला जो मनुष्य, धान्य इ० पदार्थ त्यास आरोपानें म्हणतात. ४ अंतःकरणास व्यथा जेणेंकरून होते असा जो शोक, चिंता, मत्सर इ० त्यास प्रत्येकीं म्हणतात.

रोगण (फा० न. ना.) तेल, मेण, राळ

इ० कितीएक पदार्थ एकत्र करून जो चिक्कण पदार्थ करितात, ज्याचा लेप मेणा, गाडी, रथ इ०कांस केला असतां भिजत नाहीं आणि तकतकीत दिसतो तें. २ त्याचा मेणा इ०कांस जो करितात लेप तें.

रोगमल, मल्ल (पु. ना.) रोगिष्ट जो मनुष्यादि त्यास ह्मणतात. [रोग तो.

रोगराई (स्त्री. ना.) लाहानमोठा जो

रोगिष्ट (वि०) रोगी.

रोगी (सं. वि०) पंडु, क्षय, दमा, कुष्ट इ०चिरस्थायी रोग जडला आहे ज्यास असा जो मनुष्यादि तो. [परिलोण.

रोचक (सं. वि०) रुचिकर. २ (न.)

रोज (फा० पु. ना.) अहोरात्रात्मक काल तो. २ दिवसाचे बोलीनें कांहीं एक कामाकरितां ठेविला जो मनुष्यादि त्यास प्रतिदिवशीं जें देय द्यावें लागतें तें. ३ (अव्य०)प्रतिदिवशीं.

रोजउठून (अव्य०) नित्यशः.

रोजगार (फा० पु. ना.) द्रव्यादि संपादनार्थ सुभा, मामलत इ० जो धंदा तो किं० पैका मिळविण्याचा जो यच्चयावत् उद्योग तो. २ प्रसंगविशेषीं सामान्यतः उद्योगमात्रास ह्मणतात.

रोजगुदस्त (फा० अव्य०) वर्तमान दिवसाचे पूर्व दिवशीं.

रोजचा (वि०) नित्याचा.

रोजचेरोज (अव्य०) नित्याचोनित्य

रोजमरा, मुरा (फा० पु. ना.) चाकरास चाकरीसंबंधी प्रतिमासीं किं० प्रतिवर्षी देतात जें वेतन तो.

रोट, रोंट (पु. ना.) कणीक इ० कांचा जाड भाकरीचे आकाराचा किं० वरंवट्यासारिखा जो गोळा करून भाजितात तो.

रोटगा (पु. ना.) रोट.

रोठ (पु. ना.) (ग्रं०) विरोध.

रोड (वि०) अंगांत मांस कमी असल्यामुळें उरःस्थलादिसंबंधी हाडें ज्याचीं निरनिराळीं दिसतात असा जो कृश मनुष्यादि तो किं० त्याचें शरीर तो.

रोडका (वि०) रोड.

रोडगा (पु.ना.) रोटगा. [तुकडा तो.

रोडा (पु. ना.) भाजलेल्या विटेचा

रोतीसुरत (स्त्री. ना.) रडवी मुखश्री ती. [बाण.

रोध (सं. पु. ना.) निरोध. २ (ग्रं०)

रोधणें (धा. ना.) मनुष्य, द्वार, नदी, मार्ग, इ० कांस गतिकुंठित होई असें अडविणें.

रोप, रोंप (न. ना.) नारळ, पोंफळ, भात, वांगी, मिरची, तुळस इ०-कांचीं बीजें उगवून जीं लाहान लाहान झाडें झालीं असतात तें किं० तीं झाडें प्रत्येकीं; परंतु प्रायः तेथून उपटून अन्यत्र स्थळीं लावण्याची विवक्षा असतां प्रयोग. २ (ग्रं०) बाण.

रोम (सं. न. ना.) शरीरावरील केश ते प्रत्येकीं.

रोमणदिवली (स्त्री. ना.) प्रवासादि उपयोगीं जमिनींत रोंवून ठेवायाजोगा जो लोहादिकांचा एक दिव करितात ती.

रोमांच (सं. पु. ना.) आनंदादिकानें

शरीरावर जो काटा उभा राहतो तो.

रोंवणें (भा. ना.) भूमि, भिंत, शरीर, वस्त्र, इ०कांत बीज, स्तंभ, खिळा, कांटा, सुई इ० खुपसणें.

रोशनाई (फा०स्त्री.ना.) कोणेकस्थळीं शोभार्थ अनेक दिप लावून जो प्रकाश करितात तो किं० तत्संबंधी कारखाना तो. २ वृक्ष, मनुष्य इ० समुदायमूळक जी स्थळादिकास शोभा येत्ये ती. [तेल काढितात तें.

रोशेल (न. ना.) एक तृणविशेषाचें

रोष (सं. पु. ना.) क्रोध. [२ उत्पत्ति.

रोहा, रोह (पु. ना.) (ग्रं०) वृद्धि.

रोळा (पु. ना.) (ग्रं०) वृष्टि.

रोहिणीजल (सं. [illegible] ०) मृगजल.

रौप्य (सं. न. [illegible] [illegible]पे प्रथ०.

रौरव (सं. पु. ना., एकवीस महानरकांतील एक नरक आहे.

---

## —ल—

ल— हा वर्ण भट्टाविसावें व्यंजन आहे.

लकडा (पु. ना.) सावकार इ०कांचें देणें किं० शेत, संसार इ० जीं अवश्य निर्वाह्य त्यांजकडून त्यांचा निर्वाह करण्याविषयीं आपणास लागला असतो जो नेट तो.

लकब (अर० स्त्री. ना.) सहवास, अभ्यास इ० कारणामुळें बोलणें, चालणें, लिहिणें, वस्त्रादि धारण करणें इ० व्यापाराविषयीं काहींएक तऱ्हेची लागत्ये जी चाल ती.

लकलकाट (पु. ना.) सूर्य, चंद्र, चंद्रज्योत, दिवे इ० संबंधी तेजाची दाट व्याप्ति तो.

लकलकीत (वि०) स्वच्छ निर्मळ जो पात्र, अलंकार, वस्त्र, शरीर, स्थळ इ० तो. २ जें अधिकरण ज्या द्रव्यादि पदार्थांनीं सहित होतें तो पदार्थ तेथून निःशेष नाहींसा झाल्यामुळें एकटें स्वरूपेंकरून मात्र राहिलें जें अधिकरण तो.

लंका (सं. स्त्री. ना. ) एक उपद्वीप आहे. २ क्रीडार्थ जाळायासाठीं दारूचीं झाडें, राक्षस इ० पदार्थांहींकरून जी रचनाविशेष करितात ती. लंकेची पार्वती म्हणजे जिचे अंगावर यत्किंचितही अलंकार नाहीं अशी जी सौभाग्यवती स्त्री तिला म्हणतात.

लकेरी ( स्त्री. ना. ) सुवर्णादि धातु, हिरकादि रत्नें, रंग इ० जे चकचकीत पदार्थ त्यांचेठायीं किं० कंठादि ध्वनीचे ठायीं जी झील असत्ये ती. २ रंग, राग, स्वाद, वास इ०कांमध्यें रंगांतरादिकांची जी छटा मारत्ये ती. ३ वस्त्रादिकांस कलाबतू, रेशीम, रंग इ०कांनी बारीक जी किनारी असत्ये ती

लक्क (वि०) लकलकीत. २ (न. ना.) विद्युल्लता, तोफ इ० संबंधी अकस्मात् जें तेजःस्फुरण होतें तें किं० पित्तक्षोभादिकांमुळें जो डोळ्यापुढें तसा भास होतो तें.

लकूख (वि०) केवळ निर्धूत कफलक जो मनुष्य त्यास म्हणतात.

लखलाभ (पु. ना.) लक्ष रुपयांचे

लाभस्थानीं मानिला जो कांहींएक अर्थ त्यास म्हणतात. २ कापड इ० पदार्थ विक्रयाद्वारा घेण्यासमर्थ तो पदार्थ गिऱ्हाइकाचे हातीं देतेवेळेस मंगलार्थ याचा प्रयोग करितात.

लखोटा (पु. ना.) लाखोटा.

लग (स्त्री. ना.) घर इ०कांचे ओळीनें असतात जे खांब त्यांचे माथ्यावर एक चौरस आडवें लांब लांकूड बसविलें असतें तें. २ (पु. स्त्री. ना.) काष्ठ, शरीरावयव इ० झिजला, तुटला असतां केवळ द्विभाग न होतां उभयसंबद्ध मध्यें त्याचा त्याचा जो किंचिन्मात्र अंश राहिला असतो तो. तो. ३ लगा प्रथ० द्विती०.

लगट (स्त्री. ना.) पळणारा जो चोर इ० त्याचे किं० कोणेक कामाचे झटून पाठीमागें लागण्याचा जो व्यापार तो.

लगटणें (धा. ना.) कोणेक लक्ष्याशीं जाऊन ठेपणें. २ कांहींएक पदार्थ कांहीं पदार्थाशीं चिकटणें.

लगड (स्त्री. ना.) सोनें, रुपें इ० धातूचा रस करून ओतणींत ओतला असतां जो लांबट आकार होतो तो. २ माकण.

लगडणें (धा. ना.) मनुष्य, पशु इ० कानीं पाय अधू असल्यामुळें किं० दुखावल्यामुळें त्या पायावर भार घेववत नाहीं म्हणून पाय काढित एक प्रकारचें वांकडें वांकडें चालणें.

लंगडा (वि०) जन्मापासून किं० मोडल्यादुखल्यामुळें अधू किं० कांटा मोडला, फोड भाला, सुजला इ०-कामुळें विकल जो पाय किं० हात तो किं० तेणेंकरून युक्त मनुष्य, पशु, पलंग, इ० तो. २ कांहींएक उणेपणामुळें विकल जो व्यापारादि तो.

लगडणें (धा. ना.) (प्रं०) वृक्षादिकानीं फलपुष्पादिकेंकरून दाट भरणें.

लगत (स्त्री. ना.) कोणेकाचा कोणेकाशीं गुणक्रियादि संबंध व्हावयाजोगा सामीप्य संबंध तो. २ योनिसंबंधानें कोणेकाशीं जवळीक तो. ३ कोणेकाचा कोणेकाशीं दाट परिचय तो. ४ (अव्य०) कोणेक अर्थाचे केवळ समीप प्रदेशीं. ५ निरंतरत्वानें एकापुढें एक, एकापुढें एक होई असें.

लगता (पु. ना.) लगत प्रथ०. २ देश, ग्राम, नदी, पर्वत इ० जें कोणीएक अविभिन्न तत्सामीप्यसंबंधविशिष्ट जो देशविभाग तो.

लगबग (स्त्री. ना.) त्वरा, घाई.

लगलगां (अव्य०) (ग्रं०) लगबगीनें.

लंगर (फा० पु. ना.) गलबताचा जो लोखंडी नांगर तो. २ लोखंडाची मोठी जी सांखळी तो. ३ साधारण प्रमाणापेक्षा मोठा जो गोट, सरी, सांखळी, दोर, खांब इ० तो. ४ डंग.

लगलग, लगलगां (अव्य०) अतित्वरेनें.

लगा (पु. ना.) थिरा. २ आश्रय.

लगाबांधा (पु. ना.) कोणेकास चार पैसे मिळावे, संसार इ० खटलें चालावें इ०कांचे विषयीं कोणी सुहृत्संबंधी, आप्त इ०कांचा लहान मोठा

असतो जो आश्रय तो. २ लागाबांधा.

लगाम (फा० पु. स्त्री. ना.) घोड्यानें मनुष्याचे स्वाधीन राहावें, फिरवलें तसें फिरावें, म्हणून त्याचे तोंडात शृंखलासदृश पदार्थ करून घालितात तो. ती. २ कोणेक व्यवहारादिक विवक्षानुरूप वर्त्तविण्याचें कोणेकाचे स्वाधीन असतें जें सूत्र त्यास म्हणतात.

लगामीं (अव्य०) (ग्र०) स्वाधीन.

लगावणें (धा. ना.) का-,चपराक, चाबूक इ० कोणेकाचे अंगावर धांगला प्रहार होई असा मारणें.

लगलग (अव्य०) घाईघाईनें. २ (स्त्री. ना.) फारच जी घाई ती.

लगेहात (अव्य०) कोणेक कामाचे ठायीं प्रवृत्त होतांना अंगीं घेतला असतो जो वेग त्याचा मध्यें विराम न होऊं देतां त्याच वेगानें.

लगोटी (स्त्री. ना.) केवळ गुह्याचें मात्र आच्छादन व्हावयाजोगा जो वस्त्राचा तुकडा करगोट्यानें नेसतात ती. २ चार साहा बोटें रुंद आणि हात दीड हात लांब असा जो वस्त्राचा तुकडा त्यास म्हणतात. ३ रुंदी थोडी व लांबी फार असा जो शेत इ०कांतील भूमीचा भाग ती.

लंगोटियार (पु. ना.) बाळमित्र.

लग्न (सं. न. ना.) विवाह. कोणेकाचें कोणेकाशीं लग्न लागणें ह्म० सर्वदा सर्वकर्मांचे ठायीं उभयतांचें साहचर्य असावें असा परस्परांचा संबंध बनलेला असणें. २ (वि०) संलग्न.

लग्नकार्य (सं. न. ना.) लग्न, मुंज इ० लाहान मोठें कार्य तें.

लग्नमुहूर्त (सं. न. ना.) लग्नकार्य.

लग्नसराई (स्त्री. ना.) लग्नें करावयाचा जो मार्गशीर्षापासून ज्येष्ठपर्यंत काळ ती.

लंघणें (धा. ना.) दुखणें,उपोषण किं० शारीर कष्ट झाल्यामुळें मनुष्यादि प्राणी किं० त्यांचें शरीर, जीव, हात पाय, यांणीं केवळ सामर्थ्यहीन होणें. २ (ग्रं०) उल्लंघणें.

लंघन (सं. न. ना.) ज्वरादि निरसनार्थ जें उपोषण करितात तें. २ (ग्र०) उल्लंघन.

लघाळ (वि०) दुसऱ्यानें अनेकवार निषेधिलें असताहि कोडगेपणानें पुन: पुन: बोलावें असा स्वभावाचा जो मनुष्य तो.

लघु (सं. वि०) भारानें किं० योग्यतेनं जो विवक्षिताहून हलका किं० आकारानें जो विवक्षिताहून लाहान तो.

लघुत्व (सं. न. ना.) कांहीं कारणामुळें कोणेकाचे योग्यतेस येतो उणेपणा तें. २ लघुपणा.

लघुशंका (सं. स्त्री. ना.) मुतण्याचा जो व्यापार ती किं० मूत्र.

लघ्वी (स्त्री. ना.) लघुशंका.

लचक (स्त्री. ना.) पाय, कंबर इ० कोठें लचकल्यामुळें आंत शिरेवर शीर चढून अंमळ चलन झालें असतां वेदना लागायाजोगा जो विकृतिविशेष उत्पन्न होतो ती.

**लचकणें** (धा. ना.) हस्तपादादि शरीरावयव समविषम स्थलादिकांचे ठायीं वांकडा तिकडा पडल्यामुळें आंतील शिरा इ०कांस धक्का बसे अशा अंचक्यानें युक्त होणें. २ धमकणें. ३ (ग्रं०) तरळणें.

**लचका** (पु. ना.) मांस, पिठादिकांचा गोळा इ०कांचा कमलाकार हस्तानें किं० मुखानें तोडून काढिला जो मोठा अंश तो.

**लचंड, लचांड** (न. ना.) कचाट.

**लचाळ** (वि०)(ग्रं०) लोंचट. २ लाचखाऊ.

**लजत** (अर० स्त्री. ना.) कोणेक विषयींची कोणेकास लागली जी खोड ती. २ रंगादिकांत अन्यरंगादिकांची मारल्ये जी छटा ती. ३ गोडी.

**लज्जा** (सं. स्त्री. ना.) लाज.

**लज्जित** (सं. वि०) लज्जायुक्त झाला जो तो.

**लटक** (स्त्री. ना.) गाणें, बोलणें, चालणें इ०कांमध्यें इतराहून विलक्षण कोणेकाची निराळीच तऱ्हा असल्ये ती. २ लकब या अर्थींही क्वचित् प्रयोग.

**लटकणें** (धा. ना.) खालीं लोंबत हालत राहायाजोगें कोणेक पदार्थानें वरचे आधाराशीं संबंध असणें. लटकत चालणें इ० नखऱ्यानें ठुमकत चालणें.

**लटका** (वि०) बाह्यात्कारीं ज्या रूपानें इंद्रियगोचर होतो, वस्तुतः तद्रूप नव्हे असा जो भ्रमविषय सर्प, रजत इ० पदार्थ किं० अनृत जें भाषणादि तो. २ ज्याच्या बोलण्यांत, करण्यांत प्रामाणिकता नाहीं असा जो मनुष्य तो. ३ निरर्थक किं० निष्कारण जो व्यापारादि अर्थ तो.

**लटकावणें** (धा. ना.) कोणेक पदार्थ वरील आधाराशीं लटके असा संबद्ध करणें.

**लटपट** (स्त्री. ना.) कलह वाढायाजोगा जो परस्पराचा अरेतुरे इ० भाषणादि व्यापार तो. २ वाद, युद्ध इ० प्रसंगीं क्रोधावेश, भय इ० कारणामुळें कोणेकाची घाबरेपणानें जीभ मोडावी, कांहींच सुचूं नये इ० रूप होत्ये जी अवस्था ती. ३ (अव्य०) अनुकरण; ढिला झालेला जो खुंटा, खांब इ० त्यांचे ढिलेपणामुळें जें हालणें त्याचें वि०. ४ (ग्रं० स्त्री.) धांदल.

**लटपटणें** (धा. ना.) खुंटा इ०कानें लटपट हालणें. २ कोणेकास प्राप्त झालेला किं० होणार जो मामलत इ० अधिकार किं० आरंभिलेला अ० आरंभायाचा जो सावकारी इ० व्यवहार त्याणें कांहीं कारणामुळें त्या त्या रूपेंकरून नाहींसा होणें. ३ कोणेक मनुष्य, भाषण, व्यवहार इ० कांहीं कारणामुळें रद्द पडणें.

**लटंबर** (न. ना.) जाणें, येणें इ० प्रसंगीं मनुष्यादि समुदायात्मक जें मोठें खटलें त्यास म्हणतात.

**लटरफटर** (न. ना.) ज्या समुदायास अमुक असें नांव देतां येत नाहीं असा जो अनेक जातींचे लाहानसा-

हन अनेक पदार्थांचा समुदाय त्यास प्रतिव्यक्तिचा नामनिर्देश करावयासाठीं मुख्यत्व नसल्यामुळें अविवक्षा असतां म्हणतात. [२ (वि०) लटिका.

लटी (स्त्री. ना.) (ग्रं०) लेखा.

लटूफटू, बटू (अव्य०) लुटूफुटू.

लठ्ठ (पु. ना.) हातांत घ्यावयाचा मोठा जाड जो सोटा तो. २ (वि०) सामान्य प्रमाणापेक्षां स्थूळ जें शरीर, शरीरावयव, सूत, त्याचें केलेलें वस्त्र, आकार, अलंकार, मनुष्य इ० तो.

लठ्ठनिरंजन (पु. ना.) निरक्षर होत्साता शरीरानें धष्टपुष्ट असून जो दांडगा त्यास म्हणतात.

लठ्ठालठ्ठी (स्त्री. ना.) सोटे, दांडे इ०कानीं जी परस्परांची मारामारी ती.

लड (स्त्री. ना.) एका सुत्रांत मोत्यें किं० फुलें ओंवून खालीं गुच्छ करून जो त्यांचा सर करितात ती.

लंड (सं. पु.) प्रसंगविशेषीं शिश्नास म्हणतात. २ (वि०) पक्का धूर्त हरामी जो मनुष्यादि तो.

लडथड (स्त्री. ना.) देणें, घेणें, इ० जो परस्परांचा व्यवहार त्यामध्यें कोणेक अंशीं परस्परांचा विरोध इ० न मिळाल्यामुळें राहाल्ये जी विवादविषयता ती. २ त्यानिमित्त जो परस्परांचा विवाद ती.

लडटू, धू (वि०) गबदुल.

लडबड (स्त्री. ना.) लुडबूड. २ निद्रेनें निचेत झाला जो त्याचे किं० दुखणें, उपवास इ०कानें केवळ अशक्त झाला जो त्याचे शरीराचा ताठपणा जाऊन केवळ लबलबीतपणानें विशिष्ट असा होतो जो परिणाम तो.

लडबडणें (धा. ना.) बरबटणें. २ लटपटणें प्रथ०. ३ लुडबुडणें.

लडबड्या (वि०) लुडबुड्या.

लंडभारती (पु. ना.) सर्वदा नागवा असा जो गोंसावी त्यास निंदेनें म्हणतात.

लडिवाळ (वि०) लाडका. २ (पु. ना.) लाडगुळिगार्थी.

लंडी (स्त्री. ना.) रंडी, परंतु नामर्दपणामुळें कोणेकाचें हीनत्व वर्णायाचें असतां त्यास आरोपानें म्हणतात. २ (ग्रं०) (वि०) भित्रा.

लढणें (धा. ना.) कोणेकानें कोणेकाबरोबर झुंजणें. २ कोणेक अर्थानें सजातीय अन्य पदार्थाशीं साम्य पावणें.

लढा (पु. ना.) लडथड प्रथ०. [नी.

लढाई (स्त्री. ना.) लढण्याचा व्यापार

लढाऊ (वि०) लढण्याविषयीं समर्थ किं० लढण्याचे उपयोगी जो मनुष्यादि पदार्थ तो.

लता (सं. स्त्री. ना.) औषधि वनस्पतींत एक भेद आहे, जिच्या शाखा तंत्वाकार लांबलांब असतात आणि भूमि किं० इतर वृक्षादि यास आश्रयून विस्तार पावतात.

लत्ता (सं. स्त्री. ना.) कोणेकास प्रहार करण्याविषयीं साधनत्वेंकरून विवक्षित जें पादतल तें. २ (पु. ना.) लगना द्वितीं०.

लदाव (पु. ना.) कोनाडा इ०कांवर कमानीसारखा किं० देवळाचा मा-

भारा इ०कांवर पालथें पाठीसारखा जो विटा, चुना, दगड इ०कांनीं रचनाविशेष करितात तो.

लंपट (सं. वि०) संसार, स्त्री इ०कांचे ठायीं जो अतिशयित आसक्त तो.

लपंडाव (पु. ना.) कोणी दडावें, कोणी त्यास शोधून काढावें असा प्रकारचा मुलांचा एक खेळ आहे तो. २ सावकार इ०कांशीं तोंड चुकवून वर्तावें किं० भाषणामध्यें धूर्तपणानें कांहीं बोलायाचा अंश गुप्त राखून बोलावें किं० आपलें अंग बाहेर न दाखवितां आंतून कोणेक व्यवहाराचीं सूत्रें चाळीत असावें इ०रूप जो कपटाचा आचार त्यास म्हणतात.

लपणें (धा. ना.) दडणें. २ लवणें.

लपूनछपून (अव्य०) उघडीक न होई असें करणें, राहणें इ०कांचें वि०.

लपेट (पु. स्त्री. ना.) लपेटा. २ काठ, पाषाण इ०कांचा जो परिघि तो. ३ आंतील पाचपेंच इ० दुसऱ्याचे मनांत येऊं नये, कांहीं खोटें असलें तथापि खोटेंसें वाटूं नये, दुसऱ्यास आकांक्षा घ्यावयास अवसर सांपडूं नये अशी जी भाषणादिकांत कोणेकाची धूर्तपणाची हातोटी असल्ये ती. ४ उन्हाळे दिवसांत सूर्यकिरणांनीं संतप्त झालेला जो मनुष्यास बाधतो वायु तो. ५ पटकी म्हणून जो उपद्रव त्यास म्हणतात.

लपेटणें (धा. ना.) कोणेक पदार्थ वस्त्रादिकानें अंगावरोवर सभोंवता वेष्टित करणें.

लप्पंछप्पं (न.ना.) लपंडावाचा द्वितीयार्थी.

लप्फा (पु. ना.) शेला, पागोटें इ०कांस जो मोठा जरीचा पदर असतो तो.

लंब (सं. पु. ना.) खांब, भिंत इ०कांचे उभेपण्याचा उजपणा पाहाया इ०कांसाठीं एका दोरीस बांधून वरून खालीं सोडितात जो शिसें दगड, इ०कांचा गोळा तो. २ दीर्घ जो अवयव तो.

लंबक (सं. पु. ना.) लंब.

लबक (स्त्री. ना.) लकब. [म्हणतात.

लंबकर्ण (पु. ना.) संकेतानें गाढवास

लबका (पु. ना.) मांस, चिखल, शेण इ०कांचा सरासरी ओंजा, कंवट एवढा गोळा तो.

लबलंब (अव्य०) अनुकरण, अतित्वरेनें खातांना, बोलतांना जें तोंडाचें हालणें त्याचें किं० तसें तोंड हालत जें तसें खाणें, बोलणें त्याचें वि०.

लंबा (वि०) मूर्छेनें किं० मूर्छेनें जो भुयीवर आडवा पडला तो. २ खरचल्या, बुडल्यामुळें नाहींसा झाला जो पैका, धान्य इ० किं० कोसळल्यामुळें जमीनदोस्त झाला जो भिंत इ० पदार्थ तो.

लबाड (वि०) व्यवहारांत लोकांबरोबर वागण्याविषयीं खोटें बोलूं नये, दुसऱ्यास दुखवूं नये, दुसऱ्यानें आपला अपराध केला असताही सोसावें इ० जे चांगले गुण ते अंगीं असून त्याविरुद्ध गुण ज्याचे अंगीं असतात असा मनुष्यादि तो. २ अ-

प्रमाणिक जो मनुष्य, भाषण, लेख, ग्रंथ, आचार, धर्म इ० तो.

लंबे (वि०) लंबा.

लब्ध (सं. वि०) कोणेक व्यवहार, मनुष्य, इ०कांपासून कोणेकास मिळाला जो कांहींएक अर्थ तें. [तिष्ठ.

लब्धप्रतिष्ठा (स्त्री. ना.) कीरती प्र-

लब्धसंज्ञ (सं. वि०) (ग्रं०) सावध.

लभ्य (सं. वि०) याचनादिद्वारा मिळायाजोगा जो द्रव्यादि पदार्थ तो. २ लब्धप्रथमार्थी. ३ लभ्यांश.

लय (वि०) लई. २ (सं. स्त्री. ना.) मृदंग, वीणा इ० वाजविल्यानंतर कांहींकाल राहतो जो बारीक नाद तो. ३ (पु.) कोणेक पदार्थ पदार्थांतरांत मिळाला असतां तद्रूपता पावल्यामुळें होतो जो नाहींसेपणा तो. ४ जगाचा जो प्रलय तो. ५ संपत्त्यादिकांचा केवळ नाश तो. ६ (न.) अंत:करणाची एकाग्रता होऊन कोणेक विषयाकडे लागतें जें लक्ष तें

लयलूट (स्त्री. ना.) कोणेक पदार्थांची होत्ये जी रगड तो.

ललकारणें (धा. ना.) दूरवर ऐकायास जावें आणि लांब व उंच स्वर असावे असा एक शब्द करण्याचा प्रकार आहे त्या प्रकारानें चोपदार इ०कांनीं तीं तीं वाक्यादि उच्चारणें. २ दूरस्थित जो कोणी त्यास मोठ्यानें हाक मारणें.

ललना (सं. स्त्री. ना.) स्त्री.

ललाट (सं. न. ना.) कपाळ म्हणून जो नेत्रावरील शरीरावयव तें.

ललाम (न. ना.) (ग्रं० ) रत्न. २ भूषण. ३ (वि०) सुंदर. [लळीत.

ललित (सं. वि०) सुंदर. २ (न )

लव (पु. ना.) एक वृक्ष आहे. २ त्याचें फळ तो. ३ (सं. पु. ना.) कोणेक पदार्थाचा केवळ सूक्ष्म जो अंश तो. ४ (स्त्री.) लंव.

लंव (सं. लोम) (स्त्री. ना.) दाढी, मिशी, डोकी इ० स्थानीं जे कठोर केश असतात त्यांवाचून पाठ, पोट, हात, पाय इ०कांवर जे बारीक कोमळ केस असतात ते. २ पश्वादिकांचे अंगावर असतात केश ते.

लवक (स्त्री. ना.) (ग्रं०) उभारणी. २ (वि०) किंचित्.

लवकर (अव्य०) झटकर. २ विलंब न होऊं देतां पर्यं. ३ ज्या कार्याचा जो नियमित काल तो न लागतां पर्यं. ४ (न. ना.) उशिराचा प्रतिपक्षी जो काल तें.

लवंघा (पु. ना.) (ग्रं०) दाह.

लवटें (वि०) (ग्रं० ) लवण्याजोगें. २ लवलेलें.

लवंडणें (धा. ना.) यथायोग्य स्थितीनें भूम्यादिकांवर स्थित जो पदार्थ त्यास धक्का इ०कानें एका बाजूवर पाडणें किं० त्यांत असलेला जलादि पदार्थ बाहेर सांडणें. २ बिछाना इ०कांचे ठायीं सुखार्थ आडवें पडणें.

लवंडी (स्त्री. ना.) बटीक.

लवण (सं. पु. ना.) क्षार म्हणून जो रस तो. २ (न. ना.) मीठ. ३ दो-

हीं बाजूंस उंचवटा असून मध्यें जी खोलगट जागा तें.
लवणशाक (सं.स्त्री. पु. ना.) लोणचें.
लवणें (धा. ना.) शरीर, काष्ठ इ० पदार्थानें वर कांहीं नेट आल्यामुळें नीच होणें. वीज, डोळा इ० कानीं लवणें म्ह० स्फुरणें. २ (ग्रं०) नम्र होणें. ३ जाळणें.
लवलाह (पु. ना.) (ग्रं०) त्वरा. २ वेग. ३ (अव्य०) सत्वर.
लवलाहीं, लाहें (अव्य०) (ग्रं०) झटकर. [किंचित् अंश तो.
लवलेश (पु. ना.) कोणेक अर्थाचा
लवाजमा (अर० पु. ना.) डौल दि-साण्याजोगा समागमें चालगतात जो कांहीं घोडीं, माणसें इ० रूप खटला तो.
लवीथपी (स्त्री. ना.) (ग्रं०) लपणें प्रकटणें.
लश्कर, ष्कर (फा० न. ना.) सैन्य. २ (पु. ना.) तोफखाना इ० कितीएक कारखान्याकडे खटपटीस ठेविलीं असतात जीं मनुष्यें तीं प्रत्येकीं तो.
लस (स्त्री. ना.) क्षत, फोड इ० कांतून उदकासारिखा जो द्रवांश निघतो तो. [२(वि०) सुंदर, शुभांगी.
लसती (सं. स्त्री. ना.) सुंदर स्त्री.
लसलसणें (धा. ना.) पाणी, दूध इ० अतितप्त होणें. २ क्षत, फळ इ० कांत किडे इ० कानीं वळवळ करीत असणें. ३ शरीरांत तारुण्य इ० कानें भरावयेस येणें. [जो परकर तो.
लहंगा (पु. ना.) मोठ्या बायकोचा
लहणें (न. ना.) अन्य पेंठचे सावकार इ० कावर हुंडी इ० देणें केलें असतां त्यास जो मोबदला ऐवज हुंडी इ० पाठवितात तें.
लहत (अव्य०) (ग्रं०) प्राप्त झालें अशा प्रकारें. २ (वि०) प्राप्त.
लहर (सं. लहरी) (स्त्री. ना.) समुद्रादिकांचे उदकास येतात ज्या लाटा त्या प्रत्येकीं. २ कैफ, विष, काम, क्रोध इ० विकारसंबंधीं शरीरांत उठतात जे वेग ते प्रत्येकीं. ३ कांहींएक करण्याविषयीं येथे जी हुकी ती. ४ सर्पाच्या गळ्याखालीं जितक्या रेषा असतात तितक्या विषाच्या लहरी, मनुष्यास तो सर्प डसला असतां येतात म्हणून त्या रेषांस म्हणतात. ५ अनेक रंगाच्या वस्त्रांवर उजेड, प्रकाश यांचे उपाधीमुळें ज्या अनेक रंगाच्या छाया दिसतात त्या प्रत्येकीं. कोणेकानें लहरा मारणें म्ह० मौजा मारणें. इ०.
लहरी (सं. स्त्री. ना.) लहर प्रथमार्थी. २(ग्रं०) द्वितीयार्थक लहर. ३(वि०) दुसऱ्यानें हिताची गोष्ट सांगितली असतां ऐकेल असें प्रमाण नाहीं, आपल्या मनास येईल तें करणार असो स्वभावाचा जो मनुष्यादि तो.
लहान (वि०) असावा तिनक्याहून ज्याचा आकार कमी असा पदार्थ तो. २ वय, तेज, किंमत इ० योग्यतेनें जो उणा तो.
लळलळणें (धा. ना.) पसरलेल्या तोंडांत जिव्हेनें लाळगळत हलणें.
लळा (पु. ना.) ज्या लेंकरूं इ० कांचें जो कोणी नित्य पालन, पोषण

करितो त्याचा त्या लेंकरूं इ०कास जडला असतो जो प्रेमा तो. २ (ग्रं०) लाड.

**लळीत** (न. ना.) नवरात्रादिसंबंधी कीर्तनविशिष्ट जो उत्साह त्याचे शेवटले दिवशीं रात्रीं उत्साहदेवता सिंहासनारूढ झाली असें कल्पून वासुदेव, दंडीगाण इ० ईश्वर भक्तांचीं सोंगें आणून त्या सोंगांनीं स्वसंप्रदायानुरूप देवापाशीं प्रसाद मागावा आणि तो सर्व सभासदांस वांटावा असा जो हरिदास कीर्तनविशिष्ट समारंभ करितात तें. २ ललिताचे वेळेस गावयाचीं पदें, अभंग इ० कविता तें.

**लळेवाडें** (वि०) (ग्रं०) लाडकें.

**लक्ष** (सं. पु. ना.) एक १,००००० संख्या आहे. २ लाख रुपयांचा लाभ झाला त्याचे स्थानीं मानायाजोगें जें कांहीं झालें त्यास म्हणतात. ३ चित्ताचें जें अनुसंधान तें. ४ बंदूक, शर, नेत्र, अंतःकरण इ०कांनीं वेधावयाविषयीं उद्दिष्ट जो कांहीं अर्थ तें.

**लक्षग** (सं. न. ना.) चिन्ह.

**लक्षशः** (सं. अव्य०) एक लक्ष, दोन लक्ष इ० लक्ष संख्येनें मेजलें जाई अशा प्रकारें.

**लक्षाधीश** (सं. पु. ना.) लक्षावधि रुपये ज्यापाशीं आहेत तो.

**लक्षानलक्ष** (वि०) अनेक लक्षसंख्याक जो कांहींएक अर्थ तो.

**लक्षावधि** (सं. अव्य०) लक्षशः.

**लक्षिणें** (धा. ना.) मनुष्यादिकानें कोणेक पदार्थाकडे दृष्टि लावून तो पदार्थ लक्ष्यरूपेंकरून धरणें. २ ज्या अर्थाची साक्षात् इंद्रियगोचरता होत नाहीं तो अर्थ त्याचें ज्ञापक जें कांहींएक लक्षण त्याजवरून जाणणें. ३ प्रतीक्षिणें.

**लक्ष्मी** (सं. स्त्री. ना.) संपत्तीची आणि शोभेची अभिमानिनी विष्णूची स्त्री म्हणून देवता आहे ती. २ द्रव्याची जी संपत्ति ती. ३ शरीरादिकांचे ठायीं सुरूपादिकृत किं० अलंकारादिकृत, अ० गृहादिकांचे ठायीं संपत्त्यादिकृत, किं० शेत, बाग इ०कांचे ठायीं फल, पुष्पादिकृत जी शोभा असते ती.

**लक्ष्य** (सं. न. ना.) लक्षप्रथमार्थावाचून. २ (वि०) लक्षायास योग्य जो अर्थ तो. ३ (ग्रं०) (न. ना.) शुद्ध ब्रह्मात्मस्वरूप.

**लक्ष्यांश** (सं. पु. ना.) (ग्रं०) वाच्यांश टाकून अवशिष्ट जो ब्रह्मप्रत्यगात्मा तो.

**लाँकण** (न. ना.)(ग्रं०) लाख, बंधन.

**लांकूड** (सं. लगड) (न. ना.) काष्ठ.

**लांकूडफाटें** (न. ना.) घर इ० बांधायाचे उपयोगीं लाकडें, तृण, विटा, इ० साहित्य किं० संसाराचे उपयोगीं जाळाऊ लाकडें, शेणी, तृण, इ० जें साहित्य तें.

**लाख** (सं. लाक्षा) (स्त्री. ना.) रंगाउपयोगीं बोर, पिंपळ इ०कांपासून चिकासारिखा जो पदार्थ उत्पन्न होत असतो तो. २ (पु. ना.) लक्षरूपें जी संख्या तो. लाख रुपयांचा

पदार्थ, गोष्ट इ० म्हणजे कोणेक अर्थाची अतिशयोक्तीनें स्तुति कर्तव्य असतां त्या अर्थास म्हणतात.
लांख (स्त्री० ना.) गमनादि प्रसंगीं गुरूं, शेळी इ०कानीं भलतीकडेस जाऊं नये इ०कारितां त्याचे गळ्यात दोरी बांधून ती दुसऱ्या गुरूं इ०कांचे गळ्यात बांधाणि असें उभयतांचें करितात जें संधान तें. २ एका व्यक्तीवर अनेकांना संबंध स्यापित्यामुळें त्या निमित्तें त्यांची परस्पर होये संबद्धता ती.
लाखाजोहर (पु. ना.)(ग्रं०) लाखेचें केलेलें अग्नि लावून जाळण्याजोगें घर तें. २ लाक्षाग्नि. [लाचावणें.
लाखावणें (धा. ना.)(ग्रं०) सोकणें,
लाखों (अव्य०) लक्षावधि.
लाखोटा (पु. ना.) मोकळा कागद असतां कोणी भलता वाचील म्हणून त्याची करितात जी घडी किं० गुंडाळी, ज्यावर दुसरा कागद लोटून चिकटावितात तो. २ अनेक कागद, केश इ०कांचा परस्परांस चिकटून एकच होतो जो रचनाविशेष तो.
लाखोली (स्त्री. ना.) देवास वाहाण्याच्या उद्देशानें जी लक्षसंख्याक पुष्पादि द्रव्य ती. २ कोणेकास उद्देशून कोणेकाचे मुखांतून निघतात ज्या अनेक शिव्या ती.
लाख्या (वि०) अंकुशानें करून वर्णनीय जो पदार्थ तो.
लाग (पु. ना.) कोणेक गोष्टीचा त्या त्या रूपानें होण्याकडे झालेला असतो जो रोख तो. २ त्या गोष्टीचा त्या प्रकारें होण्याकडे रोख असून जी स्थिति ती. ३ त्या गोष्टीनें त्या प्रकारें होण्याच्या रोखास यावें म्हणून जो कोणेकाचा प्रयत्न तो. ४ चोळीला ठुशीखालीं जो तुकडा लावितात तो. ५ (ग्रं०) गोडी. ६ बंधन.
लागट (वि०) दुसऱ्यानें अनेकवार निषेधिलें असतांही त्याची लाज न धरितां वेष्टसाधनार्थ पुनःपुनः लोभानें झटण्याचा स्वभाव ज्याचा असा मनुष्यादि तो. २ ज्यास किंचित् कीड लागली आहे असा जो काष्ठ धान्य इ० पदार्थ तो. ३ भक्षिला असतां लागतो असा जो सुपारी इ० पदार्थ तो.
लागणें (धा० ना.) कोणेक पदार्थ कोणेक पदार्थाशीं संयोगसंबंधानें संबद्ध होणें. २ पश्वादि जातीय जे पुरुष त्यांणीं स्त्रीशीं मैथुनार्थ संबद्ध होणें; निंदादि समयीं मनुष्याविषयींही प्रयोग करितात. ३ रोप कलम इ० तीं तीं झाडें व्हावीं म्हणून भूमीत पुरलीं जाणें. ४ लावलेल्या रोप, कलम इ०कानें खालीं मूलधरून जगायाचा पंथ धरणें. ५ कोणेक अवयवास कोणेक अवयव जडला जाणें. ६ श्लोक, वाक्य, कुलूप इ०कानीं त्याचे अवांतर जे अवयव त्यांचा यथायोग्य संबंध होऊन बसणें. ७ चाल, रीति, खेळ, वळण इ०कानीं मनुष्यादिकाशीं संस्काररूपें करून यथायोग्य संबद्ध होणें इ०.

लागलागवड (स्त्री. ना.) लागवड प्रथमार्थी.
लागलाच (अव्य०) कोणेक क्रियेचा जो क्षण तदुत्तर अव्यवहितक्षणीं.
लागवड (स्त्री. ना.) शेत जमीन नांगरून, वेरून पेरावें इतका जो व्यापार तो. २ सिद्ध जो कांहीं गृहादि पदार्थ त्यास दागदुजीसंबंधें खर्च लागतो तो. ३ओत नव्हे अशी जी शेत जमीन किं० आगरी जमीन तो.
लागवेग(पु.ना.)(ग्रं०)अतिशयित त्वरा.
लागसर (अव्य०) (ग्रं०) जवळ.
लागाबांधा (पु. ना.) कोणेकाचें कोणेकापासून कांहीं कारण दिसत नसतां जे बरें किं० वाईट होत असतें त्याविषयीं कारणत्वेंकरून मानितात जो त्याचा त्याचा जन्मांतरीय तसा ऋणानुबंध तो.
लागी (वि०) जो ज्याशीं कोणत्याही प्रकारें संबंध व्हावयास योग्य तो त्याचें.
लागू (वि०) कोणेक स्थळीं किं० व्यापारीं अ० कोणेकापाशीं ज्या वेतानें संबद्ध हो याची विवक्षा असते त्या वेताप्रमाणें तेथें संबद्ध झाला जो कोणेक अर्थ तो.
लांगूल (सं. न. ना.) पुच्छ.
लागोपाठ (अव्य०) एका पाठीमागून दुसरी, दुसरी पाठीमागून तिसरी अशा क्रमानें अव्यवहितपणें कोणेक सजातीय क्रियेचें जें भवन त्याचें वि०.
लाघव (सं. न. ना.) लघुपणा. २ कौशल. ३ स्वकार्यसाधनार्थ गोडगोड बोलावें, आर्जव करावें इ० रूप जो कोणेकाचे अंगीं असते युक्ति ते. [अंगीं ज्याचे तो.
लाघवी (वि०) लाघवतृतीयार्थी आहे
लांच (पु. स्त्री. ना.) कोणेकापासून आपलें कांहीं कार्य करून घ्यावयाचें असतां त्यास गुप्तरूपें आर्जवार्थ जें द्रव्य देतात तो. ती. २ (ग्रं०) आड. ३ कुमार्ग. [लांच इ०.
लांचलुचपत, लांचलूच (स्त्री. ना.)
लाचार (फा० वि०) कोणेक गोष्टीविषयीं निरुपाय झाला तो.
लांचावणें (अ. ना.) कोणेक गोष्टीपासून एकवार लाभ झाल्यामुळें तीच गोष्ट पुनः करण्याविषयीं कोणेकानें संवकणें. २ कोणेकास लांच देऊन ओशाळा करणें.
लांचुगा (वि०) (ग्रं०) लांचखाऊ.
लांचू (पु. ना.) (ग्रं०) लांच.
लांच्छन (सं. न. ना.) चंद्रास जो कलंक आहे ते किं० दुराचरणादिमूलक कोणेकास लागतो जो कलंक तें. २ कोणेक पदार्थावर कोणेक आकाराचें उठलें असतें जें चिन्ह तें.
लाज (सं. लज्जा) (स्त्री. ना.) लोकांमध्यें ज्या प्रतिष्ठेनें वागत असतो त्या प्रतिष्ठेची हानि झाली किं० होईल असें मनांत आल्यामुळें किं० लोकांशीं भाषणादि व्यवहार करण्याचे प्रसंगीं अज्ञान इ० आपलें वैगुण्य उघडें पडून लोक आपणास हासतील असें मनांत आल्यामुळें भयसदृश जो अंतःकरणांत धर्मविशेष उत्पन्न होतो; ज्याचे योगानें

अंतःकरणाचा संकोच होऊन प्रवृत्ती-चा रोंख फिरतो तो. २ आपण आ-पले वडील इ०कानीं जें कांहीं केलें असतें आणि लोकोपहासकारक दु-ष्कर्मादि केलें नसतें त्याचे योगानें त्या त्या मनुष्यादिकांचे अंगीं जो योग्यताविशेष असतो, जो त्यास अ-नुकूल आचरणानें लोकोपहासापा-सून रक्षावा लागतो तो.

लाजणें (धा. ना.) लाज प्रथमार्थानें विशिष्ट होणें.

लाजवणें (धा. ना.) कांहींएक गुणानें स्वसमान जो कोणी त्यास आपल्या उत्कर्षप्रकटनानें लाजायाचे योग्यतेस आणणें. २ कोणेकानें वैगुण्य बाहेर काढून तो लाजे असा त्यास करणें.

लाजाहिणें (धा. ना.) (ग्रं०) लाजणें.

लाजा (सं. स्त्री. ना.) (ग्रं०) लाह्या

लाजिरवाणा (वि०) दुष्कर्माची प्र-सिद्धि होणें इ० कारणामुळे लाजून मुखश्री उतरायाजोगा खिन्न झा-ला जो तो. २ जी गोष्ट करतांना कर्त्यास लाजिरवाणेपणा यावा अशी जी कांहीं अनुचित गोष्ट ती.

लाझा (पु. ना.) बांधा. २ दुसऱ्याची अपराजिता आपल्याकडे यावयाजोगें चोरी, चहाडी, मारामारी, इ० कांहीं कर्म त्याचा आपलेकडे असतो जो संबंध, जेणेंकरून त्या कर्माचा निर्वाह झाल्याशिवाय आपण मोक-ळा होत नाहीं तो.

लाट (स्त्री. ना.) नदी, समुद्र इ०-कांस येंथे जी लहर ती. २ बगाड पोहे इ० कुटायाचा ढंग इ०कांस जें आडवें मोठें लाकूड संबद्ध केलें असतें तें. ३ तेल्याचा घाणा किं० तत्सदृश जो उंसाचा रस काढाया-चा घाणा असतो त्यांत जें उभें लां-कूड फिरत असतें तें. ४ बळ. ५ मार्गादि भूमि साफ करायासाठीं वरून फिरवायास वरवंट्याचे आका-रासारिखा मोठा दगड केला अस-तो तो. ६ कांहीं लाभविषयक मोठें घबाड त्यास म्हणतात.

लाटालाट (स्त्री. ना.) दपटादपट.

लाटया (वि०) लाट्यागंगाजी.

लाटयागंगाजी (पु. ना.) लाटालाट करण्याचा स्वभाव ज्याचा त्यास म्हणतात.

लाठ (स्त्री. ना.) (ग्रं०) लगड.

लाठा (वि०)(ग्रं०) मोठा. २ दांडगा.

लाठाई (स्त्री. ना.) दांडगाई.

लाठू (वि०) (ग्रं०) थोर. २ समर्थ.

लाठपण (न. ना.) (ग्रं०) शूरत्व. २ थोरपण.

लाड (पु. ना.) लालन.

लाडका (वि०) जो बाप इ० त्या पुत्रादिकाचे प्रेमानें लाड चालवितो तो पुत्र, इ० त्या बाप इ०कांचा. २ कोणेक व्यवहारीं विशेष सोडून स्वार्थसिध्यर्थ पडून कोणी करितो जें आपण, गोष्ट इ० तो.

लांडा (वि०) ज्याचें पुच्छ किं० पु-च्छाग्र छेदनादिकेंकरून नाहींसें झालें आहे असा जो पशु, पक्षी, सर्प, मत्स्य इ० तो. किं० निरग्र जें पुच्छ तो. २ थोडा जो हात, के-

खणी, चाकू इ० तो. ३ ज्याशीं जो पदार्थ अवयव—अवयवीभावसंबंधानें किं० संयोगसंबंधानें संबद्ध असतो तो तेथें भाग्वूडपणामुळें अधुरा दिसूं लागला असतां त्यास म्ह०.
लाडिलें (वि०) (ग्रं०) लाडकें.
लाडीगोडी (स्त्री. ना.) कोणेकापासून स्वकार्य करून घेण्याकरितां त्याशीं गोड बोलावें, कांहीं लोभ दाखवावा, इ०रूप जो त्यास अनुकूल करण्याविषयीं व्यापार करितात तो.
लाडीलबाडी (स्त्री. ना.) चहाडी, चुगली इ० जी लहान मोठी लबाडी तो.
लांडोर (न. स्त्री. ना.) मोराचे जातीची जी स्त्री तें. ती.
लात (स्त्री. ना.) लत्ताप्रथमार्थी. संसार किं० कांहीं एक लाभ इ०कांवर लात मारणें म्ह० अनादर बुद्धीनें त्यागणें. [पायपोसखाऊ.
लाताड (वि०) लातड. २ (ग्रं०)
लाद (पु. ना.) (ग्रं०) पाण्यानें युक्त चिखल तो.
लादणी (स्त्री. ना.) घोडे, उंट, गाडा, इ०कांवर कंठाळ इ० ओझें लादण्याचा व्यापार तो. २ (ग्रं०) लदाव.
लादणें (धा. ना.) घोडें, बैल, गलबत, ओझेली मनुष्य इ०कांवर कंठाळ, गोणी इ० ओझें चढविणें. २ यानावांचून जें घडवंची इ० अधिकरण त्याजवर मनावीं ओझें होई असें कांहीं पदार्थ रचणें. ३ कोणेक मनुष्यावर त्याची शक्ति न पाहतां किं० न्याय अन्याय न पाहतां भारभूत जें कर्तव्य काम किं० देय द्रव्य इ० तें आरोपित करणें.
लादनी (स्त्री. ना.) लदाव.
लादा (पु. ना.) कालवलेलें पीठ, चिखल, इ०कांचा हातानें घेऊन भिंत इ०कांस मारायाजोगा जो गोळा तो. २ पीठ, भात, गूळ इ०कांचा पातळ, चिकट, असा झाला जो परिणाम तो.
लाधणें (धा. ना.) (ग्रं०) द्रव्यादिक लब्ध होणें. २ कोणेक मिळालेली वस्तु आपणास उपभोग देत आपणाजवळ टिकणें.
लानी (स्त्री. ना.) (ग्रं०) शेवट.
लांपट (वि०) झिजल्यामुळें घट्ट बसेना असा झाला जो कुलपाचा कांटा, पेटी इ०कांचें झांकण, विण्याची खुंटी, मळसूत्र इ० तो. २ ज्याचे सांधे ढिले झाले असा जो गाडा, पेटी, कुलप इ० तो. ३ अनेकवार निषेध केला, मारलें, फजीती केली, तथापि पुनःपुनः निलाजरेपणानें स्वकार्यसाधनार्थ त्याच व्यापारा प्रवृत्त होण्याचा ज्याचा स्वभाव तो.
लापणिका (स्त्री. ना.) लापण्णिका.
लापण्णिका (स्त्री. ना.) लांबचलांब कंटाळा यावयाजोगी जी प्रपंचादिसंबंधी गोष्ट ती.
लापणी (स्त्री. ना.) (ग्रं०) भाषण.
लापन (सं. न. ना.) श्लोक, वाक्य, कूट, हिशेब, इ० लावण्याचा जो व्यापार तें.

लांब (सं. लंब) (वि०) इच्छित कोणेकाहून दीर्घ जो अर्थ तो. कोणेकानें लांबलांब गोष्टी सांगणें म्ह० पूर्वीची विपन्नरूप अवस्था विसरून वडीलपणाच्या किं० उमेदवारीच्या गोष्टी सांगणें. २ (अव्य०) दूर.

लांबट (वि०) किंचित् जो लांब तो. २ लांबोडा.

लांबण (स्त्री. ना.) पुढील ग्रामादि अवधि पाहिला असतां जवळ दिसतो परंतु चालते समयीं सरतां सरत नाहीं असा जो प्रदेश त्यास म्हणतात. २ इष्टस्थळाहून कोणेक स्थळीं जातात जे दोन मार्ग त्यांमध्ये एका मार्गापेक्षां एका मार्गास असतो जो फेरा तो. ३ कोणेक काम सावकाशीनें करण्याचा किं० करीत असण्याचा प्रकार तो. ४ भाषणादि कोणेक व्यवहार सारांशरूपानें संगृहीत करून थोडक्यांत आटोपावा तें न करितां तो विस्तृत करण्याचा व्यापार तो.

लांबणें (धा. ना.) कोणेक अवधीपासून कोणेक पदार्थ दूरदेशस्थित होणें. २ कोणेक पदार्थ पूर्वीपेक्षां दीर्घ होणें. ३ कोणेक गोष्ट पूर्वीचे प्रमाणापेक्षां वाढणें. ४ लौकर व्हावयाचें जें कोणेक काम त्याणें मध्यें कालकृत व्यवधान घडे अशा दशेतें पावणें इ०.

लांबलचक (वि०) लांबी, रुंदी, उंची इ० प्रमाणें असावीं तितकीं ज्यामध्यें आहेत असा जो वस्त्र, स्थळ इ० पदार्थ तो.

लांबवालांबव (स्त्री. ना.) चोरभयादि कारणास्तव कोणेक वस्तु पूर्वाधिष्ठित स्थलापासून दूर जाई असें करण्याचा जो व्यापार तो.

लांबाउगवें (वि०) (ग्रं०) श्रेष्ठ.

लाभ (सं. पु. ना.) द्रव्यादि पदार्थांची जी प्राप्ति तो. २ धान्यादिकाचें माप घालते वेळेस मोजतांना वरकत यावी म्हणून एक या स्थानीं प्रथमतः याचा प्रयोग करितात.

लाभणें (धा. ना.) लाभणें. २ लग्न, मुंज, इ० कर्तव्य जे संस्कार ते किं० मुहूर्त इ० गुरु, चंद्र इ०काचे बळामुळें इष्टकालीं करण्यास शुभप्रद होणें.

लायक (अर० वि०) ज्या कर्माविषयीं जो योग्य तो त्यास किं० जें कर्मादि ज्यास योग्य तें त्यास.

लाल (फा० वि०) तांबडा जो रंग तो किं० त्या रंगानें युक्त जें वस्त्रादि तो. २ वस्त्रादिकाचे तांबडेपणाचा अतिशय वर्णावयाचा असतां तांबडा या शब्दापुढें याचा प्रयोग करितात. उ० तांबडालाल. ३ (पु. ना.) माणकासारिखें एक रत्न आहे. ४ एक पक्षी आहे. तो हरीचा लाल आहे म्ह० हरि शब्देकरून ईश्वराचा प्रिय प्राणी आहे असा अर्थ.

लालची (सं. लालसा) (स्त्री. ना.) कांहींएक व्यापारांत जो लोभ उत्पन्न होतो किं० कोणी करितो तो. २ (वि०) द्रव्यादिकाचा लोभ ज्यास फार तो.

लालन (सं. न. ना.) पुत्र इ०कास मागितलेला जो पदार्थ तो द्यावा, कर-

तील तसें करूं द्यावें, त्याजवर माया करावी, चुंबन आलिंगनादि करावें, इ०केंकरून त्याचें मन संतुष्ट करण्याचा जो व्यापार तें.

लालसें (न. ना.) (ग्रं०) प्रीतीनें खेळविण्याचा व्यापार तें.

लालित्य (सं. न. ना.) सुंदरत्व; परंतु भाषण, काव्य इ०कांचे ठायीं अर्थरचनाकरून किं० पदरचनाकरून जें सौंदर्य असतें त्याविषयीं विशेषेंकरून प्रयोग.

लालूच (स्त्री. ना.) लालची मुख्यार्थी.

लाव (वि०) (ग्रं०) घातक.

लावणी (स्त्री. ना.) शेत इ०कांची जी लागवड ती. २ भात इ०कांचें रोप किं० वृक्षाच्या डाहाळ्या, ऊंसाचीं कांडीं इ० शेत इ०कांत लावण्याचा व्यापार ती. ३ कविता ग्रंथाची एक जाति आहे.

लावणें (धा. ना.) लागे असें करणें. २ कोणेकास अधिष्ठित स्थळापासून दुसरेकडे घालविणें. कोणेकास लावून बोलणें म्ह० दुसऱ्याचे अंतःकरणास लागायाजोगा जो कोणेक दंश तो धरून बोलणें. ३ वाडी, मळा इ०कांत लाविलेला जो वृक्षसमुदाय तें. ४ (ग्रं०) तोडणें.

लावण्य (सं. न. ना.) सौंदर्य.

लावालाव (स्त्री. ना.) परस्परांचा द्वेष, कलहादि उत्पन्न व्हायाजोगा, याची गोष्ट त्याजपाशीं, त्याची गोष्ट याजपाशीं सांगावी किं० पदरचेही अधिक उणें सांगावें इ० रूप जो कोणेकाचा व्यापार ती.

लाविणें (धा. ना.) (ग्रं०) जाळणें.

लास (पु. ना.) वायु इ०कांच्या उपद्रवनिरसनार्थ लोहादि तापवून जो शरीरावर डाग देतात तो.

लासी (स्त्री. ना.)(ग्रं०) मांजरी.

लासें (न. ना.) मनुष्यादिकांचे शरीरावर किं० आम्रादि फलांवर जें कृष्णवर्ण चिन्ह असतें तें. २ लासूर.

लाहणें (धा. ना.)(ग्रं०) लाभणें.

लाहलहात (वि०)(ग्रं०)लसलशीत.

लाहिणें (धा. ना.) (ग्रं०) लाहणें.

लाही (स्त्री. ना.) द्विदल धान्याहून इतर धान्य किं० क्षारादि भाजलें असतां फुलून होतो जो परिणाम ती. २ क्रोधादिकानें शरीराची होत्ये जी संतप्तता ती.

लाहो (पु. ना.) तृप्त न होतां जितकें घेववेल तितकें घ्यावें न घ्यावें अशा बुद्धीनें कोणेक अर्थाचा घेतात लाभ तो. २ कोणेक गोष्ट कितीं वेळ झाली किं० कोणेक वस्तु किती मिळाली तथापि तृप्ति होऊं नये असा जो कोणेकास इच्छातिशय असतो तो. ३ (ग्रं०) लाभ. ४ छंद. ५ लोभ.

लाळ (सं. लाला) (स्त्री. ना.) मुखांतील जो बुळबुळीत द्रव ती. २ तोंडांतून लाळ गळावी, पाय कुजावे असा एक गुरांस रोग होत असतो ती. कोणेकानें कोणेक वस्तुविषयीं लाळ घोटणें म्ह० अभिलाषानें ही वस्तु मला मिळेल तर बरें आहे असा ध्यास करीत असणें.

लाक्षणिक (सं. वि० ) लक्षणेनें जाणायाचा जो अर्थ तो.

लिखणें (धा.ना.)(ग्रं०) लिहिणें.

लिंग (सं. न. ना.) चिन्ह. २ व्याकरणांत पुरुषत्व, स्त्रीत्व, नपुंसकत्व असे भेद दाखविणारें पदार्थमात्राच्याठायीं जे धर्मप्रत्यक्ष किं० शास्त्र, लोकरूढी, यांवरून ग्राह्य ते प्रत्येकीं ३ शिश्न. ४ शाळुंकेत थित जी हस्तपादाद्यवयवशून्य शिवमूर्ति ते. ५ लिंगाईत लोक शरीरावर शिवमूर्तिधरेंकरून जो खडा दंडांत किं० रूप्याचे शाळुंकेत घालून गळ्यांत बाळगितात ते. ६ आपणास स्वातंत्र्येंकरून वर्तायास नडणारें जें कांहीं किं० आपल्या कर्तव्य कार्यास प्रतिबंधक जें कांहीं त्यास म्हणतात.

लिगटणें (धा.ना.) ( ग्रं० )लागणें, स्पर्शणें.

लिंगदेह (सं. पु ना.) पांच ज्ञानेंद्रियें, पांच कर्मेंद्रियें, पंचप्राण, आणि मन, बुद्धि, अशीं सत्रा मिळून जो सूक्ष्मदेह तो.

लिंगभेद, भेदु, भेदू, (पु. ना.) लिंगदेहाचा भेद तो. २ (ग्रं०)पुरुष जे वडील इ० त्यांचा उच्छेद तो ३ वैषम्य.

लिगाड (न. ना.) लचांड.

लिचपिचीत ( वि० ) सामान्य भार पडला असतांही पिचपिच लवतो असा वेत इ० पदार्थ तो.

लिथाडणें (धा. ना.)(ग्रं०) बरबटणें. २ लाथाळणें.

लिंपण ( स्त्री. न. ना. ) पात्रादिकांस कांहीं धान्यादि पदार्थ ठेवून त्यावर तृण. इ० घालून वरते शेण, चिखल यांणीं लिंपून जें आच्छादन करितात तें. तो.

लिंपणें (धा.ना.) फुटलेली भिंत, बीळ, इ० पदार्थ, भोंकें, खळगा इ० बुजून चांगलें व्हावयाजोगें शेण, चिखल इ०कांचे लेपानें युक्त करणें. २ चूना, भोंटा इ० चिखल, चुना, यांचे गोळे मारून मारून रचणें. ३ (ग्रं०)लिप्त होणें. ४ भिजणें.

लिपि (सं. स्त्री. ना.) लेख.

लिप्त (सं. वि०) शेण, चिखल इ० सद्रव पदार्थांचे लेपानें जो युक्त तो. २ ज्याचा निर्वाह केल्यावांचून आपली सुटका नाहीं असें जें कोणेक कर्म, किं० त्यापासून उत्पन्न झालेला दोषादिक त्याचे संबंधात सांपडलेला जो तो.

लिंबलोण ( न. ना. ) कोणेकास दृष्टिबाधादि विकार झाला असतां किं० न व्हावा म्हणून मीठ, मोहऱ्या इ० पदार्थ ओंवाळून टाकण्याचा जो व्यापार किं० त्याकरितां घेतलेले जे पदार्थ ते.

लिभास ( अर० पु. ना. ) वस्त्रदेशभेदेंकरून, किं० जातिभेदेंकरून जो भिन्न भिन्न वस्त्रालंकारादि धारणाचा प्रकार तो. २ लवाजमा.

लिलाम, व ( न. ना. ) कोणेक वस्तु विकावयाचें असतां अनेक घेणारांस बलावून अनुक्रमानें किंमत चढवीत चढवीत शेवटीं किंमत ठरेल तसि

विकावें असा जो विकयाचा प्रकार तें. २ तशा प्रकारानें विकावयाचा जो माल त्यास कचित् ह्मणतात.

लिबलिबीत (वि०) मृदु, शिथिल, असा जो पदार्थ तो.

लिसाळ (वि०)(ग्रं०) ढिसाळ.

लिहिणावळ (स्त्री. ना.) पुस्तकादि लिहविलें असतां तत्संबंधीं जें त्या लिहिणारास द्रव्य द्यावें लागतें तें.

लिहिणें (धा. ना.) लेखणी इ० साधनानें अक्षर लिपि असा व्यापार करणें.

लिहिणेंपुसणें (न. ना.) कागद इ० लिहिणें. हिशेब करणें इ० जो कारकून, लेखक इ०कांचा व्यापार तें. २ लेखपत्र. [२ लेख.

लिही (स्त्री. ना.)(ग्रं०) शब्दोच्चार.

लीद (स्त्री. ना.) हत्ती, उंट, घोडा, गाढव, खेचर, यांची जी विष्ठा ती. २ एक वेल आहे.

लीन (सं. वि०) कोणेक अर्थाचे ठायीं लय पावला जो कोणेक अर्थ तो. २ विनयानें नम्र जो कोणेक तो.

लीप (सं. लिपि) (स्त्री. ना.) शास्त्रव्यवहारांत किं० लौकिकव्यवहारात उच्चारांत येतात जे वर्ण त्यांच्या, लिहावयाजोग्या संकेतानें निश्चित केल्या ज्या रेषाचिन्हरूप व्यक्ति, ती; जी संकेतानें भिन्न भिन्न असते.

लीला (सं. स्त्री. ना.) क्रीडा.

लुकण (न. ना.) दगड, लांकूड, इ० कांचा सांधा बसावा, देवादिकांचे अंगास कवच करावें, इ०कासाठीं शेंदूर, राळ, चुना, मेण इ० पदार्थ एकत्र करून जें विशिष्ट द्रव्य करितात तें. २ तेणेंकरून त्या संधिप्रदेशादिकांचेठायीं करितात जो लेप तें.

लुकड (वि०) शरीरानें केवळ कृश तो.

लुच्चा (अर० वि०) लुच्चेगिरी, सोदेगिरी इ० करण्याचा स्वभाव ज्याचा असा जो हलका मनुष्य तो.

लुच्चा (वि०) चहाडी, प्रतारणा इ० असभ्य कर्म करण्याचा ज्याचा स्वभाव तो.

लुटणें (धा. ना.) कोणेक स्थळीं कोणेकाचे विद्यमान जे धान्यराशि, वस्त्रें, द्रव्य इ० पदार्थ त्यांतें अनेक चोर, पेंढारी, राजदूत, किं० ग्रामस्थ लोक, भिकारी इ०कांनीं ज्याचे हातास जें लागेल तें उठवावें अशा रीतीनें हरून नेणें. २ कोणेकाचा द्रव्यादि विषयाचा कोणेकानें कपटादिनिमित्तद्वारा अपहार करणें.

लुटारी, लुटारू (पु. ना.) लुटणारा जो मनुष्य तो.

लुटूफुटू (अव्य०) पाहिजे तो अर्थ वास्तविक नसतां केवळ मनःकल्पनेनें कल्पावा अशा प्रकारें खेळणें इ० कार्यें वि०. प्रायः मुलांचे खेळांत प्रयोग.

लुटूफुटूचा (वि०) लुटफुट अशा प्रकारें कल्पिलेला पदार्थादि तो.

लुंठण (न. ना.) लुंठन.

लुंठन (सं. न. ना.) लुटण्याचा जो व्यापार तें. २ फल, पुष्प, पर्ण इ० जें वृक्ष, लता इ० संबंधी सर्वस्व त्याचें अपहरण त्यास ह्मणतात.

लुडबुडणें (धा. ना.) लुडबूड करणें.

लुडबूड (स्त्री. ना.) कोणी काहीं उद्योग करीत असतां त्याला साहित्य व्हावें म्हणून कोणी मध्यें मध्यें भाषण किं० इकडचें तिकडे ठेव, तिकडचें इकडे ठेव इ० व्यापार करूं लागतो; तेणेंकरून साहित्य न होतां उगीच गडबड मात्र होते असें असतां त्या अप्रयोजक व्यापारास म्हणतात.

लुतिजणें (धा. ना.) (ग्रं०) गलत्कुष्ट व्याधिनें युक्त होणें.

लुबरा (वि०) आपणास तादृश ज्ञान नाहीं आणि अधिकारही नाहीं आणि इतर निवारणही करितात असें असतां कोणेक व्यवहारांत पुढें बोलण्याचा ज्याचा स्वभाव तो किं० टवळाटवळ, खटपट, इ० करण्याचा ज्याचा स्वभाव तो.

लुबलूब (अव्य०) लुबरेपणाचें जें बोलणें त्याचें वि०.

लुबाडणें (धा. ना.) हरण करणें.

लुबुधका (स्त्री. ना.) (ग्रं०) पारध.

लुब्ध (सं. वि०) कोणेक विषयावर लोभाविष्ट झाला जो तो.

लुब्धक (सं. पु. ना.) पारधी. २ मृग नक्षत्राजवळ एक तारा आहे तो.

लुला (सं. लोल)(वि०) जन्मतः किं० रोगादिकामुळें केवळ निर्जीव लडबड लोंबायाजोगा झालेला जो हात किं० पाय किं० तद्विशिष्ट मनुष्यादि तो. २ खरूज, उठाणूं, इ०कामुळें कार्याविषयीं असमर्थ झालेला जो हस्तपादादि त्यासही म्हणतात. ३ ताठपणा ज्याचे अंगीं नाहीं असा जो वात, दोरी इ० पदार्थ तो.

लुलाय (पु. ना.) (ग्रं०) रेडा.

लुसलुशीत (वि०) कोंवळेपणामुळें टवटवीत आणि मृदुत्व ज्याचे अंगीं आहे असा जो फलादि पदार्थ तो. किं० मनुष्यादिकांचें शरीर इ० तो.

लूट (स्त्री. ना.) लुटण्याचा जो व्यापार तो. २ त्या व्यापारानें लब्ध जें द्रव्य तो. ३ पैका, धान्य, इ० संबंधी पांच द्यावयाचे त्यास पंचवीस द्यावे, शेरभर द्यावें तेथें चार शेर द्यावें अशा प्रकारचा अन्नादि वाटणें, देणें, इ० विपुलतेंकरून जो व्यापार त्यास म्हणतात. ४ कोणेक पदार्थाची अतिशयित होते जी समृद्धि, जेणेंकरून त्या पदार्थास कोणी विचारीनासें होतें तो.

लूता (सं. स्त्री. ना.) कोंतीण. २ कोळी म्हणून जो किडा तो.

लेंकरालेंकरीं (अव्य०) पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें वृत्ति इ० उपभोगणें, चालणें इ०कांचें वि०.

लेंकरूं (न. ना.) बालक. २ वडील जें पित्रादिक त्यास जें अपत्य किं० त्यासारखें अन्य कोणी तें.

लेंकरूंबाळ (न. ना.) पोरबाळ, मूलबाळ.

लेंकवळा (पु. ना.) आपल्या रांखेच्या पोटीं उत्पन्न झाला जो पुत्र तो. २ आपणापासून स्वस्त्रियेवांचून इतर स्त्रियेचे ठायीं उत्पन्न झाली जी संतति तो आपला.

लेंकविता (पु. ना.) (ग्रं०) बाप.

**लेख** (सं. पु. ना.) लेखनव्यापारानें कागद इ०कावर जी अक्षरांची रचना तो. २ (न. ना.) एकादि संबंधाचे जे पाडे मुलें शिकत असतात ते प्रत्येकीं. ३ (सं. पु. ना.) देव ४ (ग्रं०) लेखा.

**लेखक** (सं. पु. ना.) बाळबोध इ० लिपीनें ग्रंथ लिहून देऊन तत्संबंधी द्रव्यानें उपजीविका करितो तो २ लिहिणारा जो कारकून तो. ३ (वि०) लिहिणारा.

**लेखणी** (सं. लेखनी)(स्त्री. ना.)बरू इ०कांची लिहिण्यास उपयोगी करितात ती.

**लेखणें** ( धा. ना. ) कोणेक अर्थास कोणेक रूपें मानणें. २ जुमानणें. इ०

**लेखन** (सं. न. ना.) लिहिण्याचा जो व्यापार तें.

**लेखा** (पु. ना.) हा अनुल्लंघनीय, हा भारी, हा शाहणा, हा दुर्धर इ० रूपेंकरून कोणेक अर्थाचे अंशीं गणनीयता असत्ये तो. २ (ग्रं०) गणित, गणती.

**लेचापेंचा** (वि०) कोणेक कार्यनिर्वाहार्थ असा खबरदार असावा तसा नव्हे असा जो कोणेक अर्थ तो.

**लेंडिया** (पु. ना.)(ग्रं०)लेंडओहोळ.

**लेंडी** ( स्त्री. ना. ) घोडा, उंट, घूस, उंदीर, इ०कांचे विष्ठेच्या पडतात ज्या गोळ्या त्या प्रत्येकीं. २ घोड्याचें खोगीर पुढें न सरकावें म्हणून दांडीखालून घ्यावयाचा त्यास संबद्ध केला असतो जो बंद ती.

**लेंडोरा** (पु. ना.)( ग्रं० ) अमंगळ अशा लेंड्या तो.

**लेणें** (धा. ना.) अलंकारार्थ शरीरावर काजळ, कुंकूं, भूषणें, इ० धारण करणें. २ ( न. ना. ) शरीरास शोभा देणारें जें अलंकारादि तें. ३ चैत्रमासीं गौरीच्या उत्साहाकरितां भिंतीवर जें गोपुर इ० काढितात तें. ४ डोंगर कोरून आंत सभामंडप, देवालयें, गुहा, नानाप्रकारचीं चित्रें इ० कृत्य कोठें कोठें प्राचीनानीं केलेलें आहे त्यास म्हणतात. ५ (ग्रं०) (धा. ना.) ग्रहण करणें, घेणें.

**लेप** (सं. पु. ना.) चिखल, कालवलेला चुना, ओषधीचा रस, काष्ठाचें उगाळलेलें गंध इ० शरीर, भिंत, इ०कांवर सारविणें इ० व्यापारानें लाविलें असतां जी त्वचारूप अवयवासारिखी त्या चिखल इ० द्रव्याची रचना होत्ये तो. २ शरीरादिकांवर ज्याचा लेप करायासाठीं सिद्ध केलें जें द्रव्य तो. ३ लेंप. ४ (ग्रं०) बाहुलें.

**लेपणें** (सं. लेपन) (धा. ना.) चंदनादिकांचे लेपानें देवादिकांचें अंग लिप्त करणें.

**लेपन** ( सं. न. ना. ) भिंत इ०कावर चिखल इ०कानीं लेप करण्याचा व्यापार तें. २ शरीरादिकांवर लेप करण्याविषयीं उद्दिष्ट चंदनादि तें.

**लेवें** (न. ना.)(ग्रं०) बाहुलें, चित्र.

**लेश** (सं. पु. ना.) कोणेक पदार्थाचा जो किंचित् अंश तो.

**लेसा** (स्त्री. ना.)(प्रं०) चांगली रीत. २ (वि०) मर्यादेचा.

**लो** (पु. ना.)(प्रं०) छंद, व्यसन.

**लोक** (सं. पु. ना.) मनुष्य, दैत्य, देव, गंधर्व, अप्सरा, इंद्रादि दिक्पाल, ब्रह्मा, विष्णु, महेश्वर इ०कांचीं रा हावयाचीं जीं भिन्न भिन्न स्थानें आहेत तीं प्रत्येकीं. २ जन. ३ कोणी-एक विधानार्थे तो, हा, तूं, मी इ० निर्देशनानें पृथक्करून जो जीव किं० जीवसमुदाय त्याहून इतर जे सर्व ते. उ० तू मात्र शाहाणा, लोक काय वेडे आहेत. ४ परकी जो कोणी मनुष्य तो. ५ राजे, सरदार इ०-कांजवळ किं० किल्ला, शहर, इ०-कांचे संरक्षणादिकांसाठीं ठेविले असतात जे रक्षक ते प्रत्येकी. ६ जाति, गुण, इ० भेदक धर्मानें त्या त्या मनुष्य, दैत्यादि समुदायाचा भेद इष्ट असतां त्या त्या जातिवाचक शब्दापुढें याचा प्रयोग होतो. उ० ब्राह्मणलोक, गवईलोक, इ०.

**लोंकर** (सं. लोम) (स्त्री. ना.) पशु-मनुष्यादिकांचे शरीरावरील जो केशसमुदाय ती; परंतु दाढी, मिशी, डोकीं, घोड्याची आयाळ, दाढी इ० स्थानचे जे मोठमोठे जाड केस त्याविषयीं प्रयोग नाहीं.

**लोकसंग्रह** (सं. पु. ना.) सर्व लोकांस वर्तनाविषयीं न्याय्य ज्या रीति तदनुसार आपण वर्तलें नसतांही आपल्यास प्रत्यवायादि नाहीं, परंतु आपण त्या रीति सोडिल्या असतां आपल्या दृष्टांतेंकरून लोकही सोडतील आणि बुडतील तसें न व्हावें म्हणून त्या त्या आचरणद्वारा त्या त्या रीतींचा कोणी करितो जो अंगीकार तो.

**लोकालोकीं** (अव्य०) प्रत्यक्ष दर्शन नसतां किं० लेखादि प्रमाण नसतां केवळ लोकप्रवादद्वारा कोणेक गोष्ट ऐकणें इ०कांचें वि०. २ स्वयें आपण किं० आपलेस्थानीं आपला पुत्र, सेवक, इ० नसतां केवळ लोकांचे हातून कांहीं काम होणें, करणें, इ०कांचें वि०.

**लोकैषणा** (सं. स्त्री. ना.) लोकांनीं बरें म्हणावें, हांसूं नये, वाईट म्हणूं नये, अशी जी इच्छा ती. २ कर्मेंकरून प्राप्त होतात जे स्वर्गादि लोक तद्विषयक जी इच्छा ती.

**लोकोत्तर** (सं. वि०) सर्व लोकांपेक्षां उत्कृष्ट जो मनुष्य, किं० त्याचें सामर्थ्य, सौंदर्य इ० तो.

**लोकोपकार** (सं. पु. ना.) वाट बांधणें, वाटेवर पाणी करणें, धर्मशाळा बांधणें, इ० कर्मांनीं लोकांवर उपकार तो.

**लोकोपचार** (सं. पु. ना.) जें करावयाविषयीं शास्त्राज्ञा, आपली हौस इ० प्रयोजक निमित्त तादृश नाहीं; परंतु न केल्यास लोक आपणास हासतील, वाईट म्हणतील म्हणून केवळ लौकिकसंरक्षणार्थ करावा लागतो तदाचरणरूप उपचार तो.

**लोंचट, ड** (वि०) तुटतां तुटत नाहीं असा जो भाकर, पोळी, काष्ठ इ० पदार्थ तो. २ अनेकवार निषेध केला असतांही स्वकार्यसाधनार्थ

ष्टण्याचा स्वभाव ज्याचा असा जो मनुष्यादि त्यास म्हणतात.

**लोचन** (सं. न. ना.) नेत्र.

**लोट** (पु. ना.) अकस्मात् वेग प्राप्त झाल्यामुळें जमावानें चाललेला जो उदक, वायु, इ०कांचा पुंज किं० मनुष्यसमुदाय इ० तो. २ धान्यादिकांची अतिशयित जी समृद्धि तो.

**लोटणें** (धा. ना.) कोणेक पदार्थास, गाड्याचें चाक जसें आपल्या भोंवतें फिरत फिरत चालतें त्या गतीनें पुढें चालविणें. २ ढकलणें. ३ कोणेक स्थळीं कोणेक अर्थानें प्रवृत्तपणें येणें. ४ (ग्रं०) चुकविणें.

**लोटपोट** (स्त्री. ना.) नृत्य, गीत, नाटक, इ०कांचे श्रवणादिकेंकरून अंतःकरणात पराकाष्ठेचा चमत्कार वाटून त्या त्या रसानें भरून गेल्यासारखी श्रोते इ० कांची होत्ये जी अवस्था ती. २ (वि०) ती अवस्था झाली आहे ज्याची असा जो श्रोता इ० तो.

**लोटांगण** (न. ना.) ईश्वरादि प्रतिमेपुढें आडवें पडून चक्रासारिखें लोटत जाण्याचा जो व्यापार तें किं० वसें लोटत जात असतां जे शरिराचे फेरे होतात ते प्रत्येकीं. २ पर्वतादिकांवरून खालीं गडबडत येतो जो पाषाणादि पदार्थ त्याचे जे आपलेभोंवते फेरे होतात त्यास प्रत्येकीं म्ह०.

**लोड** (पु. न. ना.) वस्त्रांत कापूस इ० भरून शिंवून मृदंगाकार पदार्थ ओठिंगायासाठीं करितात तो-तें. २ (स्त्री.) तुरपून शिवलें असतां जो वातीसारखी रचना होत जात्ये ती.

**लोढणें, लोंढणें** (न. ना.) ओढाळ जे गुरूं इ० पशु त्याणें पळूं नये म्ह० त्याचे गळ्यात बांधितात जें लाकूड तें. २ आपणास इच्छेंई वागण्यास प्रतिबंधक जें बायको, पोर इ० कांहीं असतें त्यास म्हणतात.

**लोंढा** (पु. ना.) पाणी इ० सद्रव पदार्थाचा अकस्मात् जो लोट येतो तो.

**लोणा** (पु. ना.) भातांत एक जाति आहे. २ जमीन, माती, यांचे अंगीं असतो जो क्षारांश, ज्याचे योगानें तेथें निरंतर ओल असतो तो.

**लोथ** (स्त्री. ना.) माजून भारी पुष्ट झालेलें जें मनुष्यादिकांचें शरीर तें. २ मरण, निद्रा, अडखळणें, इ० कारणामुळें खालीं पडलेलें जें शरीरमात्र तें. ३ फार मोठें जें फणस इ० फळ त्यास म्हणतात. ४ (ग्रं०) मोट.

**लोधणें** (धा. ना.) (ग्रं०) झोंबणें. २ चिकटणें.

**लोप** (सं. पु. ना.) अभाव, नाश. २ (ग्रं०) लोथ.

**लोंबकळणें** (धा. ना.) लोंबणें या अर्थी, परंतु त्या स्थितीस संकटावस्था असतां प्रयोग.

**लोंबणें** (धा. ना.) कोणेक पदार्थानें वर असणाऱ्या कोणेक आश्रयास आश्रयून खालीं न लागतां अंतराळीं हालायाजोगे स्थितीनें असणें. २ कोणेक आरंभिलेलें कार्य शेवटास न जातां लोंबणीवर पडून तसेंच राहाणें. ३ कोणेक कार्याचे उद्देशानें प्रवृत्त झाला जो कोणीएक त्याणें तें

काम हस्तगत न होतां सोडतां नये, धरतां नये अशी अवस्था पावून क्लेश पावत असणें.

लोभ (सं. पु. ना.) कांहींएक पदार्था-च्या लाभाविषयीं उत्कट जी इच्छा तो. २ कोणेक वस्तुविषयीं हें म-ला सुटूं नये अशी जी बुद्धि तो. ३ कोणेकावर हा माझा अशी अस-ल्ये जी बुद्धि तोणेंकरून त्याचें सर्व-था बरें असावें असा पक्षपात अस-तो तो.

लोम (सं. न. ना.) रोम.

लोलंगता (स्त्री. ना.)(ग्रं०) आसक्ति.

लोलुप (सं. वि०) लुब्ध.

लोष्ठ (सं. न. ना.) ढेकूळ.

लोह (सं. न. ना.) लोखंड. २ (ग्रं०) सुवर्णरूप धन.

लोहचुंबक (सं. पु. ना.) लोखंडास आकर्षिणारा असा एक पाषाण आहे. २ कोणेकापासून द्रव्यादि काढून घेण्याविषयीं आरंभिलें असतां अनेक युक्ति कराव्या, झटावें, चिकटावें इ०-केंकरून द्रव्यादि काढल्याशिवाय सोडायाचें नाहीं असा स्वभाव ज्या-चा त्यास म्हणतात.

लोहबंद (वि०) (ग्रं०) सोनेरी.

लोहवी (स्त्री. ना.)(ग्रं०) तांबूसपणा.

लोहित (सं. वि०) आरक्त.

लोहीव (वि०) (ग्रं०) तांबडा.

लोळ (पु. ना.) सवेग जो अग्नीचा कल्लोळ तो.

लोळकंड (स्त्री. ना.) लोळण.

लोळण (स्त्री. ना.) कोणी आपणास बलात्कारानें कोठें नेऊं लागलें असतां जाऊं नये, किं० कोणापाशीं कांहीं हटानें मागावें इ० कारणास्तव भू-मीवर लोळत पडावें अशी जी श-रीराची स्थिति ती.

लोळणें (धा. ना.) खालचें अंग वर, वरचें खालीं होई असें भूम्यादिकांवर इतस्ततः चलनविशिष्ट होणें. २ व-स्त्र, पात्र, इ० कोणेक पदार्थ कार्या-वर विनियुक्त नसतां अव्यवस्थितपणें इकडे तिकडे पडला असणें किं० मनुष्यादिकानें धंदा, रोजगार, इ० ज्या कामाचे अधिकारावर असावें तो अधिकार नसल्यामुळें निरुद्योग-पणें अंधारांत पडल्याप्रमाणें असणें.

लोळवणें (धा. ना.) लंबाकरणें.

लोळा (पु. ना.) घांटेचे आंत वाज-वायाकरितां जो लोखंड इ०कांचा खिळ्यासारिखा लांबट पदार्थ संबद्ध करितात तो. २ पडजिभेस आरो-पानें म्हणतात. ३ दांत इ०कांनीं कोणेकाचे शरीराचा तोडितात जो लचका तो.

लोळी (स्त्री. ना.) लहान जो घांटेचा लोळा तो. २ तदाकार नाकावाटे येतो श्लेष्मा तो. ३ गाढव इ०कास लोळायाची तलफ येते ती.

लौकिक (सं. पु. ना.) कीर्ति. २ को-णेक गोष्टीची जी वाच्यता तो. ३ (वि०) लोकांत प्रसिद्धपणें चाल-लेली जी रीत, आचार, संप्रदाय तो. ४ (ग्रं०) अवैदिक म्ह० वेदो-क्त नव्हे, केवळ लोकप्रसिद्ध तो.

लौंद (वि०)(ग्रं०)गलेलठ्ठ. २ दांडगा.

लौल्प (स्त्री. ना.) (ग्रं०) आशा.

## —व—

व– हा वर्ण एकुणतिसावें व्यंजन आहे. (अव्य०) आणि.

वकटें (न. ना.) संकेतानें घुबडास म्हणतात.

वंकनाळ (न. ना.) (ग्रं०) ज्या वाटेनें मातेनें खाल्लेला अन्नरस गर्भास पोंचतो तें नाळ.

वकील (अर० पु. ना.) राजा, वादी, प्रतिवादी, इ०कानीं इतर राजा, किं० न्यायाधीश, इ०कांपाशीं आपले तर्फेचें बोलणें बोलायाकरितां किं० तिकडे होईल वर्तमान तें आपणास कळावयाकरितां ठेविला असतो जो अधिकारी तो.

वकूब (अर० पु. ना.) मोठा एकादा व्यवहार अंगावर घेऊन संभाळावा, सभा, दरबार, इ० स्थळीं न भितां न घसरतां, उत्तर, प्रत्युत्तर इ० करावें, इ० विषयीं उपयुक्त जो ज्ञान आणि धैर्य मिळून अंगीं प्रभावविशेष असतो तो किं० अंगीं स्वभावसिद्ध जी अक्कल असते तो.

वक्त (पु. ना.) वेळ.

वक्ता (सं. वि०) बोलणारा जो तो. २ (पु.) वादप्रतिवादादि वाग्व्यापार करण्याविषयीं जो कुशल तो.

वक्त्र (सं. न. ना.) मुख.

वक्र (सं. वि०) वांकडा. २ वक्री.

वक्रदृष्टि (सं. वि०) जो ज्याकडे विरुद्ध भावानें पाहतो तो त्याजवर. २ (स्त्री. ना.) विरुद्ध भावरूप जी दृष्टि ती.

वक्रावलोकन (सं. न. ना.) वक्रदृष्टि. २ (ग्रं०) चोरून हळूच पाहण्याचा व्यापार तें.

वखार (स्त्री. ना.) विकायाचा जो माल तो सांठवून ठेवायाकरितां बांधिलें असतें जें स्थळ ती.

वग (स्त्री. ना.) ज्यापासून आपलें कार्य व्हावयाचें तत्संबंधी जो कोणी त्याला आपले कार्याविषयीं अगत्य वाद पडायाजोगी ओळख देख, स्नेहभाव, शरीरसंबंध, इ० कांहींएक संबंधामुळें त्याशीं आपली असते जी जवळीक ती.

वंग (सं. न. ना.) कथील.

वंगण (न. ना.) करकर वाजूं नये, झिजूं नये, हलका यावा, इ०कारणास्तव गाडा, रहाट, इ०कांचे कणा इ० अवयवांस लावितात जें तेल इ० तें.

वगळणें (धा. ना.) क्रमानुरोधानें संबंध होण्याविषयीं प्राप्त झालेला जो कोणेक अर्थ त्यास, त्या संबंधानें संबद्ध न करितां सोडणें.

वंगु, गू (पु.ना.)(ग्रं०) कलंक. २ वंग.

वगैरे (फा० अव्य०) आदि करून या अर्थी. उ० मामलेदार, फडणवीस वगैरे.

वच (न. ना.) (ग्रं०) भाषण.

वंचक (सं. वि०) वंचना करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

वंचक (स्त्री. पु. ना.) कोण्यावेळेस हा

काय करील, काय बोलेल, इ० रूप जें कोणेकाचें भय असतें तें. तो.

**वचचणें** (धा.ना.)(प्र०)समर्पण करणें.

**वचणें** ( धा. ना. ) ( ग्रं० ) वेचणें. २ नासणें. ३ जाणें.

**वंचणें** (धा.ना.) प्रतारणा, कपट इ०-कांनीं कोणेकास ठकविणें. २ वगळणें. ३ अंतरलें जाणें.

**वचन** (सं. न. ना.) भाष. २ भाषण किं० ऋषि इ०कानी उक्त जी श्लोकादिरूप रचना तें, परंतु या शब्दाचा प्रयोग प्रमाणत्वेंकरून ग्रहणादिप्रसंगीं या अर्थी होतो.

**वंचन** (सं. न. ना.) प्रतारणा.

**वंचना** (सं. स्त्री. ना.) वंचन.

**वचपा** (पु. ना.) कोणेक कर्मांच्या ठायीं द्रव्यादि पदार्थ किं० स्थान, काल, इ०कांहींएक ज्याप्रमाणें लागावें, करावें, मिळावें, इ० विवक्षा असतां त्याहून अधिक, किं० उणें झालें असतां त्या प्रमाणाची बरोबरी व्हावयाजोगा त्याच प्रकारचे दुसरे कार्यांत त्याविपरीत न्यूनाधिक भावानें साधला जातो जो न्यूनाधिक अंश तो.

**वजन** (अर० न. ना.) पदार्थमात्राचे अंगीं जो भार म्हणून गुण असतो तें. २ त्याची इयत्ता समजण्यास साधनीभूत जो मासा, तोळा, धडा, मण, इ० तीं प्रत्येकीं. ३ मनुष्यादिकांचे अंगीं विद्वत्ता, धनिकता, सभ्यता, इ० कृत असतें जें गुरुत्व तें.

**वज्र** (सं. न. ना.) इंद्राचें जें आयुध तें. २ हिरा म्हणून जें रत्न तें. ३ विद्युल्लता. ४ विद्या, शौर्य, इ० गुणानें दुसऱ्याचा पराभव करण्याविषयीं समर्थ त्यास म्हणतात.

**वज्रपात** ( सं. पु. ना. ) आयुधरूप किं० विद्युल्लतारूप जें शस्त्र त्याचें कोणेक स्थळीं पतन तो.

**वज्रप्राय** (सं. वि०) वज्रासारिखा जो कठीण पदार्थ तो किं० वज्रासारखा आघात ज्याचा असा जो बाण, मुष्टि इ० तो. २ त्यासारखें हृदयांत सलायाजोगें भाषणादि तें.

**वज्रलेप** ( सं. पु. ना. ) चुन्यामध्यें कात, गूळ इ० सरंजाम घातल्यामुळें दृढतारूप गुणविशिष्ट जो चुना तो. २ त्या चुन्याचा करितात जो दगड इ०कांचे संधीस लेप तो ३ न जाण्याजोगा जो लेप तो.

**वज्रांगी** (स्त्री.ना.)(ग्रं०) कवच, चिलखत. २ स्वकर्मास म्हणतात.

**वज्राग्नि** (सं. पु. ना.) (ग्रं०) विद्युल्लतारूप अग्नि तो.

**वज्री** (स्त्री. ना.) पाय घासायाचे उपयोगीं दगड, खंगर, इ०कांचा पदार्थ करितात ती. २ (सं. पु.) इंद्र.

**वटवट** (स्त्री. ना.) विशेष प्रयोजन नसतां कंटाळा यावयाजोगी जी बडबड ती.

**वटारणें** ( धा. ना. ) क्रोध इ० कारणानें कोणेकानें दुसऱ्यास भयप्रदर्शनादिकासाठीं अतिशयित डोळे वासणें.

**वटावणें** (धा. ना.) रुपया इ० नाणें वटवणें. २ कांहीं संकटादिकांपासून पार पडणें.

वठणीस (अव्य०) मर्दन, दमन, इ० व्यापारानें कोणेक पदार्थ नरम येई असें ये, आण, इ०कांचें वि०.

वठणें (धा. ना.) मर्दनादि व्यापारानें कोणेक पदार्थानें वठणीस येणें. २ मुद्रा, रंग, इ०कानीं विवक्षानुरूप उमटणें. ३ कोणेकानें कोणेकास दिला जो शाप इ० त्याणें फलद्रूपता पावणें. ४ सजीव जो मनुष्य वृक्षादि, त्याणें कांहिंएक रोगादिकें-करून शुष्क होणें.

वठ्या (वि०) लठ्ठ्या, दांडगा, असा जो मनुष्य त्यास म्हणतात.

वडप (पु. ना.) (ग्रं०) शृंगार. २ आश्रय. ३ वृष्टि.

वडवा (पु. ना.)(ग्रं०) वाहत्या पाण्यास बांधितात जें धरण तें. २ (सं. स्त्री.) घोडी.

वडवाग्नि (सं. पु. ना.) समुद्रांत जो पुराणप्रसिद्ध अग्नि आहे तो.

वडवाळी (स्त्री. पु. ना.)(ग्रं०) ग्रास.

वडस (पु. ना.) देवी इ० कारणानें नेत्राचे बुबुळावर जो कवडा येत असतो तो.

वडिलोपार्जित (वि०) वडिलांनीं संपादित जें धन, स्थावर इ० तो.

वडील (सं. वृद्ध) (वि०) माता, पिता, आजा, पणजा, इ० जे पूर्वज ते प्रत्येकीं. २ वयानें, किं० विद्या, नातें, याणें जो अधिक तो.

वण (सं. व्रण) (पु. न. ना.) देवी, गळूं, क्षत, इ० बरें झाल्यावर त्या त्या ठिकाणीं शरीरावर जें डागासारखें चिन्ह राहात असतें तो.

वणवण (अव्य०) बहुत श्रम होत असें निरर्थकपणानें प्रायः करणें, फिरणें या धातूंचें वि०.

वणवा (वि०) भोणवा. २ (पु. ना.) डोंगर इ०कांत जो अग्नि पेटत असतो तो. ३ क्रोधादिकानें कोणेकाचे शरीराची होत्ये जी आग तो.

वणिजकरणें (धा. ना.) (ग्रं०) व्यापार करणें.

वणिजें (न. ना.) (ग्रं०) वाणिज्य.

वणोटा (पु.ना.) (ग्रं०)रंगाचा पट तो.

वतन (अर० न. ना.) कोणेकानें कोणेकास दिलें जें पुत्र, पौत्रादि वंशपरंपरेनें चालायाजोगें वृत्ति, क्षेत्रादि उपजीविकासाधन तें.

वतनवाडी (स्त्री. ना.) वतन किं० तत्संबंधी शेत, वाडी, इ० तीं.

वताळ (पु. ना.)(ग्रं०)वार, जखम.

वत्स (सं. पु.न. ना.) गोमहिष्यादिकाचा जो बालक तें.

वत्सल, ळ (सं. वि०) संरक्षणीय जो पुत्र, भक्त, शरणागत, इ० त्याचें अभिमानपूर्वक ममतेनें बरें करण्याचा ज्याचा स्वभाव तो.

वदंता (स्त्री.ना.)जनवार्ता. २ बोलवा.

वंदन (सं. न. ना.) वंदण्याचा व्यापार तें.

वदन (सं. न. ना.) मुखरूप जो शरीरावयव तें. २ (ग्रं०) फळ. ३ विषय.

वदळ (स्त्री. ना.) येणें, जाणें, इ०

व्यापारामुळें कोणेकास मनुष्य, पशु, इ० संबंधी लागतो जो उपद्रव तो.
वदान्य (सं. वि०) उदार.
वंद्य ( सं. वि० ) वंदायास योग्य जो माता पितरें, देव, ब्राह्मण इ० तो.
वध ( सं. पु. ना. ) जिवें मारण्याचा व्यापार तो.
वधू (सं. स्त्री. ना.) स्त्री, परंतु विवाह-योग्य झाल्यापासून प्रौढ होई तों-पर्यंतच लोकव्यवहार आढळतो.
वधूवरें ( न. ना. ) विवाहसमारंभ ज्यांचा चालला आहे ती वधू आणि तो वर अशीं उभयता मिळून जीं तीं.
वंध्या (सं. वि०) जीस अपत्य होत नाहीं अशी जी स्त्री ती.
वंध्यापुत्र (सं. पु. ना.) वंध्या जी ति-चा पुत्र तो इ० त्याचा अभाव.
वंध्यामैथुन ( सं. न. ना. ) निष्फल काहींएक व्यापार त्यास म्हणतात.
वन (सं. न. ना.) अरण्य; साधारण-ही एकजातीय वृक्षसमुदाय त्यास म्हणतात.
वनमाला (सं. स्त्री. ना.) ईश्वराचे कंठांतील पुष्पें, तुळसी, इ०कांची जी आपादलंबिनी माला ती.
वनवास ( सं. पु. ना. ) अरण्यवास. २ प्रवासादि संबंधानें भोगायास प्रा-प्त होतें जें कांहीं दुःख तो.
वनश्री ( सं. स्त्री. ना. ) फळ, पुष्प-संभाररूप जी वनाची शोभा ती.
वनस्पति (सं. स्त्री. ना.) औषधोपयो-गी ज्या लता, वृक्ष, इ० त्या प्रत्येकी.
वनाळ ( वि० ) ज्यास अंगावर वण आहे तो. २ (पु. ना.) वार, जखम.
वनिता (सं. स्त्री. ना.) स्त्री.
वन्हि (सं. पु. ना.) अग्नि.
वपन ( सं. न. ना. ) वस्त्रा इ०कानें डोकी करण्याचा व्यापार तें.
वपु (सं. पु. ना.) देह.
वमक (न. ना.) (ग्रं०) वमन.
वमन (सं. न. ना.) वांति.
वय (सं. न. ना.) उत्पन्न झालेल्या प्राण्याचे उत्पत्तीपासून बाल्य, तारु-ण्यादि अवस्थाभेद करीत अतिक्रांत होत; चाललेला जो काळ तें किं० तत्कृत त्याचे अंगीं असल्ये जी अ-वस्था तें. वयांत येणें म्हणजे तारु-ण्याचे भरांत येणें २ कुपण, वई.
वयसा (स्त्री. ना.) (ग्रं०) वय.
वयसें (न. ना.) (ग्रं०) तरुणपण. २ विस्तार. [किं० वृद्ध तो.
वयस्क (सं. वि०) वयानें जो प्रौढ
वयस्कर (सं. वि०) बाल्यदशा अ-तिक्रमून तरुणदशापन्न झालेला तो.
वयातीत (सं. वि०) म्हातारा.
वयोवृद्ध (सं. वि०) वयानें जो वृद्ध तो.
वर (सं. पु.ना.) अलौकिक सामर्थ्य-विशिष्ट जे ऋषि, साधु, इ० कोणी ते, कोणावर प्रसन्न होऊन तुला अमुक फल प्राप्त होईल इ०रूप अवश्य फलदायक शुभफलविष-यीं त्यास देतात जें वचन तो. २ न-वरा. ३ (वि०) श्रेष्ठ. ४ (अव्य०) उपरिभागाचे ठायीं. ५ कांहींएक संख्या किं० प्रमाण त्याहून पलीकडे. उ० हे आंबे शंभरावर आहेत.

वरकट, कड (वि०) विवक्षिताहून इतर.

वरकर्मी (वि०) अंतःकरणपूर्वक नव्हे असें जें भाषणादि, व आंत ज्याचा प्रवेश नाहीं असा जो रोग, किं० त्याचें शामक औषध, अ० बुद्धि इ०, व ज्यास मूळचा झरा नाहीं असें जें जल, अशा प्रकारचे जे जे पदार्थ त्यांचें तत्तत्प्रतिपादितार्थ-बोधकत्वेंकरून विशेषण होतें.

वरगण (स्त्री. ना.) (ग्रं०) वांटणी.

वरघडी (स्त्री. ना.) वस्त्राची घडी करण्ये समयीं दर्शनीं चांगला अंश यावा ह्मणून अंमळसा बारीक विणून केला असतो जो तदेकदेश ती.

वरघोडा (पु. ना.) वरात इ० अंगलें अनेक घोडीं, गाड्या, इ० समारंभपूर्वक मिरवत जी नवरानवरीची स्वारी निघत्ये ती.

वरचढ (वि०) कोणेकापेक्षां गुणादिकानें जो श्रेष्ठ तो. [२ वारंवार.

वरचावर (अव्य०) हातचे हातीं.

वरचिलें (अव्य०) (ग्रं०) आणखी. २ (वि०) वरलें.

वरटा (सं. स्त्री. ना.) हंसपक्ष्याची स्त्री. २ गांधिल माशी.

वरढाण (स्त्री. ना.) कोणेक पदार्थसंबंधी जो दुर्गंधि ती.

वरणी (स्त्री. ना.) लग्न लागण्येसमयीं नवरीस जें रंगविशिष्ट वस्त्र नेसवीत असतात ती. २ आराध्य देवता इ०कोंप्रीत्यर्थ कोणेकानें ब्राह्मणद्वारा मास, पक्ष, इ० कालनियमानें वरचेवर ब्राह्मण पालटीत असावें अशा प्रकारें चालविलें असतें जें अनुष्ठान ती.

वरणें (धा. ना.) स्वकीय अनुष्ठानादिविषयीं तुम्ही अनुष्ठान करावें असें सांगून त्याविषयीं कोणेक ब्राह्मणास अधिकारी करणें. २ कन्या आणि वर या परस्परांनीं हा माझा पति आणि ही माझी भार्या असें निश्चित करणें.

वरदळ (न. ना.) घरावर कवलें किं० तृण इ० घालावयाकरितां वांसे इ० पसरून जी रचना करितात तें. २ वदळ. ३ वजन. ४ (ग्रं०) (पु०) वरील भाग.

वरदी (वि०) ज्यास ईश्वरादिकांपासून वर प्राप्त झाला आहे असा जो पुरुष, कुळ इ० तो.

वरपंगीं (अव्य०) (ग्रं०) वरवर.

वरपडा (वि०) (ग्रं०) गुतलेला.

वरपडी (स्त्री. ना.) (ग्रं०) मिठी. २ उडी. ३ मुरकुंडी. ४ झड, झडप.

वरपेकरी (वि०) (ग्रं०) लुटारू.

वरपेरकरी (वि०) (ग्रं०) वरपेकरी.

वरप्रस्थान (सं. न. ना.) स्वगृहातून किं० जानवसेघरातून विवाहार्थ नवरीचे मंडपांत जावयाकरितां वराचें जें प्रस्थान तें.

वरमणें (धा. ना.) उत्साहानें प्रवर्तमान जो कोणी त्याणें मर्माचें उद्घाटन झाल्यामुळें अंतःकरणांत खोंचेल जाणें. २ फोड, गळू इ०कानें दबलें जाणें.

**वरमाई, वरमाय,मायी** (स्त्री. ना.) वराची माता तीस विवाहसमारंभात ह्मणतात.

**वरबंडी** (स्त्री. ना.) भिंतीचे वरल्या प्रदेशीं दोहीं बाजूंस पाणी ढाळ येई अशी चुना इ० लावून क्रमानें निमोळती आकाराविशेषाची जी रचना करितात ती.

**वरवर** (अव्य०) आंत प्रवेश न करितां, किं० न होतां खोदणें, चोळणें इ० धातूंचें वि०. २ केवळ अंतःकरणापासून नव्हे, बाह्याकारीं मात्र दिसे असें बोलणें, ममता करणें, इ०कांचे वि०.

**वरवळा** (पु.ना.)(ग्रं०) वरचढपणा.

**वरस** (पु. ना.) (ग्रं०) वर्षाव.

**वराक** (सं. वि०) केवळ गरीब, दुर्बळ हलका जो त्यास म्हणतात.

**वरात** (स्त्री. ना.) विवाह झाल्यानंतर वधूसहवर्तमान वरानें आपल्या घरं मिरवत जावें असा जो समारंभ करितात तो. २ (फा० स्त्री. ना.) मामलेदार इ०कांकडेस यावयाचें द्रव्य त्याविषयीं त्यांजवर सरकारांतून करितात जी चिठ्ठी ती. ३ झोंपाळ पाळणा इ० टांगावयासाठीं ज्या मोठ्या जाड्या दोऱ्या करित असतात त्या प्रत्येकीं.

**वरिखणें** (धा. ना.)(ग्रं०) वृष्टिकरणें.

**वरितु, तू** (पु. ना.) (ग्रं०) भ्रतार.

**वरिपडणें** (धा. ना.) (ग्रं०) कांहीं कळेनासें होणें. २ उताणें पडणें, हरलें जाणें. ३ (न. ना.) अज्ञान.

**वरिवंडणें** (धा. ना.) (ग्रं०) सफळ होणें. [कानें श्रेष्ठ तो.

**वरिष्ठ** (सं. वि०) विद्या, वय, इ०-

**वरुषणें** (धा. ना.) (ग्रं०) वर्षाव करणें.

**वरोस** (न. ना.) (ग्रं०) पोट.

**वरोसी** (स्त्री. ना.)(ग्रं०) पोटगीखर्च.

**वर्ख** (अर० पु. ना.) कागदाचे पानाचे वंदाचा जो अर्धा भाग तो. २सोनें इ० धातूंचा भक्षणादिकांसाठीं फारच बारीक पातळ जो पत्रा करीत असतात तो.

**वर्खेल** (स्त्री. ना.) सोनें, रुपें, इ० पासून परीक्षा पाहण्याचे उपयोगी खरखरीत एक दगड आहे.

**वर्ग** (सं. पु. ना.) मनुष्यादि पदार्थांचा जो समुदाय तो. २ अकार, ककार, चकार, इ०कांचे पांच पांच अक्षरांचे जे आठ समुदाय ते प्रत्येकीं. ३ ज्या संख्येनें तीच संख्या गुणिली असतां जो गुणाकार होतो तो. ४ एका ठिकाणाहून अन्यत्र नेमणूक तो.

**वर्गणी** (स्त्री. ना.) समुदायावर समुदितपणेंकरून प्राप्त झालें जें देणें, घेणें, इ० कांहीं त्याची एकेक व्यक्तीवर बसवितात जी वाटणी ती.

**वर्गीत** (स्त्री. ना.) वर्गणी.

**वर्गावर्गी** (स्त्री. ना.) कामगारांच्या बदल्यांचा जो व्यापार तो.

**वर्चस्व** (सं. न. ना.) विद्यादिगुणेंकरून किं० कांहींएक अधिकारादिपदलेंकरून कोणा एकाकडे जें महत्व असतें तें.

वर्ज्य (सं. वि०) ह्या प्रकरणामध्यें जो घेऊं नये म्हणून सांगितलें तो त्यांत किं० संकेतानें कांहींएक विवक्षिता-बाहेर टाकिला तो.

वर्ण (सं. पु. ना.) ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, ह्या चार जाति आणि श्वेत, पीत, रक्त, नीलादि रंग ते व अकारादिक जीं अक्षरें तीं प्रत्येकीं. २ व्रण ह्मणून जो एक रोग आहे त्यास ह्मणतात.

वर्णन (सं. न. ना.) वर्णण्याचा जो व्यापार तें. २ कोणेकाची स्तुति तें.

वर्णना (सं. स्त्री. ना.) वर्णन.

वर्णनीय (सं. वि०) ज्याचें गुणादि-कांचें वर्णन करायास योग्य असा प-दार्थ तो.

वर्णसंकर (सं. पु. ना.) ब्राह्मणक्षत्रि-यादि वर्णांचा व्यभिचारादिकांनीं झा-ला जो संकर तो.

वर्णोच्चार (स. पु. ना.) अकारादि व-र्णांचा जो स्पष्ट उच्चार तो.

वर्तणूक (स्त्री. ना.) वर्तण्याचा जो संप्रदाय तो.

वर्तणें (धा. ना.) कोणेक रीतीचा आश्रय करून तीप्रमाणें आचरत असणें. २ कांहींएक गोष्ट घडली असणें. ३ (ग्रं०) कोणी कोणेक स्थ-ळीं विद्यमान असणें. [पार तें.

वर्तन (सं. न. ना.) वर्तण्याचा व्या-

वर्तमान (सं. न. ना.) बातमी. २ (वि०) कोणेक काल, देश, या अधिकरणीं आहेपणानें जो विशिष्ट तो. ३ विद्यमानकालाचें वि०.

वर्तोळा (पु. ना.) एका शिक्याचें नाणें सराफ इ०कांस देऊन दुसऱ्या शिक्याचें नाणें घेऊन त्याचा जो वर कांहीं बट्टा येतो तो किं० विवक्षि-त प्रमाणानें धान्यादि मोजून वर जो वाढवा येतो तो.

(सं. वि०) वाटोळा.

(स्त्री. ना.) वरळप्रथमार्थीं.

वर्धमान (सं. वि०) वृद्धिदशापन्न जो तो.

वर्म (न. ना.) मर्म.

वर्य (सं. वि०) श्रेष्ठ.

वर्ष (सं. न. ना.) द्वादशमासात्मक जो काल तें. २ (ग्रं०) (पु. ना.) वर्षाव.

वर्षणें (धा. ना.) मेघानें वृष्टि करणें. २ कोणेकावर बाण, अग्नि इ०कांची वृष्टि करणें. [काळ.

वर्षाकाल, ळ (सं. पु. ना.) पर्जन्य-

वर्षानवर्ष (अव्य०) प्रतिवर्षीं. २ अ-नेक वर्षात्मक काल त्यास व्यापून.

वर्षाव (पु. ना.) पर्जन्यादिकांची वृष्टि.

वर्षाशन, सन (सं. न. ना.) ब्राह्म-णादिकांचे उपजीविकेसाठीं सरकार इ० प्रतिवर्षीं जें नियमानें धन, द्रव्य, देत असतात तें.

वऱ्हाड (न. ना.) वर आणि वधू यांचें होतें जें लग्न तें. २ मुंग्या इ०-कांचा चालत असतो जो समुदाय त्यास म्हणतात.

वलभा (स्त्री. ना.)(ग्रं०) आवड.

वलय (सं. न. ना.) बांगडीचे आ-

काराचा जो कंकण इ० पदार्थ तो

वलाट (वि०) (ग्रं०) वलाळ्य.

वलें, व्हें (न. ना.) गलबत चालवा-यास साधनभूत एका लाकडाचे दांड्यास फळीचा तुकडा लावून जो पदार्थ करीत असतात तें. २ पोंहणें इ० प्रसंगीं हस्त, पाद, या शरीरा-वयवांसही आरोपानें म्हणतात.

वल्कल (सं. न. ना.) नेसायाकरितां जी वृक्षाची अंतरसाल काढीत अ-सतात तें.

वल्गना (सं. स्त्री. ना.) अंगीं सामर्थ्य नसतां अरे जा, तो काय समजला आहे, एका क्षणात मी त्याचें पारिपत्य करीन इ० रूप जो भाषणप्रकार तो.

वल्लभ (सं. पु. ना.) भर्त्ता किं० त त्सदृश जो परमप्रिय तो.

वल्लभा (सं. स्त्री. ना.) प्रिया.

वल्लभी (स्त्री. ना.) (ग्रं०) मनोरम स्थळास म्हणतात.

वल्ली (सं. स्त्री. ना.) लता. २ (वि०) स्वच्छंदानें वागणारा जो मनुष्य तो.

वल्हें (न. ना.) वलें.

वश (सं. वि०) आर्जव, सेवा, द्रव्य इ० द्वारा जो ज्याणें अनुकूळ केला तो त्यास.

वंश (सं. पु. ना.) कुळ. २ पुत्र, नातू इ० रूप जी संतति तो. ३ वेळू.

वशीकरण (सं. न. ना.) कोणी आ-पणास वश व्हावा म्हणून जें मंत्रा-दि साधन करीत असतात तें.

वशीला (अर० पु. ना.) वग. २ ज्याची वग ज्याला असते तो त्याचा.

वसणें (धा. ना.) कोणी कोणेक स्थ-ळीं राहणें. २ ग्राम, देश, इ०-कानीं वसतीनें युक्त होणें.

वसंत (सं. पु. ना.) चैत्र आणि वै-शाख हे दोन मास मिळून किं० मी-न मेष ह्या दोन संक्रांति मिळून जो द्विमासात्मक काळ तो.

वसता (वि०) (ग्रं०) वरपडा.

वसति (सं. स्त्री. ना.) ग्राम, देश इ० कोहींएक स्थळीं जी मनुष्यादि-विशिष्ट गृहादिकांची स्थिति ती. २ कांहींएक स्थळीं एकरात्रादि काल जी स्थिति ती.

वसन (सं. न. ना.) चिरगूट.

वसवसणें (धा. ना.) वसवस शब्द-पुरःसर क्रोधादि कारणानें कोणेका-नें कोणेकाचे अंगावर ओरडणें.

वसात (स्त्री. ना.) वसतिप्रथमार्थी. २ ओस पडलेला जो गाव इ० तो पुनः वसविण्याचा जो व्यापार तो.

वसाहत (स्त्री. ना.) वसात.

वसुंधरा (सं. स्त्री. ना.) पृथ्वी.

वसुधा (सं. स्त्री. ना.) वसुंधरा.

वसुमती (सं. स्त्री. ना.) वसुधा.

वसू (न. ना.) नांगराचा फाळ, गा-ड्याचें चाक, मुसळ इ०कांच्या टों-काकडल्या प्रदेशीं जें लोखंडाचें व-लय बसवितात तें.

वसूल (अर० पु. ना.) सरकार किं० सावकारलोक इ०कांस कुळांनीं

क्षेत्रभ्रमणादिसंबंधी देय जें द्रव्य तो किं० त्यापासून आलें जें द्रव्य तें. २ कूळ इ०कांकडील द्रव्याचा उगावा तो.

वसोट, टा, टी (स्त्री. पु. ना.)(ग्रं०) वसति. २ वसतीचें स्थान. [वसोट.

वसौट, वसौटा (स्त्री.पु.ना.)(ग्रं०)

वस्त (सं. वस्तु)(स्त्री. ना.) सुवर्णादिकांचा जो अलंकार तो. २ जिन्नस अशा रूपानें विवक्षित जो पदार्थ तो.

वस्तभाव ( स्त्री. ना. ) अलंकारादि पदार्थसमुदाय तो.

वस्तवानी (स्त्री. ना.) वस्तभाव.

वस्ताद ( अर० पु. ना.) ज्या विद्याकलादि गुणांमध्यें जो पुरा तो त्यामध्यें. २ तें विद्यादि शिकविणारा जो तो; परंतु गायन, नृत्य, तालीम, कुस्ती, अशा कलांचा जो शिक्षक त्याविषयींच प्रयोग. ३ जो ज्याचा दमनकर्ता तो त्याचा.

वस्ती (स्त्री. ना.) वसति.

वस्तु (सं. न. ना.) यच्चयावत् जे पदार्थ ते प्रत्येकीं.

वस्तुगत्या ( सं. अव्य० ) परमार्थतः किं० विचारानें पाहतां.

वस्तुतः (सं. अव्य०) वस्तुगत्या.

वस्त्र (सं. न. ना.) कापूस, रेशीम, लोंकर, इ०कांचे तंतु विणून नेसणें, पांघरणें, इ० उपयोगीं करितात जो रचनाविशेष तें. कोणेकास वस्त्रें होणें म्ह० दिवाणगिरी इ० अधिकार प्राप्त होणें. [दि कुंडें इ० तें.

वस्त्रपात्र (सं. न. ना.) वस्त्र, भांवस्त्रप्रावरण (सं.न. ना.) वस्त्र, उपवस्त्र, इ० तें.

वहमा (अर० पु. ना.) प्रत्यक्ष अनुभव नसतां केवळ हेतुदर्शनावरून याणें अमुक कर्म केलें असेल, यापाशीं अमुक द्रव्य असेल, इ०रूप कोणेकाविषयीं कोणेकाचे मनांत झाला असतो जो निश्चय तो.

वहाण (स्त्री. ना.) नदी इ०कांचा जो वेगविशिष्ट प्रवाह तो. २ चालतांना पायांस कंटकादि न लागावे म्हणून जी चर्माची पादुका केली असते ती.

वहावणें (धा. ना.) जलादि प्रवाहांत पडलेल्या पदार्थानें त्या प्रवाहाबरोबर जाणें. २ भाषणादि व्यवहारीं कोणेकानें घसरणें.

वहिलें (अव्य०)(ग्रं०) सत्वर, लौकर.

वाहिलेपण (न. ना.) (ग्रं०) वेग.

वहिवाट (स्त्री. ना.) संसार, जकात, दिवाणगिरी, राज्य इ० जीं खटलीं तीं, लेखन, कृषिकर्म, इ० तत्साधनभूत व्यापारांनीं चालविण्याचा जो व्यापार तो. २ शेत, वाडा, वतन, वृत्ति, अलंकार, इ० जें उपभोग्य वस्तु त्यातें आपल्या भोग्यकोटींत वर्तविण्याचा व्यापार तो. ३ देणें, घेणें, बोलणें, चालणें, इ० ज्या यथायोग्य क्रिया तद्द्वारा त्या त्या अर्थांचा संबंध घडे असें जें त्या अर्थांशीं वर्तन तो.

वही ( स्त्री. ना. ) बहुल्याचे भोंवतीं उतरंडी रचायाकरितां आणितात जो मडक्यांचा समुदाय तो. २ चोपडी.

३ कुपण. ४ ( ग्रं० ) प्रतिबंध, आडकाठी. [शेत, इ० तो.

वहीत ( वि० ) लागवड जी जमीन,

वहीम (अर० पु. ना.) वहमा.

वळ (पु. ना.) मांड्या, काखा, कान, यांचे संधिप्रदेशीं लांबट असें एक उठाणूं होत असतें तो. २ सूत्र, दोर, इ०कांस जो पीळ असतो तो. ३ (पु. स्त्री. ना.) काठी इ०कांचे प्रहारानें तदाकार जें शरीरादिकांवर चिन्ह उठतें तो. ती. ४ हात, पाय, इ०कांस वायूचे उपद्रवानें जो व्यथाविशेष उत्पन्न होतो तो. ५ (स्त्री.) ओळ.

वळकटी (स्त्री. ना.) बिछाना, तक्या, आंथरी, इ०कांची करितात गुंडाळी ती.

वळगिणें (धा. ना.) (ग्रं०) बोलणें.

वळघ (स्त्री. ना.) (ग्रं०) वेध.

वळघणें ( धा. ना. ) उच्चस्थानादि कारणामुळें कष्टसाध्य जो कोणेक अर्थ त्याचे लाभाविषयीं अतिशयित प्रयत्नानें त्याजवर झटून पडणें. २ (ग्रं०) वेंघणें. ३ बसणें.

वळचण (स्त्री. ना.) गृहादिकांचे मूळपायाचे बाहेरला पागोळ्यांचे आंतील जो प्रदेश ती. २ गृहादिकांचे पाखयाचा जो अग्रप्रदेश ती.

वळण (सं. वलन) (न. ना.) अक्षर, चित्र, शरीर, किं० तदवयव, इ० पदार्थांचे आकाराचे भेदक जे लांबट, उभार, उंचवट, चापट, धपकट, इ० अनेक प्रकार ते प्रत्येकीं. २ संसारादि व्यवहारीं वर्तनाविषयीं लागलीं असल्ये जी परी, वाईट रीति तें. ३ कोणेक मनुष्यादिकांशीं किं० कोणेकस्थळीं चालत असतो जो देणें, घेणें, जाणें, येणें, इ० व्यवहार तद्द्वारा त्या मनुष्यादिकांची आणि आपली असल्ये जी साहजिकपणें व्यवहारसंबंधिता तें. ४ नदी इ०कांचें पाणी इच्छितस्थळीं न्यावयासाठीं बांधितात जें धरण तें. ५ मार्ग, काठी, इ०कांस सरळपणा सुटून धनुष्याकार आली असल्ये जी वक्रता तें. ६ इष्टप्राप्ति आणि अनिष्टनिरसन यांचे उपयोगी दरबार इ०कांचे ठायीं बांधीत असतात जें संधान तें.

वळणें ( धा. ना. ) स्थितिमान् किं० गतिमान् जो कोणेक मनुष्यादि अर्थ त्याचे स्थितीचा किं० गतीचा कोणेक दिशेकडे असतो जो रोख, तो तदितर दिशेकडे होई असें त्या मनुष्यादिकानें फिरणें. २ कोणेक दिशेकडे रोख धरून चाललेले जे मनुष्य, गुरें इ० त्यांस कोणेकानें इच्छित इतर दिशेकडेस रोख होई असें फिरविणें. ३ गुरें, शेळ्या, इ० गुराखी इ०कानें चारायास नेणें, आणणें, इ० व्यापारानें रक्षिणें. ४ अक्षर, चित्र, इ०कानें विवक्षित वळणानें विशिष्ट होणें. ५ अक्षरादिक वळणशुद्ध निघायाजोगें हस्तानें त्या व्यापारीं घटलें जाणें. ६ वायूच्या उपद्रवानें हात, पाय, इ०कांनीं विलक्षण व्यथाविशिष्ट होणें.

वळवळ (स्त्री. ना.) सर्प, कातू, इ० जे प्राणी त्यांचे अंगास मोडी पडत

असें जें चलनवलन तें. २ मनुष्या-दिकानीं या कुशीहून त्या कुशीस वळावें, त्या कुशीहून या कुशीस वळावें, इ० रूप जें त्यांचें चलनवलन तें. ३ कोणेक विषयींचा अंतःकरणास लागल्ये चटपट ती. ४ दुसऱ्याचा कोणेक व्यापार पाहणें इ० कारणामुळें अंतःकरणाचे ठायीं तें तें करावें, अन्यथा चैन पडूं नये असा उत्पन्न होतो कांहीं विकारविशेष ती. ५ वळावळ.

**वळसा** (पु. ना.) वेढा. २ (ग्रं०) गलबला. ३ घोंटाळा. ४ उपद्रव. ५ फेरा, झपाटा. ६ अडचण.

**वळसें** (वि०) (ग्रं०) अधिक.

**वळही** (स्त्री. ना.) (ग्रं०) गंज.

**वळी** (स्त्री. ना.) घोडें इ०कांचे पाठीस खोगीर इ० न लागावें म्हणून त्याचे खालीं घालायाकरितां उशीसारिखे दोन अवयव एकत्र शिवून करितात जो पदार्थविशेष ती. २ वळकटी. ३ (ग्रं०) वेग.

**वळू** (पु. ना.) घोड्या काढवायाकरितां नियुक्त केला असतो जो घोडा तो.

**वक्षस्थल** (सं. न. ना.) उरस्थल.

**वाई** (अव्य०) (ग्रं०) वाया, व्यर्थपणानें.

**वाइलें** (वि०) (ग्रं०) निराळें, भिन्न.

**वाईट** (वि०) पाहिजे ते गुण नाहींत, आणि नसावे जे गुण ते ज्यामध्यें आहेत, असा जो पदार्थ तो.

**वाउगा** (वि०) (ग्रं०) वावगा.

**वाउधान** (न. ना.) (ग्रं०) व्यवधान.

**वाउर** (वि०)(ग्रं०) वाईट. २ वाउगा.

**वाक्** (सं. स्त्री. ना.) वाणीप्रथमार्थी.

**वांकडा** (वि०) उजू शब्दार्थाचा प्रतिपक्षी तो. कोणेकाचें कोणेकाशीं वांकडें पडणें, असणें म्ह० त्याचा त्याचा विरुद्धभाव पडणें, असणें किं० परस्परांनीं विरोधी असणें. कोणेकाचें वांकडें पाऊल पडणें म्ह० त्याचे हातून कदाचित् परदारागमनादि एकादें दुष्कर्म घडणें.

**वांकडातिकडा** (वि०) वांकडा इ० तो.

**वांकण** (न. ना.) मार्ग, नदी, काष्ठ इ० पदार्थांस मनुष्याकार असल्ये जी वक्रता तें.

**वांकणें** (अ. ना.) वृक्ष, शरीर, इ० पदार्थांनीं वक्रताविशिष्ट होणें. २ मनुष्यादिकानें औद्धत्य सोडून नम्र होणें. [तृतीयार्थी.

**वाकब** (अर० वि०) माहीतद्वितीय-

**वाका** (अर० पु. ना.) सरकार, पंच, इ०कांस निवेदनीय जें स्वस्वव्यवहारसंबंधी इत्थंभूत वर्त्तमान तो.

**वांकुडी** (स्त्री. ना.) (ग्रं०) पावसाची दाट जी सर ती. [२ चेष्टा.

**वांकुलिया** (स्त्री. ना.) (ग्रं०) निंदा.

**वांकुल्या** (स्त्री. ना.) कोणेकानें खिजावें म्हणून त्याचे पुढें हात नाचविणें, किं० वेडीं वांकडीं तोंडें विचकणें, अ० त्याच्या, कांहीं वांकडें चालणें, तोत्रें बोलणें, इ० रूप ज्या खोडी असतील त्यांचा अनुकार करणें, इ० ज्या चेष्टा त्या.

वाकें (वि०) (ग्रं०) चांगलें.
वांकोण (न. ना.) (ग्रं०) बांक.
वाक्य (सं. न. ना.) एका क्रियेशीं क्रियाकारकभावादि संबंधानें अन्वित होणारीं जीं अनेक पदें त्यांचा त्या क्रियापदानें विशिष्ट समुदाय तें २ धर्मशास्त्रादिसंबंधी शास्त्रार्थबद्ध जो गद्यपद्यात्मक पदसमुदाय तें
वाक्यदीप (सं. पु. ना.) (ग्रं०) यथार्थ अशीं वाक्यें तो.
वाखती (स्त्री. ना.) (ग्रं०) भक्ति, भजन. २ चिंता.
वाखल (स्त्री. ना.) क्षुधा इ० कारणानें पोटास पडल्ये जी खळी ती.
वाखा (पु. ना.) मोडशी, हगवण, पोटसूळ, इ० रोगानीं प्रकृतावस्था पालटून जी कांहीं विकृति होत्ये तो.
वाखाणा (पु. ना.)(ग्रं०) व्याख्यान. २ स्तुति. ३ उखाणा.
वाखारी (स्त्री. ना.)(ग्रं०) दुकान.
वाखोरा (पु. ना.) (ग्रं०) घर.
वाग (स्त्री. ना.) जाणें, येणें, बसणें, उठणें, इ० व्यापारानीं सद्व्यापारणें जें कोणेकाचें कोणेकस्थळीं वर्तन ती.
वाग (पु. ना.) सोनें, रुपें, इ०कांस मोरचूत, शिसें, इ०कांचा संबंध असल्यामुळें त्यांजवर जो काळा डाग मारितो तो. २ मनुष्याचे मुखादिप्रदेशीं जन्मतांच असतो किं० कालांतरानें उठतो जो काळसर डाग तो. ३ धातुमय पात्रावर जे हातोड्याचे ठोके असतात ते प्रत्येकीं.
वागणूक (स्त्री. ना.) वाग. २ कोणेकस्थळीं कोणेकानें वागवून घेतल्यामुळें जी कोणेकाची नांदणूक ती.
वागणें (धा. ना.) कोणेक मनुष्यादिकानें गृहादिस्थलरूप किं० राज्यकारभार इ० व्यवहाररूप जें अधिकरण त्याचेठायीं निजणें, बसणें, उठणें, हिंडणें, बोलणें, चालणें, लिहिणें, इ० यथायोग्य स्वस्वव्यापार करीत वर्तत असणें. २ अंतःकरणांत कामक्रोधादि,किं० कोणेक बरी वाईट गोष्ट किं० जनांत कोणेक धर्म, किं० चाल इ० अर्थानीं त्या त्या अधिकरणीं वर्तत असणें.
वागवणें (धा. ना.) गर्भ, ओझें इ० कानें त्यांचा भार संभाळून वाहणें. २ चाकर इ०कांस वागवून घेणें म्ह० त्यांपासून कार्यादिकांत कांहीं अंतर पडलें असतां त्याविषयीं क्षमा करून निभावणी होई असें संभाळून घेणें. [२ सारखेपणा.
वागरा (पु. ना.) (ग्रं०) वागुरा.
वागारें (न. ना.) (ग्रं०) वाग्दोर.
वागुरा (पु. ना.) पारध्याचें जाळें.
वागुल (पु. ना.) (ग्रं०) प्रपंच.
वागेक (पु. ना.) (ग्रं०) वेग.
वाग्दोर (पु. ना.) सारथ्याचे हातांत असतात घोड्याचे दोर ते.
वाग्ब्रह्म (सं. पु. ना.) (ग्रं०) वेद.
वाग्विलासिनी (सं.स्त्री.ना.)सरस्वती.
वाग्शून्य (सं वि०) वाचाहीन, मुका.
वाघर (स्त्री. ना.) आरण्यक जे हरिणादि पशु त्यांस धरायाचें उपयोगी जें जाळ असतें ती.

वाघी (स्त्री. ना.) वाघ्याची भंडार ठेवण्याची वाघाचे कातड्याची पिशवी ती. २ वाघाचे तोंडाची त्वरेनें चालणारी नौका ती.

वाघुरा (स्त्री. पु. ना.)(ग्रं०) जाळें.

वाचणें (धा. ना.) लिहिलेला ग्रंथ, अक्षरें, इ० पाहून तीं त्याप्रमाणें उच्चारणें.

वांचणें (धा. ना.) जगणें.

वाचा (सं. स्त्री. ना.) वाक्.

वाचादत्त (सं. वि०) वाचेनें दिला जो कोणेकास कांहीं अर्थ तो.

वाचाल, ळ (सं. वि०) अप्रयोजकपणें मनस्वी भाषण करण्याचा ज्याचा स्वभाव तो.

वाची (स्त्री. ना.) (ग्रं०) विस्तार.

वाच्यांश (सं. पु. ना.) (ग्रं०) वाचेनें बोलायाजोगा जो अंश तो.

वांच्छा (सं. स्त्री. ना.) इच्छा.

वाज (पु. ना.) (ग्रं०) श्रम.

वाजट (वि०) (ग्रं०) व्यर्थ, निर्फळ. २ वाचाल. ३ वाया.

वांजट (वि०)(ग्रं०) वाजट प्रथमार्थी.

वाजटां (अव्य०) (ग्रं०) अकालीं.

वाजणें (धा. ना.) वाद्यादिकानें शब्दयुक्त होणें. २ कांहींएक गुप्त गोष्ट प्रसिद्धतेस येणें. थंडी, हींव, वाजणें म्ह० लागणें.

वाजतगाजत (अव्य०) वाद्य, गर्जनाप्रधान समारंभानें जाणें, येणें, मिरवणें, इ०कांचें वि०.

वाजवी (वि०) न्याय्य.

वाजा (वि०) (ग्रं०) वीट.

वाजी (सं. पु. ना.) घोडा.

वाजी (स्त्री. ना.) (ग्रं०) अपवाद. २ कंटाळा, त्रास. ३ बोभाट.

वांझ (स्त्री. ना.) वंध्या.

वाझाटी (स्त्री० ना.) (ग्रं०) कल्पना.

वाट (स्त्री. ना.) मार्ग. कांहींएक गोष्टीची होय्ये जी गति तिस प्रसंगविशेषीं म्हणतात. कोणेकानें कोणेकाची वाट पाहणें म्ह० मार्गप्रतीक्षा करणें. वाट मारणें म्ह० वाटेनें जाणारा जो मनुष्य, जिन्नस, इ० तो विवक्षित स्थळीं न जाऊं देतां मधचेमध्यें लुटून घेणें. कांहींएक वाटेवर पडणें म्ह० फुकाचें लागणें, निषेधविषयीं प्रयोग.

वाटकोळ (अव्य०) बहुतवेळपर्यंत. २ (पु. ना.) बहुत जो वेळ तो.

वाटचाचोर, वांटचाचोर (पु. ना.) अमुक वस्तूची अमुक प्रमाणक किंमत भलता कोणीएक देईल असें बोलायाचे प्रसंगीं भलत्या कोणास म्हणतात.

वांटणी (स्त्री. ना.) कांहीं द्रव्यादि पदार्थ वांटण्याचा व्यापार तो. २ त्या व्यापारानें झाले जे पृथक् पृथक् विभाग ते प्रत्येकीं.

वांटणें (धा. ना.) द्रव्यादिरूप कोणेक अर्थाचे अनेक विभाग अनेक विभाग्यांशीं संबद्ध होत अशा प्रकारें तो अर्थ विभक्त करणें किंवा कोणेक अर्थ अंशतः अंशतः अनेक विभाग्यांशीं संबद्ध करणें.

**वाटणें** (धा. ना.) पाटा इ०कोवर कांहीं पदार्थ घालून तो वरवंटा इ०कांचे फिरविण्यानें पाहिजे तसा बारीक करणें. २ कोणेक गोष्टिचा निर्णय व्हावा ह्मणून ती गोष्ट अनेकानीं मिळून विचारपूर्वक घोळणें. ३ कोणेक अर्थ हा बरा, हा वाईट, हा होईल, हा जाईल, हा अमुक, इ० कोणेक रूपेंकरून मनोवृत्तीनें घेतला जाणें. ४ कोणेक गोष्ट इच्छाविषय होणें.

**वाटव** (पु. ना.) (ग्रं०) वाटीव.

**वाटवधा** (पु. ना.) (ग्रं०) अडथळा.

**वाटवा** (पु. ना.) सराफ इ०कांची द्रव्यादि ठेवायाची आकारविशेषाची पिशवी आहे तो.

**वाटसरू** (पु. ना.) स्वकीय गृहादि स्थळापासून निघून देशांतरास किं० ग्रामांतरास जावयास मार्गी लागला आहे जो तो. [करणारें होणें.

**वाटहोणें** (धा. ना.) (ग्रं०) स्तुति

**वांटा** (पु. ना.) एका पदार्थाचे जे अनेक अंश ते प्रत्येकीं.

**वाटाडी, वाटाड्या** (पु. ना.) मार्ग दाखवायासाठीं बरोबर जो कोणी माहितगार घेत असतात तो.

**वाटावाट** (स्त्री. ना.) कोणेक गोष्टींतील तात्पर्यार्थ समजावा इ०कारणास्तव अनेक शंकातर्कादिपूर्वक घोळ्योळून जी चौकशी ती.

**वाटिका** ( सं. स्त्री. ना. ) फुलझाडें इ०कांचा जो बाग ती. [२ बळ.

**वाटीव** (स्त्री. ना.) (ग्रं०) पुरूषार्थ.

**वाटेय** (पु. ना.) (ग्रं०) विषय.

**वाटोळा** (सं. वर्तुल) (वि०) मध्यबिंदूपासून सभोंवताल्या परिधीशीं अंतर सारखें असतें असे आकाराचा जो दगड, स्थळ, इ० पदार्थ तो किं० तो त्याचा आकार. २ लांबट असून गोल असा जो काठी, नळकांडें, इ० पदार्थ तो. कोणेकाचें वाटोळें होणें म्ह० नाश व्यथादि होऊन कांहीं राहिलें नाहीं अशी अवस्था होणें.

**वाड** (न. ना.) वाटें. २ (वि०) (ग्रं०) थोर, मोठें. ३ अधिक.

**वाडपण** (न. ना.) (ग्रं०) थोरपण, मोठेपण. २ अधिकपण.

**वाडव** (पु. ना.) (ग्रं०) वडवानळ. २ (सं. पु.) ब्राह्मण.

**वाडवेळ** (पु. ना.) (ग्रं०) उशीर.

**वाडा** (पु. ना.) श्रीमंत लोकांचें जें मोठें घर तो. २ गुरें, शेळ्या, मेंढ्या, इ० बांधायाकरितां जें वेगळें घर केलें असतें तो.

**वाडी** (स्त्री. ना.) बागायती जमीनीचे आवारादिरूप सीमाचिन्हांनीं जे अनेक विभाग केले असतात ते प्रत्येकीं ती. २ मूळगांवाचे शेजारीं शेत भात इ०कांचे सोईनें गृहादि बांधून जी वस्ती होत्ये ती त्या गांवची.

**वाडेकोड** (न. ना.) (ग्रं०) मोठी आवड. २ मोठें कपट. ३ (वि०) कोडपट. [आवडीनें.

**वाडेकोडें** (अव्य०) (ग्रं०) मोठ्या

**वाढ** (सं. वृद्धि) (स्त्री. ना.) मनु-

त्यादिकांचे शरीराची उत्पन्न झाल्यापासून तारुण्य येई तों उत्तरोत्तर होत चालली असते जी वृद्धि ती. २ ज्या धान्यद्रव्यादि पदार्थांचें संख्याप्रमाण निर्णीत असतें तें धान्यादि पुनः मोजिलें मापिलें असतां मापाचा कमीपणा इ० कारणानें पहिल्यापेक्षां कांहीं अंशानें होतें जें आधिक्य तीं किं० तो अंश ती. ३ (न. ना.) वाढें.

वाढण (न. ना.) पात्रादिकांवर परिवेषण करायासाठीं घेतलें जें भाकर, भात, इ० द्रव्य तें किं० तें परिवेषण करण्याचा व्यापार तें. २ न्हाणवलीस भोजनार्थ सोयरेधायरे किं० शेजारीपाजारी यांजकडून पक्वान्नादि अन्नविशिष्ट जें पात्र येतें तें. ३ अन्यत्र जाऊन भोजन करायाकरितां अन्न वाढलेलें जें कोणेकास पात्र देतात तें.

वाढणें (धा. ना.) भक्ष्यभोज्यादि पदार्थ भोजन करायाचे पात्रांत घालणें. २ भिक्षा, तेल, पाणी, इ० पदार्थ झोळी, समयी, पानपात्र इ० कांत घालणें. ३ कोणेक पदार्थानें पूर्व प्रमाणापेक्षां अधिक प्रमाणविशिष्ट होणें किं० विवक्षित प्रमाणाशीं तुल्यता होऊन कांहीं अतिरिक्त होणें. ४ काजळ, कुंकू, धान्य, इ० पदार्थाविषयीं संपलें हा शब्द अभद्र असें मानून त्या अर्थी या धातूचा प्रयोग प्रायः स्त्रिया करितात. ५ वाढणद्वितीयार्थी.

वाढवा (पु. ना.) वाढद्वितीयार्थी.

वाढी (स्त्री. ना.) सावकारापासून आपले गरजेस्तव धान्यादि कर्ज घेतलें असतां त्याबद्दल व्याजाचे स्थानीं मूळ द्रव्यापेक्षां अधिक जें धान्यादि बोलीप्रमाणें द्यावें लागतें ती.

वाढीदिढी (स्त्री. ना.) वाढीचे बोलीनें कोणी करितो जो व्यवहार ती.

वाढीव (स्त्री. ना.) (ग्रं०) कोंवि.

वाण (सं. वायन) (न. ना.) व्रतादि अंगलेंकरून नारिकेलादि फलें किं० सौभाग्य द्रव्यें, किं० पक्वान्नें, इ० द्रव्यें वंशादिकाचे पात्रांत घालून ब्राह्मणास किं० सुवासिनीस जें देतात तें. २ (पु. ना.) शरीर, वस्त्र, इ० संबंधी जो काळा, पिंवळा इ० वर्ण तो. तें. ३ (स्त्री.) संसारादिकांत कोणेक पदार्थाची जी न्यूनता ती. ४ (ग्रं०) ठसा.

वाणणें, नें (धा. ना.) वर्णन करणें.

वाणिज्य (सं. न. ना.) उदीमव्यापाररूप जें कर्म तें.

वाणी (सं. स्त्री. ना.) शब्दाचे उच्चारास साधनभूत जिव्हानिष्ठ शक्तिविशेषात्मक जें कर्मेंद्रिय किं० त्याची अधिष्ठात्री जी देवता ती किं० जिजपासून उत्पन्न होतो जो वर्णात्मक शब्दसमुदाय ती. २ (सं. वणिक्) (पु. ना.) हिंग, जिरेंमिरें, गूळ, इ० जिन्नस विकणारा जो दुकानदार तो. ३ (स्त्री.) (ग्रं०) वाण किं० तोटा. ४ (अव्य०) कोणेक अर्थाशीं सदृश होई असें होणें, असणें, इ०कांचें वि०.

वाणीउदमी (पु. ना.) वाणी, तांबोळी इ० तो.
वाणीबकाल (पु. ना.) वाणीउदमी.
वाणेउमट (पु. ना.) (ग्रं०) अनेक प्रकार.
वात (सं. वर्त्ति.) (स्त्री. ना.) दिवा लावणें इ०कांसाठीं कापूस, सूत, वस्त्र, यांचा पीळ घालून जो तंतूसारखा अवयव करितात तो. २ (सं. पु.) वायु.
वातट, ड (वि०) ज्याचे अंगीं खुसखुशितपणा इ० नाहीं, अतएव तुटतां तुटत नाहीं असा जो पोळी इ० पदार्थ तो. २ दुसऱ्यानें कितीही धिक्कारिलें, निषेधिलें, असतांही अवमान न मानितां, त्याशीं न तुटतां, निर्लज्जपणें भाषणादिव्यवहार करण्याचा स्वभाव ज्याचा तो मनुष्य, किं० ज्याचें तसें भाषण तें.
वातायन (न. ना.) (ग्रं०) खिडकी.
वाताहत, हात (स्त्री. ना.) जमलेला जो संसार, व्यवहार, फौज, गांव, इ० त्याचे अवयव लुटणें, नागवणें, वाऱ्यानें उडणें, पळणें, मरणें, इ० कारणानें चहोंकडे झाल्यामुळें होतो जो त्या संसारादिकांचा विध्वंस तो.
वांति (सं. स्त्री. ना.) भक्षिलेल्या पदार्थांचें चित्तक्षोभादि निमित्तानें जें मुखाकडून उलटें बहिःपतन होतें तें. २ तोंडांतून पडतें जें अन्नादिक तें.
वातूल, ळ (वि०) बहुतकरून पोट फुगावें, मलशुद्धि साफ होऊं नये, इ० रूप वातविकृतिविशिष्ट प्रकृति, किं० शरीर तो. २ ज्याचे भक्षणानें पोट फुगावें इ० वातविकृति होत्ये असा जो पावटा, हरभरा, उडीद, देवडांगर इ० पदार्थ तो.
वाद (सं. पु. ना.) कोणेक विषयाविषयीं उभयतां परस्पर विप्रतिपन्न होऊन आपआपला पक्ष स्थापनाविषयीं वाग्व्यापारानें करितात जें भांडण तो. २ कोणेक अर्थाचे निर्णयादिकांसाठीं परस्परांचें जें प्रश्नोत्तरादिरूप भाषण तो.
वादविवाद (सं. पु. ना.) वादप्रतिवाद.
वादळ (न. ना.) वृक्ष मोडावे, गलबतें बुडावीं, घरें पडावीं, धुरळा उडावा, इ० अनर्थ व्हावयाजोगा होतो जो वायूचा अतिशय तें.
वादी (सं. पु. ना.) कोणेक अर्थाविषयीं विप्रतिपन्न होऊन वाद करणारे जे उभयतां ते प्रत्येकी. २ कांहींएक निमित्त करून वाद लागण्याचा स्वभाव ज्याचा तो किं० वाद सांगण्याविषयीं जो कुशल तो. ३ वादानें जो अर्थ सिद्ध करण्याविषयीं अभिमान धरिला आहे ज्याणें तो तद्वादी. ४ (स्त्री.) बंधनादि उपयोगी दोऱ्यासारिखा लांबट जो चर्माचा तुकडा तो.
वादीकुडें (न. ना.) (ग्रं०) वादीचें कोडें अ० खेळ तें.
वाद्य (सं. न. ना.) वाजवायाचे उपयोगी जो मृदंग, वीणा, सनई, नगारा, इ० पदार्थ ते प्रत्येकी.
वाधा (पु. ना.) देणें, घेणें, इ० व्यवहारीं झगडा न होतां राहत्ये जी वादविषयिता तो.

वाधावणें (धा. ना.) (ग्रं०) मूळधाडणें. २ (न. ना.) मौन.

वाधावा (पु. ना.) (ग्रं०) मूळ आल्याची सूचना. २ आगमन. ३ अरुणोदय.

वानगी (स्त्री. ना.) ज्या पदार्थांची परीक्षा चाखून होत्ये त्या विशिष्ट पदार्थांची परीक्षा करायाकरितां त्यांतून घेतात जो थोडा अंश तो. २ हुंगून, ऐकून ज्या विषयांची परीक्षा होत्ये असे जे अत्तर, गुलाब, गाणें, इ० विषय त्यांविषयींही प्रयोग होतो. ३ जकातदार इ०कांस उदमी लोक, तसेंच ज्याचा मळा, बाग, इ० आपण खंडानें केला आहे, त्या धन्यास ते माळी इ० जकात, सारा यांशिवाय ऐन जिनसाच्या बोलीप्रमाणें देतात जो अंश तो.

वानवसा (पु. ना.) (ग्रं०) माजघर. २ भोजनशाळा.

वानवसें (अव्य०) (ग्रं०) क्षणभर.

वानवा (पु. स्त्री. ना.) कांहींएक गोष्टीविषयीं होईलच, किं० नाहींच होणार, इ० एकरूपेंकरून निश्चय न होतां असतें जें द्वैविध्य तो. ती. २ त्या द्वैविध्याचा निरास होऊन होय, किं० नाहीं, असा कोणेक गोष्टीविषयीं एकरूपतेचा निश्चय तो. ती. ३ वर्णन.

वानी (स्त्री. ना.)(ग्रं०)कस. २ मोल.

वापरणें (धा. ना.) वस्त्र, शस्त्र, पात्रादि पदार्थ, पांघरणें, तोडणें, धान्यादि सांठवणें, इ० जो त्याचा त्याचा योग्य व्यापार त्याचेठायीं लावणें. २ वागणें प्रथमार्थीं.

वापी (सं. स्त्री. ना.) विहीर.

वापेक (पु. ना.) (ग्रं०) कुलधर्म.

वाफ (सं. बाष्प) (स्त्री. ना.) अग्नि, सूर्यकिरण, इ० तेजःसंयोगानें तप्त जो पाणी इ० आर्द्र पदार्थ त्यापासून जो धुरासारखा अंश निघतो तो. २ (ग्रं०) विधियुक्त कर्म.

वाफा (पु. ना.) वांग्या, मिरच्या, कोथिंबीर, ऊंस, इ० जिन्नस करायाकरितां पाणी लावायाचे सोईचीं चतुष्कोणाद्याकार करितात जीं अनेक क्षेत्रें तीं प्रत्येकीं.

वाफारा (पु. ना.) कांहीं औषधिपदार्थ शिजवून त्याचे वाफेचा जो शरीरास किं० त्याचे अवयवांस घेतात शेक तो.

वामळ (स्त्री. ना.) अभाळें यावीं त्यामुळें नष्ट ऊन पडूं नये, कांहीं गारठा पडावा अशी जी एकाद्या दिवशीं कालावस्था होत्ये ती.

वामा (सं. स्त्री. ना.)(ग्रं०) बायको.

वामाळ (स्त्री. ना.) वामळ.

वामी (सं. स्त्री. ना.) (ग्रं०) घोडी. २ (वि०) वाममार्गी.

वाय (वि०) (ग्रं०) वायां.

वायकळ (वि०) ज्यामध्यें जमेस धरायाजोगा अंश नाहीं असें जें भाषणादि तो.

वायचळणें (धा. ना.) वेड्यासारिखें [होणें.

वायदा (अर० पु. ना.) मी तुला अमुकवेळीं अमुक देईन, तूं अमुक

काम करीन, इ० रूप जो कोणेक गोष्टींविषयीं दुसऱ्याशीं कालनियम करितात तो.

वायबार (पु. ना.) आंत गोळा इ० न घालितां जो नुसता दारू घालून तोफ इ०कांचा बार काढितात तो.

वायवस (वि०) (ग्रं०) लटिका.

वायस (सं. पु. ना.) कावळा.

वायां, वांयां (वि०) व्यर्थ.

वायांणी (वि०) (ग्रं०) वायां.

वायाणें (वि०) (ग्रं०) वायांणी.

वायु (सं. पु. ना.) रूपरहित असून ज्याचा स्पर्श होतो असें पंचमहाभूतांतील एक भूत आहे. २ त्याचाच अंश शरीरांत दोषरूपी असतो तो. ३ त्याचे क्षोभानें होते जी विकृति ती.

वार (स्त्री. ना.) मनुष्यादिकांचा जो गर्भ त्याचें वेष्टन ती. २ (पु. ना.) तरवार इ० शस्त्रांचे प्रहारानें शरीरावर होतो जो छेद तो. ३ सूर्योदयापासून सूर्योदयपर्यंत अहोरात्रात्मक जे दिवस ते प्रत्येकीं. ४कोणेक भिक्षुक इ०कांची एकाचेच घरीं भोजनाची सोय होत नाहीं म्हणून अनेकांचे घरीं भोजनाविषयीं नियमित केला असतो जो एकेक दिवस तो प्रत्येकीं. ५ (अव्य०) वेळा, प्राय: संस्कृत शब्दापुढें योग होतो. उ० एकवार, द्विवार, शतवार इ०.

वारट (पु. ना.) (ग्रं०) अंत, शेवट.

वारण (सं. पु. ना.) हत्ती. २ (न.) कोणेकास कोणेक कर्मापासून मागें फिरविण्याचा व्यापार तें.

वारणें (धा. ना.) निवारणें. २ हस्तादिकेंकरून मक्षिका हाकणें. ३ ऋण फेडणें. ४ मनुष्यानें मरणें या अर्थी संकेतानें म्हणतात. ५ मोरचेल, चवरी, इ० देवता, राजा, इ०कांवर धरून हालविणें.

वारंयावेंघणें (धा. ना.) (ग्रं०) वायु जसा भ्रमतो असें मनानें भ्रमणें.

वारसा (अर० पु. ना.) स्थावरादि द्रव्यावर जो कोणेकाचा स्वत्वसंबंध असतो तो.

वारसी (स्त्री. ना.) (ग्रं०) वृष्टि.

वारापाणी (न. ना.) आपणास प्रतिबंधक जें कर्ज, जामीनगत, इ० खटलें त्याची जिकडील तिकडे व्यवस्था करून जी निःशेषता तें.

वारावार (स्त्री. ना.) ऋणकरी, सरकार, देवता, इ०कांचें जें देणें, घेणें, इ० खटलें उरकायाचें असतें तें जिकडील तिकडे देऊन, घेऊन तोडून, टाकण्याचा जो व्यापार ती.

वारासार (स्त्री. ना.) गृहादिकांत पडलेला जो पात्रादिकांचा पसारा तो व्यवस्थेनें जिकडला तिकडे ठेवण्याचा व्यापार ती. २ वारावार.

वारि (सं. न. ना.) उदक.

वारिका (स्त्री. ना.) (ग्रं०) वेग.

वारिकें (न. ना.) (ग्रं०) कोकरूं.

वारिज (सं. न. ना.) कमळ.

वारिस (अर० पु. ना.) वारिसदार. २ (अव्य०) येणें याच्या योगीं प्रयोग. वांट्यास.

वारू (पु. ना.) घोडा.

वारूळ (न. ना.) मुंग्यांनीं केलेलें मातीचें राहायासाठीं पोकळ घर तें, ज्यांत प्रायः सर्प राहातो. २ एक व्रण रोग आहे. ३ वाल्मीकऋषि यांचें नांव.

वारें (न. ना.) गतिमान् जो वायु तें. कोणेकाचे शरीरावयवांवरून वारें जाणें म्ह० वायुविकृतीनें तो तो अवयव निर्जीव होऊन निरुपयोगी होणें. २ कोणेकाचे अंगीं कोणेक देवतेचें खेळत असनें जें अंशतः स्वरूप तें. ३ कोणेकाचे अंगीं विद्या, कला, किं० सरकारी अधिकार, इ०कांचें प्रवृत्तिप्रयोजक वागत असतें जें स्वरूप तें.

वार्ता (सं. स्त्री. ना.) अमुक स्थळीं अमुक झालें, अमुक दिवशीं अमुक होणार, इ० रूप जो कोणेक व्यवहार त्याची वाचक जी गोष्ट ती. कोणेक गोष्टीची वार्ताही नसणें म्ह० त्या गोष्टीचा सुतरां अभाव असणें असा अर्थ.

वार्षा (स्त्री. ना.) (ग्रं०) पर्जन्यवृष्टि.

वाऱ्याचीमोट (स्त्री. ना.) युक्त्यादिरूप जें एक साधन तेणेंकरून अनेकांचें विवक्षित कार्यादिकांसाठीं आकलन होण्याविषयीं साहित्यभूत जें त्या अनेकांस कांहीं तरी एक बंधारण असावें तें नसल्यामुळें उक्त प्रकारें आकलन करण्याची दुःशकता वर्णायाचे प्रसंगीं त्या अनेकात्मक अर्थास म्हणतात.

वालभ (स्त्री. ना.) (ग्रं०) आवड, प्रीति. २ तद्रूपता.

वालीप, वालीफ (वि०) तंतूंचा बारीकपणा, निर्बलपणा, इ० कारणामुळें घटमूट नव्हे असें जें वस्त्र इ० तें. २ (ग्रं०) (स्त्री. ना.) गवसणी.

वालेंदुलें, वाल्हेंदुल्हें (वि०) (ग्रं०) युग्मरूप.

वावगा (वि०) अयोग्यत्वप्रयोजक जो कोणेक दुर्गुण तेणेंकरून विशिष्ट जो कोणेक मनुष्य, वस्त्र, पात्र, इ० पदार्थ तो किं० न्यायरीतीस विरुद्ध जें आचरण, भाषण इ० तें. २ ज्याचें कांहीं काम नाहीं असा केवळ निरर्थक अर्थ तो.

वावटणें (धा. ना.) (ग्रं०) विश्राम पावणें. २ ओहोटणें. ३ विरामपावणें.

वावटळ (स्त्री. ना.) मंडलाकार भ्रमण पावतो जो मोठा वारा तो.

वावडा (वि०) पावटा, लाक, काळा भोंपळा, इ० जो वातूळ पदार्थ तो. २ ज्या रोगास जो अपथ्यभूत पदार्थ तो त्या रोगास. ३ ज्या व्यवहारादिविषयीं प्रतिकूल जो भाषादि कोणेक अर्थ तो त्या व्यवहारादिकास.

वावंडा (वि०) कोणेक क्रियादिकाचा ज्या क्रमस्थित अर्थावर अनुक्रमानें संबंध होत चालला असतो तो संबंध न होतां त्या क्रियादिकानें अतिक्रमलागेला जो कोणेक अर्थ तो.

वावनी (पु. ना.) (ग्रं०) घोर.

वावर (न. ना.) शेत, मळा इ० करावयाजोगी जी जमीन तिचा विवक्षित मर्यादेनें मानिला जो विभाग तें. २ (पु०) झाडणें, सारवणें, इ० रूप गृहकृत्यसंबंधी नीटनेटकेपणा करण्याचा व्यापार तो. इ०.

वावरणें (धा. ना.) घर, शेत, इ०-कांचेठायीं करायाचें असतात जें झाडणें, सारवणें, वेणणें, इ० उद्योग ते करीत त्या त्या स्थळीं असणें. २ (ग्रं०) फिरणें, भटकणें. ३ घालणें.

वावरिजैणें (धा. ना.) (ग्रं०) व्यवहारणें.

वावली (स्त्री. ना.) (ग्रं०) विस्तार.

वावसें (वि०) (ग्रं०) व्यर्थ.

वावी (स्त्री. ना.) (ग्रं०) गवाक्षद्वार.

वास (पु. ना.) फूल इ० पदार्थांचे अंगचा बरा किं० वाईट गंध तो. २ कोणेक अर्थाचा जो लेश तो. ३ वसतिस्थान. ४ कोणेकाची कोणेक स्थळीं काहीं काळ राहून जी स्थिति ती. ५ (न. ना.) वस्त्र. ६ (ग्रं०) सोय. ७ मार्ग, वाट. ८ मार्गप्रतीक्षा.

वासणें (धा. ना.) मिटलेलें जें तोंड, डोळे, तंगड्या, इ० तें पसरणें. कोणेकाचें वासणें म्ह० दिवाळें निघणें, रोजगार बुडणें, इ० दुर्दशा होणें.

वासन (न. ना.) कापडाचें दिंड ज्या वस्त्रांत बांधितात तें वस्त्र.

वासना (सं. स्त्री. ना.) सर्वांचें बरें व्हावें, किं० वाईट व्हावें, किं० इतरांचें काहीं होऊ, आपलें मात्र बरें व्हावें, इ० रूप निरंतर वाटत असण्याविषयीं कारणभूत जे भिन्न भिन्न चित्तस्वभाव ते प्रत्येकीं. २ अमुक करावें, अमुक पदार्थ भोगावा, इ०-रूप इच्छेनें परिणाम पावली जी अंतःकरणवृत्ति ती. ३ (ग्रं०) पाप पुण्य बीजरूपानें जिच्यांत असतें ती.

वासरमणि (सं. पु. ना.) सूर्य.

वासलात (अर० स्त्री. ना.) आलेला वसूल, झालेला खर्च, इ० मांडायाकरितां एक प्रकारची रेघ काढितात ती. कोणेक गोष्टीस वासलात लावणें म्ह० तपशील लावणें.

वासव (सं. पु. ना.) (ग्रं०) इंद्र.

वासिपणें (धा. ना.) (ग्रं०) वचकणें, भिणें. [वचक. २ काळ, मृत्यु.

वासीप, पू (पु. ना.) (ग्रं०) भय,

वास्तव्य (सं. न. ना.) कोणेकाची कोणेकस्थळीं काहींकाळ राहून जी स्थिति तें.

वास्तु (सं. स्त्री. न. ना.) राहायासाठीं केलें जें गृह ती. तें.

वास्तुशांत, ति (स्त्री. ना.) नवें घर बांधिलें असतां किं० ओसाड घरांत वस्ती करायाची असतां जी शांति करीत असतात ती.

वाहण (न. ना.) (ग्रं०) भजन.

वाहणें (धा. ना.) पालखी, रथ, गाडी इ० जें काहीं एक स्थलांतरीं न्यावयाचें ओझें त्यातें त्याचा भार आपण संभाळून आपले गतीनें गतिविशिष्ट करणें. २ कोणेक पदार्थ, गोष्ट, इ०कांचा भार आपणावर घेऊन त्यास पडूं न देतां विवक्षित स्थितींत धरणें. ३ शेत, झाड, घोडे, बैल, गाडी, गलबत इ० जीं कृषिकर्मादि व्यवहारांचीं कारकें त्यांतें त्या त्या व्यवहाराचा निर्वाहक आपण होऊन त्या त्या व्यवहारीं चालविणें. ४ देवतामूर्ति, ब्राह्मण, इ०कांचे

अंगावर पूजार्थ गंध, पुष्प, अक्षता, इ० पूजाद्रव्यें उचलून ठेवणें. आण, शपथ, इ० वाहणें म्ह० करणें. मनुष्य, पशु, इ० देवता इ०कांस उद्देशून हें सर्वस्वीं त्याचें अशा बुद्धीनें त्यागणें. ५ जलादि सद्रव पदार्थ, किं० वायु, काल, सेना, इ० यांणीं अनुक्रमें पुढचा अवयव पुढें ढकलिला ह्मणजे मागचे अवयवानें तेथें येत असावें अशा प्रकारें उत्तरोत्तर चालत असें करणें. ६ वहाणें. ७ (ग्रं०) वागवणें, वाळगणें, इ०.

वाहन (सं. न. ना.) पालखी, रथ, घोडा, इ० जीं यानें तीं प्रत्येकीं. २ उखळ.

वाहर (पु-स्त्री-ना.)(ग्रं०) बाधकता.

वाहवा (फा० अव्य०) जसा असावा तसा, अतिशयित चांगला जो कोणेक विषय त्याचे साक्षात्कारानें विकास व्हावयाजोगा अंत:करणांत होतो जो आनंद त्याचा हा उद्गार निघतो. २ (स्त्री. ना.) कोणेकाचा विद्या, कला, इ० रूप जो उत्कृष्ट गुण तो लोकांस अनुभूत झाल्यामुळें त्याची वाहवा एतदुद्गारप्रधान लोकांचे मुखें होत्ये जी प्रशंसा तीस किं० कोणेकास दुसऱ्यापासून मिळती जो वाहवा इ०प्रशंसाशब्द त्यास ह्मणतात.

वाहाणी (स्त्री. ना.) (ग्रं०) मार्ग, प्रवाह, रूढी.

वाहिनी (स्त्री. ना.) (ग्रं०) सेना.

वाहिवा (पु. ना.) (ग्रं०) कारभार.

वाहील (न. ना.) वांझ नारळ तें.

वाळ (स्त्री. ना.) रुपया इ० नाण्यास त्याचा कांहीं दोष प्रकट झाल्यामुळें त्याची व्यवहारांत चलन मोडावी असें येतें जें हीनत्व ती. २ वाळीत.

वाळणें (धा. ना.) बाहेरून जलादिकानें भिजल्यामुळें किं० आंतील रस रक्त यांचे योगानें आर्द्र जो पदार्थ त्याणें अग्नि, वायु, सूर्यकिरण, रोग, इ०कांच्या योगानें आर्द्रतारहित होणें. २ खिळा इ० दृढ बसावा ह्मणून विवक्षित अंगास वळविणें. ३ (ग्रं०) निषिद्ध करणें, निरास करणें, टाकणें.

वाळंबा (पु. ना.) चांचड ह्मणून मुंगळ्यासारिखा प्राणी आहे तो. २ वाळवी ह्मणून प्राणी तो.

वाळवंट (न. ना.) नदी, समुद्र, ओढा, यांचे पाण्याबाहेर जी वालुकामय भूमि असत्ये तें.

वाळवी (स्त्री. ना.) वस्त्रकाष्ठादिकांस खाऊन नाश करणारी अशी एक क्षुद्रजाति आहे. २ तद्रूप जो काष्ठ, वस्त्र, इ०कांस रोग लागतो ती. ३ उत्तरोत्तर क्षीणता येण्यास कारणभूत जें शरीरास रोग, चिंता, इ० किं०राज्यादिकांस शत्रुसंबंधादि जडतें त्यास ह्मणतात.

वाळीत (न. ना.) कोणी व्यभिचारादि दुष्कर्म केलेलें प्रकट झालें असतां स्वजातीय मिळून त्यास घालितात जो बहिष्कार तें. २ (वि०) जातिबहिष्कृत केला जो तो.

वाळू (सं. वालुका)(स्त्री. ना.) नदी, समुद्र, इ० कांचें तीर, इ० स्थळीं असतो जो केवळ स्निग्धतारहित मृत्तिकाविशेष ती. २ वाळवंटांतील वा-

रीक बारीक खड्यांचा समुदाय तो. ३ वाळवी.

वि ( सं. अव्य० ) हा उपसर्ग आहे, हा कोणेक शब्दाचे मागें लागतो तेथें विशेषेंकरून किं० विगत, विरुद्ध, इ० अर्थाचा द्योतक होतो, क्वचित् निरर्थकपणेंही असतो.

विकडी (स्त्री. ना.) (ग्रं०) चातुर्य.

विकणें (धा. ना.) काहिंएक पदार्थाचें मोल घेऊन तो पदार्थ ज्याणें मोल दिलें त्याचा करणें. तो त्याचा विकलेला आहे म्ह० अनेक उपकारांमुळें ओशाळा आहे. येथें तुमचें शाहाणपण विकणार नाहीं म्ह० चालणार नाहीं असा अर्थ.

विकरणें (धा. ना.)(ग्रं०)विकार पावणें. २ (न. ना.)नाश. ३ (धा. ना.) विखरणें. ४ प्रकाशणें.

विकरा ( पु.ना.)(सं. विक्रय)काहिंएक पदार्थ विकण्याचा जो व्यापार तो. २ त्या व्यापारानें त्या पदार्थाचा होतो विकलेपणा तो.

विकरी (स्त्री. ना.) विकरा. २ त्याणें लब्ध जें द्रव्य त्यासही म्हणतात

विकल ( सं. वि० ) जो हस्तपादादि अवयव वायु इ० विकृतीनें, किं० मोडल्यामुळें अधू झाला तो. २ तद्विशिष्ट.जो मनुष्यादिक तो. ३ विवक्षित साधनादि जें अवश्य असावें त्याचा अभाव झाल्यामुळें हीन दशा पावला जो व्यवहारादि तो.

विकल्प (सं. पु. ना.) काहिंएक शास्त्रादिविषयीं जें मतद्वय असतें तो. २ कोणेकाविषयीं जी कोणेकाचे मनात, विरुद्ध कल्पना आली ती. ३ काहिंएक कार्याविषयीं ज्या नानाप्रकारच्या कल्पना मनात येतात त्या प्रत्येकीं.

विकसित (सं. वि०) प्रफुल्लित.

विकाऊ (वि०) विकण्याचे उद्देशानें ठेविला जो पदार्थ तो.

विकार (सं. पु. ना.) कोणेकास कामादिकांचा किं० रोगादिकांचा होतो जो उपद्रव तो. २ काहीं कारणानें पदार्थमात्राची पूर्वप्रकृति पालटायाजोगें होतें जें रूपांतर तो किं० रूपांतर होण्यास होतो जो मध्यें काहीं विकार तो. ३ ज्या उपादान कारणापासून जो पदार्थ झाला तो पदार्थ त्याचा. उ० अलंकार हा सुवर्णाचा विकार इ०. २ (ग्रं०) विस्तार.

विकारी (वि०) विकार झाला किं० होतो ज्यास तो. २ (ग्रं०) बाधक. ३ नाशवंत.

विकृति (स्त्री. ना.) विकार.

विकृती (स्त्री. ना.) काहीं कारणानें कोणेक भोग्यपदार्थाचा येतो जो तिटकारा ती.

विकोपास, विकोपीं (अव्य०) जाणें याच्या योगीं प्रयोग, कथा, रोग, इ०काहीं अपथ्य इ० विरुद्ध उपचार पोंचल्यामुळें अतिशयित विषम दशा पावणें.

विक्रम (सं. पु. ना.) पराक्रम.

विक्रय (सं. पु. ना.) विकरा.

विख (न. ना.) (ग्रं०) विष.

विखरणें ( धा. ना. ) धान्य, केश, कागद, इ० पदार्थ अस्ताव्यस्त करणें, पसरणें.

विखार ( पु. ना.) सर्पादिकांचे ठायीं जो विषाचा अंश असतो तो. २ त्याचा होतो जो कोणेकास उपद्रव तो. ३ (ग्रं०) सर्पास म्हणतात.

विखास (पु. ना.) (ग्रं०) श्रम.

विखो (पु. ना.) (ग्रं०) विषय.

विख्यात (सं. वि०) प्रख्यात.

विगत (वि० सं.)नाहींसाझाला जो तो.

विगतविषय (सं. वि०)(ग्रं०) विरक्त.

विगलित (सं. वि०) गलित जो पुष्पादि पदार्थ तो.

विग्रह (सं. पु. ना.) समासादिरूपेंकरून विशिष्ट जें पद त्याचें अवयवार्थप्रदर्शक जें वाक्य तो. २ देह. ३ युद्ध.

विघड ( पु. ना.) अनेक अवयवांच्या योगानें कि० पदार्थांच्या योगानें जो वाडा, रहाट, संसार, इ० सिद्ध होतो त्यांतील कांहीं पदार्थांचा नाशादि झाल्यामुळें जी मुख्य पदार्थास विकलता प्राप्त होत्ये ती. २ स्त्री, पुरुष, मित्र, इ०कांचा जो परस्पर वियोग होतो तो.

विघडणें (धा. ना.) सुघटित पदार्थ, गोष्ट, इ०कांचे अवयव, वियोगद्वारा विध्वंस पावणें.

विघरणें (धा. ना.) तूप, गूळ, मेंण, साखर, कथील, इ० पदार्थ अग्नि, जल, इ०कांच्या योगानें पातळ होणें.

विघ्न (सं. पु. न. ना.) कांहींएक कार्यास प्रतिबंधक जें निमित्त तें किं० त्याची उपस्थिति तें.

विचकट (वि०) बीभत्स जें भाषणादि तो. २ तें करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

विचका (पु. ना.) चिवडा प्रथमार्थी.

विचंबणें (धा. ना.) (ग्रं०) खोळंबणें. २ श्रम करणें. ३ विघ्न करणें. ४ कष्टी होणें.

विचंबु, बू (पु. ना.) (ग्रं०) संकट.

विंचरणें (धा० ना.)गुंतलेले केशादिक फणीनें मोकळे करणें.

विचळणें (धा. ना.) (ग्रं०) भांबावणें. २ आश्रय होणें.

विचक्षण (सं. वि०) शास्त्रादि ज्ञानपूर्वक जो व्यवहारचतुर तो.

विचक्षणा ( सं. स्त्री. ना. ) कोणेक गोष्टीचें परिज्ञान व्हावें ह्मणून अपयशः फोड करून जी चवकशी ती.

विचार ( सं. पु. ना. ) कोणेक गोष्टीविषयीं हें असें असा एकरूपेंकरून निश्चय होण्यास, हें बरें कीं वाईट, हें करावें कीं न करावें, असें करावें किं० तसें करावें, इ० रूप जो अंतःकरणव्यापार होतो तो. २ तेणेंकरून हें असें इ० रूप निश्चयात्मक होत्ये जी कल्पना तो. ३ करावें कोणतें, न करावें कोणतें इ०रूप जी व्यवस्था तत्परिपालनात्मक वर्तनास जी मर्यादा तो. ४विचारणा.

विचारणा (सं. स्त्री. ना.) कोणेक गोष्टीचे निर्वाहाची तोड निघेनाशी झाल्यामुळें कसें करावें, काय करावें,

करावें कीं न करावें, इ० रूप चिंतात्मक जी संकटावस्था प्राप्त होन्ये ती. २ विचारप्रश्नार्थी.

विचारणें (धा. ना.) कोणेक गोष्टीविषयीं कोणेकास प्रश्न करणें. २ द्रव्यादि दानानें किं० मधुर भाषणादिकानें कोणेकाचा परामर्श घेणें. ३ कोणेकास पदार्थबुद्धीनें गणणें. ४ (ग्रं०) विचार करणें.

वेचारपूस (स्त्री. ना.) कांहींएक पदार्थाच्या शोधादिकांसाठीं कोणेकास विचारणें, पुसणें, इ० चौकशी करण्याचा व्यापार तो. २ आला, गेला, इ०कांस कुशल प्रश्नादि विचारणें, परामर्श घेणें असा जो व्यापार तो.

विचित्र (सं. वि०) चित्रविचित्र दिसायाजोगा जो पदार्थ तो. २ दुसऱ्यास आश्चर्यकारक जो मनुष्य, किं० भाषण, आचरण, इ० तो. ३ (ग्रं०) अनेक प्रकारचा. ४ चमत्कारिक. ५ (न.) आश्चर्य.

विच्छिन्न (सं. वि०) छिन्न भिन्न झाली जी मूर्ति इ० तो. २ कांहींएक कारणानें ज्याचा भंग झाला असा तो कोणेकाचा नियम, किं० संसारादि खटलें, किं० वृत्ति, इ० तो.

विच्छेद (सं. पु. ना.) सतत चाललेल्या वृत्तिअनुष्ठानादिकाचा कांहीं निमित्तानें मध्यें होतो जो खंड किं० लोप तो.

विजय (सं. पु. ना.) युद्धादिकांत जो कोणेकाचा होतो जय तो.

विजया (सं. स्त्री. ना.) भांगेस म्हणतात. [तो.

विजयी (सं. वि०) ज्याचा जय झाला

विजवटा (वि०) द्वाड गुणाचा जो मनुष्यादि त्यास म्हणतात.

विजातीय (सं. वि०) विवक्षित जात्यादिकांत नव्हे असा जो मनुष्य, रत्न, इ० पदार्थ तो. २ लोकविलक्षण जो मनुष्य, किं० सामर्थ्य, किं० व्यापार तो. ३ एकजातीय नव्हेत असे जे पदार्थ ते परस्पर.

विजावळी (स्त्री. ना.)(ग्रं०) वेगळेपण.

विजु, जू (स्त्री. ना.)(ग्रं०) विश्रांति. २ वीज.

विझणा (पु. ना.) विंझुणा.

विझणें (धा० ना.) पेटलेला अग्नि, जाळ, मशाल, चूल, इ०कांनीं शांत होणें. २ प्रवृत्त जो कज्जा, युद्ध, क्रोध, इ० त्याणें शांत होणें.

विंझुणा (पु. ना.) पंखा.

विटंकु, कू (वि०) (ग्रं०) निबिड, घनदाट. २ (पु. ना.) जय.

विटणें (धा. ना.) वस्त्रादिकांवरचा पूर्वींचा रंग त्याणें उष्णादिकांमुळें कांहीं काळानें मलिन होणें. २ अन्नादि शिळें झाल्यामुळें त्याणें दुर्गंधीनें विशिष्ट होणें. ३ कोणेक पदार्थाचें बहुत सेवन झाल्यामुळें किं० कोणेक पदार्थाच्या सेवनकाळीं कांहीं अमंगलादिकाचें दर्शन किं० कांहीं दोषबुद्धि इ० कारणामुळें त्या त्या पदार्थाचे उपभोगाविषयीं कंटाळा पावणें. कोणेकाचें कोणेकाशीं विटणें

म्हणजे परस्पर असतें जें सौरस्य तें नाहींसें होणें.

**विटप, पी** (सं. पु. ना.) (ग्रं०) वृक्ष.

**विटंब** (पु. ना.) (ग्रं०) अपमान. २ नाश.

**विटंबना** (स्त्री. ना.) (सं. विडंबना नाक कान कापणें, धिंड मिरवणें, छी थू करणें, इ०रूप जी कोणेकाची लोकांत फटफजीती ती.

**विटाळ** (पु. ना.) ज्यास स्पर्श करूं नये ह्मणून धर्मशास्त्रांत सांगितलें आहे असा जो सुतकी, विटाळशी, माहार, मुसलमान, गाढव, कुत्रें इ० जीव किं० हडूक, विष्ठा, इ० अमेध्य पदार्थ, त्यांचे अंगीं असतो जो अशुचितारूप दोष तो, ज्याचे योगानें त्या पदार्थास स्पर्श झाला असतां स्नान वस्त्रांतर इ० करावें असें शास्त्रांत सांगितलें आहे तो. २ तशा दोषयुक्त पदार्थास स्पर्श झाला असतां स्नानादि करायाजोगी स्पर्शकर्त्याचे अंगीं येते अशुचिता तो. ३ सोंवळा जो त्यास ओंवळ्याचा स्पर्श झाल्यामुळें भोजनादि कर्मांविषयीं जी अशुचिता प्राप्त होते तो. ४ स्त्रियांचे शरीरापासून प्रतिमासीं स्रवतें जें रज तो.

**विटाळु, ळू** (पु. ना.) (ग्रं०) विटाळ.

**विट्ट** (पु. ना.) मनुष्य, किं० कांहीं पदार्थ, गोष्ट, इ०कांची जी फटफजीती तो. २ पराकाष्ठेचा वीट तो.

**विडा** (पु. ना.) खाण्याचे किं० कोणास देण्याचे उद्देशानें एकत्र केलीं जीं नागवेलीचीं पानें, सुपारी, चुना, एतत्प्रधान अनेक द्रव्यें तीं सर्व मिळून तो. २ नागवेलीचे पानांत सुपारी इ० घालून जो आकारविशेषविशिष्ट रचनाविशेष करितात तो. कोणेकानें विडा उचलणें म्ह० कांहींएक दुर्घट कार्याविषयीं हें मी करितों अशी प्रतिज्ञा करणें.

**विडापाऊड** (पु.ना.)(ग्रं०)विडपेता.

**विणकर** (स्त्री. ना.) तंतूनीं वस्त्रादि विणण्याचे जे अनेक प्रकार आहेत, त्या प्रकारानीं विणलें असतां जे अनेक प्रकारचे त्याचे रचनाविशेष होतात ते प्रत्येकीं. [२ विनवणी.

**विणावणी** (स्त्री. ना.)(ग्रं०) उपाधि.

**विणें** (धा. ना.) गाय, म्हैस, इ०कितीएक पशूंनी, किं० पक्षी, कीटक, इ०कांनीं अपत्यानें प्रसवणें; याचा प्रयोग अश्वाविषयीं करीत नाहीत, मनुष्यस्त्रीविषयीं निंदनें करितात. २ केळ, चवेण, यांनी प्रसवणें.

**वितंड, डू** (वि०) (ग्रं०) अघटित. २ विशाळ, प्रशस्त, मोठा.

**वितंडवाद** (पु. ना.) आपला पक्ष वस्तुनः खोटा जाणत असतांही खोट्या युक्तीनें आपला पक्ष सिद्ध करण्याविषयीं आग्रहानें कोणी करितो जो वाद तो.

**वितळणें** (धा. ना.) विघरणें. २ जमलेलें जें अभाळ, राजकारण, पंचाईत, इ० त्याणें फाटाफूट पावून नाहींसें होणें. ३ करुणादि रसानें अंतःकरण द्रवणें.

**विताण** (पु. ना.)(ग्रं०) विस्तार.

वितान (सं. न. ना.) (प्र०) छत. २ (वि०) शून्य.

वितुष्ट (सं. न. ना.) परस्पराचें जें वांकडें पडतें तें [रूप जें द्रव्य तें.

वित्त (सं. न. ना.) पैसा, अडका, इ०

वित्तविषय (सं. पु. ना.) वित्त इ० तो.

विद (वि०) (प्र०) जाणता, ज्ञानी.

विदरा (वि०) (प्र०) कुरूप.

विंदाण, णी (न. स्त्री. ना.) (प्र०) कारागिरी, कुशलता. २ (वि०) कुशल.

विदारण (सं. न. ना.) हस्तादिकानें फल, वस्त्र, पोट, काष्ठ, इ० पदार्थांचे दोन अवयव दोहांकडे ओढून मध्यें फाडण्याचा जो व्यापार तें.

विदित (सं. वि०) परिज्ञान झालें आहे ज्याचें तो विषय.

विदुदयोद्यान (सं. न. ना.) (प्र०) ज्ञानोत्पत्तीचा बाग.

विद्रद (न. ना.) (प्र०) आत्मज्ञान.

विद्यमान (सं वि०) आहेपणानें जो विशिष्ट तो. २ वर्त्तमान जो काळ तो. ३ (स्त्री. न) गुजारत. ४ (अव्य०) दृष्टिदेखता.

विद्या (सं. स्त्री. ना.) पुराण, शास्त्र इ० जीं चतुर्दश ज्ञानसाधनें तीं प्रत्येकीं, कि० तत्तत्प्रतिपाद्य जीं ज्ञानें तीं प्रत्येकीं. २ गायन, चित्र, लेखन, इ० ज्या कला त्यासही ह्मणतात ३ (प्र०) विक्षेपरूप ईश्वरी शक्ति ती.

विद्यार्थी (सं. पु. ना.) गुरुपाशीं विद्येचा अभ्यास करणारा जो तो २ कोणेकाजवळ शागीर्दीचें काम करायास राहिला जो त्यास ह्मणतात.

वैद्युलता (सं. स्त्री. ना) वीज.

वेद्रूप (सं. वि०) राहित्य, कि० कांहींएक अवयवाचें आधिक्य, इ० कारणामुळें विशोभित जो मनुष्यादि तो.

विद्वान् (सं. वि०) वेदशास्त्रादि जाणतो तो.

विंधणें (प्रा. ना) तीर, सामता, इ० कानें शरीर, काष्ठ, मोती, इ० पदार्थ सच्छिद्र करणें. २ (न. ना) किंकरें. [मेला तो

विधवा (सं. स्त्री. ना.) जिचा नवरा

विधाता (सं. पु ना) ब्रह्मदेव.

विधान (सं न. ना.) कोणेक अर्थातें उद्देशून कोणेक धर्मादिकांचे वाक्यें करून जें सत्रधन तें. २ पूजा इ० अनुष्ठान अमुक प्रकारें करावें इ० रूप जें वाक्यनिबंधन तें कि० तदनुरूप जें अनुष्ठान तें.

विधि (सं. पु. ना.) विधान. २ ब्रह्मदेव, ३ दैव.

विधिनिषेध (सं. पु. ना) कोणेक गोष्टीविषयीं हें बरें, हें वाईट, हें करावें, हें न करावें, इ०रूप जो भिन्नभाव तो, जो मानिला असतां वर्तनास कांहीं अडचण पडते.

विधु (सं. पु. ना.) चंद्र.

विधुर (सं पु. ना.) ज्याची स्त्री मेली असतां ज्याणें दुसरें लग्न केलें नाहीं तो. २ (सं. वि०) कांहींएक साधनानें विकल तो.

विध्वंस (सं. पु. ना.) कांहींएका प-

कार्याचा फुटणें, मोडणें, इ०कार्नी जो नाश तो.

विनटणें (धा. ना.) (ग्रं०) कोणेक विषयांत रंगून जाणें, मग्न होणें. २ खेळणें.

विनटु-टू (पु. ना.) (ग्रं०) खेळ.

विनत (सं. वि०) नम्र.

विनति (सं. स्त्री. ना.) विज्ञापना.

विनंती (स्त्री. ना.) विनति.

विनय (सं. पु. ना.) नम्रता.

विनयोगणें (धा. ना.) (ग्रं०) व्यवस्था करणें. २ खाणें. [कर्म.

विनयोदक (न. ना.) (ग्रं०) यथोक्त

विनवणी (स्त्री. ना.) प्रार्थना.

विनाश (सं. पु. ना.) विशेषेंकरून नाश तो.

विनियोग (सं. पु. ना.) योजना.

विनोद (स. पु. ना.) थट्टा. २ अनेक प्रकारें मन रमविण्याचा व्यापार.

विन्मुख (वि०) विमुख.

विन्यास (पु. ना.) (ग्रं०) विस्तार. २ भाषण. [कोडें तें.

विपट (न. ना.) (ग्रं०) परस्पर वा-

विपत्ति (सं. स्त्री. ना.) आपदा.

विपत्य (पु. ना.) हाल. २ (स्त्री.) विपत्ति. [दृष्टया पाहणें.

विपनणें (धा. ना.) (ग्रं०) शास्त्र-

विपरीत (सं. वि०) शास्त्रसंप्रदाय किं० लोकसंप्रदाय यांस उलटा जो पदार्थ, क्रिया, इ० तो. २ प्रतिकूळ जो काळ इ० तो.

विपर्यय (सं. पु. ना.) विपर्यास.

विपर्यास (सं. पु. ना.) विपरीतपणा. २ कांहींएक गोष्टीचे स्थितीमध्यें यत्किंचित् अंतर तो.

विपक्ष (सं. पु. ना.) शत्रु.

विपाइलें (वि०) (ग्रं०) विरळा, एकादें.

विपाक (सं. पु. ना.) परिणाम.

विपाय (सं. पु. ना.) (ग्रं०) अपाय.

विपायें (अव्य०) (ग्रं०) कदाचित्. २ व्यर्थतेंकरून.

विपारा (वि०) (ग्रं०) विद्रूप.

विपिन (सं. न. ना.) अरण्य.

विपुल, ळ (स. वि०) पुष्कळ.

विपुलिना (वि०) (ग्रं०) व्यर्थ.

विपुळात (स्त्री. ना.) विपुलपणा. २ (वि०) पुष्कळ.

विप्रतिपत्ति (सं. स्त्री. ना.) कांहीं एक कार्याविषयीं मनद्वयाचा विरोध तो किं० मतद्वयाचा अंगीकार करून जो परस्परांचा विवाद लागतो तो.

विफल, ळ (सं. वि०) निर्फळ.

विफळात (वि०) (ग्रं०) विफळ.

विबुध (सं. पु. ना.) इंद्रादिक जे देव ते प्रत्येकीं. २ पंडित.

विभक्त (सं. वि०) समुदायापासून पृथक् केला किं० मानिला जो अंशरूप पदार्थादि तो. २ गृह, धन, भूमि, इ० पदार्थ वांटून घेऊन परस्पर निराळे झाले जे बंधु, पिता, पुत्र, इ० तो. ३ (ग्रं०) जो भक्त नव्हे तो, ह्मणजे अभक्त.

विभव (सं. पु. ना.) ऐश्वर्य.

विभाग (सं. पु. ना.) परस्पर संबद्ध-पणें स्थित जे अवयवादि त्यांचा छेदनादिकेंकरून होतो जो पृथक्भाग तो. २ एका पदार्थाचे अनेक जे अंश ते प्रत्येकीं. [ करणें, जिकणें.

विभांडणें (धा. ना.) (ग्रं०) पराभव

विभातोडणें (धा. ना.)(ग्रं०) मोडणें.

विभावसु (सं पु. ना.)(ग्रं०) अग्नि

विभु (सं. वि०) व्यापक. २ (ग्रं०) महान्.

विभू (पु. ना.) व्यूह.

विभूति (सं. स्त्री. ना.) गोमय, काष्ठ इ० कांचें जें भस्म तें. २ ऐश्वर्य. ३ विद्या, तप, इ० कारणांनी लोकोत्तरत्वेंकरून कोणेकाचें वर्णन कर्तव्य असतां त्यास म्हणतात.

विभ्रम (सं. पु ना.) स्त्रियांचा जो शृंगारकरून विलास तो. २ (ग्रं०) भ्रांति.

विमल (सं. वि०) निर्मल.

विमा (पु. ना.) ही तुझी वस्तु विवक्षित स्थळीं सुरक्षित पोंहचेल, किं० विवक्षितकालपर्यंत सुरक्षित राहील, असें न झालें तर त्याची किंमत भरून देईन, तसें झालें तर तूं मला अमुक द्यावेंस अशा बोलीनें त्या वस्तूच्या होणाऱ्या भयाचा कोणी करितो जो निरास तो; करणें, भरणें, उतरणें, याच्या योगीं प्रयोग. २ त्यासंबंधें विमेकऱ्यास द्यावें लागतें जें द्रव्य त्यासही म्हणतात.

विमान (सं. न. ना.) आकाशमार्गानें जाणारें असें देवादिकांचें यान आहे तें.

विमुख (सं. वि०) पराङ्मुख.

वियुक्त (सं. वि०) वियोग पावला तो.

वियोग (सं. पु ना.) संयुक्त पदार्थांचा पृथक्भाव तो.

विरक्त (सं. वि०) ज्या विषयावरून ज्याची प्रीति उठली आहे तो त्याविषयीं, किं० आत्मस्वरूपाहून इतर जे पदार्थ त्यांवर ज्याची प्रीति राहिली नाहीं असा जो मनुष्यादि तो.

विरंगुळणें (धा. ना.) काम करतांना मध्यें गमणें.

विरघळणें (धा ना.) विघरणें. २ जीर्णत्वादि कारणामुळें वस्त्र जागोजागीं फाटे अशा अवस्थेनें युक्त होणें. ३ लज्जा, भय, शोक, इ० कांहीं कारण अकस्मात् उत्पन्न झाल्यामुळें कोणेकानें धैर्यउत्साहादिभंगपूर्वक केवळ गलितप्राय होणें.

विरंची (सं. विरिंचि) (पु. ना.) (ग्रं०) ब्रह्मदेव.

विरज (सं. वि०) निर्मळ.

विरजण (न. ना.) दुधाचें दहीं व्हावें म्हणून त्यांत जो कांहीं ताक इ० आंबट पदार्थ घालितात तें. २ एका एका भांड्यांत, किं० एकेकवार विरजलेलें जें दूध तें प्र०. ३ तपश्चर्या, विद्वत्ता, इ० कांस कलंक लागायाजोगें जें कोणेकाचें वाईट आचरण असतें त्यास म्हणतात.

विरजत (वि०) (ग्रं०) विरक्त.

विरजा (पु. ना.) साधल. २ साधकर्ता.

**विरजिया** (वि०) (ग्रं०) साह्यकर्त्ता. २ सोबती. ३ सहाय.

**विरणें** (धा. ना.) विरघळणें. २ वस्त्राचे तंतु इकडे तिकडे सरल्यामुळें त्या वस्त्रानें विरळपणानें विशिष्ट होणें.

**विरत** (सं वि०) विरामपावला जो तो.

**विरति** (सं. स्त्री. ना.) विराम.

**विरमणें** (धा. ना.) काहींएक व्यापार समाप्त न होतां मध्येंच काहींकाल राहणें किं० तो व्यापार करणारा त्याणें तो व्यापार न करितां काहीं: काळ राहणें. २ वरमणें प्रथ०.

**विरल, ळ** (सं. वि०) मध्यें मध्यें विवक्षित प्रमाणाहून अंतर अधिक राहीं अशा प्रकारें संनिविष्ट जे अनेक अर्थ ते, किं० तशा संनिवेशविशिष्ट अर्थानीं आरंभित जो समुदाय तो. २ सर्वकाळीं, सर्वदेशीं असत नाहीं, क्वचित् कदाचिन्मात्र असतां असा जो कोणेक पदार्थ तो.

**विरस** (सं. वि०) ज्यांत रस नाहीं असें जें भाषण, फळ, इ० तो २ पूर्वी उत्साहानें प्रवृत्त असतां काहीं अप्रिय प्राप्त झाल्यामुळें ज्याचा मनोभंग झाला तो.

**विरह** (सं. पु. ना.) स्त्रीपुरुष, मित्रमित्र, पितापुत्र, इ० कांचा जो परस्पर वियोग होतो तो. २ तशा वियोगानें होतें जें दुःख तें. ३ (वि०) कोणेक अर्थाचें कोणेक अर्थास जें राहित्य तो.

**विराग** (सं. पु. ना.) विरक्ति.

**विराणा** (पु. ना.) (ग्रं०) एक देवताविशेष मानिला आहे तो.

**विराम** (सं. पु. ना.) कोणेक चाललेला जो व्यापार त्याचे गति राहून कुंठितपणें जी स्थिति ती. २ काहींएक कार्य करीत असतां त्यामध्यें काहीं काल घेतात जो विसावा तो. [तत्वांश.

**विरावें** (न. ना.) (ग्रं०) शौर्य,

**विरी** (स्त्री. ना.) चुना, पीठ, औषध, इ० पदार्थांच्या अंगीं जो सत्वांश असतो ती.

**विरुगोळा** (पु. ना.) (ग्रं०) अडथळा.

**विरुढणें** (धा. ना.) (ग्रं०) उगवणें. २ वाढणें.

**विरुद्ध** (सं. वि०) प्रतिकूल. [परब्रह्म.

**विरुद्धनानिज** (न. ना.) (ग्रं०) प्रपंच ना

**विरुद्धभलें** (वि०) (ग्रं०) शुभाशुभ.

**विरूप** (सं. वि०) विद्रूप.

**विरोध** (सं. पु. ना.) विरुद्धभाव.

**विलग** (न. ना.) कोणेक व्यापारीं किं० पदार्थीं यथास्थितपणें वर्तण्याविषयीं जी साधनसंपत्ति असावी त्यामध्यें काहीं उणें असल्यामुळें जें वैकल्य तें किं० तें उणें. २ (वि०) तें विलग आहे ज्यामध्यें असा जो संसार, व्यवहार, किं० घड्याळ, गाडी, इ० तो. ३ (ग्रं० पु.) उपद्रव.

**विलंब** (सं. पु. ना.) काहींएक कार्यास काळरूप अवकाश असतो किं० लागतो तो.

**विलय** (सं. पु. ना.) मोडणें, बुडणें, इ० कानीं जो काहीं पदार्थाचा नाश तो.

**विलक्षण** (सं. वि०) लोकोत्तर किं० लोकसंप्रदायपेक्षां विपरीत जो मनुष्य, किं० सामर्थ्य, स्वभाव, इ०

तो. २ कोणेक पदार्थापेक्षा काहीं-एक विशेषणविशिष्ट जो तो.

विलाप (सं. पु. ना.) कोणीएक मृत झाला असतां किं० काहीं हानि झाली असतां तन्निमित्त रडणें, ओरडणें, इ० रूप जो व्यापार करितात तो.

विलास (सं. पु. ना.) स्त्रिया, पुष्प, गीत, नृत्य, इ० जे शृंगारप्रधान विषय तदुपभोगद्वारा ज्या अनेक प्रकारच्या क्रीडा तो, किं० काहीं विषय नसतांहीं केवळ अंतःकरण रमवायासाठीं इच्छानुरूप जें वर्तन तो.

विलेपन (सं. न. ना.) शरीर, शरीरावयव, इ०कांस चंदनादि पदार्थांचा करितात लेप तें किं० तो लेप करण्याचा व्यापार तें किं० त्यासाठीं सिद्ध केलें जें चंदनादि द्रव्य तें.

विलोकन (सं. न. ना.) अवलोकन.

विलोम (सं. वि०) उलटा.

विल्हे (अर० स्त्री. ना.) अकारादि वर्ण अनुक्रमानें लिहून तत्तद्वर्णादि नामें त्या त्या वर्णाखालीं त्याहावीं म्हणून जीं अनुक्रमानें प्रतिवर्णाचीं स्थानें केलीं असतात तीं प्रत्येकीं. २ काहींएक पदार्थांचीं जातिगुणादि भेदेंकरून पृथक् पृथक् करितात जीं प्रकरणें तीं प्र०.

विल्हेवाट (स्त्री. ना.) द्रव्यादि पदार्थांचा अनेक प्रकारें खर्च वेंच करून जी निःशेषता ती.

विल्हेवार (अव्य०) ज्या विल्हेनील त्या विल्हेन अशा प्रकारें. [करणें.

विवंचणें (धा. ना.) (ग्रं०) विवंचना

विवंचना (स्त्री. ना.) काहींएक संकट, किं० अवघड गोष्ट, इ० प्राप्त झालें असतां त्याच्या निर्वाहाचा पडतो जो विचार ती.

विवटणें (धा. ना.)(ग्रं०)स्पष्ट करणें.

विवर (सं. न. ना.) बिल, बीळ. २ (ग्रं०) विवरण.

विवरण (सं. न. ना.) गूढ रूपेंकरून स्थित जो श्लोक, वाक्यादिकांचा अर्थ त्याचें थोड्या शब्दांत शब्दांतरानीं व्याख्याद्वारा जें स्पष्टीकरण तें.

विवरणें (धा. ना.) सांगणें. २ विचार करणें. [विकरूप भेद तो.

विवरू, रू (पु. ना.)(ग्रं०) सेव्यसे-

विवर्ण (सं. वि०) शुक्ल, गौर, इ० जो पूर्वस्थित रंग तो भिन्न झाला ज्याचा असें जें शरीरादि तो, निस्तेज.

विवर्त (सं. पु. ना.) (ग्रं०) जो पदार्थ ज्या रूपानें असतो तो त्या रूपानें न दिसतां अन्यथारूपानें दिसावा, असें जें मूळवस्तूच्याठायीं अन्यथारूपत्व तो.

विवश (सं. वि०) पराधीन.

विवळ (वि०)(ग्रं०)सविस्तर. २ सोपें. ३ स्पष्ट. ४ (पु. ना.) प्रकाश.

विवळणें (धा. ना.) (ग्रं०) स्पष्टकरणें. २ दुःखितप्रमाणें हळू व लांबट बोलणें. ३ प्रकाशणें.

विवक्षा (सं. स्त्री. ना.) कोणेक अर्थविषयक प्रतिपादन करण्याविषयीं जी वक्त्याची इच्छा ती.

विवक्षित (सं. वि०) ज्या अर्थाविषयीं इच्छा आहे तो अर्थ. २ ग्राम, राज्य, इ०कांमध्यें शिष्टतेंकरून जे

कोणी गणनीय असतात त्यास म्हणतात.

**विवाद** (सं. पु. ना.) वाद प्रथम द्वितीयार्थी.

**विवाह** (सं. पु. ना.) ज्याचे योगानें स्त्रीपुरुषांचा दंपतीरूप संबंध होतो असा उभयतांचा मिळून एक संस्कार आहे तो.

**विविक्त** (सं. वि०) विवेचन केलें ज्याचें तो अर्थ. २ (न. ना.) एकांतस्थळ तें.

**विविध** (सं. वि०) अनेक.

**विवेक** (सं. पु. ना.) विचारप्रथ०. २ काम, क्रोध, लोभ, इ० रूप ज्या अंतःकरणवृत्ति उठतात तदधीन आपण न होतां विचारानें त्या वृत्तींचें आवरण करून जी चित्ताची दृढता तो किं० तत्साधक जो व्यापार तो.

**विवेचन** (सं. न. ना.) कोणेक समुदायांतून अवयवांचें विवक्षित धर्मेंकरून जें पृथक्पृथक्करण तें किं० कोणेक अवयवीभून अर्थाचें अवयवशः परिज्ञान व्हावें म्हणून अवयवशः जें मनानें विषयीकरण तें.

**विवेचना** (सं. स्त्री. ना.) विवेचन.

**विशद** (सं. वि०) ज्यांत गूढत्व, अस्पष्टत्व, इ० नाहींत असें जें भाषण लेख, इ० तो. २ अडचण व्हावयाजोगें नव्हे असें जें प्रसृत, मोकळें स्थळ, पात्र, इ० तो.

**विशाल,ळ** (सं. वि०) लांब रुंद आकारानें मोठा जो पदार्थ तो.

**विशिष्ट** (सं. वि०) कोणेक विशेषणाचे संबंधामुळें सामान्यापेक्षां कांहीं भेद पावलेला जो कोणेक अर्थ तो. २ ज्या कोणेक अर्थानें युक्त जो कोणेक अर्थ तो तद्विशिष्ट. ३ ज्याच्या पोटीं अवांतर भेद अनेक आहेत असा जो कोणेक अर्थ तो. ४ (ग्रं०) एक अजहत् म्हणून लक्षणा आहे ती.

**विशेष** (सं. पु. ना.) जेणेंकरून एकसामान्याक्रांत अनेक पदार्थांचा परस्पर भेद उपलभ्यमान होतो असा जो पदार्थनिष्ठ जात्यादि धर्म तो. २ ज्या सामान्यधर्माच्या पोटच्या धर्मानें विशिष्ट जो अर्थ तो तद्विशेष. ३ (वि०) विवक्षित प्रमाणापेक्षां किं० सामान्य प्रमाणापेक्षां जो अधिक तो.

**विशेषणें** (धा. ना.) (ग्रं०) वर्णन करणें. २ बोलणें.

**विशेषेंकरून** (अव्य०) सामान्यतः जीं लक्ष्यें त्याहून कोणेक लक्ष्यावर अधिक कटाक्ष पडे अशा प्रकारें.

**विशोभित** (सं. वि०) चांगला शोभत नाहीं असा पदार्थ तो.

**विश्रांति** (सं. स्त्री. ना.) विसावा. २ कोणेक विषयाचे योगानें शोकादि दुःख विसरून सुखेंकरून जें कालक्रमण तें. ३ तत्साधनीभूत जो विषय तो.

**विश्राम** (सं. पु. ना.) विश्रांति.

**विश्रुत** (सं. वि०) लोकांत जो प्रसिद्ध तो.

**विश्व** (सं. न. ना.) यच्चयावत् जें भावाभावरूप अर्थजात तें म्हणजे सर्व जग.

विश्वास (सं. पु. ना.) कोणेक गोष्टी-विषयीं हे अमुक प्रकारेंच होईल, अन्यथा होणार नाहीं असा अंतः-करणांत धरिला असतो जो निश्चय तो. २ कोणेक मनुष्यादिकावर हा सर्वथा प्रतारणादिकेंकरून आपणा-शीं प्रतिकूल वर्तणार नाहीं असा जो भाव धरिला असतो तो.

विश्वासू, सूक (वि०) ज्यावर विश्वास ठेवणें योग्य आहे असा जो मनुष्या-दि जीव तो.

विश्वोदयपंथकंधर (सं.पु.ना.)(ग्रं०) मायानियंता जो ईश्वर तो.

विष (सं. न. ना.) ज्याचा शरीरादि-कास संपर्क झाला असतां प्रतिकूल विकृति होत्ये किं० मृत्यु होतो असा जो सर्पमूषकादिकांच्या ठायीं किं० सोमल, बचनाग इ०कांच्याठायीं दुष्ट कांहीं अंश असतो तें. २ पदा-र्थनिष्ठ कडूपणाचा अतिशय वर्णा-याचा असतां त्या पदार्थास आरोपानें म्हणतात. ३ ज्याच्या संग्रहानें आप-णास मृत्यु इ० संकटसंभावना आहे असा जो द्रव्यादि पदार्थ त्याच्याठायीं आरोप करितात.

विषम (सं. वि०) समाचा आणि अ-नुकूलाचा प्रतिपक्षी तो.

विषय (सं. पु. ना.) चक्षुरादि बाह्यें-द्रियानीं किं० अंतःकरणानें जाणा-याचा जो रूपादि किं० सुखदुः-खादि अर्थ तो त्याचा त्याचा किं त्या चक्षुरादिकानीं स्वृतीनें आकलि-त केलेला जो अर्थ तो तो त्याचा त्याचा. २ ज्या इंद्रियादिकानें जें कर्म करायास योग्य किं० शक्य तें कर्म त्या त्या इंद्रियादिकाचा. ३ शा-स्त्रादिसंबंधी जो शब्द, व्यवहार, त्यामध्यें प्रतिपाद्यत्वेंकरून विवक्षित जो अर्थ तो. ४ विक्रयादिद्वारा ज्या-पासून पैका उत्पन्न होण्याची योग्य-ता आहे, अतएव पैक्यासीं अभिन्नत्वें-करून विवक्षित जो सोनें, रूपें, घ-रदार, भांडेकुंडें, इ० पदार्थ तो.

विषयी (सं. वि०) मैथुन, गायनादि-विषयीं जो अत्यासक्त तो. २ जो विषय ज्याचा तो त्या विषयाचा.

विषाण (सं. न. ना.) शिंग.

विषाद (सं. पु. ना.) कोणेक गोष्टी-विषयीं उत्साहानें प्रवृत्त असतां तेथें कांहीं प्रतिकूल झाल्यामुळें जो उ-त्साह भंगून तद्विषयीं उलटी द्वेषबु-द्धि व्हावी असा जो अंतःकरणांत भावविशेष उत्पन्न होतो तो.

विष्ठा (सं. स्त्री. ना.) गुदद्वारापासून निघतो जो मळ तो.

विसकूस (स्त्री. ना.) (ग्रं०) विघड. २ तुटातूट. ३ (वि०) अन्यथा.

विसकुसें (न. ना.) (ग्रं०) व्यर्थका-सावीसीं.

विसंगत (सं. वि०) पूर्वापर संगति ज्यास नाहीं असा जो ग्रंथ, भाषण इ० पदार्थ तो. [विकारणें.

विसंचणें (धा. ना.) (ग्रं०) नासणें,

विसण (न. ना.) पाहिजे तितकेंच उष्ण राहावें म्हणून अति उष्ण पा-ण्यांत थंड पाणी घालितात जें तें.

विसणणें (धा. ना.) (ग्रं०) आवेशा-

नें युक्त होणें. [२ ओसणलेलें.

विसणेलें (वि०) (ग्रं०) उसळलेलें.

विसंबणें (धा. ना.) रक्षणादिकासाठीं निरंतर लक्ष्यानुसंधानांत बाळगाया-चें जें लेंकरूं, वस्त्र, अलंकार, संसार, इ० कांहींएक त्यांतें कांहीं काल लक्ष्यानिराळें करून असणें.

विसर (सं. विस्मरण) (पु. ना.) कोणेक विषयाचा अंतःकरणास संस्कार झाल्यामुळें तद्विषयक असत्ये जी अंतःकरणांत स्फूर्ति तिचा कालातिक्रम, अन्य वृत्तीचा उदय, इ० कारणामुळें होतो जो अभाव तो. २ स्वल्प कालाच्या अतिक्रमानें अवगत झालेल्या अर्थाची विस्मृति पडावी असा कोणेकाच्या बुद्धीस असतो दोष तो. ३ (ग्रं०) विवरण. ४ विचार.

विसर्जन (सं. न. ना.) आपणाशीं संबद्ध होऊन राहिलेला जो कोणेक अर्थ तो आपणापासून वियुक्त होई असा त्यास सोडून देण्याचा जो व्यापार तें. २ प्रतिमा, सभा, इ० अधिकरणातें आश्रयून स्थित जें देवता, मनुष्यसमुदाय, इ० त्यांतें तेथून उठून जावयास निरोप देण्याचा जो व्यापार तें.

विसवटा (पु. ना.)(ग्रं०) विसांवा.

विसार, विसारा (पु. ना.) इसार.

विसावणें (धा. ना.) कढत पाण्यांत विसण घालून पाहिजेतितरत उष्ण करणें. २ करावयास धरलेल्या कामापासून विरत होऊन राहणें.

विसांवा (सं. विश्राम) (पु. ना.) कोणेक कर्माचे ठायीं व्यापून असल्यामुळें होतात जे श्रम त्यांच्या परिहारासाठीं कांहीं काल तें कर्म सोडून मोकळेपणें जी स्थिति तो. २ कोणेक विषयाचे योगानें चित्ताचा उद्वेग जाऊन समाधानवृत्तीनें जी कांहींकाल होत्ये स्थिति तो. ३ ज्या विषयाचे योगानें चित्तास विसांव होतो तो पुत्रादि विषय. [२ पिशाच.

विसाळ (पु. ना.) भूतादि बाधा.

विसिफ (पु. ना.) गुरांच्या बसण्याचा जो आखाडा त्यांत जो किडा असतो तो.

विसुरा (पु. ना.) (ग्रं०) विस्मय. २ अभिप्राय. ३ भ्रांति.

विस्तार (सं. पु. ना.) कोणेक पदार्थाचे शरीराची लांबी, रुंदी, उंची, या धर्मानें जी व्याप्ति असत्ये तो. २ अल्परूपेंकरून स्थित जो कांहींएक अर्थ त्याचें वृद्धीनें होतें जें बाहुल्य तो. ३ रुंदी म्हणून जो क्षेत्रधर्म तो. ४ वृक्ष, लता यांचे कांडास फुटून विस्तारला असतो जो स्कंध, शाखा, इ० रूप अंश तो.

विस्तीर्ण (सं. वि०) विस्तृत.

विस्फुलिंग (सं. पु. ना.) अग्नीची ठिणगी.

विस्मय (सं. पु. ना.) कांहींएक लोकविलक्षण व्यापार किं० पदार्थ पाहिला असतां जें आश्चर्य होतें तो.

विस्मर (पु. ना.) (ग्रं०) विस्मरण.

विस्मरण (सं. न. ना.) विसर.

विस्मृति (सं. स्त्री. ना.) विस्मरण.

विहंग, हंगम (सं. पु. ना.) पक्षी.

विहरण (सं. न. ना.) क्रीडा करण्याचा जो व्यापार तें.

विहरा (पु. ना.) (ग्रं०) विहिरा.

विहार (सं. पु. ना.) क्रीडा.

विहित (सं. वि०) हें करावें, हें खावें, इ० रूप शास्त्रादि वचनानीं ज्याविषयीं विधि झाला आहे असा जो कोणेक अर्थ तो. २ त्या त्या व्यवहारानुरोधानें वर्तत असतां करणें, देणें, घेणें, इ० विषयीं ज्या अर्थास उचितपण दिसतें असा जो कोणेक अर्थ तो.

विहिरा (पु. ना.) नदीचें तीर इ० स्थळीं खणितात जो मोठा डोहरा तो.

विहू (पु. ना.) विभू.

विव्हल, ळ (सं. वि०) व्याकुल.

विळखा (पु. ना.) मनुष्य, सर्प, इ०कानीं भुजादिकेंकरून कोणेकास घातला वेढा तो.

विळून (अव्य०)(ग्रं०) एका वेळ्यातून.

विक्षिप्त (सं. वि०) मंत्रचळ इ० कारणानें सुमाराचा वेडा झाला तो.

विक्षेप (सं. पु. ना.) कोणेक विषयाचें वास्तविक रूप चित्तांत न स्फुरतां अवास्तविक रूपाचे आकारानें जो त्या विषयावर चित्ताचा पात होतो तो. २ कोणेक विषयावर लागलेलें जें चित्त त्याचें तेथून उत्थान होऊन भलतीकडेसच जी त्याची गति होते तो. ३ पिशाचादि उपद्रवानें चित्तास होतो जो चळ तो.

विज्ञप्ति (सं. स्त्री. ना.) विज्ञापना.

विज्ञान (सं. न. ना.) शास्त्रादिकांत जी गोष्ट सांगितली आहे, तिचा जो त्याप्रमाणें अनुभव तें. २ कोणेक अर्थविषयक जें साधारण ज्ञान तद्विषयकही क्वचित् प्रयोग होतो. ३ (ग्रं०) प्रपंच.

विज्ञापना (सं. स्त्री. ना.) थोर जे गुरु, राजा, इ० त्यांस कोणेक अर्थाचें नम्रपणें भाषणद्वारा जें बोधन तो, आणि तदर्थ जें तें भाषण तो. २ वडील, गुरु, धनी, यांस पत्र लिहिलें असतां त्यांत याचा लेख करितात.

वी (सं. पु. ना.) पक्षी.

वीख (न. ना.) विष.

वीचि (सं. स्त्री. ना.) (ग्रं०) पाण्यावरील लाट.

वीज (स्त्री. ना.) मेघसंघर्षणानें जो अग्नि उत्पन्न होतो तो.

वीट (पु. ना.) विट. २ भक्ष्यादि पदार्थांचें किं० कोणेक गोष्टीचें अति सेवन झाल्यामुळें, किं० त्यामध्यें कांहीं दोष आढळल्यामुळें त्याविषयीं येतो जो कंटाळा तो. ३ (स्त्री.) भिंत रचायासाठीं मातीचा चतुष्कोण करितात तो.

वीण (स्त्री. ना.) पशु, पक्षी, सर्प, क्षुद्रजंतु, यांची अपत्यरूपेंकरून विऊन होणें जी उत्पत्ति ती. २ वस्त्रादिकांची जी विणकर ती.

वीर (सं. पु. ना.) युद्धकलादि प्रसंगीं अभियोग करण्याविषयीं, किं० दुसऱ्याची आपत्ति दूर करण्याविषयीं, किं० याचक पाहून दान करण्याविषयीं उत्साहपूर्वक जो प्रवृत्त होतो

तो मनुष्यादि. २ त्या उत्साहानें अंतःकरणांत जो रस उत्पन्न होतो तो.

वीर्य (सं. न. ना.) पुरुषाचे इंद्रियापासून उत्पन्न होतें जें रेत तें. २ पदार्थमात्राचे अंगचा जो शक्तिविशेष तें. ३ वीरपणा.

वीक्षण (सं. न. ना.) अवलोकन. २ त्यास साधन जें नेत्र तें.

वृक (सं. पु. ना.) लांडगा.

वृत्त (सं. न. ना.) आचरण. २ वर्तमान. ३ आर्या, अनुष्टुप, यावांचून श्लोकाचे जगती आदिकरून अनेक छंद सांगितले आहेत ते प्रत्येकीं. ४ कर्कटादिकांनीं काढिलें जें वाटोळें मंडळ तें. ५ (वि०) तदाकार किं० गोलाकार जो पदार्थ तो.

वृत्तांत (सं. पु. ना.) वृत्तद्वितीयार्थी.

वृत्ति (सं. स्त्री. ना.) मनुष्यादि चेतनाचेतन पदार्थांचा स्वस्वभावारीं वर्तण्याचा जो प्रकार ती. २ उपजीविका किं० तत्साधनीभूत जोशीपणा, उपाध्येपण, इ० नियत, किं० भिक्षा, चाकरी, इ० अनियत जें ती. ३ क्रोधादिरूप किं० विषयरूप जे अंतःकरणाचे आकार ते प्रत्येकीं. ४ (ग्रं०) स्फूर्ति, किं० स्फुरण.

वृथा (सं. अव्य०) निष्फल होई असें जाणें, येणें, इ०कांचें वि०.

वृंद (सं. न. ना.) मनुष्यादिकांचा जो समुदाय तें.

वृद्ध (सं. वि०) अतिवयस्क जो मनुष्य, पशु, वृक्ष, इ० तो. २ त्या त्या गुणादिकानें जो मोठा तो त्या त्या गुणादिकानें. ३ वृद्धि पावला जो कोणिक अर्थ तो.

वृद्धि (सं. स्त्री. ना.) कोणिएक पदार्थादिकाचें पूर्वावस्थेपेक्षां प्रमाणादिकेंकरून जें आधिक्य ती, किं० त्या पदार्थादिकांची उत्तरोत्तर आधिक्य होण्याची दशा ती. २ रुपये, धान्य, इ० संबंधीं जें व्याज, काढा, इ० येतें ती. ३ कोणेकाचे कुलांत मुलगा उत्पन्न झालें असतां त्यास जें आशौच प्राप्त होतें ती.

वृद्धिंगत (सं. वि०) उत्तरोत्तर वृद्धि पावत चालला जो कोणिक अर्थ तो.

वृष (सं. पु. ना.) बैल.

वृषण (सं. पु. ना.) आंड.

वृषभ (सं. पु. ना.) बैल.

वृषली (सं. स्त्री. ना.) कुणबीण. २ (ग्रं०) व्यभिचारिणी.

वृष्टि (सं. स्त्री. ना.) मेघनिर्मुक्त जलाचें जें पतन ती. २ बाण, पुष्प, पाषाण, इ०कांचें जें पर्जन्यासारिखें पुष्कळ पतन ती. ३ श्लोक, दृष्टांत, वाक्यें, शिव्या, इ०कांचा भडिमार ती.

वृक्ष (सं. पु. ना.) झाड प्रथमार्थी.

वेडळी (स्त्री. ना.) (ग्रं०) इंगळी.

वेंकावल्या (स्त्री. ना.) वाकुल्या.

वेखसें (वि०) (ग्रं०) वेखासें.

वेखासें (वि०) (ग्रं०) व्यर्थ.

वेंग (स्त्री. ना.) मनुष्य, वृक्ष, इ० पदार्थ दोहों हातांत धरायाकरितां केली जी कव ती.

वेग (सं. पु. ना.) पदार्थांचें गुरुत्व

आणि गणितशास्त्र एतदुभयप्रयुक्त पदार्थांचे अंगीं असतो जो सामर्थ्यविशेष तो. २ विष, वायु, इ० संबंधी क्वचित् अवयवीं विदित होऊन क्रमानें शरीरांत संचारित होत जाये जी दुःखरूप वेदना ती.

वेंगडी (स्त्री. ना.) (ग्रं०) वेग, वळणें या धातूच्या योगीं प्रयोग.

वेंगणें (धा. ना.) उपोषण, दुखणें, इ०कामुळें, किं० अनेक संकटें एक कालीं प्राप्त झाल्यामुळें, कोणेकानें केवळ थकलें जाणें.

वेगती (वि०) (ग्रं०) व्यक्त, प्रकट. २ (स्त्री.) व्यक्ति, प्रकटता.

वेंगाटणें (धा. ना.) वेंगेत भरणें.

वेगाढें (अव्य०) (ग्रं०) त्वरेनें.

वेगू (पु. ना.) (ग्रं०) त्वरा. २ वेग. ३ आधिक्य. ४ दूषण.

वेंघणें (धा. ना.) मनुष्यादिकानें वृक्ष, पर्वत, जिना, इ० उच्च प्रदेशीं आरोहण करणें.

वेच (पु. ना.) (सं. व्यय) द्रव्यादिकांचा जो व्यय तो. २ (ग्रं०) क्षय.

वेंचणें (धा. ना.) भूमि इ०कांवर पसरलेलें जें धान्य, रुपये, खडे, फळें, फुलें, इ० पदार्थ ते हस्तादिकानें एकेक दोन दोन असे उचलून घेणें. २ कोणेक समुदायांतून विभिन्न जो अंश तो वेगळा निवडून काढणें.

वेंचा (पु. ना.) ग्रंथ, भाषण, इ०संबंधी जे इच्छित कार्याचे उपयोगी निवडक अंश ते प्रत्येकीं.

वेज (न. ना.) मोतीं, लालडी, माणीक, इ०कांस पाडितात जें छिद्र तें.

वेंटाळणें (धा. ना.) (सं. वेष्टन) सर्पादिकानीं स्वशरीरादिकेंकरून किं० मनुष्यादिकानें रज्ज्वादिकेंकरून कोणेकानें वेष्टित करणें किं० कोणेक पदार्थास रज्जु इ० गुंडाळणें.

वेंटाळें (न. ना.) सर्पानें केला जो स्वशरीराचा वृत्ताकार तें. २ नराकार जें रज्जु इ०कांचें गुंडाळें करितात तें.

वेठ (स्त्री. ना.) विगार.

वेंठणें (धा. ना.) (ग्रं०) वेंटाळणें.

वेड (न. ना.) पिशाच, वायु, इ०कांचे योगानें भलभलतेंच बोलावें, भलभलतेंच करावें, इ० व्हावयाजोगा होतो जो बुद्धीस विकार तें. २ कोणेक विषयाची कोणेकास अतिशयित असावी जी आसक्तता, जीणेंकरून त्या विषयावांचून चैन पडूं नये तें. ३ अविचाररूप जें अज्ञान तें. कोणी कोणास वेड भरविणें इ० अनेक प्रकारचे उपद्रव, किं० चेष्टा, इ० करून कांहींएक सुचेनासें करून टाकणें. वेड शिरणें इ० कोणेकाच्याठायीं किं० राज्यादि व्यवहारीं असमंजसपणा, अविचार, यांची वृद्धि होणें.

वेडगळ (वि०) वेड्यांत गणायाजोगा [जो तो.

वेडझंवा (वि०) ज्यास व्यवहाराचा तुर्त नाहीं तो. २ भयादि कारणानें कांहींएक करण्याविषयीं युक्ति सुचेनाशी होऊन केवळ भ्रमांत पडला जो तो.

वेडदुलीं, धुली (वि०) मूर्खत्वद्योतनार्थ कोणेकास निंदेनें ह्मणतात.

वेडा (वि०) वेड ज्यास लागलें आहे तो किं० वेड लागलेल्यासारिखा व्यवहारचातुर्यशून्य जो तो. २ पूर्वापर अनुसंधानादिरहित जें भाषण, लेख, इ० त्यास ह्मणतात.

वेडापिसा (वि०) इष्टविरहादि कारणानें वेड्यासारिखा-पिशासारखा झाला जो तो.

वेडापीर (पु. ना.) वेडगळ, छांदिष्ट, असा जो मनुष्य त्यास ह्मणतात.

वेडाबागडा (वि०) वेडावांकडा.

वेडामधुरा (पु. ना.) ज्वरामध्यें शीतोपचार झाला असतां ज्वर विकोपास जाऊन एक प्रकारचा वायु होत असतो, जेणेंकरून वेड लागल्यासारिखी प्रकृति होते तो.

वेडावणें (धा. ना.) वेडें होणें. २ कोणेकास वांकुल्या दाखविणें.

वेडावांकडा (वि०) वांकडातिकडा. २ जसें असावें तसेंच नव्हे, अंशतः विपरीत, अंशतः मध्यम, अंशतः चांगलें, अशी प्रकारचें जें भाषण, आचरण, इ० तो.

वेडीहळद (स्त्री. ना.) वेडदुळी.

वेडेचार (पु. ना.) वेडेवेडेचार.

वेडेपीक (न. ना.) येऊं लागलें ह्मणजे पुष्कळच येतें, नाहीं तर कांहींच नाहीं असें जें कितीएक वृक्ष, लता, धान्य, यांचें पीक तें. २ वळला तर सर्वस्व देईल, जें ह्मटलें तें करील, असा जो दाता इ० त्यास ह्मणतात.

वेडेवेडेचार (पु. ना.) वेड्यासारिखें जें आचरण तो.

वेढणें (धा. ना.) सूत्र, मनुष्यादिपंक्ति, इ०कानें कोणेक पदार्थ, त्याचा विवक्षित कोणेक परिधि व्याप्त होई असा आवृत करणें. २ घेरणें. ३ रुधणें.

वेढा (पु. ना.) किल्ला, गृह, मनुष्य, इ०काचे भोंवता सैन्य, उदक, रज्जु, इ०कांचा पडतो जो घेर तो. २ काष्ठादि पदार्थाभोंवते रज्ज्वादिकांचे फेरे गुंडाळितात ते प्रत्येकीं. ३ कोणेक पदार्थ आपल्याभोंवता फिरला असतां किं० कोणेकाभोंवता मंडलाकार फिरला असतां होतात जे फेरे ते प्रत्येकीं.

वेढालावणें (धा. ना.) (ग्रं०) भ्रमविणें, भुलविणें, वेडलावणें.

वेणी (सं. स्त्री. ना.) मस्तकादिस्थित केश किं० ताग, आंबाडी, इ०काचे प्रायः तीन, पांच, असे पेड करून ते परस्पर गुंफून सर्पाकारक जो रचनाविशेष करितात ती.

वेत (सं. वेतस) (पु. ना.) चिंच्यासारिखा एक वृक्ष आहे, ज्याच्या तोनी काढून खुरशी इ० विणतात तो. २ त्याची करितात जी छडी ती. ३ (न.) पशु इ०कांची विण्याची जी खेप तें.

वेतड (सं. पु. ना.) (ग्रं०) हत्तीं.

वेतन (सं. न. ना.) कोणेकास चाकरीस ठेवून त्या चाकरीसबंधें जें त्यास देय देतात तें, परंतु पुराणिक

फडणीस, इ० जे प्रतिष्ठित चाकर त्यांस जें प्रतिवर्षी देतात त्याविषयीं लोकांत विशेष प्रसिद्धि.

वेत्ता (सं. वि०) जाणणारा.

वेद (सं. पु. ना.) ईश्वरी प्रेरणेनें ब्रह्मदेवाच्या चारी मुखांतून प्रकट झाले जे ऋग्वेदादिसंज्ञक चार ग्रंथ ते प्रत्येकीं. २ (ग्रं०) ज्ञान.

वेदत्रयी (सं. स्त्री. ना.) (ग्रं०) धर्म, अर्थ, काम, यांस ह्मणतात. २ संहिता, ब्राह्मण, अरण्य, हे तीन मिळून ती.

वेदना (सं. स्त्री. ना.) तिडीक, ठणका इ०रूप जें दुःख ती.

वेदलोक, कू (पु. ना.) (ग्रं०) श्रुति.

वेदवती (सं. स्त्री. ना.) (ग्रं०) पृथ्वी. २ एक नदी.

वेदांत (सं. पु. ना.) सकल प्रपंचास मिथ्यात्व बोधवून ईश्वराचे सच्चिदानंदस्वरूपाचें कथन करणारें असें शास्त्र आहे तें.

वेध (सं. पु. ना.) मोती इ०कांस शस्त्रादिकानें छिद्रविशिष्ट करण्याचा व्यापार तो. २ तेणेंकरून त्यास पडतें जें छिद्र तो. ३ दृष्टि, बाण, गोळी, इ०कानीं आपआपल्या लक्ष्यावर केलें जें स्थानविशिष्टत्व तो. ४ सूर्यग्रहणाचे पूर्वी चार प्रहर आणि चंद्रग्रहणाचे पूर्वी तीन प्रहर अशी जी ग्रहणसंबंधी धर्मशास्त्रसिद्ध दोषाची व्याप्ति असते तो. ५ कोणेक मनुष्यादिकांस, ज्यामुळें स्वतंत्रपणें वर्तता येत नाहीं असा जो त्याचे पाठीशीं कांहीं अवश्य निर्वाह संबंध असतो तो. ६ (ग्रं०) छंद.

वेधणें (धा. ना.) वेधयुक्त करणें. २ (ग्रं०) चिंतन करणें. ३ गढून जाणें. [व्यापार तो.

वेरझार (स्त्री. ना.) जाण्यायेण्याचा

वेरीं (अव्य०) पर्यंत या अर्थी.

वेऱ्हीं (अव्य०) (ग्रं०) वेरीही.

वेल (सं. वल्लि) (स्त्री. पु. ना.) लता. २ नागवेल. ३ कुडूक, काप, बुगड्या इ० कर्णभूषणास मौक्तिकविशिष्ट जी सुवर्णाची सांखळी लावितात ती. ४ (ग्रं०) मर्यादा. कोणेकाचा वेल वाढणें म्ह० वंश वाढणें.

वेलबुटी, बुट्टी (स्त्री.ना.) भिंत, कागद, छिट, इ०कांवर रंग इ०कानें लिहिलेले जे द्राक्षादिकाचे वेल, अनेक तऱ्हांचे बूट ती.

वेलबूट (स्त्री. ना.) वेलबुटी.

वेलरी (स्त्री. ना.) (ग्रं०) फळ.

वेला (सं. स्त्री. ना.) समुद्राचें पाणी पराकाष्ठा येण्याचा जो अवधिप्रदेश किं० मर्यादाप्रदेश ती.

वेलाकूळ (न. ना.) (ग्रं०) घर.

वेलाटक (न. ना.) (ग्रं०) घर.

वेलाडी (स्त्री. ना.) (ग्रं०) वृद्धि.

वेलावणें (धा. ना.) (ग्रं०) सुखावणें.

वेल्हावणें (धा. ना.) (ग्रं०) भोगणें. २ वांटणें.

वेल्हाळ (पु. ना.) (ग्रं०) परम प्रितिपात्र जो भर्ता. इ० त्यास प्रीतीनें

म्हणतात. २ (वि०) प्रिय. ३ सविस्तर
वेल्हाळी (स्त्री. ना.) (ग्रं०) परम प्रीतिपात्र जी नायिका इ० स्त्री तीस प्रीतीनें म्हणतात.
वेव (पु. ना.) (ग्रं०) आश्रय.
वेश्या (सं. स्त्री. ना.) कळवंतीण.
वेष (सं. पु. ना.) जातिदेशादि भेदेंकरून वस्त्रालंकारादि धारण करण्याचे जे प्रकारभेद तोंडीकरून होतात पुरुषादिकाचे जे रूपभेद ते प्रत्येकीं.
वेषधारी (सं. वि०) राजा इ०कांचा वेष ज्याणें घेतला आहे तो. २ अंगीं साधुत्वादि नसतां साधुत्वादि मिरवितो त्यास म्हणतात.
वेष्टन (सं. न. ना.) कोणेक पदार्थाभोंवतालें वस्त्रचर्मादिकाचें जें आवरण तें. २ पुस्तकादि वेष्टायास साधन जें वस्त्रचर्मादि असतें तें. ३ वेष्टण्याचा जो व्यापार तें.
वेस (स्त्री. ना.) गांवकुसास जो दरवाजा ठेवीत असतात तो. २ गृहादिकाचे आवारास असतें जें दार तो.
वेसकर (पु. ना.) गांवचे वेशीवर संरक्षणार्थ जो महार असतो तो.
वेसजें (न. ना.) (ग्रं०) व्यसन.
वेसण, सणी (स्त्री. ना.) बैल, टोणगा, इ०कांनीं स्वाधीन राहावें म्हणून त्याचे नाकांत जी दोरी ओंविलो असत्ये ती. २ (ग्रं०) लहान मूल इ०कांचे नाकांत देवास नवस इ० केल्या कारणानें जी नथ किं० वलय घालितात ती.
वेसवा (सं. वेश्या) (स्त्री. ना.) जी स्त्री गरत असून निर्लज्जपणें व्यभिचारादि करूं लागली तीस म्हणतात.
वेळ (सं. वेला) (पु. ना.) अखंडदंडायमान जो काल त्याचा विवक्षित जो विभाग तो. त्याला काहीं काम करावयास वेळ लागतो इ० प्रमाणापेक्षा अधिक काळ लागतो. २ काहीं अवकाश. ३ (अव्य०) वेळां. ४ (स्त्री. ना.) कालरूप जो समय तो.
वेळअवेळ (स्त्री. ना.) विवक्षित कर्माविषयीं उचित, किंवा अनुचित अ० अनुकूळ किंवा प्रतिकूळ असा द्विविधत्वेंकरून जाणावयाचा जो काळ तो.
वेळाईत (वि०) (ग्रं०) कैवारी.
वेळाऊळ (न. ना.) (ग्रं०) घर.
वेळिलवाणें (वि०) (ग्रं०) दीनवाणें.
वेळुफेडणें (धा. भा.) (ग्रं०) सांगणें.
वेळेनसार (अव्य०) समयानुसार.
वेळेवारीं (अव्य०) कोणेक कर्म करावयास वेळप्रयुक्त जी सोय असत्ये ती आहे तों.
वेळोंवेळां (अव्य०) (ग्रं०) वारंवार.
वै (स्त्री. ना.) कुराण.
वैकल्य (सं. न. ना.) विकलता.
वैगुण्य (सं. न. ना.) विगुणता.
वैचित्र्य (सं. न. ना.) विचित्रता.
वैदिक (सं. पु. ना.) वेदविद्येनें जो प्रख्यात ब्राम्हण तो. २ (वि०) वेदसंबंधी किं० वेदानें उक्त जें कर्मादि तो.

वैद्य (सं. पु. ना.) औषधादिद्वारा रोगशांतीचा उपाय जाणतो तो.

वैधव्य (सं. न. ना.) विधवापणा.

वैपरीत्य (सं. न. ना.) विपरीतपणा.

वैभव (सं. न. ना.) ऐश्वर्य.

वैमनस्य (सं. न. ना.) परस्पराचा वांकडेपणा.

वैयर्थ्य (सं. न. ना.) व्यर्थत्व.

वैर (सं. न. ना.) कोणेकाचा कोणेकाशीं जो प्रतिकूलभाव तें.

वैरण (स्त्री. ना.) घोडें, गाय, इ०-कास भक्षणार्थ घालायाचें उपयोगी जें तृण, कडबा, इ० ती. (न. स्त्री. ना.) दळायाकरितां जात्यांत घालीत, किं० भाजायाकरितां खापर इ०कांत एकेक वेळ घालितात जें धान्य तें. तो. [जी खाण तो.

वैरागर (पु. ना.) (ग्रं०) हिऱ्यांची

वैराग्य (सं. न. ना.) विरागपणा.

वैरी (सं. पु. ना.) ज्याशीं ज्याचें वैर असतें तो त्याचा.

वैलक्षण्य (सं. न. ना.) विलक्षणपणा.

वैश्वानर (सं. पु. ना.) अग्नि.

वैषम्य (सं. न. ना.) विषमता. २ (ग्रं०) द्वैत. [याची ढाल.

वोडण (न. ना.) (ग्रं०) हातांत धरा-

वोडपणें (धा. ना.) (ग्रं०) प्राप्त होणें.

वोडंबरी (स्त्री. ना.)(ग्रं०) गारुड्याची मंत्रविद्या.

वोडंबा (पु. ना.) (ग्रं०) गलबला. २ बाळवी नांवाची कीड.

वोडवणें (धा. ना.)(ग्रं०) प्राप्त होणें. २ खालीं करणें. ३ पुढें करणें.

वोडवा (स्त्री. ना.)(ग्रं०) योग्यता.

वोढवणें (धा. ना.)(ग्रं०) वोडवणें.

वोढावारा (पु. ना.)(ग्रं०) धरबंद.

वोढितपण (न. ना.)(ग्रं०) उद्धटपण.

वोत (पु. ना.)(ग्रं०) ओहोट.

वोतपली (स्त्री. ना.) (ग्रं०) तेज, दीप्ति. २ उन्हाचा शेक तो.

वोथंबा (पु. ना.) (ग्रं०) गवंड्याचा लंबक. २ आश्रय, टेका.

वोथर (पु. ना.)(ग्रं०) पडशब्द.

वोथिजणें (धा. ना.) (ग्रं०) पातळ करणें. २ विस्तारणें.

वोप (स्त्री. ना.)(ग्रं०) पुट. २ तेज.

वोपणें (धा. ना.) (ग्रं०) देणें. २ विकणें. ३ धुणें.

वोपसर (पु. ना.) (ग्रं०) हीनखडा हिरकणीसारखा दिसावा म्हणून देतात जें पुट तो.

वोपसिरा (पु. ना.) (ग्रं०) संबंध.

वोभण (पु. ना.)(ग्रं०)प्रवाह. २ वेग.

वोभाण, णें (न. ना.) (ग्रं०) वोभण.

वोमथणें (धा. ना.) (ग्रं०) उमटणें. २ उगवणें.

वोरकली (स्त्री. ना.) (ग्रं०) स्पर्श.

वोरकलुजणें (धा. ना.) (ग्रं०) वरपड होणें.

वोरप (स्त्री. ना.) (ग्रं०) इच्छा.

वोरबार (स्त्री. ना.) (ग्रं०) अपेक्षा. २ ज्यांत लाभ ना हानि असा जो व्यापार तो.

वोरस (वि०) (ग्रं०) स्नेहभरित २ (पु.) स्नेहभरित पान्हा.
वोली (स्त्री. ना.) (ग्रं०) चूक.
वोल्हाटणें (धा. ना.) (ग्रं०) बुजबून टाकणें.
वोल्हावणें (धा. ना.)(ग्रं०) भिजणें
वोल्हासु, सू (पु. ना.) (ग्रं०) ओलावा. २ उल्हास.
वोवथा (स्त्री. ना.)(ग्रं०) अवस्था.
वोवर (न. ना.) (ग्रं०) घर.
वोवसा (पु. ना.) (ग्रं०) व्रत.
वोवसें (वि०) (ग्रं०) उणें.
वोवाडणें (धा. ना.) (ग्रं०) ओंवाळून टाकणें. २ उल्लंघणें.
वोवांडा (पु. ना.) (ग्रं०) ओलांडा.
वोवांडैणें (धा. ना.) (ग्रं०) लवणें.
वोवाळणें (धा.ना.)(ग्रं०)जवळ करणें २ ओंवाळणें.
वोवाळणी (स्त्री. ना.) (ग्रं०) ओंवाळणी. २ साक्षात्कार.
वोवाळी (स्त्री. ना.) (ग्रं०) प्राप्ति.
वोसक (पु. ना.) (ग्रं०) विषय.
वोसंग (पु. ना.) (ग्रं०) ओसंग.
वोसंडणें (धा. ना.) (ग्रं०) भरून वाहूं लागणें. २ भरपूर होणें. ३ टाकणें, सोडून देणें.
वोसंडलें (वि०) (ग्रं०) अधिक..
वोसण (न. ना.) (ग्रं०) पोसाणें.
वोसणणें (धा. ना.) (ग्रं०) बरळणें.
वोसणतियाचाग्रंथ, वोसणातियाचाग्रंथ (पु. ना.) ओंगेतल्याची बडबड.
वोसंतणें (धा. ना.)(ग्रं०) आचरणें. २करणें.
वोसर (पु. ना.)(ग्रं०) ओहोट.
वोसरण (स्त्री.ना.)(ग्रं०)ओसाड वाट.
वोसरणें (धा.ना.)(ग्रं०) ओहोटणें.
वोसाडा (पु.ना.) (ग्रं०) शिंतोडा.
वोसाणें (न. ना.) (ग्रं०) पुरामधील केरकचरा याचा समूह.
वोहटी (स्त्री. ना.) (ग्रं०) भेट.
वोहर (न. ना.) (ग्रं०) वधूवर किं० दंपत्य, किं० मेहूण.
वोहलणें (धा.ना.)(ग्रं०)वाहून जाणें.
वोहा (पु. ना.) (ग्रं०) गाय, म्हैस, इ०कांची कास.
वोळगण (स्त्री. ना.) (ग्रं०) प्राप्ति.
वोळगणा (पु. ना.)(ग्रं०) सेवक.
वोळगणें (धा. ना.)(ग्रं०) प्राप्त होणें. २ अनुकूल होणें.
वोळगें (न. ना.) (ग्रं०) सेवा.
वोळणें (धा. ना.) (ग्रं०) प्राप्त होणें, वळणें.
वोळंबा (स्त्री. ना.) (ग्रं०) दाळवी.
वोळा (पु.ना.)(ग्रं०) मेघ. २ ओळा.
व्यक्त (सं. वि०) इंद्रियगोचर होण्याविषयीं योग्यता ज्याचे अंगीं आहे असा जो कोणेक अर्थ तो. २ चांगलें समजायाजोगें जें भाषण, लेख इ० तो.
व्यक्ति (सं. स्त्री. ना.) एक,एक,एक अशा रूपानें गणायास योग्य असे भिन्नभिन्नतेंकरून स्थित जे अर्थ ते प्रत्येकीं. २ कोणेकाची गुणेंकरू-

न किं० अवगुणेंकरून असाधारणता वर्णायाची असतां त्यास म्हणतात. ३ अभिव्यक्ति. ४ प्रकटपणा.
व्यंग (सं.वि०)विकलांग. २ (न.ना.) विकलत्व.
व्यग्र (सं. वि०) शोकादिकांमुळें कांहीं सुचेना अशा अवस्थेस पावलें जें अंतःकरण इ० किं० तद्विशिष्ट पुरुषादि तो.
व्यतिरिक्त (सं. वि०) ज्याचा व्यतिरेक ज्याच्याठायीं आहे असा जो अर्थ तो तद्व्यतिरिक्त. २ (अव्य०) विवक्षितावांचून.
व्यतिरेक (सं. पु. ना.) (ग्रं०) कोणेक अर्थाचेठायीं कोणेक अर्थाचे अन्वयाचा जो अभाव तो.
व्यतीपात (सं. पु. ना.) सत्तावीस योगांतील सत्रावा योग तो. २ भारी चंचळ, द्वाड जो पोर इ० त्यास म्हणतात. [२ व्याक्षेप.
व्यत्यय (सं. पु. ना.) विपर्यास.
व्यथा (सं. स्त्री. ना.) आधिरूप किं० व्याधिरूप अनुभूयमान जें दुःख तें.
व्यभिचार (सं. पु. ना.) कोणेक विधीविषयीं मानलेल्या नियमाचा लक्ष्यविशेषीं असतो जो भंग तो. २ पुरुषानें स्वस्त्रीहून इतर स्त्रीशीं किं० स्त्रीनें परपुरुषाशीं रमणें जो नियमातिक्रम होतो तो.
व्यय (सं. पु. ना.) खर्च. [वृथा.
व्यर्थ (सं.वि०) निरर्थक. २ (अव्य०)
व्यवधान (सं. न. ना.) कोणेक पदार्थाशीं कोणेक पदार्थाचें संनिधान किं० साक्षात्संबंध न होण्यास कारणीभूत जें मध्यवर्ति अवकाशादिनिरूप, किं० तृतीय पदार्थादिनिरूप असणें जें अंतर तें, किं० तत्कारणीभूत अवकाश आणि तृतीय पदार्थ तें. २ कोणेकाचे गतीस मध्यें कांहीं एक पदार्थाचे स्थितीमुळें होतो जो प्रतिबंध तें, किं० तो प्रतिबंधक पदार्थ तें. ३ सतत चाललेल्या व्यापारामध्यें कांहीं कारणानें यत्किंचित् पडतो जो काळखंड तें.
व्यवसाय (सं. पु.ना.) क्रयविक्रयादि जो व्यापार तो. २ निश्चय.
व्यवस्था (सं. स्त्री. ना.) कांहीं पदार्थांचा किं० क्रियांचा यथायोग्य किं० विवक्षितानुरूप संबंध होई असा जो विनियोग तो. २ गति, परिणाम अशा अर्थी कोणी प्रयोग करितात.
व्यवहार (सं. पु. ना.) अर्थावर कांहीं क्रिया उत्पन्न झाल्यानें तद्द्वारा परस्परें अर्थाचें संयोग, वियोग, आकर्षण, प्रसारण, उच्चारण, इ० जें कांहीं घडतें तें सर्व मिळून जी एक विशिष्ट क्रिया ते. २ क्रयविक्रयादि जो वाणिज्यव्यापार त्याविषयीं विशेषेंकरून प्रसिद्धि ३ लोकरीति.
व्यष्टि (सं.स्त्री.ना.)एकेक जो देह तो.
व्यसन (सं. न. ना.) कोणेक विषयाची एकवेळ गोडी लागल्यामुळें त्याचा वियोग झाल्यानें चित्तास चैन पडूं नये असा जो त्याचा संबंध आपणास जडतो तें. २ संकटावस्था तें.
व्याकरण (सं. न. ना.) प्रकृतिप्रत्य-

यविभागादि प्रकारानें शब्दांची सिद्धि ज्यांत प्रतिपादिली आहे असें जें शास्त्र तें.

व्याकुल, ळ (सं. वि०) शोक, हर्ष, इ० कानें अतिव्याप्त झाल्यामुळें कांहींच सुचेना अशी अवस्था पावलें जें अंत:करण किं० तद्विशिष्ट मनुष्यादि तो. २ कोणेक अतिशय दु:ख झाल्यामुळें ज्ञानशक्ति आणि शरीरशक्ति ज्यामध्यें राहिली नाहीं असा जो मनुष्यादि तो.

व्याख्या (सं. स्त्री. ना.) श्लोक, वाक्य, इ०कांची अर्थवर्णनद्वारा जी परिस्फुटता ती. २ गुप्त गोष्टीचा कोणी करितो जो बोभाटा ती. ३ वर्णन. ४ हेंटाळणी.

व्याख्यान (सं. न. ना.) ग्रंथ, वाक्य, इ० कांची व्याख्या करण्याचा व्यापार तें. २ गुरुनें शिष्यास काव्य, शास्त्र, इ०कांचा अर्थ समजावून देण्याचा व्यापार तें.

व्याघात (सं. पु. ना.) खंड. २ (ग्रं०) वर्णास हानि.

व्याघ्र (सं. पु. ना.) वाघ.

व्याज (सं. न. ना.) मिष. २ (प्रा.) सावकारापासून कांहीं पैका ऋण घेतला असतां शंभरास प्रतिमासीं एक इ०रूप बोलिनें जें कर्ज घेणारानें देणारास कांहीं वर द्यावयाचें केलें असतें तें.

व्याजबट्टा (पु. ना.) कर्जाऊ रुपये देणें, नाणीं वटावणें, हुंड्यापाड्या करणें, इ० जो सराफीचा व्यवहार तो.

व्याध (सं. पु. ना.) पारधी. २ (स्त्री.) व्याधि.

व्याधि (सं. स्त्री. पु. ना.) शरीरास उपद्रवकारक जे रोग, क्षत, इ० ते प्रत्येकीं. २ आपणास उपद्रवकारक पाठीमागें कांहीं लागतें जें लचांड तें. ३ अर्वाच्य जें पोर त्यास ह्मणतात.

व्याप (पु. ना.) देश, ग्राम, राज्य, दरबार, इ० जीं व्यवहाराधिकरणें त्यांचेठायीं कोणेक व्यवहारकर्त्यांचीं जाणें, येणें, देणें, घेणें इ० व्यवहारद्वारा असल्ये जी व्याप्ति तो. २ उपद्व्याप.

व्यापणें (धा. ना.) कोणेकानें कोणेक पदार्थादिक आपल्याबाहेर न उरे असा करणें, किं० त्याचे सर्व अवयव, स्वरूपानें किं० स्वशक्त्यादिकानें अन्वित होत असा करणें, किं० तशा प्रकारें आपण पसरणें.

व्यापार (सं. पु. ना.) करणें, मारणें, इ० धातूंचा जो अर्थ तो. २ क्रयविक्रयरूप जो व्यवहार तो.

व्याप्ति (सं. स्त्री. ना.) कोणेक अर्थाची कोणेक अर्थातें व्यापून जी स्थिति ती.

व्यामोह (सं. पु. ना.) कर्तव्यविचार विसरून भलतेंच करायास कारणीभूत जी चित्तास भ्रांति उत्पन्न होत्ये ती.

व्यायाम (सं. पु. ना.) गमन करणें, दंड काढणें, इ०कें करून शरीरावयव ओढणें, ताणणें, जात असा शरीरास होतो जो संस्कार तो, किं०

त्यासाठीं केला जो गमनादि व्यापार तो.

**व्याल, ळ** (सं. पु. ना.) सर्प.

**व्यावहारिक** (सं. वि०) व्यवहारसंबंधी जें नाम, भाषा, लिपि, इ० तें.

**व्यावृत्ति** (सं. स्त्री. ना.) कोणेक लक्ष्यविशेषीं प्रसक्त झालेला जो दोषादि कोणेक अर्थ तो विशेषणादि सामर्थ्यानें त्या लक्ष्यीं लागू न होतां त्याचा तेथून जो पृथक्भाव तो. २ कोणेक धर्म इ०कांचे ठायीं कोणेक धर्मादिकांचा जो व्यतिरेक तो. ३ विवंचना.

**व्यास** (सं. पु. ना.) वेदांचे विभाग, अष्टादश पुराणें, इ० ज्याणें केलें असा एक ईश्वराचा अवतार चिरजीवी ब्राह्मण आहे तो. २ पुराण सांगणारा जो त्यास म्हणतात. ३ गोलाकार, किं० वृत्ताद्याकार जो पदार्थ त्याचे गर्भीचें जें प्रमाण तें.

**व्यासंग** (सं. पु. ना.) विद्याकलादिरूप जें साध्य तद्विषयीं तदनुकूल पठनादि व्यापार करीत नेहमी त्याचे ठायीं जी स्थिति तो.

**व्याहाळी** (स्त्री. ना.) (ग्रं०) क्रीडा.

**व्युत्पत्ति** (सं. स्त्री. ना.) शास्त्रादि व्यवहाराचे जे तत्पारिभाषिक संकेत असतात तत्ज्ञानपूर्वक तत्तद्व्यवहाराचें जें ज्ञान तें. इ०.

**व्युत्पन्न** (सं. वि०) शास्त्रादि व्युत्पत्ति आहे ज्यास तो, किं० ज्याचे अवयवांत अर्थकल्पना आहे असा जो शब्द तो.

**व्यूह** (सं. पु. ना.) शत्रूचा आंत प्रवेश न होतां आपला मार शत्रूवर चालावा म्हणून शकटाद्याकारक सैन्याच्या रचनेचे प्रकार आहेत ते प्रत्येकीं. २ शत्रुपराजयादिरूप जें साध्य तत्साधनार्थ अनेक युक्तींनीं दुसऱ्याचे मनांत एकाएकीं न यावयाजोगी मोठी कोणी रचिली जी मसलत तो.

**व्योम** (सं. न. ना.) आकाश.

**व्रण** (सं. पु. ना.) मनुष्य, वृक्ष, इ०कांचे शरीरास शस्त्रादि लागल्यामुळें किं० रोगादिकांमुळें जो छिद्र पडतो तो.

**व्रत** (सं. न. ना.) ईश्वरप्रसादद्वारा पापक्षय किं० इष्टफलप्राप्ति ज्यापासून होते अशीं तत्तन्नियमपूर्वक करायाचीं कर्मे आहेत तीं प्रत्येकीं. २ कोणेक शुभाशुभ कर्म करण्याविषयीं सतत धरिला जो नियम तें.

**व्रतबंध** (सं. पु. ना.) मुंज म्हणून संस्कार तो.

**व्रतस्थ** (सं. वि०) कांहींएक व्रतादि कर्मांगभूत जो ब्रह्मचर्यादि नियम तो ज्याणें धारण केला आहे तो.

**व्रात्य** (सं. पु. ना.) ज्याची मुंज न होतां गौणकालही अतिक्रांत झाला तो ब्राह्मणादिकांचा पुत्र. २ (वि०) अवाच्य.

**व्रीडा** (सं. स्त्री. ना.) लज्जा.

**व्रीहि** (सं. पु. स्त्री. ना.) भात म्हणून जें धान्य तो. तीं.

## — श —

**श** — हा वर्ण निराळें व्यंजन आहे.

**शकट** (सं. पु. ना.) गाडाप्रथमार्थी.

**शंकणें** (धा. ना.) आशंकायुक्त होणें

**शंकराचार्य** (सं. पु. ना.) कलियुगामध्यें पाखंडमताचा विध्वंस करून वेदोक्त अद्वैतमार्ग चालवायासाठीं धर्मप्रवर्तक शंकराचा अवतार झाला होता तो. २ जागोजाग त्याचे मठ आहेत तेथें धर्म चालवायाकरितां अधिकृत संन्यासी असतो ते.

**शकल** (सं. न. ना.) खंड किं० तुकडा. २ कोणेक गोष्टीच्या भागांतील मर्मांश. ३ (स्त्री. ना.) युक्ति.

**शंका** (सं. स्त्री. ना.) कांहिंएक कर्म करण्याविषयीं या कर्मानें मला लोक हसतील, इ० संभावनेनें अंतःकरणाचा संकोच व्हावयाजोगी अंतःकरणांत वृत्ति उत्पन्न होते ती. २ कोणेक अर्थ बाह्यत्कारीं जसा रूपेंकरून बोधविषय होत असतो तद्विरुद्धांश संभावना घेऊन जें त्याच अर्थाविषयीं कल्पनेंतर ती. ३ शास्त्रार्थाविरुद्ध जो कोणेक ज्ञेय विषय त्याजवर कांहीं विरुद्धांश संभावना घेऊन जो तद्विषयी प्रश्न तो.

**शकुंत** (सं. पु. ना.) पक्षी.

**शकुन** (सं. पु. ना.) कोठें जाण्यास प्रवृत्त होते समयीं सुशब्दकुशब्दादिकांचें श्रवण, किं० मंगलामंगल पदार्थांचें दर्शन, इ०रूप जें कांहीं साहजीक होतें तेंच शास्त्रानुरोधानें मानितात जें होणारे शुभाशुभाचें लक्षण तें. २ प्रश्न.

**शक्ति** (सं. स्त्री. ना.) अर्थमात्राचे अंगीं नानाकार्यनिर्वाहक जो बल झाणून धर्मविशेष असतो तो. २ ईश्वराची जी योगमाया ती जिचे पार्वती, लक्ष्मी इ० अवतार. ३ एक आयुधविशेष आहे. [यास्तव चक्र.

**शक्तिचक्र** (सं. न. ना.) (ग्रं०) मा-

**शक्तिपात** (सं. पु. ना.) रोग, भय, इ० कारणामुळें शरीरशक्तीची हानि होते तो. २ (ग्रं०) अज्ञानरूप शक्तीचा निरास तो.

**शक्य** (सं. वि०) कार्याचे शक्तीनें करणें, घडणें, इ० विषयीं होणयाजोगा जो कोणेक कर्मभूत अर्थ तो.

**शक्र** (सं. पु. ना.) इंद्र.

**शंख** (सं. पु. ना.) समुद्रादिकांत राहणारा एक जलजंतु आहे. २ त्याचें जें अस्थिरूप शरीरावर आवरण असतें तें, जेणेंकरून देवावर पाणी घालितात, जो युद्धादिकांत मुखानें वाजवितात, इ०. ३ तदाकार जें अंगुल्यादिकांवर रेषाचिन्ह असतें तें. ४ शंखेश्वा. शंख करणें म्ह० बोंबलणें.

**शंखतीर्थ** (न. ना.) (ग्रं०) बोंबलण्यास म्हणतात.

**शंखध्वनि** (सं. स्त्री. ना.) शंखाचा जो ध्वनि तो २ बोंबलण्याचा जो शब्द तो.

**शंखवळा** (स्त्री. ना.)(ग्रं०) बांगड्या.

**शंखळा** (स्त्री. ना.) शृंखला.

**शठ** (सं. वि०) शहाणा असून दुसऱ्यास वंचावें म्हणून व्यवहारीं सकपटपणें वर्तण्याचा स्वभाव ज्याचा असा जो हरामी तो. २ कदर्यु.

**शंड, षंड** (सं. पु. ना.) नपुंसक तो.

शण (सं. पु. ना.) ताग.
शतक (सं. न. ना.) शंभर श्लोकादि-
काचा जो समुदाय तें.
शतचूर्ण (सं. न. ना.) कोणेक पदार्थ
फुटून त्याचा केवळ होतो जो चुराडा
तें. २ तसा परिणाम पावला जो प-
दार्थ तो.
शतंभीष्म (पु. ना.) विद्यापराक्रमा-
दिकेंकरून एकापेक्षां एक अधिक
असे जे असंख्यात पृथ्वीवर पडले आ-
हेत त्यास म्हणतात. परंतु त्याची वि-
द्यमानता दाखवून प्रकट जो कोणी
त्याची कःपदार्थता वर्णनीय असतो
प्रयोग. [मूर्ख त्यास म्हणतात.
शतमूर्ख (सं. पु. ना.) केवळ जो
शतशः (सं. अव्य०) शंभर शंभर
अशा संख्येनें मेजले जात असे.
शत्रु (सं. पु. ना.) वैरी.
शनैःशनैः (सं. अव्य०) मंदमंदगतीनें.
शपणें (भा. ना.) (ग्रं०) शापणें.
शपत (स्त्री. ना.) शपथ.
शपथ (सं. स्त्री. ना.) दिव्य.
शंपा (सं. स्त्री. ना.) (ग्रं०) वीज.
शफ (सं. पु. ना.) गाय, म्हैस, घोडा
इ०कांचे पायाचा खर तो.
शफरिध्वज (पु. ना.)(ग्रं०) कामदेव.
शबर (सं. पु. ना.) भिल्ल म्हणून म-
नुष्यांत एक जाति आहे.
शबल (सं. वि०) सजातीय अनेक
अर्थांचें आंत मिश्रण झाल्यामुळें ज्या-
ची शुद्धरूपता गेली असा कोणेक
अर्थ तो. २ (न. ना.) तसा झाला
जो त्या अर्थाचा परिणाम तें.
शबलब्रह्म (सं. न. ना.)(ग्रं०) मा-
योपाधिक जें ब्रह्म तें.
शब्द (सं. पु. ना.) श्रोत्रेंद्रियानें ज्या-
चें प्रत्यक्ष होतें असा एक विषय आहे.
२ भाषणांतील जीं वाक्यें किं० पदें
तीं प्रत्येकीं. ३ प्रथमादि विभक्ति
ज्यावरून होतात असा जो कितीएक
वर्ण मिळून एक अवयवी तो. ४ तूं
असें कां केलेंस, तूं हें बिघडलेंस,
इ०रूप दोषाभासक जें कोणेकाला
उद्देशून कोणेकाचें वचन तो; लागणें,
येणें, ठेवणें, इ० धातुयोगीं प्रयोग.
शब्दपांडित्य (सं. न. ना.) बोलण्या-
सारिखें ज्याचें हातून कांहीं व्हावयाचें
नाहीं, त्याचें उगीच जें कोरडें ढो-
लाचें वाक्पाटव तें.
शब्दब्रह्म (सं. पु. ना.) (ग्रं०) वेद.
शब्दराशि (सं. पु. ना.) (ग्रं०) वेद.
शब्दपिता (पु. ना.)(ग्रं०) परमात्मा.
शब्दवेधी (सं. वि०) कोणेक पदार्थ
प्रत्यक्ष दिसत नाहीं, त्याचा शब्द मात्र
ऐकूं येतो त्या शब्दानुसंधानानेंच त्या
पदार्थाचा बाणादिकेंकरून वेध क-
रितो तो.
शब्दशास्त्र (सं. न. ना.) व्याकरण-
शास्त्र. [कविता.
शब्दसृष्टि (सं. स्त्री. ना.) (ग्रं०)
शब्दालंकार (सं. पु. ना.) कवितेंत
अनुप्रास, यमक इ० जे अलंकार
ते प्रत्येकीं.
शम (सं. पु. ना.) काम, क्रोध, मोह,
अग्नि, वायु, रोग, शीत, इ० जे
त्यांचा क्षोभ होण्यास कारणभूत जो

वेगविशेष उत्पन्न होत असतो तो न्यून झाल्यानें किं० नसल्यानें त्या त्या अर्थाची प्रकृतिरूपानें धरून जी स्थिति तो. २ अंत:करणामध्यें कामक्रोधादि किं० संकल्पविकल्पादिरूप ज्या अनेक वृत्ति उठत असतात तद्राहित्येंकरून स्वस्थपणें जी अंत:करणाची स्थिति तो.

शमन (सं. न. ना.) शम. २ शमण्याचा व्यापार तें. ३ ज्याचा शम जेणेंकरून होतो तें त्याचें. ४ यम.

शय (सं. पु. ना.) (ग्रं०) हात.

शयन (सं. न. ना.) निजण्याचा जो व्यापार तें. २ अंथरूण, माचा, पलंग, इ० तें.

शय्या (सं. स्त्री. ना.) शयन.

शर (सं. पु. ना.) धनुष्यानें सोडायाचा बाण तो.

शरण (सं. न. ना.) कोणेकाचे हातानें कोणेकाचें संकटापासून होतें जें संरक्षण तें. २ तादृश संरक्षण करणारा जो तें. ३ (वि०) या संकटापासून माझें तूं संरक्षण कर अशी प्रार्थना करित कोणेक समर्थाच्या आश्रयास गेला जो तो; जाणें, येणें, असणें, इ० योगीं प्रयोग.

शरणागत (सं. वि०) रक्षण व्हावें म्हणून रक्षणकर्त्याप्रत गेला जो तो.

शरधि (सं. पु. ना.) (ग्रं०) बाण ठेवण्याचा भाता.

शरभ (सं. पु. ना.) एक पक्षी आहे.

शरम (फा० स्त्री. ना.) लाज.

शरमिंदा, धा (फा० वि०) उपकाराच्या भारानें दबलेला.

शरासन (सं. न. ना.) धनुष्य.

शरीर (सं. न. ना.) देह. २ स्त्रीपुरुषाच्या गुह्यावयवास संकेतानें म्हणतात. [अहंभाव.

शरीरभाव (पु. ना.) (ग्रं०) (सं.)

शरीरसंबंध (सं. पु. ना.) आपली मुलगी दुसऱ्याकडे दिली किं० त्याची आपण केली अशा प्रकारें साक्षात् किं० परंपरेनें होतो जो परस्पराचा संबंध तो.

शर्करा (सं. स्त्री. ना.) साकर. २ रेती.

शर्थ (स्त्री. ना.) पराकाष्ठा.

शर्यत (अर० स्त्री. ना.) पैज.

शलभ (सं. पु. ना.) टोळनावाचा प्राणी.

शलाका (सं. स्त्री. ना.) धातु इ०कांची काडी ती.

शल्य (सं. न. ना.) शरीरामध्यें सलायाजोगा आंत शिरलेला बाण इ०कांचा अंश तें. २ स्त्रियांचे पोटांत राहतें जें सल तें. ३ सूड न घेतां राहिलेला जो दुसऱ्यानें केलेला अपकार इ० रूप जें कांहीं अंत:करणांत सलत असतें तें.

शव (सं. न. ना.) मढें.

शश, शशक (सं. पु. ना.) ससा.

शशांक (सं. पु. ना.) शशी.

शशी (सं. पु. ना.) चंद्र.

शस्त्र (सं. न. ना.) तरवार इ० आयुध तें. कोणेकानें कोणेकावर शस्त्र धरणें म्ह० त्याचें वाईट करण्याविषयीं कंबर बांधणें.

शस्त्रवैद्य (सं. पु. ना.) शस्त्रानें शरीर कापून आंतील रोग काढून आरोग्य करणारा असा वैद्य तो.

शहर (फा० न. ना.) नगर.

शहरपन्हा (फा० पु. ना.) चौकी, पाहरा, इ०कें करून सरकारानें करायाचा जो शहरचा बंदोबस्त त्या कामाचें जें प्रकरण तो.

शहाजादा (फा० पु. ना.) पातशहाचा पुत्र तो.

शहाजोग (वि०) धनीचा जो मनुष्य तो.

शहाणा (वि०) चतुर.

शहानिशा (फा०पु.स्त्री.ना.) शानिशा.

शहामृग (फा०पु.ना.) एक पक्षी आहे.

शहारा (पु. ना.) अंगावर रोमांच उठावे, अंग थर्थरावें अशा ज्या विकृतीच्या लहरी येतात त्या प्रत्येकीं तो.

शहारें (न. ना.) शहारा.

शहाळें (न.ना.) कोंवळा जो नारळ तें.

शाई (फा० स्त्री. ना.) अक्षरादि लिहायाकरितां लाख, काजळ, हिरडे, इ०कांचा जो काढा, तांबडा, इ० किं० सुवर्णादिकांचे वर्ख पाण्यांत घोटून त्याचा करितात जो रंग तो. २ मृदंगाचे एका तोंडावर बसवितात तें लोखंडाचे किटानें चूर्ण इ० तो. ३ ग्राम, शहर एतद्वाचक शब्दापुढें तत्संबंधी या अर्थी या शब्दाचा प्रयोग होतो. उ० पुणेशाई इ०.

शाईशिरस्ता (फा० पु. ना.) साधारण जी जनरीति तो.

शाखा (सं. स्त्री. ना.) वृक्षाची जो खांदी ती. २ ग्रंथादि कोणेक अर्थास वृक्षरूपत्वेंकरून मानून त्याचे जे प्रकरणादिरूप अनेक अवयव त्यांस प्रत्येकीं म्हणतात.

शाखामृग (सं. पु. ना.) (ग्रं०) वानर.

शाखिया (पु. ना.) (ग्रं०) वृक्ष.

शागिर्द (फा० पु. ना.) जो ज्याचा विद्यार्थीपणा करितो तो त्याचा; प्रायः गवई लोकांत किं० तालिमखान्यांत याची प्रसिद्धि. २ कोणेकापाशीं देवपूजेस मांडावें, धोतें धुणून यावीं इ० कामावर जो ब्राह्मण वेतन देऊन ठेविला असतो तो.

शाग्रीत (पु. ना.) शागिर्द.

शाड्वल, ळ (न. ना.) (ग्रं०) कोंवळा धान्यांकुर. २ (वि०) कोंवळा लसलशित.

शांत (सं. वि०) सत्वगुणप्रधान मनुष्य, प्रकृति, औषध, अग्नि, वायु, नदी, इ० तो. २ मरणें, विझणें, इ० कारणामुळें प्रकृतिरूपीं लीन झाला जो मनुष्य, दिवा, इ० पदार्थ तो. ३ क्रोधद्वेषादिरहित जें स्थळ इ० तो. ४ शांति.

शांतवन (न. ना.) सांत्वन.

शांति (सं. स्त्री. ना.) शम. २ रोग इ० जें कांहीं उपद्रवकारक अरिष्ट त्याच्या निरासार्थ होम, जपादि प्रधान जें कर्म करितात ती. ३ मरणें इ० कारणानें पूर्वप्रकृतिरूप अवस्थेंत जी स्थिति ती.

शांतिरस (सं. पु. ना.) नवरसांतील एक रस आहे.

शानदार (फा० वि०) छानदार.

**शानिशा** (फा० पु. स्त्री.ना.) होतें कीं नाहीं होत, मिळतें कीं नाहीं मिळत, इ० रूप संदेहविषय जो कोणेक अर्थ तद्विषयीं होतेंच किं० नाहींच होत इ० एकरूपतेचा जो निश्चय, जेणेंकरून संदेहविषयता किमपिही राहात नाहीं तो. ती.

**शाप** (सं. पु. ना.) कोणेकातें उद्देशून त्याचें कांहींएक अकल्याण व्हावें असें मनांत आणून तुझें निसंतान होवो, तुला दारिद्र्य येवो, तुला दुष्ट योनि प्राप्त होवो, इ०रूप जो वाक्यप्रयोग करितात तो.

**शाबास** (फा० अव्य०) कोणेकाचें चांगलें कर्म पाहून आनंद झाला असतां त्याचे प्रशंसेसाठीं हा उद्गार निघतो. २ (स्त्री. ना.) धन्य.

**शाबासकी** (स्त्री. ना.) शाबास या शब्दप्रयोगापासून कोणेकास मिळतो जो सत्कार तो.

**शाबूत, बूद** (अर० वि०) नाशादि संभावना असतां तें नाशादि न होतां जसेंचे तसें राहिला जो तो. कोणेकावर कांहींएक गोष्ट शाबूत करणें म्ह० साक्ष्यादि प्रमाणानें खरी करणें. [गेस ह्मणतात.

**शांभवी** (सं. स्त्री. ना.) संकेतानें भा-

**शायदी** (स्त्री. ना.) साक्षी प्रथमार्थी. २ (पु. ना.) साक्षीद्वितीयार्थी.

**शार्ङ्ग** (सं. न. ना.) विष्णूचें धनुष्य तें. २ शृंगाचें जें धनुष्य तें.

**शार्दूल, ळ** (सं. पु. ना.) व्याघ्र.

**शाल** (फा० स्त्री. ना.) एक प्रतिष्ठित उर्णावस्त्र आहे. २ (सं. पु. ना.) एक वृक्ष आहे

**शाला** (सं. स्त्री. ना.) अग्निहोत्र, विद्यार्थ्यांचें अध्ययन, स्वयंपाकगृह, नृत्य, इ० व्यवहारार्थ किं० गाई, घोडीं, इ० जीव किं० शालें, रत्नें, इ० पदार्थ आंत राहायाकरितां जें गृह केलें असतें तें. २ विद्या कलादि शिकण्याचा जो कोणेक स्थळीं आखाडा असतो तो. ३ बरी वाईट रीत लागण्यास कारणभूत जी शिक्षा, ती जेथून होते त्या अधिकरणास म्हणतात.

**शालाशुद्ध** (सं. वि०) चांगले संप्रदायाचे शाळेंतला अतएव चांगला जो विद्यार्थी, गवई इ० किं० त्याचें तें अध्ययन, गायन इ० तें.

**शालिका** (स्त्री. ना.) (ग्रं०) उत्पत्ति.

**शालीय** (न. ना.) (ग्रं०) मंदिर.

**शावक** (सं. पु. ना.) बालक.

**शाश्वत** (सं. वि०) नश्वर नव्हे जो पदार्थ तो. २ (स्त्री. ना.) शाश्वति.

**शाश्वती** (स्त्री. ना.) शाश्वतपणा.

**शासणें** (धा. ना.) (ग्रं०) शासनानें कोणेकास युक्त करणें.

**शासन** (सं.न.ना.) पारिपत्य. २ आज्ञा. ३ राजादिकानें आपलेकडे धनीपणा घेऊन प्रजादिकांस अनुकूळ मार्गांत वर्तवणें असा जो व्यापार तें. ४ (ग्रं०) सान्न, उपकरण.

**शास्ता** (सं. पु. ना.) शासन करणारा जो राजा, गुरु इ० तो.

**शास्त्र** (सं. न. ना.) कोणेक विद्या-

विषयानें अभिक्रून करून प्रवृत्त झा-लेलें, जें ईश्वराचें किं० इतर कोणी ज्ञात्यांचें वचन तद्द्वारा जे विषय-भेदेंकरून भिन्न भिन्न शब्दव्यवहार तें प्रत्येकीं. न्यायशास्त्र, धर्मशास्त्र, इ० समास.

**शास्त्रार्थ** (सं. पु. ना.) प्रवृत्तिनिवृत्तिविषयीं नियामक जे धर्मशास्त्रादि शास्त्र तत्प्रतिपादित जो कोणेक कर्माविषयीं विधिरूप किं० निषेधरूप अर्थ तो. कोणेक गोष्टीचा शास्त्रार्थ करणें. म्ह० ती गोष्ट सरासरी केलीशी करणें.

**शाहीर** ( अर० पु. ना ) पोंग्याचा तमाशा करून उपजीविका करणारा जो लावण्यांचा कवि तो. २ दुसऱ्यानें केलेल्या लावण्या म्हणून तमाशावर उपजीविका करणारा जो त्यासही म्हणतात.

**शाळा** (स्त्री. ना.) शाला.

**शाळू** ( पु. ना.) जोंधळ्यांत एक जाति आहे. २ हेमंतऋतूंतील लवकर जाणारे जे दिवस त्यांस म्हणतात.

**शाळूसोबती** ( पु. ना. ) शेवटपर्यंत सोबत देणारा नव्हे, मध्येंच सोडून जाणारा असा जो सोबती त्यास म्हणतात.

**शिउ** ( पु. ना.) (ग्रं०) शिव.

**शिऊळ** ( स्त्री. ना. ) बैल इ०कांची मान अडकायासाठीं जोकडाचे कडेस भोकें पाडून त्यांत ज्या घालायाच्या खुंट्या केल्या असतात त्या प्रत्येकीं. २ शंखासारिखा जो मुखानें शब्द करितात तो.

**शिंक** (स्त्री. ना.) शैत्यादि कांमुळें नाकांतून सशब्द वायूचें निःसरण व्हावयाजोगी जी वायूची चेष्टा ती.

**शिकणें** (धा. ना.) (सं. शिक्षा) विद्या-कलादि आपणास यावें म्हणून तद्विषयक जी शिक्षा तद्विशिष्ट होणें आणि तद्द्वारा तो विषय अंगीं प्रवीणता यावयाजोगा बुद्धींत घेणें.

**शिकल** (अर० स्त्री. ना.) जंगलेलीं जी तरवार इ० शस्त्रें त्यांचा जंग जाऊन झिल्हई यावी म्हणून त्यांजवर करितात जो घर्षणसंस्कार ती.

**शिकवण, वणी** (स्त्री. ना.) कोणेकास काहींएक गोष्टीविषयीं बुद्धिवाद सांगण्याचा जो व्यापार ती.

**शिकार** (फा० स्त्री. ना.) पारध.

**शिकाळी, शिंकाळी** (स्त्री. ना.) जी दोरी भरून उचललें असतां पात्र समान उचललें जावें अशी जी त्या पात्राचे गळ्यास दोरी बांधली असते ती. २ तद्विशिष्ट जें तें पात्र ती.

**शिंकें, शिंकें** ( न. ना. ) पोटीं भांडीं इ०पदार्थ घालून टांगायाचे उपयोगी दोरीचा पाशविशेष करितात तें.

**शिक्का** (अर० पु. ना.) मोहोर, पुतळी, इ० नाणें, किं० सनद इ० पत्र, इ०कांवर प्रभूच्या नांवाचें चिन्ह असावें म्हणून त्यांजवर मारायाकरितां प्रभूचे नामाक्षरांचा जो ठसा केला असतो तो किं० त्याणें नाणें, पत्र, इ०कांवर उमटतें चिन्ह तो. २ चिन्हार्थ कांहीं एकावर मारितात जो कोणेक ठसा तो. इ०.

**शिखर** (सं. न. ना.) वृक्ष, पर्वत, घर, इ०कांचा जो शिरोभाग तें. २ देवालयादिकांवर शृंगाकार उंच जी रचना केली असते तें. कोणेक गोष्ट शिखरास जाणें. म्ह० तिचा कळस होणें.

**शिखा** (सं. स्त्री. ना.) मस्तकावर भोंवतालचे केंस काढून मध्येंच जो केशसमुदाय राखितात तो. २ मोर, कोंबडा, इ०कांचे मस्तकावर मध्यें जो केशादिरूप अवयव वाढला असतो तो. ३ तशीच घोडा इ०कांचे मस्तकावर जें कलगी इ० लाविलें असतें तें. ४ अग्नीची जी ज्वाला ती.

**शिंग** (सं. शृंग) (न. ना.) कित्येक जातींचे पशूंचे मस्तकावर जे अस्थिरूप अवयव फुटतात ते प्रत्येकीं. २ तदाकार पितळ इ०कांचें वाकडें जें मुखवाद्य करितात तें.

**शिजणें** (धा. ना.) तांदूळ, दाळ, भाजी, इ० पदार्थ जलादिसंयोगानें पक्क होणें. कोणेकाची दाळ कोणेकस्थळीं शिजणें म्ह० त्याचें तेथें चालणें. २ उष्मा होणें.

**शिटाऊ, टाव** (वि०) पक्का हरामी जो मनुष्य इ० त्यास म्हणतात.

**शिडी, शिढी** (स्त्री. ना.) लांब लांब दोन लांकडें हात सवाहातांचे अंतरानें उभीं मांडून त्यांस मध्यें पाय ठेवायास हात सवाहात लांबीचे लांकडाचे अनेक तुकडे आडवे संबद्ध करून जें माडी इ०कांवर चढायास साधन करितात तें. [फसवणें.

**शितरणें** (धा. ना.) (ग्रं०) झकवणें,

**शितरू, रू** (वि०)(ग्रं०)फसविणारा.

**शितळ** (वि०) शीतल.

**शितळाई** (स्त्री. ना.) थंडावा.

**शितोडा** (पु. ना.) आघातादिकामुळें आधारापासून सुटून उडतो जो उदकादिकांचा बिंदु तो. २ पर्जन्यादिकांचा वरून पडतो जो थेंब त्यासही म्हणतात. ३ उदकादिकांचा जो सेक तो.

**शिथिल** (सं. वि०) ज्याचे आरंभक अवयवांचा संयोग दृढ नव्हे असा जो पदार्थ तो.

**शिदोरी** (स्त्री. ना.) अरण्य, शेत, मार्ग, इ० कांच्याठायीं भोजनार्थ न्यावयाकरितां शिजलेल्या अन्नाची वस्त्र, पात्र, इ०कांत बांधली असते जी गाठोडी ती.

**शिधा** (पु. ना.) भोजनार्थ पाक करायाकरितां घेतात जो तांदूळ, डाळ, पीठ, तूप, इ० पाकसामग्री तो.

**शिधोरी** (स्त्री. ना.) शिदोरी.

**शिंप** (स्त्री. ना.) समुद्रादिस्थित जलजंतूंचीं आवरक शंखाकार दोन हाडें असतात तीं प्रत्येकीं.

**शिंपडणें** (धा. ना.) कोणेक पदार्थ, स्थळ, इ०कांवर बिंदुशः सेक होई असें जल, रंग, गंध, इ० टाकणें.

**शिंपणें** (धा. ना.) खळीं इ० पात्रस्थित जें पाणी इ० सद्रव पदार्थ तो स्थळ इ०कांवर सेक होई अशा प्रकारें हस्तादिकानें त्याजवर उडविणें. २ (न.) रंगपंचमीस रंगाचा खेळ तें.

**शिंपला** (पु. ना.) जीमध्यें मोत्यें उत्पन्न होतात अशा जातीची किं० जिच्या पाठीवर रेषा असतात अशी जी शिंप तिला म्हणतात.

**शिपाई** (फा० पु. ना.) सैन्यामध्यें युद्ध करणारे जे योद्धे ते प्रत्येकी. २ वसूल वासूल, नवरकिंवा चाकरी, इ० कामावर ठेविला असतो जो नरवार, मोटा, इ० शस्त्र वाळगणारा राजादिकांचा दूत तो. ३ युद्ध, वादप्रतिवाद, इ०कांविषयीं मन भिन्न भिटरणें उत्साहानें प्रवृत्त होण्याचा स्वभाव ज्याचा असा जो त्यास म्हणतात. ४ डोली, पालखी, गाडी, इ०कांची दांडी, व जेजाल, दिवटी, इ०कांस आधारभूत कैंचीसारखी दोन दोन लाकडें एकत्र सबद्ध केली असतात तीं दोन दोन मिळून एक किं० प्रत्येक तो.

**शिपाईप्यादा** (पु. ना.) शिपाई, खिजमतगार इ० तो.

**शिफारस** (फा० स्त्री. ना.) राजा इ० कोणेक थोराजवळ कोणेकाची मानमान्यता व्हावी म्हणून त्याचे विद्याशौर्यादि गुणांची कोणी करितो जी प्रशंसा ती. २ हिमाईत.

**शिबंदी** (फा० स्त्री. ना.) किल्ला, शहर, इ०कांचे संरक्षणार्थ ठेविले असतात जे पायदळ शिपाई ती.

**शिबिका** (स. स्त्री. ना.) पालखी.

**शिबिर** (सं न. ना.) सैन्यामध्यें राजा, सेनापति, इ०कांच पृथक् पृथक् असतात गोट तें.

**शिर** (सं. न. ना.) मस्तक.

**शिरकमळ** (न. ना.) कमळाचे रूपकेंकरून शिरासच म्हणतात.

**शिरजोर** (वि०)(फा०)वरचढ झाला जो सेवक, यायको इ० तो.

**शिरणें** (अ. ना.) बाह्यप्रदेशीं स्थित जो अर्थ त्याणें अभ्यंतर प्रदेशीं प्रविष्ट होणें.

**शिरपेंच** (फा० पु. ना.) पुरुषाचे पागोट्यावर बांधायाचें जडावाचें भूषण असतें तो.

**शिरश्छेद** (सं. पु. ना.) तरवार इ० शस्त्रानें कोणेकाचे मस्तकाचा जो छेद तो.

**शिरस्ता** (फा० पु. ना.) चाल, रीत.

**शिरा** (वि०) अतिशयित उत्तम तो.

**शिराणी** (स्त्री.)(फा०) कौतुक. २ महत्व. ३ उपभोग. ४ लाभ.

**शिराळ** (न. ना.) पडवळ.

**शिरोभाग** (स. पु. ना.) शिरोरूप जो भाग तो. २ (वि०) गुणदुर्गुणादिकरून योग्यतेनें जो विवक्षित समुदायामध्यें उत्तम तो.

**शिरोमणि** (सं. पु. ना.) मुगुटमणी.

**शिलक** (अर० स्त्री. ना.) आतून कांहीं खर्च होऊन अंशतः अवशिष्ट राहिली जी पैका, धान्य, इ०कांची जमा ती. २ पत्रावळ लावण्याची चोय. ३ वायु इ० विकृतीनें पाठ इ०कांत भरले जी उसण ती.

**शिलकसांखळी** (स्त्री. ना.) प्रतिमासीं अशा क्रमानें उतरत उतरत गेली अशी जी शिलकेची परंपरा ती. २ द्रव्याचे पोतें इ० आणि तत्संबंधी हा-

डाग्रडती इ० मिळून जें शिलकेचें प्रकरण तें.

**शिलकूणें, गणें** (धा. ना.) बंदुकीचा तोडा, काडी इ० कानीं पेटणें.

**शिलकावण, णी** (स्त्री. ना.) कोणी अपराधी जो त्याजकडे, त्याला बोलावयास किं० तगाद्यास सरकारांतून शिपाई पाठविला असतां तो शिपाई त्या कुळापासून दर्शनींच घेतो जें द्रव्य तें. २ मामलेदार इ० अधिकाऱ्यास अमुक कामाचा निकाल होईपर्यंत प्रतिदिवसीं अमुक द्रव्य सरकारास द्यावें अशी आज्ञा करून तदनुरूप जें द्रव्य घेतात तें.

**शिलकी** (वि०) शिलकरूपानें राहिला जो पदार्थ तो. २ बहुत दिवस न खरचतां संग्रहीं राहिलेला जो पदार्थ तो.

**शिलंगण** (सं. सीमोल्लंघन) (न. ना.) दसऱ्याचे दिवशीं करितात जें सीमेचें उल्लंघन तें.

**शिला** (सं. स्त्री. ना.) पाषाण.

**शिलाराशि** (सं. पु. ना.)(ग्रं०)पर्वत.

**शिलेखाना** (फा० पु. ना.) सरकारचीं शस्त्रें इ० ठेवण्याची जागा तो.

**शिलेदार** (फा० पु. ना.) आपले पदरचें घोडें घेऊन त्यासुद्धां जो सरकारांत चाकरीस राहतो तो

**शिलोच्चय** (सं. पु. ना.)(ग्रं०)पर्वत.

**शिल्प** (सं. न. ना.) धातु, काष्ट, पाषाण, रंग, इ०कानीं यंत्र, शस्त्र, अलंकार, नौका, घर, वाडा, चित्र, इ० त्यांच्या त्यांच्या क्रियांनीं निर्माण्याचें जें कौशल तें.

**शिल्पी** (सं. पु. ना.) शिल्पानें उपजीविका करणारे जे सुतार, लोहार, गवंडी, सोनार, इ० ह्या जाति त्या प्रत्येकीं.

**शिवणें** (धा. ना.) वस्त्र, पर्ण, जखम इ० दोरा घालून विवक्षानुरूप परस्पर सांधले जात असें करणें. २ स्पर्शसंबंध होई असें कोणेकानें कोणेकास लागणें, परंतु परस्पर स्पर्शानें विटाळ, ओंवळेपणा, इ० होतें असा विषय असतां प्रयोग.

**शिवतणें** (धा. ना.) (ग्रं०) स्पर्शणें.

**शिवनिर्माल्य** (सं. पु. न. ना.) शिवावरील जो निर्माल्य तो. तें. २ शिवस्वासारिखा असा शपथ इ० प्रसंगीं याचा प्रयोग होतो. [भावाचा.

**शिवरा** (वि०) शिव्या देण्याचे स्व-

**शिवस्व** (सं. न. ना.) शिवास अर्पित झाला जो द्रव्यादि कोणेक विषय तें, ज्यानें ग्रहण केल्यास मोठें पाप लागतें, अतएव तुझें द्रव्य ह्मणजे मला शिवस्व आहे असे असे शपथ इ०कासाठीं याचे प्रयोग करितात.

**शिवायजमा** (स्त्री. ना.) शेतसारा, वतन, इ०रूप जी ऐनजमा त्याहून इतर जी खंड, गुन्हेगारी, नजर, इ०रूप जी जमा असल्ये ती.

**शिवार** (पु. न. ना.) गांवाकडे गृहसमुदाय, बागबगीचा याखालीं रुधलें असतें जें स्थळ त्याचे बाहेर त्या गांवचे शिवेपर्यंत शेतें, तृणें, काष्ठें, इ० जेथें होत असतें असें जें स्थळ तो. तें.

**शिवी** (स्त्री. ना.) क्रोधादि समयीं

कोणेकास उद्देशून प्रयुक्त करितात जें पातकारोपक रांडेचा, बोडकीचा, लबाड, लुच्चा, इ० शब्द किं० अक- मारतोस इ० वाक्य तें.

**शिवीगाळ, गाळी** (स्त्री. ना.) शिवी इ० रूप जी दुरुक्ति ती.

**शिशु** (सं. पु. ना.) बालक.

**शिश्नोदरपरायण** (सं. वि०) मैथुन आणि भक्षण या दोहों विषयांच्या सर्वदा पाठीस लागला जो तो.

**शिष्ट** (सं. वि०) यथाशास्त्र वर्तणारा, ज्याची रीति, आचार, इ० लोकांनीं प्रामाण्यंकरून घेत असावें अशा योग्यतेचा, किं० विद्या, तप, इ० गुणविशिष्टत्वामुळें पूजादि भरसरीं साधारण जनांपेक्षां उत्कृष्ट कोटींत गणायाचा जो ब्राम्हणादि तो.

**शिष्टसंभावना** (स. स्त्री. ना.) विवाहयज्ञादि समारंभीं इतरजनांपेक्षां विशेषेंकरून दक्षिणावस्त्रादि दानपूर्वक सभ्य जनाचा करितात जो सत्कार तो, किं० तत्समयीं त्यांस देतात जें तें दक्षिणावस्त्रादि तें.

**शिष्टाई** (स्त्री. ना.) (ग्रं०) एकाकडून दुसऱ्याकडे जाऊन त्याला वळवायाकरितां चार गोष्टी अधिक उण्या सांगाव्या, त्यास राजी करावा इ० रूप जो मध्यस्थपणें कोणी भाषणव्यापार करितो तो.

**शिष्टाचार** (सं. पु. ना.) शिष्टपरंपरेनें चालत आला जो आचार तो, ज्याला इतर जन आपल्या वर्तनास शास्त्रासारिखें प्रमाण मानितात तो.

**शिष्य** (सं. पु. ना.) जो ज्या गुरूपासून विद्याकलादि काहीं शिकतो तो त्या गुरूचा.

**शिष्या** (पु. ना.) शिष्य. २ शागिर्द.

**शिसा** (फा० पु. ना.) अंतर्ळ गळ्याचें उभार आकारानें कांचेचें पात्र असतें तें. २ मनमाशा ज्यांत मधाचा सचय करितात असा जो त्या मोहळाचा एक विभाग तो.

**शिसारी, शिसारी** (स्त्री. ना.) ज्यानें भक्षणानें किं० वास आल्यामुळें वमन व्हावयाजोगें जें कळमळून येतें तें. २ कोणेक पदार्थांचे अतिसेवनामुळें किं० त्याच्या ठायीं काहीं अमंगलादि दोषाच्या दर्शनादिकामुळें त्या पदार्थाचा आला जो वीट तो.

**शिस्त** (फा० स्त्री. ना.) कुळांकडील वसूल करायासाठीं जो कुळारगवार याद तयार करितात ती. २ (वि०) विवक्षित संप्रदायानुरूप जो जावसाल, व्यवहार, इ० तो. ३ (स्त्री. ना.) बागांदिकेंकरून कोणेक लक्ष्य वेधायाकरितां धरितात जें संधान तें.

**शिळा** (वि०) पर्युषित. २ पान, फळ इ० झाडावर असतां जो तेजांश असतो तो काहीं कालातिक्रम झाल्यामुळें निःशेष वियुक्त झाला आहे ज्यापासून असा जो फल, पुष्प, इ० पदार्थ तो.

**शिळोपा** (पु. ना.) चारसहा घटका दिवस आल्यापासून चारसहा घटिका दिवस राहीपर्यंत प्रायः सूर्यजनित संताप होत असतो त्या काळास सोडून इतर जो पूर्वापर काल तो.

**शिक्षक** (सं. पु. ना.) विद्यादि शिकविणारा जो गुरु तो. २ चोर इ० कांस शिक्षा करणारा जो राजादिक तो. [ण्याचा जो व्यापार तें.

**शिक्षण** (सं. न. ना.) शिक्षा कर-

**शिक्षा** (सं. स्त्री. ना.) अविदित जो विद्याकलादि कोणेक अर्थ, त्याविषयींचें ज्ञान व्हावयाजोगा गुरुवचनादिक जे ज्ञापक तेणेंकरून अंतःकरणास होतो संस्कार तो, आणि तादृश संस्कारजनक जें गुरु इ० कर्त्यांचें कर्म तें. २ पारिपत्य.

**शींग** (स्त्री. ना.) अधोली, पायली इ० माप, किं० इतर कांही पात्र त्यांत काठोकाठ धान्यादि भरून आगखवर धान्यादि घातलें असतां जो काठावर राशि होतो तो, किं० भूम्यादिकांवर स्थित जो, क्रमानें वर बारीक होत गेलेला धान्यादिकांचा राशि त्याचा जो अग्रभाग तो.

**शीघ्र** (सं. वि०) त्वरित.

**शीघ्रकोपी** (सं. वि०) यत्किंचित् निमित्तावरून ज्यास तत्काल कोप येतो असे स्वभावाचा जो तो.

**शीड** (न. ना.) गलबत इ०कांचें जें अवजार तें.

**शीण** (पु. ना.) शक्तीपेक्षां अधिक कांहीं श्रम केल्यामुळें अवयव शिथिलित होऊन उगीं फुटून शक्तिक्षीण व्हावयाजोगा जो विकृतिविशेषरूप संस्कार शरीरांत राहतो तो. २ (पु. स्त्री.) वयोवस्था.

**शीत** (न. ना.) शिजलेल्या भाताचे जे भिन्न भिन्न अवयव ते प्रत्येकीं. २ धनुष्याची जी दोरी तें. ३ (सं.) उष्णतेचा प्रतिपक्षी जो जलादिनिष्ठ गुण तें. ४ (वि०) तशा गुणानें विशिष्ट जो जलादि पदार्थ तो.

**शीतकर** (सं. पु. ना.) चंद्र.

**शीतल,ळ** (सं. वि०) शीत चतुर्थार्थी.

**शीतवास** (सं. पु. ना.) (ग्रं०) शीतकाळीं पाणी इ०कांत उभें राहावें असा जो राहण्याचा प्रकार तो.

**शीर** (सं. शिरा) (स्त्री. ना.) शरीर, पान, फळ, काष्ठ, इ०कांचे अंगीं त्यांचे उपजीव्य जे अन्नादि रस ते जिकडचे तिकडे पोहोंचावयास मार्ग भूत जे अनेक तंत्वाकार बारीक मोठे अवयव असतात ते प्रत्येकीं. २ चतुष्कोणाद्याकार जे काष्ठ, पाषाण, इ०कांचे पदार्थ त्यांस जे धारेसारखे आकार असतात ते प्रत्येकीं.

**शीर्ष** (सं. न. ना.) मस्तक.

**शील** (सं. न. ना.) स्वभाव. २ उत्तम मार्गानें वर्तावें, कुमार्गानें सर्वथा वर्तू नये असा जो कोणकाचे अंतःकरणाचा स्वभाव असतो तें.

**शींव** (स्त्री. ना.) सीमा, परंतु गांव, स्थळ, इ० स्थळविभागसंबंधी जी सीमा तद्विषयीं प्रयोग.

**शुक** (सं. पु. ना.) पोपट.

**शुक्ति** (सं. स्त्री. ना.) शिंप.

**शुक्र** (सं. पु. ना.) दैत्यांचा उपाध्याय एक ऋषि तो. २ (न. ना.) रेत.

**शुक्राचार्य** (सं. पु. ना.) शुक्रमथ-मार्थी. २ एकाक्ष जो मनुष्य त्यास थट्टेनं ह्मणतात.

शुक्ल (सं. वि०) पांढरा स्वच्छ जो वर्ण किं० तद्विशिष्ट पदार्थ तो. २ मासाचे जे दोन पक्ष त्यामध्यें ज्यांत प्रतिदिवशीं चंद्रकलेची वृद्धि होत असत्ये असा जो पक्ष तो किं० तद्गत तिथि तो

शुक्लकाष्ठ (सं. न. ना.) भाषण कोणीकडे गेलें तरी आपणास सोडीत नाहीं असें जें काहींएक पाठीशीं लागलें असतें झट त्यास म्हणतात.

शुक्लित (न. ना.) (ग्रं०) रेत.

शुचि (सं. वि०) स्वच्छ-पवित्र तो.

शुचिर्भूत (सं.वि०)व्यभिचार,अभक्ष्यभक्षण, इ० दोष करीत नाहीं, सर्वदा स्नानसंध्यादि सदाचाराच्या ठायीं जो वर्ततो असा स्वभावाचा किं० स्नानविधि, शौचविधि, प्रायश्चित्त इ०कें करून पवित्र झालेला जो तो, किं० विटाळ, चंडाळ, खरकटें, मरकटें, इ० जेथें नाहीं असा पवित्र किं० सडासंमार्जन इ०कें करून पवित्र केलेलें जें स्थळ तो.

शुचिष्मंत (सं. वि०) शुचिर्भूत.

शुंडा, शुंडादंड (सं. स्त्री. पु. ना.) हत्तीची सोंड.

शुद्ध (सं. वि०) पाप, मळ, इ० जे दोष तद्रहित जो तो. २ शोधनसंस्कार ज्यास झाला तो. ३ ज्यामध्यें अशुद्ध नाहीं असें जें अक्षर, पोथी, लिहिणें, म्हणणें, भाषण इ० तो. ४ ज्या रूपानें निर्देश करावयाचा तद्रूपत्व जो कोणेक अर्थ तो. उ० हे शुद्ध वैदिक आहेत. ५ शुक्लद्वितीयार्थी. ६ ते ते अर्थ जसे जसे असावे तसे तसे ज्यास आहेत असा अर्थीं कितीएक शब्दांपुढें, याचा योग होऊन समास होतो. उ० आकारशुद्ध, आचारशुद्ध, इ०. ७ (स्त्री.) शुद्धि.

शुद्धि (सं. स्त्री. ना.) पवित्रता किं० निर्दोषता तो. २ कोणेक अर्थाचा शोध करण्याचा जो व्यापार तो आणि तेणेंकरून लागतो जो शोध तो. ३ सावधपणा.

शुद्धअपरोक्ष (न. ना.) (ग्रं०) स्वप्रकाशअपरोक्ष.

शुद्धउपदेश (सं. पु. ना.) (ग्रं०) तूंच प्रत्यगात्मा ब्रह्म असा जो उपदेश तो.

शुद्धज्ञान (सं. न. ना.) (ग्रं०) यथार्थ जें ब्रह्म त्याचें जें स्वस्वरूपत्वेंकरून ज्ञान तें.

शुभ (सं. न. ना.) कल्याण. २ (वि०) कल्याणावह जें कर्म, शकुन इ० तो. ३ विवाहादि जें मंगळरूप कर्म तो.

शुंभ (पु. ना.) केवळ जडबुद्धि, कर्माविषयीं फारच मंद असा जो मूर्ख त्यास म्हणतात.

शुभ्र (सं. वि०) पांढरा.

शुभ्रांशु (पु. ना.) (ग्रं०) चंद्र.

शुश्रूषा (सं. स्त्री. ना.) परिचर्या, सेवा. २ काहींएक श्रवण करण्याची जी इच्छा तो.

शुष्क (सं. वि०) ज्यामध्यें ओलावा नाहीं असा जो कोरडा कोणेक अर्थ तो. २ रोगादिकानें रक्तरहित होऊन वाळलेलें जें शरीर तो.

शुष्काशुष्क, शुष्काशुष्की (अव्य०)

द्रव्यव्यय, द्रव्यलाभ, इ० रूप जो तत्वांश आंत असावा त्यावांचून.

**शूकर** (पु. ना.) (ग्रं०) सूकर.

**शून्य** (सं. न. ना.) कांहीं नाहीं अशा प्रकारें जी प्रतीति होते तिचा विषय जो केवळ अभाव तें. २ संख्यादिकांचे अभावाचें बोधक त्यात्या स्थानीं वर्तुल चिन्ह करितात तें. तसेंच अनुस्वार विसर्ग यांचें जें तत्सदृश चिन्ह करितात त्यासहि ह्मणतात. ३ आकाश. ४ उजाड जें गृह इ० तें.

**शून्यवाद** (सं. पु. ना.) कांहीं नाहीं तेंच ब्रह्म असें जें मत तो.

**शून्यशेज** (स्त्री. ना.) (ग्रं०) माया.

**शून्याकार** (वि०) शून्यरूप.

**शूर** (सं. पु. ना.) युद्ध, दान, इ० कर्मांचे प्रसंगी निर्भयपणें उत्साहानें प्रवृत्त होण्याचा स्वभाव ज्याचा असा जो तो.

**शूल, ळ** (सं. पु. ना.) एक आयुधविशेष आहे. २ अपराधी जनास वर चढवून ठार मारायासाठीं जो सूच्यग्र लोहदंड भूमींमध्यें रोंवून उभा केला असतो तो. ३ पोट, कपाळ, इ०कांच्या ठायीं उठते जी तिडीक तो किं० तसी त्यांत तिडीक उठायास प्रयोजक जो वातरोग तो.

**शृंखला** (सं. स्त्री. ना.) लोहादिकांचीं अनेक वलयें एकांतएक गुंतवून बंधनाउपयोगी जें दोरीसारिखें साधन करितात ती

**शृंग** (सं. न. ना.) शिंग.

**शृंगार** (सं. पु. ना.) शरीरादिक सुशोभित दिसायाजोगी जी त्या शरीरादिकांच्या ठायीं अलंकारभूत पदार्थांची यथायोग्य संनिवेशानें रचना करितात ती. २ स्त्रीपुरुषांचें विलासप्रधान जें चेष्टित त्यापासून होतो असा नवरसांतील एक रस आहे.

**शृगाळ** (सं. अप. पु. ना.) (ग्रं०) कोल्हा.

**शेक** (पु. ना.) भग.

**शेकडा** (पु. ना.) शंभर पदार्थांचा समुदाय तो. २ (अव्य०) प्रति शेकड्यास.

**शेकडों** (अव्य०) शतशः.

**शेखर** (सं. पु. ना.) तुरा ह्मणून जें शिरोभूषण तें.

**शेखी** (फा० स्त्री. ना.) शौर्य, पराक्रम, संपत्ति, इ० संबंधी कोणी आपली लोकांजवळ दर्शवितात जी थोरवी ती. [शेवटीं.

**शेखीं** (अव्य०) (ग्रं०) पर्यवसानीं,

**शेगडी** (स्त्री. ना.) शेक घेण्याकरितां विस्तव पेटवायाचें उपयोगी मृत्तिका इ०कांचें पात्र करित असतात ती.

**शेज** (सं. शय्या)(स्त्री. ना.) निजायासाठीं भूम्यादिकांवर वस्त्रादिकांचें करितात जें आस्तरण तें. २ अनुक्रम, शेज लागणें, पडणें ह्मणजे उत्तरोत्तर होत जावयाचें कर्म त्याचा आरंभ होणें.

**शेजार** (पु. ना.) गृहादि कोणेक स्थळीं राहणारा जो कोणी, त्यास तत्समीपदेशीं राहणारा जो कोणी

दुसरा, त्याचा असतो जो सामान्य संबंध तो.

**शेजारी** (पु. ना.) ज्या एकमेकाचा शेजार ज्या एकमेकास आहे ते परस्परें.

**शेजारीं** (अव्य०) समीप देशीं.

**शेट्या** (पु. ना.) पेठ, बंदर, इ० जी उदमाचीं स्थानें तेथें मापें, वजनें, दरदाम, इ०कांची चौकशी, इ० कामावर अधिकारी वतनदार असतो तो.

**शेंडा** (पु. ना.) समाप्तिकडील जो अग्रभाग तो, परंतु वृक्ष, खांब, इ०काचे अग्रभागावर विशेषेंकरून प्रयोग.

**शेंडाबुडखा** (पु. ना.) कोणेक गोष्टीचे मुळापासून शेवटपर्यंत सर्व विभाग नव्हेत; मधला, शेवटचा, इ० रूप कितीएक जे विभाग ते. २ आरंभापासून समाप्तिपर्यंत जें कोणेक गोष्टीचें सर्व रूप तें.

**शेणमार** (स्त्री. ना.) अपराधिया इ० व्हावें म्हणून शेण, चिखल, इ०कांचा कोणी मार करितात जो मार तो.

**शेणामेणाचा** (वि०) ज्यांत मजबुदी विशेष नाहीं असा जो घर, व्यवहार, मनुष्य इ० त्यास प्रसंगविशेषीं म्हणतात.

**शेत** (स. क्षेत्र) (न. ना.) ज्या स्थळीं धान्य, कापूस, ताग, ऊस, इ० पीक होतें तो भूमिभाग आणि त्या भूमीवर रुजून उभें असतें जें पीक तें. २ जें ज्याचें उपजीविकासाधन तें त्याचें.

**शेतवाडी** (स्त्री. ना.) शेत बाग इ०.

**शेतीभाती** (स्त्री. ना.) शेतकी इ०. २ (पु. ना.) शेत भात करून उपजीविका करितो तो.

**शेंदणें** (धा. ना.) विहीर इ० अधोदेशीं विद्यमान जो उदक इ० पदार्थ तो दोरीच्या योगानें उपरिदेशीं हातानीं ओढून घेणें. २ (न. ना.) विहिरीतून पाणी शेंदून काढायाचें साधन जें दोरीनें विशिष्ट पोहरा इ० पात्र असतें तें.

**शेफरणें** (धा. ना.) कोणेकानें दुसऱ्यापासून वाखाणणी, लाडिकपणा, बक्षीस, इ० कांहीं मिळालें असें कांहीं झाल्यामुळें चित्तस्थानेंच चढून मनस्वीपणें वर्तूं लागणें.

**शेरडावणें** (धा. ना.) शेफरणें.

**शेरडूं** (न. ना.) शेळी बोकड यांचें सामान्य नांव आहे.

**शेरणी** (फा० स्त्री. ना.) कोणेक कामनेविषयीं कोणेक देवतेस नवस करून तो काम पूर्ण झाला म्हणजे तो नवस फेडायासाठीं देवालय इ०काच्या ठायीं लोकांस वाटितात जो साखर, गूळ, मिठाई, इ० भक्ष्य पदार्थ तो. २ नदीचे कांठीं एक झाड असतें तो.

**शेरताटी** (स्त्री. ना.) शेराच्या झाडांची क्रमानें लागत गेली जी ओळ ती.

**शेरा** (अर० पु. ना.) कोणेक व्यवहारसंबंधी जो लेख किं० भाषण, त्याला उद्देशून हें वाईट आहे, हें बरें आहे, हें मान्य आहे किं० नाहीं, इ० रूप जें लेख किं० भाषण, धनी इ० करितो तो. २ भाग, रीत.

**शेरी** (स्त्री. ना.) शहर इ०कांतील जो बोळ तो. २ गांव इ० संबंधी जी उत्तम शेतजमीन, जी सरकार इ० अधिकारी आपले खासगीकडे ठेवितात ती.

**शेलका** ( वि० ) एकजातीय अर्थांचे समुदायामुळें विवक्षित गुणानें उत्तम जो अर्थ तो प्रत्येकीं.

**शेवट** ( पु. ना.) कोणेक गोष्टीची जी समाप्तिदशा तो. २ (न. ना.) कोणेक पदार्थाचा जो चरमावयव तें.

**शेवटणें** (धा. ना.) कुऱ्हाड, कोयता, कुदळ, खिळा, इ०कांस ठोकून बारीक धार, अणकुची, इ०कांनी विशिष्ट करणें.

**शेवडी** (स्त्री. ना.) (ग्रं०) चर्म.

**शेवाळ** (सं. शैवाल) (न. स्त्री. ना.) नदी इ०कांचे पाण्यामध्यें जो हिरवे रंगाचा बुळबुळीत तंतुसमुदाय उत्पन्न होतो तें. ती. २ पाण्यास जें गांडाळ नीळ इ० असतें त्यासही ह्मणतात. ३ पाषाण, भूमि, इ०कांवर उदकसंयोगानें हिरवा बुळबुळीत पदार्थ उत्पन्न होतो तो.

**शेष** (सं. पु. ना.) एक पुराणप्रसिद्ध सर्प आहे. २ ( पु. ना.) कांहींएक पदार्थ, व्यवहार, इ०कांचा जो अवशिष्टांश तो. तें.

**शैत्य** (सं. न. ना.) शीतपणा. २शीतपदार्थसंबंधानें जी शरीरांत विकृति होत्ये तें.

**शैथिल्य** (सं. न. ना.) शिथिलपणा.

**शैल** (सं. पु. ना.) पर्वत.

**शैली** (स्त्री. ना.) बोलणें, चालणें, करणें, इ० व्यवहारांच्या कर्तृभेदेंकरून ज्या भिन्न भिन्न रीति असतात त्या प्रत्येकीं.

**शैल्य** (न. ना.) शल्य.

**शोक** (सं. पु. ना.) मरण, चोरादिकृत अपहार, इ० निमित्तानें आपणास अंतरलें जें स्त्री, पुत्र, धन इ० प्रिय वस्तु तद्विषयीं हें सर्वथा आतां आपणास प्राप्त व्हावयाचें नाहीं असा निश्चय होऊन जी अंतःकरणांत खेदात्मक वृत्ति होत्ये तो. २ कोणेक अर्थाची दुर्दशा, दैन्य, इ० पाहून हाय हाय, याची गति काय, अशी जी अंतःकरणांत खेदात्मक वृत्ति होत्ये तो. [होणें, करणें.

**शोकणें** (धा. ना.) ( ग्रं० ) शोषण

**शोणित** (सं. न. ना.) रुधिर.

**शोध** (सं. पु. ना.) कोणेक अर्थ कोठें आहे, कसा आहे, इ०रूप ज्ञान होण्याकरितां त्याची संभावना असलेल्या स्थळांचें किं० त्या अर्थाचें त्या त्या नेत्रादि इंद्रियानें जें पर्यालोचन तो, आणि तेणेंकरून तो अर्थ अमुक ठिकाणीं आहे कीं नाहीं, किं० अमुक प्रकारचा आहे इ०रूप होणें जें ज्ञान तो. २ लिहिण्यांत चुकलेलीं अक्षरें तीं ज्या स्थळींची चुकलीं त्या स्थळीं काकपद इ० खूण करून अन्यत्र लिहितात तो.

**शोभणें** (धा. ना.) कोणेक अर्थ शोभायुक्त दिसणें. २ कोणेक गोष्ट कोणेकास लोकदृष्टीनें योग्य अशी दिसणें.

शोभा (सं. स्त्री. ना.) सौंदर्य, अलंकारधारण, इ०कांच्या योगानें मनुष्य, शरीर, स्थळ, इ०कांचे अंगीं येतो जो दर्शनीयतारूप धर्मविशेष तो. २ शरीर, गृह, इ०कांस ज्याचे योगानें शोभा येते असे जे अलंकार, लेंकरें, बाग, इ० त्यास म्हणतात. ३ पदार्थनिष्ठ स्थूलत्व, लघुत्व,शुक्लत्व, कृष्णत्व, इ० धर्म तन्मूलक तो पदार्थ दिसण्यात येतेसमयीं त्या पदार्थाचे रूपाचा जो भेदक धर्म भासतो तो. कोणिकाची शोभा करणें म्ह० शोभा शब्दाचा विपरीत लक्षणेनें फजीती असा अर्थ.

शोभायमान (वि०) शोभतो जो तो.

शोभिवंत (वि०) शोभायुक्त.

शोष (सं. पु. ना.) संतप्त झालेलें स्थलादि किं० भस्माचा गोळा इ० जो अति शुष्क पदार्थ त्याचे अंगीं, सद्रव पदार्थांचा संयोग होतात तो पदार्थ आकर्षून घ्यावा असा जो शक्तिविशेष असतो तो. २ तृषाविकाराचा जो अतिशय तो. ३ शोषणानें उदकादि द्रवांशावर शोषलेगेलेपणा म्हणून जो संस्कार होतो तो.

शोषण (सं. न. ना.) शोषण्याचा जो व्यापार तें.

शोषणें (प्रा. ना.) तप्तस्थलादिकानें स्वनिष्ठ जी शोषणशक्ति तीणेंकरून स्वसंबद्ध जलादि सद्रव पदार्थ आकर्षून घेणें. २ तृषाक्रांत जो त्याणें जलादि पदार्थ घोटणें. ३ आतील द्रवांशाचें शोषण झाल्यामुळें पृथ्वी, शरीर इ०कांनीं शुष्क होणें. ४ कोणेक अधिकरणांतील द्रव्यादि पदार्थ कोणेकानें आकर्षणें.

शौक (अर० पु. ना.) इष्क, इश्क.

शौच (सं. न. ना.) शरीर, वस्त्र, गृह, अंतःकरणसंबंधी जे ते ते मल किं० विटाळ, काम, क्रोध, पाप, इ० दोष त्यांचा प्रक्षालन, संमार्जन, ईश्वरस्मरण, प्रायश्चित्त, इ० यथायोग्य उपायांनीं निरास होऊन त्यांची होते जी शुद्धि तें. २ (न. पु. ना.) मलसर्गास म्हणतात.

शौर्य (सं. न. ना.) शूरपणा.

श्मशान (सं. न. ना.) मसण.

श्मशानवैराग्य (सं. न. ना.) मढें श्मशानांत घेऊन गेलेले जे मनुष्य त्यांस त्या मेलेल्याची अवस्था पाहून आपण मरून अशीच अवस्था होणार तस्मात् या प्रपंचांत कांहीं नाहीं असें मनांत येऊन पुनः माघारे फिरत तोंपर्यंत वैराग्य होतें तें; तद्वत् कांहीं कारणामुळें कोणेक गोष्टीविषयीं जें क्षणमात्र वैराग्य होतें त्यास म्हणतात.

श्मश्रु (सं.न.ना.) दाढी, मिशी, एकूण तोंडावरचे जे केंस तें. २ (स्त्री.ना.) हजामत.

श्याम (सं. वि०) सजल मेघासारिखा जो वर्ण तो आणि तद्विशिष्ट शरीरादि तो.

श्यामकर्ण (सं. पु. ना.) अश्वमेधाचे उपयोगीं श्यामवर्णकर्णांचा शास्त्रोक्तलक्षणान्वित घोडा असतो तो.

श्रद्धा (सं. स्त्री. ना.) गुरु, शास्त्र,

किं० इतर वैद्यादिक कोणी, कोणेक गोष्टीविषयीं जें जसें सांगतात त्यांत अर्थवाद, अतिशयोक्ति, प्रतारणा, इ० कांहीं नाहीं, तें सांगतात तसेंच, तेंच खरें, हें सांगतात असें वर्तल्यानें फळ होईलच, असा जो त्या गुरु इ०कांवर किं० त्यांचे वचनावर भाव असतो तो. २ अपानद्वारा जो वायूचा उत्सर्ग होतो त्यास म्हणतात.

श्रम (सं. पु. ना.) आयास. २ इष्ट-वियोग इ० कांहीं अनिष्ट झाल्यामुळें अंतःकरणास होतें जें दुःख तो.

श्रवण (सं. न. ना.) शब्दरूप विषयाचें इंद्रियानें जें ग्रहण तें. २ (न. पु. ना.) ज्या इंद्रियानें शब्दाचें प्रत्यक्ष होतें तें इंद्रिय.

श्राप (पु. ना.) शाप.

श्री (सं. स्त्री. ना.) लक्ष्मी. २ देवता, तीर्थ, गुरु, पुण्यक्षेत्र, इ०कांचे नामाचा लेखादिकांच्याठायीं निर्देश करायाचा असतां एतच्छब्दपूर्वक करितात. ३ हत्तीचे मस्तकावर शोभार्थ घालायाचें वस्त्र केलें असतें तें.

श्रीफल, ळ (सं. न. ना.) प्रसादरूपेंकरून कोणेकास देणें, इ० प्रसंगीं नारळास म्हणतात.

श्रीमंत (पु. ना.) पालखी, हत्ती, अशानीं युक्त जी मोठी संपत्ति ती आहे ज्यास असा जो राजा, किं० प्रधान, सेनापति, इ० तो. २ साधारण संपत्तिमान् जे सावकार इ० त्यासही म्हणतात.

श्रीमान् (सं. वि०) लक्ष्मीवान्, श्री शब्दासारखा गौरवानें देवतादिकांचे नावामागें याचा प्रयोग करितात, उ० श्रीमन्नारायण, श्रीमच्छंकराचार्य, श्रीमद्भागवत, इ०.

श्रीमुख (सं. न. ना.) तोंडांत मारणें असें ह्मणायाचें असतां किं० गौरवानें बोलायाचें असतां मुखासच ह्मणतात.

श्रीया (स्त्री. ना.) (ग्रं०) कमळ.

श्रीयेसारखिया (स्त्री. ना.) (ग्रं०) अष्टमहासिद्धि.

श्रुति (सं. स्त्री. ना.) कर्णरूप जें इंद्रिय तो. २ वेद आणि तद्गत जीं प्रमाणभूत वचनें तीं प्रत्येकीं.

श्रेणी (सं. स्त्री. ना.) पंक्ति.

श्रेय (सं. न. ना.) आरोग्य, धनलाभ, आयुर्वृद्धि, वंशवृद्धि, इ०रूप जें कांहींएक बरें तें. २ कांहींएक सत्कर्मापासून अपूर्वरूपेंकरून उत्पन्न होतें जें पुण्यरूप फल तें. ३ अकर्मापासून होतें जें पापरूप फल त्याजवर विपरीत लक्षणेनें; तसेंच व्यावहारिक जें जाणें, येणें, इ० कांहीं कर्म तज्जन्य जें संतोषश्रमादि फल त्याजवरही व्यवहार होतो.

श्रेयस्कर (सं. वि०) कल्याणकारक.

श्रेष्ठ (सं. वि०) कोणेकापेक्षां विवक्षित गुणानें जो उत्तम तो. [पताका.

श्रोणवी (स्त्री. ना.) (ग्रं०) निशाण,

श्रोता (सं. पु. ना.) पुराणीक, हरिदास, इ० जो वक्ता त्याचे मुखापासून पुराणाचा अर्थ, हरिगुणकीर्तन, इ०कांतें आईकणारा तो. [तें.

श्रोत्र (सं. न. ना.) श्रवणरूप इंद्रिय

श्रोत्रिय (सं. पु. ना.) वेदवेत्ता जो ब्राह्मण तो. २ (ग्रं०) ब्रह्मसाक्षात्कारवान् तो.

श्रोत्री (पु. ना.) (ग्रं०) श्रोत्रिय.

श्रौतसमो (पु. ना.) (ग्रं०) श्रुतिसमूह.

श्लाघा (सं. स्त्री. ना.) कोणेकाचि ब- [ढाईची प्रशंसा.

श्लाघेजता (स्त्री. ना.)(ग्रं०) श्लाघ्यता.

श्लाघ्य (वि० सं.) उत्तमत्वेंकरून वर्णायास योग्य तो.

श्लेष (सं. पु. ना.) अर्थाची बोधक जो पद, वाक्य, किं० समुदाय, एतद्रूप एक व्यक्ति तिच्या ठायीं अनेक अर्थांनीं एकमेकास धरून असावें असा त्यांचा झाला असतो जो संगम, लेंगेंकरून त्या पदादिकांचा वाचकत्वादिरूपेंकरून त्या अनेक अर्थांवर अन्वय होत असतो तो. २ तादृश अनेकार्थक पदवाक्यादिकांच्या प्रयोगेंकरून भाषण, काव्य, इ०कांस होतो जो अलंकार तो.

श्लोक (सं. पु. ना.) अनुष्टुबादिछंदांनीं बद्ध जी अनेक शब्दांची रचना तो.

श्वपच (सं. पु. ना.) चांडाल.

श्वपाक (सं. पु. ना.) चांडाल.

श्वशुर (सं. पु. ना.) नवऱ्याचा किं० बायकोचा जो बाप तो.

श्वसन (सं. पु. ना.) वायु. २ (न.) शरीरांतून बाहेर जावें, आंत यावें असा जो प्राणवायूचा निरंतर व्यापार होत असतो तें.

श्वा (सं. पु. ना.) कुत्रा.

श्वान (सं. पु. ना.) कुत्रा.

श्वापद (सं. न. ना.) प्रायः व्याघ्रादिक जे आरण्यक पशु ते प्रत्येकीं.

श्वास (सं. पु. ना.) नाकानें किं० तोंडानें आंत बाहेर येत जात असतो जो प्राणवायु तो. २ कफादि रोगानें किं० अति आयास झाल्यामुळें प्रमाणापेक्षां अधिक गति ज्याची असा क्षोभ पावतो तोच प्राणवायु तो.

श्वासोच्छ्वास (सं. पु. ना.) आंत यावें, बाहेर जावें अशी जी प्राणवायूची गति चालली असते तो.

श्वासोश्वास (पु. ना.) श्वासोच्छ्वास.

श्वित्र (सं. पु. ना.) कुष्ट, कोड. [सेतु.

श्वेत (सं. वि०) पांढरा. २ (पु. ना.)

---

## —ष—

ष— हा वर्ण एकतिसावें व्यंजन आहे.

षट् (सं. वि०) सहा.

षट्क (सं. न. ना.) सहांचा समुदाय तो.

षट्कर्णी (अव्य०) कोणेक गोष्ट बोलणारा, आणि ज्यापाशीं सांगत असतो तो ऐकणारा या दोघांहून अविवक्षित जो तिसरा त्याचे कानीं ती गोष्ट जाणें, होणें, करणें, इ०कांचें वि०.

षट्कर्मे (न. ना.) यजन, याजन, अध्ययन, अध्यापन, दान, प्रतिग्रह, हीं ब्राह्मणास मात्र विहित जीं सहा कर्मे तीं.

षट्दर्शनें (न. ना.) (ग्रं०) सौर, शाक्त, गाणपत्य, वैष्णव, शैव, स्कांद अशीं जीं सहा दर्शनें तीं.

षट्पद (सं. पु. ना.) भ्रमर. २ (वि०)

सहा आहेत पाय ज्यास असा जो शलभ, ऊ, इ० क्षुद्रप्राणी तो.

**षंड** (पु. ना.) शंड.

**षडूर्मी** (स्त्री. ना.)(ग्रं०) शोक, मोह, क्षुधा, तृषा, जन्म, मरण.

**षड्गुणैश्वर्यसंपन्न** (सं. पु. ना.) ज्ञान, वैराग्य, ऐश्वर्य, यश, कीर्ति, औदार्य, या सहा गुणांनीं संपन्न जो ईश्वर तो.

**षड्रस** (सं. पु. ना.) मधुर, आंबट, खारट, तिखट, तुरट, कडू असे जे सहा रस ते. २ (वि०) भोज्य जें पक्वान्नादि पदार्थ त्यास स्तुतिप्रसंगीं हें विशेषण देतात.

**षड्रिपु** (सं. पु. ना.) काम, क्रोध, लोभ, मोह, मद आणि मत्सर, हे जे जीवाचें अहित करणारे अंतःकरणाचे सहा विकार ते.

**षंढ** (सं. पु. ना.) शंड.

---

## —स—

**स**—हा वर्ण बत्तिसावें व्यंजन आहे. (अव्य०) हा ज्याचे मागें लागतो तेणेंकरून सहित इतर कोणी असा विशिष्टाचा विशेषणरूप अर्थ होतो. उ० पुत्रानें जो सहित तो सपुत्र, सकुटुंब, सकंप, सकाम, इ०.

**सई** (स्त्री. ना.) आठवण. २ (अव्य०) (स्त्री. ना.) वाणिज्य, पंचाईत, इ० व्यवहारीं हा व्यवहार मला मानला अशा अर्थाचा ज्ञापक जो सई असा शब्द उच्चारितात किं० त्या त्या व्यवहारसंबंधीं पत्रावर लिहितात तो. कोणेक माल सई करणें किं० म्हणणें म्ह० हा माल मला अमुक प्रकारें पसंत केला असें त्या मालधन्यास वचन देऊन तो माल पतकरणें. किल्ला, राज्य, इ० सई करणें म्ह० जिंकून हस्तगत करणें. बंदर, गांव, इ० सई करणें म्ह०. गतिद्वारा आक्रांत करणें. ३ (ग्रं०) सखी. इ०.

**सईसुमार** (पु. ना.) करावें कोणतें, न करावें कोणतें, आपणास पचेल किती, आपण खावें किती, इ० राखायाचा जो सुमार तो.

**सकट** (अव्य०) सहवर्तमान स्थित जे अनेक पदार्थ त्यांतून चांगला, वाईट, अधिक, उणा, इ० निवड करून कितीएक घ्यावे, कितीएक वगळावे असा जो व्यवस्थाप्रकार तो न धरितो. २ सहवर्तमान स्थित जो कोणेक अर्थ त्यातें वर्जितो.

**संकट** (सं. न. ना.) आपल्याची स्वातंत्र्यामुळें मोकळेपणें जी वृत्ति चालली असते तिचा संकोच होऊन कसें करूं, काय करूं, अशी ज्याचे योगानें विवंचना प्राप्त होणें असें जें काहींएक प्रतिकूळ उपस्थित उत्पन्न होतें तें.

**संकर** (सं. पु. ना.) भिन्न भिन्न जातींचे जे अनेक पदार्थ त्यांचा जो परस्पर मिश्रभाव तो. २ तेणेंकरून ते अवघे मिळून निराळेंच होतें जें जात्यंतर तो.

**सकराई** (स्त्री. वि०) हुंडी सकारण्याबद्दल जें देय पडतें ती.

**सकल** (सं. वि०) परिपूर्णरूपेंकरू-

न स्थित जो कोणेक व्यक्तिरूप अर्थ तो. २ सर्व.

**संकलित, ळीत** (सं. वि०) ज्याचें एकत्र मेलन केलें तो. २ विस्ताराचा संकोच करून थोडक्यांत आणिला जो ग्रंथ, भाषण, इ० तो.

**संकल्प** (सं. पु. ना.) अमुक करावें, अमुक स्थळीं जावें, इ० रूप ज्या अंतःकरणांत वृत्ति उठतात त्या प्रत्येकीं. २ कांहींएक गोष्ट करण्याविषयीं अ० म करण्याविषयीं अंतःकरणांत धरिला असतो जो निश्चय तो. ३ कांहीं व्रत, दान, इ० कर्म कर्तव्य असतां प्रारंभीं देशकालादि उच्चारपूर्वक अमुक कारणास्तव अमुक कर्म करितों असा जो वाक्यप्रयोग तो.

**सकळीक** (वि०) (ग्रं०) सकल.

**संकळीत** (वि०) संकलित प्रायः द्वितीयार्थीं.

**सकाम** (सं. वि०) धन, पुत्र, स्वर्ग, इ० फलविषयक ज्याचे मनांत इच्छा आहे तो. २ तशी फलेच्छा धरून करितात जें यज्ञयागादि कर्म तो. ३ कामविकारानें व्याप्त जो तो.

**सकार** (स्वीकार) (पु. ना.) ही हुंडी मला मान्य आहे अशा अर्थाचा बोधक जो हुंडीपत्रावर हुंडी सही असा लेख करितात तो.

**सकाळ** (स्त्री. ना.) सूर्योदय झाल्यावर सूर्योदयाजवळचा किं० मध्यान्हावधि जो काळ तो. २ (अव्य०) सकाळीं.

**सकाळसंध्याकाळ** (अव्य०) मध्यान्हाहून पूर्वापर जे दोन विभाग त्यांच्याठायीं.

**सकाळां, सकाळीं** (अव्य०) उदयीक. २ सकाळ म्हणून जो काळ त्या काळीं.

**संकीर्ण** (सं. वि०) ज्याचा संकर झाला आहे तो. २ मनुष्य, वृक्षादि अनेक पदार्थांनीं व्यापून गेला जो स्थलादि तो.

**संकुचित** (सं. वि०) संकोच पावला जो तो.

**सकुमार** (वि०) सुकुमार.

**सकुली** (स्त्री. ना.) (ग्रं०) करंजी म्हणून जें पक्वान्न तो.

**सकृत्** (सं. अव्य०) एकवार.

**सकृद्दर्शनीं** (अव्य०) नुकतें दर्शन मात्र होतें आहे तों इतक्यांत, रागें भरणें, मारणें, इ०कांचें वि०. २ कोणेक गोष्टीच्या मूळारंभींच.

**संकेत** (सं. पु. ना.) याला हें अमुकच निमित्त, याचें अमुकच नांव, अमुकाचा अमुकच अर्थ, इ० प्रकारें विशेषरूपेंकरून ईश्वरानें, किं० कोणी आधुनिकांनीं केली जी योजना तिणेंकरून एक झाला असतो जो नियम तो. २ हस्त, नेत्र, इ०कांनीं कोणेकास कोणेक अर्थाविषयीं करितात जी खूण तो.

**संकोच** (सं. पु. ना.) कोणेक अर्थाची आकुंचितपणें जी स्थिति तो. २ प्रवृत्तिविषयीं प्रफुल्लितपणें स्थित जें अंतःकरण त्याचा लज्जा, भीड इ०कें-करून होतो जो आकुंचितपणा तो.

**सक्त** (सं. वि०) कोणेक कर्मादिकाच्याठायीं लागल्यामुळें त्यांत गुंतून

राहिला जो तो. २ सखत.
संक्रमण (सं. न. ना.) सूर्यादि ग्रहांचें जें एका राशीवरून दुसऱ्या राशीवर गमन तें, परंतु लोकांत सूर्याविषयीं प्रसिद्धि. २ देशादिकांचें जें आक्रमण तें. [तो. तत्सख.
सख (सं. पु. ना.) जो ज्याचा सखा
सखल (वि०) उंची ह्मणून जें प्रमाण तें न्यून आहे ज्याचें असा जो गृह, शरीर, इ० पदार्थ तो.
सखलात, द (स्त्री. ना.) तुर्की भाषेनें एक उंचें ऊर्णावस्त्र आहे.
सखा (सं. पु. ना.) ज्या परस्परांचा स्नेह आहे ते एकमेकांचे. २ (वि०) सख्खा.
सखासोइरा, सोयरा (पु. ना.) मित्रत्व, योनिसंबंध, इ० योगानें जो संबंधी तो.
सखी (सं. स्त्री. ना.) मैत्रिण.
सखोल (वि०) दूरवर विचार ज्यामध्यें आहे, एकाएकीं उतावळा व्हावयाचा नाहीं, असा गंभीर जो मनुष्य किं० त्याची बुद्धि किं० गूढ अभिप्रायाची कल्पना, भाषण, इ० तो. २ (ग्रं०) कोमल.
सख्खा (वि०)(सं. सखा किं० स्वकीय) बहीण, भाऊ, चुलता, मामा, सासरा, सासू, इ० जे आपले संबंधी तत्समान स्थानिक जे त्यांजवरही ही बहीण इ० व्यवहार होतो त्याची व्यावृत्ति व्हावी ह्मणून बहीण इ०कांस हें विशेषण लागवें.
सखत (अर० वि०) पराकाष्ठेचा तगादा, रदबदली, मेहनत, इ० कितीएकांचें वि०.
सख्य (सं. न. ना.) मैत्री.
संख्या (सं. स्त्री. ना.) एक प्रमाण आहे, ज्याचे योगानें अर्थव्यक्तींची इयत्ता समजली जात्ये. २ एकत्व इ० तिचे जे अवांतर भेद ते प्रत्येकीं.
संग (सं. पु. ना.) चालणें बसणें इ० कांच्याठायीं सहवर्तमान असावें असा जो कोणेकास कोणेकाचा संबंध असतो तो. २ मैथुनसंबंध.
सगट (अव्य०) सकट.
संगत (वि०) संगति द्वितीयार्थानें विशिष्ट जो ग्रंथ, भाषणादि कोणेक अर्थ तो. २ (स्त्री. ना.) संगति. ३ एकाकित्वाचा परिहार ज्याचे योगानें होतो असें जें कोणेकास दुसऱ्या कोणेकाशीं सहितत्व तो आणि ज्याशीं सहितत्व असतें असा जो कोणी दुसरा तो.
संगतवार (वि०) संगत प्रथमार्थी.
संगतसोबत (स्त्री. ना.) कोणत्यातरी प्रकाराची बरी, वाईट, लहान, मोठी सोबत तो.
संगति (सं. स्त्री. ना.) संग. २ पद, वाक्य, पदार्थ, वाक्यार्थ, इ० कोणेक अर्थानें अन्वित होण्याविषयीं आकांक्षित असतें जें अर्थांतर तें ज्या रूपानें आकांक्षित असतें त्याच रूपानें मिळालें असतां त्यांचा परस्पर यथायोग्य संबंध जो होतो तो. ३ संगत तृतीयार्थी.
संगतीं (अव्य०) एकाकीपणा न

व्हावयास कारणीभूत जें कोणेकाचें सहितत्व त्यास आश्रयून, ये, बोल, इ०कांचें वि०. २ एककालीं जा, ये, इ०कांचें वि०.

संगनमत (न. ना.) दुसऱ्यास कपटानें वंचून कांहिंएक कार्य साधायाकरितां तूं असें बोल,मी असें बोलेन, तूं असें कर, मी असें करीन, इ०रूप अनेकांचा परस्पर केला असतो जो संकेत तें.

संगम (सं. पु. ना.) अनेक दिशांकडून येणारे जे नद्या, वाटा, इ० अनेक त्यांचा एकत्र होतो जो संयोग तो आणि एकेच दिशेंकडून येणारे जे त्यांच्या गतीच्या शीघ्रत्वमंदत्वामुळें क्वचित् जो संयोग होतो तोहि.

संगमरवर (फा० पु. ना.) पांढऱ्या दगडांत एक जाति आहे.

संगर (सं. पु. ना.) युद्ध.

संगीत (सं. न. ना.) वीणा, मृदंगादि वाद्यें, सूर देणारे, इ०कांचे योगानें सांग जें गायन तें. २ गाणें जमायास साधनभूत जे मृदंगादि वाद्यें, सूर देणारे,इ०सर्व मिळून तें.

संगीन (फा० वि०) दगडानीं केलेली जी पक्की किल्ला, कोट, देवालय, इ० इमारत ती. २ ज्याचे जवे दृढ बसविले आहेत असें पक्कें केलेलें काष्ठ, धातु, चुना, इ०कांचें गाडा, हौद इ० काम त्यास म्हणतात. ३ यथास्थित, बळकट, जो कांहीं व्यवहार तो. ४ (न. ना.) वाद, पंचाईत, इ० विषयींचा जसा असावा तसा जो पक्का कागदपत्र, भाषण, इ० तो. ५ (स्त्री. ना.) कटारीचे डौलाचें एक शस्त्र आहे, जें बंदुकीचे अग्रभागीं लावीत असतात ती.

सगुण (सं. वि०) निर्गुणाचा प्रतिपक्षी तो. उ० सगुणोपासना, सगुणमूर्ति.

संगोपन (सं. न. ना.) यथायोग्य जोपेनें उत्तम रीतीकरून जें कोणेकाचें संरक्षण तें.

संग्रह (सं. पु. ना.) कोणेक अर्थ तेथचे तेथेंच राही अशा प्रकारें कोणेक अधिकरणीं घेतल्यानें तेथें त्या अर्थाची होय जी जमा ती.

संग्रहणी (सं. स्त्री. ना.) एक दोन दिवस पोटांत मळाचा संग्रह व्हावा आणि एक दोन दिवस ढाळ व्हावे असें नेहमीं जेणेंकरून होतें असा एक रोग आहे.

संग्राम (सं. पु. ना.) संगर.

संघ (सं. पु. ना.) समुदाय.

संघट (वि०) (ग्रं०) फार, पुष्कळ.

संघटन, संघट्टण (न. ना.) परस्परें भाषण, थट्टा, मस्करी, हास्य, विनोद, इ० करावें, एकमेकांचे घरीं जावें, निरंतर एके ठिकाणीं बसावें उठावें इ०रूप जें कोणेकाचें कोणेकाशीं वर्तन तें.

संघट्टन (सं. न. ना.) एकमेकांचे अंगानें एकमेकांचें अंग रगडलें जाईं असा जो एकमेकांस घट्ट लागण्याचा व्यापार तें. २ संघटण.

सघन (वि०) दाट आणि पातळ अ-

शा ज्या दोन कोटी त्यांमध्यें दार या कोटींत गणायाचा तो.

संघट्टण (न. ना.) संघट्टन.

संघाट (पु. ना.) (ग्रं०) संघात.

संघात (सं. पु. ना.) समुदाय.

संच (सं. संचय) (पु. ना.) कोणेक कार्यसिद्धीस जी जितकी जशी उपकरणसामग्री लागत्ये ती सर्व मिळून जो जोड तो. २ सचकार.

सचकार (पु. ना.) विस्तार.

संचणें (धा. ना.) (ग्रं०) असणें.

संचय (सं. पु. ना.) कोणेक ठिकाणीं कोणेक अर्थाचा सांचून होतो जो जमाव तो.

संचरणें (धा. ना.) पिशाच, अग्नि, विष, इ०कानें शरीर, अरण्य, इ० अधिकरणी सचारद्वितीयार्थानें विशिष्ट होणें.

सचवटी (स्त्री. ना.) सचोटी.

संचळ (न. ना.) पादेलोण. २ (वि०) (ग्रं०) तुच्छ.

संचार (सं. पु. ना.) कोणेक अधिकरणीं इकडून तिकडे फिरण्याचा जो व्यापार तो. २ कोणेक अधिकरणी शिरून त्या अधिकरणाचे, सर्वांशी व्याप्ति होई अशी जी त्याच्याठायीं कोणेक अर्थाची गति ती. ३ म्हणणें, बोलणें, किं० कांहीं एक काम करणें. याचें ज्या क्रमास धरून अनुसंधान धरलें असतें तें सधान सुटून अन्य क्रमाकडे जें संधान जातें तो. ४ जेथें ती भ्रांति होऊन संचार जातो असें जें स्थळ त्या स्थळासही म्हणतात.

संचारणें (धा. ना.) संचरणें. २ कोणेक अधिकरणीं कोणेकातें संचित करणें.

संचित (सं. वि०) सांचलेला जो उदक, धान्य, इ० पदार्थ तो. २ (न. ना.) जीवाचे पदरीं जो पापपुण्यात्मक कर्मांचा राशि असतो त्यांतून प्रकृत देहारंभानेंकरून प्रारब्धता पावला जो विभाग त्याहून इतर जो शेष सांठ्यास राहिलेला कर्मविभाग असतो तो.

सचिंत (वि०) कोणेकविषयीं चिंता ज्याला प्राप्त झाली आहे तो.

सचेतन (सं. वि०) चेतना ज्याचे अंगीं आहे असा जो मनुष्यपश्वादि तो.

सचैल (अव्य०) अंगावरील जें वस्त्रप्रावरण त्यासुद्धां.

सचोटी (स्त्री. ना.) भाषण, देणें, घेणें, इ० व्यवहारीं सप्रमाण वर्तणारा जो त्याचे अंगीं आली असत्ये जी प्रामाणिकतारूप योग्यता ती.

सच्चिदानंद (सं. पु. ना.) सत्य,ज्ञान, आणि आनंद एतत्स्वरूप जें ईश्वरस्वरूप तो.

सजण (पु. ना.)(ग्रं०) सज्जन; परंतु लावणी इ० कवितेंत मित्र, नायक, यांवर प्रयोग.

सजणें (धा. ना.) (सं. सज्ज) अनेक अंगें परस्पर असंबद्धपणें जिकडे तिकडे असता जें अंगीचें रूप असतें त्या रूपानें स्थित जो कोणेक अंगी त्याणें तीं अंगें एकत्र यथायोग्य संबद्ध झाल्यामुळें व्यवहार्यरूपेंकरून सिद्धावस्थेस येणें. २ केवळ मूळचे

रूपानें स्थित जो कोणी त्याणें युद्ध नृत्यादि व्यवहाराविषयीं योग्य जें शस्त्रालंकारादिविशिष्ट रूप त्या रूपानें सिद्ध होणें. ३ साजणें.

सज्या (पु. ना.) बंगला, वाडा, इ०-कांच्याठायीं वरचे मजल्यावर क्रीडार्थ बसायाचे उपयोगीं सर्वत्र दृष्टि पोहोंचायाजोगें लहानसें उंच जें बंदिस्तीचें स्थळ केलें असतें तें. २ मध्यें खंड न पडतां क्रमानें लागत गेलीं जीं शेतांचीं क्षेत्रें तीं सर्व मिळून जो भूविभाग तो. ३ (अर०स्त्री.ना.) शिक्षा.

संजाइती, ईत (वि०) खपला तर खपवूं, न खपला तर परत करूं, अशा बोलीनें घेतात जो वस्त्रादि जिन्नस तो.

सजीव (सं. वि०) सचेतन.

संजीवनी (सं. स्त्री. ना.) मृतास जिवंत करणारी अशी एक विद्या आहे ती आणि औषधि आहे ती.

संजोग (सं. संयोग)(पु. ना.)संच.

संजोगणें (धा.ना.)संयोगणें. २ (ग्रं०) रथादिकास घोडे जुंपणें. ३ सिद्ध करणें.

सज्ज (सं. वि०) कोणेक कार्याच्या ठायीं प्रवृत्त होण्याविषयीं शस्त्रभूषणादि विशिष्ट जें रूप असावें-सें असतें त्या रूपानें सिद्ध होऊन राहिला जो कोणेक अर्थ तो.

सज्जन (सं. पु. ना.) कोणाचा घातपात करूं नये, बरें होईल तितकें करीत असावें, कज्जा, भांडण, इ० करूं नये असे जे चांगले गुण तद्विशिष्ट जो मनुष्य, पशु, इ० कोणी जीव तो. [पार्थी.

सज्जा (पु. ना.) सज्या प्रथम द्वितीय.

सटकणें (धा. ना.) कोणेकानें हाहा म्हणतां निघून जाणें. [साठवणें

संटणें (धा. ना.) (ग्रं०) सोडणें,

सटवणें (धा. ना.) सटावणें. २ (ग्रं०) क्षय पावणें. ३ पतन पावणें. [तो

सटीक (सं. वि०) टीकेसहित जो ग्रंथ

सटींसामाशीं (अव्य०)सठींसामाशीं.

सट्टा (पु. ना.) जी हुंडी किं० जें नाणें देऊन दुसरें हुंडीनाणें घ्यावें अशी एकास गरज, आणि ती हुंडी तें नाणें देऊन दुसरें हुंडीनाणें घ्यावें अशी दुसऱ्यास गरज असतां, ते जे गरजवंत त्यांचा परस्पर तें तें देऊन घेऊन होतो जो व्यवहार तो.

सठींसामाशीं (अव्य०) वर्षासहामहिन्यांतून एकादे वेळेस भेटणें, कोठें जाणें, इ०कांचें वि०.

सड (पु. ना.) गाय, म्हैस, इ० पशूंचा जो आचळ तो. २ कठीण जो केंस, काडी इ०पदार्थ तो. ३ विवादविषय झालेला जो वृत्यादि कोणेक अर्थ त्याच्या निर्णयासाठीं प्रमाणलेंकरून पाहतात जें त्या अर्थाचें पूर्वकालिन वृत्त तें. ४ तांदूळ,डाळ, इ० कांस जो सडण्याचा संस्कार तो.

सडक (स्त्री. ना.) दोरी, परंतु गाडा इ०कांवरील ओझें कसणें, स्थलादिकांचें ऋजुत्व पाहणें, इ० विषयीं गृहीत असतां विशेषेंकरून प्रयोग. २ वरून गाडा, गाडी, इ० अश्व-

लित चालायाजोगी सारखी बांधली असल्ये जी वाट ती. ३ जिचें पान उजू असतें अशी तरवारींत एक जाति आहे ती. ४ ज्यास पोंक इ० कांहीं नाहीं असें नीट जें मनुष्यादिकांचें शरीर किं० तसा तो मनुष्यादि तो. ५ (ग्रं०) वस्त्राचा पदर किं० पदराचा शेवट. ६ नीट.

**सडकणें** (धा. ना.) पर्जन्य, मनुष्य, इ०कानें मोठे थेंब, गारा, खडे, इ० कांनीं कोणेकास ताडणें, किं० दोरी छडी, इ०कांनीं अनेक प्रहार होत असें कोणेकास ताडणें.

**सडका** (वि०) रोगादि विकृतीमुळें ज्याचे अवयव सडले असा जो फळ, पान, शरीर, इ० पदार्थ तो.

**सडकून** (अव्य०) रगडून.

**सडणें** (धा. ना.) तांदूळ, डाळ, इ० मुसळाचे आघातानीं निस्तुष करणें. २ फळ, पान, शरीरावयव, इ० कोणेक पदार्थानें कुजून कांहीं अवयव गळत अशा अवस्थेनें युक्त होणें.

**सडपातळ** (वि०) ज्याचें अंग विशेष मांसल नव्हे असा जो मनुष्यादि तो.

**सडा** (वि०) बायका पोरें, ओझें पाझें इ० गुंतून पडायाजोगें खटलें ज्याचे मागें नाहीं असा जो गृहस्थ, संसारी, मार्गस्थ, इ० तो. २ (पु.) बावडीस लावणें इ० उपयोगी बारीक लांबी दोरी तो. ३ शेणखळा, चंदनोदक, रंगोदक, इ०कैंकरून संस्कारार्थ भूमीवर करितात जो सेक तो

**सडासंमार्जन** (न. ना.) स्थलशुद्धयर्थ झाडणें, सडा घालणें, इ०रूप जो संस्कार तें. [हित. ३ शुद्ध.

**सडें** (वि०) (ग्रं०) सडा. २ संगर-

**सढळ** (वि०) उदार.

**सण** (पु. ना.) दसरा, दिवाळी, शिमगा, इ० जे वार्षिक दिवस ते आणि विवाहोत्तर आठवा, सोळावा, किं० मास, वर्ष, यांचे समाप्तीचा दिवस ते प्रत्येकीं. २ त्या दिवशीं पोळी, पक्वान्न, इ० मिष्टान्न करून इष्टमित्र, सोयरेधायरे, इ०कांसहवर्तमान भोजन करावें, वस्त्रालंकारादि धारण करावे, इ०रूप जो उत्सव करितात तो. [त्साहाचा दिवस तो.

**सणवार** (पु. ना.) सण इ० जो उ-

**सणाणें** (वि०) (ग्रं०) तीव्र.

**सत्** (सं. वि०) आहे अशा रूपेंकरून ज्याची प्रतीति आहे असा जो अर्थ तो. २ चांगला जो कोणेक अर्थ तो. ३ (पु.) संत.

**संत** (सं. पु. ना.) विषयासक्ति सोडून ईश्वरभजनीं लागला जो पुरुष तो, परंतु जे रुमाल बांधितात, गळ्यांत तुळशीच्या मण्यांच्या माळा घालितात, असा वेष करून ईश्वराचें भजन कीर्तन करून भिक्षावृत्तीनें उपजीविका करणारे जे त्यांजवर विशेषेंकरून प्रसिद्धि. २ (वि०) संथ.

**सतत** (अव्य०) संतत प्रथमार्थीं.

**संतत** (अव्य०) निरंतर. २ संतति. ३ (वि०) (ग्रं०) संपूर्ण.

**संततधार** (स्त्री. ना.) मध्यें खंड न

पडतां देवावर अभिषेकार्थ उदकादिकांची धरितात जी धारा ती. २ पर्जन्य किं० सच्छिद्रभांडें, इ० संबंधी कांहीं काल चालत्ये जी धारा तीस म्हणतात.

संतति (सं. स्त्री. ना.) पुत्रपौत्रादि किं० कन्यादौहित्रादि रूपेंकरून होतो जो जीवाचा विस्तार तो.

संतप्त (सं. वि०) अतिशयेंकरून जो तप्त तो.

संतर्पण (सं. न. ना.) अन्नदानादिकेंकरून ब्राह्मण, अग्नि, इ०कांस तृप्त करण्याचा जो व्यापार तें.

संतान (सं. न. ना.) संतति. २ (ग्रं०) वृक्ष.

संताप (सं. पु. ना.) अग्नि, सूर्य, काम, क्रोध, ज्वर, इ० संबंधी अतिशयित जो ताप तो. २ क्रोधावेश. ३ कांहींएक प्रतिकूल संबंधानें कोणेकास येतो जो उद्वेग तो.

सतार (फा० स्त्री. न. ना.) एक तंतुवाद्य आहे.

सतावणें (धा. ना.) छळणें, गांजणें, चेष्टा करणें इ० व्यापारानीं कोणेकास त्रासविशिष्ट करणें.

सतिक (न. ना.)(ग्रं०) सत्यत्व.

सती (सं. स्त्री. ना.) परम पतिव्रता जी स्त्री ती. २ पतिमरणोत्तर तदुद्देशानें परलोकप्राप्त्यर्थ अग्निप्रवेश करित्ये जी स्त्री ती.

सतीचेंवाण (न. ना.) ज्याचा एकवार अंगिकार केला असतां सर्वस्वाचा अपहार होवो, जीव जावो, परंतु सोडतां येत नाहीं असा जो कोणेक व्यवहारादि विषय त्यास ह्मणतात.

संतुष्ट (सं. वि०) संतोषानें युक्त जो तो.

संतोख, खू (पु. ना.)(ग्रं०) संतोष.

संतोष (सं. पु. ना.) कांहीं इष्टानुरूप झाल्यामुळें उद्वेगादि जाऊन बरें वाटतें अशी जी सुखरूप वृत्ति तो.

सत्कर्म (सं. न. ना.) ईश्वरास आवडतें असें जें दान, यज्ञ, परोपकार, इ० कर्म तें.

सत्कार (सं. पु. ना.) आदर.

सत्ता (सं. स्त्री. ना.) अस्तित्व. २ स्वामित्वसंबंध तो. सत्तेचा ह्म० ज्याची सत्ता ज्यावर आहे तो त्याचा.

सत्ताधारी (पु. ना.) सत्ताधिश.

सत्य (सं. वि०) वास्तविक. २ (न. ना.) प्रामाणिकता. ३ दिव्य जें प्रमाण तें.

सत्यदर्शी (सं. पु. ना.)(ग्रं०) ब्रह्मतत्वदर्शी.

सत्यनास (सं. पु. ना.) कोणेक अर्थाचा सर्वस्वीं होतो जो नाश तो.

सत्यप (सं. पु. ना.)(ग्रं०) ब्रह्मदेव.

सत्यपांड (न. ना.)(ग्रं०) ब्रह्मांड.

सत्यवादी (सं. वि०) कदापि असत्य बोलूं नये असा स्वभाव ज्याचा तो.

सत्यसंध (सं. वि०) कोणेक गोष्ट अशी करावी असें एकादा मनानें धरलें असतां त्या नियमास टळत नाहीं असा पुरुष तो.

सत्यानास (पु. ना.) सत्यनाश.

सत्पात्र (सं. न. ना.) दान देण्यास योग्य जें पात्र तें.

सत्पुत्र (सं. पु. ना.) मातापित्रें इ० जे वडील त्यांचे आज्ञेंत वर्तणारा आणि विद्यादिकेंकरून आपले कुळाची कीर्त्ति वाढविणारा असा जो पुत्र तो.

सत्पुरुष (सं. पु. ना.) कामक्रोधादि ज्याणें वश केले आहेत आणि सदाचरण करणारा, ज्याचे हातानें अनेक लोकांचीं हितें होत असावीं असा जो पुण्यात्मा पुरुष तो.

सत्र (सं. न. ना.) अनेक मिळून पात्रिणीनें एकानें यजमान व्हावें, इतरानीं ऋत्विज व्हावें, तसेंच एकानें वक्ता व्हावें, इतरानीं श्रोते व्हावें असा प्रकारें जें यज्ञरूप किं० भगवद्गुणकीर्तनरूप इ० कर्म चालविनात तें. २ यज्ञविशेषाची संज्ञा. ३ अन्नसत्र.

सत्राण (न. ना.)(ग्रं०)बल. २ (वि०) थोर. ३ (अव्य०) सर्वांगेंकरून.

सत्व (सं. न. ना.) मायेचे तीन गुणांतील एक गुण आहे, ज्याचे उत्कर्षानें शांति, क्षमा, दया, इ० गुणांची वृद्धि होत्ये तें. २ अस्तित्व. ३ पदार्थमात्राचे अंगीं तें तें कार्यकारणशक्तिरूप जो तत्वरूप गुण असतो तें, आणि त्या गुणाचा आश्रयभूत जो दहीं, गहूं, गुळवेल, इ०कांचे अंगीं नवनीतादि रूप सारांश असतो तें.

सत्वधीर (सं. वि०) एकाएकीं आपलें सत्व सोडीत नाहीं असा जो दाता, पतिव्रता इ० तो.

सत्वर (सं. अव्य०)लौकर. २ (वि०) ज्याचे अंगीं त्वरा आहे तो.

सत्वरी (अव्य०)(ग्रं०) लौकर.

सत्वशील (सं. वि०) पाप होईल हें सर्वदा मनांत धरून उच्छृंखलपणें न वागतां मर्यादेनें वागणारा आणि क्रोध, मत्सर, इ० दुर्गुण ज्याचे अंगीं नाहींत अशा स्वभावाचा जो तो. २ सत्वधीर.

सत्वस्थ (सं.वि०) सत्वशीलप्रथमार्थीं. २ सात्विक जें अन्न, धान्य, इ० तो.

सत्संग, सत्संग-ति, सत्समागम (सं. पु. स्त्री. ना.) साधुजनाचा संग.

संथ (वि०) अतिशयित वेग न धरिती हलक्या गतीनें वाहणारें जें उदक, वायु, इ० किं० जळणारा जाळ, तेल, दिवा, इ० किं० बाधणारा जो महामारी इ० रोग इ० जें गतिविशिष्ट कांहींएक तो. २ प्रकृतीनें शांत जो मनुष्य, किं० स्वभाव, इ० तो.

संथा (स्त्री. ना.) थोडा थोडा अंश घेऊन घोकावा अशा प्रकारें कोणेक ग्रंथविभागाचा करितात जो पाठ तो.

सद (सं. स्त्री. ना.) (ग्रं०) सभा.

सदट (वि०) बळकट. २ मोठा.

सदन (सं. न. ना.) गृह.

सदय (सं. वि०) कृपालु, दयालु.

सदर (अर० स्त्री. ना.) सरकारचे कचेरीची जी जागा ती. २ (न. ना.) व्यावहारिक लिहिण्यामध्यें ज्या प्रकरणाचे पोटचे अनेक भेद विशेषरूपेंकरून खालीं लिहावयाचे असतात त्या प्रकरणाचा सामान्यरूपेंकरून वर करितात जो उल्लेख तें.

३ सामान्यरूपेंकरून कोणेकास काहीं सांगणें, परवानगी देणें, इ०- कावें वि०.

सदरहू (अर० अव्य०) लेखामध्यें वर लिहिला जो कोणेक अर्थ त्याचें परामर्शक हें अव्यय व्यवहारीं लिहिण्यांत प्रयोग

संदर्भ (स. पु. ना.) कथा, गोष्ट, भाषण, इ० सबंधी वाक्यें, पदें, इ० अर्थ परस्परें अन्वित होऊन त्यांचा परस्पर संबंध लागत गेला असतो तो.

संदला (स. संधि) (पु. ना.) दर जा भरणें, भिंत, गच्ची, इ० साफ करणें, इ०कासाठीं आंत काच, नाग, इ० द्रव्यें घालून वाटून सिद्ध केला जो चुना तो २ त्या चुन्यानें भिंत, गच्ची, इ०कांस करितात जो लेप रूप संस्कार तो

सदसद्विचार, सदसद्विवेक (स पु ना.) कोणेक गोष्टीविषयीं सत कोणतें, असत् कोणतें, इ०रूप जो विचार तो.

सदा, सदां (स. अव्य०) निरंतर.

सदाचरण (स. न. ना.) उत्तम जें आचरण तें [आचार तो.

सदाचार (स पु. ना.) उत्तम जो

सदाफळ (वि०) (ग्रा०) सदासफळ.

सदावर्त (न. ना.) अन्यागतांस अन्न घालावें किं० शिधा द्यावा, असें जें कोणेकानें धर्मार्थ सत्र घातलें असतें तें.

सदासर्वदां (अव्य०) नेहमीं

संदिग्ध (स. वि०) संदेहविषय जो ग्रंथ, अक्षर, भाषण, इ० तो.

संदिसा (अव्य०) आतांसा.

संदु, संदू (पु. ना.)(ग्रा०) छद.

संदूक (अर० स्त्री. ना.) मोठी पेटी.

सदृढ (स. वि०) बळकट.

सदृश (स वि०) गुणादिकेंकरून जो ह्याशीं तुल्य तो त्याशी.

संदेश (स. पु ना.) आज्ञा किं० निरोप.

संदेह (सं पु ना.) होय किं० नाहीं, असें किं० असें नव्हे, इत्याकारक उभय कोटयात्मक जें ज्ञान तो. २ संशय,

सदैव (स. अव्य०) सदा.

सदोदीत (अव्य०) सदैव.

सद्गद (वि०)(ग्रा०) सद्गदित.

सद्गदित (स. वि०) दुःखानें किं० आनंदानें अश्रु कंठांत उत्तर यामुळें दाटून येतो जो कंठ तो, किं० तशी अवस्था झाली आहे ज्याची तो मनुष्य.

सद्गुण (स पु ना.) विद्या, कळा, शौर्य, उपकारता, सहिष्णुता, इ०- रूप कोणेकाचे अंगीं असतो जो उत्तम गुण तो.

सद्गुरु (स पु ना.) ईश्वरप्राप्तीचा मार्ग दाखविणारा असा जो गुरु तो. २ ब्रह्मस्वरूप अपरोक्ष करून देणारा

सद्गृहस्थ (स पु ना.) भला, प्रमाणिक जो गृहस्थ तो

सदी (अर० स्त्री ना.) जें केलें तें पार पडतें, साजरें दिसतें, असा कोणेकास अनुकूल काळ असतो तो.

सद्भाव (स पु.ना.) साधुत्व. २ अस्तित्व.

सद्म (सं. न. ना.) सदन.
सद्यः (सं. अव्य.) वर्तमानकाळीं.
सधट (वि०) (ग्रं०) मोठा.
सधर (वि०)(ग्रं०)अधिक आश्रययुक्त
संधान (सं. न. ना.) सांधण्याचा जो व्यापार तें. २ नेत्रादि इंद्रियें, बाण गमनादि कर्त्ता, इ० जे त्याणीं स्वस्व वृत्तिनें आकलित करायाचे जे इंद्रियार्थ, वेध्य लक्ष्य, कर्त्तव्य कार्य, गंतव्यस्थल, इ० विषय त्यातें अनुलक्षून जो त्या इंद्रियादिकांचा रोख झाला असतो तें. ३ कोणेक कार्य विवक्षानुरूप होण्याचा जो मार्ग किं० युक्ति तें आणि तो मार्ग करण्याचा व्यापार तें.
संधि (सं. पु. स्त्री. ना.) भिन्न भिन्न जे दोन अर्थ त्यांच्या कोणेके अंगीं जो एकमेकांशीं मिलितपणा होतो तो. २ त्याचा जेथें मिलितपणा होतो तो जो उभयात्मक प्रदेश तो. ३ समेट.
संध्या (सं. स्त्री. ना.) ब्राह्मणानीं प्रतिदिनीं त्रिकाळ करायाचें एक कर्म आहे. २ संध्याकाळ.
संध्याकाल,काळ (सं. पु. स्त्री.ना.) सूर्यास्तसमय किं० तत्सन्निहित जो काळ तो.
सनंग (न. ना.) वस्त्र, परंतु क्रयविक्रयादिप्रसंगीं. २ क्रयविक्रय, विवाह इ०प्रसंगीं पशु, स्त्री, इ०कांस म्हणतात.
सनद (अर० स्त्री. ना.) सरकारचें शिक्क्याचें पत्र तें. २ प्रमाणत्वेंकरून मानितात जें कोणेकाचें वाक्य, ग्रंथ, इ० त्यास प्रसंगविशेषीं म्हणतात.
सनपणें (धा. ना.)(ग्रं०) उपमेस येणें.
सनातन (सं.वि०) अनादिसिद्ध शाश्वत जो ईश्वर, धर्म इ० तो.
सनाभ (सं. वि०) मध्यें मूळग्रंथ आणि दोहीं बाजूंस टीका अशा प्रकारें लिहिला जो ग्रंथ, पुस्तक, इ० तो.
सनोळख (वि०)(ग्रं०) ओळखीचा.
सन्निकृष्ट (सं. वि०) जवळच्या प्रदेशीं स्थित जो कोणेक अर्थ तो. २ (अव्य०) जवळ.
सन्निध (सं. अव्य०) जवळ.
सन्निपात (सं. पु. ना.) वात, पित्त, कफ यांचा क्षोभ झाल्यामुळें जो विकृतिविशेष होतो तो.
सन्निहित (सं. वि०) संन्निकृष्ट.
सन्मात्र (सं. न. ना.)(ग्रं०) ब्रह्म.
सन्मान (सं. पु. ना.) सत्कार.
सन्मुख (सं. वि०) संमुख.
संन्यासी (सं. पु. ना.) यति.
सन्‍ला (पु. ना.) संदला.
सपक (वि०) रुचीस कमी झालेला पदार्थ तो.
संपणें (सं.समापन) (धा. ना.)द्रव्यादि कोणेक अर्थाचा कांहींएक कार्याकडे व्यय होऊन तो निःशेष होणें. २ आरंभिलेलें कार्य त्या त्या क्रियेच्या द्वारें समाप्त होणें. ३ कोणेकानें मरणें.
संपत्ति (सं. स्त्री. ना.) कोणेकापाशीं आपल्या सत्तेंत असतो जो पैका आ-

दिकरून सर्व भोग्य पदार्थांचा समुदाय तो.
सपत्न (सं. पु. ना.) शत्रु.
संपदा (सं. स्त्री. ना.) संपत्ति.
संपन्न (सं. वि०) ज्या द्रव्य, विद्या, गुण इ०कें करून जो युक्त तो तत्संपन्न. २ (पु. ना.) धनिक.
संपर्क (सं. पु. ना.) कोणिकाचा कोणेकास स्पर्शादिरूप जो संबंध तो.
सपाई (वि०) (ग्रं०) सर्व. [विस्तर.
सपाखर (वि०) (ग्रं०) सकूा. २ स-
सपाट (वि०) खळगा किं० उंचवटा इ० ज्याचे अंगीं नाहीं असा जो प्रदेश तो. आणि तद्विशिष्ट भूम्यादि पदार्थ तो. २ (अव्य०) चपाट.
सपाटा (स्त्री. ना.) सपाटपणा.
संपात (सं. पु. ना.) मार्ग सूत्र इ० कितीएक पदार्थ दोहींकडून तिर्कस किं० सन्मुख येऊन झाला जो त्यांचा संयोग तो.
सपातळ (पु. ना.) (ग्रं०) पडदा. २ (वि०) पसरलेला.
संपादणी (स्त्री. ना.) कांहीं आणलें जें सोंग तद्विषयीं किं० पसरली अ० खोटी जी कोणेक गोष्ट तद्विषयीं भाषणादिकेंकरून तें तें वास्तविकारीं नीटनेटकें करून दाखविण्याचा जो व्यापार तो.
संपादणें (धा. ना.) विद्याद्रव्यादि मिळवणें. २ कोणेक कार्य करून घेणें. ३ कोणेक गोष्ट संपादणीनें विशिष्ट करणें.
संपादन (सं. न. ना.) संपादण्याचा व्यापार. [पिंड.
सपिली (वि०) (ग्रं०) समूळ. २ स-
संपुट (सं. पु. ना.) दोन पुडें ज्यास आहेत असा जो करंडा इ० तो.
सपुर (वि०) (ग्रं०) बारीक. २ लहान.
संपुष्ट (पु. ना.) संपुट. २ आकारविशेषाचें धातु इ०कांचें पात्र आहे. कोणेकाचें संपुष्टांत येणें म्ह० गोकर्णांत येणें किं० द्रव्यादिकांचें मान अगदीं थोडक्यांत येणें.
सपूरण (वि०) (ग्रं०) बारीक. २ संपूर्ण.
संपूर्ण (सं. वि०) सकल प्रथम द्वितीयार्थीं. २ पूर्ण द्वितीयार्थीं. ३ करतां करतां समाप्तीस पावला जो अर्थ तो. ४ (न. ना.) व्रतादिकांचे सांगतार्थ जें उद्यापन, ब्राह्मणभोजन, इ० रूप कर्म करितात तें.
संपूर्णता (सं. स्त्री. ना.) ग्रंथ, कार्य, इ०कांची समाप्ति ती. २ व्रतादिकांची जी सांगता ती.
सपोस, सपोष (वि०) (ग्रं०) पुष्ट.
सप्तक (सं. न. ना.) एकजातीय सात पदार्थांचा समुदाय तें.
सप्तव्यसनें (सं. न. ना.) (ग्रं०) जारण, मारण, विध्वंसन, वशीकरण, स्तंभन, मोहन, उच्चाटन, हीं सर्व मिळून.
सप्ता, सप्ताह (सं. पु. ना.) साता दिवसांत भागवत इ० पुराणाचें जें पारायण करितात तो.
संप्रदाय (सं. पु. ना.) रीति.
सफई (स्त्री. ना.) सफाई.
सफर (अर० स्त्री. ना.) गलबत सु-

ढां जी विवक्षित स्थळीं सफरी लो-
कांची खेप ती आणि त्यांस तत्संबं-
धीं देतात जें वेतनादि तें.

सफल, फळ (सं. वि०) विवक्षित फलानें युक्त जो वृक्षादि, व्यापार, मनोरथ, इ० तो.

सफाई (अर० स्त्री. ना.) काष्ठ, पाषाण, इ० पदार्थांवर घोंटणें, तासणें, साफ करणें, इ० संस्कारानें जो गुळगुळीतपणा, नीटनेटकेपणा, इ० रूप धर्मविशेष उत्पन्न होतो तो. २ ज्यामध्यें नीटनेटकेपणा असावा तसा आहे आणि व्यंग सहसा दुसऱ्यास दिसूं नये असा जो भाषणलेखनादिविषयींचा कृतिप्रकार तो.

सफेत (फा० वि०) स्वच्छ जो पांढरा तो, पांढरेपणाचा अतिशय वर्णावयाचा असतां पांढरा या शब्दापुढें याचा योग करितात.

सफेता (फा० पु. ना.) रंग इ० करायाचे उपयोगी खडूसारखा एक पांढरा पदार्थ आहे.

सफेती (स्त्री. ना.) भिंत इ० सफेत करायासाठीं जो चुना इ०कांनीं त्यास लेपरूप संस्कार करितात तो. २ सफेतपणा.

संबंध (सं. पु. ना.) परस्परें भिन्नस्वरूप जे अर्थ त्यांचा कोणेक प्रकारेंकरून एकमेकाशीं लागपणा असतो तो; ज्याचे जन्यजनकभाव, सेव्यसेवकभाव, इ० आणि संयोगादि अनेक अवांतर भेद आहेत. २ ब्राह्मण मरून जो पिशाच झाला तो

सबंध (वि०) अवांतर अवयव इतस्ततः न व्हावे म्हणून जो कांहींएक बंध करून ज्या रचनेनें रचित केला असतो तो बंध न सुटतां त्या रचनेनें विशिष्ट जो पदार्थ तो.

सबब (अर० स्त्री. ना.) कारण. २ (अव्य०) कोणेक कारणास्तव.

सबर (वि०) सगर्भ; परंतु घोडी, गाढवी, खेचरी याविषयीं प्रयोग.

सबराभरित, भरीत (वि०) (ग्रं०) सबाह्यअभ्यंतरीं व्यापक.

सबल, ळ (सं. वि०) निर्बळ नव्हे तो. २ सेनेसहवर्तमान तो. ३ (ग्रं०) शबल किं० औपाधिक.

सबळें (अव्य०) (ग्रं०) सर्वेंच, लागलीच. २ बळेंकरून.

सबुरी (अर० स्त्री. ना.) घाई, उतावळी न करितां दम धरून उगेंच राहण्याचा जो व्यापार तो. [करणें.

संबोखणें (धा. ना.) (ग्रं०) समजूत

सबोब (वि०) (ग्रं०) सुशोभित.

संभव (सं. पु. ना.) अर्थानें असायास किं० व्हावयास जी साधनसामग्री अपेक्षित असत्ये ती असल्यामुळें त्या अर्थाचे अंगीं असण्याविषयीं किं० होण्याविषयीं जी योग्यता असत्ये तो. २ होईलच होईल, असेलच असेल असा निश्चय न होतां असेल तर असेल, झालें तर होईल, असें कोणेक अर्थाविषयीं जें अंतःकरणांत ज्ञान होतें तो. ३ उत्पत्ति. ४ (वि०) ज्यापासून ज्याची उत्पत्ति तो तत्संभव.

सभा (सं. स्त्री. ना.) कांहीं कारणास्तव राजा, राजलोक, किं० विद्वान,

पंडित, गुणी, इ०कांचा समाज व्हावयाकरितां निर्मिलें असतें जें स्थळ तें. २ त्या स्थळीं किं० कोणेक स्थळीं त्यांचा झाला जो समाज तो.

सभाग्य (सं. वि०) भाग्यवान. २ ज्याचे हातून बहुतांवर उपकार होत असावे, ज्याचे योगानें बहुतांचें हित होत असावें असा जो कोणी पुरुषादि त्यास म्हणतात.

सभामंडप (सं. पु. ना.) देवालयापुढेंच कथा, कीर्तन, पुराण, इ०कांसाठीं जो लांकडी, दगडी, असा केला असतो मंडप तो.

संभार (सं० पु. ना.) यज्ञ युद्ध इ० कार्यांचा जो सामग्रीसमुदाय तो.

संभावना (सं. स्त्री. ना.) संभव प्रथम द्वितीयार्थी. २ हा पदार्थ बहुतकरून अमुक स्वरूप असेल, किं० अमुक पदार्थ अमुकस्थळीं असेल काय, इ० रूप जो मनोव्यापार तो. ३ पंडित, वैदिक, पुराणिक, हरिदास, इ० कोणी प्रतिष्ठित जो भिक्षुक तो कांहीं निमित्तानें आपले घरीं आला असतां त्यास निरोप देतेसमयीं दक्षिणादि दानें करून त्याचा करितात जो गौरव तो आणि तें देतात जें दक्षिणादि तें.

संभावित (सं. वि०) संपत्तिमत्ता, विद्वत्ता, इ० कानीं जो प्रतिष्ठित तो. २ संभावनाविषय जो अर्थ तो.

संभाषण (सं. न. ना.) कोणेकाचें कोणेकासंगतीं जें भाषण तें.

सभासद (सं. पु. ना.) सभेमध्यें प्रतिष्ठितपणें बसले असतात जे लोक ते प्रत्येकी. २ सभेंत बसून न्यायमनसुबी, वादविवाद, इ० व्यापार करणारे जे मनुष्य ते प्रत्येकी.

संभाळ (पु. ना.) प्रतिपाळ.

संभाळणें (धा. ना.) अन्नदानादिकेंकरून कोणेकास प्रतिपाळित करणें. २ कांहीं व्यापार, पदार्थ, इ० सशक्ति, सावधपणा, इ० कानें आटोपून धरणें. ३ अपथ्य, कांहींएक अरिष्ट प्राप्त होईल ह्मणून तद्विषयीं सावधपणें असणें.

संभूतवार्ता (स्त्री. ना.) संभावना होत असावी, गोष्टी तरी नियत असाव्या, इतक्यानें तरी कोणेक गोष्टीचें अस्तित्व तो. २ कोणेक अर्थाची ज्ञापक तत्संबंधी यत्किंचित् तरी गोष्ट ती. [भूतवार्ता.

संभूति (सं. स्त्री. ना.) संभव. २ सं-

संभोग (सं. पु. ना.) विषयाचा जो उपभोग तो, परंतु स्त्रीचे उपभोगाविषयीं विशेष प्रयोग.

सभ्य (सं. वि०) सभासद. २ संभावितप्रथमार्थी.

संभ्रम (सं. पु. ना.) भयलाभादिकांचा किं० थोराचे आगमनाचा इ० प्रसंग आला असतां त्या कालीं कर्तव्य जें कृत्य त्याविषयीं कांहीं सुचूं नये, घाबरें व्हावें, अंतःकरणास त्वरा व्हावी, इ० रूप जी अवस्था होते तो. २ कोणेक गोष्टीविषयीं प्रीतिपूर्वक उद्योग करीत असावा अशी असल्ये जी कोणेकास हौस तो. ३ कोणेक पदार्थ नीटनेटक

दिसावा ह्मणून त्यास करितात जे अनेक उपचार ते प्रत्येकीं.

**सम्** (सं. अव्य०) हा संस्कृत उपसर्ग आहे. हा ज्याचे मागें लागतो त्याचा प्रशस्तपणा बोधवितो.

**सम** (सं. वि०) तुल्य. २ वांकडेतिकडेपणा किं० उंचसखलपणा इ० अविवक्षित गुणरहित जो भूम्यादिकांचा प्रदेश तो आणि तद्विशिष्ट भूम्यादि पदार्थ तो. ३ दोन, चार, साहा, इ० रूप जी युग्मसंख्या ती. ४ सर्व अर्थास तुल्यरूपानें पाहणारा जो साधु इ० तो. ५ कोणेकाचा शत्रु नव्हे आणि मित्रही नव्हे असा केवळ उदासीन जो ग्रह इ० तो. ६ (ग्रं०) (न. ना.) ब्रह्म.

**समग्र** (सं. वि०) सगळा.

**समज** (स्त्री. पु. ना.) परिज्ञान.

**समजणें** (धा० ना.) काहींएक गोष्ट कोणेकास परिज्ञात होणें व त्या ज्ञानानें आपण विशिष्ट होणें. २ रूसलेला किं० कोणेक गोष्टीविषयीं अडून बसलेला जो कोणी त्याणें रुसवा, अड, इ० सोडून अविरुद्धभावविशिष्ट होणें.

**समंजस** (वि०) काहींएक गोष्ट करणें ती तारतम्यानें विचारपूर्वक चौघास बरी दिसेल ती करणारा असा चांगल्या स्वभावाचा जो तो. २ समजदार. ३ न्याय्य जें भाषणादि तें.

**समजाविशी, समजावीस, समजी** (स्त्री. ना.) रूसलेला, किं० अडून बसलेला, किं० विवादास प्रवृत्त झालेला जो कोणी त्याणें समजावें ह्मणून करितात जो तदनुकूल व्यापार तो आणि तेणेंकरून त्याचा होतो समजलेपणा ती.

**समजूत** ( स्त्री. ना. ) समजाविशी. २ समज.

**संमति** (सं. स्त्री. ना.) सम्मति.

**समतुक** (वि०) (ग्रं०) सारख्या तोलाचा—महत्वाचा तो.

**समतोल** (वि०) गुणादिद्वारा जे तुल्य ते परस्पर. २ (अव्य०) शरीर, ओझें, इ० कांचा किंचितही इकडे तिकडे तोल न जाऊं देतां, तर इ० कांत बसणें, ठेवणें, इ०कांचें वि०.

**समधात** (वि०) शीत, उष्ण, ज्यांत सम आहेत असें जें औषध, शरीर, प्रकृति, देश इ० तें.

**समय** ( सं. पु. ना. ) कोणेक कार्य करण्याचा, होण्याचा जो कालावयव तो. कोणेकावर समय पडणें किं० येणें ह्म० परम दुःखदायक प्रसंग त्यास प्राप्त होणें. समयास किं० समयीं उपयोगीं पडणें ह्म० प्रसंगीं कामास येणें. २ प्रसंग. ३ (स्त्री.) समई. [संगोपात्त.

**समयानसार, नुसार** (अव्य०) प्र-

**समयोचित** ( सं. वि० ) विवक्षित समयीं योग्य जें भाषण इ० तें.

**समर** (सं. पु. ना.) युद्ध.

**समरंगण** (न. ना.) समरांगण.

**समरस** ( सं. वि० ) सर्वांशीं मिळून राहावें अशा स्वभावाचा जो पुरुष इ० तो. २ (ग्रं०) ब्रह्म.

समरांगण (सं. न. ना.) युद्धासाठीं नेमितात जें स्थळ तें. २ युद्धादिकांचा जो प्रसंग त्यास म्हणतात.

समर्थ (सं. वि०) शरीर, द्रव्य, विद्या, इ०कांचे बळानें त्या त्या कार्याविषयीं जो शक्तिमान् तो.

समर्पक (सं. वि०) कोणेकाच्या प्रश्नादिकावर यथायोग्य असावें तसें जें उत्तरादि तो.

समर्पण (सं. न. ना.) देव, ब्राह्मण, इ०कांस कांहींएक पदार्थाचें केलें जें अर्पण तें.

समला (अर० पु ना.) पाठीवर लोंबायाजोगा डोईवरचे पागोट्याचा शेवट बाहेर सोडितात जो पदर तो.

समवयस्क, समवई (सं. वि०) तुल्य वयाचे जे ते परस्पर.

समशेर (फा० स्त्री. ना.) तरवार.

समष्टि (सं स्त्री. ना.) अनेक व्यष्टि मिळून झाला जो विराट् देहादि एक अवयवी तो.

समसमान (वि०) तुल्य.

समस्त (सं. वि०) सर्व.

समस्या (सं. स्त्री. ना.) ज्याचें उत्तर एकाएकीं ध्यानांत येत नाहीं असा जो कोणेक विषयावर कोणेकाचा असतो प्रश्न तो. २ (ग्रं०) शंका. ३ शक्ति.

समक्ष (अव्य०) कोणेकाचे देखत त्याशीं भाषणादिव्यवहार करायाचा त्याशीं आणि आपणाशीं साक्षात् संबंध होई असें बोलणें, पाहणें, गांठ पडणें, इ० कितीएक धातूंचें वि०.

समक्षासमक्ष (अव्य०) देखत.

समाईक (सं. सामयिक) (वि०) अनेकस्वामिक असून विभक्त केलेला नव्हे जो क्षेत्रधनादि पदार्थ तो.

समाकूळ (वि०) (ग्रं०) व्याप्त. २ सर्व.

समागम (सं. पु. ना.) परस्पराचा [जो संयोग तो.

समाचार (सं. पु. ना.) परामर्श प्रथमार्थी. २ कोणेकाचें बरेंवाईटपणाचें जें वर्तमान तो.

समाज (सं. पु. ना.) समुदाय.

समाधान (सं. न. ना.) इष्टानुरूप घडल्यामुळें उद्वेगादि जाऊन बरें वाटायाजोगी सुखरूपेंकरून जी अंतःकरणाची स्थिति तें. २ पूर्वपक्षाचा निरास करणारें जें वाक्यादि तें. कोणेकाचे शरीरीं समाधान नाहीं कि० त्यास समाधान वाटत नाहीं इ० त्यास बरें वाटत नाहीं, तो दुखणेकरी आहे असा अर्थ.

समाधि (सं. पु. स्त्री. ना.) विषयापासून अंतःकरण निवृत्त होऊन ईश्वराचे ठायीं लागावें म्हणून प्राणायामादि साधनांनीं करितात जी त्या अंतःकरणाची एकाग्रता तो. ती. २ संन्यासी जलांत बुडून घेऊन किं० स्थलांत पुरून घेऊन जो प्राणत्याग करितो तो. ती. ३ संन्यासी मरण पावल्यानंतर त्याचे देहास जलांत बुडविणें किं० स्थलांत पुरणें असा जो संस्कार करितात तो. ती. ४ संन्यासी ज्या स्थळीं पुरतात तेथेंच जें वृंदावनादि बांधितात तो. ती.

समाधिस्थ (सं. वि०) समाधिप्रयोगानें युक्त जो तो. संन्यासी, ब्रह्मचारी, साधुपुरुष यांणीं समाधिस्थ होणें म्ह० मरण पावणें.

समान (वि० ) सपाट प्रथमार्थी. २ तुल्य. [वाचें ते परस्पर.

समानशील (सं. वि०) तुल्य स्वभा-

समानाधिकरण (सं. वि०) एका अधिकरणाचे ठायीं जे विद्यमान ते परस्पर.

समाप्ति (सं. स्त्री. ना.) संपलेपणा.

समारंभ (सं. पु. ना.) लग्न, मुंज, यज्ञ, सण, वार, ब्राह्मणभोजन, इ० कार्यांचा अनेक सामग्रीनें शोभायमानता करितात जो उत्साह तो. २ तदर्थ संपादित जी उपयुक्त सामग्री तो.

समाराधना (सं. स्त्री. ना.) व्रत, विवाह, इ० संबंधी जें ब्राह्मणभोजन करितात तें.

समावणें (सं. समावेश) (धा. ना.) मावणें. २ समाविष्ट होणें.

समावेश (सं. पु. ना.) कोणेक प्रकरणांत कोणेकाचा संग्रह तो. २ कोणेक अर्थाची कोणेक अधिकरणीं प्रवेशपूर्वक स्थिति तो.

समिध (सं. स्त्री. ना.) समीध. [पुल.

समीचीन (सं. वि०) उत्तम. २ वि-

समीर (सं. पु. ना.) वायु.

समुच्चय (सं. पु. ना.) समुदाय.

समुदाय (सं. पु. ना.) एकत्रस्थित ज्या अनेक व्यक्ति त्यांस अवयवत्व कल्पून त्यांचा मानिला जो विशिष्टरूपेंकरून निराळा अवयवी तो.

समुद्र (सं. पु. ना.) बहुतेक पृथ्वीचा प्रदेश व्यापून राहिला आहे असा जो अपार उदकराशि तो; ज्याचें उदक क्षार आहे. ज्याचा अंतपार नाहीं असे जे ईश्वरगुण, माया, शब्दसमूह, जन्ममरणरूप संसार, इ० त्यांस आरोपानें म्हणतात.

समुद्रवलयांकित (सं. वि०) समुद्ररूप वलयानें अंकित अशी संपूर्ण जी पृथ्वी तिचें वि०. [समुदाय.

समुदाव, वावो (पु. ना.) (ग्रं०)

समूल, समूळ (सं. वि०) मूळासहित जो वृक्ष इ० तो. २ ज्यास आधारभूत मूळ आहे असा जो वाक्य, ग्रंथ, इ० तो.

समूह (सं. पु. ना.) समुदाय.

समृद्धि (सं. स्त्री. ना.) विपुलता.

समेट (पु. ना.) रूसवा, शत्रुत्व, इ० जो झाला असतो तो जाऊन परस्परांचा होतो जो अविरुद्धभाव तो.

समेटणें (धा. ना.) प्रवृत्त जें युद्ध, वाद, इ० तें कोणेकानें मिटे असें करणें. [२ समय.

समो (पु. ना.) ( ग्रं० ) समुदाय.

समोर (वि०) सूत मारल्यासारिखा उजू तो. २ (अव्य०) कोणेक अवधिपासून समानसूत्रानें अन्वित जो प्रदेश त्याच्या ठायीं किं० कोणेकाचे पुढल्या प्रदेशीं.

समोरासमोर (अव्य०) परस्पर संमुख होत अशा प्रकारें.

संमोह (सं. पु. ना.) (ग्रं०) अतिशयित भ्रांति तो.

समोहो (पु. ना.) (ग्रं०) समूह.

सम्मत (वि०) अभिमत. २ (न.) अनुमत.

सम्मति (सं. स्त्री. ना.) अनुमत.

सम्मार्जन (सं. न. ना.) शेणखळा, पाणी इ०कांनीं शुद्धतेसाठीं सडा घालणें, सारविणें, इ० रूप जो व्यापार तें.

सम्मुख (सं. वि०) अभिमुख.

सम्यक् (अव्य०) उत्तम प्रकारें करून.

सय (स्त्री. ना.) आठवण. २ (पु.) (ग्रं०) विषय.

संयती (स्त्री. ना.) (ग्रं०) नेम.

संयम (पु. ना.)(ग्रं०) समान स्थिति.

सयसुमार (पु. ना.) सईसुमार.

संयुक्त (सं. वि०) संयोगसंबंधानें संबद्ध जो तो.

संयोग (सं. पु. ना.) पदार्थांचा परस्परांस लागलेपणारूप जो संबंध तो.

सर (पु. ना.) ज्यामध्यें मोतीं, पोवळीं, फुलें, इ० ओंवलीं आहेत असें जें सूत्र तो. २ सरळ लांब मोठा असा जो वासा तो. ३ (फा०) समानीय अधिकारविशिष्ट जे अनेक अधिकारी त्यांजवर केला असतो जो एक मुख्य अधिकारी तो, हा शब्द अधिकार व अधिकारी यांचे मागें लागतो. उ० सरदेशमुखी, सरदेशमुख, इ०. ४ (स्त्री.) मध्यें मध्यें कांहींकाल कोणेकास वेड लागल्यासारखी जी अवस्था होत्ये ती. ५ कांहींकाळ राहून जावा असा येतो जो पर्जन्याचा झपाटा ती. ६ कोणेकास कोणेकाची गुणादिकेंकरून जी बरोबरी ती. किल्ला, राज्य, इ० सर करणें म्ह० युद्धादिकेंकरून स्वाधीन करणें. ७ बाण.

सरकणें (धा. ना.) सरकटणें. २ विवक्षित स्थळापासून पलीकडे होणें.

सरकत (अर० स्त्री. ना.) कृषिवाणिज्यादिरूप जो कोणेक व्यवहार त्यामध्यें तोटा, नफा यांचे अधिकारिंकरून अनेकांचा असतो जो स्वामित्वसंबंध ती.

सरकफांस (पु. ना.) गांठ सरकावली असतां पाहिजे तेवढा लहान मोठा व्हावा असा जो फांस करितात तो.

सरकार (न. ना.) सर्कार.

सरघा (सं. स्त्री. ना.) मधमाशी.

सरजा (फा० पु. ना.) नथेस मुख्य मोत्याचे वर त्या गाळ्यास जीं कलिकाकार मोतीं ओंवूनि लावितात तो. २ बंदुकीस तोडा अडकवायाचे उपयोगीं जो लोखंडाचा अंकुशासारिखा अवयव असतो तो.

सरंजाम (फा० पु. ना.) सामग्री. २ सरकारांतून ज्यास घोडें, पालखी इ० देतात किं० फौज ठेवायास सांगतात त्यांचे खर्चाबद्दल जो गांव इ० नियमित करून देतात तो.

सरड, सरडा (सं. सरट) (पु. ना.) पालीचे आकाराचा एक क्षुद्र जंतु आहे.

सरडोका (पु. ना.) सरड.

सरण (न. ना.) मृत मनुष्यास जाळण्याकरितां रचिलेलें जें चिता तें.

सरणि (सं. स्त्री. ना.) मार्ग. २ कोणेकाची भाषण, कविता, इ० संबंधी जी रीति ती.

सरणें (धा. ना.) सरकणें. २ व्यय इ०द्वारा द्रव्यादि निःशेष होणें. ३ कोणेक गोष्ट कोणेकास योग्य दिसणें. त्यावांचून त्याचें सरत नाहीं म्ह० चालत नाहीं.

सरता (वि०) अनुक्रमानें स्थित जे अनेक अर्थ त्यामध्यें जो शेवटला तो. २ (ग्रं०) वंद्य. ३ कृतकृत्य. ४ पावन. ५ पुढारी. [नुसंधान.

सरतिलें (न. ना.) (ग्रं०) लक्ष, अ-

सरतेशेवट, शेवटीं (अव्य०) भाषणादि कोणेक व्यवहाराची जी चरमावस्था तिचे ठायीं. २ शेवटल्या विभागीं.

सरधोपट (वि०) ज्यामध्यें वांकडेतिकडेपणा नाहीं असा जो सरळ मार्ग, भाषण इ० तो. २ (अव्य०) अर्थ सांगणें, मननकरणें, इ०काकडे न गुंततां सरळ रीतीनें, लिहिणें, इ०कांचें वि०.

सरप (न. ना.) (ग्रं०) रत्न.

सरबरा (स्त्री. ना.) बरावरी.

सरबरीत (वि०) फार दाट नव्हे आणि फार पातळ नव्हे असा जो भाज्याचा रस, कालविलेला भात, पीठ, चिखल, इ० पदार्थ तो.

सरबसर (वि०) केवळ बरोबरी नव्हत. प्रमाणादि गुणानें एकमेकाशीं यत्किंचित् अंतरानें विशिष्ट जो कोणेक अर्थ तो.

सरया (वि०) (ग्रं०) शुद्ध.

सरल, ळ (सं. वि०) ऋजू, नीट असा जो काठी, मार्ग, इ० पदार्थ तो. २ ज्यांतील आशय गूढ नाहीं, पदें कठीण नाहींत, इ० दोषरहित जी कविता, भाषण इ० ती.

सरवदा, वद्या (पु. ना.) सहदेवमताच्या ज्योतिषप्रमाणें भविष्य सांगणारा जोशी तो.

सरस (फा० पु. ना.) बकऱ्याचे मांसापासून एक पदार्थ उत्पन्न होत असतो; जो चपडा लाखेसारखा दिसतो आणि जो उकवागाचे उपयोगीं पडतो. २ विवक्षित गुणानें जो उत्तम तो. ३ विवक्षित प्रमाणापेक्षां जो कांहीं अधिक तो. [प्रथमार्थी.

सरसकट, सगट (अव्य०) सकट

सरसा (अव्य०) सन्निध प्रदेशीं किं० सन्निध प्रदेशातें आश्रयून बस, ठेव, इ०कांचें वि०. २ कोणेक कार्यासाठीं पदार्थावर उत्पन्न झाला जो वेग त्याच वेगबलानें.

सरसावणें (धा. ना.) दूरस्थित जो पदार्थ तो सरसा करणें. २ कोणेक पदार्थ अधिष्ठित स्थलाहून विवक्षित स्थलीं सरके असा करणें. ३ युद्धवादादि प्रसंगीं कोणेकानें तद्विषयीं सिद्ध होऊन प्रायः आवेशपूर्वक पुढें होणें. ४ मनुष्य, पशु, वृक्ष, यांणीं अकस्मात् वृद्धिंगत होणें.

सरसिज (सं. न. ना.) कमळ.

सरस्वतशुभें (न. ना.)(ग्रं०) प्रसन्न- विद्या.

सरस्वतीदान (सं. न. ना.) कोणेका- पासून द्रव्यादि घेऊन किं० एरवींच त्यास जें खत इ० दस्तैवज करून देतात त्यासच प्रसंगविशेषीं म्हण- तात, क्वचित् विद्यादानास म्हणतात.

सरळणें (धा. ना.) सरसावणें द्वि- तीय तृतीयार्थी.

सरळी (स्त्री. ना.) एकदाच अंगा- मध्यें वेग घेऊन मध्यें हातपाय न हालवितां सर्पासारखें पाण्यामध्ये सरळ पोहत जावें अशा प्रकारें जी गति ती. २ (ग्रं०) मोंकळीक. ३ गोडी.

संरक्षण (सं. न. ना.) उत्तमरीतीनें [रक्षण तें.

संरक्षित (सं. वि०) संरक्षण केलें ज्याचें तो.

सरा (पु. ना.) यंत्रादि संस्कारानें संस्कृत जी तार्डी, माडी, इ० ती. २ सर द्वितीयार्थी. ३ (ग्रं०) गोडी.

सराई, सराई (स्त्री. ना.) फळधा- न्यादि तो तो पदार्थ सिद्ध होण्याचा जो मुख्य समय ती. २ लग्न इ० तो तो व्यवहार होण्याचा मुख्य समय ती. ३ (फा० स्त्री.) यवनादिकांनीं मार्गामध्यें मार्गस्थांस उतरायाकरितां जी शाळा बांधिली असत्ये ती.

सराईत (वि०) पोहणें, गाणें, घो- ड्यावर बसणें, निशाण मारणें, इ० विद्येमध्यें लहानपणापासून अभ्यस्त झालेला तो तद्विषयीं.

सरागणें (धा. ना.) (ग्रं०) शोभणें.

सराफ (अर० पु. ना.) हुंडी, नाणें, रोकड, यांची दे, घे करावी असा व्यापार करून उपजीविका करितो तो. २ खर्चवेच करण्याविषयीं बा- रीक कसर पाहणारा असा जो कृ- पण त्यास निंदेनें म्हणतात.

सराव (पु. ना.) घोड्यावर बसणें, चालणें, पोहणें, इ० गोष्टींचा अभ्यास तो.

सरासरी (फा० अव्य०) यथाकथं- चित्. २ पुरतेपणीं निर्णय न होतां अजमासानें.

सरित्, सरिता (सं. स्त्री. ना.)नदी.

सरिफा (अर० पु. ना.) फायदा.

सरिफेदार (फा० वि०) ज्यांत फायदा होतो असा जो पदार्थ तो.

सरिसा (अव्य०) (ग्रं०) सारिखा. २ समागमें. ३ जवळ.

सरिसेपण (न. ना.) सारखेपण. २ व्यापकपण. ३ सिद्धता.

सरी (स्त्री. ना.) सुवर्णाच्या किं० रुप्याच्या तारा दोरीसारख्या वळून स्त्रियांचें एक कंठभूषण करीत अस- तात ती. २ (ग्रं०)बरोबरी. ३ उपमा.

सरोक (वि०) (ग्रं०) बिनकीड.

सरोख (वि०) (ग्रं०) सरोष, सक्रोध.

सरोज (सं. न. ना.) कमळ.

सरोत्तर, त्तरीं (अव्य०) (ग्रं०) ब- रोबरीनें उत्तर देणें, करणें, त्याचें वि०.

सरोबरी (स्त्री. ना.) बरोबरी. २ (अव्य०) कोणेक प्रमाणानें तुल्य

होई असें कोणेक पदार्थांत कोणेक पदार्थ मिसळणें, असणें, इ०कांचें वि०

**सरोभरी** ( स्त्री. ना. ) सरोबरी २ (ग्रं०) आदर.

**सरोरुह** (सं. न. ना.) कमल.

**सरोवर** (सं. न. ना.) मोठें जें तटाक, ज्यांत प्रायः कमलादिक असतात तें.

**सर्कार** (फा० न. स्त्री. ना.) ज्याच्या योगानें प्रजापालन, दुष्टनिग्रह, इ० कार्यें होतात असें जें सत्तारूप अधिकरण, ज्याचा अधिकारी राजा असतो तें. २ त्या अधिकरणाचा अधिकारी राजा इ० तो.

**सर्ग** (सं. पु. ना.) अध्यायस्थानापन्न जें काव्यादिकांचें प्रकरण तो. २ सृष्टीची जी उत्पत्ति तो.

**सर्द** (फा० वि०) ज्यामध्यें सर्दी बहुत आहे असा जो देश, औषध, हवा, इ० तो. कोणेकानें मनांत सर्द होणें म्ह० कोणी मर्म काढिल्यामुळें किं० उगीच दोष ठेविल्यामुळें खिन्न होणें.

**सर्दार** (फा० पु. ना.) ज्याचे हाताखालीं अनेक शिपाई लोक असतात असा जो मोठा शिपाई राजादिकांपाशीं असतो तो.

**सर्दी** (फा० स्त्री. ना.) वायु, पृथ्वी, जल, औषध, इ० पदार्थांमध्यें विकारकारी जो ओलेपणा किं० थंडपणा असतो ती. २ तेणेंकरून होतो जो शैत्यविकार ती.

**सर्प** (सं. पु. ना.) ज्याला बाहेर पाय दिसत नाहींत, सरसरत चालणारा रज्जूसारखा लांब असा एक प्राणी आहे, त्यासारखाच दशांक विन्हित सविष असा जो असतो त्यास विशेषेंकरून म्हणतात.

**सर्पटणें** ( धा. ना. ) मनुष्यादिकानें भुईवर पालथें पडून भुईशीं पोट लागत लागत पुढें सरावें अशी किं० फेंकलेला दगड इ०कानें भुईशीं फार अंतर न राहता भुईस लागत पुढें जावें अशी गति धरणें. २ सरकटणें प्रथमार्थीं.

**सर्पोस** (फा. पु. ना.) झांकण, परंतु कोणेकास नजर किं० अहेर न्यावयाचा असतो त्याचे आच्छादनार्थ जें वस्त्र केलें असतें त्याविषयीं किं० कितीएक पात्रांवर घालायाचें जें झांकण केलें असतें त्याविषयीं प्रसिद्धि.

**सर्फराजी** (फा० स्त्री. ना.) कोणी शौर्यादि केलें असतां त्याची सरकारांत करितात जी मोठी प्रतिष्ठा ती.

**सर्बत** (अर० न. ना.) लिंबू, चिंच, आंबा, यांच्या रसांत साकर घालून पिण्यासाठीं जो पदार्थ करितात तें.

**सर्बती, सर्बत्ती** (स्त्री. ना.) एकसमयावच्छेदेंकरून अनेक तोफा, बंदुका यांचा होतो जो आवाज ती.

**सर्वतः** (सं. अव्य०) सर्वत्र.

**सर्वत्र** (सं. अव्य०) विवक्षित सर्वाठायीं याचा प्रयोग. सर्व या अर्थी प्राकृतजन करितात.

**सर्वथा** (सं. अव्य०) सर्व प्रकारें.

**सर्वशाक, शाख** (सं. स्त्री. ना.) अनेक भाज्या एकत्र शिजवून करितात जी एकच भाजी ती. २ आलें म्हणून जो कंद त्यास प्रसंगविशेषीं म्हणतात.

सर्वसाक्षी (सं. वि०) सर्वभूतमात्राच्या ठायीं साक्षिरूपानें राहणारा जो ईश्वर इ० तो.

सर्वस्व (सं. न. ना.) स्वसत्ताक्रांत जें सर्व धनादि तें. २ जें ज्याचें सारभूत मुख्य रूप तें त्याचें.

सर्वस्वीं, सर्वस्वें (अव्य० ) सर्वप्रकारें. २ सर्वस्वसुद्धां.

सर्वज्ञ (सं. वि०) अर्थमात्रानें जाणणारा जो ईश्वर, योगी इ० तो.

सर्वोपरि (अव्य०) सर्वप्रकारें.

सल (पु. न. ना.) न वाढतां बहुत दिवस पोटांत राहिला असतो जो गर्भ तो. नें. २ शरीरावयवांत कांटा इ० भरल्यामुळें त्यांत राहतो जो त्याचा अंश तें. ३ (स्त्री. ना.) पाठ इ०कांत भरल्ये जी उसण ती. ४ (पु. ना.) तरवार इ० कांपासून मेण पडूं नये ह्मणून परजास बांधायाकरितां त्या मेणास संबंध केली असल्ये जी दोरी तो.

सलग (स्त्री. ना.) जाणें, येणें, इ० कारणानीं कोणेकाचा झाला जो विशेष परिचय ती. २ (वि०) मध्यें खंडित न होतां किं० सांधा नसतां विवक्षित लांबीनें किं० रुंदीनें युक्त जो काष्ठ, वस्त्र इ० पदार्थ तो.

सलगी (स्त्री. ना.) सलग प्रथमार्थी. २ (ग्रं०) संगत, सोबत. ३ बरोबरी.

सलचढणें (धा. ना.) (ग्रं०) विषाद वाटणें. [विपर्क्षी.

सलज्ज (सं. वि०) निर्लज्जाचा प्र-

सलणें (धा. ना.) कांटा इ०कानें शरीरांत खुपणें. २ शत्रु किं० दुर्भाषण, इ० नेत्र, मन, इ०कांत खुपत असणें.

सलाबत (अर० स्त्री. ना.) ज्याचे योगानें जें केलें तें पार पडावें, लोकानीं वचकत असावें, असा जो दैवानुकूल्यानें कोणेकाचे अंगीं प्रताप असतो तो.

सलामत (अर० अव्य०) फुटणें, तुटणें इ०कारणानीं नाशादि न होतां यथास्थितपणें कोणेक पदार्थ असणें, जाणें, येणें, इ०कांचें वि०.

सलामालकी (अर० स्त्री. ना.) परस्परांनीं एकमेकाचे घरीं कदाचित् जात असावें, वाटेंत गांठ पडली असतां रामराम, नमस्कार, इ० करावा, परगांवीं असतां कुशल वृत्त लिहून कळवीत असावें, असा जो कोणेकाचा कोणेकाशीं सुमाराचा सख्यभाव असतो ती.

सलिता, दा (पु. ना.) उंटावर लादावयाचें जें ओझें तें बांधायाकरितां गोणपाटाचे तुकडे जोडून एक साधनभूत वस्त्रविशेष केला असतो तो.

सलिल (सं. न. ना.) जल. [समुद्र.

सलिलराशि (सं. पु. ना.) (ग्रं०)

सलिली (स्त्री. ना.) (ग्रं०) पाणी.

सलूक, ख (अर० पु. ना.) सलगी प्रथमार्थी. २ परस्परांची मैत्री तो.

सलेप (वि०) (ग्रं०) मालिन.

सलो (पु. ना.) (ग्रं०) द्वेष.

सलग्न (वि०) कोणेक पदार्थाशीं लागून राहिला जो पदार्थ तो त्याशीं.

सला (अर० पु. स्त्री. ना.) समेट प्रथमार्थीं, परंतु प्रायः युद्धप्रसंगीं प्रयोग. २ कोणेक कार्याविषयीं कोणेकाचें घेतात जें अनुमत तो. ती. ३ कांगव्यांत घालायाचें एक भूषण आहे तो.

सवंकणें (धा. ना.) कोणेक व्यापारापासून कांहीं लाभ झाला असतां त्याची गोडी लागून पुनः पुनः तोच लाभ व्हावा म्हणून तो तो व्यापार करण्याविषयीं जी चट लागत्ये तद्विशिष्ट कोणेकानें होणें.

सवंग (सं. समर्घ) (वि०) महाग नव्हे तो. २ (ग्रं०) सोपा.

सवंगडी (पु. ना.) खेळगडी. २ (ग्रं०) सोबती.

सवंगण (स्त्री. ना.) (ग्रं०) शेतांतील धान्य मळून जमा करण्याचा व्यापार तो.

सवघड (वि०) अवघड नव्हे तो.

सवंचोर (पु. ना.) (ग्रं०) मार्गांत वाटाचा सोबती परंतु असावा चोर असा जो तो.

सवड (स्त्री. ना.) अवकाश, जागा.

सवडी (स्त्री. ना.) (ग्रं०) सवड. २ चोवट.

सवत (सं. सपत्नी) (स्त्री. ना.) एकपतिक ज्या दोन स्त्रिया त्या परस्पर.

सवतमत्सर (पु. ना.) परस्पर सवतींचा जो मत्सर तो. २ एकस्वामिक जे अनेक भृत्यादि त्यांचा जो मत्सर त्यास म्हणतात.

सवता (वि०) निराळा.

सवतें (न. ना.) (ग्रं०) सार्थक. २ (वि०) सवता.

संवत्सर (सं. पु. ना.) द्वादश मासात्मक जो काळ तो. २ पर्यायेंकरून होत असतात जीं प्रभव, विभव, इ० साठ वर्षांचीं नामें तीं प्रत्येकीं.

संवयळ (वि०) सपाट जी भूमि ती.

सवदा (फा० पु. ना.) कोणेक जिनसाचा क्रयविक्रयरूप जो व्यापार तो. २ तशा व्यापारानें घेतला जो जिन्नस तो.

सवदागर, गीर (फा० पु. ना.) इकडील जिन्नस तिकडे नेऊन विकावा, तिकडील इकडे आणून विकावा असा व्यापार करणारा जो मोठा व्यापारी तो.

सवदासुत (न. ना.) सवदा इ० तें.

सवन (सं. स्त्री. न. ना.) गाते, पढत्ये समयीं जे उच्च, मध्य, नीचरूप स्वरमान ती. तें.

संवय, सवय (स्त्री. ना.) कोणेक गोष्टीचें अनेक वार आचरण झाल्यामुळें कर्ता इ०कांचे अंगीं तत्संबंधीं जडतो जो संस्कार ती, जेणेंकरून ती गोष्ट स्वाभाविक वृत्तिप्राय होत्ये, अतएव तद्विरहीं दुःख व्हावें, ती सहजांत केली जावी इ० होतें.

सवरणें, संवरणें (धा. ना.) सर्व धातुमात्राच्या रूपापुढें तत्सदृश याचीं रूपें होऊन उर शब्दासारिखीं लागतात. उ० मी करून सवरून वाईट. इ०.

संवसाट (पु. ना.) (ग्रं०) सद्भाव.
संवसाटी (स्त्री. ना.)(ग्रं०) बरोबरी, साम्यता. [समागमें.
संवसारें (अव्य० ) (ग्रं०) बरोबर,
संवाद (सं. पु. ना.) कोणीएक विषयींचें प्रश्नोत्तरादिरूप जें परस्परांचें भाषण तें.
सवाल (अर० पु. ना.) विवादादि प्रसंगीं वादी प्रतिवादी इ०कांस कोणेक गोष्टीविषयीं जो प्रश्न करितात तो.
सवाशिण, सवाष्ण (स्त्री. ना.) सुवासिनी. [२ साधन.
संवाहन (न. ना.)(ग्रं०) आरोहण.
सविता (सं. पु. ना.) सूर्य.
संविति, ती (स्त्री. ना.)(ग्रं०) ज्ञान.
सविया (अव्य०) (ग्रं०) सहजीं.
सवियाचें (वि०) (ग्रं०) सहजींचें. २ सांगायाजोगें.
साविवळ (वि०)(ग्रं०)स्पष्ट. २सविवेक.
सविस्तर (सं. वि०) विस्तारेंकरून युक्त जें वर्तमान, गोष्ट, लेख इ०तो.
सवे, संवे (स्त्री. ना.) संवय.
संवें (अव्य०) (ग्रं०) सहवर्तमान. २ तत्क्षणीं.
संवेंच, सवेंच (अव्य०)(ग्रं०)काहीं-एक कार्याचे उत्तरक्षणीं काहींएक करणें, होणें, इ०कांचें वि०.
सवेशा, सा (स्त्री. ना.)(ग्रं०) सइच्छा. [काल.
सवेळ (स्त्री. पु. ना.) (ग्रं०) प्रातः-
सवेळे (अव्य०) (ग्रं०) तत्क्षणीं.
संशय (सं. पु. ना.) संदेह.
संशयात्मक (सं. वि०) ज्यापासून संशय उत्पन्न होतो, पुरतेपणीं एकाचें ज्ञान होत नाहीं असा जो ग्रंथ, भाषण इ० तो.
संशयी (वि०) ज्याचे मनांत कांहीं गोष्टीविषयीं वरचेवर अनेक संशय येतात अशा स्वभावाचा तो.
संसक्त (सं. वि०) आसक्त.
ससनणें (प्रा. ना.) (ग्रं०) बोलणें.
संसरण (सं. न. ना.) (ग्रं०) जन्ममृत्युरूप संसार भोगण्याचा व्यापार तें.
संसर्ग (सं. पु. ना.) पदार्थाचा पदार्थाशीं जो स्पर्शादि संबंध तो.
ससाणें (वि०) (ग्रं०) लखलखीत जें शस्त्र इ० तें.
संसार (सं. पु. ना.) प्रपंच, प्रथमद्वितीयार्थी. २ (ग्रं०) विस्तार. ३ लोक. ४ बंधन. ५ अहंकार.
संसारि (सं. वि०) घरदार, बायकापोरें, इ०रूप संसार ज्याचे पाठीशीं आहे तो.
संसृति (सं. स्त्री. ना.)प्रपंच प्रथमार्थी. २ (ग्रं०) जन्ममरण.
संस्कार (सं. पु. ना.) कोणेक अर्थावर क्रियेचा संबंध झाला असतां तेणेंकरून त्या अर्थावर काहींएक नवा गुणविशेष उत्पन्न होऊन काहीं राहतो तो, ज्याचे योगानें त्या अर्थाचे स्वरूपाचा पूर्वापेक्षेपेक्षा काहीं भेद होतो. २ गर्भाधानादिक जीं संस्कार कर्में तीं प्रत्येकीं.
संस्कृत (वि०) संस्कारिला तो. २ ए-

क भाषा आहे तिचें आणि तत्संबंधी जो शब्द, ग्रंथ, भाषण इ० त्याचें वि०.

सस्ता (वि०) सवंग.

संस्था (सं. स्त्री. ना.) सुखरूपेंकरून राहण्यास अन्नोदकादिकांची जी जी जशी जशी सोय असावी तसें तसें तिचें आनुकूल्य असल्यामुळें जी यथास्थितपणें स्थिति होते ती. २ कोणेक अर्थाची समाप्तिरूप जी दशा ती. ३ (ग्रं०) निर्णय.

संस्थान (सं. न. ना.) राजाचा राजकीय व्यवहार जेथें मुख्यत्वेंकरून होत असतो असें जें नगरादि स्थान तें. २ त्याचे खर्चाचे सरंजामाकरितां राजादिकांनीं प्रामादिक दिलें असतें असा जो कोणी देव, सत्पुरुष, विद्वान, मांडलिक, राजे इ० त्याचें जें आपआपला व्यवहार करण्याचें मुख्य ग्रामादि स्थान तें. ३ मोठा विद्वान् इ० जो कोणी त्यास ह्मणतात.

संस्थानिक (वि०) वंशपरंपरादि संबंधी ज्यांची स्थानें तीं समान आहेत त्यांचीं ते परस्पर.

संस्थानी (वि०) स्वरूप संस्थानाचा जो अधिकारी तो.

सस्मित (सं. वि०) (ग्रं०) विकासित.

सस्य (सं. न. ना.) वृक्षादिकांचें जें फल तें, परंतु धान्याविषयीं विशेष प्रसिद्धि.

सस्यांत (सं. पु. ना.) (ग्रं०) माघ आणि फाल्गुन या दोन मासांचा जो अंत तो. [श्रम.

सस्यु, सस्यू (पु. ना.) (ग्रं०) वर्णा

सहगमन (सं. न. ना.) स्त्रीचें सती जाण्याचें जें कर्म तें.

सहचर (सं. वि०) कोणेक कर्माविषयीं जो त्याचे बरोबर वागणारा तो त्याचा, परंतु मित्रपणानें जो वागणारा त्याविषयीं प्रायः प्रयोग.

सहज (सं. अव्य०) तादृश कार्याचा उद्देश न धरितां, किं० तादृश प्रयत्न न करितां, जा, ये, कर, हो, इ० कांचें वि०.

सहजगतीनें, गत्या (अव्य०) सहज.

सहजरीतीनें, रीत्या (अव्य०) सहजगतीनें.

सहजाखालीं (अव्य०) सहजगतीनें.

सहजांत (अव्य०) सहज.

सहजानसार (अव्य०) सहजांत.

सहजावारी, वृत्त्या (अव्य०) सहजगतीनें.

सहजासहजीं (अव्य०) सहजगतीनें.

सहन (सं. न. ना.) प्रतिकूलत्वेंकरून संबद्ध होणार जें दुःख, संकट, शीत, उष्ण, अन्यकृत अपराध, भार, इ० कांहींएक अर्थ त्याचे संबंधानें होणारी जी क्षोभभंगादि विक्रिया तिला आत्मप्रभावानें न होऊं देतां किं० झाली असतां न गणितां त्या अर्थाचें जें आत्मसंबंधांत धारण तें.

सहनशील (सं. वि०) अन्यकृत अपराधादि सहन करण्याविषयीं आहे शील ज्याचें तो.

सहल (अर० स्त्री. ना.) व्यायामादिकांसाठीं मौजेनें इतस्ततः फिरण्याचा जो व्यापार तो. २ (अव्य०)

कोणेक गोष्ट कोणेक कारणानें सुलभ होई असें.

सहवास (सं. पु. ना.) एकत्र स्थिति इ० रूप जो कोणेकाचा कोणेकाशीं संबंध तो. २ एकत्र स्थिति, संभाषण, इ० कारणानें कोणेकाचा होतो जो विशेष परिचय तो. कोणेक व्यवहार सहवासाखालीं पडणें ह्म० अभ्यासाखालीं पडणें.

सहसा (सं. पु. अव्य०) एकाएकीं.

सहस्रकर (सं. पु. ना.)(ग्रं०) सूर्य.

सहस्रदल (सं. न. ना.) ब्रह्मरंध्र.

सहस्रनयन (सं. पु. ना.)(ग्रं०) इंद्र.

सहस्रमुख (सं. पु. ना.) शेषनामक सर्प.

सहस्रशः (अव्य०) हजारों.

सहस्रावधि (अव्य०) हजारों.

सहाकारी (वि०) जो कोणी कोणेकाचें साहाय्य करितो तो त्याचा.

सहाध्यायी (सं. पु. ना.) बरोबर अध्ययन करणारे जे अनेक ते परस्पर.

सहामहिन्यांचीजांभई (स्त्री. ना.) आळशी, चेंगट जो कोणी त्याप्रशीं काम दिलें असतां लौकर होणार नाहीं अशा संभावनेनें या शब्दाचा प्रयोग करितात.

सहाय (वि०) कोणीएक मनुष्यादि काहींएक कार्य करित असतां तत्कार्यसिद्धीविषयीं अनुकूलपणें त्याशीं वागणारा जो मनुष्यादि तो त्याचा. २ (न. ना.) साहाय्य.

संहार (सं. पु. ना.) नामरूपानें प्रसिद्धीस आलेला जो कोणेक अर्थ त्याचा तें नामरूप सोडून जो लय तो. २ खाणें, जाळणें, मारणें, तोडणें, इ०केंकरून कोणेक अर्थाचा जो निःशेष नाश तो. [उपकरण.

सहावन (नं. ना.)(ग्रं०) साधन,

संहिता (सं. स्त्री. ना.) अनेक जे वर्ण, पदें, इ० त्यांची अतिशयित सान्निध्यें करून स्थिति ती. २ ऋषि इ० प्रोक्त जे वैद्यक, धर्मशास्त्र इ० विषयप्रतिपादक मूल ग्रंथ ते प्रत्येकीं. ३ वेदामध्यें एक विभाग आहे ती.

सहिष्ण (वि०) सहिष्णु.

सहिष्णु (सं. वि०) सहनशक्ति.

सळ (पु. ना.) सलचतुर्थांपैकीं. २ नव्या सनगांस ज्या घडीच्या मोडी असतात त्या प्रत्येकीं. ३ (ग्रं०) छळ. ४ वैर. ५ आग्रह. ६ अभिमान.

सळई (सं. शलाका) (स्त्री. ना.) उठाणूं, गळूं, इ० फोडणें, किं० नेत्रांत अंजन घालणें, इ० काहींएक कारणास्तव धातु, कांबट, इ०कांची केली असल्ये जी दाभणासारिखी काडी ती. २ कडबा, गवत, फळें यांची संख्येनें किं० लांकडाची वजनानें इतका कर्तव्य असतां विवक्षित संख्याबोधार्थ जो त्याचा त्याचा अंश काढून ठेवितात ती. ३ विडी बसविल्यावांचून जें मुसळाचें लाकूड ती. ४ जनानीं मुगटाच्यावर ज्या उभ्या रेषा असतात त्या प्रत्येकीं.

सळसळणें (धा. ना.) उदकादिकानें

विशेष तापल्यामुळें सळसळ शब्दानें विशिष्ट होणें.

सळाथी (स्त्री. ना.) केरसुणी.

सळु, सळू (पु. ना.) (ग्रं०) आग्रह. २ बळ. ३ उणेपणा. ४ (वि०) धाईट.

सळें (न. ना.) (ग्रं०) छळ. २ द्वेष.

संक्षिप्त (सं. वि०) संक्षेपविशिष्ट जो ग्रंथ, भाषण इ० तो.

संक्षेप (सं. पु. ना.) भवांतर विशेषादि योगानें विस्तार पावलेली जी कोणेक गोष्ट ती आंतील सारांश न जातां जितका अंश कमी होईल तितका कमी करून थोडक्यांत आणण्याचा जो प्रकार तो.

संज्ञा (सं. स्त्री. ना.) व्यवहारामध्यें त्या त्या अर्थाचें तत्तद्रूपेंकरून ज्ञान व्हावें म्हणून अर्थमात्रास जें संकेतित नाम असतें तो. २ कोणेकास कांहींएकाविषयीं नेत्रसंकेतादिद्वारा करितात जी खूण ती. ३ मूर्च्छित झाला जो कोणी त्यास येते जी शुद्धि ती.

साइकडें, खडें, घडें (न. ना.)(ग्रं०) कळसूत्राचें बाहुलें. २ बाहुलें.

साइपणें (अव्य०) (ग्रं०) स्वनः.

साऊमा (अव्य०) (ग्रं०) समोर, समोरून.

साऊळ (स्त्री. ना.) माड, पोफळी, इ० कांची झावळी. २(ग्रं०)(न. ना.) पाडलेणा.

साक (स्त्री. ना.) साख.

सांकड (वि०) संकुचित जें स्थळ, गृह, पात्र इ० तो. २ (ग्रं०) (स्त्री. ना.) संकोच, अडचण. ३ (वि०) कठिण. ४ संकोचित, अल्प. [२ संकोचित होणें.

सांकडणें (धा. ना.) (ग्रं०) अवघडणें.

सांकडी (स्त्री. ना.) (ग्रं०) सांकड.

सांकडें (न. ना.) (ग्रं०) संकट.

साकल्य (सं. न. ना.) सकलपणा, कोणी सकल याअर्थीं म्हणतात.

सांकळ (स्त्री. ना.) साखळ. २ (ग्रं०) बेडी. [२ (ग्रं०) अडकविणें.

सांकळणें (धा. ना.) साखळणें.

सांकळी (स्त्री. ना.) सांकळ.

साकू (पु. ना.) नदी इ० कांतून पार जाण्याकरितां आडवीं लाकडें, टाहाळ इ० टाकून जो सरासरी पूल करितात तो.

साकें (वि०) (ग्रं०) डाकलग.

साकें (अव्य०) (ग्रं०) सारखें असें.

सांकेतिक (सं. वि०) ज्या ज्या अर्थाच्या ज्या ज्या प्रसिद्ध संज्ञा आहेत त्या सोडून लाघवार्थ त्या त्या अर्थाच्या नव्याच केल्या असतात ज्या शब्द, रेषा इ०रूप संज्ञा तत्प्रधान जें भाषण लेख इ० तो.

साख (स्त्री. ना.) पत. २ सचोटी.

साखरझोंप (स्त्री. ना.) पहाटेच्या वेळेस थोडीबहुत निद्रा घेतात तीस म्हणतात.

साखरपुडा (पु. ना.) वधुवरांच्या विवाहनिश्चय दिवशीं वधूच्या हातीं साखरेचा पुडा देऊन सर्वांस पान सुपारी वांटणें इ०रूप जो समारंभ करितात तो.

सांखळ (स्त्री. पु. ना.) लोहादिकां-ची मोठी जी सांखळी ती. तो.

सांखळणें (धा. ना.) नासणें इ० विकृतीनें प्रायः रक्तानें घट्ट होणें. २ वाघ इ०कास सांखळीनें संबद्ध करणें. ३ मनुष्यादिकांनीं स्वतंत्रपणें वागूं नये ह्मणून विवक्षित उद्योगीं गुंतविणें.

सांखळदंड, साखळदंड (पु. ना.) धातुमय अनेक कड्या एकत्र गुंतवून दंडाकार जी मोठी जाडी सांखळी करितात तो.

सांखळी, साखळी (स्त्री. ना.) धातुमय अनेक कड्या एकांतएक गुंतवून भूषणार्थ किं० बंधनार्थ रज्ज्वाकार पदार्थ करितात ती. [विद्या.

सांखी (वि०) (ग्रं०) सांख्य शास्त्र

सांख्य (सं. न. ना.) एक सहा शास्त्रांतील शास्त्र आहे. २ (वि०) त्याचें अध्ययन करणारा किं० त्या मतानें वागणारा तो.

सांग (स्त्री. ना.) भाल्यासारिखा शस्त्रविशेष आहे. २ (सं. वि०) वाग्दान पुण्याहवाचनादि जीं जीं त्याचीं अंगें तीं तीं करून पूर्ण जो विवाह, यज्ञ, वेद, ब्राह्मणभोजन इ० तो.

सांगड (पु. ना.) दोन होड्या इ० परस्पर संबद्ध करून जें जलयान करितात तो. २ (स्त्री. ना.) पोहरे भोंपळे, नारळ, इ०कांच्या अनेक व्यक्ति विवक्षित कारणास्तव रज्ज्वादिकांनें एकत्र संबद्ध केल्या असतां जी रचना होते ती.

सांगडें (वि०) (ग्रं०) अवयव. २ (अव्य०) योगें. ३ सारिखें.

सांगणी (स्त्री. ना.) कोणेक गोष्टीविषयीं तूं असें कर, असें बोल, असें करूं नको इ० रूप जी कोणेकाप्रत कोणेकाची उक्ति असते ती. २ पुराण, गोष्ट इ० सांगण्याचा प्रकार ती.

सांगणें (धा. ना.) कोणेकास कोणेकानें कांहींएक गोष्ट भाषणादिद्वारा कळे असें करणें. २ कोणेकास रोजगार, मामलत, चाकरी काम इ० करण्याविषयीं अर्पिणें. ३ अध्ययन, ग्रंथ, विद्या इ० कोणेकास शिकविणें, कोणेकास जेवायास सांगणें ह्म० भोजनार्थ आपले घरीं बोलावणें.

सांगणेंवांगणी (स्त्री. ना.) (ग्रं०) सांगासांगी.

सांगता (सं. स्त्री. ना.) विवाहादि कर्मांचा जो सांगपणा ती. २ कितीएक कर्मांचीं सांगतासंपादक जीं ब्राह्मणभोजन, दक्षिणा, हीं दोन कर्में त्यांस ह्मणतात.

सागर (सं. पु. ना.) समुद्र.

सागळा, ळ्या (पु. ना.) (ग्रं०) पाण्याची झारी हातांत धरणारा जो सेवकादि तो.

सांगाडा (पु. ना.) शरीर, गाडा, पलंग, नौका, छत्री, इ०कांचे आकारास मुख्यत्वेंकरून आधारभूत जीं हाडें, लांकडें इ०कांनें झालेली रचना असते ती, ज्याचे आश्रयानें चर्मादि वेष्टन, तृणादि आच्छादन,

मृत्तिकादि लेप इ० होऊन तो पदार्थ सांग होतो.

सांगावांगी (स्त्री. ना.) सांगासांगी.

सांगासांगी (स्त्री. ना.) कोणेक गोष्टीविषयीं प्रत्यक्षादि प्रमाण नसतां एकानें दुसऱ्यापाशीं सांगावें, त्याणें तिसऱ्यापाशीं सांगावें, अशी जी सांगण्याची परंपरा चालत्ये तद्रूपच जें त्या गोष्टीविषयीं प्रमाण तें.

सांगी (स्त्री. ना.)(ग्रं०) संगत, सोबत.

सांगोपांग (वि०) अंगानीं आणि उपांगानीं पूर्णता पावला जो विवाहयज्ञादि तो.

सांगोवांगी (स्त्री. ना.) सांगोसांगी.

सांगोसांगी (स्त्री. ना.) सांगासांगी.

साग्या (पु. ना.) चोरी, चाहाडी, शिंदळकी, वध इ० गुप्त निंद्य कर्मांविषयीं जो ज्याचा सोबती तो त्याचा कि० ते परस्पर.

सांघडें (न. ना.) (ग्रं०) साहखडें.

सांघाती (पु. ना.) (ग्रं०) सोबती.

साच (सं. सत्य) (वि०) (ग्रं०) वास्तविक.

सांचणें (धा. ना.) कोणेक अधिकरणीं उदक, धान्य, द्रव्य, इ० पदार्थानें थोडा थोडा येऊन पडत गेल्यामुळें संग्रहरूपता पावणें. २ जमून राहणें. [पाणी तें.

सांचवणी (न. ना.) सांचलेलें जें

सांचा (पु. ना.) सुलभतेनें तत्तदाकारक पदार्थ अनेक सिद्ध व्हावे एतदर्थ इच्छित लांबी, रुंदी इ०रूप आकार मनांत येऊन तसा सिद्ध केला असतो जो कागद, फळी, यंत्रादि पदार्थ तो. २ एकसारख्या लांबी रुंदीचीं कापून केलेली जी कागद, केळीचीं पानें इ०कांची जुडी तो.

साचा (वि०)(ग्रं०) साच.

साचार (अव्य०)(ग्रं०) निश्चयेंकरून.

साचें (वि०) (ग्रं०) साच.

साचोकार (अव्य०)(ग्रं०) खरोखरी.

साचोळ (पु. ना.) (ग्रं०) चाहूल.

साज (फा० पु. ना.) पखवाज. २ संचप्रथमार्थी. ३ (ग्रं०) रास. ४ सामान. [काळ.

सांज (सं. संध्या) (स्त्री. ना.) संध्या-

साजणी (संबोधन) (ग्रं०) हे सज्जनाविषयें.

साजणें (धा. ना.) कोणेकास कांहींएक गोष्ट शोभणें. २ समावणें प्रथमार्थावांचून. ३ (ग्रं०) बोलणें. ४ (न.) मैत्री.

साजरा (वि०) शोभिवंत. २ गोजिरवाणा. दिवस, सण इ० साजरा करणें इ० त्या त्या दिवसादिकांचेठायीं जें जें उत्साहादि करायाचें तें तें यथाकथंचित् केलेंसें करून तो दिवस, सण, सुशोभित करणें.

सांजवात (स्त्री. ना.) देवालयादिकांच्याठायीं सायंकाळीं शास्त्रापुरता दिवा लावलासा व्हावा म्हणून तेलांत वात भिजवून सरासरी लावितात जो दिवा तो. [ध्याकाळ.

सांजसकाळ (अव्य०) सकाळ सं-

साजा (वि०)(ग्रं०) साजूक, नवा.

सांजावणें (धा.ना.) संध्याकाळ होणें.

साजिंदा (फा० पु. ना.) वेश्येचे मागें राहून नृत्यादि समयीं गाणें, पखवाज, सारंगी इ० वाजविणें, इ०कें करून साह्य करितो तो.

साजिरा (वि०)(पं०) साजरा.

साजुकूळ (वि०)(पं०) शांत.

साजूक (वि०) ज्याचे उत्पत्तीस बहुत काळ झाला नाहीं अतएव ज्याची रुचि बिघडली नाहीं असा जो भक्ष्यभोज्यादि पदार्थ तो किं० मळस्थानापासून आणून ज्यास बहुतकाळ झाला नाहीं असा जो उदक, पुष्प इ० तो. २ (पं०) (न. ना.) निर्गुण सायुज्यता तें. [भायमान.

साजें (वि०)(पं०) टवटवीत. २ शो-

साट (पु. ना.) माळा, गलबत, इ०-कावर बसणें, निजणें इ०कांसाठीं आस्तरणादि उपयोगी बांबू, कांबी, इ० अनेक एकत्र संबद्ध करून अंथरीसारिखा पदार्थ करितात तो. २ (न. ना.) फणसपोळी किं० आंब्याचे रसाची पोळी तें. ३(पं०)भय.

सांटा, साटा ( पु. ना. ) साठा. २शितोडा.३सोगाडा.देशावर प्रसिद्ध.

साटें ( न. ना. ) कोणी विकायास आणलेल्या सर्व मालाचा एकदम जो सवदा तें.

साटेंलोटें ( न. ना. ) आपले घरची मुलगी दुसऱ्याचे घरीं द्यावी त्याचे घरची आपले घरीं आणावी असा जो विवाह करण्याचा प्रकार तें. मोबदला या अर्थी कोणी प्रयोग करितात.

साटोप (वि०) संसारादि व्यवहाराची आकलनशक्ति ज्याचे अंगीं आहे असा जो मनुष्य तो. २ (पु. ना.) (पं०) अतिशयित नेट. ३ (वि०) अहंकारयुक्त.

साटोवा (पु. ना.)(पं०) सांठवण.

साटोवाटी (स्त्री.ना.)(पं०) मोबदला.

सांठवणी (न. ना.) आंत जिवंत झरा नसतां पर्जन्यादिसंबंधी सांठून राहिलें जें पाणी तें.

सांठवणें (धा. ना.) धान्यादि कितीएक पदार्थ कोठार इ०कांचे ठायीं किं० विवक्षित पात्रादिकांत भरून ठेवणें. २ कोणेक पदार्थ सांचविणें.

सांठा (पु. ना.) संग्रह.

सांड ( स्त्री. ना. ) उंटाचे जातीची स्त्री ती. २ सांडवा. ३ जो जो पदार्थ हातीं घ्यावा तो तो सांडावा अशी जी कोणेकास अवस्था प्राप्त होते ती. ४ निसरसांड. ५ सोड. ६ उपेक्षा.

सांडणीस्वार (पु. ना.) सांडणीवर बसून डाक, बातमी, इ० पोहोंचविण्याचें कसब करितो तो.

सांडणें (धा. ना.) पात्रादिकांत ठेवलेला जल, धान्य, इ० पदार्थ त्याणें उलंडणें इ० कारणानें बाहेर पडणें. २ कोणेकानें कोणेक पदार्थ विस्मरणादिकानें कोठें पाडल्यामुळें किं० टाकल्यामुळें तो आपला आपणास हीं सांपडूं नये असा करणें. ३ स्वसंबंधाकांत जो संपत्ति, संसारादि पदार्थ, अभिमान, लज्जा, इ० त्यांत त्यांतें त्यागणें.

साडलवंड (स्त्री. ना.) जलादि प-दार्थ सांडण्याला. ंडण्याचा व्यापार तो.

सांडवा (पु. ना.) धरण, बांध, इ०-कानीं तुंबविलें जें पाणी त्याणें विव-क्षानुरूपच राहावें, अधिकानें निघून जावें इ० अर्थ त्या धरण इ०कास राखितात जी द्वारें तीं प्रत्येकीं.

सांडासांड (स्त्री. ना.) हें सांड, तें सांड, असा जो व्यापार तो.

सांडीपडणें (धा. ना.)(ग्रं०) हरणें. २ हरविणें.

सांडीमांडी (स्त्री. ना.) (ग्रं०) सांड-णें मांडणें असा जो व्यापार तो.

साडेभावार्थी (वि०) भावलवाड अ-सून बाहेर भावार्थ दाखविण्याचा स्वभाव ज्याचा त्यास प्रसंगविशेषी ह्मणतात. [२ त्याग.

साडोवा (पु. ना.) (ग्रं०) कुरवंडी.

साणा (पु. ना.) निसणा. २ शेत गुऱ्हाळ, इ०कांत सर्कनी इ० कोणी काहीं चोरून काढून घेईल ह्मणून आपल्या पक्षाचा जो कोणी रक्षणार्थ बसवितात तो.

साणें (न. ना.) गवाक्ष, धारें.

सांत (स्त्री. ना.) धाम. [ततपणा.

सातत्य, सांतत्य (सं. न. ना.) स-

सातरिया (पु. ना. (ग्रं०) सात फळें इ०कांचा समुदाय.

सातरें (न. ना.) सात अहोरात्रें प-र्यंत जी पर्जन्यादिकाची स्थिति ते. २ साहा दिवस मध्यें जाऊन सातवे दिवशीं हींव यावें असा जो हीं-व येण्याचा प्रकार तें.

सातलणें (धा. ना.) (ग्रं०) संचणें.

सांतवण (न. ना.) (ग्रं०) सांठवण, संग्रह.

सातळणें (धा. ना.) हरभरे इ० दाणे किं० मिरच्या इ० काहीं पदार्थ अग्नीवर ठेवलेलें जें कढई इ० पात्र त्यांत थोडेसें तेल अ० तूप घालून त्यांत भाजणें.

सांत्वन (सं. न. ना.) शोकक्रोधा-दि कारणानें क्षुब्ध झालेला जो कोणी त्यास गोडीगुलाबीच्या गोष्टी सांगणें इ० द्वारा सामोपचारानें प्रकृतीवर आणण्याचा जो व्यापार तें आणि तेणेंकरून होते जी त्याची स्वस्थता तें.

सात्विक (सं. वि०) सत्वगुणानें युक्त जो मनुष्य इ० किं० गोधूमादि पदार्थ किं० चांगला व्यापार इ० तो.

साथ (स्त्री. ना.) सोबत.

साथें (न. ना.) (ग्रं०) मार्ग.

साथेंफळ (न. ना.) (ग्रं०) सातन-रूप फळ.

साद (पु. ना.) शब्द. २ (ग्रं०) स्मरण. ३ इच्छा. ४ हाक.

सादट (वि०)(ग्रं०)निखट. २मळका.

सादर (सं. वि०) आदरविशिष्ट जो तो. काहींएक सादर करणें ह्म० विवक्षित स्थळीं पाठविणें, परंतु लि-हिणाराकडे मोठेपणा असतो प्रयोग.

सादिलवार (अर० वि०) गांवाकडे वार्षिक नेमणुकेशिवाय फकीर, गोसावी, बैरागी, मेजवानी, इ० संबंधी जो जास्ती खर्च होतो त्याचें आणि त्याबद्दल करितात जी गांवख-

र पडीं निर्वे तत्संबंधी जमा लिहिणें इ०कार्वें वि०. २ (पु. ना.) मामलेदार इ० अंमिकाऱ्यांस पगाराशिवाय कागद, शाई इ० खर्चाबद्दल जी जास्त नेमणूक असते ते.

सादुकणें (धा. ना.) (ग्रं०) पेटणें.

सादृश्य (सं. न. ना.) सदृशपणा, सारखेपणा.

साद्यंत (वि०)आद्यंतानें सहित असा जो अवघा ग्रंथ, वर्तमान इ० तो.

साद्र (सं. वि०) निबिड.

साधक (सं. वि०) मोक्षादि कार्य साधण्याविषयीं प्रवृत्त तो. २ इच्छित त्या त्या कार्याचे सिद्धीसाठीं उपयुक्त जो लेख, वचन, पदार्थ इ० तो.

साधणूक (स्त्री. ना.) मंत्रयंत्रादिकेंकरून काहींएक कार्य साधण्याचा जो व्यापार तो. २ कोणेक कार्य सिद्ध करण्याविषयीं करून ठेविलें असतें जें कला इ० रूप संधान तो.

साधणें (धा. ना.) त्याचे त्याचे उपयोगी व्यापारानीं तें तें कार्य सिद्ध होई असें करणें. २ तशा व्यापारानें तें कार्य सिद्ध होणें.

सांधणें (धा. ना.) वस्त्र, कागद, पत्रा, सूत्र, काउ, इ० पदार्थाचे फाटणें, तुटणें, मोडणें, इ० कारणानें भिन्न झाले जे विभाग ते, किं० मळचेच पृथक् जे विभाग ते, तो तो वस्त्रादि पदार्थ सलग एकरूप दिसावाजोगे परस्पर एकास एक जडणें.

साधन (सं. न. ना.) काहींएक कार्य इ० साधण्याचा जो व्यापार तें आणि तदुपयुक्त जीं खत, पत्र, कुऱ्हाड, काठी इ० करणभूत पदार्थ ते प्रत्येकीं. २ (ग्रं०) अनुष्ठान.

साधनी (स्त्री. ना.) गवंडी, सुतार, इ०कार्चे उंच, नीच, वांकडें तिकडें, इ० पाहायाचें एक औत आहे ती. २ (वि०) कोणेक कार्य साधण्याविषयीं अनेक युक्तिप्रयुक्तिद्वारा झटणारा जो मनुष्य तो. ३ काहींएक कार्याचे साधनास उपयोगी पडणाजोगा जो मतलबी कागद, पत्र, इ० तो. ४ मुख्यानेंकरून साधनोपयोगी जें खत, पत्र, इ० त्यास प्रसंगानेंकरून म्हणतात.

साधर्म्य (सं. न. ना.) सादृश्य.

साधा (फा० वि०) नकशी, जर, रेशमी काठ, छानछोकपणा, आकड, अन्योक्ति, वक्रता, इ० रूप जे त्या त्या पदार्थास विशेष शोभादि देणारे गुणादि ते ज्याचे अंगीं नाहींत असा जो खोर, पागोटें, धोत्रजोडा, मनुष्य, भाषण, इ० तो.

सांधा (पु. ना.) सांधलेल्या अनेक पदार्थांचा जो संधिप्रदेश तो किं० अवयवीरूप जो पदार्थ त्यास अवयवांनेंकरून सांधला जो सजातीय तुकडा तो.

साधारण (सं. वि०) विवक्षित जे अनेक अर्थ त्यांजवर ज्याचा समान संबंध असतो असा जो कोणेक धर्मादि तो. २ केवळ उत्कृष्ट नव्हे, केवळ निकृष्ट नव्हे, असा मध्यम प्रतीचा जो अर्थ तो.

साधितणें (धा. ना.)(ग्रं०) साधणें.

साधु (सं. पु. ना.) शमादि गुणेंक-रून युक्त आणि कामक्रोधादि दो-षानें रहित असा असून परोपकार करावा आणि ईश्वराचे ठायीं निष्ठा असावी असा जो तो. २ (वि०) विवक्षित दोषरहित असून विवक्षित गुणानीं युक्त असा जो वाक्य, भाष-ण, ग्रंथ, कर्म, इ० तो.

साध्वस (सं. न. ना.) भय. २ (ग्रं० पु. ना.) उद्देश.

साध्वी (सं.स्त्री.ना.) पतिव्रता स्त्री ती.

सान (वि०)(ग्रं०) लहान.

सानणें (धा. ना.)(ग्रं०) लहानावणें. २ क्वचित् विसारणें.

साना (वि०) (ग्रं०) लहान, ठेंगणा. २ संपूर्ण. ३ उपमेस न येणारा.

सानीव (स्त्री. ना.) (ग्रं०) लहानपण.

सानुला (वि०)(ग्रं०) लहानगा, चि-मणासा.

सापट, सापट (स्त्री. ना.) फट.

सापडणें (धा.ना.) अर्थाचें आकल-न करणारें जें इंद्रियादिक त्याचें तें तो अर्थ आकलित करायास साधन-भूत जें वृत्यादिक त्याचेठायीं कोणेक अर्थ पडणें. २ हरवलेला पदार्थ गवसणें.

सापत्न (सं. वि०) सावत्र.

सांपसारणी (स्त्री. ना.) प्रायः भाषण करते समयीं पसरलेली जी गोष्ट ती सुधारण्याचा व्यापार ती.

सापळा (पु. ना.) घूस, वाघ, उंदीर, इ० प्राणी धरणें इ० कारणाकरितां जो यंत्रविशेष करितात तो. २ अ-स्थिपंजरास म्हणतात.

सापें (अव्य०)(ग्रं०) सांप्रत. २ आ-ज. ३ आतां. ४ अलीकडे.

सापेक्ष (सं. वि०) ज्याविषयीं ज्यास अपेक्षा आहे तो त्याविषयीं प्रायः स-मासीं प्रयोग.

सांप्रत (अव्य०) वर्तमान काळीं.

साफ (अर० वि०) वांकडेतिकडे-पणा, खरखरीतपणा, उखीरवाखीर-पणा, इ० दोष ज्याचे अंगीं नाहींत असा नीटनेटकेपणा, गुळगुळीतप-णा, इ० गुणानीं विशिष्ट जो काष्ठ, पाषाण, इ० पदार्थ तो. २ ज्यामध्यें गूढार्थ, वक्रोक्ति, संदेहविषयता, इ० दोष नाहींत असें सरळ जें भा-षण, लेख, इ० तो. ३ रोगांश, मलांश, ज्यापासून निःशेष गेले असा जो शरीर, पात्र, इ० तो. ४ (अव्य०) लाभलोभ, भीड, मुरवत, इ० न धरितां निखालसपणें बोलणें, उत्तर करणें, इ०कांचें वि०. ५ पुरतेपणीं जळणें, भिजणें, दिसणें, इ०कांचें वि०.

साफी (अर० स्त्री. ना.) सफाई. २ भांगेचें पाणी गाळायाचें फडकें ती.

साब (सं. पु. ना.) महादेव. २ भो-ळा जो मनुष्य त्यास म्हणतात.

साबडा (वि०) साभडा.

साबरें (न. ना.) (ग्रं०) पाणी.

साबळा (सं. शर्वला) (स्त्री. ना.) (ग्रं०) बर्ची म्हणून जें हत्यार ती. २ भोंक.

साबळें (न. ना.) (ग्रं०) भाला इ०

मृत्तिकादि लेप इ० होऊन तो पदार्थ सांग होतो.

सांगावांगी (स्त्री. ना.) सांगासांगी.

सांगासांगी (स्त्री. ना.) कोणेक गोष्टीविषयीं प्रत्यक्षादि प्रमाण नसतां एकानें दुसऱ्यापाशीं सांगावें, त्याणें तिसऱ्यापाशीं सांगावें, अशी जी सांगण्याची परंपरा चालत्ये तद्रूपच जें त्या गोष्टीविषयीं प्रमाण तें.

सांगी (स्त्री. ना.)(ग्रं०) संगत, सोबत.

सांगोपांग (वि०) अंगानीं आणि उपांगानीं पूर्णता पावला जो विवाहयज्ञादि तो.

सांगोवांगी (स्त्री. ना.) सांगोसांगी.

सांगोसांगी (स्त्री. ना.) सांगासांगी.

साग्या (पु. ना.) चोरी, चाहाडी, शिंदळकी, वध इ० गुप्त निंद्य कर्माविषयीं जो ज्याचा सोबती तो त्याचा कि० ते परस्पर.

साघडें (न. ना.) (ग्रं०) साइखडें.

साघाती (पु. ना.) (ग्रं०) सोबती.

साच (सं. सत्य) (वि०) (ग्रं०) वास्तविक.

सांचणें (धा. ना.) कोणेक ओंभिकरणीं उदक, धान्य, द्रव्य, इ० पदार्थानें थोडा थोडा येऊन पडत गेल्यामुळें संग्रहरूपता पावणें. २ जमून राहणें. [पाणी तें.

सांचवणी (न. ना.) सांचलेलें जें

सांचा (पु. ना.) सुलभतेनें तत्तदाकारक पदार्थ अनेक सिद्ध व्हावे एतदर्थ इच्छित लांबी, रुंदी इ०रूप आकार मनांत घेऊन तसा सिद्ध केला असतो जो कागद, फळी, यंत्रादि पदार्थ तो. २ एकसारख्या लांबी रुंदीची कापून केलेली जी कागद, केळीचीं पानें इ०कांची जुळी ती.

साचा (वि०)(ग्रं०) साच.

साचार (अव्य०)(ग्रं०) निश्चयेंकरून.

साचें (वि०) (ग्रं०) साच.

साचोकार (अव्य०)(ग्रं०) खरोखरी.

साचोळ (पु. ना.) (ग्रं०) चाहूल.

साज (फा० पु. ना.) पखवाज. २ संचप्रथमार्थी. ३ (ग्रं०) रास. ४ सामान. [काळ.

सांज (सं. संध्या) (स्त्री. ना.) संध्या-

साजणी (संबोधन) (ग्रं०) हे सज्जनास्त्रिये.

साजणें (धा. ना.) कोणेकास कांहींएक गोष्ट शोभणें. २ समावणें प्रथमार्थावांचून. ३ (ग्रं०) बोलणें. ४ (न.) मैत्री.

साजरा (वि०) शोभिवंत. २ गोजिरवाणा. दिवस, सण इ०साजरा करणें म्ह० त्या त्या दिवसादिकांचेठायीं जें जें उत्साहादि करायाचें तें तें यथाकथंचित् केलेंसें करून तो दिवस, सण, सुशोभित करणें.

सांजवात (स्त्री. ना.) देवालयादिकांच्याठायीं सायंकाळीं शास्त्रापुरता दिवा लावलासा व्हावा ह्मणून तेलांत वात भिजवून सदासरी लावितात जो दिवा तो. [ध्याकाळ.

सांजसकाळ (अव्य०) सकाळ सं-

साजा (वि०)(ग्रं०) साजूक, नवा.

सांजावणें (धा.ना.) संध्याकाळ होणें.

सायान्ह (सं. पु. ना.) सायंकाळ.
सायाळ (पु. ना.) एक पक्षी आहे.
सायुज्य (सं. न. ना.) चतुर्विध मुक्तींतील एक मुक्ति आहे; जिमध्यें ईश्वराशीं आणि जीवाशीं अभेद होतो.
सायुज्यता (स्त्री. ना.) सायुज्य.
सार (सं. पु. न. ना.) पदार्थमात्रांतील तत्वांश तें. २ चिंच, अमसोल, इ० जे आंबट पदार्थ ते पाण्यांत कोळून त्यांत मीठ, हिंग इ० घालून जें कालवण करितात तें.
सारंग (सं. पु. ना.) एक राग आहे. २ (न.) शार्ङ्ग नामक विष्णूचें धनुष्य तें. ३ (ग्रं०) भ्रमर.
सारंगपाट (पु. ना.) क्रीडासाधनभूत जो सोंगट्या, फांसे, पट इ० खेळ तो.
सारंगा (वि०) केवळ तांबडा नव्हे, आंत कांहीं काळसरपणा अशा रंगविशेषानें विशिष्ट जो अश्व तो.
सारजा (स्त्री. ना.) (ग्रं०) शारदा.
सारणें (धा. ना.) सरकें असें कि० कोणेक पदार्थ व्ययादिद्वारा निःशेष होई असें करणें. २ (ग्रं०) कांहींएक व्यापार करून संपविणें.
सारथि (सं. पु. ना.) रथाच्या अग्रभागीं बसून घोड्यांचें नियमन करून पाहिजे तसा रथ चालवावा, त्याचें रक्षण करावें, अशा कामावर नियुक्त तो. २ कोणेकाचें कांहीं कार्याविषयीं कोणी साहाय्य करितो तो त्याचा.
सारमेय (सं. पु. ना.)(ग्रं०) कुतरा.
सारवण (न. ना.) भूमि इ० सारवायाकरितां तयार करितात जो शेणखळा इ० तें व त्याणें केला जो भूमि इ०कास संस्कार तें व तो संस्कार करण्याचा व्यापार तें.
सारवणें (धा. ना.) भूमि इ० सारवणसंस्कारानें संस्कृत होई असें करणें.
सारस (सं. पु. ना.) एक पक्षी आहे. २ (न. ना.) कमल.
सारा (वि०) अवघा. २ (पु. ना.) शेत, वाडी, इ० संबंधीं जें सरकार देय द्यावें लागतें तो. ३ नेत्रावर येतो जो तवंग तो.
सारांश (सं. पु. ना.) पंचाईत, वाद, ग्रंथ, भाषण, इ० विषयांतील निवडून काढिला जो सारभूत अंश तो. २ तो ज्या कागदावर लिहितात तो कागद. ३ सारप्रथमार्थी.
सारासार (न. ना.) कांहीं सारभूत व कांहीं असारभूत असे कोणेक गोष्टींतील उभयविध जे अंश तें. २ (स्त्री. ना.) दुसऱ्याचा समावेश होण्यासाठीं अलीकडलें पलीकडे सारावें, तिकडलें इकडे सारावें, असा जो व्यापार तो.
सारासारविचार (सं. पु. ना.) कोणेक गोष्टींतील सारभूत अर्थ किती व असारभूत अर्थ किती त्याविषयींचा जो विचार तो.
सारिका (सं. स्त्री. ना.) मैना ह्मणून जो पक्षी तो. २ सोंगटी.
सारिपाट (पु. ना.)(ग्रं०) सारंगपाट.
सारी (स्त्री. ना.)(ग्रं०) सोंगटी, सोंकटी.
सारूप्य (सं. न. ना.) सरूपता.

**सार्थक** (न. ना.) सार्थक्य. काहींएक पदार्थ सार्थकीं लागणें म्ह० विवक्षानुरूप यथायोग्य विनियोग पावणें.
**सार्वजनीन** ( सं. वि० ) सर्वजनसंबंधी जो आचार इ० तो.
**सार्वत्रिक** (सं. वि०) सर्वत्र विद्यमान किं० प्रसिद्ध इ० तो.
**सार्वभौम** (सं. पु. ना.)सकल पृथ्वीचा राजा तो.
**साल** ( स्त्री. न. ना. ) वृक्ष, लता, फल, धान्य, इ० पदार्थांवर जो त्वगंश असतो तो. तें. २ मनुष्यादिकांचे अंगाचें घर्षणादिकानें जातें जें कातडें तें. पाठीचें साल जाणें म्ह० काहींएक व्यवहारीं चट्टा बसणें. ३ ( न. ना. ) कोंकंबसाल. ४ (फा० न. ना.) वर्ष. ५( पु.ना.) एक वृक्ष आहे.
**सालंकृतकन्यादान** ( सं. न. ना. ) विवाहविधीनें अलंकारसहित वरास कन्येचे दान तें.
**सालगुदस्त** (फा० न. ना.) चालत्या वर्षाचे पाठीमागील जें साल तें.
**सालगुदस्तां** (अव्य०)गतवर्षी.
**सालदरसाल** (अव्य०) प्रतिवर्षी.
**सालपट** ( न. ना. ) मनुष्य धान्य इ० संबंधी साल तें.
**सालमजकूर** (फा०न.ना.)चालूवर्ष तें.
**सालस** (अर० वि०) जो लबाड, लचाड,खोडकर,नव्हे असा जो सज्जन मनुष्य, पशु, इ० तो.
**सालाबाद** (अव्य०) प्रतिवर्षी.
**सालीना** (फा०अव्य०) सर्वसाल मिळून अशा प्रकारें प्रतिवर्षी. [र्षीवर्ष.
**सालोसाल** (अव्य०) प्रतिवर्षी. २ व-
**साव** (सं. साधु) (पु.ना.)सावकार. २ चोराचा प्रतिपक्षी तो.
**सावकार** ( पु. ना.) ज्यापासून लोक द्रव्यादि कर्जी घेतात असा जो धनवान् तो. २ जो ज्यास कर्जी पैका देतो तो त्याचा. ३ सामान्य उदीम व्यापार करणारा जो कोणी त्यासही म्हणतात.
**सावकारा** (पु.ना.) कोणेक ग्रामादिकांचे ठायीं सावकारांचा जो समुदाय तो. २ मोठी जी सावकारी तो.
**सावकारी** ( स्त्री. ना. ) सावकाराचा जो दुसऱ्यास कर्ज देणें इ० व्यापार तो. २ ( वि० ) सावकारसंबंधी जें द्रव्य, खातें, चाल, शिरस्ता, इ० तो.
**सावकाश** (सं. अव्य०) कोणेक कार्याविषयीं त्वरा न करितां स्वस्थपणें किं० विवक्षित कालांतरीं जाणें, येणें, भोजन करणें इ० कांचें वि०.
**सावचित, चित्त** ( वि० ) ( ग्रं० ) सावधानपणें जो स्थित तो.
**सावचोर** (पु.ना.) (ग्रं०) सवचोर. २ वाटावा साव आणि असावा चोर असा जो मनुष्य तो.
**सावज** (सं. अप. न. ना.) श्वापद.
**सावजी** (पु. ना.) (ग्रं०) सावकार.
**सावडणें** (धा. ना.) इकडे एक, तिकडे एक अशा प्रकारें चहूंकडे पडलेले किं० पसरून पडलेले जे अर्थ ते जमा करणें. [यार्थी. २ सावडणें.
**साँवडणें** (धा. ना.) सावरणेंतृती-

सावध (सं. वि०) मूर्च्छा, कैफ, निद्रा, इ० कारणानें देहभान ज्याचें गेलें नाहीं असा तो. २ दक्ष. ३ दारिद्र्य जाऊन ऊर्जित दशापन्न जो त्यास म्हणतात.

सावधान (सं. वि०) अवधानानें सहित तो. २ (न. ना.) लग्न आणि मुंज लावण्यावेळेस मंगलाष्टक म्हणून शेवटीं या शब्दाचा प्रयोग करितात त्याचा सावध असा अभिप्राय. ३ प्रसंगविशेषीं विवाहसंस्कारास म्हणतात.

सावन (सं. वि०) तीस दिवसांचा एक महिना या मानानें जो वर्ष, मास, दिवस, इ० काळ तो.

सावयव (सं. वि०) अवयवविशिष्ट तो

साँवरणें, सावरणें (धा. ना.) इतस्ततः लोंबणारा किं० पडणारा असा जो वस्त्रकाष्ठादि कांहींएक पदार्थ त्यातें आवरून धरणें. २क्षीणावस्थापन्न जें शरीर किं० शरीरीं त्याणें विवक्षित शारिरशक्तीनें अ० द्रव्यशक्तीनें युक्त होणें. ३ पसरलेली जो कांहींएक गोष्ट किं० व्यापार इ० त्यातें युक्तिप्रयुक्तीनें संभाळणें.

सावली (स्त्री. ना.) मनुष्यवृक्षादिकांची जी छाया ती. २ (ग्रं०) प्रतिबिंबासही म्हणतात.

सावर (वि०) (ग्रं०) प्रशस्त.

सावसावकारा,कारी (पु. स्त्री. ना.) सावकार, सावकारी इ० तो.

सावळगोंदा (वि०) (ग्रं०) मलिन, घाणेरा. २ कानकोंडा. ३ अनाचारयुक्त.

सावळा, साँवळा (सं. श्यामल) (वि०) केवळ गोरा नव्हे आणि केवळ काळाही नव्हे असा जो मनुष्यवर्ण तो, व त्या वर्णानें विशिष्ट जो मनुष्य तो. २ केवळ काळा नव्हे, तांबडा नव्हे, असा जो पशु इ० कांचा रंग व तद्वर्णविशिष्ट जो गाय, बैल, वासरूं तो.

सावाइणें (धा. ना.) (ग्रं०) सांगणें. २ पुष्ट होणें. [करतो तो.

सावाय (पु. ना.) (ग्रं०) साहाय्य

सावाया (पु. ना.) (ग्रं०) प्रकाश.

सावायें (न. ना.) (ग्रं०) सावाय.

सावालणें (धा.ना.)(ग्रं०)सांग करणें.

सावाव (वि०) (ग्रं०) अधिक. २ (पु.) अधिकता. ३ प्रबळता. ४ प्रदीप्तता. ५ साहाय्य. ६ साह्य करणारा. [करणें.

सावावणें (धा. ना.) (ग्रं०) साहाय्य

साविया (अव्य०) (ग्रं०) सहजीं.

सावेव (वि०)(ग्रं०) सावयव. २सांग. ३ (पु. ना.) आकार.

साशंक (सं. वि०) आशंकेनें युक्त.

साष्टांग (सं. वि०) अष्टांगानीं सहित जो प्रणाम, नमस्कार इ०कांचें वि०.

सासन (न. ना.) (ग्रं०) साधन.

सासितलें (न. ना.) (ग्रं०) निबिड छाया. [२ स्थिरावणें.

सासिनणें (धा. ना.) (ग्रं०) पिकणें.

सासुरवास (पु. ना.) सुनेस श्वशुरगृहीं सासूसासरा इ० करितात जो जाच तो. २ स्वतंत्रतेनें न वागण्या-

विषयीं कोणेकाचा कोणेकास जाच असतो तो.

**सासरवासी, शी** (वि०) सासुरवासानें युक्त जी सून इ० तो. २ माता पितर, सासू सासरा, धनी इ०कांचे धाकामुळें ज्यास स्वतंत्रपणें वागतां येत नाहीं असा जो कोणी तो त्याचा.

**साहजिक** (सं.वि०) सहज द्वितीयार्थी. २ (अव्य०) सहज.

**साहणें** (धा. ना.) सोसणें प्रथमार्थी.

**साहना** (स्त्री. ना.) (ग्रं०) सेना.

**साहस** (सं. न. ना.) ज्या व्यापारांत मरणसंभावना आहे असा जो युद्धांत उडी घालणें, दुसऱ्याचे घरास आग लावणें, कोणेकास जिवें मारणें इ० रूप व्यापार तें. [कर्म तें.

**साहाय्य** (सं. न. ना.) सहाय्याचें जें

**साहित्य** (सं. न. ना.) सामग्री. २ साहाय्य.

**साहित्यशास्त्र** (सं. न. ना.) काव्य नाटक इ० कांचीं अलंकार लक्षणें इ० ज्यांत सांगितलीं आहेत असें जें शास्त्र तें. [इ० तें.

**साहित्यसुहित्य** (न. ना.) साहित्य

**साहुकार** (पु. ना.) सावकार.

**साह्य** (सं. न. ना.) सहाय्यत्व.

**साळ** (सं. शाला) (स्त्री. ना.) वेतन घेऊन मुलांस लिहिणें शिकविणें किं० सुतार, लोहार, इ० कित्येक शिल्पकारांचें लोखंडी काम घडणें, लांकडी काम करणें, इ० व्यवहाराचें जें स्थळ तें आणि तो कारखाना तो. २ शाली ह्मणून जें धान्य तें. ३ सायाळ.

**साळकोजीमाळकोजी** (पु. ना.) ज्यांचें विशेषरूपेंकरून नाम घ्यावयाची विवक्षा नाहीं असे सामान्यकोटींत परिगणनीय जे मनुष्य त्यांस निर्देशें ह्मणतात.

**साळढाळ** (वि०) ज्याचे अंगीं अक्कड दाखवावी, भट भरावी, छांदसपणा करावा, इ०नाहीं, व्यवहारांत चवघांशीं मिळून चवघांचे रीतीप्रमाणें वर्तणारा असा सालस जो मनुष्य तो आणि त्याचा तसा व्यवहार, भाषण इ० तो.

**साळसूद, सूध** (स.शालाशुद्ध)(वि०) सालस जो मनुष्य इ० तो.

**साळाभोळा** (वि०) विशेष छक्केपंजे ज्याचे अंगीं नाहींत, निष्कपट असा जो मनुष्य तो, किं० तसा त्याचा व्यवहारादि तो. [साक्षी.

**साक्ष** (स्त्री ना.) साक्षा. २ (स्त्री.पु.ना.)

**साक्षा** (स्त्री. ना.) प्रतीति.

**साक्षात्** (सं. अव्य०) शब्दमात्राचे अर्थाचे स्वरूपेंकरून दोन अंश असतात; एक मुख्य, आणि ज्याणें केलें असतां आपण केलेंसें होतें म्हणून, किं० सादृश्यादि कारणांस्तव तत्स्वरूपेंकरून मानायाजोगा असा जो पुत्र, भृत्य, प्रतिमादि कोणी तत्स्थानिक तो दुसरा गौण; त्यांत केवळ त्या मुख्यांशीच जेव्हां तात्पर्य आहे तेव्हां गौणांशाचे व्यावृत्तीकरितां हें विशेषण लागतें. २ स्वतः.

**साक्षात्कार** (सं. पु. ना.) साक्षा. २ स्वरूपाकार.

साक्षी (सं. पु. ना.) कर्तृत्वादि अभिमान नसतां कोणेक व्यवहारातें प्रत्यक्ष पाहणारा जो तो त्याचा. २ (स्त्री. ना.) साक्ष. ३ (ग्रं०) जाणतें ज्ञान तें.

साक्षीदार (पु. ना.) साक्षी प्रथमार्थी.

साक्षेप (सं. पु. ना.) विद्या, पदार्थ इ०कांचा संग्रह किं० कांहींएक व्यापार अगत्य धरून करावा असा जो कोणेकाचा स्वभाव असतो तो.

सिकता (सं. स्त्री. ना.) वाळू प्रथम द्विती०.

सिकलगर, गार (पु. ना.) शिकलगार.

सिंचणें (धा. ना.) शिंपणें.

सिंचन (सं. न. ना.) शिंपण्याचा व्यापार तें.

सित (सं. वि०) शुभ्र.

सितरणें (धा. ना.) (ग्रं०) झरुविणें.

सिता (सं. स्त्री. ना.) (ग्रं०) साकर.

सिंधु (सं. पु. ना.) समुद्र. २ एक देश आहे. ३ (स्त्री. ना.) एक नदी आहे. [आहे.

सिंधुनद (सं. पु. ना.) एक महानद

सिंधुर (पु. ना.) (ग्रं०) हत्ती.

सिद्ध (सं. वि०) तयार, जेणेंकरून जें सिद्ध होतें तें तत्सिद्ध. उ० न्यायसिद्ध इ०. २ निर्णयादिकेंकरून निर्णीत जो अर्थ तो. ३ (पु. ना.) अणिमादि सिद्धि ज्यास प्राप्त झाली आहे तो. ४ (ग्रं०) जीवत्व भ्रांतीचा निरास होऊन स्वतःसिद्ध जें ब्रह्मस्वरूप तेंच जो ऐतच होऊन गेला तो. ५ एक देवजाति आहे.

सिद्धतत्व (सं. न. ना.)(ग्रं०) ब्रह्म.

सिद्धता (सं. स्त्री. ना.) सिद्धपणा.

सिद्धपुरुष (सं. पु. ना.) अणिमादि सिद्धि ज्यास प्राप्त झाली आहे तो. २ मी जीव असें जें अज्ञान तें जाऊन जो स्वतः ऐतेंच ब्रह्म झाला तो.

सिद्धसाधक (पु. ना.) कपटानें कोणेकास वंचायाकरितां हे एकमताचे आहेत असें बाहेर न समजूं देतां एकानें बावा व्हावें, दुसऱ्यानें शिष्य व्हावें व बावाची प्रौढी वर्णावी किं० एकानें कांहींएक बोलावें, दुसऱ्यानें त्यास अनुमोदन द्यावें अशा प्रकारचे संगनमताचे जे अनेक ते.

सिद्धांत (सं. पु. ना.) कोणेक गोष्टीविषयीं प्रमाणादिकेंकरून निर्णय होऊन शेवटीं ठरतो जो अर्थ तो. २ ज्योतिष ग्रंथ तो. ३ (ग्रं०) गुरुप्रतीति. ४ निश्चय.

सिद्धान्न (सं. न. ना.) शिजणें इ० संस्कारानें सिद्ध जें अन्न तें.

सिद्धि (सं. स्त्री. ना.) अणिमा, महिमा इ० ज्या आठ त्या प्रत्येकीं. २ कोणेकापाशीं जें कांहींएक गोष्टीचें अलौकिक सामर्थ्य असतें त्यास म्हणतात. ३ त्या त्या कार्यास उपयोगी जी सामग्री तिणें झाली जी त्या त्या कार्याची सिद्धता ती.

सिनसाळ (वि०) (ग्रं०) क्षणिक.

सिनसाळपण (न. ना.) (ग्रं०) उंच पदवीपासून पतन.

सिनान (न. ना.) (ग्रं०) वेगळेपण. २ (वि०) वेगळा.

सिनार, न्हार (न. ना.) वेगळेपण.
सिन्हें (न. ना.) (ग्रं०) सिनान.
सिमुर, सिमूर (वि०) (ग्रं०) मुरले-
ला. २ रुळलेला.
सियाड (पु. ना.) (ग्रं०) सिंह.
सियारी (स्त्री.ना.)(ग्रं०)शारा.२कंप.
सिराणी (स्त्री. ना.) (ग्रं०) श्रेष्ठता.
सिरियाळणें (धा. ना.) (ग्रं०) गुड-
घ्यांत मान घालून बसणें.
सिरें (न. ना.) (ग्रं०) कारण.
सिसार (पु. ना.) (ग्रं०) अर्धशिसी.
सिसाळें (न. ना.) (ग्रं०) मस्तक.
सिंह (सं. पु. ना.) सकल चतुष्पदां-
मध्यें श्रेष्ठ असा एक आरण्यक पशु
आहे. २ सजातीय समुदायामध्यें गु-
णादिकेंकरून विशेष श्रेष्ठत्व पावला
त्यास म्हणतात.
सिहाडा (पु. ना.) (ग्रं०) सिंह.
सिंहावलोकन (सं. न. ना.) लेखन-
पठनादि उत्तरोत्तर पुढें करीत जात
असतां मध्यें मध्यें जें उलटून मागें
करितात अवलोकन तें.
सिंहासन (सं. न. ना.) देव, राजा
इ० कांचें मुख्य बसायाचें आसन तें.
सीमा (सं. स्त्री. ना.) देश, ग्राम,
काल इ० कांचा जो अवधि ती.
२ आचार, व्यवहार इ० कांविषयीं
लोकशास्त्रकृत जी मर्यादा ती. ३ का-
हींएक व्यवहार, भाषण इ० कांची
जी पराकाष्ठा ती.
सु (सं. अव्य०) हा संस्कृत उपसर्ग
आहे, याचा ज्या शब्दाचे मागें
योग होतो त्याच्या उत्तमत्वाचा किं०
अतिशयाचा वाचक किं० द्योतक अर्थ
होतो, याचा प्रयोग समासीं. उ०
उत्तम जो पुत्र तो सुपुत्र, सुशब्द,
सुशील इ० अतिशय जो दूर तो
सुदूर, सुदुर्लभ इ०. [२ सेवन करणें.
सुआवणें (धा. ना.) (ग्रं०) करणें.
सुइणें (धा. ना.) (ग्रं०) घालणें.
सुइजणें (धा. ना.) सुइणें.
सुईण (स्त्री. ना.) प्रसूत होणारी जी
स्त्री तिच्या प्रसूतिसमयीं करावयाची
खटपट ती करून पुढें बाळंतपणाची
खटपट करीत असते ती.
सुएर (पु. न. ना.) वृद्धितृतीयार्थी.
सुकड (स्त्री. ना.) जून होऊन वाळ-
लेला जो चोडासकट नारळ ती.
सुकणें (धा. ना.) शुष्क होणें. २ स-
मुद्रादिकांचें पाणी ओहोटणें.
सुकरणें (धा. ना.) (ग्रं०)आनंदविणें.
सुका (वि०) आर्द्रपणा जाऊन शुष्क
झाला किं० ज्यांत आर्द्रपणा मुळींच
नाहीं असा जो पदार्थ तो.
सुकाण (अर० न. ना.) विवक्षानुरूप
गलबत फिरवावें म्हणून जो त्याचे
मागले अंगास अवयवविशेष केला
असतो तें.
सुकाणूं (न. ना.) सुकाण.
सुकादुकळ (पु. ना.) पर्जन्य न पड-
ल्यामुळें पडतो जो दुकळ तो.
सुकुमार (सं. वि०) नाजुक.
सुकृत (सं. न. ना.) ईश्वरप्रीतिजनक
जीं यज्ञादि कर्में तीं प्रत्येकीं. २ त्या-
पासून उत्पन्न जो आत्म्याच्याठायीं
धर्मविशेष राहतो तें. ३ पुण्य.

**सुख** (सं. न. ना.) अनुकूल रूपेंकरून जीवाच्याठायीं जो अनुभव घडतो तें. २ (ग्रं०) आनंद. कोणेकास सुखास पडणें, वाटणें, कि० येणें इ० चैन पडणें.

**सुखरूप** ( सं. वि० ) दुखणें बाहणें इ० दुःख किं० कांहीं संकटादि प्राप्त न होतां सुखेंकरून युक्त तो. २ (अव्य०) सुखेंनेव.

**सुखवस्तु** (वि०) वतन, वाडी, इ०रूप आश्रय नसतां तृणकाष्ठादि संबंधी सोईचें कांहींएक सुख मानून कोणेक ग्रामादि स्थळीं राहिला जो तो.

**सुखशेज** (स्त्री. ना.) (ग्रं०) निजायाचें जें चांगलें अंथरूण, पलंग, इ० त्यास म्हणतात.

**सुखसंतोषें** (अव्य०)कोणी बलात्कार, शिवी गाळ, इ० न करितां आपले संतोषेंकरून लिहून देणें, भोजन करणें, जाणें इ०काचें वि०.

**सुखावणें** (धा. ना.) कोणेकास कांहींएक विशेष सुख प्राप्त झालें असतां पूर्वीचें सुख सोडून त्या विशेष सुखाच्याठायीं आसक्त होणें.

**सुखासंतोषानें, समाधानानें** ( अव्य० ) सुखसंतोषें.

**सुखासन** (सं. न. ना.) सुखावह जें आसन तें. २ (ग्रं०) पालखी आदिकरून जें सुखानें बसायाचें यान तें.

**सुखासुखीं, सुखीं** (अव्य० ) सुखसंतोषानें.

**सुखी** ( सं. वि० ) सुख आहे ज्यास तो. २ प्रपंचापि निर्वाहाची यथास्थित सोय आहे ज्याची असा जो गृहस्थ तो.

**सुखेंनेव** (सं. अव्य०) सुखेंकरूनच.

**सुगंधमार्जार** ( सं. पु. ना. ) ( ग्रं० ) जवादी मांजर.

**सुगंधमृग** (सं. पु. ना ) कस्तुरीमृग.

**सुगम** (सं. वि०) सोपारा.

**सुगर** (वि०) कुशल.

**सुगरण** (वि०) पाकक्रियादि कर्मामध्यें कुशल जो तो, परंतु प्रायः स्त्रीविषयीं प्रयोग. २ सुगर.

**सुगरावा** ( पु. ना.) सुगरपणा.

**सुगरीण** (स्त्री. ना.) सुगरण.

**सुगावा** ( पु. ना.) सुदावा.

**सुग्रास** (सं. पु. ना.) उत्तम प्रकारचें जें अन्नादि भोज्य त्यास समयविशेषीं म्हणतात.

**सुचटी** (स्त्री. ना.)(ग्रं०) टांच.

**सुघड** (न.ना.)सुगड. २(वि०)सुगर.

**सुचणें** (धा. ना.) त्या त्या प्रसंगीं उपयुक्त कांहींएक गोष्ट, कल्पना, श्लोक, वाक्य, कर्तव्यांश इ० अंतःकरणांत अकस्मात् आविर्भूत होणें.

**सुचना** (स्त्री. ना.) सूचना.

**सुचेणें** (धा.ना.)(ग्रं०)निर्माण करणें.

**सुजणें** ( धा. ना. ) मनुष्यादिकांनीं सुजीनें युक्त होणें. तो त्या पदार्थासाठीं सुजला नाहीं म्हणजे त्यावाचून त्याचें खोळंबलें नाहीं. २ (ग्रं०) घालणें. ३ दिसणें.

**सुजन** (सं. वि०) सज्जन.

**सुजाण** (वि०) सुज्ञ.

सुझणें (धा. ना.) (ग्रं०) दिसणें २ जाणणें.

सुटंक (न. ना.) (ग्रं०) सुचिन्ह २ (वि०) सुचिन्हित.

सुटका (स्त्री. ना.) मोकळीक.

सुटणें (धा. ना.) ज्याशीं संबद्ध होऊन राहिला जो कोणेक अर्थ त्याणें त्यापासून वियुक्त होणें. २ कोणेक प्रतिबंधानें प्रतिबद्ध जो त्याणें त्या प्रतिबंधापासून मुक्त होणें. ३ अंतःकरण, शरीर, शरीरावयव, अन्न, मीठ, मांस इ० कितीएक अर्थरूप अधिकरणें त्यांच्याठायीं भय, कंप, खाज, वास, पाझर, घाण, इ० कितीएक अर्थ उद्भवणें. तोफ, बंदूक इ० सुटणें ह्म०त्यापासन आवाज होणें.

सुटसुटीत (वि०) कांहीं काम करण्याविषयीं ज्याचे अंगीं मंदत्व नाहीं असा चपल जो तो. २ बोजड नव्हे असें जें शरीर, ओझें, इ० तो. ३ आटोपसार जो संसार, व्यवहार, इ० तो.

सुटा (वि०) कोणेक अवयवीपासून पृथक्‌त्व पावला जो त्याचा अवयव तो किं० अवयवीवेंकरून मानिला जो पदार्थ तो. २ कोणेक व्यवहारीं गुंतला न जातां मोकळेपणें स्थित जो पदार्थ तो.

सुटी (स्त्री. ना.) विद्याभ्यास, चाकरी, कृषिकर्म, इ० व्यापार करणारे जे शिष्य, चाकर, बैल, इ० त्यांस त्या त्या व्यापारीं संबद्ध न करितां विश्रामाकरितां कांहीं काळ देतात जी मोकळीक ती.

सुडकणें (धा. ना.) (ग्रं०) भडकणें.

सुडका (पु. ना.) जुनेवस्त्राचा जो फडका तो. २ सुडकें. ३ एक शिवी आहे. [म्हणतात.

सुडकें (न. ना.) वस्त्रास निंदेनें

सुडावणी (स्त्री. ना.) (ग्रं०) एकाकारता. २ सुडउगवणी.

सुडावणें (धा. ना.) कांहींएक दुष्कर कर्म करण्याविषयीं कोणेकानें पुढें होणें

सुडी (स्त्री. ना.) कणसासकट जोंधळा, सजगुरा इ० धान्याचा रचून ठेवितात जो गंज तो.

सुणें (न. ना.) (ग्रं०) कुत्रें.

सुत (सं. पु. ना.) पुत्र.

सुतणें (धा. ना.) (ग्रं०) निजणें.

सुतराम् (अव्य०) सर्वथा. [२ ठेवणें.

सुतसणें (धा. ना.) (ग्रं०) घालणें.

सुतिणें (धा. ना.) (ग्रं०) मारणें.

सुती (वि०) सुताचा जो दोरी इ० पदार्थ तो. २ सूत मारून पाहिलें असतां ज्यास किंचित्‌ही वक्रता नाहीं असा भिंत, खांब इ० पदार्थ तो. ३ (स्त्री. ना.) (ग्रं०) प्रवेश. ४ विस्तार.

सुतेरा (पु. ना.) कोळी ह्मणून एक क्षुद्र जंतु आहे तो. २ त्याचे गुदापासून उत्पन्न होतो जो तंतु तो.

सुत्रा (वि०) दोरीसूत्त काम ज्याचे हातून सहज घडतें असा जो मनुष्य आणि त्याचा हात, लेखणी इ० तो.

सुदणें (धा. ना.) (ग्रं०) घालणें.

सुदती (सं. वि०), सुंदरी.

सुंदर (सं. वि०) चांगला.
सुंदरा (स्त्री. ना.) (ग्रं०) मुंदरी.
सुंदरी (सं. स्त्री. ना.) सुंदर जी स्त्री ती. २ सतार, रुद्रवीणा इ०वाद्यास विवक्षित स्वरानुसंधानानें त्याचे दांडीस जे बंध बांधीत असतात ते प्रत्येकीं.
सुदर्शन (सं. न. ना.) विष्णूचें चक्र ह्मणून जें आयुध आहे तें. २ कांहीं पाठीस लागलें जें लचांड तें.
सुदंशू (वि०)(ग्रं०) ज्ञाता. २आस्तिक.
सुदामत (अव्य०) खराबी, नाश इ० न होतां सुरक्षितपणें असणें,पोंहोंचणें, पावणें इ०कांचें वि०. २उच्छृंखलपणा, दांडगाई इ० न करितां सुरळीतपणें वागणें, नांदणें, देणें, घेणें, बोलणें इ०कांचें वि०.
सुदावा (सं० शोध)( पु.ना.) गतनष्ट जो पदार्थ त्याचा किं० गुप्तरूपें स्थित जी कांहीं गोष्ट तिचा लावितात किं० लागतो जो शोध तो.
सुधा (सं. स्त्री. ना.) अमृत. २ चुना. ३ (वि०) पाहिजेत जे गुण तेहीं तेहीं करून जो बरा तो.
सुधाकर (सं. पु. ना.) चंद्र.
सुधारणें (धा. ना.) कोणिकाचे हातून घसरली जी कांहींएक गोष्ट ती किं० करतांना बिघडला अ० मुळींच सरासरी केला जो पदार्थ तो पाहिजे तसा नीट करणें. [जो रस तो
सुधारस (सं. पु. ना.) अमृतरूप
सुधांशु (सं. पु. ना.) चंद्र.
सुधी (सं. वि०) उत्तमप्रकारच्या ज्ञानानें युक्त जो पंडित तो. २ (स्त्री.ना.) त्याची जी बुद्धि ती.
सुनका (वि०) सुना.
सुना (वि०) ओकें दिसायाजोगें कोणेक अर्थानें शून्य झालें जें कोणेक अधिकरण तें. २ दिवस, डाव इ० सुना जाणें ह्मणजे त्या त्या मध्यें घडायाचें जें जें फल तें तें न होतां तो तो दिवसादि व्यर्थ जाणें.
सुनाट (वि०) ( ग्रं० ) शून्यरूप. २ व्यर्थ. [घालून, ठेवून.
सुनी (वि०)(ग्रं०)सुनाट. २ (अव्य०)
सुपर्ण (सं.पु.ना.) गरुड, विष्णुवाहन.
सुपर्णाग्रज (सं.पु.ना.)(ग्रं०)अरुण.
सुपाणी (न. ना.) (ग्रं०) मोतीं.
सुप्त (सं. वि०) निद्रित. [प्रसन्न तो.
सुप्रसन्न (सं. वि०) अतिशयित जो
सुबत्ता (स्त्री. ना.) धान्यादि पदार्थांची सवंगाई, राजक्रांति, चोर, महामारी इ० कृत उपद्रवांचा अभाव इ० कारणानें देशादिकाचे ठायीं असल्ये जी स्वस्थता ती.
सुबुद्ध (सं. वि०) बुद्धिमान् जो तो.
सुबोध (सं. वि०) दुर्बोध नव्हे तो.
सुबोंब (वि०) (ग्रं०) शोभिवंत.
सुंभ (न. पु. ना.) काथ्याची वळून करितात जी दोरी तें. २ (पु.ना.) घोडे गाढव इ० कांचा जो खूर तो.
सुभग (सं. वि०) उत्तम भाग्यवान्.
सुभट (वि०) (ग्रं०) शूर. २चांगला.
सुभणें (धा. ना.) (ग्रं०) घालणें.
सुभा (अर० पु. ना.) विवक्षित परि-

माणानें परिमित जो देश, तालुका इ० त्यांची जमाबंदी करण्याचा जो सरकारी अधिकार तो, व तो देश, तालुका इ० तो. २ त्या अधिकारानें विशिष्ट जो त्यासही प्रसंगविशेषीं म्हणतात. ३ विटाळशीपणास संकेतानें म्हणतात.

**सुभाषित** (सं. न. ना.) लौकिकव्यवहारोपयोगी दृष्टांतदार्ष्टांतरूप जो श्लोक, वाक्य इ०कांचा समुदाय तें.

**सुभिक्ष** (सं. न. ना.) धान्यादि पदार्थांची जी सवंगाई तें.

**सुम** (सं. न. ना.) सुमन.

**सुमन** (सं. न. ना.) पुष्पप्रथमार्थी. २ (पु.) इंद्रादिक देवांची संज्ञा.

**सुमरु, रू** (पु. ना.) (ग्रं०) स्मरण

**सुमार** (फा० पु. ना.) हें इतकेंच आहे, अमुक तें हेंच, हें अमुकच आहे, अशा प्रकारें निश्चित न होतां किंचित् अंतरविशिष्ट जो कोणेक अर्थाचें स्वरूप मनांत येतें तो. सुमारानें सांगणें, बोलणें म्हणजे त्या त्या अर्थाचा सुमार अनुलक्षून बोलणें, सांगणें. २ संख्या, परंतु सुमारी जिन्नस लिहिण्याचे प्रसंगीं प्रयोग उ० आंबे सुमार शंभर. [तो

**सुमाराचा** (वि०) मध्यम प्रतीचा जो

**सुमारी** (वि०) व्यक्तींची संख्या करून द्यावयाचा घ्यावयाचा असा जो फळें इ० पदार्थ तो. २ सुमारप्रथमार्थी. [तो.

**सुमार्ग** (सं. पु. ना.) उत्तम जो मार्ग

**सुमूहूर्त** (सं. पु. ना.) प्रयाणाद्युपयोगी ग्रहबलादिकेंकरून उत्तम प्रकारचा जो मुहूर्त तो.

**सुयाण** (पु. ना.) (ग्रं०) सुकाळ.

**सुयुक्त** (सं. वि०) उत्तम प्रकारचें यथायोग्य जें भाषण, लेख इ० व्यापार तो. २ तसें भाषणादिकर्त्ता जो मनुष्य तो.

**सुर** (सं. पु. ना.) देव.

**सुरई** (स्त्री. ना.) तरवारीसारिखें एक हत्यार आहे. २ प्यावयाचें पाणी ज्यामध्यें थंड राहातें, कोठें बरोबर नेतां यावें म्हणून ठेवीत असतात असें प्राय: जस्ताचें चंबूसारखें उंच गळ्याचें एक पात्र आहे. ३ उकडे नव्हत असे जे तांदूळ ते. ४ लवंगा, वेलदोडे, जायफळ, जायपत्री, केशर इ० रूप जीं उंची औषधें तीं प्रत्येकीं.

**सुरकांडी** (स्त्री. ना.) मत्स्याकार शरीर करून वेगानें पाण्यांत मारितात जी सरळी ती. २ दाटी इ० कांमध्यें शिरायाकरितां मुखावयव कांहीं पुढें करून शरीराकुंचनपूर्वक धरिली जी सवेग गति ती.

**सुरकुती** (स्त्री. ना.) वस्त्र, चर्म, शरीर इ० कांची विवक्षित सफाई बिघडायाजोगे त्यांजवर आकुंचनादि कारणानें जे चुणीसारखे आकार होतात ते प्रत्येकीं. [एक झाड आहे.

**सुरंग** (पु. ना.) सुरुंग. २ (स्त्री. ना.)

**सुरंगी** (स्त्री. ना.) (ग्रं०) मार्ग, वाट.

**सुरत** (अर० स्त्री. ना.) रूपद्वितीयार्थी. २ (सं. न. ना.) मैथुन. ३ तोंड.

**सुरतरु** (सं. पु. ना.) कल्पवृक्ष.

सुरती (स्त्री. ना.)(ग्रं०) ऐक्य.
सुरद्रु, द्रुम (सं. पु. ना.) सुरतरु.
सुरनदी (सं. स्त्री. ना.) भागीरथी.
सुरपति (सं. पु. ना.) इंद्र.
सुरपुरणें (धा ना.) (ग्रं०) सुचणें.
सुरफुरें (वि०)(ग्रं०) सूचक.
सुरभी (सं. स्त्री. ना.)(ग्रं०) कामधेनु.
सुरमा (फा० पु. ना.) डोळ्यांत घालायाचें उपयोगी एक अंजन आहे तो. २ शरीरावर पांढरे चट्टे येतात असा जो एक रोग आहे तो.
सुरवाड (स्त्री. पु. ना.)(ग्रं०) सुकाळ. २ सुख. ३ स्वतंत्रता. ४ मोठेपणा. ५ (वि०) शुद्ध, चोख.
सुरवाडणें (धा० ना. (ग्रं०) प्रफुल्लित होणें. २ शोभणें. ३ विस्तार पावणें. ४ सुखावणें. ५ कथन करणें.
सुरवाडीक (वि०) (ग्रं०) सुखदायक. २ महत्वकारक.
सुरवात (अर० स्त्री. ना.) आरंभ.
सुरस (सं. वि०) उत्तम आहे रस ज्यामध्यें असें जें काव्य, भाषण, गाणें, इ० तें.
सुरसरित् (सं. स्त्री. ना.)(ग्रं०) सुरनदी.
सुरसरी (स्त्री. ना.)(ग्रं०) सुरनदी. २ प्राप्ति.
सुरसी (स्त्री. ना.) (ग्रं०) प्राप्ति.
सुरसोटा (पु. ना.) केवळ सोट्याचे आकारासारिखा एक वीणा करीत असतात तो.
सुरळी (स्त्री. ना.) कागद, वस्त्र इ० कांची जी केली वळकटी तीस प्रसंगविशेषीं म्हणतात.
सुरळीत (वि०) ज्यामध्यें खचरटपणा, नदी, नाले, इ० नाहींत असा जो मार्ग तो. २ वक्रोक्ति, गूढार्थ, दांडगाई, इ० ज्यांत नाहींत असा जो श्लोक, वाक्य, भाषण, ग्रंथ, मनुष्य, इ० तो. ३ (अव्य०) मध्यें कांहीं विघ्नादि न होतां किं० व्यवहाररीति, इ० न सोडितां यथास्थितपणें कांहींएक वृत्त्यादि चालणें, किं० कोणेकानें वर्तणें, इ० कांचें वि०.
सुरक्षित (सं. वि०) विवक्षित नाशादि न होतां यथास्थितपणें जो विद्यमान तो.
सुरा (सं. स्त्री. ना.) मद्य. २ (पु. ना.) मोठी जी सुरी तो.
सुरांगना (स. स्त्री. ना.)(ग्रं०) देवांगना.
सुरी (स्त्री. ना.) फळें इ० कापणें, चोया करणें, पानें कापणें, इ० उपयोगी एक शस्त्र आहे.
सुरुंग (पु. ना.) खडक फुटावा म्हणून दारू भरायासाठीं त्यास जें भोंक पाडितात तो. २ भूमींतून गुप्तपणें जाण्यायेण्याकरितां जो मार्ग करितात तो.
सुरू (फा० पु. ना.) एक झाड आहे. २ (वि०) आरंभविशिष्ट झाला जो कोणेक व्यापार तो.
सुरूवात (अर० स्त्री. ना.) आरंभ.
सुरेख (वि०) नीटनेटका सुंदर जो पदार्थ तो.
सुलभ (सं. वि०) दुर्लभ नव्हे तो. २ करणें, जाणणें, इ० कांविषयीं कठीण नव्हे जो तो.

सुलाख (फा० पु. ना.) सोनें इ०-कांचे खरेखोटेपणाचे परीक्षेकरितां त्यास जी खिळा मारून खळी पाडितात ती.

सुलीनणें (धा. ना.) (ग्रं०) मिळून जाणें, ऐक्यता पावणें.

सुवणें (धा. ना.) (ग्रं०) घालणें.

सुवर्ण (सं. न. ना.) तांबें इ० सर्व धातूंमध्यें एक श्रेष्ठ धातु आहे तें.

सुवर्णधातूचामार्ग (पु. ना.) (ग्रं०) सोनें करण्याची जी किमयारूप विद्या ती.

सुवर्णपंथी (सं. पु. ना.)(ग्रं०)सोन्याची किमया करणारा तो.

सुवर्म (वि०) (ग्रं०) सुयुक्त.

सुवाच्य (सं. वि०) भ्रांतिकर नव्हे आणि मोकळें अतएव वाचायास सुलभ असें जें अक्षर तें किं० तसें अक्षर आहे ज्याचें असा ग्रंथ, पुस्तक, इ० तो. [क्रिया.

सुवार, वारा (पु. ना.) (ग्रं०) पाक-

सुवारु, वारू (पु. ना.) (ग्रं०) आच्यारी.

सुवाव (पु. ना.) (ग्रं०) सहवास.

सुवावणें (धा. ना.) (ग्रं०) घालणें.

सुवास (सं. पु. ना.) केशर, कस्तूरी, इ० पदार्थनिष्ठ जो उत्तम प्रकारचा वास तो.

सुवासिक (सं. वि०) सुवासविशिष्ट जो पुष्पादि पदार्थ तो.

सुवासिनी (सं. वि०)जीचा पति विद्यमान आहे अशी जी स्त्री ती.

सुवेनसी (स्त्री. ना.)(ग्रं०) सामर्थ्य.

सुवेष (सं. वि०) (ग्रं०) सुंदर.

सुशिक्षित (सं. वि०) कोणेक कर्म करण्याची शिक्षा ज्यास चांगली आहे असा तो. [उत्तम तो.

सुशील (सं. वि०) ज्याचें शील

सुशोभित (सं. वि०) उत्तम प्रकारचे शोभेनें युक्त तो.

सुषमा (स्त्री.ना.)(ग्रं०)उत्तम शोभा.

सुषुप्ति (सं. स्त्री. ना.) जागृति आणि स्वप्न या दोन अवस्थांहून तिसरी अवस्था, जीमध्यें अंतःकरणवृत्तीचा अज्ञानांत लय झाल्यामुळें कोणत्याच विषयाची स्फूर्ति असत नाहीं ती.

सुस (न. ना.) (ग्रं०) सुख.

सुस्कारा (पु. ना.) सशब्द सवेग जो मुखानें बाहेर सोडिला उच्छ्वास तो.

सुसाचणें (धा. ना.)(ग्रं०) दम घेणें, उसासा टाकणें.

सुसाट (पु.ना.) सुसाटा. २ (अव्य०) सशब्द सवेगपणें वायु, अश्व, इ० कानीं जाणें, येणें, इ० कांचें वि०.

सुसाटा (पु. ना.) वारा, जल, इ० कांचा जो झपाटा तो. २ वेगानें चालणारा जो वायु, जल, इ० त्यांचा जो शब्द तो.

सुस्त (फा० वि०) सुस्तीप्रथमद्वितीयार्थानें विशिष्ट जो तो. २ कोणेक कार्य सुस्तीनें करण्याचा स्वभाव ज्याचा तो किं० त्याचा तो कारभार इ० तो.

सुस्ती (फा० स्त्री. ना.) अलस्य. २ दहीं, आम्ररस, इ० पदार्थ भक्षिल्यानें

शरीरांत शैथ्य होऊन उद्योगादिविषयीं हस्तपादादिक त्वरेनें न उठायाजोगी जी जडतारूप विकृति होते ती. ३ आळस इ० कारणानें कोणेक काम मंदपणें करण्याचा प्रकार ती.

सुस्वर (सं.वि०)कर्कशपणा, अपस्वर, इ० दोषरहित जें गाणें,म्हणणें, इ०.

सुहा (पु. ना.) (ग्रं०) द्वेष.

सुहाड (वि०) (ग्रं०) सुजाण.

सुहाडणें (धा. ना.) शोभणें.

सुहाडा (पु. ना.) (ग्रं०) अलंकार. २ (वि०) ज्ञानी, सुजाण.

सुहाव (पु. ना.) (ग्रं०) आवड. २ (वि०) सुशोभित.

सुहावणें (धा. ना.) आवडणें. २ कळिणें. [२ साह्यकर्ता.

सुहावा (वि०) (ग्रं०) आवडता.

सुहृत् (सं. पु. ना.) सखा.

सुळका (पु. ना.) क्रमानें सुळ्याच्या अग्रासारखा होत गेलेला जो पर्वतादिकांचा शृंगादिरूप अवयव तो. २ आडवा विस्तार ज्याला फार नाहीं असा,फार उंच जो वृक्ष त्यास म्हणतात.

सुळा (पु. ना.) ज्याला अणी असते असा जो दांत तो. २ गमन करतेसमयीं पायास खुपायाजोगे जे खडे इ० ते प्रत्येकीं. ३ एक क्षुद्र प्राणी आहे, जो म्हैस इ० पशूंचे अंगावर गोचिडाप्रमाणें पडत असतो तो. ४ मोटेचें चाक ठेवायासाठीं विहिरीचे कांठावर जे दोन झुकते खांब उभे केले असतात ते प्रत्येकीं.

सुळावरचीपोळी, (स्त्री. ना.) यथास्थितपणें निभावलें असतां बरें, नाहीं तर सर्वस्व नाशादिक मोठें संकटाची संभावना ज्यांत असें जें कांहींएक अवघड कर्म त्यास म्हणतात.

सुज्ञ (सं. वि०) शास्त्रादि परिचयेंकरून जें विशेष ज्ञान येत असतें तें आहे ज्यास तो.

सूकर (सं. पु. ना.) डुकर.

सूक्त (सं. वि०) भाषणादि अर्थविषयीं बरें आणि वाईट असा ज्या दोन कोटी त्यांमध्यें बरें ही जी कोटी तद्विषयीं प्रयोग.

सूचक (सं. वि०) कोणेक अर्थातें सुचविणारा जो मनुष्य किं० कांहीं चिन्ह तो. २ (पु. ना.) चहाडखोर मनुष्य तो.

सूचना (सं.स्त्री.ना.) कोणेकास कोणेक अर्थ सुचविण्याचा व्यापार ती.

सूज (सं. शोथ) (स्त्री. ना.) जलोदरादि रोगामुळें किं० आघातादि कांहीं निमित्तानें रक्तास विकार होऊन शरीरास किं० शरीरावयवांस येतो जो विलक्षण जाडेपणा ती.

सूट (स्त्री. ना.) देणें, घेणें, इ० व्यवहारांत न्यायतः कोणाइ० कडून द्यावयाचें जें द्रव्यादि तें देणाराचे गरीबी इ० कारणामुळें सर्व न घेतां त्याचे कांहीं अंशाविषयीं करितात जी माफी ती आणि न घेतां सोडितात जो तो द्रव्यादि अंश ती. २ आपले संबंधांत असलेले दास, दासी, इ० त्यास आपले संबंधाचा निरास करून स्वतंत्रपणें वागण्याविषयीं देतात जी मोकळीक ती. ३ ए-

का पंक्तींत असलेले अनेक पदार्थ त्यांस परस्परें मध्यें असणें जें अंतर तें.

सूड (पु. ना.) चुकलेला, हरवलेला, इ०रूप जो कोणेक अर्थ त्याचा त्या त्या प्रकरणादिकांचे अनुक्रमानें चाळून पाहिल्यानें लागतो जो शोध तो. सूड घेणें, उगवणें, इ० कोणेकानें आपला केला जो अपकार तो प्रतिक्रियाद्वारा फेडणें.

सूत (सं. सूत्र) वस्त्रादिकांचे उपयोगीं कापूस, रेशीम, लोंकर, सुवर्णादि धातु, लाख, इ०कांचा जो तंतु तें, परंतु कापसाचे तंतूवर विशेषेंकरून प्रसिद्धि. २ कांहींएक कार्यसाधनार्थ कोणेकाचें कोणेकाशीं असतें जें संधान तें. ३ फळ इ०कांत बारीक पडतात जे कृमि ते प्रत्येकीं. कोणेक मनुष्य, व्यवहार, इ०कानें सुतास लागणें म्हणजे सुरळीतपणें चालायाजोगें सोईस लागणें. ४ (सं. पु. ना.) राजादिकांहीं स्तुतिकरणें, सारथ्यकरणें, इ० कर्म करणारी अशी एक पुराणप्रसिद्ध मनुष्यांत जाति आहे. ५ सारथि. ६ पारा.

सूतपणें (धा.ना.)(ग्रं०) तन्मय होणें.

सूत्र (सं. न. ना.) कापूस इ०कांचा जो तंतु तें. २ शास्त्रप्रवर्तक जे आचार्य त्यांणीं त्या त्या शास्त्रविषयावर जो मूळ ग्रंथ रचिला असतो तें आणि त्यांचीं जीं अवांतर वाक्यें तीं प्रत्येकीं. ३ (ग्रं०) यज्ञोपवीत. ४ व्यासास म्हणतात.

सूत्रधार (सं. पु. ना.) नाटकाची नांदी झाली म्हणजे नाटककथेचा प्रसंग आणायाकरितां जें सोंग येतें तें. २ सूत्रधारी.

सूदणें (धा. ना.) ठार मारणें.

सूपरम, राम (पु. ना.) मरण.

सूपशास्त्र (न. ना.) (ग्रं०) पाक करण्याची विद्या.

सूर (पु. ना.) स्वर प्रथम द्वितीयार्थीं. २ सनई, पांवा, इ० वाद्यें सप्तस्वरांवर वाजत असतां त्या स्वरांचें सामान्यस्वरूप धरून जें सतत एकसारखें वाद्य वाजत असतें तें.

सूर्य (सं. पु. ना.) ज्याचे उदयास्तानें दिवसरात्र होतात असा जो सर्व ग्रहांत श्रेष्ठ ग्रह आहे तो.

सूर्यकांत (सं. पु. ना.) एक तेजस्वी स्वच्छ पाषाण आहे, जो सूर्यस्थानीं पूजीत असतात आणि सूर्यकिरणाचे संयोगानें ज्यापासून अग्नि उत्पन्न होतो तो.

सूर्यपान (न. ना.)(ग्रं०) अंगारगिरी.

सूर्यपूट (न. ना.) उन्हांत औषधादि पदार्थ सारा दिवस तापत ठेवावा असा जो संस्कार तें. [समूह.

सूर्यमाळा (स्त्री. ना.) सूर्यादिग्रह-

सूर्यवंश (सं. पु. ना.) सूर्यापासून झालेला असा एक पुराणप्रसिद्ध राजवंश आहे.

सूक्ष्म (सं. वि०) बारीक.

सूक्ष्मदर्शी, दृष्टि (सं. वि०) कोणेक विषयाचा बारीक विचार, मर्मांश इ० पाहण्याविषयीं समर्थ आहे दृष्टि ज्याची तो.

सूक्ष्मदेह (सं. पु. ना.) लिंगदेह.
सृगाल (सं. पु. ना.) कोल्हा.
सृजणें (धा. ना.)(ग्रं०)उत्पन्न करणें.
सृष्टि (सं. स्त्री. ना.) ब्रह्मदेवादिकांनीं केली जी सर्व जगाची किं० जगदंतःपाती पदार्थांची उत्पत्ति ती आणि त्या उत्पत्तीनें उत्पन्न झालें जें जग किं० तदंतःपाती पदार्थ ती.
से (पु. ना.) (ग्रं०) छंद. २ भय, स्मरण.
सेक (सं. पु. ना.) भूम्यादिकांवर जलादि सद्रव पदार्थ शिंपडल्यानें त्याचा बिंदुशः होतो जो पात तो.
सेजहोणें (धा. ना.)(ग्रं०) शांत होणें.
सेजार (न. ना.) (ग्रं०) सेज. २ (अव्य०) जवळ.
सेजारीं, रें (अव्य०) (ग्रं०) जवळ.
सेतु (सं. पु. ना.) पूल.
सेना (सं. स्त्री. ना.) राजादिक जो नायक त्याचे पदरीं स्वार, पायदळ इ० जो योधसमुदाय असतो ती.
सेनापति (सं. पु. ना.) राजादिकानें आपले सर्व सेनेवर जो अधिकारी करून ठेविला असतो तो.
सेल (पु. ना.) (ग्रं०) उत्तम वाटा. २ भाग. ३शेवट. ४(वि०)निवडक.
सेलतणें (धा. ना.) (ग्रं०) भासणें.
सेव (न. ना.) (ग्रं०) शव.
सेवक (सं. पु. ना.) चाकर. २(वि०) कोणेक अर्थातें सेवणारा जो तो.
सेवटिली (स्त्री. ना.) (ग्रं०) शेवटली जी ज्ञानरूप भक्ति तिला म्हणतात.
सेवन (सं. न. ना.) ज्या अर्थांचा जो उपयोग तो त्यापासून आपणास पडे असें त्या अर्थाचें तत्तद्योग्याक्रयाद्वारा आत्मसंबंधांत जें धारण तं. २(ग्रं०) सेवा करण्याचा व्यापार तें.
सेवा (सं. स्त्री. ना.) चाकरीरूप जें कर्म तें. २ सेवनानें घडतो जो अर्थाचा संबंध तो.
सेव्य (सं. वि०) सेवावयास योग्य जो ईश्वर, औषध इ० पदार्थ तो.
सेव्याठाय (पु. ना.) (ग्रं०) सेव्यठाव, ब्रह्म.
सेस (पु. ना.) (ग्रं०) भरण.
सैंघ (वि०) (ग्रं०) बहुत, पुष्कळ, फार. २ (अव्य०) केवळ. ३ स्वतःसिद्ध. ४ (पु. ना.) समुदाय.
सैतान (अर० पु. ना.) सर्व कर्मफलदाता जो ईश्वर त्याचा विरोधी असा एक कोणी आहे म्हणून यवन लोक मानितात तो. २ (पु. ना.) घोरकर्मा, घोररूपी असा जो मनुष्य पर्जन्य, वारा इ० त्यास आरोपानें म्हणतात.
सैंधव (सं. न. ना.) एक क्षार आहे. २ (वि०) सिंधुदेशसंबंधी जो अश्वादि पदार्थ तो आणि समुद्रसंबंधी जो जल, मौक्तिक इ० पदार्थ तो.
सैन्य (सं. न. ना.) सेना. २ (पु.) सैनिक.
सैंपाक (सं. स्वयंपाक) (पु. ना.) पाकक्रिया आणि त्या क्रियेनें सिद्ध झाला जो भात, भाकरी, भाजी, वरण इ० पदार्थ तो.

सैर (वि०) (ग्रं०) स्वच्छंदी.

सैरट (वि०) अंत:करणांत जशी लहर येईल तसें वर्तावें अशा स्वभावाचा छांदिस जो तो. २ ज्याचे बुद्धींत सूक्त असूक्त काय हें धोरण नाहीं अशा स्वभावाचा तो.

सैरा (वि०)(ग्रं०) अफाट. २ मोकाट.

सैराट (वि०) (ग्रं०) अच्यावाच्या जो मनुष्य तो. २ मोकाट.

सैरावैरा (अव्य०) (ग्रं०) ज्याला जिकडे वाट फुटेल तिकडे; सैन्यादिकानें भयादिकामुळें अनेक मार्गांनें संभ्रांतपणें जें पळणें, धांवणें इ० त्याचें वि०.

सैंवर (न. ना.) स्वयंवर.

सोइरगत (स्त्री. ना.) कोणेकाचा कोणेकाशीं असतो जो यौनसंबंध तो.

सोई (स्त्री. ना.) सोय. २ (ग्रं०)मार्ग.

सोईवार (वि०) ज्यामध्यें असावी तशी सोय आहे असा जो पदार्थ, व्यवहार इ० तो.

सोईसोईनें (अव्य०) जशी जशी सोय होईल तसें तसें देणें, घेणें, करणें इ० कानें वि०.

सोंकणें, सोकणें (धा. ना.)सवंकणें.

सोकरणें (धा. ना.) (ग्रं०) रक्षण करणें. [कणें.

सोंकावणें, सोकावणें (धा. ना.) सों-

सोंकील, सोकील (वि०) कोणेक विषयीं संवकलेला तो.

सोंग (न. ना.) तमाशा इ० कामध्यें कोणेकाचा धरितात जो वेष तें आणि वशा वेषानें विशिष्ट जो मनुष्य तें. २ कपटानें धरिलें जें दारिद्र्य दुखणेकरी इ० कांचें कोंग तें. ३ लोकविलक्षण आचार, वेष इ० कांनीं युक्त जो मनुष्यादि त्यास,तसेंच विशेष शोभा, डौल इ० दिसावें, वस्तुत: ज्याचें प्रयोजन नसून उगीच भडचग मात्र असें जें अविवक्षित कांहीं त्यास म्हणतात.

सोंगयाचेंअंजन (सं. सौवीरांजन) (न. ना.) (ग्रं०) डोळ्यांत सुरम्यासारिखा घालण्याचा कांहीं पदार्थ आहे तें.

सोंगसंपादणी,संपादनी (स्त्री. ना.) जें सोंग आणलें त्याची यथायुक्त जी संपादणी ती.

सोंगळ (वि०) मलिनपणा, दुसऱ्याचें उच्छिष्टभक्षण इ०कांविषयीं ज्यास फार खंत असते अशा स्वभावाचा जो तो.

सोंगा (पु. ना.) नेसलेल्या किंवा अंगावर घेतलेल्या धोतर, शेला इ० वस्त्राचा लोंबत सुटला असतो जो अवयव तो.

सोंगाडी (पु. ना.)तमाशा इ०कांत अनेक सोंगें घेतो तो. २ (वि०) अंगीं तादृश दु:ख दारिद्र्य इ०नसतां बाहेर लोकांस कोंग दाखविण्याचा स्वभाव ज्याचा तो.

सोज्वल, ळ (सं. वि०) स्वच्छ निर्मळ.जो कोणेक अर्थ तो.

सोट (पु. ना.) आडवा विस्तार विशेष न होतां एका कांडानें नीट उंच वाढत गेलेला जो मोठा जाड वृक्ष तो क्रि० भ्या. कांडासारिखें मोठें

लांब सरळ जें लाकूड तो. २ स-
रीट उभा, अवघड चढायास कठिण
असा जो पर्वत, मनोरा इ० तो
३ शरिरानें धष्टपुष्ट असून विद्यादि
गुण ज्यास नाहींत किं० मुलें बाळें
इ० खटलें ज्याचे मागें नाहीं असा
जो पुरुष किं० स्त्री त्यास म्हणतात.
४ (ग्रं०) एक क्षुद्र प्राणी आहे.

सोटगें (न. ना.) लहान जो सोटा तें.

सोटवात (पु. ना.) (ग्रं०) फोक.

सोटा, सोंटा (पु. ना.) गलबताची काठी इ० व्हावयाजोगें जाड गोल लांब असें जें लाकूड तो. २ आयुध-स्थानीं हातीं वाळगायाचें उपयोगी सरासरी मणगटाएवढें जाड दोन तीन हात सुमार लांब असें जें वाटोळें लाकूड तो.

सोटादुपट्टा, दुपेटा (पु. ना.) एकादें वस्त्र, एकादें पात्र इ० रूप थोडेंच जें कोणेकाचें खटलें असतें त्यास म्हणतात.

सोंड (स्त्री. ना.) शुंडा.

सोडचिटी, चिठी (स्त्री. ना.) आपल्या सत्तेंत राखून ठेवलेला जो गांव, शेत, माल, किल्ला, दासी इ० याचे मोकळिकेविषयीं मी आपल्या सत्तेंतून सोडला अशा अर्थाची ज्ञापक लिहून देतात जी चिठी ती.

सोडणें (धा. ना.) सुटें असें करणें.

सोडत (स्त्री. ना.) कोणेक पदार्थाची किंमत अनेकांनीं मिळून अंशतः भरावी आणि केल्या संकेताप्रमाणें ज्याचे नांवें तो पदार्थ निघेल त्या एकट्यानेच तो घ्यावा अशा सं-
ताचा करितात जो व्यवहार तो.

सोडबांध (स्त्री. ना.) अनेकवार सोडावें बांधावें असा जो व्यापार तो.

सोडवण (स्त्री. ना.) काहींएक नियम इ० कानें संबद्ध जो कोणी एक त्यास त्याप्रमाणें वर्तवेनासें झालें असतां पक्षांतरेंकरून तें सोडण्याविषयीं असते जी मोकळीक ती.

सोडवणूक (स्त्री. ना.) काहींएक प्रतिबंधापासून कोणेकाची सुटका ती. २ प्रतिबंधक जें काहीं कार्यादिक तेणेंकरून प्रतिबद्ध झालेला जो कोणी त्यास काहीं काळामध्यें मोकळें व्हावयास साधनभूत जें काहीं असतें त्यास म्हणतात. ३ सोडवण.

सोडवणें (धा. ना.) कोणेकाशीं संबद्ध झालेला जो कोणेक अर्थ तो त्यापासून कोणेकानें सुटा असा करणें.

सोदा (पु. ना.) साधुपणा, धनिकपणा, प्रामाणिकता इ० रूप डौल बाहेर दाखवावा इ० अनेक कपट युक्तींनीं दुसऱ्यास ठकवून आपलें कार्य करून घेणारा जो तो किं० रांडबाजी, ख्याल तमाशा इ० रूप अप्रतिष्ठित कर्मांवर ज्याची निष्ठा असा जो तो.

सोधणें (धा. ना.) शोधणें, परंतु पुस्तकादि शोधणें या अर्थावांचून. २ (न. ना.) जलादि सद्रव पदार्थ गाळायाचे उपयोगीं जें वस्त्र केलें असतें तें.

सोनखत (न. ना.) शेत इ० कास घालितात जें मनुष्यविष्ठाप्रधान खत तें.

सोनताव (पु. ना.) अश्वादिकांचे पायांस कांहीं दुःख झालें असतां नवा तापवून त्यावर त्याचा पाय ठेवून वर पाणी ओततात म्हणजे जो त्याचे पायांस चटका बसतो तो. २ शिष्या इ० कांच्या द्वारें कोणेकास देतात जो ताव तो.

सोनपितळ (स्त्री. न. ना.) पितळ म्हणून जो धातु तींत एक भेद आहे.

सोनवी (स्त्री. ना. ग्रं०) निशाण, झेंडा.

सोनसळा (वि.) पिवळट जो गहूं तो. २ पिंगटवर्ण जे केस ते प्रत्येकीं. ३ पीत वर्ण सळया ज्याजवर असतात असें जे लुगडें, खण, इ० वस्त्र त्याचें वि०. ४ (ग्रं० पु.) पिवळा जो पीतांबर तो.

सोनें (सं. अप. न.) सुवर्णपर्यायी उत्कृष्टत्वेंकरून ज्याचें वर्णन कर्तव्य असतें त्याच्याठायीं आरोप उपमा इ० प्रकारें प्रयोग करितात, सोन्यासारखें लेंकरूं, सोन्यासारखा दिवस इ० कोणेकाचें सोनें होणें म्ह० मरणोत्तर उत्तम परिणाम होणें. कोणेकस्थळीं सोन्याचा धूर निघत असणें म्ह० संपत्तीचा अतिशय असणें. २ विजया दशमीचे दिवशीं सीमोल्लंघन करून लोकांस वांटायाकरितां आणितात जीं आपटा, शमी इ० कांचीं पानें त्यांस म्हणतात.

सोनेंनाणें (न. ना.) सोनें, रुपें इ[रूप विषय तें

सोनेरी (वि०) सोन्याचे जे वर्ख, शाई कलाबतू, इ० तो किं० तीहींकरून केला जो मुलामा, रंग, इ० तो किं ह्यांकरून काढलेले वेल, बूट, इ तो, किं० तद्विशिष्ट कागद इ० तो.

सोपि (न. ना.) केळ, चवई, यांचे अंगास ज्या त्वचा असतात त्या प्रत्येकीं. २ (ग्रं. वि.) फलकट, व्यर्थ, मिथ्या.

सोपट (न, ना.) सोप.

सोपणें, सोंपणें (अ. ना.) संपणें. २ कोणेक व्यवहार किंवा० कांहीं एक खटलें याचे बरेवाइटाचा सर्वस्वें अधिकारी तूं असें म्हणून कोणेकाचे स्वाधीन करणें.

सोपा (पु. ना.) घोडीं, गुरें, इ० बांधणें, तृणकाष्ठादि ठेवणें इ० उपयोगी लांब जो गृहास अवयव वाढिवला असतो तो किं० त्यासारखें निराळें बांधलें असतें जें घर तो. (वि०) सोपारा.

सोपाना (स्त्री. ना.) (ग्रं०) जिना इ० कांच्या पायऱ्या.

सोबत (स्त्री. ना.) संगतवृत्तीपार्थी.

सोपू (वि० ग्रं०) व्यर्थ.

सोबती (पु. ना.) ज्याची सोबत ज्याला असत्ये तो त्याचा.

सोभत (स्त्री. ना.) सोबत.

सोम (सं. पु. ना.) चंद्र. २ एक लता आहे. ३ सोमयाग. ४ (ग्रं०) अमृतास म्हणतात.

सोमकांत (सं. पु. ना.) एक पाषाण [आहे.

सोमप (सं. पु. ना.) सोमपान करणारे.

सोमवंश (सं. पु. ना.) चंद्रापासून उत्पन्न झालेला असा एक पुराणप्रसिद्ध क्षत्रियवंश आहे तो.

सोय (स्त्री. ना.) कोणेक कार्य सिद-

अनुकूल होण्याविषयीं त्यास जें जें जसेंजसें अपेक्षित असतें तें तें तसें वसें सर्व अनुकूळ असल्यामुळें त्या कार्याची गति होण्यास मार्गवत् जें कांहीं उपकारक संधान असतें तो. २ द्रव्य मिळावें, संसारनिर्वाह व्हावा इ० विषयीं आश्रयभूत जे चाकरी, वतन, शेतभात इ०कांहीं असतें त्यास ह्मणतात. ३ (ग्रं०) आरंभ. ४ मार्ग.

सोयरा (पु. ना.) वरपक्षीय आणि वधूपक्षीय जे लोक ते परस्पर. २ ज्यांचा परस्पर योनीसंबंध झाला आहे ते परस्पर. ३ वेश्या, बटीक इ० जी सामान्य स्त्री तिणें मैथुनार्थ नेहमीं आश्रयलेला असतो जो पुरुष तो तिचा

सोयराधायरा (पु. ना.) सोयरा, इष्टमित्र इ० तो.

सोयरीक (स्त्री. ना.) कोणिकाचा कोणिकाशीं जो योनिसंबंध तो.

सोर (पु. ना.) (ग्रं०) आकांत. २ डुकर.

सोरट (पु. ना.) दांडगेपणानें वागणारा जो हलक्या स्वभावाचा मनुष्य तो. २ गायनांत एक राग आहे.

सोरू (सूकर) (पु. ना.) (ग्रं०) डुकर.

सोल (पु. ना.) अनेक पेड एकत्र वळून जी मोठी जाड दोरी करितात ती. २ (न.) कोकंबसोल.

सोलणें (धा. ना.) कोणेक पदार्थावरील त्वचा, शल्क, नख इ०ककरून काढून तद्रहित करणें.

सोला (पु. ना.) हरभरा, पावटा इ० द्विदल धान्याच्या ओल्या शेंगा घाटे सोलून त्यांतील काढिलेला जो दाणा तो.

सोलाणा (पु. ना.) सोला.

सोवता (वि०) (ग्रं०) निराळा. २ स्वतःचा.

सोंवळा, सोवळा (वि०) संध्या, देवपूजा, भोजन इ० कर्माविषयीं जितकी शुद्धता असावी तितकी स्नानादिकेंकरून ज्याचे अंगीं आली आहे तो मनुष्य, आणि त्याणें स्पर्शायास योग्य ह्मणजे ज्याला स्पर्श केला असतां आपण ओंवळा होत नाहीं असा जो अन्न, वस्त्र इ० पदार्थ तो. २ कोणेक कर्मसंबंधानें विटाळला नव्हे जो त्यास ह्मणतात. ३ जेथील जनसंमर्द अगदीं मोडला असा जो मार्ग, ग्राम इ० त्यास किं० ज्याचे पाठीशीं कामकारभार, बायकापोरें इ० खटलें नाहीं त्यास ह्मणतात. विधवेनें सोंवळें होणें म्ह० सवाशीणपणांतील जे केश ते काढून विधवाधर्मास शुद्ध होणें.

सोंवळें, सोवळें (न. ना.) सोंवळ्यास नेसायाचे उपयोगीं एक रेशमी वस्त्र आहे तें. २ सोंवळेपणा.

सोवाणी (स्त्री. ना.) (ग्रं०) गणना.

सोवें (न. ना.) (ग्रं०) दुःख.

सोशिक (वि०) रोगादि दुःख झालें असतां किं० कोणी दुर्भाषणादि केलें असतां तें सोसून उगेंच राहण्याचा स्वभाव ज्याचा तो.

सोस (पु. ना.) सोख. २ आपणाला हें असावें, तें असावें, मिळालें असतां-ही पुरणार नाहीं, अधिक असावें असें सर्वदा वाटायाजोगा कोणेकास असतो जो तृष्णातिशय तो. ३ (ग्रं०) यत्न.

सोसणें (धा. ना.) सहन करणें. २ अन्न औषधादि पदार्थ विकारकरून प्रतिकूळ असे न होणें.

सोसाटा (पु. ना.) सुसाटा.

सोसाळें (न. ना.) (ग्रं०) सोनें.

सोसो (पु. ना.) (ग्रं०) संशय.

सोहं (पु. ना.)(ग्रं०) मी ब्रह्म असा भाव तो.

सोहम (पु. ना.) (ग्रं०) तो मी. इ० हा देहादिक मी नव्हें एतद्रूप भाव तो.

सोहळा, सोहाळा (पु. ना.) लग्नादि शोभन संस्कार ते प्रत्येकीं. २ उत्साह. ३ सुखदुःखादिकारक जे देहास संस्कार घडतात ते प्रत्येकीं.

सोळभोंक (पु. ना.) ज्याचे अंगीं विद्यादि गुण कांहीं नाहींत, संसाराची काळजी नाहीं, आपले घरीं आलेल्याचें आदर आतिथ्य करण्याचें समजत नाहीं, असा जो वृथापुष्ट मनुष्य तो.

सोळासंस्कार (पु. ना.) गर्भाधान, पुंसवन, इ० शास्त्रपरिगणित जे द्विजातीस सोळा संस्कार आहेत ते. कोणेकाचे सोळा संस्कार होणें इ० बरें वाईट सर्व जे संस्कार ते होणें.

सोक्षमोक्ष (पु. ना.) कांहींएक गुंतून पडलेल्या व्यवहाराचा बरा किं० वाईट परिणाम होऊन कसा तरी जो उलगडा तो.

सोकट (पु. ना.) (ग्रं०) कोष्ट्याचा वस्त्र विणण्याचा माग तो.

सौख्य (सं. न. ना.) सुखीपणा.

सौजन्य (सं. न. ना.) सुजनपणा.

सौंदर्य (सं. न. ना.) सुंदरपणा.

सौदामनी, मिनी (सं. स्त्री. ना.) विद्युल्लता.

सौध (सं. पु. न. ना.) राजमंदिर. २ श्रीमंत लोकांचा चुनेगच्ची वाडा तो.

सौभाग्य (सं. न. ना.) सुभगपणा. २ सवाशीणपणामुळें काजळ, कुंकूं, मंगळसूत्र, बांगड्या, इ० धारण करण्याविषयीं जो स्त्रियांचे अंगीं योग्यताविशेष असतो तें. ३ ज्याचे योगानें आपणास मान्यता, शोभा, प्रतिष्ठा, तेज, इ० कांहीं असतें असें जें विद्या, वतन, अधिकार, समर्थाचा आश्रय, इ० त्यास म्हणतात.

सौभाग्यतंतु (सं. पुं. ना.) मंगळसूत्रास म्हणतात.

सौभाग्यद्रव्य (सं. न. ना.) सुवासिनीनें धारण करायाचे जे हळद, कुंकूं, इ० पदार्थ तें. [नी स्त्री ती.

सौभाग्यवती (सं. स्त्री. ना.) सुवासि-

सौमनस्य (सं. न. ना.) वैमनस्याचा प्रतिपक्षी भाव तें.

सौम्य (सं. वि०) क्रूर, उग्र, असा नव्हे तो. २ (पु. ना.) बुध म्हणून जो ग्रह तो.

सौर (सं. वि०) सूर्यसंबंधी जें व्रत, मंत्र, पूजा, उपासना, इ० तो.

२ सूर्यानें एक राशीचा भोग केला म्हणजे एक मास झाला अशा संकेताचा दिवस, वर्ष, इ० कालमान तो. ३ (ग्रं०) सुरंउपासक तो.

सौरस (पु. ना.) (ग्रं०) सुरसपणा. २ यत्न. ३ आसक्ति. ४ प्रसाद. ५ ऐक्यभाव.

सौरस्य (सं. न. ना.) एकमेकानें केलेलें एकमेकास विरुद्ध वाटूं नये, एकमेकांविषयीं एकमेकाचे मनांत कपट असूं नये इ० रूप जो परस्परांचा भाव असतो तें. २ सुरसपणा.

सौरहस्य (न. ना.) सौरस्य.

सौरा (पु. ना.) (ग्रं०) शूर.

स्कंध (सं. पु. ना.) मनुष्यादिकांच्या ग्रीवेपासून बाहुमूळपर्यंत जो विभाग तो. २ बैल, हत्ती इ० कांचे ग्रीवेचे मूळचा जो प्रदेश तो. ३ वृक्षाचे मूळकांडास जे मोठे मोठे अवयव फुटले असतात ते प्रत्येकीं.

स्खलन (सं. न. ना.) चालणें, बोलणें इ० व्यापारीं जो अडखळलेपणा होतो तें. २ आभ्रादिकांपासून रेत, जल इ० कांचें बिंदुरूपेंकरून जें पतन तें.

स्तन (सं. पु. ना.) ज्यामध्यें दूध उत्पन्न होत असतें असे जे मनुष्य, वानर इ० कांचे स्त्रियांस उरस्थलावर दोन दोन आणि गोमहिष्यादि पशुस्त्रियांस पोटावर योनिभेदेंकरून दोन, चार, सहा, आठ इ० नियतसंख्याक अवयव असतात ते प्रत्येकीं.

स्तब्ध (सं. वि०) धरलेला जो गतिभाषणादि व्यापार तो कुंठित करून, थोंबून राहिला जो तो.

स्तंभ (सं. पु. ना.) खांब. २ कोणेक अर्थाची गति कुंठित झाल्यामुळें तेथचे तेथेंच जी स्थिति तो. उ० वीर्यस्तंभ, गतिस्तंभ इ०.

स्तंभन (सं. न. ना.) वीर्य, भाषण इ० कांचा स्तंभ करण्याचा व्यापार तें. २ वीर्यादिकांचा स्तंभ जेणेंकरून होतो असें जें औषध, मंत्र, इ० तें.

स्तव (सं. पु. ना.) प्रशंसा. २ (अव्य०) हेतुत्वाचें वाचक. हें अव्यय हेतुभूत जो कोणेक अर्थ तद्वाचक शब्दापुढें याचा प्रयोग होतो.

स्तवन (सं. न. ना.) स्तवण्याचा व्यापार तें.

स्तुति (सं. स्त्री. ना.) स्तवप्रथमार्थी.

स्तुतिप्रिय (सं. वि०) ज्यास कोणी आपली स्तुति केली असतां फार आवडल्ये अशा स्वभावाचा तो.

स्तुत्य (सं. वि०) ज्याचा स्तव करण्यास योग्य तो.

स्तोत्र (सं. न. ना.) स्तव. २ देवता, गुरु इ० जे स्तुत्य त्यांचे स्तवानें घटित असा रचला असतो ग्रंथ तें.

स्तोम (सं. पु. ना.) (ग्रं०) समुदाय.

स्त्री (सं. स्त्री. ना.) पुरुषापासून बीज ग्रहण करून सगर्भ व्हावें अशी संभावना जेथें आहे अशा ज्या मनुष्यादि व्यक्ति त्या प्रत्येकीं. २ ज्या वृक्षलतादि जातीमध्यें जीस फळें येतात ती व्यक्ति. ३ जी ज्याची बाईल ती त्याची. ४ स्त्रीलिंग नामानें वाच्य जो अर्थ तो.

स्त्रीपुरुषें (न. ना.) नवरा आणि त्याची बायको मिळून उभयतां तीं.

स्त्रैण (सं. वि०) स्त्रीचेठायीं जो लंपट तो. २ स्त्रीसंबंधी जो व्यवहारादि तो.

स्थल, ळ (सं. न. ना.) जागा प्रथमार्थावांचून. २ समुद्रादिकाचे उदकानें अवरुद्ध झालेलें नव्हे असें जें भूतल तें. [स्थल तें.

स्थलांतर (सं. न. ना.) अन्य जें

स्थविर (सं. वि०) (ग्रं०) म्हातारा.

स्थळ (न. ना.) स्थल.

स्थाणु (सं. पु. ना.) वर शाखादि विस्तार अगदीं नाहीं असा केवळ कांडरूपवृक्ष तो. [२ प्रसंगप्रथमार्थी.

स्थान (सं. न. ना.) स्थल प्रथमार्थी.

स्थानभ्रष्ट (सं. वि०) पदच्युत.

स्थापक (सं. वि०) कांहींएक अर्थातें स्थापणारा जो तो.

स्थापणें (भा. ना.)कोणिक अधिकरणीं कोणेक अर्थ स्थित होई असा करणें.

स्थापन (सं. न. ना.) स्थापण्याचा जो व्यापार तें.

स्थापना (सं. स्त्री. ना.) स्थापन.

स्थायिक (सं. पु. ना.) उपरी नव्हे असा मनुष्य तो.

स्थायी (सं. पु. ना.) स्थायिक. २ (वि०) कोणेक स्थळीं कांहींकाल राहणारा जो तो.

स्थावर (सं. वि०) ज्याचे अंगीं ईश्वरानें संचारशक्ति ठेविली नाहीं असे जे वृक्ष, पर्वत, काष्ठ, पाषाण, इ० पदार्थ ते प्रत्येकीं. २ ज्याचा उपभोग जागचेजागीं करावा लागतो, जो राहिजे तिकडे नेतां येत नाहीं असा जो घर, शेत, वतन, इ० तो.

स्थिति (सं. स्त्री. ना.) द्रव्यक्रियादिरूप अधिकरणातें धरून जी अर्थाची विद्यमानता ती. कोणेकानें स्थितीवर येणें, असणें इ० जशी असावी तशी योग्य जी स्थिति ती. २ जगाची उत्पत्ति झाल्यापासून विनाश होईल तोंपर्यंत जी मधली अवस्था ती.

स्थिर (सं. वि०) जी एक धरलेली स्थिति तेथून इकडे तिकडे चलन न पावतां त्याच स्थितीवर कांहींकाल विद्यमान जो तो. २ होणें, जाणें, करणें इ० विषयीं प्रयोजक जो वेग तो ज्याचे अंगीं अल्प आहे असा जो तो. ३ स्थावर.

स्थिरस्थावर (सं. वि०) राजक्रांति, क्रोध, संभ्रम इ० करणामुळें जी गडबड असते ती जाऊन एथे स्थितीवर आला जो राज्य, मनुष्य, अंतःकरण इ० तो. २ (न. ना.) ती गडबड जाऊन जी स्वस्थता तें.

स्थूळ (वि०) स्थूल.

स्थूल (सं. वि०) सूक्ष्म नव्हे तो.

स्थैर्य (सं. न. ना.) स्थिरपणा.

स्नान (सं. न. ना.) देहशुद्ध्यर्थ जलादिकेंकरून शरीर धुवावें किं० तदभावीं भस्मादि शुद्धिकारक पदार्थांनीं लिप्त करावें इ० रूप जो शरीरास संस्कार करितात तें.

स्नानसंध्या (सं स्त्री. ना.) स्नान आणि संध्या एतत्पूर्वक जे देवपूजा, जप, जाप्य इ० कर्म तें.

स्नेह (सं. पु. ना.) चूर्णादि पदार्थांचा गोळा व्हायास कारणीभूत जो वस्तपदार्थनिष्ठ गुणविशेष असतो तो. २ धान्यकाष्ठादि पदार्थांचे अंगीं जो तैलांश असतो तो. ३ कोणेकाचा कोणेकाशीं मित्रभाव तो.

स्नेही (सं. वि०) ज्यांचा परस्पर स्नेहभाव आहे ते परस्पर.

स्पंद (सं. पु. ना.) गति.

स्पर्धा (सं. स्त्री. ना.) आपल्या उत्कर्षानें याला अपकृष्ट करीन किं० याची बरोबरी करीन असा जो कोणेकानें कोणेकाशीं भाव धरिला तो.

स्पर्श (सं. पु. ना.) कोणेक पदार्थ कोणेक पदार्थाशीं लागल्यानें त्याचा ध्यास संबंध होतो त्याचें जें आरंभावस्थेंतील स्वरूप तो. २ त्वगिंद्रियानेंच ज्याचें प्रत्यक्ष होतें असा जो पदार्थनिष्ठ गुण तो. ३ लेश याअर्थी प्रयोग करितात. ४ ककारापासून मकारापर्यंत जे पंचवीस वर्ण ते प्रत्येकीं. ५ परीस ह्मणून जो पाषाण तो.

स्पर्शमणि (सं. पु. ना.) परीस ह्मणून जो मणि तो.

स्पष्ट (सं. वि०) संदेहरूपता ज्यामध्यें नाहीं असा अभिव्यक्तरूपेंकरून जो कोणेक अर्थ तो.

स्पष्टवक्ता (सं. वि०) भिड, मुरवत इ० न धरितां मनांत येईल ते स्पष्ट बोलण्याचा स्वभाव ज्याचा तो.

स्पष्टीकरण (सं. न. ना.) कोणेक अर्थ स्पष्ट करण्याचा व्यापार तें.

स्पृहा (सं. स्त्री. ना.) कोणेक अर्थाविषयीं जी इच्छा ती.

स्फटिक (सं. पु. ना.) शुभ्र तेजस्वी असा एक पाषाण आहे.

स्फीति (सं. स्त्री. ना.) प्रशंसा.

स्फुंज (पु. ना.) (ग्रं०) फुंज.

स्फुट (सं. वि०) स्पष्ट. २ मोठ्या ग्रंथांत बांधला गेला नाहीं असा जो श्लोक, वाक्य, कथा इ० तो.

स्फुंदणें (धा. ना.) रडण्याचा वेग आवरून गेलें असतां आवरेनासा होऊन श्वासाची गति विलक्षण होत्ये असा जो कांहीं विकार होतो तद्विशिष्ट कोणेकानें होणें.

स्फुरण (सं. न. ना.) विद्युल्लता, रत्न, अग्नि इ० संबंधी जें तेज त्याचें, किं० नेत्र, बाहु इ० शरीरावयवसंबंधी कातडीचें जें कंपन तें. २ युद्ध, वाद दान इ० कांविषयीं जो उत्साह, क्रोधविशेष यांचा हृदयांत आविर्भाव होऊं लागला ह्मणजे त्याबरोबर कंपस्वरादिकारक जो विकारविशेष शरीरांत होतो तें. ३ बुद्धीच्याठायीं संस्काररूपेंकरून स्थित जो विषय त्याचें तत्तत्समयीं जें आविर्भवन तें. ४ (ग्रं०) नामरूपात्मक दृश्यादृश्य सकलजगताचे उत्पत्तीस हेतु कल्पिलें आहे जें ब्रह्मस्वरूपीं अहंब्रह्म असें मायास्वरूप तें.

स्फुरणें (धा. ना.) कोणेक अर्थानें द्वितीयार्थांवांचून स्फुरणविशिष्ट होणें.

स्फुरद्रूप (सं. वि०) वर्त्तमानकाळीं स्फुरतो आहे असा जो विद्युल्लतादिसंबंधी तेज किं० तद्विशिष्ट विद्युल्ल-

तादि किं० विद्याशास्त्रादिरूप कोणेक अर्थ तो.

स्फुलिंग (सं. पु-ना.) अग्नीची ठिणगी.

स्फूर्ति (सं. स्त्री. ना.) स्फुरणद्वितीयार्थवाचक. [विषयाची स्मृति तो.

स्मर (सं. पु. ना.) मदन. २ कोणेक

स्मरण (सं. न. ना.) अनुभूत होऊन संस्काररूपेंकरून अंत:करणांत राहिला असतो जो कोणेक विषय त्याचें पुन: उद्बोधक कांहीं झाल्यामुळें होतें जें ज्ञान तें. २ अनुभूत जो अर्थ तो संस्काररूपेंकरून राखून ठेवण्याची जी अंत:करणशक्ति तें. ३ अनुभूत विषय संस्काररूपानें ज्याचे ठायीं राहतो असें जें अंत:-करणवृत्तिरूप अधिकरण तें. ४ ईश्वरादिकांचें जें नामसंकीर्तन तें. ५ दूर राहणारा जो मित्रादिक त्यास आपलें स्मरण राहावें म्हणून जें त्यास अलंकारादि वस्तु देतात त्यास म्हणतात.

स्मशान (न. ना.) श्मशान.

स्मारक (सं. वि०) कोणेक विषयातें स्मरणविषय करून देणारा जो पुरुष, शब्द, लेख इ० तो.

स्मित (सं. न. ना.) मुखाचा फार विकास न करितां मुखांतले मुखांत किंचित् जें हास्य तें.

स्मृति (सं. स्त्री. ना.) स्मरण. २ धर्मशास्त्रप्रतिपादक जे मन्वादि ऋषींचे ग्रंथ ते किं० तत्संबंधी वाक्यें तीं प्रत्येकीं.

स्यंदन (सं. पु. ना.) रथ.

स्त्रव (सं. पु. ना.) स्राव.

स्राव (सं. पु. ना.) कांहीं एकापासून स्रवतो जो द्रवांश तो.

स्रोत (सं. पु. ना.) प्रवाह.

स्व (सं. न. ना.) मी एतच्छब्दवाच्य जो आपण तो. २ पैका किं० तद्रूपेंकरून मानिलेलें जें अलंकार, वस्त्र, पात्र, गृह इ० तें. ३ आपला.

स्वकपोलकल्पित (सं. वि०) मूलभूत प्रमाण नसतां केवळ आपल्याच कल्पनेनें रचित जो ग्रंथादि तो.

स्वकष्टार्जित (सं. वि०) स्वत: कष्ट करून संपादिलेला जो द्रव्यादि पदार्थ तो. [आप्त जो कोणी तो.

स्वकीय (सं. वि०) स्वीय. २ आपला

स्वच्छ (सं. वि०) निर्मळ.

स्वच्छंद (सं. पु. ना.) प्रवृत्तिनिवृत्तीविषयीं जो आपल्या अंत:करणाचा झोंक तो. २ स्वच्छंदी. ३ (अव्य०) स्वच्छंदानुरोधानें वागणें; वर्तणें इ० कांचें वि०. [जन तो.

स्वजन (सं. पु. ना.) आत्मीय जो

स्वत: (अव्य०) खुद्द आपण. २ दुसरा कोणी प्रवर्तक नसतां आपल्याआपण. ३ दुसरें कांहीं निमित्त नसतां स्वभावेंकरून. उ० दूध स्वत: गोड, त्यांत साखर पडल्यावर मग काय विचारतां. [पल्या आधीन जो तो.

स्वतंत्र (सं० वि०) परतंत्र नव्हे, आ-

स्वत:प्रमाण (सं. वि०) प्रामाण्यार्थ इतर प्रमाणाची ज्यास अपेक्षा नाहीं असा जो वेद तो.

स्वत:सिद्ध (सं० वि०) मनुष्यादिकाचे कृतीनें झालेला नव्हे असा

आपल्याआपणच सिद्ध झालेला जो पदार्थ तो.

स्वतां (अव्य०) स्वतः.

स्वत्व (सं. न. ना.) घर, दार, वतन द्रव्य इ० जो आपला म्हणून कोणेक अर्थ त्याजवर असतो जो आपलेपणा म्हणून धर्म तें.

स्वदस्तूर (न. ना.) कोणेक खत पत्र इ० कांवर असतो जो आपल्या हातानें लिहिलेला लेख तें. २ (वि०) आपल्या हातानें लिहिलेलें जें खतपत्र इ० तो.

स्वधर्म (सं. पु. ना.) ब्राह्मणादि जातींचे ठायीं वर्णाश्रमाद्यनुरोधानें, शास्त्रानें जो ज्यास विहित धर्म असतो तो त्याचा किं० अर्थमात्राचेठायीं जो अव्यभिचारि गुणादि असतो तो. २ (ग्रं०) ब्रह्म जें आपलें स्वरूप तें यानवानें जाणून तद्रूप ऐसेंच आहे तें व्हावें याविषयींचा कर्तव्य व्यापार तो.

स्वप्न (सं. पु. न. ना.) जागृतींतील इंद्रियांचा लय झाला असतां एकटें अंतःकरणच इंद्रियादि सर्व प्रपंचरूपी होऊन त्या प्रपंचाचा अनुभव घेत असतें अशी जी मनुष्यादि जीवास अवस्था प्राप्त होते तो. तें. किं० त्या अवस्थेंत तो भासतो जो प्रपंच तो. तें.

स्वप्नावस्था (सं. स्त्री. ना.) स्वप्नरूप जी अवस्था ती. २ स्वप्नामध्यें जो वीर्यपात होतो ती.

स्वप्रकाश (सं. वि०) स्वयंप्रकाश.

स्वप्रभ (सं. वि०) स्वप्रकाश.

स्वभाव (सं. पु. ना.) अर्थमात्राचे ठायीं अर्थनिष्ठ वृत्तींचा नियामक जो, त्या त्या अर्थाचे बरोबर उत्पन्न झालेला असतो धर्मविशेष तो.

स्वभावतः (सं. अव्य०) स्वभावेंकरून.

स्वभावसिद्ध (सं. वि०) त्या त्या अर्थाचा जो स्वभाव त्याच कारणानें त्या अर्थावर सिद्ध झाला असतो जो गुणादि तो.

स्वयंज्योति (सं. वि०) स्वप्रकाश.

स्वयंपाक (सं. पु. ना.) भोजनार्थ आपल्या हातानें करितात जो भात, भाजी, भाकर इ० अन्नाचा पाक तो. २ सैंपाक.

स्वयंप्रकाश (सं. वि०) आपल्याच प्रकाशानें प्रकाशमान जो अग्नि, सूर्य इ० तो. २ (ग्रं०) ब्रह्म.

स्वयंभ (वि०) स्वयंभू. २ (ग्रं०) ब्रह्म.

स्वयंभू (सं. वि०) स्वतःसिद्ध जें शिवलिंगादि तो. २ कोणी अर्चाच्यानें स्थापित नव्हे अशी शिवलिंगादि देवमूर्ति तीस म्हणतात. ३ ब्रह्मदेव.

स्वयंवर (सं. पु. न. ना.) वधूनें आपले मनास येईल तो वर वरावा किं० पराक्रमादि परीक्षार्थ पित्रादिकानीं केला असतो जो कांहीएक पण तो जिंकील त्यास वरावें अशा संकेतानें कन्येचा करितात जो विवाह तो. तें.

स्वयें (अव्य०) स्वतः.

स्वर (सं. पु. ना.) उच्चता नीचता या भेदेंकरून भिन्न होतात जे कंठ, तंतुवाद्य, इ० जन्य ध्वनींचे भेद ते

प्रत्येकीं, त्यांत षड्ज ऋषभादि सात भेद विशेष नामांकित आहेत. २ दोन नाकपुड्यांतून वाहतात जे वायु ते प्रत्येकीं. अ आ इ०क जे सोळा वर्ण ते प्रत्येकीं.

स्वरूप (सं. न. ना.) कोणेक अर्थाचें व आपलें जें रूप तें. २ रूप. ३ (ग्रं०) परब्रह्म.

स्वर्ग (सं. पु. ना.) मृत्युलोकीं ज्याणें पुण्य केलें असत त्याणें मरणोत्तर त्या पुण्य कर्माचे फलाच जेथें जाऊन उपभोग करावा असा इंद्रादि देवानीं अधिष्ठित लोक आहे; ज्याची संस्था या भूर्लोकापासून वर आहे तो. कोणेकाचे दोन बोटें स्वर्ग उरणें ह्म० संपत्यादिकामुळें गर्वित होणें.

स्वर्गीन (अव्य०) (ग्रं०) दुरून.

स्वर्ण (सं. न. ना.) सुवर्ण.

स्वल्प (सं. वि०) अल्प.

स्वसणें (धा.ना.)(ग्रं०) श्वास टाकणें.

स्वसंतोषें (अव्य०) केवळ आपल्याच संतोषानें काहींएक करणें, जाणें, लिहून देणें, इ०कांचें वि०.

स्वसत्ताक (सं. वि०) आपला स्वामिसंबंध ज्याजवर आहे असा जो कोणेक अर्थ तो.

स्वसत्तात्मक (वि०) स्वसत्ताक.

स्वसंवेद्य (सं. वि०) जो दुसऱ्यास सांगतां येत नाहीं, केवळ मनानेंच जाणायाचा असा जो आत्मानुभव इ० तो. २ (ग्रं०) (न.) परब्रह्म.

स्वसो (पु. ना.) (ग्रं०) संशय.

स्वस्त (वि०) स्वंग. २ स्वस्थ.

स्वस्ता (वि०) स्वंग.

स्वस्ति (सं. अव्य०) कल्याणार्थक हें अव्यय आहे, आशीर्वाद देणें इ० प्रसंगीं याचा प्रयोग होतो.

स्वस्तिक्षेम (सं. अव्य०) नाश, उपद्रव, इ० न होतां यथास्थितपणानें असणें इ०कांचें वि०.

स्वस्थ (सं. वि०) क्षोभ, विकार, घाई, गडबड, इ० रहित होत्साता समाधानवृत्तीनें किं० प्रकृतिरूप वृत्तीनें स्थित तो. २ स्वंग.

स्वहित (सं. न. ना.) आपलें जें हित तें.

स्वागत (सं. न. ना.) आपले घरीं जो कोणी आला त्याचा, तुम्ही आलां हें बरें झालें, यावें, बसावें, इ० रूप सत्कार करितात तें.

स्वांतःकरण (सं. न. ना.)(ग्रं०) लिंगदेह.

स्वातंत्र्य (सं. न. ना.) स्वतंत्रपणा.

स्वाद (सं. पु. ना.) रुचि. २ पदार्थाचे अंगीं जो वास असतो त्याविषयींही प्रयोग करितात.

स्वादिष्ट (वि०) स्वादविशिष्ट.

स्वादु (सं. वि०) मधुर.

स्वाभाविक (सं. वि०) स्वभावसिद्ध. २ (अव्य०) विशेषरूपेंकरून कोणेक उद्देश न धरितां एरवीं.

स्वामित्व (सं. न. ना.) धनीपणा. २ शेत, वाडी, ग्राम, पेंठ, इ० संबंधी जो मामलत, अकार, इ० व्यवहार सरकारांतून ज्याणें मक्त्यानें आपणाकडे करून घेतला असतो तशा त्या मालकापासून तो व्यवहार

दुसऱ्या कोणेक तिऱ्हाइतानें आपणा-कडे पतकरून घेतला असतां सरका-रचे देयाशिवाय निराळें जें त्या मालकास त्या तिऱ्हाइतानें कांहीं द्रव्य द्यावें लागतें तें.

स्वामी (सं. पु. ना.) ज्याचा जो धनी तो त्याचा. २ देव, गुरु, राजा, संन्यासी, तपस्वी, इ० जे मोठे त्यांस गौरवानें म्हणतात.

स्वार, स्वाँर (अर० पु.ना.) घोडेराऊत. अश्वादिकांवर स्वार होणें म्ह० आरूढ होणें.

स्वारस्य (सं. न. ना.) भाषणादिकांचे अंगीं असतें जें रुचिविशिष्टत्व तें. २ कोणेक व्यवहारांत असावी जी गोडी, जिच्या योगानें कार्यानें आस्थापूर्वक प्रवृत्त व्हावें तो.

स्वाँरी, स्वारी (अर०फा० स्त्री.ना.) कोणेक स्थलीं गमनार्थ अश्वादिकांवर जी आरूढता ती. २ अश्वादि यानावर बसून जाणारी जी मनुष्यव्यक्ति ती. ३ राजादि श्रीमंत लोक बाहेर जात असतां त्यांचे बरोबर चालायाचें जें घोडीं, पालख्या, वाद्यें, स्वाँर, पायदळ, मनुष्यें, इ० खटलें तीं. ४ तशा खटल्यानिशीं गमनागमन करायाचे योग्यतेचा जो राजा किं० सरदार इ० थोर लोक त्या एका व्यक्तीसही म्हणतात. ५ मनुष्यादि व्यक्तीस प्रशंसेनें बोलायाचें असतां याचा प्रयोग करितात. ६ श्मशानभूमीस जात असतां संकेतानें प्रेतास म्हणतात.

स्वार्थ (सं. पु. ना.) हित. स्वार्थ सुटणें म्हणजे लोभ उत्पन्न होणें.

स्वार्थी (सं. वि०) दुसऱ्याचें अहित झालें तरी होवो परंतु आपला स्वार्थ करीत असावें असा स्वभाव ज्याचा तो.

स्वास्थ्य (सं. न. ना.) स्वस्थपणा. २ प्रपंचनिर्वाहोपयोगी राजादिकांपासून संपादिलें असतें जें ग्राम, भूमि, वर्षासन, इ० कांहीं उपजीविकासाधन त्यास म्हणतात.

स्वीकार (सं. पु. ना.) अंगीकार.

स्वीय (सं. वि०) आत्मीय.

स्वेच्छ (सं. वि०) आपल्याच इच्छेनें वर्तणारा जो तो. २त्याचें वर्तनादि तो.

स्वेच्छाचारी (सं. वि०) स्वेच्छ.

स्वेत, तू (पु. ना.) (प्रं०) सेतु.

स्वेद (सं. पु. ना.) घर्म, घाम.

स्वैर (सं. वि०) स्वेच्छ.

स्वैरिणी (सं. स्त्री. ना.) व्यभिचारिणी.

---

## —ह—

ह— हा वर्ण तेतिसावें व्यंजन आहे.

हैं (अव्य०) हाँ.

हकनहक, नहाक (अव्य०) नाहक.

हकनाकू, नहाक (अव्य०) नाहक.

हकाटा (पु. ना.) हाकाटा.

हकालणें (धा. ना.) हाकालणें.

हकीकत (अर० स्त्री. ना.) वाका.

हकीगत (स्त्री. ना.) हकीकत.

हकीम (अर० पु. ना.) वैद्य. २ हाकीम.

हक्क (अर० पु. न. ना.) स्वत्व. २ दे-

शमुख, देशपांड्ये, शेटे, महाजन, इ० जे देशादिकाचे स्वामी त्यांस प्रतिवर्षी किं० त्या त्या व्यवहाराचे निमित्तानें जें नियमित द्रव्यादि द्यावें लागतें तो. तें.

हगवण (स्त्री. ना.) वारंवार हगत असावें अशी जी कोणेकास विकृति प्राप्त होते ती. २ कांहींएक पदार्थ कोणेकापासून पुनः पुनः तोच तोच उत्पन्न होऊं लागला असतां त्याचे उत्पत्तीस निंदेनें ह्मणतात.

हगवणें (धा. ना.) कोणेकाचे मनांत द्रव्यादि द्यावयाचें नसतां बलात्कारादिकानें तें त्यापासून काढणें.

हंगाम (फा० पु. ना.) धान्यादि पदार्थ किं० कोणेक व्यवहार इत्यादि त्यानीं प्रचुरपणीं उत्पन्न होत असावें, विकावें, चहूंकडून येत असावें, सर्वत्र होत असावें, इ० विषयीं ज्याचा त्याचा मुख्यसमय तो.

हंगामशीर (अव्य०) हंगाम न जाऊं देतां त्यांतच जिन्नस घेणें इ०काचें वि०.

हजामत (अर० स्त्री. ना.) वस्त्रा, कात्री, येणेंकरून डोकी, दाढी, मिशी, एतत्संबंधी केश काढण्याचा व्यापार ती. २ ते काढायाचे जे केश त्यांस ह्मणतात. ३ गालिप्रदानादिद्वारा जी कोणेकाची फजिती ती.

हजारी (फा० स्त्री. ना.) ज्यास भोकें पुष्कळ राखिलीं असतात असा कारंज्याचे तोटीवर लावायासाठीं पदार्थ केला असतो ती.

हजारीकारंजें (न. ना.) ज्यापासून हजारों धारा एकसमयावच्छेदेंकरून निघाव्या असें जें कारंजें केलें असतें तें.

हजारों (वि०) एक हजार, दोन हजार, अशा प्रकारें हजार या संख्येनें मेजायाजोगा जो कोणेक अर्थ तो.

हजारोंहजार (वि०) हजारों.

हजीर (अर० वि०) कोणेक अर्थ सिद्ध अशा रूपानें सन्निहित तो. कोणेक अर्थ हजिर करणें इ० हा घ्या म्हणून जवळ आणून देणें.

हजीरजबाब (फा० पु. ना.) प्रसंगीं समयोचित जें उत्तर तो.

हजीरजामीन (फा० पु. ना.) चोर इ० अपराधी किंवा कर्जकरी यांस मोकळें सोडायाचें असतां तो आपणास पुनः भेटणार नाहीं ह्मणून कराराप्रमाणें हजीर करून देणारा असा घेतात जो जामीन तो.

हजीरमजालस (फा० स्त्री. ना.) ज्या कचेरीस पंचाईत इ० कोणेक व्यवहार होत असतो त्या कचेरीस त्या समयीं विद्यमान जो मनुष्य तो. २ (अव्य०) चौघांसमक्ष कांहींएक करणें इ०कांचें वि०.

हजीरी (फा० स्त्री. ना.) ज्या कर्मादिकाचे ठायीं असायाचे जे मनुष्य, पशु, शस्त्र, भांडें, इ० पदार्थ त्यांचीं हे हजीर आहेत असा रूपेंकरून जी तेथें तेथें गणति ती. कोणेकाची कोणेकापाशीं हजीरी लावणें इ० विवक्षित रूपेंकरून त्यास त्यापाशीं विद्रित करणें.

हट (सं. पु. ना.) हठ. २ कोणेकाचा कोणेकाशीं असतो जो द्वेष तो.

**हटकणें** (धा.ना.) कोणेकास हाकेनें अभिसंबद्ध करणें. २ तुम्ही कोण, कोठील, कोठें जातां, काय करितां, इ० रूप भाषणानें कोणेकास अभिसंबद्ध करणें.

**हटकून** (अव्य०) प्रतिज्ञापूर्वक काहींएक करणें, बोलणें, सांगणें, इ०कांचें वि०. २ अवर्जून.

**हटणें** (धा. ना.) मागें सरणें. २ वरण, पुरण, इ० अहाटणें. [तो.

**हटवाद** (पु.ना.) अनिशयित जो हट

**हट्ट** (पु. ना.) कोणेक गोष्टीविषयीं हें करावें किं० हें नये करूं असें जें एकवार मनांत आलें असतें तद्विषयीं अर्थनाशादि काय होईल तें होऊ परंतु करीनचकरीन किं० नाहींच करणार असा धरिला असतो जो आग्रह तो. (सं.) बाजारप्रथमार्थी.

**हट्टी** (वि०) हटखोर.

**हठयोग** (सं.पु.ना.) प्राणवायूचा निरोध करून तद्द्वारा अंतःकरणवृत्ति एकाग्र करण्याचा शास्त्रोक्त एक उपाय आहे तो. २ सतत एका पायावर उभें राहावें, अधोमुख होऊन धूम्रपान करावें, बाहु निरंतर ऊर्ध्व धरावे, इ० रूप दुष्कर घोर जें तप त्यास म्हणतात.

**हडकणें** (धा. ना.) ओलें जें वस्त्र काष्ठ, इ० त्याणें थोडें बहुत वाळणें.

**हडप** (न. ना.) व्यवहारामध्यें जकात इ० संबंधी काहीं देय कोणेकाचें द्यावयाचें असतें तें न वारितां तो आपल्यास सोडीत नाहीं म्हणून विश्वासार्थ त्याजपाशीं जें काहीं दुसरें वस्तु मोबदला देऊन ठेवितात तें. २ गहाण. ३ (ग्रं०) पानदान.

**हडपी** (पु. ना.) (ग्रं०) राजादिकांजवळ त्यास लागेल तेव्हां विडा देणारा असतो तो.

**हडबड** (स्त्री. ना.) (ग्रं०) दंगा इ० कारणानें होत्ये जी कोणेकाची गडबड ती.

**हडसणें** (धा. ना.) पोतें इ०कांत भरलेले दाणे, विणलेले तंतु, इ० पदार्थांनीं घट्ट बसावें म्हणून हालवणें किं० आपटणें इ० क्रियाद्वारा आंचक्यानीं विशिष्ट करणें. २ तटकारणें. ३ कापडकऱ्यानें गिऱ्हाइकास सनंग देत्ये समयीं हें तुला लखलाभ होवो असें म्हणून खाली आपटणें.

**हत** (सं. वि०) काठी इ० कानें ताडिला तो. २ कोणेकानें ठार मारिला किं० मेला जो तो.

**हततुक** (स्त्री. ना.) (ग्रं०) अजमास.

**हतदैव** (सं. वि०) दैवहीन.

**हतभाग्य** (सं. वि०) हतदैव.

**हतवीर्य** (सं. वि०) ज्याचें अंगीं वीर्य राहिलें नाहीं असा जो मनुष्य, औषध इ० तो. [मिश्र.

**हतासन** (न. ना.) (ग्रं०) निमित्त,

**हतियार** (न. ना.) (ग्रं०) हत्यार.

**हतिवा** (पु. ना.) (ग्रं०) हातदिवा.

**हतेर** (न. ना.) हत्यार.

**हत्ता** (पु. ना.) दंड काढत्येसमयीं हाताखालीं धरायाकरितां विटेच्या आकाराचें लांकूड, दगड इ० काचें

किं० भुईवर आथ्यासारिखे साधन-भूत जे करितात ते प्रत्येकीं.

हत्ती (सं. हस्ती) (पु. ना.) सर्व प-शूंपेक्षां आकारानें मोठा असा एक वन्यपशु आहे, ज्याला राजादिक वाहनार्थकरून बाळगीत असतात तो. २ हस्त म्हणून जें महा नक्षत्र त्यास म्हणतात.

हत्तीचेंमंडें (न. ना.) मोठेपणामुळें दुर्निर्वह जें कांहींएक संसारादि ख-टलें त्यास म्हणतात.

हत्या (सं. स्त्री. ना.) मनुष्यादिकां-चा जो वध तो आणि तज्जन्य जें पातक तें. २ केवळ मरतुकडा जो मनुष्यादि त्यास निंदेनें म्हणतात.

हत्यार (न. ना.) शस्त्र.

हत्यारबंद (वि०) ज्याचे जवळ तर-वार इ० हत्यार आहे असा जो प्यादा, स्वार इ० शिपाई तो.

हत्यारा (वि०) ज्यास हत्या घडली आहे तो, प्राय: समासीं प्रयोग. उ० बाळहत्यारा, ब्रह्महत्यारा, स्त्रीहत्यारा इ०.

हदरणें (धा. ना.) एका स्थळीं आ-घातादि झाल्यामुळें त्याचे आसमंतात् प्रदेश सुद्धां त्या भूमि इ० कांनीं कंपविशिष्ट होणें.

हद्द (अर० स्त्री. ना.) सीमा. [२ ही.

हन (अव्य०) (ग्रं०) आणि, आणखी

हनन (सं. न. ना.) तरवार इ०कें-करून कोणेक पदार्थ तोडण्याचा व्यापार तें. २ काठी इ० कें करून जें ताडन तें. ३ शस्त्रादिकें करून कोणेकास ठार मारण्याचा व्यापार तें.

हनवटी (स्त्री. ना.) हनुवटी.

हनु (सं. स्त्री. ना.) हनवटी.

हनुवटी (स्त्री. ना.) खालचे ओंठाचे खालीं जो उंच अवयव असतो तो.

हप्ता (फा० पु. ना.) सरकार किं० सावकार यांचें द्यावयाचें जें द्रव्य तें एकदांच द्यावयास अनुकूळ पडत नाहीं म्हणून थोडथोडें द्यावयास जे कालावधि नियमित केले असतात ते प्रत्येकीं आणि त्या त्या अवधीस द्या-वयास ठरविला असतो जो द्रव्यांश तो.

हप्तेबंदी (फा० स्त्री. ना.) हप्त्याचा जो ठराव केला असतो ती.

हंबरडा (पु. ना.) गाय, बैल इ० कांचा जो स्वजातीय मोठा शब्द तो.

हंबरणें (धा. ना.) गाय बैल यांणीं स्वजातीय शब्द करणें.

हंबेतुंबे (स्त्री. न. ना.) अरेतुरे.

हबेलंडी (स्त्री. ना.) कांहींएक संकट, दुखणें इ० कारणामुळें कोणेकाची होते जी दुरवस्था ती.

हमखास (अर० अव्य०) सर्वत्र प्र-सिद्धपणें. २ खामाखाय.

हमजात (स्त्री. ना.) मनुष्यादिकांची जी जाति ती.

हमरस्ता (फा० पु. ना.) सर्व जेथ मार्गानें जात येत असतात असा जो राजमार्ग तो. [हंबेतुंबे.

हमरातुमरी, हमरीतुमरी (स्त्री. ना.)

हमाल (अर० पु. ना.) पेठ, बंदर, इ० कांच्याठायीं धान्यादिकांचें ओझें

आपल्या अंगें इकडचें तिकडे, तिकडचें इकडे अशा प्रकारें मजुरीनें वाहून उपजीविका करितो जो पुरुष तो. २ मेणा, डोली, इ० वाहणारा जो भोई त्यास कचित् म्हणतात.

हमाली (स्त्री. ना.) हमालपणा. २ हमालास द्यावी लागत्ये जी मजुरी ती.

हमी (अर० स्त्री. ना.) देणें, घेणें, इ० व्यवहारीं याणें तुला द्यावयाचें तें न दिल्यास मी जातीनिशीं देईन किं० याणें करायाचें तें न केल्यास मी खुद्द करीन या प्रकारचें जें आपल्या खातरीसाठीं तिसऱ्याचें वचन घेतात ती.

हमेश, हंमेश, | ( फा० अव्य० )
हमेशा, हंमेशा | नित्यशः.

हय (सं. पु. ना.) घोडा.

हयगई, गय, गयी (स्त्री. ना.) कोणेक कर्तव्य कार्याविषयीं अगत्य धरून जेव्हांचे तेव्हां करावें तें न करितां आज करूं, उद्यां करूं, एव्हां नाहीं केलें तर काय होतें इ० रूप करितात जी अनादरबुद्धि ती.

हयासयेणें, आणणें (धा. ना.) मद्यास येणें, आणणें.

हयासा (पु. ना.) घोड्याचा तंग आवळणें इ० उपयोगी सुमार बोटभर रूंद आणि दोन तीन हात लांब जी वादी असत्ये ती.

हय्यंगवीन (सं.न.ना.) ताजूक लोणी.

हरउपाय (पु. ना.) नानाप्रकारचे अनेक उपाय.

हरएक (वि०) जो जो कोणी तो तो.

हरकत (अर० स्त्री. ना.) देणें, घेणें, चाकरी, इ० व्यवहारीं चालण्याची जी सरळ रीति ती सोडून विरुद्ध रीतीनें जें प्रतिकूल वर्तन तें. २ होणारे कार्यास प्रतिकूल वर्तनानें कोणी करितो जें विघ्न तें.

हरकसबी (वि०) अनेक प्रकारचीं कसबें ज्याचे अंगीं आहेत तो. २ हरकामी प्रथमार्थी.

हरकाम (न. ना.) प्रसंगवशात् उपस्थित होणारें काम तें.

हरकामी (पु. ना.) जें पडेल तें काम करावें अशा बोलीनें ठेवितात जो मनुष्य तो. २ (वि०) जें म्हटलें तें काम ज्याचे अंगीं आहे असा जो मनुष्य तो आणि अनेक कामांवर उपयोगी पडायाजोगा जो शस्त्र, वस्त्र, पात्र, इ० पदार्थ तो.

हरकारा (फा० पु. ना.) कचित् स्थळीं कागद, निरोप, इ० पोहोंचवावा किं० कोणेकास बोलावून आणावें, कोणेकास कांहीं गोष्टीविषयीं ताकीद करावी, इ० कामावर ठेवलेला जो राजा, सरदार, इ० कोणाशीं सेवक, मनुष्य असतो, ज्याचे हातीं गोंडा लाविलेली काठी असत्ये तो.

हरकी ( सं. हर्ष ) (स्त्री. ना.) वादी किं० प्रतिवादी यांतून ज्याचा वाद खरा होतो तो आपणास हर्ष झाल्यामुळें जें सरकारास कांहीं द्रव्य देतो ती. २ हरवलेली वस्तु सांपडली किं० मोठा कांहीं लाभ झाला, इ० कारणानें आपणास हर्ष झाला असतां हरवलेली वस्तु देणारा किं० ज्यापासून लाभ होतो तत्संबंधी चा-

कर माणसें, इ० किं० आपले इष्ट मित्र, इ० त्यास जें कांहीं द्रव्यादि देतात तें.

**हरकोणी** (वि०) भलता कोणी.

**हरघडी** (अव्य०) वारंवार.

**हरजिन्नस** (पु. ना.) अनेक प्रकारचा जिन्नस तो.

**हरण** (सं. अप. पु. न. ना.) हरिण. २ हरणी. ३ ऐरण. ४ (न. सं.) कोणेकाचे द्रव्याचा जो अपहार तें. ५ कोणेक अधिकरणापासून कोणेक अर्थ नेण्याचा व्यापार तें.

**हरणकाळजी** (स्त्री.ना.) कोणेक वस्तु गेली, हरवली असतां तद्विषयींची जी काळजी ती. २ (वि०) तशी काळजी ज्यास असा जो तो.

**हरणें** (धा. ना.) कोणेकाचे द्रव्यादिकांचा अपहार करणें किं० पाप, दुःख,संकट, इ०कांचा परिहार करणें. ३ वादयुद्धादि व्यापारीं तो तो आपली शक्ति दुसऱ्यावर चालवावी अशी इच्छेनें प्रवृत्त असतो जो कर्त्ता त्याणें ती शक्ति चालेनाशी झाल्यामुळें थकणें. ४ द्यूतादि व्यवहारीं पणास मांडलेलें जें द्रव्यादि तें आपण जिंकणें. मी हरलों इ० दुसऱ्यानें जिंकिल्यामुळें हारीनें विशिष्ट झालों.

**हरतऱ्हा** (स्त्री. ना.) अनेक तऱ्हा.

**हरताळ** (पु. ना.) हरितालं. पेठ, बाजार, इ० कांत हरताळ पाडणें म्ह० सरकारी उपद्रव इ० कांहीं कारणामुळें वाणी इ० वदम्यानीं आपलालीं दुकान लावून व्यवहार बंद करणें. कोणेक पदार्थाची हरताळ पडणें म्ह० तो तो पदार्थ कांहीं कारणामुळें दुर्मिळ होणें.

**हरदम** (फा० वि०) सदा.

**हरदू** (फा० वि०) दोघेजण.

**हरद्र** (न. ना.) हार्द.

**हरपणें** (धा. ना.) कोणेक अर्थानें आपल्यापासून पतनादि कारणानें वियुक्त होऊन अज्ञात ठिकाणीं लागणें.

**हरप्रयत्न,प्रेत्न** (पु.ना.)कोणेक कार्याविषयीं अनेक प्रकारचे प्रयत्न ते.

**हरंबळणें** (धा.ना.)(ग्रं०) तळमळणें.

**हरभाँस** (फा० वि०) अष्टपैलू जो मनुष्य तो. २ हरजिनशी. [युक्ति.

**हरयुक्ति** (स्त्री. ना.) नानाप्रकारच्या

**हरवखत** (अव्य०) हरघडी.

**हरवणें** (धा. ना.) द्रव्य, वतन, प्रतिष्ठा इ० आपल्यापाशीं असतें जें कांहींएक तें; द्यूत खेळणें,अनवधानतेमुळें भलतेथें विसरणें इ० कोणेक कारणानें गमावणें. २ वाद, युद्ध इ० कांत प्रतिपक्षी जो कोणी तो हारे असा करणें.

**हरहुनर, हुन्नर** (पु.न. ना.)(फा०) नानाप्रकारचे जे हुन्नर ते.

**हरळ** (पु. ना.) वांग्या, मिरच्या इ० कांचें रोप लावायाकरितां किं० कांहीं अन्य कार्यार्थ चरासारिखी लांब खळी करितात तो. २ (न.) बारीक रेतीसारखा खडा डोळ्यांत जातो त्यास म्हणतात. [जाति आहे.

**हरळी** (स्त्री. ना.) तृणामध्यें एक

हरळीचीमुळी (स्त्री. ना.) मुख्यसंकट हीं हरळी उपटली असता तिचा बी- जभूत मूलांश यत्किंचित् तरी भुईत असतो तद्वत् एकाएकीं नाहींसा व्हा- वयाचा नाहीं असा जो कोणेक रथ- ळचा वननदार किं० वननदारपणा त्यास प्रसंगविशेषीं म्हणतात.

हराम (अर० वि०) लबाडी, लुचा- डी, फंद, फितूर इ० लोकशास्त्रविरुद्ध जें अन्याय्य कर्म किं० तादृश कर्म करणारा जो मनुष्य तो.

हरामजादा (फा० वि०) हराम. २ दुसऱ्यास ठकवावें, आपण एका- एकीं ठकूं नये असा धूर्त जो मनु- ष्यादि तो.

हरामी (अर० वि०) हरामजादा. २ (स्त्री. ना.) हरामपणा. [हानि.

हराश, ष, स (सं. ऱ्हास) (पु. ना.)

हरिख (पु. ना.) (ग्रं०) हर्ष. [रणें.

हरितणें (धा. ना.) (ग्रं०) हरण क-

हरिदास (सं. पु. ना.) ईश्वरापुढें वीणा घेऊन उभयानीं जो ईश्वराच्या किं० तद्भक्ताच्या गुणाचें कीर्तन क- रीत असतो तो.

हरीख (पु. ना.) हर्ष.

हरीफ, फ (अर० पु. ना.) शौर्यादि गुणानीं कोणेकाचें दमन करण्यास जो समर्थ तो.

हरुष, रूष (पु. ना.) (ग्रं०) हर्ष.

हर्ख (सं. अप० पु. ना.) हर्ष.

हर्ष (सं. पु. ना.) इष्टलाभ किं० अनिष्टाचा नाश झाल्यामुळें सुख होऊन अंतःकरणाचा जो प्रफुल्लित- पणा तो.

हर्षवायु (सं. पु. ना.) अतिशयित द्रव्यादि लाभामुळें हर्ष होऊन जो वायु होतो तो.

हर्षामर्ष (सं. पु. ना.) कोणेक कार- णास्तव होतो जो परस्पराचा अरेतुरे, गालिप्रदान इ० रूप व्यापार तो. २ (ग्रं०) हर्ष आणि क्रोध तो.

हल (सं. पु. ना.) नांगर.

हलक, हलक (अर० वि०) दुखणें, श्रम इ० कारणामुळें जो निःशक्त झाला तो व त्याची प्रकृति इ० तो. २ गाणाराचे गळ्यांत जी फिरक असते ती.

हलकल्लोळणें (धा. ना.) दंगा, धोपा, अग्न्युत्पात इ० भयजनक कारणा- मुळें देश, ग्राम, जनसमुदाय इ० कानीं गडबडणें.

हलका (वि०) जड नव्हे जो अर्थ तो. २ ज्यामध्यें वेगादिजन्य बळ किं० प्रमाण न्यून असा जो द्रव्यक्रियादि- रूप कोणेक अर्थ तो. ३ (पु. ना.) झोपाळा, पाळणा इ० कांच्या दोऱ्या इ० अडकवायाचे उपयोगी जे लो- खंडाचे दशाकाकार आकडे करि- तात ते प्रत्येकीं. [होणें.

हलकावणें (धा. ना.) हलकें करणें,

हलवा (अर० पु. ना.) वर थोडा थोडा साखरेचा पाक घालून हलवून अग्निसंयोगानें त्या साखरेचा वरती कांटा उभा राही असे सिद्ध केलेले जे तीळ, वेलदोड्याचे दाणे, लवंगा

इ० पदार्थ तो. २ मिठाईसारखा एक पदार्थ आहे. ३ मत्स्यांत एक जाति आहे.

हलवाई (पु. ना.) पेढे, बरफी, गाठ्या, हलवा इ० मिठाई आपण करून विकावी अशा व्यापारावर उपजीवन करितो तो.

हलाकी, खी (अर० स्त्री. ना.) उपास, दुखणें इ० कारणामुळें जो हलकपणा येतो तो. २ खर्चविचाची ओढ असल्यामुळें जी संकटावस्था होत्ये ती.

हलाल (अर० वि०) ग्रहण करणें, भक्षिणें इ० विषयीं विहित जो कोणिक अर्थ तो. हलाल करणें म्ह० यवन शास्त्रोक्तविधीनें बकरा, कोंबडा इ० काांस संस्कारपूर्वक मारणें. २ हयगय, कपट इ० न करितां शरीरास कष्ट देऊन करितात जें सेवादिरूप काम त्याचें किं० तादृश्य कष्ट करून संपादिलेलें जें द्रव्यादि त्याचें वि०.

हलासिणें (धा० ना.) (ग्रं०) हाणणें.

हलेणें (धा. ना.) (ग्रं०) बडविणें. २ मारणें.

हल्या (पु. ना.) रेडा.

हलर (पु. ना.) (ग्रं०) गान, गाणें.

हला (अर० पु. ना.) शत्रु, किल्ला इ० जिंकून आपलासा करायाकरितां सेना, सैनिक इ० कांनीं आवेशपूर्वक त्यावर एकदम चालून जाण्याचा व्यापार तो. २ कांहींएक कार्यावर आवेशपूर्वक झटण्याचा व्यापार तो.

हलीं (अर० अव्य०) प्रस्तुतकाळीं.

हवई (फा० स्त्री. ना.) मोठी जी चंद्रज्योत ती.

हवन (सं. न. ना.) देवतोद्देशानें भात तूप इ० पदार्थ अग्नींत टाकण्याचा व्यापार तें.

हवलदील (अर० वि०) अकस्मात् कांहीं मोठें संकट प्राप्त झालें किं० कांहीं मोठी हानि झाली इ० कारणामुळें घाबरें व्हावें, कांहींच सुचू नये, चित्त व्यग्र व्हावें, भ्रांत व्हावें एतदवस्थापन्न झाला जो तो.

हवळा (पु. ना.) हुळा.

हवा (अर० स्त्री. ना.) वायुनामक पंचभूतांतील भूत तो. पर्जन्य, धुकें, थंडी, उष्ण, वाऱ्याचा अतिशय किं० स्वल्पता इ० भेदकनिमित्तानें भिन्न भिन्न होत्ये जी दिक्कालावस्था ती.

हवाई (स्त्री. ना.) हाई.

हवाल (अर० पु. स्त्री ना.) देश, ग्राम, मनुष्य इ० कांची बरी वाईट जी स्थिति तो. ती.

हवाला (अर० पु. ना.) आपण सरकार सावकार इ० कांचें द्यावयाचें जें द्रव्यादिक किं० कोणेकाचें करायाचें जें कांहीं काम तें आपल्यावरचें दुसऱ्या कोणेकानें द्यावें, करावें, म्हणून त्यास मान्य करून त्याविषयींचा अधिकार जो ज्याकडे देतात तो. २ हवालदाराचा अधिकार तो.

हवार, वारा (स्त्री. ना.)(ग्रं०) शोभा.

हवारी (स्त्री. ना.) डोंगर इ० कांवर चढणें किं० धावणें इ० कारणानीं श्रम झाल्यामुळें जो लागतो दम ती.

हवाशीर (वि०) पुष्पादिकांचा सुगंध, भ्रमर, कोकिल इ० संबंधी मंजुळ मंजुळ शब्द, शीतल मंद असा सुखकर वायु इ० योगानें रमणीय जें बाग, वाडा, ग्राम इ० स्थळ तें.

हवि (सं. न. ना.) हवनोपयोगी जें घृतादि द्रव्य तें.

हवेली (अर० स्त्री. ना.) दुमजला तिमजला असें मोठें जें उंच गृह तें. २ एका प्रांतांत अनेक कसबे किं० गांव असतात त्यांमध्यें ज्याचे नांवानें प्रांत प्रसिद्ध असतो तो कसबा किं० गांव तो. [जें घृतादिक तें.

हव्य (सं. न. ना.) होमाकरितां घेतलें

हव्यकव्य (सं. न. ना.) होमहवन, श्राद्धपक्ष इ० कर्म तें.

हव्यवाट् (सं. पु. ना.) अग्नि.

हव्यास (अर० पु. ना.) कोणेक गोष्टीविषयीं अनेक प्रकारचे उद्योग करावे, तें तें कार्य सिद्ध करावें असा असतो कोणेकास छंद तो. २ (ग्रं०) इच्छा.

हशील, हशील (अर० न. पु. ना.) ग्राम, देश, जकात इ० संबंधी सरकार इ० कांस द्यावें लागतें जें देय तें. तो. २ लेख, भाषण इ० कांतील जें तात्पर्य तें.

हंस (सं. पु. ना.) एक पक्षी आहे. २ सूर्य, विष्णु, शिव यांचें नांव आहे. ३ संन्याशांत एक भेद आहे. ४ (ग्रं०) सद्गुरूस म्हणतात.

हंसडणें (धा. ना.) हालवणें, ओढणें इ० क्रियानीं कांहींएक पदार्थ आंचक्यानें युक्त करणें. २ युक्ति प्रयुक्तीनें कोणेकापासून द्रव्यादि काढणें. कोणेकास शिव्या इ० हंसडणें म्ह० देणें.

हंसणें—हसणें (धा. ना.) कोणेकानें हास्यविशिष्ट होणें. कोणेकानें कोणेकास हंसणें म्ह० त्याचें वाईट कर्म पाहून त्यास खोड्या, नांवें इ० ठेवणें

हसबी (स्त्री. ना.) रुपये इ० भरून घोड्यावर घालून न्यावयाचे उपयोगी पडशीसारिखी लहान एक पिशवी आहे ती.

हँसूँ, हसूँ (न. ना.) हंसें.

सें, हसें (न. ना.) विस्मय, आनंद इ० अंतःकरणांत झाल्यामुळें, किं० शरीरास गुदगुली इ० झाल्यामुळें अंतःकरण विकसित होऊन मुखाचा विकास व्हावा असा जो विकारविशेष होतो तें. २ उपहास.

हस्त (सं. पु. ना.) जेणेंकरून पदार्थांचें दान, ग्रहण इ० घडतें असें मनुष्यादि जीवांस कर्मेंद्रिय आहे तद्रूप जे शरीरास दोन अवयव असतात ते प्रत्येकीं. २ वर पाखाडी इ० टेकायाकरितां खांबणीचे टोकास जो लांकडाचा चापट तुकडा बसवितात तो. ३ हत्तीची सोंड तो. ४ चोवीस अंगुळेंरूप प्रमाण तो.

हस्तकौशल (सं. न. ना.) चित्रलेखनादि कांहींएक कार्य करण्याविषयीं हस्ताच्या ठायीं असतें जें कौशल तें.

हस्तकौशल्य (न. ना.) हस्तकौशल.

हस्तक्रिया (सं. स्त्री. ना.) अनुष्ठान,

प्रसंग, रसायण इ० कोणेक विषयींची हातानें करायाची क्रिया ती, हातगुण.

हस्तगत (सं०वि०) कोणेकाचे स्वाधीन झाला जो कोणेक अर्थ तो.

हस्तदोष (सं. पु. ना.) लेखामध्यें अशुद्ध किं० चुकी पडावयास कारणीभूत जो लेखकाचे हाताचा दुर्गुण तो आणि तेणेंकरून लेखांत पडतें जें अशुद्ध किं० चुकी तो.

हस्तमात्रा (स्त्री. ना.) (ग्रं०) हातामध्यें घालायाचीं कडीं तोडे इ० भूषणें तीं प्रत्येकीं.

हस्तलाघव (सं.न.ना.) हस्तकौशल.

हस्ताक्षर (सं. न. ना.) ज्याचे हातांचें लिहिलेलें जें अक्षर तें त्याचें.

हस्तिदंत (सं. पु. ना.) हत्तीचा काढलेला जो दांत तो.

हस्ती (सं. पु. ना.) हत्ती.

हस्तें (अव्य०) हातानें देणें, घेणें, इ० व्यवहारांत रुपये इ० द्रव्य जो साक्षात् आणून देतो किं० आपले पदरीं घेऊन जातो त्याचें नांव एतच्छब्दपूर्वक लेखांत लिहितात.

हस्तेंपरहस्तें (सं.अव्य०) स्वतः आपण किं० दुसऱ्याकडून कोणेकाचें कार्य करणें इ०कांचें वि०.

हळदकुंकू (न. ना.) चैत्रमासीं किं० नवरात्रादि उत्साहांत सुवासिनी स्त्रियांस हळद आणि कुंकूं इ० देण्याचा जो समारंभ करितात तें.

हळवट (वि०) हळवा आणि महान् या ज्या दोन कोटी त्यांत हळवा या कोटींत गणयाचा जो तो. २ (ग्रं०) हलका.

हळहळ (स्त्री. ना.) कांहीं वस्तु हरवणें इ० कारणानें जी अंतःकरणास दुःखावस्था प्राप्त होते ती.

हळाळ (न. ना.) हालाहल.

हळवट (वि०)(ग्रं०) हलका.

हळूवार (वि०) (ग्रं०) अल्पवार.

हळूवारपण (न. ना.)(ग्रं०)मऊपणा.

हळू (अव्य०)हलकेपणें.(वि०)हलका.

हळूहळू (अव्य०) मंदमंदपणें.

हा (वि०) सन्निहित जो कोणेक अर्थ त्याचें परामर्शक हें सर्वनाम. २ कालकृत विलंबाचे अभावद्योतनार्थ अर्थाचें वर्तमानक्षणिक जें रूप त्या रूपेंकरून कोणेक क्रियेच्याठायीं अन्वय विवक्षित असतां त्या अर्थाचें परामर्शक हें सर्वनाम. उ० तुम्ही पुढें चला, हा मी मागून येतों. ३ (अव्य०)हत्त. ४ (ग्रं०) हायहाय.

हाँ (अव्य०) कोणेकानें कांहींएक गोष्ट सांगितली असतां ती आपण ऐकिली किं० अंगीकारिली म्हणून जें उत्तर द्यावयाचें त्या स्थानीं याचा प्रयोग करितात. २ कोणेक गोष्टीविषयीं मनांत समजूत पडली किं० कोणेक गोष्ट आठवली असतां जें समाधान होतें त्याचा हा उद्गार आहे. ३ कोणेकास कोणेक गोष्टीविषयीं इशारा करायाचा असतां किं० दटावायाचें असतां याचा प्रयोग करितात.

हाक (स्त्री. ना.) दूरस्थित मनुष्यादिकानें स्वसमीप [illegible]

त्यातें उद्देशून करितात जो शब्दप्रयोग तो व तो ऐकून त्याणें दिलें जें ओ, आलों इ० रूप प्रत्युत्तर तें. २ हाकाटी. ३ किंमत इ० हाकण्याविषयींचा अतिशयोक्ति दिसायाजोगा जो शब्द तो. ४ हाक ऐकूं जायाजोगें जें मार्गप्रमाण तें. कोणेक काम हाका मारणें म्ह० दुर्दशारूप परिणामास पावणें. कोणेकानें हाका मारणें म्ह० करीत असलेल्या उद्योगाची निष्फलतारूप दशा जी तीतें पावणें. कोणेकानें कोणेकाचे नांवें हाका मारणें म्ह० त्याचे नांवें चडफडणें.

**हाँकणें, हाकणें** (धा. ना.) तोंडानें शब्द, काठीनें प्रहार इ० द्वारा अभिप्रेत स्थळ सोडून लवकर जावें असें वाटायाजोगा लागतो जो नेट तद्विशिष्ट पशुपक्ष्यादिकांस करणें. २ संसार इ० खटलें कसेंकरून चालविणें. किंमत, बातमी, गप्प, इ० हाकणें म्ह० अतिशयोक्ति दिसायाजोगें सांगणें. [कणें.

**हाकलणें, हाँकलणें** (धा. ना.) हा-

**हाकाटणें** (धा. ना.) बोभाटणें. २ कांहींएक कार्यार्थ प्रायः अनेकांस हाकांनीं अभिसंबद्ध करणें.

**हाकाटा** (पु. ना.) अनेक हाकांचा जो गलबा तो. २ बोभाटा.

**हाकारणें** (धा. ना.) शीड उभारून गलबत चालू करणें. २ कोणेकास हाकाटणें. [(ग्रं०) दौंडी.

**हाकारा** (पु.ना.) हाकाटा. २(पु.ना.)

**हाकाहाक** (स्त्री. ना.) याणें त्याला हाक मारावी, त्याणें याला हाक मारावी असा अनेक ज्या हाका होतात तो. २ रडारड. ३ कांहींएक पदार्थ सरल्यामुळें किं० असून न मिळाल्यामुळें त्याकरितां सर्वांनीं हाका माराव्या असी जी अवस्था ती.

**हाकीम** (अर० पु. ना.) ग्राम देश इ०कांवर हुकूम करण्याचा अधिकारी जो राजा, मोकाशी, किं० मामलतदार इ० धनी तो.

**हाँजी** (अव्य०) कोणी आपणाशीं बोलूं लागलें असतां त्यास विनयानें उत्तर देण्याचे प्रसंगीं याचा उच्चार करितात. २ कोणेकानें कोणेकापाशीं हांजी हांजी करणें, म्हणणें म्ह० स्वकार्यार्थ म्हणेल त्यास अनुमोदन देणें इ० द्वारा आर्जव करीत असणें.

**हाट** (पु. ना.) (ग्रं०) बाजार.

**हाटकरस** (पु. ना.) (ग्रं०) शाई.

**हाठावोवरी** (अव्य०)(ग्रं०) येथपर्यंत.

**हाड** (न. ना.) अस्थि. कोणेकाचीं हाडें भाजणें, शेकणें, उजवणें म्ह० कसेंहि करून लग्नसंस्कार केलासा करणें. हाडांचीं काडें किं० माणि करणें म्ह० कोणेक गोष्टीचे सिद्ध्यर्थ देह झिजे असा श्रम करणें. कोणेकाचीं हाडें निघणें म्ह० त्याणें अति कृश होणें. २ कोणेकाचीं हाडें मोडणें, चुरळणें, खिळखिळीं करणें म्ह० त्यास अतिशयित श्रम, दुःख देऊन बेजार करणें [अर्कद्वेष तें.

**हाडवैर** (न. ना.) परस्परांचा जो

**हाणणें** (धा. ना.) काठी इ०कांनी

ताडणें. २ तरवार इ० शस्त्रानें कोणेकास साफ तोडणें.

हाणमार, णमारी, णामारी (स्त्री. ना.) मनुष्यादिकांनीं एकमेकास किं० कोणेकानें कोणेकास हाणावें, मारावें इ० रूप जो व्यापार तो. [आंवड.

हाणावन, वनी (स्त्री. ना.) (ग्रं०)

हात (सं. अप. पु. ना.) हस्तप्रथमचतुर्थार्थी. २ गृहादि कोणेक पदार्थाच्या वामदक्षिण ज्या बाजू त्या प्रत्येकीं. ३ कार्यमात्राविषयीं साधनभूत कोणेक कार्याचे भागचे जी कर्तृत्वशक्ति तो त्या कार्याचा. उ० अपराधाबाचून शिपी देणें माझे हातानें घडणार नाहीं, माझा हात चालेल तेव्हां मी तुझे रुपये देईन. इ०. कोणेक कर्मास हात घालणें म्ह० करायाकरितां अंगीकारणें. कोणेकानें कोणेकास हात देणें म्ह० उठावणीविषयीं आश्रयभूत होणें. कोणेकाचा हात चेपणें, दाबणें म्ह० त्याणें स्वकार्याविषयीं अनुकूळ व्हावें म्हणून त्यास गुप्तरूपें द्रव्यादि देणें. कोणेकानें हात टेकणें म्ह० मद्राम येणें. हात धुऊन पाठीस लागणें म्ह० कोणेकाचा नाश करण्याविषयीं आग्रहपूर्वक प्रवृत्त होणें. कोणेकानें कोणेकाचे हातावर हात देऊन किं० मारून पळणें, जाणें, म्ह० देखत देखत जाणें. कोणेकानें हातावर शिर घेऊन असणें म्ह० मी मरेन हें भय न बाळगितां युद्धादि साहस कर्माविषयीं सिद्ध असणें. कोणेकानें हात पाय चोळणें म्ह० चरफडणें. गर्भिणीनें हातीं पायीं सुटणें म्ह० प्रसूत होऊन तिची सुटका होणें. कोणी कोणाचे हातीं पायीं लागणें म्ह० केवळ दैन्यानें त्याचें आर्जव करणें. कोणेकास किं० कोणेक कार्यास हात लावणें म्ह० सहाय होणें. कोणेकानें हात पाय गाळणें म्ह० भयादि कारणानें कोणेक कर्माविषयीं धरिलेला उत्साह तो सोडून माघार घेणें कोणेक पुरुषाचे दोन हाताचे च्यार हात होणें म्ह० बायको मिळणें. कोणेकानें कोणेकास हात दाखविणें म्ह० त्याचे मनात वचक राहायाजोगी काहीं शिक्षा करणें. त्याचा हात कोण धरणार आहे म्ह० कोणेक कर्माविषयीं त्याची बरोबरी किं० त्यावर चढ कोण करणारा आहे. कोणेक स्त्रीनें कोणेकाचा हात धरून जाणें म्ह० त्याचे घर निघणें. कोणेकानें कोणेकास हातीं धरणें म्ह० त्याचें उर्जित करण्याविषयीं अभिमान धरून अंगीकारणं इ०.

हातउसणा, उसना (वि०) लवकर परत करायाचा म्हणून लेखपत्र न करितां उसणा देतात घेतात जो पैसा रुपया इ० तो.

हातखंडा (वि०) अति अभ्यासामुळें प्रसंगीं पाहिजे तशी प्रयुक्त करण्याविषयीं स्वाधीन असल्ये जी कोणेक विद्या किं० कला तो.

हातगुण (पु. ना.) कोणेकानें हातांत धरिलें जें काहीं एक काम किं० हाताखालीं धरिला जो शिष्य इ० त्याचें बरें किं० वाईट होण्याविषयीं

निमित्तानेंकरून मानितात जो त्या हातीं धरणाराचा प्रारब्धयोग तो.

**हातघाई** (स्त्री. ना.) मंदमंदपणें चालत असतें जें वाद्यवादनादि कोणेक कर्म त्याविषयीं आवेशादि कारणामुळें तो मंदपणा सुटून होत्ये जी घाई ती. कोणेकानें हातघाईवर येणें म्ह० मारामारीवर येणें.

**हातचलाखी** (स्त्री. ना.) दुसऱ्याला ठकविण्याविषयीं गारुडी, सराफ, वाणी इ० कांचे हातांनं,पदार्थ प्रथम घेतो केव्हां, टाकतो केव्हां, दुसरा बदलतो केव्हां इ० कर्म न समजायाजोगें असतें जें कसब ती.

**हातचा** (वि०) हातांतला जो तो २ जो ज्याणें आपले हातानें निर्मिलेला किं० मिळविलेला जो अर्थ तो. ३ अंकांची मिळवणी इ० प्रसंगीं ज्या स्थानींचा त्या स्थानीं मांडून किं० मिळवून त्याचे पुढले स्थानीं मिळवायाचा जो अंक राहतो तो.

**हातणें** (धा. ना.) (ग्रं०) हातानें सारविणें.

**हाततुक** (स्त्री. ना.) (ग्रं०) अटकळ.

**हातपा** (पु. ना.) आंगरखा, चोळी, इ० कांचा बाही तो.

**हातपिटी** (स्त्री. ना.) कलहप्रसंगीं परस्परांची जी हातानीं मारामार ती.

**हातफळीं** (अव्य०) (ग्रं०) हातोंपातीं.

**हातरू** (न. ना.) निंदेनें हत्तीसच म्हणतात.

**हातवटी** (स्त्री. ना.) भाषणादि कोणेक व्यवहार करण्याविषयीं करून जे भिन्न भिन्न कृतिप्रकार असतात ते प्रत्येकीं.

**हातवसणें** (धा. ना.) (ग्रं०) हस्तगत करणें.

**हातवसी** (स्त्री. ना.) (ग्रं०) हात उगारण्याचा व्यापार ती.

**हातवळा** (पु. ना.) लेखनादि कोणेक कर्माचा अभ्यास झाल्यामुळें तद्विषयीं हाताचे ठायीं येत्ये जी प्रवीणता तो.

**हातवा** (स्त्री. ना.) (ग्रं०) काडवात.

**हातानिराळा** (वि०) ज्याविषयींचा कर्तव्यांश किमपि राहिला नाहीं, अतएव ज्याला हात लावावा न लागे असा सिद्ध झाला जो गृहादि अर्थ तो. २ (अव्य०) जेथें मनुष्याचे हातांचा वहिवाट नसत्ये अशा स्थळीं, एकीकडे.

**हाताफळी** (स्त्री. ना.) परस्परांची हात धरून जी झोंबी ती.

**हातावेगळा** (वि०) हातानिराळा.

**हातासरसा** (अव्य०) कोणेक कार्य करण्याविषयीं हाताचे ठायीं धरिला जो वेग त्याच वेगानें कांहींएक इतर कार्य करण्याचें वि०.

**हाताळ** (वि०) कोणेकाची वस्त हातीं लागली असतां चोरण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**हाताळणें** (धा. ना.) फलादि पदार्थ हातानें चोळवटणें. २ कोणेकाची वस्तु हाताळ मनुष्यानें चोरणें.

**हातिमें** (धा. ना.) (ग्रं०) मारणें.

हातिवा (पु. ना.) (ग्रं०) हातांत घेतलेला दिवा. [तळींचा आवळा.

हातींचामळू (पु. ना.) (ग्रं०) कर-

हातेर (न. ना.) हतेर. २ कुळांस ग्रामसंबंधी जे पाटील इ० अधिकारी, त्यांचें शेत ख्रवणें इ० काम करण्याविषयीं करावी लागते जी बिगार तें.

हातोटी (स्त्री. ना.) हातवटी.

हातोपात, पातीं (अव्य०) कांहींएक ओझें वहायाचें असतां एकानें दुसऱ्याचे हातीं, दुसऱ्यानें तिसऱ्याचे हातीं अशा प्रकारें नेणें, वाहणें इ० कांचें वि०.

हातोफळी (स्त्री. ना.) हातापळी २ (ग्रं०) (अव्य०) हातोहातीं.

हातोहात, हातोहातीं (अव्य०) हातचे हातीं किं० वरचेवर हा हा म्हणतां. [अभिप्राय.

हादंशु (पु. ना.) (ग्रं०) मनांतील

हानि (सं. स्त्री. ना.) नाश.

हामी (स्त्री. ना.) हमी.

हाय (अव्य०) खाज, संताप इ० जन्य जें अंगीं दुःख असतें त्याचा खाजविणें, वारा घेणें इ० संबंधानें प्रतीकार होऊं लागला म्हणजे जो सुखानुभव होतो त्याचा उद्गार. २ शरीरास किं० अंतःकरणास कांहीं दुःखवेदना झाली असतां त्या दुःखाचा हा उद्गार आहे.

हायन (सं. न. ना.) वर्ष.

हायहाय (अव्य०) कांहींएक झालेलें पाहिलें असतां किं० ऐकिलें असतां किं० मनांत आलें असतां हा उद्गार निघतो.

हार (सं. पु. ना.) रत्नें, पुष्पें इ० कांची गळ्यांत घालायाकरितां जी माळा करितात ती. २ भाजक. ३ (स्त्री. ना.) एका शेजानें लागत गेलेली जी अनेक पदार्थांची पंक्ति ती. ४ युद्ध, वाद, खेळ इ० कांचे ठायीं येतो जो पराजितपणा ती. कोणेकानें हार जाणें म्ह० जिंकला जाणें.

हारजित (स्त्री. ना.) हारणें किंवा जितणें यांचा जो व्यापार ती.

हारणें (धा. ना.) हरणें.

हारेमोहरे, मोहरेस (अव्य०) कोणेकाचे समोरचे किं० आजूबाजूचे प्रदेशीं. [तील जो अभिप्राय तें.

हार्द (सं. न. ना.) कोणेकाचे आं-

हार्द्र (न. ना.) हार्द.

हाल (अर० पु. ना.) आपदा. २ (अव्य०) हल्लीं. [हाल ती.

हालअपेष्टा (स्त्री. ना.) नानाप्रकारचे

हालचाल (स्त्री. ना.) वळवळ.

हालणें (धा. ना.) कोणेक पदार्थानें आधाराशीं एके विभागेंकरून संबद्ध असून इतर विभागीं इतस्ततः चलित होणें. २ अधिष्ठित आधारापांसून कोणेक अर्थानें इतस्ततः चलित होणें. ३ हलकलणें.

हालमस्त (अर० फा० वि०) दारिद्र्यमूलक आपत्ति असूनही ज्याचे अंगीं ताठा बहुत असतो असा जो मनुष्य तो.

हालाहल ( सं. न. ना. ) देवदैत्यांनीं पूर्वीं समुद्रमंथन केलें तेव्हां त्यापासून उत्पन्न झालें जें विष तें. २ सर्पादिकाचें उग्र जें विष त्यास ह्मणतात.

हालीमाजी ( अर० स्त्री ना. ) राजादिकाचे कारकीर्दींचे होतें नवें जुनें तीं. [तचेहालीं.

हालोहाल, हालोंहाल (अव्य०)हा-

हाव ( सं. पु. ना. ) शृंगाररसाचा आवेश अंगीं आल्यामुळें ज्या चेष्टा होतात तें. २ (ग्रं० स्त्री. ना.)इच्छा, आशा.

हाँव ( स्त्री. ना. ) हवाशी. २ खर्चवेंच करण्याविषयीं कोणेकास असतो दम ती.

हावभाव ( सं. पु. ना. ) अभिनय आणि तेणेंकरून व्यंजित होतात जे रसाचे भाव तें.

हावरा (वि०) कितीहि मिळालें तथापि आणखी हवेंच असें इच्छिण्याचा स्वभाव ज्याचा तो. २ ( पु. ना. ) पोटरा जो तीळ तो.

हावाव (स्त्री. ना.) (ग्रं०) शोभा.

हास्य (सं. न. ना.) हंसें. २ एतद्रूपच नवरसांतील एक रस आहे. ३ मुखविकास व्हायाजोगा जो कोणेकाचे अंगीं विकारविशेष होतो तें. ४ उपहास.

हास्यमुख, वदन ( सं. वि० ) ज्याचें मुख निरंतर हास्ययुक्त असतें असा जो तो किं० कांहीं कारणानें हास्ययुक्त झालें मुख ज्याचें तो.

हाँहाँ (अव्य०) कांहींएक कार्याविषयीं प्रवृत्त जो कोणी त्याला मार्गें सर असें जें ह्मणायाचें त्या अर्थाचें द्योतक हें अव्यय.

हाहाकार ( सं. पु. ना.) कांहीं महासंकट प्राप्त झाल्यामुळें किं० शोकादि कारणामुळें हा हा असा दुःखोद्गाररूप शब्द करितात तो. कांहींएक पदार्थाचा हाहाकार होणें,पडणें, ह्म० तो तो पदार्थ दुर्मिळ झाल्यामुळे हाकाटा पडणें.

हाहाःकार ( पु. ना.) हाहाकार.

हाँहूँ (न. ना.) कोणेकानें भय मानावें किं० कर्त्तव्य कार्य करेनें यथास्थित करावें किं० मी जागृत आहे असावध नाहीं इ० जाणावें इ०कांसाठीं थोडा बहुत जो शब्दव्यापारादि व्यापार तें.

हाळ (स्त्री. पु. ना.) अनेक गुरांनीं पाणी प्यावें याकरितां चुना, दगड, इ०कांनीं बांधून करितात जो लांबट टाँकी ती. तो.

हिकमत (अर० स्त्री. ना) युक्ति.

हिंगुरडें (न. ना.) शरीरावर कांहीं क्षत झालें असतां हिंग खाल्ला किं० क्षतास हिंगाचा स्पर्श झाला ह्मणजे त्या क्षताचे जागीं जो मांसग्रंथि होतो तें.

हिंगळ ( पु. ना.) पारा आणि गंधक यांचा एक रांधा आहे, याचा रंग तांबडा असतो.

हिंगो ( पु. ना. ) दाखविणें धातूचे योगीं प्रयोग. कोणेकास इला दाखवून फसविण्याचा व्यापार तो.

**हिजडा** (पु. ना.) पुरुषवेषधारी नपुंसक तो. २ बीभत्स भाषण करणारा निर्लज्ज असा जो मनुष्य त्यास आरोपानें म्हणतात.

**हिंडणें** (धा. ना.) मनुष्यादिकांनीं इकडून तिकडे, तिकडून इकडे अशा रीतीनें फिरणें.

**हिडीस** (वि०) ओंगळ. २ (न. ना.) केरकचरा, मलमूत्र इ० जो कोणेक स्थळीं घाण पडली असल्ये ते.

**हिणकट** (वि०) हिणकस जें रुपें इ० तो आणि त्याचा केलेला पदार्थ तो.

**हिणकस** (वि०) अन्य धातु मिश्र झाल्यानें बिघडलागेला जो सोनें रुपें इ० पदार्थ तो व त्याचा केला जो अलंकार इ० तो.

**हिणवणें** (धा. ना.) हिणावणें.

**हिणवर** (पु. ना.) बायकोपेक्षां दिसण्यांत अप्रौढ दिसतो जो दादला तो. २ (न. ना.) तशा प्रकारचें दांपत्यसंबंधास दिसतें जें वैषम्य ते.

**हिणावणें** (धा. ना.) कोणेकाचे अंगीं जो उणेपणा असतो तो भाषणादिद्वारा बाहेर काढून त्यास लाजविणें.

**हित** (सं. न. ना.) कांहींएकापासून द्रव्यलाभ, दुःखनिरास इ० रूप आपलें होतें जें बरें तें. २ ज्याच्या योगानें तें बरें होतें तो.

**हिंदोळा** (पु. ना.) चौपाळा. २ (ग्रं०) झोपाळा इ० संबंधी झोका तो.

**हिनसुदा** (वि०) ग्रं०) हिरमुसलेला.

**हिपुटी** (वि०) (ग्रं०) कष्टी.

**हिम** (सं. न. ना.) बर्फ. २ हींव. ३ थंड जो स्पर्श किं० तद्विशिष्ट पदार्थ तो.

**हिमटा, ट्या** (वि०) भक्ष्यादि पदार्थ ज्याच्यानें कोणास पाहिजे तितका घालवत नाहीं किं० देववत नाहीं असा स्वभावाचा जो मनुष्य तो.

**हिंमत** (अर० स्त्री. ना.) कोणेक कार्य करण्याविषयीं कोणेकाचे अंतःकरणांत असल्ये जो धमक तो.

**हिमाईत** (अर० स्त्री. ना.) लोकांनीं मानावें, भय वागवावें, असें वजन पडायास कारणीभूत कोणेकास कोणेक समर्थाचा असतो आश्रय तद्रूप जें बळ तें.

**हिमांशु** (सं. पु. ना.) (ग्रं०) चंद्र.

**हियें** (न. ना.) (ग्रं०) हृदय. २ भय.

**हिय्या** (सं. हृदय) (पु. ना.) कोणेक अवघड कार्याचेठायीं प्रवृत्ति न होण्यास प्रयोजक जें भय, लज्जा, निर्बलता इ० प्रतिबंधकें तीं न गणितां त्या कार्यामध्यें प्रवृत्ति होण्याविषयीं अंतःकरणाची करितात जी दृढता तो.

**हिरडी** (स्त्री. ना.) जेथें दांत उगवतात असे जे मुखांत दोन अवयव आहेत ते प्रत्येकी. किं० त्यांमध्यें दांत उगवायाचीं जीं निरनिराळीं स्थानें तीं प्रत्येकीं.

**हिरणें** (धा. ना.) (ग्रं०) हरण करणें.

**हिरण्य** (सं. न. ना.) सुवर्ण नांवाची धातु.

**हिरमुसणें** (धा. ना.) कोणेक कर्माचे ठायीं हौसेनें जो वागत असतो त्यास

कोणी दुर्भाषणादि केल्यामुळें त्याणें तो हौस सोडुन निरस होणें.

**हिरमोड** (पु. ना.) कांहींएक कार्याविषयीं धरिला असतो जो उत्साह त्याचा कांहीं कारणामुळें होतो जो भंग तो. ती.

**हिरवट** (वि०) सुमाराचा जो हिरवा तो. २ (ग्रं०) चिरडीस लवकर येऊन तापतो तो.

**हिरवळ** (स्त्री. ना.) हिरव्या लहान तृणादिकांचा जो समुदाय तो.

**हिरहिरी** (स्त्री. ना.) हिरिरी.

**हिरावणें** (धा. ना.) कोणेकापासून कपटानें किं० बलात्कारानें द्रव्यवस्त्रादि पदार्थ घेणें.

**हिरिरी** (स्त्री ना.) कोणेक कार्य करण्याविषयीं कार्याचे अंगीं एकेक प्रयत्नानें उत्थित झाला असतो जो वेग तो.

**हिलगड** (स्त्री. ना.) भानगड.

**हिलाल** (अर० पु. ना.) उत्साहादिकांचेठायीं प्रकाशार्थ भात पलिते इ० घालून पाजळायासाठीं एका काठीचे अग्रास जें पणतीसारखें लोखंडाचें पात्र संबद्ध केलें असतें तो.

**हिलावणें** (धा. ना.)(ग्रं०) हलविणें.

**हिला** (अर० पु. ना.) धनी, सावकार, इ०कोशीं सोईनें वागावें तें न वागतां टोळगाई, कागाळें, इ० रूप ज्या लबाड्या कोणी करितो तो. २ प्रपंचादि कार्यनिर्वाहाविषयीं कोणेकास कोणेकाचा असतो जो आश्रय तो.

**हिलाहरकत** (अर० स्त्री. ना.) हिला, आणि हरकत इ० तो.

**हिवज्वर** (पु. ना.) हिमज्वर.

**हिवासणें** (धा. ना.)(ग्रं०) हिरमुसणें.

**हिशेब** (अर० पु. ना.) एक जी विशिष्ट संख्या तिचेतिन अवांतर संख्या निरनिराळ्या काढाव्या किं० अनेक ज्या पृथक् पृथक् संख्या त्या एकत्र करून विशिष्ट संख्या करावी असा जो संख्याव्यवहार, ज्याची सिद्धि सुलभपणें व्हावी ह्मणून गुणाकार इ० अनेक युक्ति बुद्धिमंतांनीं करून ठेविल्या आहेत तो आणि तेणेंकरून सिद्ध होतें जें संख्येचें इयत्ता ह्मणून फल तो. २ न्यायप्राप्त जी रीति तो. ३ गणती.

**हिशेबकितेब** (पु. ना.) हिशेब इ०.

**हिशोब** (पु. ना.) हिशेब.

**हिंसक** (सं. वि०) हिंसा करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**हिसकणें, हिंसकणें** (धा. ना.) दोर, वृक्षशाखा, मनुष्यादिकांचा हस्तादि अवयव, इ० आंचक्यानें विशिष्ट करणें. २ कोणेकानें कोणेक काम हिसकटे असें करणें. ३ कोणेकापासून द्रव्यादि हिसडणें.

**हिसका, हिंसका** (पु. ना.) आचका. २ हबकाप्रथमार्थीं. ३ हेलपटा. ४ घडायास आलेलें जें कोणेक काम त्यास कोणेक विघ्नसंबंधानें पडतो जो अडथळा तो.

**हिसकावणें** (धा. ना.) कोणेकापासून वस्त्रालंकारादि पदार्थ हिसका दे-

रूम वळानें किं० कपटानें ओढणें.

**हिसणें, हिंसणें** (धा. ना.) अश्वानें खंकाळणें.

**हिसळणें, हिंसळणें** (धा. ना.) पात्रस्थित जो उदकादि पदार्थ त्याणें ध-क्का इ० वसल्यामुळें वर उसळणें.

**हिंसा** (सं. स्त्री. ना.) मनुष्यादि जीवांचा जो वध तो.

**हिसेरशी** (फा० स्त्री. ना.) विभागायाचा अर्थ आणि विभागियांची संख्या तेच भाज्यभाजक करून त्रैराशिक रीतीनें विभाग करण्याचा जो प्रकार तो व त्या प्रकारानें झाली जी एकेकाची भिन्न भिन्न वांटणी ती.

**हिंस्र** (सं. वि०) हिंसा करण्याचा स्वभाव ज्याचा असा जो व्याघ्रसिंहादि प्राणी किं० व्याध, दालदी, इ० कोणी तो.

**हिस्सा** (अर० पु. ना.) कोणेक अर्थाचे अनेक जे वांटे ते प्रत्येकीं.

**हीड** (स्त्री. ना.) वळचण.

**हीण** (न. ना.) सुवर्णादि धातूंमध्यें ताम्रादिकांचा जो मिश्रितांश असतो तें. २ लोकांनीं हिणवायाजोगें जें हीनत्व येतें तें.

**हीन** (सं. वि०) विवक्षित गुणधर्मादिकांनीं रहित किं० विवक्षितापेक्षा न्यून तो. २ नीच हलकें जें कर्मादि तो.

**हीर** (पु. ना.) माड, पोफळ, इ०-कांचे पातीचे मध्यें जी कांडी असत्ये ती. २ (सं. वि०) श्रेष्ठ हिरा. ३ हीर भरणें झा० लचक भरणें.

**हींव** (न. ना.) थंडी. २ हिमज्वर.

**हुकमत** (अर० स्त्री. ना.) कोणेकाचा हुकूम कोणेकावर चालावा असें जें कोणकाचे अंगीं सामर्थ्य असतें ती.

**हुकमा** (अव्य०) हुकूम केला असतां जसें व्हावें, करावें, तसें होणें, करणें, इ०कांचें वि०; परंतु त्या होण्याकरण्यास अनिष्टता असतां प्रयोग. उ० पाऊस नको म्हटलें असतां हुकमा पडतो.

**हुकार** (पु. ना.) (अर०) यवनी संप्रदायानें कागद पत्र इ० लिहायाचें असतां प्रथम वर, जशी आमचे हिंदु लोक श्री लिहितात त्याप्रमाणें जें अक्षर काढितात तो. २ हुंकार.

**हुंकार** (पु. ना.) कोणी कांहींएक गोष्ट सांगत असतां किं० विचारली असतां करितात जो हूं असा शब्द तो.

**हुंकार** (पु. ना.) कोणेकास दटावत्ये समयीं जो हूं असा शब्द करितात तो.

**हुंकारा** (पु. ना.) कोणी कांहींएक गोष्ट सांगत असतां जो, मध्यें मध्यें हूं असा शब्द ऐकणारे करितात तो.

**हुकी** (स्त्री. ना.) कोल्ह्याचा जो स्वजातीय शब्द तो. २ कांहींएक कार्य करण्याविषयीं कोणेकास येत्ये जी उत्कलिका ती.

**हुकूम** (अर० पु. ना.) आज्ञा.

**हुकूमनामा** (फा० पु. ना.) वादी प्रतिवादी यांचे वादाचा निर्णय झाल्यानंतर जो खरा ठरतो त्यास खरका-

रातून जें निर्णयपत्र करून देत असतात तो.

**हुक्का** (अर० पु. ना.) गुडगुडी.

**हुक्की** (स्त्री. ना.) हुक्का द्वितीयार्थी.

**हुंगणें** (धा. ना.) कोणेक पदार्थाचा वास घेणें. २ कोणेक गुप्त गोष्ट काहीं एका लक्षणावरून जाणणें.

**हुच्च, हुच्चा** (वि०) प्रपंचाचे खटल्याकडे ज्याचें अगदीं चित्त नाहीं, खेळणें, बाता छाटणें, तमाशा पाहणें, दुसऱ्याच्या कुचेष्टा करणें, इ० विषयांवर ज्याचें सर्वदा लक्ष्य असा स्वभावाचा जो तो.

**हुजत** (अर० स्त्री. ना.) वांकड्या रीतीनें जो उगीच वाद तो. २ शेतसारा इ० संबंधी कुळास सरकारांतून देतात जी पावती ती.

**हुजरात** (स्त्री. ना.) (अर०) सरंजामाचे दिमतीस न लाविता सरकारानें आपले खासगीकडे ठेविली असत्ये जी फौज ती. २ कोणेकापाशीं असतात जीं दास, दासी, शिष्ये, खिजमतगार, कुत्रीं, मांजरें, इ० त्यांस म्हणतात.

**हुजऱ्या** (पु. ना.) राजा इ०कांजवळ जो खिजमतगार असतो तो.

**हुजूर** (अर० अव्य०) समक्ष. २ मुख्य सरकारांत. ३ (पु. ना.) राजकीय व्यवहाराची जागा.

**हुटहुट** (स्त्री. ना.) कोणेक गोष्टीविषयीं केव्हां करीन, केव्हां होईल, केव्हां पाहीन, केव्हां जाईन इ० रूप जो भाव अंतःकरणांत होतो. जेणेकरून ती गोष्ट तशी होईपर्यंत चित्त उद्विग्न असतें तो.

**हुडकणें** (धा. ना.) धुंडणें.

**हुंडका** (पु. ना.) रडें यावयाचे पूर्वीं पोटांतून रडण्याचा येतो जो उभड तो. २ गाय, म्हैस, इ०कांचे वांसरूं आपले आईस पितेसमयीं दुग्ध यावें म्हणून कासेस करितें जो मुखानें प्रहार तो. ३ ढोंकी, बाहुमूळ, इ०कांनीं कोणेकास कोणी करितो जो प्रहार तो.

**हुडहुडी** (स्त्री. ना.) जिच्या योगानें शरीरास कंप सुटावा, दांतखिळी वाजावी, हातपाय कांकडावे, असें व्हावयाजोगी जी शरीरांत अतिशयित थंडी भरल्ये ती. [चा बुरूज.

**हुडा** (पु. ना.)(ग्रं०) किल्ला इ०कां-

**हुंडा** (पु. ना.) मक्ताप्रथमार्थी. २ लग्नामध्यें नवरास, वरपक्षीयांस जे वस्त्रालंकारादि द्यावयाचे त्याबद्दल उक्तीबोली ठरावून जे रोकड द्रव्य मुलीचा बाप देतो तो.

**हुंडाभाडा** (पु. ना.) कोणेक व्यवहारीं भाडें, जकात, सारा इ० खर्चांची निरनिराळी बोली न करितां तो व्यापार पत्करून घेण्याविषयीं एकंदर करितात जो मक्ता तो.

**हुंडारणें** (धा. ना.) गाय, म्हैस इ० पशूंनीं आपल्या मस्तकेंकरून कोणेक मनुष्यादिकास पलीकडे ढकलणें. २ जवळ प्राप्त झालेला जो मनुष्यादि कोणेक पदार्थ किं० कोणेक गोष्ट तो खिसगणतींत न आणितां आपणापासून दूर घालविणें.

हुंडी (स्त्री. ना.) कोणेक स्थळीं कोणेक सावकारापाशीं ऐवज भरून त्यापासून दुसऱ्या स्थळींचे सावकारावर अमुक मतीचें अमुक संख्याक नाणें द्यावें अशी जी चिट्ठी घेतात ती. २ देशांतरीं मरण पावला जो कोणी आपला गोत्रज त्याचें लेखादि येतें जें वर्तमान त्यास म्हणतात. ३ एका स्थळीं रुजलेलें जें आंबा, तुळस इ० काचें झाड तें दुसरे स्थळीं लावायाचें असतां तेथून खणून काढतेसमयीं त्याचे मुळास आधारभूत जो मृत्पिंड राखीत असतात तो. आणि तद्विशिष्ट तें झाड तो. ४बुरुज्याचे तोंडास झोळीसारखी दोरी बांधून त्यावर फडकें घालून त्यात माती, शेण ठासून वसवावी असा जो दद्या वसविनात तो. ५ जोंधळ्यांत एक भेद आहे. [इ० तो.

हुंडीपांडी (स्त्री. ना.) हुंडीचिट्ठी

हुडूक (न. ना.) एक चर्मवाद्य आहे; जें सरदेर, जोशी इ० हातात वा ळगीत असतात. २ कोरडेशास आमटीसारिखा पदार्थ करीत असतात तें. ३ (ग्रं०) वस्त्र.

हुंडेंभाडें (न. ना.) हुंडाभाडा.

हुतवह (सं. पु. ना.) अग्नि.

हुताश, हुताशन (सं. पु. ना.) अग्नि.

हुतास (पु. ना.) (ग्रं०) हुताशन.

हुतुतू (पु. ना) एक मुलांचा खेळ आहे. २ पोरें आपला अध्ययनादि व्यापार सोडून ओरडणें, उड्या मारणें इ० रूप करितात जी दांडगाई ती.

हुंदका (पु. ना.) हुंडका. [प्रथमार्थी.

हुंदडणें (धा. ना.) हुंडारणें प्राय:

हुंदडा, हुँदडा (पु. ना.) हुंडका प्राय: प्रथमार्थावांचून. २ जरीमरीसारिखा एक रोग आहे तो आणि तदभिमानिनी जी देवता ती. ३ मार्गादिकाचे ठायीं काहींही अडचण असो परंतु त्यास न गणितां जो, रोख धरला असतो त्या रोखानें धडक जाणारा जो मनुष्य, पशु इ० त्यास आरोपानें म्हणतात. ४ सोंगट्यांचे खेळांत एकच फिरती जी सोंगटी राहात्ये तीस म्हणतात.

हुद्दा (अर० पु. ना.) हवालदारी, सुभेदारी इ० रूप जो कोणेकाकडे असतो अधिकार तो. २ ताशा, मर्फा, ढोल ही तीन वाद्यें तीं व त्यांचे जे वाजविणारे ते प्रत्येकीं.

हुनर (फा० पु. स्त्री. ना.) युक्ति.

हुन्नर (पु. स्त्री. न. ना.) हुनर.

हूप (स्त्री. ना.) (ग्रं०) उत्सुकता. २ धैर्य.

हुंबणें (धा. ना.) (ग्रं०) कण्हणें.

हुंबरणें (धा.ना.)हंबरणें. २शब्द करणें.

हुबहू (अर० अव्य०) कोणेक अर्थाशीं सर्व धर्मादिकेंकरून सादृश्य असल्यामुळें केवळ तोच हा अशी प्रतीति होई असें कोणेक अर्थानें असणें दिसणें, बोलणें इ० कांचें वि०.

हुबेहूब (अव्य०) हुबहू.

हुंबा, व्या (वि०)(ग्रं०) रडका, रड्या.

हुमणी (स्त्री. ना.) (ग्रं०) बुकी, ठोसरा.

हुमा (वि०) हुम्मा.
हुमाणा (पु. ना.) उखाणा.
हुम्मा (फा० पु. ना.) एक पक्षी आहे, जो कधींही भुईवर बसत नाहीं.
हुम्मा (वि०) मोठें काहीं अडचणीचें काम आल्यामुळें दुसऱ्यानें किती जरी घाई केली तरी ज्याचें आसनई ढळूं नये, कोणी काहीं विचारलें असतां झटकर उत्तर ज्याचे मुखांतून निघत नाहीं, फारच झालें तर कदाचित् हूं मात्र ह्मणेल अशा स्वभावाचा केवळ मंद जो मनुष्य त्यास निंदेनें म्हणतात.
हुरडफुंक्या (पु. ना.) तादृश लढाईचे उपयोगीं नव्हे, सरासरी नांवाचा मात्र शिपाई त्यास निंदेनें म्हणतात. २ रिकामचोट, जो कांहीं कामाचे उपयोगीं नाहीं असा मनुष्य तो.
हुरडा (पु. ना.) जोंधळ्याचीं ओलीं कणसें अग्नींत भाजून त्याचे खावयासाठीं काढितात जे दाणे ते. २ तशीं भाजून खायाचे योग्यतेस आलीं जीं जोंधळ्याचीं ओलीं कणसें तीं.
हुरपळणें, फळणें (धा. ना.) अग्नि किंवा तत्सदृश तप्त जो फुंपाटा, भुरळा इ० तेणेंकरून कोणेक पदार्थ वर वर दग्ध करणें.
हुरमत (अर० स्त्री. ना.) अब्रू.
हुरमूज (अर० स्त्री. ना.) कविसाविखा एक मृत्तिकाविशेष आहे.
हुररेवडी (स्त्री. ना.) कोणी चालतांना पडला, बोलतांना कचरला इ० काहीं उपहासास कारण झालें असतां अनेक पोरें इ० हुर्र करून जी त्याची बचेरी करितात ती.
हुरहूर (स्त्री. ना.) कांहींएक गोष्ट आपल्या हातून गेल्यामुळें जीवास लागते जी चटपट ती. २ (ग्रं०) उदासी.
हुरळणें (धा. ना.) आपलें अवसान किती, ही गोष्ट केवढी, ही आपले हातून होईल कीं न होईल, हिचा परिणाम बरा होईल कीं वाईट होईल इ० विचार न करितां प्रवृत्त होण्याविषयीं एकाएकीं मोठ्या उत्साहानें विशिष्ट होणें.
हुरूप (पु. स्त्री. ना.) कोणेक कार्य करण्याविषयीं अंतःकरणाच्याठायीं उत्पन्न होतो जो उत्साह तो. ती.
हुर्मत (स्त्री. ना.) हुरमत.
हुर्र (अव्य०) कोणेकाची अप्रतिष्ठा व्हावी म्हणून चेष्टा करायाची असतां याचा प्रयोग करितात. [दंगा ती.
हुलकट (स्त्री. ना.) चोर इ० कांचा
हुलकावणी (स्त्री. ना.) हा अमुक करणार आहे किं० अमकेकडे जाणार आहे इ० रूप आपले कर्तृत्वाचा रोख दुसऱ्याचे ध्यानांत यावयाजोगी चेष्टा, भाषण इ० जें कांहीं करितात ती.
हुशार (फा० वि०) सावध.
हुशारी (फा० स्त्री. ना.) सावधपणा.
हुसकटणें (धा. ना.) उसकटणें. २ हुंडारणें द्वितीयार्थी. ३ गाय, म्हैस इ० पशूनीं वाघ इ० कांस पाहून बुजणें.

**हुसकणें** (धा. ना.) हुसकटणें द्वितीयतृतीयार्थी.

**हुळहुळणें** (धा. ना.) अंगावर केश फिरविला असतां किं० मुंगी इ० कीट चालला असतां कंडू होण्याजोगा कोणेक शरीरावयव विशिष्ट होणें. २ तसा कंडू उत्पन्न होण्याजोगें केश किं० मुंगी इ० कानीं संचरित होणें. ३ तोंड, हात, पाय इ० अवयवांनीं बोलणें, मारणें, चालणें इ० स्वव्यापारीं उत्कंठा लागायाजोग्या कंडूविशेषानें विशिष्ट होणें.

**हुळहुळा** (वि०) घर्षणादि कारणामुळें इतर पदार्थस्पर्शाविषयीं असहिष्णु झाला जो हस्तपादादि अवयव तो.

**हुळहूळ** (स्त्री.ना.)हुळहुळण्यास कारणभूत जो कंडूविशेष प्राप्त होतो तो.

**हुळा** (पु. ना.) भक्षणार्थ ओल्या हरभऱ्याचे भाजलेले जे घांटे ते.

**हूं** (अव्य०) हां या अर्थी.

**हूक** (स्त्री. ना.) उसण. २ कोल्ह्याचा स्वजातीय शब्द तो. ३ कोणेक गोष्टीविषयींची उठते जी वातमी ती.

**हूड** (वि०) युद्धादिप्रसंगीं मागला पुढला विचार न पाहतां उडी घालण्याचा स्वभाव ज्याचा तो. २ भारी खोडकर जें पोर त्यासही म्हणतात.

**हूल** (स्त्री. ना.) हुलकावणी. २ हुल्कट.

**हूळ** (स्त्री. ना.) दुसऱ्यास कांहीं सुचूं नये, त्याणें घाबरलें जावें अशी कोणी करितो जी घाई ती.

**हृदय** (सं. न. ना.) वक्षस्थल. २ अंतःकरण. ३ कोणेकाचे मनांतील किं० भाषणांतील आशय तें.

**हृदयशून्य** (सं. वि०) (प्रं०) निष्काळजी जो मनुष्य तो.

**हृद्गत** (सं. वि०) हृदयस्थ जो कोणेक अर्थ तो. २ (न. ना.) हृदयांतील अभिप्राय तें.

**हृद्रोग** (सं. पु. ना.) अंतःकरणास निरंतर असते जी काळजी तो.

**हे** (अव्य०) संबोधनाचें द्योतक हें अव्यय आहे.

**हेंकट** (वि०) दुसऱ्यानें बरी गोष्ट सांगितली तथापि ती न ऐकतां आपलेच हेक्यानें वर्तण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**हेंकड,हेकड** (वि०) हेंकट.

**हेका,हेंका** (पु. ना.) कोणेक गोष्टीविषयीं प्रबळ जी इच्छा किं० कोणेक तऱ्हेची समजूत होते तिचा भार अंतःकरणावर पडल्यामुळें तदनुरोधेंकरून तिकडे अंतःकरणाचा वळला असतो जो झोंक तो, तद्विषयीं अनेक दोष दिसत असले किं० असें करूं नये, हें ठीक नव्हे असें लोक सांगत असले तरी आवरला जात नाहीं तो.

**हेकाड** (वि०)(प्रं०) हेकेखोर.

**हेंगाडा** (वि०) लिहिणें, बोलणें, नासणें, उचलणें, टाकणें, इ० यथायावत् कर्माविषयीं जी युक्ति असावी ती त्याचे अंगीं नाहीं, दुसरा सांगत शिकवीत असतांही ती मनांत येऊं नये आणि हातपाय इ० अवयव तदनुरूप वळूं नये. अतएव कर्ममात्रांत

ज्याचा अडाणीपणा दिसण्यांत येतो असा स्वभावाचा जो मनुष्य तो किं० त्याचें तदनुसार बोलणें इ० कर्म तो. २ आपल्यापेक्षां ज्यांच्या रीति, भाषा, इ० अगदीं वेगळ्या, अतएव आपले संप्रदायास मिळत नाहींत असे जे देशांतरस्थ लोक त्यांस आणि त्यांची भाषा, रीत इ० त्यांस म्हणतात.

**हेजीब** (सं. पु. ना.) (ग्रं०) दूत, सेवक.

**हेटाळणी** (स्त्री. ना.) हेलना.

**हेटाळणें** (धा. ना.) कोणेकास किं० कोणेकाचे भाषणादिकास हेटाळणीनें युक्त करणें.

**हेड** (स्त्री. ना.) वणजारी इ० लोक विकायाकरितां नेतात किं० आणितात जो गाय, म्हैस, इ० पशूंचा समुदाय तो.

**हेडया** (पु. ना.) हेडीचा व्यापार करणारा जो मनुष्य तो. २ कोणेकास कांहींएक वस्तूची गरज लागली असतां ती वस्तु अमुक ठिकाणीं आहे, अमुक उपायानें हस्तगत होईल असें जाणत असतो असा जो पुरा माहितगार त्यास म्हणतात.

**हेत** (सं. अप. पु. ना.) हेतु, इच्छा. २ (ग्रं०) मनांतील इ० अभिप्राय.

**हेतु** (सं. पु. ना.) कारण, निमित्त. २ हेतु.

**हेंदर** (स्त्री. न. पु. ना.) विष्ठा, केरकचरा, इ०रूप जी घाण ती. तें. तो.

**हेंदरा** (वि०) अमंगळ तो. २ ज्याचे अंगीं आटोप, ठाकठीकपणा, इ० नाहीं असा जो मनुष्य किं० त्याचें भाषण, आचरण, इ० तो.

**हेम** (सं. न. ना.) सुवर्ण.

**हेमकट** (वि०) (ग्रं०) सोनेरी.

**हेर** (सं. पु. ना.) कोणेक गोष्टीचें वर्तमान जाणून विवक्षित स्थळीं कळवावें म्हणून त्या कामावर राजादिकांनीं नियुक्त असतो दूत तो. २ (स्त्री.) कोणेक पदार्थ हेरायाकरितां त्यावरून दृष्टीचे जें परिवर्तन ती.

**हेरणें** (धा. ना.) कोणेक पदार्थ सूक्ष्म दृष्टीनें पाहणें. २ कोणेक पदार्थ कोणेकास स्पष्टपणें पुरता दिसणें. ३ टेहेळणें.

**हेरफेर** (पु. स्त्री. ना.) कोणेक अर्थाचें कोणेक अर्थाशीं मूल्य, प्रमाण, गुण, इ० करून जें अंतर असतें तो. ती.

**हेरूनफेरून** (अव्य०) फारूनफेरून.

**हेऱ्या** (पु. ना.) टेहेळ्या.

**हेल** (पु. स्त्री. ना.) कोणेकाचें ओझें आपल्या अंगावर घेऊन गांवांतलेगांवांत किं० दोन चार कोसांवर स्थलांतरीं नेऊन पोंचवण्याचें जें कर्म व तें ओझें व तत्संबंधीं जी मजूरी तो. ती. २ कोणास पुत्र, कन्या, झाली असतां त्याचे घरीं शूद्रस्त्रिया इ० दहा दिवसांचे आंत आणून घालितात जो जळ, दुग्ध इ० पदार्थ तो. ३ वाहून नेण्याकरितां गाड्यावर रचलेला जो कडबा, गवत, यांचा ढीग तो. ४ गाणें, रडणें, ओरडणें, यासंबंधीं जो मोठा दीर्घस्वर त्यास म्हणतात.

**हेलकरी** (पु ना.) हेल वाहून उपजीविका करितो तो. २कोणास अपत्य

झालें असतां हेल घालणारा जो तो.

**हेलकावणें** (धा. ना.) जल, नौका, इ०कांनीं हेलकाव्यानें विशिष्ट होणें.

**हेलकावा** (पु. ना.) समुद्र, तडाग, इ० संबंधीं उदक, वृक्षाची टहाळी, इ०कांस वाऱ्यादिकांचे धक्क्यानें कि० हस्तादिकेंकरून हलविल्यानें बसतो जो झोंका तो आणि त्या योगानें त्याच्या आश्रयेंकरून स्थित जे नौका, मनुष्य, इ० त्यांस बसतो जो झोंका तो.

**हेलगा** (पु. ना.) रेडा.

**हेलना** (स. स्त्री. ना.) मनुष्यादि कोणेक अर्थाची हा कःपदार्थ, यांत काय आहे, याला कोण विचारतो अशा भावानें जी गणना ती.

**हेलपटणें** (धा. ना.) कोणेकास हेलपट्यानें युक्त करणें. २ वारी कि० शत्रु कि० कोणेकाचें काम, भाषण इ० लटपटलें जाईं असें करणें.

**हेलपटा** (पु. ना.) केशल्पेंकरून मानिला जो विवक्षित स्थलपर्यंत चालण्याचा व्यापार तो. २ कोणेक मार्गास नीटपणापेक्षां दीर्घता यावयास कारणभूत जी वक्रता असल्ये तो आणि त्या मार्गानें चालणारा जो त्यास अधिक चालण्यानें श्रम पडतो तो. ३ फिरकांडाप्रथमार्थीं.

**हेला** (पु. ना.) हेलगा. [चमळणें.

**हेलावणें** (धा. ना.) हलविणें. २ उ-

**हेवड** (पु. ना.) (ग्रं०) गुंनाडा.

**हेवा** (पु. ना.) स्पर्धा. २ द्रव्यादिविषयक कोणेकास असतो जो सोस तो.

**हेळणा** (स्त्री. ना.) हेलना.

**हेळसणें** (धा. ना.) हेळणें.

**हेळा** (अव्य०) (ग्रं०) क्षणांत. २ मत्सर. ३ (स्त्री. ना.) दृष्टि.

**हेळी** (पु. ना.) (ग्रं०) सूर्य.

**हैगई, गय, गयी** (स्त्री. ना.) हयगई.

**हैबत** (स्त्री. ना.) भीती, धाक.

**हैराण** (अर० वि०) दुखणें, बाहणें, श्रम इ० योगानें ज्याचे अंगीं ईषत्‌ही सामर्थ्य राहिलें नाहीं अतएव थकला, व्याकूळ झाला जो तो.

**हैहय** (स. पु. ना.) (ग्रं०) सहस्रार्जुनास म्हणतात.

**हो** (अव्य०) होय. २ कोणेक प्रवृत्तीविषयीं कोणेकाचे अंगीं आरंभ असतां जो वेग तो आटोपून स्तब्ध रहा अशी जी त्या दुसऱ्यास करावयाची प्रेरणा तिचें सूचक हें अव्यय. ३ अहो ४ कोणेकास कांहीं गोष्ट हटकून सांगावयाची असतां त्या वाक्यापुढें कि० त्यांतील क्रियापदापुढें याचा योग होतो. उ० सावकाश जेव हो, सांगितलेलें काम कर हो.

**होआवें** — व्हावें.

**होईक** (न. ना.) (ग्रं०) होष्यमाण.

**होऊन** (अव्य०) इतराचे प्रेरणेवांचून आपलेआपण, तत्तदर्थवाचक शब्दापुढें याचा प्रयोग. उ० तो होऊन जर मुलगी द्यावयास आला तर करीन; मी होऊन जाणार नाहीं.

**होकरणें** (धा. ना.) (ग्रं०) बोलावणें, हाक मारणें.

**होका** (पु. ना.) पूर्वादि दिशासाध-

नाचे उपयोगी लोहचुंबकाचें एक यंत्र आहे.

**होकार** (पु. ना.) हुकार.

**होकारणें** (धा. ना.) बोलावणें.

**होगा** (वि०) अंगीं तादृश आवश्यक शक्ति नाहीं, मंद, आळशी असा जो मनुष्य तो. २ दांडगा जो मनुष्य त्यास म्हणतात.

**होगाडणें** (धा. ना.) कोणेकास अधिकारादिकांवरून घालविणें. २ हाकणें. [निद्रा.

**होड** (स्त्री. ना.) पैज. २ (ग्रं०) प्र-

**होडकी, होडकें** (स्त्री. न. ना.) लहान जी होडी ती. तें. २ प्रसंगीं लघुत्व मानून होडी, मचवा यांसही म्हणतात.

**होडगें** (न. ना.) होडकी.

**होडा** (पु. ना.) खळगा.

**होडी** (स्त्री. ना.) मोठें एक लाकूड खोदून त्याचें जें जलयान करीत असतात ती.

**होतकर, करू** (वि०) विद्वत्ता, पुष्टि इ० जे गुण ते थोडथोडे कोणेकाचे अंगीं प्रकट होऊं लागल्यामुळें हा त्या गुणांनीं उत्तरोत्तर वाढत वाढत विवक्षित योग्यतेस पावेल असें वाटावयाजोगा मनुष्य, पशु, वृक्ष इ० तो.

**होतव्य** (न. ना.) भवितव्य. [णारा.

**होता** (सं. पु. ना) (ग्रं०) हवन क-

**होन** (पु. ना.) सुमारें चार रुपयांचे किमतीचें एक सोन्याचें नाणें आहे.

**होनेंणें** (धा. ना.)(ग्रं०) होऊन जाणें.

**होपळ** (वि०) पोकळ. २ निरर्थक.

**होय** (अव्य०) कोणेकानें काहींएक गोष्ट सांगितली असतां तद्विषयींचे मान्यतेचें जें उत्तर किं० कोणेकानें काहीं गोष्ट विचारली असतां ती गोष्ट ह्मणतोस तशीच आहे ह्मणून सांगायाचें जें उत्तर त्याचें बोधक हें अव्यय.

**होयबा, होयाबा** (पु. ना.) कोणी काहीं गोष्ट सांगितली असतां त्यांतील गुण दोष न पाहतां होय होय ह्मणण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**होरणें** (धा. ना.) कोणेक स्थळचा खळगा, विहीर, किं० शरीरावरील क्षत, छिद्र इ० मृत्तिका इ०कांनीं भरें असें करणें. २ अलंकार इ०कांनीं शरीरावयवादि व्याप्त करणें.

**होरपळणें, पाळणें** (धा. ना.) हुरपळणें.

**होलपटणें** (धा. ना.) फळ पाडणें इ०कांसाठीं वृक्षादिकांवर होलपाटा फेकणें किं० तद्द्वारा आम्रफलादि प्रहारविशिष्ट करणें. २ (न. ना.) होलपाटा.

**होलपाटा** (पु. ना.) वृक्षादिकांवरील फलादि पाडण्यासाठीं वर भिरकावयाकरितां घेतात जो हातें दोन हात लांब लाकडाचा तुकडा तो.

**होष** (अर० पु. ना.) काहींएक कर्तव्य गोष्टीविषयीं जो कोणेकास उत्साहविशेष असतो तो. २ कोणेक प्रसंगीं कोणेक कर्म करण्याविषयीं बुद्धीच्याठायीं असतें जें अवधान तें, परंतु संकटप्रसंगीं प्रयोग.

...ध्यमाण (न. ना.) होतव्य.

होहोखरेंच (अव्य०) कोणेक गोष्टीची अकस्मात् होणे जी स्मृति तिचा हा उद्गार आहे. [या अर्थी.

होळणें (धा. ना.) ओहोळणें. २ धुणें

होळाव (पु. ना.)(सं०) पालन.

हौद (अर० पु. ना.) उदकादि पदार्थ सांठवून ठेवायाकरितां दगड, विटा, चुना, इ०कांचें चतुष्कोणाद्याकारक जें पात्र करितात तो. २ पाणी तापवायाकरितां किं० ठेवायाकरितां जें तशाकार धातुमय पात्र करितात तो.

हौदा (हौद) (पु. ना.) हत्तीचे पाठीवर ठेवून आंत बसावयाकरितां हौदासारिखें आकारविशेषाचें काष्ठादिकांचें आसन करितात तो; ज्यावर छाया नसल्ये. २ तालीमखान्यांत कुस्ती खेळणें इ०कांसाठीं हौदासारिखी खळी करितात तीस ह्मणतात.

हौशा (वि० ) पाहिजे तशी ज्याची खुशाली, गाणें वजावणें, इ०कांनीं आपले मनाची हौस पुरविण्याचा ज्याचा स्वभाव तो.

हौस (अर० स्त्री. ना.) कोणेक गोष्टीविषयीं यामध्यें कांहीं चमत्कार आहे अशी भावना असल्यामुळें हें पाहावें, हें करावें, हें घ्यावें, हें भोगावें, इ० वाटायाजोगा जो अंतःकरणांत उत्साहविशेष असतो ती.

ऱ्हद (सं. पु. ना.) डोहमध्यमार्गी.

ऱ्हस्व (सं. वि०) विवक्षित प्रमाणाहून ज्याची लांबी किं० उंची कमी तो. २ ज्याच्या उच्चारणास एक मात्रात्मक काळ लागतो असे जे अ, इ, उ, ऋ, ऌ, हे स्वर ते प्रत्येकीं.

ऱ्हास (सं. पु. ना.) कांहीं एक गोष्ट किं० पदार्थ यांचा जो उत्तरोत्तर कमीपणा तो.

व्हावा (क्रि० ) पाहिजे या अर्थी हें क्रियापद; परंतु जो अपेक्षाविषय असतो त्याच्या लिंगानुरोधेंकरून याला लिंगकार्य होतें.

—ळ—

ळ— हा वर्ण चौतिसावें व्यंजन आहे. हा वर्ण आरंभीं असलेले शब्द नाहींत.

—क्ष—

क्ष— हा वर्ण पस्तिसावें व्यंजन आहे.

क्षइष्णु (वि०) क्षयिष्णु.

क्षण (स. पु. ना.) मुहूर्तात्मक कालाचा बारावा जो अंश तो. २ केवळ सूक्ष्म जो कालविभाग तो.

क्षणदाचर (सं. पु.ना.)(सं०)राक्षस.

क्षणभंगुर (सं. वि० ) या क्षणीं आहे पण असाच उत्तर क्षणीं असेल असा ज्याविषयीं विश्वास ठेवितां येत नाहीं असा जो संपत्ति, आयुष्य, देह, इ० नाशवंत पदार्थ तो.

क्षणक्षणां, क्षणीं (अव्य०) प्रतिक्षणीं.

क्षणिक (सं. वि. ) क्षणमात्र ज्याची स्थिति असे जें सुख, दुःख, इ० तें.

क्षणोक्षणीं (अव्य०) क्षणक्षणां.

**क्षत** (सं. न. ना.) व्रण. २ (वि०) शस्त्रादि लागल्यामुळें व्रणविशिष्ट झाला जो तो.

**क्षति** (सं. स्त्री. ना.) द्रव्यनाशादि झाल्यामुळे कोणेकाची होणें जी हानि ती. २ आपणास कोणी काहीं वाईट बोललें किं० अभक्ष्यभक्षण आपल्या हातून घडलें किं० द्रव्यादिकांचा नाश, अपहार, इ० काहीं वाईट झालें असतां चित्तास वाईट वाटवें असा जो अंतःकरणांत विकारविशेष उत्पन्न होतो तो.

**क्षपा** (सं. स्त्री. ना.)(ग्रं०) रात्र.

**क्षम** (सं. वि०) काहींएक कार्य करण्याविषयीं शक्त जो कर्त्रादि तो किं० शक्य जें कार्य तें.

**क्षमा** (सं. स्त्री ना.) कोणेकापासून आपलें अपराधादि अप्रिय झालें असतां तेणेंकरून होत असतो जो चित्तास क्षोभ तो न होऊं देतां त्या अप्रियाचें करितात जें सहन तें. २ सहिष्णुता. ३ पृथ्वी.

**क्षमापन** (सं. न. ना.) अपराधादिकेंकरून क्षुब्ध झाला जो कोणी त्यास गोड भाषण, आर्जव, इ०कें करून क्षमाविशिष्ट करण्याचा व्यापार तें.

**क्षमी** (सं. वि०) क्षमाशील.

**क्षय** (सं. पु. ना.) मरणें, जळणें, इ० कारणानें कोणेक अर्थाचा सर्वस्वीं किं० अंशतः होतो जो नाहींसेपणा तो. २ सूर्योदयानंतर प्रवृत्त जे तिथि, नक्षत्र, योग त्यांणीं दुसऱ्या सूर्योदयापूर्वीं संपावें असा जो त्यांचा होतो ऱ्हास तो. ३ क्षयरोग. ४ साठा संवत्सरांतील शेवटला संवत्सर तो.

**क्षयरोग** (सं. पु ना.) ज्याचे रोगानें शरीरांतील सर्व धातु उत्तरोत्तर क्षीण होत जातात असा एक रोग आहे.

**क्षयिष्णु** (सं. वि०) ज्याचा क्षय अवश्य व्हावयाचा अशा स्वभावाचा जो आयुष्य, संपत्ति, इ० कोणेक अर्थ तो.

**क्षयी** (सं वि०) क्षयरोगी.

**क्षर** (सं. वि०) अवयवशः क्षरून क्षरून नाहींसा व्हावा अशा स्वभावाचा कोणेक अर्थ तो.

**क्षरणें** (धा ना.) क्षरणविशिष्ट होणें.

**क्षांति** (सं. स्त्री. ना.) क्षमा.

**क्षार** (सं. पु ना.) मीठ, समुद्रोदक यांचे रसासारिखा सहा रसांतिल एक रस आहे. २ तादृश रसविशिष्ट जें सैंधव, पादेलोण, पापडखार, टाकणखार, इ० किं० केळीचे सोप, आघाडा, हळदीचें पान, इ० कांची राख इ० पदार्थ ते प्रत्येकीं. ३ (वि०) तादृश क्षार रसविशिष्ट जो समुद्रोदक, मीठ, किं० भौम्यपदार्थ इ० तो.

**क्षालन** (सं. न. ना.) प्रक्षालन.

**क्षाळण** (न. ना.) क्षालन.

**क्षाळणें** (धा. ना.) प्रक्षाळणें.

**क्षिति** (सं. स्त्री. ना.) पृथ्वी.

**क्षितिज** (सं. न. ना.) दृष्टिमर्यादावृत्त अ० जेथपावेतों आपली दृष्टि पोहोंचत्ये तशा प्रकारचें जें भूमीवरील स्थळ तें.

क्षिती (स्त्री. ना.) क्षितिद्वितीयार्थी.
क्षिप्र (सं. अव्य०) लौकर.
क्षिप्रा (सं.स्त्री.ना.) खिरीस ह्मणतात.
क्षीण (सं. वि०) क्षय होऊन नाहींसा झाला जो तो किं० अंशतः क्षय झाल्यामुळें अल्प शेष राहिला जो तो. २ कृश.
क्षीत (स्त्री. ना.) क्षितिद्वितीयार्थी. २ खातरप्रथमार्थी.
क्षीर (सं. न. ना.) दुग्ध. २ उदक. ३ अर्क, वड इ० कांचा पांढरा निघतो जो चीक तें. ४ खिरीस ह्मणतात.
क्षीरोदक (न. ना.) स्त्रियांस नेसायाचें उपयोगीं रेशिमाचें उंचें वस्त्र आहे, जें प्रायः ग्रंथीं प्रसिद्ध.
क्षीरोदकपाटोळा (पु. ना.) (ग्रं०) क्षीरोदक.
क्षुद्र (सं. वि०) आकारानें किं० योग्यतेनें लहान जो पदार्थ, मनुष्य इ० तो.
क्षुद्रघंटिका (सं. स्त्री. ना.) सोनें, रुपें, कांसें इ० धातूंचे भूषणादिकांस लावायाकरितां वाजायाजोगे हरभरा, करवंद इ० प्रमाणाचे, मण्याचे आकाराचे पोकळ जे पदार्थविशेष करितात ते प्रत्येकीं.
क्षुधा (सं. स्त्री. ना.) भूक.
क्षुब्ध (सं. वि०) क्षोभ पावला जो तो.
क्षुर (सं. पु. ना.) वस्त्रामुख्यार्थी.
क्षुरप्र (सं. पु. ना.) बाण.
क्षुल्लक (सं. वि०) योग्यतेनें केवळ हलका जो मनुष्य, कर्म, व्यापार, गोष्ट इ० तो.
क्षेत्र (सं. न. ना.) विवक्षित लांबीरुंदीनें विशिष्ट जो शेत, गृह इ० कांचे उपयोगी भूतलविभाग तें. २ लांबी, रुंदी किं० लांबी, रुंदी आणि उंची या प्रमाणानी विशिष्ट जो भूमि, पाषाण, काष्ठ, इमारत इ० अर्थ तें. ३ काशी, अयोध्या इ० स्थळें तीं प्रत्येकीं. ४ मनुष्यादिकांचें शरीर तें. ५ जी ज्याची बायको ती त्याचें; परंतु बीजारोपद्वारा संततिरूप फळ उत्पन्न होण्याविषयीं स्थलत्वेंकरून विवक्षा असतां प्रयोग.
क्षेत्रफल, फळ (सं. न. ना.) क्षेत्रनिष्ठ जी लांबी, रुंदी किं० लांबी, रुंदी आणि उंची एतद्रूप जें प्रमाण त्याची जी इयत्ता, जिचें परिज्ञान लांबीनें रुंदी गुणावी या रीतीकडून होतें तें. २ कोणेक व्यापारापासून येतें जें फळ तें; परंतु त्याची इतर व्यापारफलाशीं समता किं० विषमता यांचा विचार कर्तव्य असतां प्रयोग.
क्षेत्रसंन्यास (सं. पु. ना.) काश्यादि कोणेक पुण्यक्षेत्रीं राहून हें क्षेत्र सोडून मरणपर्यंत कोठें जावयाचें नाहीं असा जो कोणी धरितात नियम तो.
क्षेत्रस्थ (सं. वि०) काश्यादि क्षेत्रीं वास करणारा जो तो प्रायः ब्राह्मणाविषयीं प्रयोग.
क्षेत्रज्ञ (सं. पु. ना.) जीवात्मा.
क्षेप (सं. पु. ना.) प्रक्षेप. २ क्षेपक द्वितीयार्थी.
क्षेपक (सं. पु. ना.) कोणेक ग्रंथकाराचें ग्रंथांत इतरानें कोणी घातलें असतें जें श्लोकवाक्यादि तें. २ प्र-

हादिकांचें सिद्ध झालेलें जें गणित तें स्पष्ट भावें म्हणून त्यांत मिळवावा किं० उणा करावा अशाविषयीं सांगितला असतो जो अंकराशि तो ३ क्षेपणकर्त्ता जो तो. [मालिंगन.

**क्षेम** (सं. न. ना.) कल्याण. २

**क्षेमालिंगन** (न. ना.) (ग्रं०) मित्रादिकांस प्रीतीनें देतात जें आलिंगन तें

**क्षोणी** (सं. स्त्री. ना.) पृथ्वी.

**क्षोभ** (सं. पु. ना.) प्रकृत्यवस्थेच्या ठायीं स्थित जो कोणेक अर्थ त्यास कोणेक उपाधिसंबंधानें कांहीं वेग प्राप्त झाल्यामुळें त्याचे त्या अवस्थेचा होतो जो अन्यथाभाव तो. २ क्रोधावेशानें होतो जो अंतःकरणाचा अन्यथाभाव तो.

**क्षौर** (सं. न. ना.) वस्तऱ्यानें मस्तकादिसंबंधी केश काढण्याचा व्यापार तें.

**क्ष्मा** (सं. स्त्री. ना.) पृथ्वी.

**क्ष्वेड** (सं. न. ना.) विष.

---

## —ज्ञ—

**ज्ञ**— हा वर्ण छत्तिसावें व्यंजन आहे (पु. ना.) बुध नामा ग्रह तो. २ (वि०) जो ज्या अर्थातें जाणतो तो तज्ज्ञ. उ० शास्त्रातें जाणतो तो शास्त्रज्ञ, किंचिज्ज्ञ, सर्वज्ञ इ०.

**ज्ञप्ति** (सं. स्त्री. ना.) जाणीव.

**ज्ञप्तिचिन्मात्र** (सं. वि०) केवळ ज्ञानस्वरूप.

**ज्ञातव्य** (सं. वि०) ज्ञेय.

**ज्ञाता** (सं. वि०) कोणेक अर्थातें जाणणारा जो तो. २ (पु. ना.) सुज्ञ.

**ज्ञाति** (सं. पु. ना.) गोत्रज.

**ज्ञान** (सं. न. ना.) जाणीव. २तद्द्वारा कोणेक विषयाचें होतें ग्रहण तें. ३ त्या विषयग्रहणाच्या जाणिवेच्याठायीं फलित झाला असतो जो संस्कार तें. ४ चातुर्य. ५ ब्रह्मज्ञान.

**ज्ञानघन** (सं. वि०) परिपूर्ण ज्ञानस्वरूप तें.

**ज्ञानचक्षु** (सं. पु. ना.) बाह्येंद्रियाचा विषय नव्हे असा जो आत्मस्वरूपादि कोणेक अर्थ तो जाणण्याविषयीं समर्थ जें कोणेकाचें ज्ञान तो. (वि०) तद्विशिष्ट मनुष्यादि तो.

**ज्ञानदृष्टि** (सं. स्त्री. ना.) ज्ञानचक्षु.

**ज्ञानमात्र** (सं. वि०) ज्ञानस्वरूप.

**ज्ञानवल्ली** (स्त्री. ना.) भागेस म्हणतात.

**ज्ञानवायु** (सं. पु. ना.) एक वातरोग आहे जो झाला असतां अनेक प्रकारच्या बारीक मोठ्या कल्पना निघतात.

**ज्ञानशक्ति** (सं. स्त्री. ना.) (ग्रं०) ज्ञानेंद्रियपंचकास संज्ञा.

**ज्ञानी** (सं. वि० ) शास्त्रव्यवहारादिसंबंधीं विशिष्ट ज्ञान ज्यास आहे तो. २ (पु.) ब्रह्मज्ञानी.

**ज्ञानोपदेश** (सं. पु. ना.) आत्मज्ञानविषयक जो कोणेकास उपदेश करितात तो.

**ज्ञेय** (सं. वि०) जाणायास योग्य जो कोणेक विषय तो.

समाप्त.